# कुराण

## मराठी अनुवाद

अरबीतून उर्दूत अनुवादः

**मौलाना वहीदुद्दीन खान**

उर्दूतून मराठीत अनुवादः

**अब्दुर-रहमान चाऊस**

GOODWORD BOOKS

# अनुक्रमणिका


| सूरह (प्रकरणांची) नावे | | पृष्ठ क्र. |
|---|---|---|
| कुराण: एक परिचय | | ०५ |
| १. | अल-फ़ातिहा | १३ |
| २. | अल-बक़रह | १३ |
| ३. | आले इमरान | ६९ |
| ४. | अन-निसा | १०१ |
| ५. | अल-माइदा | १३५ |
| ६. | अल-अनआम | १६२ |
| ७. | अल-आराफ़ | १९१ |
| ८. | अल-अनफ़ाल | २२२ |
| ९. | अत-तौबा | २३५ |
| १०. | यूनुस | २६० |
| ११. | हूद | २७९ |
| १२. | यूसुफ़ | २९९ |
| १३. | अर-रअद | ३१७ |
| १४. | इब्राहीम | ३२७ |
| १५. | अल-हिज्र | ३३५ |
| १६. | अन-नहल | ३४३ |
| १७. | बनी इस्राईल | ३६२ |
| १८. | अल-कहफ़ | ३७९ |
| १९. | मरयम | ३९५ |
| २०. | ता० हा० | ४०५ |
| २१. | अल-अंबिया | ४१९ |
| २२. | अल-हज | ४३२ |
| २३. | अल-मोमिनून | ४४५ |
| २४. | अन-नूर | ४५५ |
| २५. | अल-फ़ुरक़ान | ४६७ |
| २६. | अश-शुअरा | ४७७ |
| २७. | अन-नम्ल | ४९१ |
| २८. | अल-क़सस | ५०२ |

| सूरह (प्रकरणांची) नावे | | पृष्ठ क्र. |
|---|---|---|
| २९. | अल-अन्कबूत | ५१६ |
| ३०. | अर-रूम | ५२६ |
| ३१. | लुक़मान | ५३३ |
| ३२. | अस्-सजदा | ५३९ |
| ३३. | अल-अहज़ाब | ५४३ |
| ३४. | सबा | ५५५ |
| ३५. | फ़ातिर | ५६४ |
| ३६. | या० सीन० | ५७२ |
| ३७. | अस-साफ़्फ़ात | ५७९ |
| ३८. | सॉद | ५८९ |
| ३९. | अज़-ज़ुमर | ५९७ |
| ४०. | अल-मोमीन | ६०९ |
| ४१. | हा० मीम० अस-सजदा | ६२१ |
| ४२. | अश-शूरा | ६२८ |
| ४३. | अज़-ज़ुखरुफ़ | ६३७ |
| ४४. | अद्-दुख़ान | ६४५ |
| ४५. | अल-जासिया | ६४९ |
| ४६. | अल-अहक़ाफ़ | ६५३ |
| ४७. | मुहम्मद | ६६० |
| ४८. | अल-फ़त्ह | ६६५ |
| ४९. | अल-हुजुरात | ६७१ |
| ५०. | क़ाफ़० | ६७४ |
| ५१. | अज़-ज़ारियात | ६७८ |
| ५२. | अत-तूर | ६८२ |
| ५३. | अन-नज्म | ६८६ |
| ५४. | अल-क़मर | ६८९ |
| ५५. | अर-रहमान | ६९३ |
| ५६. | अल-वाक़िआ | ६९७ |
| ५७. | अल-हदीद | ७०२ |

५८. अल–मुजादला ७०७
५९. अल–हश्र ७१२
६०. अल–मुम्तहिना ७१६
६१. अस–सफ़्फ़ ७२०
६२. अल–जुमुआ ७२२
६३. अल–मुनाफ़िक़ून ७२४
६४. अत–तग़ाबून ७२५
६५. अत–तलाक़ ७२८
६६. अत–तहरीम ७३१
६७. अल–मुल्क ७३३
६८. अल–क़लम ७३७
६९. अल–हाक़्क़ा ७४०
७०. अल–मआरिज ७४३
७१. नूह ७४५
७२. अल–जिन्न ७४८
७३. अल–मुज़्ज़म्मिल ७५०
७४. अल–मुद्दस्सिर ७५२
७५. अल–क़ियामह ७५५
७६. अद–दह्र ७५७
७७. अल–मुरसलात ७५९
७८. अन–नबा ७६१
७९. अन–नाज़िआत ७६३
८०. अबस ७६५
८१. अत–तकवीर ७६७
८२. अल–इनफ़ितार ७६८
८३. अल–मुतफ्फिफ़ीन ७६९
८४. अल–इनशिक़ाक़ ७७१
८५. अल–बुरूज ७७२
८६. अत–तारिक़ ७७३
८७. अल–आला ७७४
८८. अल–ग़ाशियह ७७५
८९. अल–फज्र ७७६
९०. अल–बलद ७७७
९१. अश–शम्स ७७८
९२. अल–लैल ७७९
९३. अज़–ज़ुहा ७७९
९४. अल–इनशिराह ७८०
९५. अत–तीन ७८०
९६. अल–अलक़ ७८१
९७. अल–क़द्र ७८२
९८. अल–बय्यिनह ७८२
९९. अज़–ज़िल्ज़ाल ७८३
१००. अल–आदियात ७८४
१०१. अल–क़ारिआ ७८४
१०२. अत–तकासुर ७८५
१०३. अल–अस्र ७८५
१०४. अल–हु–म–ज़ह ७८५
१०५. अल–फ़ील ७८६
१०६. क़ुरैश ७८६
१०७. अल–माऊन ७८७
१०८. अल–कौसर ७८७
१०९. अल–काफ़िरून ७८७
११०. अन–नस्र ७८८
१११. अल–लहब ७८८
११२. अल–इख़लास ७८८
११३. अल–फ़लक़ ७८९
११४. अन–नास ७८९

# कुराण: एक परिचय

कुराण ईश्वरीय ग्रंथ आहे. सातव्या शतकाच्या पूर्वार्धात कुराण ईश्वराकडून मुहम्मद बिन अब्दुल्लाह बिन अब्दुल मुतल्लिब यांच्याकडे प्रकट केला गेला. कुराण आपल्या मूळ अरबी भाषेत आजपावेतो पूर्णपणे सुरक्षित आहे. कुराण सर्वार्थाने एक सुरक्षित ईश्वरीय ग्रंथ आहे. कुराणाच्या text मध्ये कोणत्याही प्रकारे ना वाढ झालेली आहे, ना घट झालेली आहे.

कुराणाची मांडणी अशी आहे की, त्यामध्ये स्वत: मानवाचा निर्माता थेट (directly) मानवाला संबोधित आहे. आणि स्वत: कुराणाच्या वाचकालाही असाच अनुभव होतो की, त्याचा निर्माता प्रत्यक्ष त्याला उद्देशून असे सांगत आहे, 'हे मानवा, मी तुझा निर्माता व पालनकर्ता आहे. आणि तुला समजेल अशा भाषेत तुला संबोधित आहे, तू माझ्या संदेशांना लक्षपूर्वक ऐक आणि त्यांचे अनुसरण कर. कारण यामध्येच तुझे कल्याण आहे. आणि याद्वारेच तू आपल्या जीवनाला खऱ्या अर्थाने सार्थक बनवू शकतोस.'

कुराणात लहान–मोठी एकूण ११४ प्रकरणे आहेत आणि ६२३६ संदेशवचने आहेत. प्रत्येक प्रकरणाच्या सुरुवातीला (फक्त एक प्रकरण अपवाद वगळता), हे वाक्य असते, 'आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.' अशाप्रकारे कुराणाच्या प्रत्येक प्रकरणातून आणि एकंदरीत संपूर्ण कुराणातून हेच व्यक्त होते की, 'कुराण' ईश्वरीय कृपेचे प्रकटीकरण आहे. कुराण अवतीर्ण होणे म्हणजे ईश्वरीय कृपा अवतीर्ण होणे आहे. पण ही कृपा पावसासारखी नसते की, ज्यापासून प्रत्येक स्त्री–पुरुष आपोआप लाभान्वित होईल. कुराणापासून खऱ्या अर्थाने केवळ तो माणूस लाभान्वित होईल, जो पूर्णपणे एकाग्रचित्त होऊन त्यावर चिंतन करेल आणि अभ्यासू वृत्तीने त्यात मार्गदर्शनाचा शोध घेईल.

# ईश्वरवाणी

वस्तुस्थिती ही आहे की, कुराण ईश्वरातर्फे सावधानतेचा इशारा देणारा ग्रंथ आहे. तसेच तो बोधपर गोष्टींनी व उपदेशांनी ओतप्रोत असा ग्रंथ आहे. कुराण सर्वसाधारणपणे साहित्यिक तऱ्हेने रचना केलेला ग्रंथ नव्हे, तर तो शहाणपणाचे धडे (lessons of wisdom) देणारा ग्रंथ आहे. कुराणाचा उद्देश असा आहे की, कुराणाचा वाचक त्यातील केवळ एक पृष्ठ जरी वाचेल किंवा एक वाक्य ऐकेल, तरीदेखील त्यात त्याला एक चिंतन करायला लावणारा संदेश आढळेल.

कुराण एकाप्रकारे कृपावंताकडून प्रदान केल्या जाणाऱ्या कृपाप्रसादांची आठवण करून देतो. ईश्वराने मानवाला अपवादात्मक गुणांसहित निर्माण केले आहे. मग त्याला पृथ्वीसारख्या ग्रहावर वसविले, जिथे मानवासाठी आवश्यक अशीच जीवनदायी व्यवस्था आहे. कुराणाचा उद्देश असा आहे की, निसर्गातील सर्व कृपाप्रसादांचा उपभोग करताना, मानवाने ते देणाऱ्याची जाण ठेवावी, तसेच हे सर्व देणाऱ्याप्रति मनापासून आभार व्यक्त करावा. या सर्व कृपाप्रसादांपासून लाभान्वित होताना, आभार मानणे व आपले कर्तव्य पूर्ण करणे म्हणजेच शाश्वत स्वर्गात प्रवेशास पात्र ठरणे होय. पण त्यांपासून लाभान्वित होताना, त्या देणाऱ्याकडे दुर्लक्ष करणे, हे कृत्य माणसाला नरकात प्रवेशास पात्र ठरवते. कुराण, खरेतर याच सर्वात मोठ्या वास्तवाची आठवण करून देणारा मार्गदर्शक–ग्रंथ आहे.

कुराणातील मानवाला उद्देशून बोलण्याची पद्धत एकमेवाद्वितीय अशीच आहे. त्यासंबंधाने असे म्हणणे अगदी खरे ठरेल की, त्यातील संबोधन पद्धत शाही स्वरूपाची आहे. कुराणाचे अध्ययन करताना वाचकाला असे वाटू लागते

की, जसे कुराणाचा लेखक एका सर्वोच्च अशा स्थानी आहे, जिथून तो संपूर्ण मानवजातीवर नजर ठेवून आहे, संपूर्ण मानवजात त्याचा विषय (concern) आहे. तो आपल्या सर्वोच्च स्थानावरून संपूर्ण मानवजातीस संबोधित आहे, पण संबोधित असताना त्याचे संबोधन कधी एका समूहाला उद्देशून असते, तर कधी दुसऱ्या समूहाला.

कुराणाचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे, त्याचा वाचक कोणत्याही क्षणी त्याच्या लेखकाशी संपर्क करू शकतो. कुराणाचा लेखक ईश्वर आहे. तो जिवंत ईश्वर आहे. त्याने आपल्या ज्ञानाने व शक्तीने सर्व लोकांना वेढून ठेवलेले आहे. तो प्रत्यक्षरित्या प्रत्येक माणसाचे म्हणणे ऐकतो आणि त्याच्या प्रश्नाचे त्याला उत्तर देतो. म्हणूनच कुराणाच्या वाचकासाठी प्रत्येक क्षणी हे शक्य आहे की, तो ईश्वराशी संपर्क करू शकतो. आणि तो ईश्वराला प्रश्न विचारून त्याचे उत्तर प्राप्त करू शकतो.

कुराण विश्वाच्या निर्मात्याचा परिचय होय. कुराण हे दर्शवितो की, एक ईश्वर आहे, ज्याने हे विश्व निर्माण केले आहे. आणि तोच या विश्वाचा सातत्यपूर्वक सांभाळ करत आहे. केवळ तोच सर्वप्रकारे सामर्थ्यशाली आहे. मानवाचे वर्तमान, भूत व भविष्य फक्त त्याच्याच अखत्यारीत आहे. असा केवळ तोच आहे. त्याच्यासारखा दुसरा कोणीच नाही. तो निरंतर जिवंत आहे. त्याच्या नियंत्रणाबाहेर कोणीच नाही — काहीच नाही.

## ईश्वराची निर्माण योजना

ईश्वराच्या परिचयाव्यतिरिक्त कुराणात ज्या गोष्टीला विशेष महत्त्व देण्यात आलेले आहे, ती म्हणजे — ईश्वराची निर्माण योजना (The creation plan of God) आहे. जी माणसासाठी स्पष्ट करण्यात आलेली आहे.

अशाप्रकारे कुराण मानवाला त्या गोष्टीची जाणीव करून देत आहे, जी मानव केवळ आपल्या प्रयत्नांद्वारे जाणू शकत नाही. कुराण मानवाला, त्याच्याशी संबंधित सर्व मूलभूत प्रश्नांची उत्तरे देतो. जसे मी कोण आहे? माझ्या निर्मितीचा उद्देश काय आहे? या जगाशी माझा संबंध काय आहे, ज्यामध्ये मी आहे? जीवन का आहे? आणि मृत्यू का आहे? मृत्यूपूर्वी मला काय करावयाचे आहे? आणि मृत्यूनंतर माझ्यासमोर काय येणार आहे? ती कोणती गोष्ट आहे, जिच्याशी प्रतिबद्ध होऊन मी यशस्वी होऊ शकतो? आणि त्या कोणत्या गोष्टी आहेत, ज्या माझ्या अपयशासाठी कारणीभूत ठरतील? या प्रश्नांचा थेट संबंध ईश्वराच्या निर्माण योजनेशी आहे. आणि याच ईश्वरीय निर्माण योजनेशी मानवाला अवगत करणे, हाच कुराणाचा उद्देश आहे.

याच अनुषंगाने पैगंबराचाही कुराणाशी थेट संबंध आहे. पैगंबर, त्याला ईश्वराकडून प्राप्त संदेशांना पूर्ण जबाबदारीच्या भावनेने लोकांपर्यंत पोचवतो. आणि तो स्वत: ईश्वरीय मार्गदर्शनानुसार आपले पूर्ण जीवन अशाप्रकारे व्यतीत करतो की, तो लोकांसाठी, कुराणानुसार जीवन व्यतीत कसे करायचे, यासंबंधाने एक व्यावहारिक उदाहरण (practical demonstration) बनतो. 'कुराण' एक विचारधारा असलेला ग्रंथ आहे, तर पैगंबर स्वत: त्या विचारधारेचा व्यावहारिक नमुना आहे. कुराणास चांगल्याप्रकारे समजण्यासाठी कुराणाच्या अध्ययनासह पैगंबराच्या जीवनाचेही अध्ययन करणे तितकेच आवश्यक आहे.

कुराणानुसार, मानव एक अनंतकालीन जगणारा प्राणी आहे. पण त्याच्या जीवनाला दोन भागांमध्ये विभागून टाकण्यात आले आहे. मृत्यूपूर्वीचा जीवनकाल (pre-death period) आणि मृत्यूनंतरचा जीवनकाल (post-death period) असे दोन भाग आहेत. मृत्यूपूर्वीचे जीवन, कर्मरूपी पेरणी करण्यासाठी

आहे आणि मृत्यूनंतरचे जीवन आपल्या कर्मांचा मोबदला प्राप्त करण्यासाठी आहे. या जगात मानवासाठी यशस्वी धोरण हे आहे की, त्याने ईश्वराच्या या निर्माण योजनेला जाणून घ्यावे आणि त्यानुसारच आपल्या जीवनाचे नियोजन करावे.

सध्याच्या जगात मानव पूर्णपणे स्वतंत्र आहे. पण हे स्वातंत्र्य बक्षीसरूपी नसून परीक्षेरूपी आहे. मृत्यूपूर्वीच्या कालखंडात ही परीक्षा पाहिली जात आहे की, कोण आपल्या स्वातंत्र्याचा सदुपयोग करतो आणि कोण दुरुपयोग करतो. आपल्या स्वातंत्र्याचा योग्य उपयोग करणे म्हणजे, स्वेच्छेने स्वत:ला ईश्वरीय शिस्तीत बांधून टाकणे होय. असेच लोक मृत्यूनंतरच्या जीवनात चिरकालीन सुखांच्या स्वर्गात स्थान प्राप्त करतील. आणि जे लोक आपल्या स्वातंत्र्याचा दुरुपयोग करतील, त्यांना मृत्यूनंतरच्या जीवनात नरकात फेकून दिले जाईल. स्वर्ग अनंतकालीन सुखांचे स्थान आहे, आणि नरक अनंतकालीन दु:खांचे स्थान आहे.

सध्याचे जग मानवाकरिता सर्व बाजूंनी अनुकूल असे जग आहे. येथे परिपूर्ण अशी जीवनदायी व्यवस्था (Life Support System) स्थापित करण्यात आलेली आहे. पण कुराणानुसार हे जग अशाचप्रमाणे कायमस्वरूपी राहणार नाही. तर या जगाच्या निर्मात्याने, ज्याप्रमाणे प्रत्येक स्त्री व पुरुषाचे वय निश्चित केलेले आहे. त्याचप्रमाणे या जगाचीही एक निर्धारित अवधी आहे. पृथ्वी हे ग्रह व सूर्यमाला (Solar System) अशाचप्रमाणे नेहमीसाठी राहणारे नाहीत. कुराणात हे स्पष्ट शब्दांत सांगितलेले आहे की, ईश्वरीय योजनेनुसार जेव्हा ठरावीक कालावधी समाप्त होईल, तेव्हा या जगाला आणि या सर्व व्यवस्थेला संपुष्टात आणले जाईल. आणि त्यानंतर ईश्वर आपल्या सामर्थ्याने

एक नवे जग निर्माण करेल. हे दुसरे जग, एक परिपूर्ण व चिरकालीन जग असेल या दुसऱ्या जगाचे नियम, या सध्याच्या जगापेक्षा भिन्न असतील.

सध्याच्या जगात मानवाला स्वातंत्र्य मिळालेले आहे, पण यानंतरच्या जगात ईश्वराचे प्रत्यक्ष नियंत्रण असेल. त्या जगात ईश्वर पूर्णपणे न्याय (Perfect Justice) स्थापित करेल. यानंतरच्या जगात त्या सर्व हकिगती उघड होतील, ज्यांच्यावर परीक्षेच्या उद्देशाने सध्या पडदा ठेवण्यात आलेला आहे.

ज्या लोकांना कुराणाच्या साहाय्याने सत्याची अनुभूती होते, त्यांना कुराण द्विसुत्रीय कार्यक्रम (two-point programme) देतो. पहिला म्हणजे, आपल्या जीवनात ईश्वरीय आदेशांचे काटेकोर पालन करणे आणि दुसरा म्हणजे, इतरांना या ईश्वरीय मार्गदर्शनाची जाणीव करून देणे. ईश्वरीय मार्गदर्शनानुसार जीवनाची सुरुवात सत्याच्या शोधापासून होते. एखादा कोणी जेव्हा कुराणाच्या साहाय्याने सत्यापर्यंत पोहोचतो, तेव्हा त्याच्यामध्ये एकाप्रकारे मानसिक क्रांती घडते, त्याचे विचार बदलतात. त्याच्या आवडी–निवडी संबंधाने त्याचा दृष्टिकोनच बदलून जातो. त्याचे जीवन आतून व बाहेरून पूर्णपणे ईश्वरीय योजनेशी एकरूप होते. त्याची हीच ईश्वराविषयीची जाण (Realization of God), विविध व्यावहारिक रूपांत प्रकट होते, जसे ईश्वराचे स्मरण करणे, प्रार्थना करणे, नैतिक मूल्यांचे भान ठेवणे व ईश्वराकडे जाब देण्याची जाणीव ठेवून जीवन व्यतीत करणे इ.

सत्याचा शोध म्हणजे एखादी यांत्रिक घटना नव्हे, तर सत्याचा शोध म्हणजे जीवनाचे सत्य जाणून घेणे होय. आणि जो माणूस जीवनाचे सत्य जाणून घेतो, तो मग आपल्या स्वभावाच्या बळावर एक नवीन माणूस बनून समोर येतो. सत्याचा शोध एखाद्या माणसासाठी आपल्या जीवनाला पूर्णपणे U-turn

देण्यासारखे आहे. आणि तिथून एक असा प्रवास सुरू होतो, जसे एक नवीन उगवलेला वृक्ष आहे ज्याची नेहमी वाढ होत असते, ज्याच्या वाढीचा प्रवास कधीही संपत नाही.

### जिहाद: एक शांततापूर्ण वैचारिक संघर्ष

ज्यांना कुराणाच्या साहाय्याने सत्याचे ज्ञान प्राप्त झाले आहे, अशांना व्यावहारिक पातळीवर जे कर्तव्य पार पाडायचे असते ते, 'लोकांना ईश्वराकडे येण्याचे आवाहन करणे' हे आहे. म्हणजे ईश्वरीय सत्याशी इतरांना अवगत करणे होय. हे कार्य फार गंभीर स्वरूपाचे कार्य आहे. ज्यासाठी समर्पणभावाची आवश्यकता आहे. आणि म्हणूनच कुराणात या कार्यास 'जिहाद' या शब्दाने परिभाषित केलेले आहे. कुराणात, कुराणावर विश्वास ठेवणाऱ्यांना अशा शब्दांत आदेश देण्यात आलेला आहे की, या कुराणाच्या साहाय्याने तुम्ही इतरांशी जिहाद करा — सर्वोत्तम जिहाद.

कुराणानुसार, जिहाद पूर्णपणे एक अराजकीय कार्य आहे. जे सुरुवातीपासून शेवटपर्यंत पूर्णपणे शांततापूर्ण मार्गाचा अवलंब करूनच पार पाडले जाते. त्याचे ध्येय मानवाचे हृदयपरिवर्तन करणे आहे, आणि हृदयपरिवर्तनाचे कार्य शांततापूर्ण आवाहनाद्वारेच शक्य आहे. जबरदस्ती आणि हिंसेच्या मार्गाने ते कदापि शक्य नाही.

कुराणात युद्धाशी संबंधित काही संदेशवचने आहेत. पण कुराणानुसार, युद्ध केवळ अशा प्रसंगी योग्य आहे, जेव्हा ते बचावात केले जाणारे युद्ध असेल. याव्यतिरिक्त कोणत्याही इतर कारणाने युद्ध करणे अजिबात वैध नाही. कुराणानुसार युद्ध करणे केवळ क्वचित अपवाद असू शकते, परंतु शांती मात्र सदैव इच्छित आहे. कुराणात युद्धासंबंधी काही संदेशवचने आहेत, जी पूर्ण कुराणाच्या एक

प्रतिशत देखील नाहीत. ती वचन कायमस्वरूपा आदेश नसून, ते प्रासंगिक आदेश आहेत. ही वचने तेव्हा प्रकट झालेली आहेत, जेव्हा श्रद्धावंत व बिगर श्रद्धावंतांदरम्यान युद्धसदृश परिस्थिती (state of war) निर्माण झाली होती. ही युद्धजन्य परिस्थिती विरोधकांकडून झालेल्या सशस्त्र आक्रमणामुळे निर्माण झाली होती. पैगंबर साहेबांनी प्रत्येक वेळेस या आक्रमणाविरुद्ध युद्ध टाळण्यासाठी विविध प्रकारे प्रयत्न केले, आणि त्यात ते अनेक वेळा यशस्वी झाले. पण असे क्वचितच घडले की, युद्ध टाळण्याचे सर्व प्रकारचे प्रयत्न अयशस्वी ठरले आणि शेवटी मजबूर होऊन बचावात्मक (defensive) युद्धाचा पर्याय स्वीकारावा लागला.

आणि हे देखील समजणे आवश्यक आहे की, हे बचावात्मक युद्धदेखील स्थापित शासनाकडूनच केले जाऊ शकते. सुस्थापित शासना (Established State) व्यतिरिक्त इतर कोणत्याही N.G.O. ला युद्धाचा मार्ग अवलंबिण्याची अजिबात परवानगी नाही.

जे लोक Media द्वारे कुराणाविषयी जाणतात, त्यांना सर्वसाधारणपणे वाटते की, कुराण जिहाद शिकवणारा ग्रंथ आहे. आणि जिहाद म्हणजे हिंसेच्या साहाय्याने आपले इच्छित ध्येय साध्य करणे होय, असे ते समजतात. पण ही कल्पना पूर्णपणे चूक आहे. जो कोणी कुराणाचे स्वत: अध्ययन करेल, त्यास हे समजायला वेळ लागणार नाही की, कुराणाचा हिंसेशी कोणत्याही प्रकारे संबंध नाही, कुराण शांतीचे धडे देणारा ग्रंथ आहे, हिंसेचे नव्हे.

**वहीदुद्दीन खान**, नवी दिल्ली.
skhan@goodwordbooks.com

# सूरह–०१. अल–फातिहा

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 सर्व स्तुती फक्त अल्लाहसाठीच आहे, जो सर्व सृष्टीचा पालनकर्ता
आहे. 2 अत्यंत दयाळू व कृपाळू आहे. 3 न्यायाच्या दिवसाचा मालक आहे.
4 आम्ही फक्त तुझीच उपासना करतो आणि फक्त तुझ्याकडेच साहाय्याची
याचना करतो. 5 (हे प्रभू!) आम्हाला सरळ मार्ग दाखव. 6 अशा लोकांचा
मार्ग ज्यांच्यावर तुझा कृपावर्षाव झाला. 7 आम्हाला नको त्यांचा मार्ग ज्यांच्यावर
तुझा प्रकोप झाला आणि जे मार्गभ्रष्ट झाले.

# सूरह–०२. अल–बक़रह

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 अलीफ० लाम० मीम० 2 हा अल्लाहचा ग्रंथ आहे, यात मुळीच शंका
नाही. मार्गदर्शन आहे अल्लाहची जाण असणाऱ्यांसाठी. 3 जे श्रद्धा ठेवतात
(मानवी आकलनापलीकडील) अदृश्यावर, आणि अढळपणे प्रार्थना करीत
असतात, आणि जे काही आम्ही त्यांना दिले आहे, त्यातून (इतरांवर) खर्च
करीत असतात. 4 आणि (पैगंबर!) जो ग्रंथ तुम्हाला प्रदान करण्यात आला व
जे ग्रंथ तुमच्यापूर्वी (इतर पैगंबरांना) प्रदान करण्यात आले, सर्वांवर दृढ
विश्वास ठेवतात आणि मरणोत्तर जीवनावरही अढळ श्रद्धा ठेवतात. 5 हेच
लोक आपल्या पालनकर्त्याने दाखवलेल्या सरळ मार्गावर आहेत. हेच लोक
यशस्वी होणार आहेत.

6 जे सत्याचा अस्वीकार करण्यावर ठाम आहेत, त्यांच्यासाठी दोन्ही गोष्टी
सारख्याच आहेत की, तुम्ही त्यांना सावध करा अथवा करू नका, ते (कदापि)
श्रद्धा धारण करणार नाहीत. 7 अल्लाहने त्यांच्या मनांना, कानांना सील केले

आहे, त्यांच्या डोळ्यांवर पडदा पडलेला आहे. त्यांच्यासाठी फार मोठी शिक्षा
आहे.

8 आणि लोकांत असेही आहेत जे म्हणतात, 'आम्ही अल्लाह व (न्यायाच्या)
अंतिम दिवसावर विश्वास ठेवतो.' पण वस्तुत: ते विश्वास ठेवणारे नाहीत. 9 ते
अल्लाहची व श्रद्धावंतांची फसवणूक करू पाहतात, वस्तुत: ते स्वत:चीच
फसवणूक करत आहेत. पण या गोष्टीची त्यांना जाण नाही. 10 त्यांच्या
अंत:करणात एक रोग आहे आणि अल्लाहने त्यांचा रोग आणखी वाढवला.
त्यांच्यासाठी यातनामयी शिक्षा आहे, यासाठी की, ते जाणीवपूर्वक खोटे बोलत
आहेत. 11 आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते, 'पृथ्वीवर अराजकता निर्माण
करण्याला कारणीभूत ठरू नका.' तेव्हा ते म्हणतात, 'आम्ही तर शांततेचे
प्रवर्तक आहोत.' 12 सावधान! हेच लोक अनाचारी आहेत. पण त्यांना या
गोष्टीची जाणीव नाही. 13 आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते, 'इतर
श्रद्धावंतांप्रमाणेच तुम्ही सुद्धा श्रद्धावंत बना.' तर ते म्हणतात, 'आम्ही मूर्ख
लोकांप्रमाणे श्रद्धावंत बनायचे की काय?' सावधान! वस्तुत: हेच लोक मूर्ख
आहेत, पण ते (स्वत:च्या मूर्ख असण्याविषयी) अनभिज्ञ आहेत. 14 आणि
जेव्हा ते श्रद्धावंतांना भेटतात, तेव्हा म्हणतात आम्हीही श्रद्धा ठेवतो, पण जेव्हा
आपल्या सैतानी साथीदारांना भेटतात, तेव्हा ते म्हणतात, 'आम्ही तर तुमच्या
सोबतच आहोत. त्या लोकांबरोबर (म्हणजे श्रद्धावंतांबरोबर) तर आम्ही केवळ
थट्टा करीत असतो.' 15 अल्लाह त्यांना त्यांच्या थट्टा करण्याच्या कृत्याची शिक्षा
देण्यासाठी, त्यांच्या बंडखोरीला वाव देत आहे, अर्थातच ते अंधकारात भरकटत
आहेत. 16 हे असे लोक आहेत ज्यांनी सन्मार्गाऐवजी कुमार्गाचा अंगीकार
केला, ना त्यांचा हा व्यवहार फलदायी ठरला, ना त्यांना (इतरत्र) मार्गदर्शन
प्राप्त झाले.

17 त्यांची अवस्था त्या माणसासारखी आहे — ज्याने अग्नी प्रज्वलित

केला, आणि जेव्हा त्या अग्नीमुळे सभोवतालचा परिसर प्रकाशमान झाला, तेव्हा अल्लाहने त्याच्या डोळ्यातील ज्योत काढून घेतली आणि त्यांना निखालस अंधकारमय अवस्थेत सोडून दिले, परिणामी त्यांना काहीही दिसत नाही. 18 ते बहिरे, मुके आणि आंधळे आहेत, ते (आता सन्मार्गाकडे) परतणार नाहीत. 19 किंवा त्यांची अवस्था अशी आहे, जसे आकाशातून तुफान पर्जन्यवृष्टी होत आहे, भयंकर काळोख आहे, विजांचा लखलखाट व गडगडाट होत आहे. विजांच्या कडकडाटामुळे मृत्यूच्या भीतीपोटी ते आपली बोटे आपल्या कानात घालतात. पण अल्लाहने सत्य नाकारणाऱ्यांना सर्व बाजूंनी वेढून ठेवले आहे. 20 विजेच्या लखलखाटामुळे त्यांची अवस्था अशी होत आहे की, जसे त्यांची दृष्टी हिरावून घेतली जात आहे. जेव्हा वीज त्यांच्यावर चमकते, तेव्हा ते त्या प्रकाशात चालू लागतात आणि जेव्हा सभोवार अंधार होतो, ते स्तब्ध उभे राहतात. अल्लाहने इच्छिले, तर त्यांची ऐकण्याची व पाहण्याची क्षमता तो नाहीशी करू शकतो. निःसंशय अल्लाहला काहीही करण्याची शक्ती प्राप्त आहे.

21 लोकांनो! आपल्या पालनकर्त्याची उपासना करा, ज्याने तुम्हाला निर्माण केले आणि त्यांनाही निर्माण केले जे तुमच्या आधी होऊन गेले. ज्यामुळे तुम्ही सदाचारी व्हाल. 22 तोच तर आहे (तुमचा पालनकर्ता), ज्याने पृथ्वीला तुमच्या साठी विसाव्याचे ठिकाण बनविले आणि आकाशाला छत बनविले,. आणि वरून ढगांद्वारे पाण्याचा वर्षाव केला आणि त्याद्वारे तुमच्या उपजीविकेसाठी फळे निर्माण केली. तर तुम्ही इतरांना अल्लाहचे सहभागी ठरवू नका. 23 आणि आम्ही आमच्या सेवकाकडे (म्हणजे पैगंबर मुहम्मद यांच्याकडे), जे काही (ईश–संदेश) पाठविले आहे त्याविषयी तुमच्या मनात काही शंका असेल, तर तशाच गुणवत्तेचा एक अध्याय तुम्ही तयार करून प्रस्तुत करा, जर तुम्ही खरे असाल आणि या कार्यात मदत करण्यासाठी अल्लाहशिवाय कोणालाही बोलावून घ्या. 24 आणि जर तुम्ही ते करू शकले नाही, आणि तुम्ही ते कदापि करू

शकणार नाही, तर वाचवा स्वत:ला त्या आगीपासून ज्याचे इंधन 'माणसे व दगड' आहेत. जी सत्याला नाकारणाऱ्यांकरिता तयार करून ठेवलेली आहे.
25 आणि जे श्रद्धा बाळगून आहेत व सत्कर्मे करीत आहेत अशा लोकांना शुभवार्ता द्या. त्यांच्यासाठी अशा बागा आहेत ज्यांत पाण्याचे झरे प्रवाहित असतील. तिथे जेव्हा त्यांना खाण्यासाठी फळे दिले जातील, ते म्हणतील, ही तर तशीच फळे आहेत, जशी या पूर्वीदेखील आम्हाला देण्यात आली होती. त्यांना सारख्या दिसणाऱ्या वस्तू दिल्या जातील. त्यांच्यासाठी तिथे शुचिर्भूत जीवनसाथी असतील, आणि ते तिथे सदैव निवास करतील.

26 निःसंशय अल्लाहला यात मुळीच संकोच नाही की, तो मच्छराचे उदाहरण देतो किंवा त्यापेक्षाही क्षुद्र जिवाचे. जे श्रद्धा बाळगतात ते जाणतात की, हे सत्य आहे त्यांच्या पालनकर्त्याकडून. पण जे श्रद्धाहीन आहेत ते म्हणतात, 'या उदाहरणाद्वारे अल्लाहला काय सांगायचे आहे?' अल्लाह याद्वारे अनेकांना सन्मार्गापासून दूर करतो आणि अनेकांना सन्मार्ग दाखवतो. तो सन्मार्गापासून दूर करतो तर केवळ अवज्ञा करणाऱ्यांना.
27 ते अल्लाहशी करार स्थापित झाल्यानंतरही त्याचे उल्लंघन करतात. आणि ज्या गोष्टीला अल्लाहने जोडण्याचा आदेश दिला, तिचे तुकडे तुकडे करतात. आणि पृथ्वीवर उत्पात माजवितात. हेच ते लोक आहेत ज्यांच्या वाट्याला नुकसानाशिवाय दुसरे काही येणार नाही.
28 तुम्ही अल्लाहला मानण्यास नकार कसा काय देऊ शकता? (हे तर तुम्ही जाणून आहात की), तुम्ही तर निर्जीव अवस्थेत होता, तेव्हा त्याने तुम्हाला जीवन प्रदान केले. आणि तोच तुमचा मृत्यू घडवून आणेल, आणि मृत्यूनंतर तोच तुम्हाला पुन्हा जिवंत करेल. आणि नंतर तुम्हाला त्याच्याकडेच परत आणले जाईल.
29 तोच तर आहे (तुमचा पालनकर्ता), ज्याने या पृथ्वीवर जे काही आहे तुमच्यासाठी निर्माण केले. त्यानंतर तो आकाशाच्या निर्मितीकडे वळला आणि सात आकाशांची रचना केली. त्यालाच प्रत्येक गोष्टीचे परिपूर्ण

ज्ञान आहे.

30 जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने स्वर्गदूतांना सांगितले की, मी पृथ्वीवर उत्तराधिकारी नेमणार आहे. (पृथ्वीवर जिन्ननंतर मानवाला वसवण्यात आले.) तेव्हा ते म्हणाले, 'तू पृथ्वीवर अशांना वसवणार आहेस का जे अनाचार घडवतील आणि रक्तपात करतील? (हे प्रभू) आम्ही तर तुझ्या असीम महानतेचे व पावित्र्याचे गुणगान करतो!' अल्लाहने उत्तर दिले, 'तुम्ही ते जाणत नाही, जे मी
जाणतो.' 31 आणि अल्लाहने आदमला सर्व गोष्टींची नावे शिकविली. आणि त्या सर्वांना स्वर्गदूतांसमोर उपस्थित केले आणि म्हटले, 'तुमचे म्हणणे खरे असेल,
तर मला या सर्वांची नावे सांगा.' 32 त्यांनी उत्तर दिले, 'असीम आहे तुझी महिमा! जे ज्ञान तू आम्हाला प्रदान केले त्याव्यतिरिक्त आम्हाला कोणतेही ज्ञान नाही. निःसंशय तूच सर्व गोष्टींचा जाणकार आणि अस्सल बुद्धिमान आहेस.'
33 तेव्हा अल्लाहने सांगितले, 'हे आदम! त्यांना यांची नावे सांग.' जेव्हा आदमने (स्वर्गदूतांना) त्यांची नावे सांगितली. तेव्हा अल्लाहने म्हटले, 'मी तुम्हाला सांगितलं नव्हतं का? की, केवळ मीच जाणतो, पृथ्वी व आकाशातील सर्व गुपिते आणि ते सर्व (मीच) जाणतो, जे तुम्ही प्रकट करता आणि जे तुम्ही लपवता.'

34 आणि (ती वेळही आठवा) जेव्हा आम्ही स्वर्गदूतांना म्हटले, 'आदमसमोर (जो पहिला मानव होता) नतमस्तक व्हा,' तेव्हा ते सर्व (आज्ञेचे पालन करीत) नतमस्तक झाले, फक्त इब्लीस ला सोडून, अहंकारापोटी त्याने तसे करण्यास नकार दिला. अशाप्रकारे त्याने स्वत:ला त्या लोकांत सामील करून घेतले जे सत्याला नाकारतात.

35 आणि आम्ही म्हणालो, 'हे आदम, तू आणि तुझी पत्नी स्वर्गात राहा आणि त्यातून तुम्हाला जे काही खाण्याची इच्छा होईल, मुक्तपणे खा. पण ह्या एका वृक्षाच्या जवळ (कदापि) जाऊ नका, अन्यथा तुम्ही अत्याचारी बनाल.'

36 पण सैतानाने त्या वृक्षाचा बहकाविण्यासाठी साधनरूपी वापर करून, त्याद्वारे
दोघांना चूक करायला लावली. अशाप्रकारे त्याने त्यांना ते (ज्या सुखमयी
अवस्थेत) होते, त्या अवस्थेतून बाहेर काढण्यास तो कारणीभूत ठरला. आणि
आम्ही त्यांना म्हणालो, ‘उतरा इथून खाली, तुम्ही (इथून पुढे) एक दुसऱ्याचे
शत्रू असाल. आणि एका निर्धारित अवधीपर्यंत पृथ्वीवर तुम्हाला वास्तव्य व
निर्वाह करायचा आहे.’ 37 त्यानंतर आदमने आपल्या पालनकर्त्याकडून (प्रार्थनेचे)
काही शब्द शिकले, अल्लाहने त्याच्या पश्चात्तापाचा स्वीकार केला. तो
पश्चात्तापाचा स्वीकार करणारा व असीम कृपावंत आहे. 38 (तेव्हा) आम्ही
म्हणालो, ‘तुम्ही सर्वजण येथून खाली उतरा. आणि जेव्हा तुम्हाला माझ्याकडून
मार्गदर्शन प्राप्त होईल, मग जे माझ्या मार्गदर्शनाचे पालन करतील तर (मृत्यूनंतरच्या
जीवनात) ते ना कधी भयग्रस्त होतील, ना दु:खी होतील. 39 पण जे ‘सत्य’
नाकारण्यावर ठाम राहिले, आणि आमच्या संदेशांना खोटे ठरविले, असेच लोक
नरकाचे रहिवासी बनणे अटळ आहे, आणि ते नेहमीसाठी तेथेच राहतील.’

40 हे इस्राईलच्या वंशजांनो! आठवा, मी तुमच्यावर केलेल्या उपकारांना,
आणि माझ्याशी जो करार तुम्ही केला होता त्याचे पालन करा. माझा तुमच्याशी
जो करार आहे मी त्याची पूर्तता करीन. आणि केवळ माझेच भय बाळगा.
41 आणि त्यावर श्रद्धा ठेवा जे मी तुमच्यावर प्रकट केले, त्याद्वारे त्याची
सत्यता प्रमाणित होत आहे जे आधीपासून तुमच्यापाशी आहे. (त्यामध्ये येणाऱ्या
अंतिम पैगंबराचे भाकीत वर्तवलेले होते.) आणि म्हणून तुम्ही सर्वप्रथम सत्य
नाकारणारे बनू नका. आणि माझ्या संदेशवचनांच्या बदल्यात क्षुल्लक मूल्य घेऊ
नका आणि माझेच भय बाळगा. 42 आणि जाणूनबुजून सत्य व असत्याची
भेसळ करू नका आणि सत्य लपवू नका. 43 नित्य प्रार्थना करा (नमाज़ पढ़ा)
आणि ज़कात द्या. आणि (नमाज़ामध्ये) नमन करा नमन करणाऱ्यांसोबत.
44 तुम्ही लोकांना तर सत्कर्मे करायला सांगता, पण स्वत:च्या बाबतीत मात्र

तुम्हाला विसर पडतो. तुम्ही अल्लाहच्या ग्रंथाचे वाचन करता, तुम्ही बुद्धीचा उपयोग करीत नाही का? 45 अढळ सहनशीलता आणि प्रार्थना (नमाज़) यांद्वारे (अल्लाहकडे) साहाय्याची याचना करा. खरोखर, ही विनयशील लोकांव्यतिरिक्त इतर लोकांसाठी कठीण गोष्ट आहे. 46 ते विनम्र लोक ठाम विश्वास ठेवून आहेत की, ते आपल्या पालनकर्त्याला भेटणार आहेत. आणि त्याच्याकडेच ते परतणार आहेत.

47 हे इस्राईलच्या वंशजांनो! आठवा, मी तुमच्यावर केलेल्या उपकारांना. आणि (त्याचीही आठवण करा) की, मी तुम्हाला इतर सर्व लोकांपेक्षा अधिक गौरवपूर्ण स्थान दिले होते. 48 आणि त्या दिवसाचे भय (जाण) बाळगा, जेव्हा कोणताही जीव, दुसऱ्या जिवाच्या किंचितही उपयोगी पडणार नाही. ना त्यांच्याकडून कोणाची मध्यस्थी स्वीकारली जाईल, ना मोबदला घेऊन कोणाला सोडले जाईल. त्यांना कोणतेही साह्य लाभणार नाही. 49 आणि (ती वेळ आठवा) जेव्हा आम्ही फिरऔनच्या लोकांपासून तुमची सुटका केली. ज्यांनी तुमच्या मुलांची हत्या करून आणि तुमच्या मुलींना जिवंत ठेवून तुम्हाला असंख्य यातना दिल्या. आणि ती तुमच्या पालनकर्त्याने घेतलेली एक मोठी सत्त्वपरीक्षा होती. 50 आणि (त्या वेळेची आठवण करा) जेव्हा आम्ही तुमच्यासाठी समुद्र दुभंगला व तुमची सुटका केली आणि तुमच्या दृष्टीसमोर फिरऔनच्या लोकांना समुद्रात बुडवून टाकले. 51 आणि (त्या वेळेची आठवण करा) जेव्हा आम्ही मूसाला (सिनाई पर्वतावर) चाळीस रात्रींचे वचन दिले. त्याच्या अनुपस्थितीत तुम्ही (सोन्याने बनविलेल्या) त्या वासराला उपास्य बनविले. असे करून तुम्ही मोठा गुन्हा करणारे बनलात. 52 मग त्यानंतरही आम्ही तुम्हाला क्षमा केली यासाठी की, तुम्ही कृतज्ञ बनावे. 53 आणि (ती वेळही आठवा), जेव्हा आम्ही मूसाला (आमचा) ग्रंथ व (सत्य आणि असत्यामध्ये फरक करण्यासाठी) कसोटी प्रदान केली. अशासाठी की, तुम्हाला योग्य मार्गदर्शन लाभावे.

54 आणि जेव्हा मूसाने आपल्या लोकांना म्हटले, 'हे माझ्या समाजबांधवानो! तुम्ही वासराला उपास्य बनवून खरोखरच स्वत:वर अत्याचार केला आहात. तर आता (पश्चात्तापदग्ध होऊन) आपल्या निर्मात्याकडे वळा. स्वत:च्या हाताने स्वत:च्या लोकांमधील अपराध्यांची हत्या करा. तुमच्या निर्मात्याच्या दृष्टीने असे करणे तुमच्यासाठी चांगले आहे.' तेव्हा अल्लाहने तुमच्या पश्चात्तापाचा स्वीकार केला. निःसंशय तो वारंवार क्षमा करणारा आणि दयाळू आहे.
55 आणि (आठवा), जेव्हा तुम्ही म्हणाला होता की, हे मूसा! जोपर्यंत आम्ही अल्लाहला प्रत्यक्ष पाहत नाही, तोपर्यंत आम्ही तुझ्यावर कोणत्याही प्रकारे विश्वास ठेवणार नाही. त्यावेळेस एका विजेच्या कडकडाटाने तुम्हाला गाठले आणि
तुम्ही पाहतच राहिलात. 56 मग तुमच्या मृत्यूनंतर आम्ही तुम्हाला अशासाठी
पुन्हा जिवंत करून उभे केले की, तुम्ही कृतज्ञ व्हावे. 57 आणि आम्ही तुमच्यावर मेघांची सावली केली. आणि तुमच्यासाठी *मन्न* व *सलवा* (अल्लाहने प्रदान केलेले अन्न) पाठविले. (व म्हटले), 'खा त्या स्वच्छ व शुद्ध वस्तू ज्या आम्ही तुमच्यासाठी उपलब्ध केल्या.' त्यांनी आमचे काही नुकसान केले नाही, पण त्यांनी स्वत:चेच नुकसान करून घेतले.

58 आणि (ती वेळही आठवा), जेव्हा आम्ही असे म्हटले होते की, या भूभागात दाखल व्हा. आणि तिथे तुम्हाला जे काही खाण्याची इच्छा होईल ते भरपूर खा, पण त्याच्या प्रवेशद्वारातून नम्रतापूर्वक प्रवेश करा, आणि म्हणा, '(हे प्रभू!) आमच्या पापांचे ओझे आमच्यापासून दूर कर.' तेव्हा (निश्चितच) आम्ही तुमच्या अपराधांना क्षमा करू आणि सत्कर्मे करणाऱ्यांना भरपूर मोबदला
देऊ. 59 पण अत्याचारी लोकांनी त्यात बदल केला व असे वचन सांगायला सुरुवात केली की, जे आम्ही त्यांना सांगितलेल्या वचनाशी भिन्न होते. म्हणून आम्ही त्या अत्याचारी लोकांवर आकाशातून शिक्षा पाठविली. कारण ते अवज्ञा
करणारे लोक होते. 60 आणि (आठवा ती वेळ) जेव्हा मूसाने आपल्या

लोकांसाठी पाणी मागितले. तेव्हा आम्ही त्याला म्हणालो, ‘तुझी काठी (अमुक) खडकावर मार.’ मग त्यातून पाण्याचे बारा स्रोत उसळून बाहेर पडले. त्यामुळे प्रत्येक जातीसमूहाला आपापल्या पाणवठ्याची माहिती झाली. अल्लाहने जे काही दिलेले आहे ते खा आणि प्या आणि पृथ्वीवर दुष्कृत्य करून अनाचार माजवू नका. 61 आणि (ती वेळ आठवा) जेव्हा तुम्ही म्हणालात की, हे मूसा, एकाच प्रकारच्या खाद्यपदार्थाने आमचे अजिबात समाधान होणार नाही. म्हणून तू आपल्या पालनकर्त्याकडे प्रार्थना कर की, जमिनीतून ज्या वस्तू निघतात त्या, त्याने आमच्यासाठी निर्माण कराव्यात. जसे भाज्या, काकडी, गहू, मसूर आणि कांदा. तेव्हा मूसाने म्हटले श्रेष्ठ अशा वस्तूच्या बदल्यात तुम्ही निकृष्ट वस्तू घेऊ इच्छिता का? तर मग कोणत्यातरी शहरात जा, तुम्ही जे मागता ते तिथे मिळेल. तेव्हा त्यांना अपमान आणि विवशतेने ग्रासले आणि त्यांनी स्वत:वरच अल्लाहचा क्रोध ओढवून घेतला. याचे कारण असे होते की, त्यांनी अल्लाहच्या संदेशवचनांवर श्रद्धा ठेवली नाही. आणि अन्यायकारकपणे पैगंबरांची हत्या करीत असत. याचे कारण ते विद्रोह करणारे व मर्यादांचे उल्लंघन करणारे लोक होते.

62 इमानधारक (मुस्लिम), ज्यू, ख्रिश्चन व साबियन (यांपैकी) जे कोणी अल्लाहवर आणि (न्यायाच्या) अंतिम दिवसावर श्रद्धा ठेवून असतील आणि सत्कर्मे करत असतील. नि:संशय त्यांच्यासाठी त्यांच्या पालनकर्त्याकडे उचित मोबदला आहे. आणि तिथे त्यांना कसलेही भय असणार नाही, कसलेही दु:ख देखील त्यांच्या वाट्याला येणार नाही.

63 (इस्राईलच्या मुलांनो! ती वेळ आठवा), जेव्हा आम्ही तुमच्याकडून प्रतिज्ञा घेतली होती आणि ‘तूर’ पर्वताला तुमच्यावर उचलून धरले होते. (आणि म्हटले होते की), आम्ही जे काही तुम्हाला दिलेले आहे ते दृढतापूर्वक धरून ठेवा आणि त्यामध्ये जे (अल्लाहचे वचन) आहेत, ते चांगल्याप्रकारे

लक्षात ठेवा. असे करून तुम्ही स्वत:ला (दुष्कृत्यांपासून) वाचवू शकाल.
64 (या प्रतिज्ञेनंतर) तुम्ही त्याकडे पाठ फिरवलीत आणि जर अल्लाहची कृपादृष्टी आणि दया तुमच्यावर झाली नसती तर निश्चितच मोठे नुकसान तुमच्या वाट्याला आले असते.
65 आणि तुम्हाला त्या लोकांची हकिगत (चांगल्याप्रकारे) माहीत आहे जे तुमच्यापैकीच होते, ज्यांनी 'सबत' च्या (नियमाच्या) बाबतीत अल्लाहची अवज्ञा केली, त्यावर आम्ही त्यांना म्हणालो, 'तुच्छ माकडासारखे होऊन जा!'
66 अशाप्रकारे आम्ही या घटनेस त्या वेळेच्या लोकांसाठी आणि त्यानंतर येणाऱ्यांसाठी इशारा देणारे उदाहरण बनविले. आणि अल्लाहचे भय बाळगणाऱ्यांसाठी उपदेशाचे साधन बनविले.

67 आणि जेव्हा मूसा आपल्या लोकांना म्हणाला, 'अल्लाह तुम्हाला एक गाय (कालवड) बळी देण्याचा आदेश देत आहे.' ते म्हणाले, 'तू आमची चेष्टा करत आहेस की काय?' त्यावर मूसा म्हणाला, 'मी असा अज्ञानी बनू नये यासाठी मी अल्लाहकडे शरण इच्छितो.'
68 ते म्हणाले, 'तू आमच्यासाठी आपल्या पालनकर्त्याकडे प्रार्थना कर की, त्याने आम्हाला स्पष्ट करून सांगावे की, ती गाय कशी असावी?' (त्यावर) मूसा म्हणाला, 'अल्लाह म्हणतो, ती गाय अशी असावी की, ती म्हातारी ही असू नये व लहान वासरूही असू नये. तर ती या दोन्ही अवस्थांच्या मध्ये असलेली असायला हवी. तर आता तुम्हाला जो आदेश देण्यात आलेला आहे त्याचे पालन करा.'
69 ते म्हणाले, '(आमच्या वतीने) तू आपल्या पालनकर्त्याकडे प्रार्थना कर की, त्याने आम्हाला स्पष्ट करून सांगावे की, ती कोणत्या रंगाची असावी?' त्यावर मूसा म्हणाला, 'अल्लाह म्हणतो की, ती करड्या पिवळ्या रंगाची असावी तिचा रंग गडद असावा, ती पाहणाऱ्यांना आनंद देणारी असावी.'
70 ते म्हणाले, 'आमच्या वतीने तू आपल्या पालनकर्त्याकडे प्रार्थना कर की, त्याने आम्हाला स्पष्ट करून सांगावे की, ती गाय कशी असावी? कारण आम्हाला तर अशा सर्व गाई

एकसारख्याच दिसून येतात. या संबंधाने आम्ही संभ्रमाच्या अवस्थेत सापडलो आहोत, आणि जर अल्लाहची इच्छा असेल तर निश्चितच याबाबतीत आम्हाला योग्य मार्गदर्शन लाभेल.’ 71 त्यावर मूसाने उत्तर दिले, ‘अल्लाहचे असे म्हणणे आहे की, ती गाय अशी असावी जिच्यापासून काम घेतलेले नसावे, ती जमीन नांगरण्यासाठी वापरली जाणारी नसावी किंवा पिकांना पाणी देण्यासाठी वापरली जाणारी नसावी. तिच्यात कुठलाही दोष असू नये, किंवा कोणत्याही प्रकारे ती कुलक्षणी असू नये.’ तेव्हा ते म्हणाले, ‘आता तू सत्य उघड केले आहेस.’ त्यानंतर त्यांनी तिचा बळी दिला. पण तसे करण्याची त्यांची इच्छाच नव्हती. 72 (इस्राईलच्या मुलांनो,) तुम्ही एका व्यक्तीची हत्या केली होती. आणि हत्येचा आरोप एकमेकांवर करू लागला होतात. पण अल्लाहला ते (गुन्ह्याचे सत्य) प्रकाशात आणायचे होते जे तुम्ही लपवू इच्छित होता. 73 त्यावर आम्ही म्हणालो, ‘त्या मृतदेहाला गाईच्या एका भागाने मारा.’ अशाप्रकारे अल्लाह मृताला जीवन देतो आणि तुम्हाला आपल्या निशाण्या दाखवतो, हे यासाठी की, तुम्ही बुद्धीचा वापर करणारे बना.

74 त्यानंतर तुमची मने कठोर झाली, दगडासारखी कठोर, किंवा त्यापेक्षाही अधिक कठोर. दगडांपैकी काही दगड असे असतात ज्यामधून पाण्याचे प्रवाह उसळून बाहेर येतात आणि त्यांपैकी काही दगड असेही असतात की, जेव्हा ते फुटतात (किंवा फोडले जातात), तेव्हा त्यांच्यातून पाण्याचे प्रवाह वाहू लागतात. काही दगड असेही असतात जे अल्लाहच्या भयाने कोसळून पडतात. आणि जे काही तुम्ही करीत आहात त्याबाबत अल्लाह अनभिज्ञ नाही.

75 तुम्ही अशी अपेक्षा बाळगून आहात का की, हे ज्यू लोक तुमचे म्हणणे ऐकून श्रद्धावंत बनतील? यांच्यात तर काही जण असे आहेत जे अल्लाहचे वचन ऐकतात आणि ते समजून घेतल्यानंतर जाणूनबुजून त्याचा विपर्यास करतात. आणि या गोष्टीची त्यांनाही पूर्ण जाणीव आहे. 76 पण जेव्हा ते श्रद्धावंतांना

भेटतात, तेव्हा ते म्हणतात, 'आम्हीही (तुमच्याप्रमाणे) श्रद्धा बाळगतो.' आणि जेव्हा ते एकांतात परस्परांना भेटतात तेव्हा ते म्हणतात, 'तुम्ही या लोकांना त्या गोष्टी सांगत आहात की काय, ज्या अल्लाहने तुमच्याकडे प्रकट केलेल्या आहेत. या आधारे ते तुमच्या पालनकर्त्यासमोर (तुम्ही त्यांना सांगितलेल्या गोष्टीच) तुमच्या विरुद्ध सादर करतील की, (तुम्हाला पैगंबर मुहम्मदांच्या आगमनाविषयी चांगले ठाऊक होते.) तर तुम्ही बुद्धीचा उपयोग करणार नाही का?' 77 हे त्यांना माहीत नाही की काय, जे काही ते लपवीत आहेत आणि जे काही प्रकट करत आहेत, ते सर्व अल्लाह जाणून आहे.

78 आणि त्यांच्यापैकी काही लोक निरक्षर आहेत, (स्वत:ला) पटतील अशा कल्पना व श्रद्धेव्यतिरिक्त त्यांना अल्लाहच्या ग्रंथाचे काहीही ज्ञान नाही, तसेच केवळ अनुमानाचे अनुसरण करण्याव्यतिरिक्त ते काहीही करत नाहीत. 79 विनाश आहे त्या लोकांसाठी जे स्वत:च्या हाताने ग्रंथ लिहितात आणि मग जाहीर करतात की, हा अल्लाहकडून मिळालेला ग्रंथ आहे. ते असे केवळ थोडेसे मूल्य प्राप्त करण्यासाठी करतात. त्यांच्या हातांनी जे काही लिहिले आहे, त्याबद्दल त्यांच्यासाठी कठोर शिक्षा आहे, त्यापासून ते जी कमाई करत आहेत त्यासाठीही त्यांना शिक्षा होणार. 80 आणि ते म्हणतात काही दिवस सोडले तर नरकाची आग आम्हाला कदापि स्पर्श करू शकणार नाही. (तुम्ही त्यांना) सांगा, 'तुम्ही अल्लाहकडून वचन घेतले आहे की काय?' कारण अल्लाह कधीही आपले वचन मोडत नसतो. अथवा तुम्ही अल्लाहच्या बाबतीत ते सांगत आहात, जे तुम्हाला माहीत नाही. 81 होय, जे कोणी दुष्कृत्य करत असतील व चहूबाजूंनी आपल्या पापकर्मांनी वेढले गेले असतील, तर असेच लोक नरकाच्या आगीत राहणारे आहेत. ते नेहमीसाठी तेथेच निवास करतील. 82 पण जे श्रद्धा बाळगून सत्कर्मे करतात, तेच स्वर्गाचे निवासी आहेत. ते सदैव तेथेच राहतील.

83 आणि (ती वेळ आठवा) जेव्हा आम्ही इस्राईलच्या मुलांकडून असा

करार करून घेतला होता की, तुम्ही इतर कोणाची उपासना न करता फक्त अल्लाहचीच उपासना कराल. आणि तुमचे आईवडील, नातलग, अनाथ व गरिबांशी चांगले वर्तन कराल आणि सर्वांशी नम्रपणे संभाषण कराल आणि (नमाज़रूपी) नित्य प्रार्थना करीत राहाल, आणि दानकार्य कराल. परंतु त्यानंतर तुमच्यापैकी काही लोक सोडले तर सर्वांनी त्याकडे पाठ फिरवली. तुम्ही वचन देऊन वचनभंग करणाऱ्यांपैकीच आहात.

84 आणि (ती वेळ आठवा) जेव्हा आम्ही तुमच्याकडून करार करून घेतला होता की, तुम्ही आपसात रक्तपात करणार नाही आणि आपल्या लोकांना घराबाहेर काढणार नाही. तुम्ही त्या कराराला स्वीकारलात आणि त्यास तुम्ही साक्षी आहात. 85 पण तुम्हीच असे लोक आहात की, आपल्याच बांधवांची हत्या करता आणि पाप व अत्याचार यांच्या साहाय्याने त्यांना एकमेकाविरुद्ध उभे करून आपल्याचपैकी काही लोकांना, तुम्ही त्यांच्या वस्त्यांमधून बाहेर काढता. पण जेव्हा ते कैदी होऊन तुमच्याकडे (मदत मागण्यासाठी) येतात. तेव्हा तुम्ही मुक्तिदंड देऊन त्यांची सुटका करता. मुळात त्यांना वस्त्यांबाहेर काढण्याची कृतीच निषिद्ध होती. तुम्ही अल्लाहच्या ग्रंथातील एका भागावर श्रद्धा ठेवता आणि एका भागावर अविश्वास दर्शविता, तुमचे असे आहे की काय? तुमच्यापैकी जे लोक असे कृत्य करत आहेत त्यांच्यासाठी ऐहिक जीवनात अपमानजनक शिक्षेशिवाय दुसरा कोणता मोबदला असू शकतो? आणि न्यायाच्या दिवशी तर त्यांच्यासाठी कठोर शिक्षा अटळ आहे. आणि जे काही तुम्ही करत आहात, त्याबद्दल अल्लाह मुळीच अनभिज्ञ नाही. 86 हेच ते लोक आहेत ज्यांनी मृत्युपश्चात (असलेल्या अनंतकालीन) जीवनाच्या मोबदल्यात सध्याचे (क्षणभंगुर) जीवन पसंत केले आहे. आणि म्हणून, ना त्यांची शिक्षा सौम्य केली जाईल, ना त्यांना कोणत्याही प्रकारचे साहाय्य मिळेल.

87 आणि आम्ही मूसाला ग्रंथ प्रदान केला आणि त्यानंतर सतत पैगंबरांना

पाठविले. तसेच मरियमपुत्र येशू मसीहला, आम्ही सत्याचे सर्व स्पष्ट प्रमाण दिले आणि पवित्र आत्म्याद्वारे त्याला बळ प्रदान केले. पण जेव्हाही तुमच्याकडे पैगंबर अशी एखादी गोष्ट घेऊन आला, जी तुम्हाला नको होती, तेव्हा तुम्ही मगरुरीचे प्रदर्शन केले. तसेच काही (पैगंबरांना) खोटे ठरविले आणि काहींची हत्या केली. 88 ते म्हणतात, 'आमच्या मनाची कवाडे (तुमचे म्हणणे ऐकण्यासाठी) बंद आहेत.' (पण वास्तविकता तशी) नाही, अल्लाहनेच त्यांच्या श्रद्धाहीनतेबद्दल त्यांचा धिक्कार केला आहे. आणि ते जी श्रद्धा ठेवतात, ती अत्यल्प आहे. 89 आणि जेव्हा त्यांच्याकडे अल्लाहकडून एक ग्रंथ आला, तो त्यांच्याकडे असलेल्या ग्रंथाची सत्यता सिद्ध करणारा होता, (त्यांच्या ग्रंथात अंतिम पैगंबरासंबंधाने भाकीत होते). आणि ते सत्य नाकारणाऱ्या श्रद्धाहीन लोकांवर विजय प्राप्त करण्यासाठी आधीपासून प्रार्थना करीत असत. असे असूनही त्यांना ज्ञात असलेले सत्य जेव्हा त्यांच्याकडे आले. तेव्हा त्यांनी त्यास मानण्यास नकार दिला. आणि 'सत्य' नाकारणाऱ्या सर्वांचा अल्लाहकडून धिक्कार आहे. 90 किती वाईट आहे ती गोष्ट, ज्यासाठी त्यांनी आपले आत्मे विकले आहेत. आणि ती म्हणजे अल्लाहने आपल्या कृपेने, आपल्या भक्तांपैकी त्यास जो आवडेल त्याच्यावर आपला संदेश प्रकट केला, या गोष्टीने ते रुष्ट झाले आहेत. आणि म्हणूनच ते अल्लाहने प्रकट केलेल्या संदेशावर अविश्वास दाखवत आहेत, केवळ दुराग्रहापोटी. असे करून त्यांनी आपल्यावर अल्लाहचा राग ओढवून घेतला आहे. आणि अशा श्रद्धाहीनांसाठी अपमानास्पद शिक्षा निश्चित केलेली आहे.

91 आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते की, अल्लाहने जे काही संदेश प्रकट केले आहे त्यावर श्रद्धा ठेवा. तेव्हा ते उत्तर देतात, 'आम्ही केवळ त्याच्यावरच श्रद्धा ठेवतो जे आमच्यावर प्रकट झालेले आहे.' आणि त्यानंतर प्रकट झालेल्या संदेशावर ते विश्वास ठेवत नाहीत. पण हे तर 'सत्य' आहे. आणि या सत्याद्वारे

त्याची सत्यता सिद्ध होते, जे त्यांच्याकडे आहे. (पैगंबर!) तुम्ही त्यांना सांगा,
'तुम्ही जर खरे श्रद्धावंत होता, तर आधीच्या पैगंबरांची हत्या का करीत होता?
92 आणि मूसा तुमच्याकडे सत्याचे स्पष्ट संकेत घेऊन आला होता, पण (स्पष्ट
संकेत असतानाही) तुम्ही त्याच्या अनुपस्थितीत वासराला उपास्य बनवले.
आणि तुम्ही अत्याचारी बनलात.' 93 आणि (ती वेळ आठवा), जेव्हा आम्ही
'तूर' पर्वताला उंच धरून तुमच्याकडून दृढ वचन घेतले होते. तेव्हा आम्ही
तुम्हाला म्हणालो होतो, 'जे काही आम्ही तुम्हाला दिलेले आहे त्यावर अढळ
राहा आणि लक्षपूर्वक ऐका.' त्यावर ते म्हणाले, 'आम्ही ऐकले आहे, पण (या
आज्ञेचे) पालन आम्ही करत नाही.' आणि त्यांच्या श्रद्धाहीनतेमुळे वासराच्या
प्रेमाने त्यांच्या मनात घर केले होते. तुम्ही त्यांना सांगा, 'जर खरोखर तुम्ही
श्रद्धावंत असाल, तर किती वाईट आहे ती गोष्ट, जे करण्याची 'तुमची श्रद्धा'
तुम्हाला आदेश देते.' 94 त्यांना सांगा, 'मृत्युपश्चात जीवनातील अल्लाहकडे
असलेले ठिकाण इतर लोकांसाठी नसून केवळ तुमच्याचसाठी आहे. (असा
तुमचा दावा असेल), तर मृत्यू प्राप्ती ची इच्छा बाळगा, असे करा जर तुम्ही
(तुमच्या दाव्यात) खरे असाल.' 95 परंतु त्यांच्या हातांनी जे काही पुढे
पाठवलेले आहे, त्यामुळे ते मृत्यूची कदापि इच्छा बाळगणार नाहीत. आणि
अल्लाह दुराचाऱ्यांना पूर्णपणे ओळखून आहे. 96 आणि निश्चितच तुम्हाला असे
दिसून येईल की, त्यांना सर्व लोकांपेक्षा या ऐहिक जीवनाचा अधिक लोभ
आहे, आणि अनेकेश्वरवादी लोकांपेक्षाही अधिक. त्यांच्यापैकी प्रत्येकाची
अशी इच्छा असते की, आपल्याला हजार वर्षांचे आयुष्य लाभावे, पण त्यांना
जरी असे दीर्घ आयुष्य मिळाले, तरी त्यांची (मृत्युपश्चात जीवनातील) शिक्षेपासून
सुटका शक्य नाही. आणि ते जे काही करत आहेत ते सर्व अल्लाह पाहत आहे.
97 (पैगंबर!) तुम्ही त्यांना सांगा, 'जो कोणी (अल्लाहचा दूत असलेल्या)
जिब्रीलचा शत्रू आहे. (त्याने हे जाणून घ्यायला हवे) की, जिब्रीलने अल्लाहच्या

आदेशानुसार हा संदेश तुमच्या हृदयपटलावर अवतीर्ण केला आहे. जो या अगोदरच्या (प्रकटित संदेशांपैकी जे तुमच्याकडे आहे) त्याची सत्यता प्रमाणित करतो. आणि हा संदेश श्रद्धावंतांसाठी मार्गदर्शन व शुभवार्ता आहे. 98 जो कोणी अल्लाहचा आणि त्याच्या स्वर्गदूतांचा आणि त्याच्या पैगंबरांचा आणि जिब्रील व मिकाईलचा शत्रू आहे. (त्यांनी नीट जाणून घ्यावे की,) अल्लाह अशा श्रद्धाहीनांचा शत्रू आहे.' 99 आणि निःसंशय आम्ही तुमच्याकडे स्पष्ट संकेत पाठवले आहेत. आणि अवज्ञा करणाऱ्यांव्यतिरिक्त अन्य कोणीही त्यावर अविश्वास दर्शवीत नाही. 100 असे त्यांच्याबाबतीत का होते की, जेव्हाही ते (अल्लाहला) वचन देतात, त्यांच्यामधील एक गट ते वचन मोडून टाकतो? (कारण) त्यांच्यापैकी अनेकजण विश्वास ठेवणारे नाहीत. 101 आणि आता जेव्हा त्यांच्याकडे अल्लाहकडून एक पैगंबर आला, त्याची सत्यता सिद्ध करणारा, जे त्यांच्याकडे (आधीपासून) आहे. तेव्हा ग्रंथधारक लोकांपैकी एका गटाने अल्लाहच्या ग्रंथाला पाठीमागे फेकून देण्याची कृती केली (म्हणजे पूर्णपणे त्याकडे दुर्लक्ष केले), जसे त्यांना काही माहीतच नव्हते.

102 आणि ते त्या गोष्टीच्या मागे लागले, जे सैतान सुलेमानच्या शासनकाळात (खोटेपणाने सुलेमानशी) जोडून पठण करीत असत. सुलेमान अश्रद्धावंत नव्हता तर हे सैतानी लोक अश्रद्धावंत होते. ते लोकांना जादूटोणा शिकवीत असत आणि ते त्या गोष्टीच्या मागे लागले जे बॅबीलोनमध्ये दोन ईशदूत हारूत व मारूत वर प्रकट करण्यात आले होते. पण त्या दोघांनी आम्ही परीक्षेच्या स्वरूपात नियुक्त आहोत असे सांगितल्याशिवाय कोणालाही काहीही शिकवले नाही. ते म्हणत असत की, तुम्ही (ईश्वरीय मार्गदर्शनाला) नाकारू नका. पण त्या लोकांनी त्यांच्याकडून ती शिकवण घेतली आणि त्याद्वारे पती-पत्नींत मतभेद निर्माण करून (संसार उद्ध्वस्त करायचे), पण अल्लाहच्या अनुज्ञेशिवाय ते त्याद्वारे कोणाला इजा पोहोचवू शकत नव्हते. उलटपक्षी ते अशा गोष्टी शिकत होते, ज्यामुळे त्यांचे स्वत:चेच नुकसान होईल, पण लाभ मात्र

होणार नाही. ते हे चांगल्याप्रकारे जाणत होते की, जो कोणी हे (जादूटोण्याचे) ज्ञान प्राप्त करेल त्याच्यासाठी मृत्युपश्चात जीवनातील (चांगल्या गोष्टीत) कोणताही वाटा असणार नाही. आणि निश्चितपणे ते वाईट आहे, ज्यासाठी त्यांनी स्वतःच्या आत्म्यांना विकले आहे. त्यांना याची जाणीव असती तर किती बरे झाले असते.
103 आणि जर ते श्रद्धावान बनले असते आणि अल्लाहचे भय बाळगून आचरण केले असते तर अल्लाहकडून निश्चितच त्यांना चांगले फळ मिळाले असते. त्यांना याची जाणीव झाली असती तर किती बरे झाले असते.

104 हे श्रद्धावंतांनो! (पैगंबरांशी बोलताना) 'आम्हाला ऐका' (राइना) असे म्हणू नका तर 'आमच्याकडे बघा' (उन्जर्ना) असे म्हणा. आणि (पूर्ण लक्ष देऊन) ऐका. आणि निश्चितच श्रद्धाहीन लोकांसाठी क्लेशदायक शिक्षा आहे.

105 ज्या लोकांनी 'सत्य' नाकारले मग ते आधीचे ग्रंथधारक असोत की, अनेकेश्वरवादी लोक असोत, त्यांना वाटते की, तुमच्या पालनकर्त्याकडून कोणतीही कल्याणकारी गोष्ट तुमच्याकडे पाठविली जाऊ नये. पण अल्लाहला जो आवडतो, त्याला तो निवडतो, आणि त्याच्यावर आपला कृपावर्षाव करतो. आणि अल्लाह कृपेच्या बाबतीत अतिशय दानशूर आहे.
106 ज्या कोणत्या वचनांना आम्ही रद्द करतो किंवा विसरायला लावतो, तेव्हा आम्ही त्यापेक्षाही उत्तम किंवा त्यासारखे संदेशवचन पाठवतो. अल्लाहला सर्व काही करण्याचे सामर्थ्य प्राप्त आहे, हे तुम्ही जाणत नाही का?
107 जमीन आणि आकाश यांवर केवळ अल्लाहचीच सत्ता आहे, हे तुम्हाला माहीत नाही का? आणि अल्लाहव्यतिरिक्त अन्य कोणीही तुमचा रक्षणकर्ता किंवा साहाय्यकर्ता नाही.
108 (श्रद्धावंतांनो!) तुमच्याकडे पाठविण्यात आलेल्या पैगंबराला तुम्ही त्याच प्रमाणे प्रश्न विचारू इच्छिता का, ज्याप्रमाणे यापूर्वी मूसाला प्रश्न विचारण्यात आले? ज्याने श्रद्धेचे रूपांतर अश्रद्धेमध्ये केले तो, निश्चितच सन्मार्गापासून दूर निघून गेला.

109 ग्रंथधारकांपैकी, अनेक लोक असे आहेत जे केवळ मत्सरापोटी

तुमच्याबद्दल अशी भावना बाळगतात की, तुम्हाला अश्रद्धेकडे (सत्य नाकारण्याकडे) परत आणावे जेव्हा की, तुम्ही सत्याचा अंगीकार केलेले आहात आणि तेही सत्य त्यांच्यावर चांगल्याप्रकारे उघड झालेले असताना. असे असले तरी तुम्ही त्यांना क्षमा करा आणि सहनशीलता बाळगा इथपर्यंत की, अल्लाह आपला निर्णय जाहीर करेल. निःसंशय अल्लाहला सर्व काही करण्याचे सामर्थ्य प्राप्त आहे.
110 आणि नित्य प्रार्थना करा (नमाज़ पढा), आणि ज़कात  द्या आणि स्वत:साठी जी काही सत्कर्मे तुम्ही पुढे पाठवाल ती सर्व अल्लाहकडे आढळून येतील. निःसंशय तुम्ही जे काही करत असता ते सर्व अल्लाह पाहत असतो.
111 आणि ते दाव्याने सांगतात, ‘ज्यू किंवा ख्रिस्ती यांच्याशिवाय अन्य कोणीही कदापि स्वर्गात जाणार नाही.’ ही त्यांची दिवास्वप्ने आहेत. त्यांना सांगा, ‘(ज्याचा तुम्ही दावा करीत आहात) त्यासाठी पुरावा प्रस्तुत करा...... जर तुमचे म्हणणे खरे असेल.’
112 निश्चितच, जो कोणी स्वत:ला संपूर्णपणे अल्लाहच्या स्वाधीन करेल, आणि सत्कर्मे करीत राहील. अशा व्यक्तीसाठी त्याच्या पालनकर्त्याजवळ त्याचे बक्षीस तयार आहे. असे लोक कोणत्याही प्रकारच्या भयाने ग्रस्त होणार नाहीत आणि कोणत्याही प्रकारच्या दु:खाशी त्यांचा कधी सामना होणार नाही.

113 आणि ज्यू म्हणतात:‘ख्रिस्ती लोकांकडे त्यांच्या श्रद्धेला कोणताही वैध आधार नाही’. आणि ख्रिस्ती म्हणतात: ‘ज्यू लोकांच्या श्रद्धेला कोणताही वैध आधार नाही’. आणि ते सर्व ईश्वरीय ग्रंथाचे वाचन करतात. आणि ज्यांच्याकडे ग्रंथाचे ज्ञान नाही ते देखील असेच म्हणतात. परंतु ज्याबाबतीत यांच्यात मतभेद आहेत त्या गोष्टींचा निवाडा अल्लाह पुनरुत्थानाच्या दिवशी करील.
114 त्यापेक्षा मोठा अत्याचारी कोण असू शकतो? जो अल्लाहच्या मशीदीमध्ये अल्लाहचे नामस्मरण करण्यास प्रतिबंध करतो आणि त्यांचा विध्वंस करण्याचा प्रयत्न करतो. त्यांची अवस्था तर अशी व्हायला पाहिजे होती की, ते अल्लाहच्या

मशीदीमध्ये भीत–भीत प्रवेश करीत आहेत. त्यांच्यासाठी या जगात अवहेलना आहे आणि मृत्युपश्चात जीवनात तर कठोर शिक्षा आहे. 115 पूर्व आणि पश्चिम (सर्व दिशा) अल्लाहच्याच आहेत. त्यामुळे तुम्ही जिकडे वळाल तिकडे तुम्ही अल्लाहशी सामोरे व्हाल. निःसंशय अल्लाह सर्वांवर नियंत्रण ठेवणारा आणि सर्वज्ञ आहे. 116 आणि ते म्हणतात अल्लाहने (स्वत:साठी एक) पुत्र बनविला आहे (असीम आहे त्याची महिमा!) तो अशा गोष्टीपासून पवित्र आहे. आकाश आणि जमीन यांमध्ये जे काही आहे ते अल्लाहचेच आहे आणि सर्वजण त्याचेच आज्ञाधारक आहेत. 117 तोच आकाश आणि जमीन यांचा आद्यप्रवर्तक आहे. आणि जेव्हा तो कोणतीही गोष्ट अस्तित्वात आणू इच्छितो. तेव्हा तो तिच्याबाबतीत फक्त आज्ञा देतो की, ‘अस्तित्वात ये.’ आणि ती गोष्ट अस्तित्वात येते.

118 आणि ज्यांना ज्ञान नाही ते लोक म्हणतात, ‘अल्लाह आमच्याशी का संभाषण करीत नाही, किंवा त्याचे (काही चमत्कारिक) संकेत आमच्याकडे का येत नाहीत?’ त्यांच्या आधीचे लोक देखील अगदी अशाच प्रकारच्या गोष्टी बोलत होते. त्या सर्वांची अंत:करणे एक सारखीच आहेत, आम्ही निश्चितच आमचे संकेत उघड केलेले आहेत, अशा लोकांसाठी जे अढळ श्रद्धा बाळगून आहेत. 119 (पैगंबर!) आम्ही तुम्हाला शुभवार्ता देणारा व सावधानतेची सूचना देणारा बनवून, सत्याच्या संदेशासह पाठविले आहे. नरकात जाणाऱ्या लोकांबद्दल तुमच्याशी विचारपूस केली जाणार नाही. 120 ज्यू किंवा ख्रिस्ती तुमच्याशी कदापि संतुष्ट होणार नाहीत, जोपर्यंत तुम्ही त्यांचा मार्ग अनुसरत नाही. तुम्ही त्यांना असे सांगा, निश्चितपणे अल्लाहचे मार्गदर्शन हेच खरे मार्गदर्शन आहे. आणि तुमच्याकडे आलेल्या या ज्ञानानंतरही तुम्ही त्यांच्या अनिष्ट इच्छांचे अनुसरण केले, तर अल्लाहपासून वाचवणारा कोणी मित्र किंवा साहाय्यकर्ता तुम्हाला मिळणार नाही. 121 आम्ही ज्या लोकांना ग्रंथ प्रदान केला आहे, ते लोक त्याचे अशा प्रकारे अनुसरण करीत आहेत, ज्या प्रकारे त्याचे अनुसरण

करायला हवे. हेच ते लोक आहेत, जे त्यावर (खऱ्या अर्थाने) श्रद्धा बाळगून आहेत. आणि जे त्या सत्याचा अस्वीकार करणारे आहेत, तेच लोक नुकसान प्राप्त करणारे आहेत.

122 हे इस्राईलच्या वंशजांनो! आठवा, मी तुमच्यावर केलेल्या उपकारांना, आणि तेही आठवा की, मी तुम्हाला सर्व जनसमुदायांवर प्रतिष्ठेचे स्थान दिले.
123 आणि त्या दिवसाचे भय बाळगा (जाण ठेवा), ज्या दिवशी कोणताही जीव दुसऱ्या जिवाच्या अजिबात उपयोगी येणार नाही किंवा त्याच्याकडून त्याला मुक्त करण्यासाठी काहीही स्वीकारले जाणार नाही. आणि कोणाचीही मध्यस्थी त्यांच्या उपयोगी पडणार नाही, ना त्यांना साहाय्य केले जाणार. 124 आणि ती
वेळ आठवा, जेव्हा इब्राहीमची त्याच्या पालनकर्त्याने काही गोष्टींमध्ये परीक्षा घेतली; तेव्हा त्याने त्यांचे पूर्ण पालन केले. त्यावर अल्लाहने म्हटले 'मी तुला सर्व लोकांचा नायक (इमाम) बनवीन, इब्राहीमने विचारले: आणि माझ्या संततीमधून? (सुद्धा तू नायक बनविशील ना?). अल्लाहने उत्तर दिले, 'माझा वायद्यात दुराचारी लोकांचा समावेश नाही.'

125 आणि ती वेळ आठवा, जेव्हा आम्ही काबागृहाला लोकांसाठी (आंतरराष्ट्रीय स्तरावर) एकत्रित येऊन प्रार्थना करण्याचे स्थान, तसेच शांतीस्थान म्हणून निश्चित केले, आणि आदेश दिला की, इब्राहीम ज्या जागेवर उभा होता त्या जागेला प्रार्थनास्थान बनवा. आणि आम्ही इब्राहीम व इस्माईल यांना अशी आज्ञा केली की, या माझ्या घराला (अर्थात काबाला) परिक्रमा करणाऱ्यांसाठी आणि त्यात उपासना करण्यासाठी येऊन थांबलेल्यांसाठी आणि प्रार्थनेत वाकून नमन करणाऱ्यांसाठी आणि नतमस्तक होणाऱ्यांसाठी स्वच्छ ठेवा. 126 आणि
इब्राहीमने प्रार्थना केली, 'हे माझ्या पालनकर्त्या! या नगराला शांतीचे नगर बनव, आणि यातील जे निवासी अल्लाहवर आणि न्यायाच्या अंतिम दिवसावर विश्वास ठेवतील त्यांच्या उपजीविकेसाठी फळे प्रदान कर.' त्यावर अल्लाहने

उत्तर दिले, 'सत्य नाकारणाऱ्यांना देखील मी काही काळ लाभ देईन, पण शेवटी त्यांना अग्नीच्या शिक्षेकडे घेऊन जाईन, आणि खरोखरच ते वाईट ठिकाण आहे.'

127 आणि जेव्हा इब्राहीम व इस्माईल (अल्लाहचे घर = काबा) या घराचा पाया रचत होते. व हे करताना अशी प्रार्थना करीत होते, 'हे आमच्या पालनकर्त्या! आमच्याकडून ही (सेवा) स्वीकार कर. निःसंशय, तूच आहेस सर्व काही ऐकणारा आणि सर्व काही जाणणारा! 128 हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला तुझा आज्ञाधारक बनव, आणि आमच्या संततीपासून देखील तुझा आज्ञाधारक असलेला समाज निर्माण कर. आणि आम्हाला आमचे उपासनेचे मार्ग दाखव, आणि आमच्यावर तुझी कृपादृष्टी ठेव. (आणि आम्हाला क्षमा कर) आणि तूच क्षमा करणारा व दयाळू आहेस. 129 हे आमच्या पालनकर्त्या! तू त्यांच्यामधूनच एक असा पैगंबर उभा कर जो तुझे संदेश त्यांना ऐकवील आणि त्यांना ग्रंथ आणि ज्ञान यांची शिकवण देईल आणि त्याद्वारे त्यांचे चित्त शुद्ध करू शकेल. निःसंशय तू सर्वशक्तिमान आणि बुद्धिवंत आहेस.'

130 आणि जो सर्वस्वी मूर्ख आहे त्याच्याशिवाय दुसरा कोण इब्राहीमचा धर्म सोडू शकेल? या जगात आम्ही त्याची निवड केली होती, आणि निश्चितपणे मृत्यूनंतरच्या जीवनात त्याचे स्थान सन्मार्ग अनुसरणाऱ्यांमध्ये असेल. 131 जेव्हा त्याच्या पालनकर्त्याने त्याला म्हटले, 'शरण ये' (स्वतःला समर्पित कर), त्यावर तो म्हणाला, 'मी सर्व जगांच्या पालनकर्त्याला शरण आलो आहे.' 132 इब्राहीमने आपल्या पुत्रांना तसेच याकूबने देखील आपल्या पुत्रांना (अल्लाहला समर्पित जीवन व्यतीत करण्याचा) उपदेश केला, 'हे माझ्या पुत्रांनो, अल्लाहने याच धर्माची निवड तुमच्यासाठी केली आहे. म्हणून तुम्ही पूर्णपणे अल्लाहला समर्पित असाल अशा अवस्थेव्यतिरिक्त (म्हणजेच इस्लाम शिवाय) इतर अवस्थेत मृत्यू तुम्हाला गाठू नये. ' 133 (हे इस्राईलच्या मुलांनो!)

त्यावेळी तुम्ही हजर होता का, जेव्हा याकूबच्या मृत्यूची वेळ आली होती? व तो आपल्या पुत्रांना म्हणाला, 'माझ्यानंतर तुम्ही कोणाची उपासना कराल?' त्यावर ते उत्तरले, 'आम्ही त्याच उपास्याची उपासना करू, ज्याची तुम्ही व तुमचे पूर्वज इब्राहीम व इस्माईल आणि इसहाक़ उपासना करीत आलेले आहेत. तोच एकमेव उपासनेयोग्य आहे, त्यालाच आम्ही समर्पित झालेलो आहोत.'
134 हा अशा लोकांचा एक वर्ग होता, जो मृत्यू पावला आहे. त्यांनी जी (कर्मरूपी) कमाई केली ती त्यांच्यासाठी आहे आणि तुम्ही जी कमाई केली ती तुमच्यासाठी असेल. आणि त्यांनी जे काही केले त्याबद्दल तुमच्याकडे विचारणा केली जाणार नाही.

135 आणि ते म्हणतात, 'तुम्ही ज्यू अथवा ख्रिस्ती व्हा, म्हणजे तुम्हाला सन्मार्ग मिळेल.' (पैगंबर!) तुम्ही त्यांना सांगा, 'कदापि नाही, आम्ही तर इब्राहीमच्या धर्माचे अनुसरण करतो. जो सदैव अल्लाहला समर्पित होता. तो अनेकेश्वरवादी लोकांपैकी नव्हता'. 136 तुम्ही (त्यांना) सांगा की, आम्ही अल्लाहवर आणि आमच्याकडे जे प्रकट करण्यात आले आहे त्यावर, आणि इब्राहीम व इस्माईल व इसहाक़ व याकूब व त्याची मुले यांच्याकडे जे प्रकट करण्यात आले त्यावर, आणि मूसा व ईसा (येशू) यांना जे काही देण्यात आले होते त्यावर, आणि इतर सर्व पैगंबरांना त्यांच्या पालनकर्त्याकडून जे काही देण्यात आले होते त्यावर श्रद्धा ठेवतो. त्या सर्व पैगंबरांदरम्यान आम्ही कोणताच भेदभाव करीत नाही. आणि आम्ही स्वत:ला, अल्लाहला समर्पित करतो. 137
आणि तुम्ही जसे श्रद्धावंत आहात तसेच ते श्रद्धावंत बनले तरच ते सन्मार्गी लागले. पण जर त्यांनी पाठ फिरवली, तर जाणून घ्या की, त्यांनी भक्कम विरोधाचा मार्ग अवलंबिला. अल्लाह निश्चितपणे तुमचे त्यांच्यापासून रक्षण करण्यास समर्थ आहे. अल्लाह सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा आहे .
138 सांगा, 'आम्ही (आमच्या जीवनाला) अल्लाहच्या रंगात रंगवून घेतले,

आणि अल्लाहच्या रंगापेक्षा श्रेष्ठ रंग कोणता असणार? आम्ही केवळ त्याचीच उपासना करणारे आहोत.' [139] तुम्ही (ज्यू आणि ख्रिस्ती लोकांना) सांगा, 'अल्लाहसंबंधाने तुम्ही आमच्याशी वाद घालता? 'तो' तर आमचाही पालनकर्ता आहे आणि तुमचाही पालनकर्ता आहे. आमची कर्मे आमच्यासाठी आहेत आणि तुमची कर्मे तुमच्यासाठी आहेत. आणि आम्ही (पूर्णपणे) त्यालाच समर्पित आहोत.

[140] इब्राहीम व इस्माईल व इसहाक़ व याकूब व त्याची मुले ज्यू किंवा ख्रिस्ती होती असे तुमचे म्हणणे आहे का?' (तुम्ही त्यांना) सांगा, 'तुम्हाला जास्त माहीत आहे की अल्लाहला? आणि त्यापेक्षा अधिक दुष्ट आणखी कोण असू शकतो, जो अल्लाहकडून आलेली साक्ष दडवून ठेवू इच्छितो? आणि तुम्ही जे काही करीत आहात त्याबद्दल अल्लाह अनभिज्ञ नाही.' [141] हा अशा लोकांचा एक वर्ग होता जो आपला कार्यकाळ पूर्ण करून मृत्यू पावला आहे. त्यांनी जे कमावले ते त्यांच्यासाठी आहे आणि तुम्ही जे कमावले ते तुमच्यासाठी आहे. आणि त्यांनी जे काही केले, त्याबद्दल (पैगंबर) तुम्हाला विचारणा केली जाणार नाही.

[142] आता मूर्ख लोक अवश्य असे म्हणतील की, पूर्वी ज्या दिशेकडे (क़िबल्याकडे) तोंड करून हे लोक आत्तापर्यंत प्रार्थना करीत आले, ती दिशा या लोकांना का बदलावी लागली? (तुम्ही त्यांना) सांगा, 'पूर्व आणि पश्चिम (सर्व दिशा) अल्लाहच्याच आहेत. ज्यांना सरळ मार्ग दाखवावा अशी त्याची इच्छा असते त्यांना तो तसा मार्ग दाखवतो.' [143] (श्रद्धावंतांनो!) अशाप्रकारे आम्ही तुम्हाला मध्यम स्थान असलेले जातीसमूह बनविले. हे यासाठी की, तुम्ही (मानवजातीवर ईश्वराकडून आलेल्या सत्याची) साक्ष देणारे बना आणि

पैगंबर तुमच्यावर साक्ष देणारा असेल. (पैगंबर!) जी प्रार्थना–दिशा तुम्ही अनुसरत होता, ती आम्ही या उद्देशाने निश्चित केली होती की, (जेव्हा ती बदलली जाईल तेव्हा) आम्हाला हे पाहता येईल की, कोण पैगंबराचे अनुसरण करतो आणि कोण पाठ फिरवितो. आणि अल्लाहने ज्यांना सन्मार्ग दाखवलेला आहे, त्या लोकांव्यतिरिक्त इतरांसाठी हे फार कठीण आहे. अल्लाह असा नाही की, तो तुमची श्रद्धा व्यर्थ जाऊ देईल. खरोखर अल्लाह हा लोकांवर करुणा करणारा (व) कृपाशील आहे.

144 (पैगंबर!) आम्ही तुम्हाला आपला चेहरा वारंवार आकाशाकडे फिरवताना पाहत आहोत. म्हणून आम्ही तुम्हाला निश्चितपणे त्या प्रार्थनेच्या दिशेकडे वळवू जी तुम्हाला अधिक प्रिय आहे. तर आता तुम्ही तुमचा चेहरा काबाच्या दिशेने वळवा. आणि तुम्ही (सर्व) जिथे कुठे असाल आपले चेहरे (प्रार्थनेसाठी) त्याच दिशेत वळवा. आणि ज्यांना ग्रंथ देण्यात आलेला आहे ते चांगल्या प्रकारे जाणतात की, हे त्यांच्या पालनकर्त्याकडून आलेले सत्य आहे. आणि ते जे काही करत आहेत त्याविषयी अल्लाह मुळीच अनभिज्ञ नाही. 145 आणि ज्यांना आधी ग्रंथ देण्यात आलेला आहे त्या लोकांसमोर तुम्ही सर्व प्रमाण प्रस्तुत केले तरी ते तुमच्या प्रार्थना दिशेचे अनुसरण करणार नाहीत. आणि तुम्हीही त्यांच्या प्रार्थना दिशेचे अनुसरण करू शकत नाही. आणि त्यांच्यापैकी कोणीही इतर (गटातील) लोकांच्या 'प्रार्थना दिशेचे' अनुसरण करत नाही. आणि तुम्हाला ज्ञान प्राप्त झाल्यानंतर त्यांच्या अपेक्षांचे अनुसरण कराल तर निःसंशय तुम्ही अत्याचारी लोकांमध्ये सामील व्हाल. 146 (तुमच्यापूर्वी) ज्यांना आम्ही ग्रंथ दिला होता, ते (या ग्रंथालाही) अशा प्रकारे (अल्लाहचा ग्रंथ असल्याचे) ओळखून आहेत, जसे ते आपल्या पुत्रांना ओळखतात. परंतु निश्चितच त्यांच्यापैकी

काही लोक जाणूनबुजून हे ‘सत्य’ दडपत आहेत. 147 जे तुमच्या पालनकर्त्याकडून आलेले आहे, तेच ‘सत्य’ आहे. तर तुम्ही त्याविषयी शंका बाळगणाऱ्यांपैकी होऊ नका.

148 प्रत्येक व्यक्तीचे एक लक्ष्य असते आणि तो त्या दिशेने पुढे जातो. तर तुम्ही सत्कर्मे करण्याच्या बाबतीत एकमेकांशी स्पर्धा करा. तुम्ही कुठेही असा, अल्लाह तुम्हा सर्वांना आपल्यासमोर एकत्र आणेल. निःसंशय अल्लाह जे इच्छितो ते सर्व करण्याचे सामर्थ्य त्याच्याकडे आहे. 149 तुम्ही कोणत्याही ठिकाणाहून बाहेर पडलात तरी आपला चेहरा (प्रार्थनेच्या वेळेस) पवित्र मशीद (काबाच्या) दिशेने वळवा कारण हा (आदेश म्हणजे) तुमच्या पालनकर्त्याकडून आलेले सत्य आहे. आणि तुम्ही जे काही करीत आहात त्याबाबतीत अल्लाह अनभिज्ञ नाही. 150 तुम्ही कोणत्याही ठिकाणाहून बाहेर पडलात तरी (प्रार्थनेच्या वेळेस) आपला चेहरा पवित्र मशीदीच्या दिशेने वळवा आणि तुम्ही जिथे कुठे असाल आपले चेहरे तिकडेच वळवा. (या संबंधाने) अत्याचारी लोकांव्यतिरिक्त इतर लोक तुमच्या विरुद्ध वादाचा मुद्दा निर्माण करणार नाहीत. तर तुम्ही त्यांचे भय न बाळगता माझेच भय बाळगा. हे यासाठी की, तुमच्यावर मला माझा अनुग्रह  पूर्ण करता यावा आणि तुम्हाला सन्मार्ग प्राप्त व्हावा. 151 ज्या प्रकारे आम्ही तुमच्यामधूनच एक पैगंबर तुमच्याकडे पाठविला आहे, जो आमचा संदेश तुम्हाला ऐकवतो आहे, तुमचे (मन) शुद्ध करीत आहे, आणि तुम्हाला (अल्लाहच्या) ग्रंथाची व विवेकाची शिकवण देत आहे. तुम्हाला त्या गोष्टींचे शिक्षण देत आहे ज्या तुम्ही जाणत नव्हता. 152 म्हणून तुम्ही माझे स्मरण करा आणि मीही तुमचे स्मरण ठेवीन, आणि माझ्याप्रति (नेहमी) कृतज्ञ असा व माझ्याप्रति कृतघ्न होऊ नका.

153 हे श्रद्धावंतांनो! सहनशीलता आणि प्रार्थना (नमाज़) यांच्याद्वारे (अल्लाहकडे) साहाय्याची याचना करा. निःसंशय अल्लाह सहनशीलता बाळगणाऱ्या लोकांबरोबर असतो. 154 जे लोक अल्लाहच्या कार्यात मारले जातात,

त्यांच्याबाबतीत ते मृत आहेत असे म्हणू नका. ते तर जिवंत आहेत, पण तुम्हाला त्याची जाणीव होत नाही. 155 आम्ही अवश्य तुमची कसोटी पाहू — भय, भूक, जीवित व वित्त हानी व फळांची हानी यांद्वारे, (या सर्व अवस्थेत) जे संयमपूर्ण आचरण करतील त्यांना शुभ समाचार द्या. 156 त्यांची अवस्था अशी आहे की, जेव्हा त्यांच्यावर संकट येते तेव्हा ते म्हणतात, 'आम्ही तर निश्चितपणे अल्लाहचेच आहोत आणि आम्ही त्याच्याकडेच परतणार आहोत.' 157 हेच ते लोक आहेत ज्यांच्यावर त्यांच्या पालनकर्त्याकडून कृपावर्षाव व दया आहे. आणि हेच लोक सन्मार्ग लाभलेले लोक आहेत.

158 निश्चितपणे सफा व मरवा अल्लाहने स्थापित केलेल्या निशाण्या आहेत म्हणून जी व्यक्ती पवित्र घराची यात्रा (म्हणजेच हज) करीत असेल किंवा उम्रा (हजच्या ठरलेल्या कालावधीशिवाय इतर वेळेत केलेली अल्पयात्रा) करीत असेल. तर त्या व्यक्तीने यांची परिक्रमा केल्यास काहीही आक्षेपार्ह नाही. आणि जो कोणी आवश्यक असेल त्यापेक्षा अधिक स्वेच्छेने सत्कर्मे करील तर निश्चितच अल्लाह गुणग्राही आणि सर्वज्ञ आहे. 159 जे लोक आम्ही प्रकट केलेल्या सत्याच्या उघड संकेतांना आणि आमच्याकडून आलेल्या मार्गदर्शनाला दडपून टाकू इच्छितात, जेव्हा की, आम्ही ते लोकांसाठी स्पष्ट करून सांगितले आहे. तर अशाच लोकांवर अल्लाहचा शाप आहे. आणि इतरांचाही त्यांच्यावर शाप आहे. 160 तथापि जे लोक पश्चात्ताप व्यक्त करतात आणि (आपल्या वर्तनात) सुधारणा करतात आणि स्पष्टपणे (सत्य) घोषित करतात तर त्यांच्याकडे मी क्षमादृष्टीने पाहतो आणि मी वारंवार क्षमा करणारा व दयाळू आहे. 161 नि:संदेह जे लोक श्रद्धाहीन आहेत आणि जे श्रद्धाहीन अवस्थेत मरण पावतील, त्यांच्यावर अल्लाहचा आणि त्याच्या दूतांचा आणि सर्व लोकांचा शाप आहे. 162 ते सदैव त्याच शापित अवस्थेत राहतील. त्यांची शिक्षा ना कमी केली जाईल, ना त्यांना उसंत दिली जाईल.

[163](लोकांनो!) तुमचा उपास्य केवळ अल्लाह आहे. त्या कृपाळू व दयावंताशिवाय दुसरा कोणीही ईश्वर नाही. [164] निश्चितच पृथ्वी आणि आकाशाच्या निर्मितीमध्ये, आणि रात्र व दिवसाच्या एकापाठोपाठ येण्यामध्ये, आणि त्या नौकांमध्ये ज्या मानवाच्या उपयोगी वस्तू घेऊन समुद्रात संचार करतात. तसेच त्या पाण्यामध्ये ज्याचा अल्लाह आकाशातून वर्षाव करतो, आणि त्यापासून मृतप्राय झालेल्या जमिनीला पुनरुज्जीवित करतो. आणि त्याने पृथ्वीवर सर्व प्रकारच्या पशूंना वाढीस लावले यामध्ये, आणि वाऱ्यांच्या मार्गांमध्ये आणि आकाश व पृथ्वी यांच्यादरम्यान नेमून दिलेल्या मार्गावर मार्गस्थ असलेल्या ढगांमध्ये (या सर्वांमध्ये) बुद्धीचा वापर करणाऱ्या लोकांसाठी खरोखर संदेश असलेल्या अनेक खुणा आहेत.

[165] आणि काही लोक असे असतात, जे इतरांना अल्लाहच्या बरोबरीचे ठरवितात आणि त्यांच्याविषयी असा प्रेमभाव ठेवतात जसा प्रेमभाव अल्लाह संबंधानेच असायला हवा. पण जे श्रद्धावंत आहेत, त्यांच्या प्रेमाचा भाव सर्वांत जास्त अल्लाहसाठीच असतो. आणि हे अत्याचारी लोक त्यांना ज्या वेळेस शिक्षा झालेली असेल, ती वेळ जर आता पाहू शकले असते, तर त्यांना जाणीव झाली असती की, सर्व प्रकारे नियंत्रण केवळ अल्लाहलाच प्राप्त आहे आणि शिक्षा देण्याच्या बाबतीत अल्लाह अतिशय कठोर आहे. [166] (त्या दिवशी) ते (नेते व पुढारी) ज्यांचे अनुसरण केले जात होते. ते आपल्या अनुयायांशी संबंध तोडून टाकतील. आणि त्यांच्यासाठी शिक्षा तयार असल्याचे ते स्वतःच्या डोळ्यांनी पाहतील. त्यांचे सर्व संबंध संपुष्टात आलेले असतील. [167] आणि तेव्हा अनुसरण करणारे लोक म्हणतील, 'किती बरे झाले असते जर आम्हाला आणखी एकदा जगामध्ये जाण्याची संधी मिळाली असती, तर आम्ही सुद्धा त्यांच्याशी संबंध तोडून टाकले असते. जसे त्यांनी आमच्याशी संबंध तोडून

टाकले.' अल्लाह त्यांच्या कृत्यांना अशा प्रकारे दाखवेल (जे पाहून त्यांना) क्लेशदायक पश्चात्ताप होईल. आणि ते (नरकाच्या) अग्नीतून कदापि बाहेर पडू शकणार नाहीत.

168 लोकांनो! जमिनीवर जे काही वैध आणि आरोग्यदायी आहे, ते खा. आणि सैतानाचा मार्ग अनुसरू नका. निःसंदेह तो तुमचा उघड–उघड शत्रू आहे. 169 तो तुम्हाला दुष्ट आणि अश्लील गोष्टींचीच प्रेरणा देतो आणि अल्लाहविषयी अशा गोष्टी सांगण्याची प्रेरणा देतो, ज्याचे तुम्हाला मुळीच ज्ञान नाही. 170 आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते की, अल्लाहने जे काही प्रदान केले त्याचे अनुसरण करा, तेव्हा ते म्हणतात, 'नाही, आम्ही तर त्याचेच अनुसरण करू ज्याचे अनुसरण आम्ही आमच्या पूर्वजांना करताना पाहिले.' जर तुमच्या पूर्वजांनी बुद्धिचा वापर केलेला नसेल तसेच ते सन्मार्गपासून दूर राहिले असतील तरीही तुम्ही त्यांचेच अनुसरण करणार का? 171 श्रद्धाहीन लोकांची अवस्था त्या जनावरासारखी आहे. ज्याच्यामागे एक व्यक्ती हाक मारतो. (आणि ते जनावर), या हाक आणि ओरड शिवाय काहीही ऐकू शकत नाही. ते बहिरे, मुके आणि आंधळे आहेत, कारण ते बुद्धीचा वापर करीत नाहीत.

172 श्रद्धावंतांनो! आम्ही तुमच्यासाठी ज्या चांगल्या वस्तूंचा पुरवठा केलेला आहे, त्या खा आणि अल्लाहचेच आभार माना, जर का तुम्ही त्याचे (खरे) उपासक असाल! 173 अल्लाहने तुमच्यासाठी निषिद्ध ठरविले आहे, फक्त (स्वतःहून) मेलेल्या प्राण्याला आणि रक्त व डुकराचे मास आणि ते, ज्यावर अल्लाहशिवाय अन्य कोणाचे नाव घेतले गेले असेल. पण एखादा कोणी गरजेपोटी (असे करण्यास) विवश झाला असेल, आणि ना तो त्याची अभिलाषा बाळगतो, ना अत्यावश्यक गरजेपेक्षा (पुढे जाऊन) मर्यादेचे उल्लंघन करतो. तर ते त्याच्यासाठी गुन्ह्याचे कृत्य असणार नाही. निःसंशय अल्लाह अतिशय क्षमा करणारा आणि कृपा करणारा आहे. 174 निःसंशय जे लोक ग्रंथांपैकी त्या गोष्टींना दाबून टाकू

पाहतात, जे अल्लाहने प्रकट केले आहे. आणि त्याच्या बदल्यात क्षुल्लक किंमत
घेत आहेत, ते आपले पोट इतर कशाने नव्हे तर केवळ आगीने भरत आहेत.
अल्लाह पुनरुत्थानाच्या दिवशी त्यांच्याशी बोलणार नाही, ना त्यांचे मन शुद्ध
करेल. त्यांच्यासाठी यातनादायी शिक्षा अटळ आहे. 175 हेच ते लोक आहेत
ज्यांनी मार्गदर्शनाऐवजी मार्गभ्रष्टता आणि क्षमेऐवजी शिक्षेचा सौदा केला आहे.
तर ते नरकाच्या अग्नीसाठी किती मोठे साहस दाखवीत आहेत. 176 हे यासाठी
की, अल्लाहने आपला ग्रंथ सत्यासह अवतरित केला आहे. पण ज्या लोकांनी
ग्रंथाच्या बाबतीत मतभिन्नता दर्शविली, ते निश्चितच (केवळ) दुराग्रहापोटी
सत्यापासून दूर निघून गेले.

177 खरे सदाचरण हे नव्हे की, तुम्ही आपले तोंड पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे
वळवाव, तर खरा सदाचरणी तो आहे, जो श्रद्धा ठेवतो अल्लाहवर आणि
न्यायाच्या अंतिम दिवसावर आणि त्याच्या दूतांवर आणि ग्रंथावर आणि पैगंबरांवर
आणि खर्च करतो आपले धन अल्लाहवरील प्रेमाखातर– नातेवाइकांवर, अनाथांवर,
वाटसरू व गरजू लोकांवर आणि जे (धर्मादाय प्रयोजनासाठी) मागतात त्यांच्यावर
आणि बंदीवान लोकांना (मुक्त करण्यासाठी). आणि (नमाज़रूपी) नियमित
प्रार्थना करीत असतो. आणि दान (ज़कात) देत असतो. (आणि तेच खरे
सदाचरणी आहेत) जे वचन दिल्यावर आपले वचन पाळतात. आणि विपत्ती व
दु:खामध्ये जे सहनशील असतात आणि युद्धाच्या काळात धैर्यशील राहतात.
अशाच लोकांनी स्वत:ला सत्यनिष्ठ सिद्ध केले आहे, आणि हेच लोक वस्तुत:
अल्लाहचे भय बाळगणारे आहेत.

178 श्रद्धावंतांनो! हत्या करण्यात आलेल्या लोकांच्या बाबतीत, (खुनाचा
बदला घेण्यासाठी) तुमच्याकरिता न्यायिक शिक्षा नेमून दिली जात आहे. स्वतंत्र
व्यक्तीने हत्या केली असेल तर त्या स्वतंत्र व्यक्तीस आणि गुलामाने हत्या केली
असेल तर गुलामास मारले जावे, आणि स्त्रीने हत्या केली असेल तर त्या स्त्रीची

हत्या करावी. परंतु एखाद्याला मृत व्यक्तीच्या वारसदाराकडून जर कोणत्याही प्रकारे शिक्षेत सूट देण्यात आली, तर (हत्येच्या नुकसानीचा मोबदला घेण्याची बाब) योग्य रीतीने हाताळण्यात यावी, आणि (हत्या करणाऱ्या व्यक्तीने) हत्येच्या नुकसानीचा मोबदला म्हणून त्यास सढळ हातांनी रक्कम द्यावी. ही तुमच्या पालनकर्त्याकडून देण्यात आलेली सवलत व दयापूर्ण व्यवहार आहे. आणि त्यानंतरही जो कोणी अत्याचार करेल त्याच्यासाठी यातनामय शिक्षा निश्चित करण्यात आलेली आहे. 179 आणि समंजस लोकांनो! न्यायिक शिक्षा देण्याच्या (या कायद्यात) तुमच्यासाठी जीवन (म्हणजे जीवनाची हमी) आहे. हे यासाठी की, तुम्ही अल्लाहची जाण ठेवणारे बना. 180 तुमच्यावर अनिवार्य केले जात आहे की, जर तुमच्यापैकी कोणाची, मृत्यूची वेळ जवळ आली असेल आणि त्याच्यामागे संपत्ती असेल तर त्याने आपले आईवडील आणि आपल्या नातेवाइकांसाठी न्याय्य रीतीने मृत्युपत्र करावे. अल्लाहचे भय बाळगणाऱ्या लोकांवर हे बंधनकारक आहे. 181 त्यानंतर जो कोणी एकदा ते मृत्युपत्र ऐकल्यानंतर त्यात बदल करेल तर तो बदल करणारा त्याच्या गुन्ह्याबद्दल जबाबदार राहील. नि:संशय अल्लाह सर्व काही ऐकणारा व जाणणारा आहे. 182 परंतु ज्याला मृत्युपत्र करणाऱ्याबद्दल शंका असेल की, त्याच्याकडून चूक घडली किंवा त्याने जाणूनबुजून अन्याय केला, तर त्याने वारसदारांदरम्यान समझोता घडवून आणल्यास (म्हणजे शंका असलेल्या व्यक्तीने असे केल्यास), ते त्याच्यासाठी गुन्ह्याचे कृत्य ठरणार नाही. नि:संशय अल्लाह क्षमा करणारा व दया करणारा आहे.

183 श्रद्धावंतांनो! तुमच्यासाठी 'रोज़ा' (म्हणजेच उपवास ठेवणे) अनिवार्य करण्यात आले आहे, जसे तुमच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांसाठी अनिवार्य करण्यात आले होते. हे यासाठी की, तुम्ही सदाचरणी बनावे. 184 उपवासाचे काही ठरावीक दिवस आहेत. परंतु तुमच्यापैकी जे आजारी असतील किंवा

प्रवासात असतील, त्यांनी इतर वेळी ते (राहून गेलेले) दिवस पूर्ण करावे. आणि ज्या लोकांना उपवास ठेवण्यासाठी अतिशय कठीण प्रयास करावे लागत असतील तर त्यांनी एका उपवासाच्या बदल्यात एका गरीब माणसाला जेवण द्यावे. आणि जो कोणी आवश्यकतेपेक्षा जास्त चांगले कार्य करेल तर ते त्याच्यासाठीच अधिक चांगले आहे. पण तुम्ही (स्वत:) उपवास ठेवा ते तुमच्यासाठी अधिक चांगले आहे, जर का तुम्ही हे समजाल. 185 'रमजान' हा तो महिना आहे ज्या महिन्यात 'कुराण' अवतीर्ण करण्यात आला, जे मार्गदर्शन आहे मानवजातीसाठी आणि मार्गदर्शनाचे सुस्पष्ट प्रमाण आणि सत्य व असत्यामध्ये फरक करणारी कसोटी आहे. तर तुमच्यापैकी ज्याची (आपल्या आयुष्यात) या महिन्याशी गाठ पडेल त्याने त्यात उपवास करावा, पण जो आजारी असेल किंवा प्रवासात असेल त्याने इतर काळात तितके दिवस उपवास पाळावा. अल्लाह तुम्हाला सुविधा देऊ इच्छितो आणि तो तुम्हाला कष्ट देऊ इच्छित नाही. (पण तो इच्छितो की), तुम्ही (दिवसांची) संख्या पूर्ण करावी. अल्लाहने तुम्हाला सन्मार्ग दाखवलेला आहे, तर तुम्ही त्याची स्तुती करत राहा; हे यासाठी की, तुम्ही त्याचे कृतज्ञ बनून राहा.

186 आणि जेव्हा माझे भक्त तुम्हाला माझ्या विषयी विचारतात, तेव्हा तुम्ही त्यांना असे सांगा की, मी (त्यांच्या) जवळच आहे. आणि हाक देणाऱ्याच्या हाकेला मी प्रतिसाद देत असतो, ज्या-ज्यावेळी तो मला हाक मारतो. तर (माझ्या भक्तांसाठीही) आवश्यक आहे की, त्यांनीही माझ्या आदेशाला प्रतिसाद द्यावा, आणि माझ्यावर विश्वास ठेवावा, म्हणजे ते सदाचरणी बनतील. 187 उपवासाच्या रात्री तुमच्या पत्नींकडे जाणे तुमच्यासाठी वैध ठरविण्यात आले आहे. त्या तुमच्यासाठी पोषाखाप्रमाणे आहेत आणि तुम्हीही त्यांच्यासाठी पोषाखाप्रमाणे आहात. तुम्ही स्वत:चीच फसवणूक करीत होता याची अल्लाहला जाणीव आहे, म्हणून त्याने तुमच्यावर कृपादृष्टी केली आणि तुम्हाला क्षमा

केली. तर आता तुम्ही त्यांच्याकडे (पत्नींकडे) जा आणि अल्लाहने तुमच्यासाठी जे काही नेमून दिले आहे त्यासाठी प्रयत्नरत राहा. आणि तेव्हापर्यंत खा व प्या जेव्हापर्यंत रात्रीचा काळोख संपुष्टात येऊन पहाट झाल्याची चिन्हे स्पष्ट दिसू लागतात. आणि सूर्यास्त होऊन दिवे लागण्यापर्यंत उपवास सुरू ठेवा आणि जेव्हा तुम्ही मशीदीमध्ये एकांतवासीय उपासना करीत असाल (त्या काळात) रात्री त्यांच्याकडे (पत्नींकडे) जाऊ नका. या अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादा आहेत, म्हणून त्या मर्यादांच्या जवळही फिरकू नका. अशाप्रकारे अल्लाह आपले आदेश सुस्पष्टपणे देत आहे, यासाठी की, लोकांनी दुष्कृत्यांपासून स्वतःला दूर ठेवावे. 188 आणि तुम्ही आपसात आपले धन अन्यायाने गिळंकृत करू नका. आणि तुम्ही इतर लोकांच्या संपत्तीचा काही भाग हेतुपुरस्सर व अन्यायकारकपणे हडप करण्यासाठी, त्या संपत्तीचा काही भाग (लाच म्हणून) प्रशासकीय लोकांना देऊ नका. 189 (पैगंबर!) लोक तुम्हाला नवीन चंद्राविषयी विचारतात. तुम्ही त्यांना सांगा की, (नवीन चंद्र व त्याच्या कला) लोकांच्या (विविध कामांसाठी) तसेच हज यात्रेसाठी कालमापनाची साधने आहेत. तुम्ही घरांमध्ये त्यांच्या मागील बाजूंनी प्रवेश करणे हे काही सत्कार्य नव्हे. तर खरा सदाचरणी तो आहे जो अल्लाहचे भय बाळगतो. तुम्ही घरांमध्ये त्यांच्या दरवाजांतून प्रवेश करा आणि अल्लाहचे भय बाळगा, म्हणजे तुम्ही यशस्वी व्हाल.

190 आणि अल्लाहच्या मार्गात त्यांच्याशी लढा जे तुमच्याविरुद्ध लढत आहेत, परंतु अतिरेक करू नका. अल्लाह अतिरेक करणाऱ्यांना पसंत करीत नाही. 191 आणि जिथे कुठे ते तुम्हाला आढळतील, त्यांना ठार करा, (जे तुमच्याविरुद्ध लढतात). आणि जिथून त्यांनी तुम्हाला बाहेर काढले आहे. तिथून त्यांना काढून टाका; कारण छळ करणे, हत्येपेक्षाही वाईट कृत्य आहे. आणि पवित्र मशीदीच्या आसपास जोपर्यंत ते तुमच्याशी लढत नाहीत, तोपर्यंत तेथे तुम्हीही त्यांच्याशी लढू नका. परंतु जर त्यांनी तिथेच तुमच्याशी लढाई

केली, तर तिथेच त्यांच्याशी (लढा व) त्यांना ठार करा. हाच मोबदला आहे सत्य नाकारणाऱ्यांचा. 192 परंतु जर ते (युद्ध करणे) सोडून देतील, तर निःसंशय अल्लाह अतिशय क्षमाशील आणि दयाळू आहे. 193 आणि जोपर्यंत (धार्मिक) छळ थांबत नाही आणि केवळ अल्लाहसाठीच धर्माचे (मुक्तपणे पालन) होत नाही, तोपर्यंत त्यांच्याशी लढा. आणि नंतर जर त्यांनी ते (छळ) थांबवले तर ही गोष्ट लक्षात ठेवा की, आक्रमकांव्यतिरिक्त इतरांच्या बाबतीत शत्रुत्व ठेवण्याची परवानगी नाही.

194 पवित्र महिन्यांमध्ये युद्धाला मनाई या स्थितीत आहे, जेव्हा ते सुद्धा पवित्र महिन्यांमधील मनाईचे पालन करतील. आणि मनाईच्या बाबतीत समान विचार केला जाईल. म्हणून जो कोणी तुमच्यावर अत्याचार करील त्यास, त्याने ज्या मर्यादेपर्यंत तुमच्यावर अत्याचार केला आहे त्या मर्यादेपर्यंत शिक्षा करा. आणि अल्लाहचे भय बाळगा व जाणून असा की, जे अल्लाहची जाण ठेवतात, अल्लाह त्यांच्याच सोबत असतो. 195 आणि अल्लाहच्या कार्यात खर्च करा, आणि स्वतःच्या हातांनी स्वतःला विनाशात लोटू नका. आणि सत्कर्मे करा, निश्चितच अल्लाह सत्कर्मे करणाऱ्यांना पसंत करतो.

196 आणि ‘हज व उम्रा’ अल्लाहसाठी पूर्ण करा. परंतु जर तुम्हाला (हे करण्यापासून) रोखण्यात आले तर सहजरित्या कुर्बानीसाठी जे जनावर मिळेल ते सादर करा. आणि जोपर्यंत ती कुर्बानी आपल्या नियत स्थानी पोहोचत नाही तोपर्यंत तुम्ही आपल्या डोक्याचे मुंडण करू नका. आणि तुमच्यापैकी जो कोणी आजारी असेल. किंवा कोणाच्या डोक्यास काही त्रास असेल तर त्याने उपवास करून, किंवा दान देऊन किंवा बलिदानाच्या स्वरूपात काही मोबदला देऊन भरपाई करावी. आणि जेव्हा तुम्ही सुरक्षित असाल तेव्हा जो कोणी हजबरोबर उम्रा चा लाभ घेईल, त्याने सहजरित्या उपलब्ध होऊ शकेल अशी कुर्बानी अर्पण करावी. आणि ज्यांना ती उपलब्ध होत नसेल त्यांनी हजच्या काळात

तीन दिवस आणि घरी आल्यावर सात दिवस, अशाप्रकारे पूर्ण दहा दिवस उपवास करावा. हा आदेश त्याच्यासाठी आहे ज्याचे कुटुंब पवित्र मशीदीच्या जवळ वास्तव्य करीत नाहीत. आणि अल्लाहचे भय बाळगा, व याची जाणीव ठेवा की, अल्लाह कठोर शिक्षा करणारा आहे. 197 हजचे ठरावीक महिने आहेत. तर जो कोणी या महिन्यात हज करण्याचा संकल्प करील. (त्याने हे लक्षात ठेवावे की), हजच्या काळात, अभद्र बोलणे किंवा कोणतेही वाईट वर्तन किंवा कोणत्याही प्रकारचा भांडण तंटा (अशा सर्व) गोष्टींपासून (स्वत:ला) दूर ठेवणे अत्यावश्यक आहे. आणि जे सत्कृत्य तुम्ही कराल, अल्लाह ते जाणून आहे. आणि प्रवासाची सामग्री बरोबर घ्या, आणि सर्वोत्तम सामग्री 'अल्लाहची जाण असणे' ही आहे. आणि बुद्धी बाळगणाऱ्यांनो! माझेच भय बाळगा!

198 (हजच्या काळात) आपल्या पालनकर्त्याकडून कृपा प्राप्त करण्याचा प्रयत्न करणे यात गुन्हा करण्यासारखे काही नाही. आणि जेव्हा तुम्ही 'अरफात' येथून परताल तेव्हा मशअरे हरम (पवित्र स्थान) जवळ येऊन अल्लाहचे स्मरण करा. ज्याप्रमाणे अल्लाहने तुम्हाला मार्गदर्शन केले आहे, त्याप्रमाणे तुम्ही त्याचे स्मरण करा. या पूर्वी तर तुम्ही मार्गभ्रष्ट झालेल्या लोकांपैकी होता. 199 नंतर जेथून लोक परत येत आहेत तुम्हीही तेथूनच परत या. आणि अल्लाहकडे क्षमेची याचना करा. निश्चितच अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे. 200 तुम्ही 'हज' चे विहित करण्यात आलेले विधी पूर्ण केल्यानंतर अल्लाहचे गुणगान करा, जसे गुणगान तुम्ही आपल्या पूर्वजांचे करीत आलात; तर त्याहीपेक्षा अधिक अल्लाहचे गुणगान करा. काही लोक असे आहेत जे म्हणतात, 'हे आमच्या पालनकर्त्या! या जगातच आम्हाला (सर्व काही) दे.' तर अशा लोकांसाठी मृत्यूनंतरच्या जीवनात (अल्लाहच्या कृपेत) कोणताही वाटा नाही. 201 लोकांत कोणी असा आहे, जो अशी प्रार्थना करतो. 'हे आमच्या पालनकर्त्या'! आम्हाला या जगात जे चांगले आहे ते दे आणि मृत्यूनंतरच्या जगातही आम्हाला जे चांगले आहे ते

दे. आणि आगीच्या यातनांपासून आम्हाला सुरक्षित ठेव. 202 अशाच लोकांना त्यांनी केलेल्या (कर्मरूपी) कमाईच्या मोबदल्यात (आनंदमयी जीवनात योग्य) वाटा मिळणार आहे. आणि अल्लाह हिशेब करण्यात फार जलद आहे. 203 निश्चित करून देण्यात आलेल्या दिवसांत अल्लाहचे स्मरण करा. पण जो कोणी घाई करून दोन दिवसात परत फिरेल, तर असे करणे गुन्हा नाही, आणि जो कोणी अधिक काळ थांबून परत फिरेल, तर असे करणे देखील गुन्हा नाही. हे त्याच्यासाठी आहे जो अल्लाहचे भय बाळगतो. आणि तुम्ही अल्लाहचे भय (जाण) बाळगून राहा. आणि चांगल्याप्रकारे याची जाणीव ठेवा की, तुम्हाला एकत्र करून त्याच्यासमोरच आणले जाईल.

204 लोकांत कोणी असाही आहे ज्याचे या (जगातील) जीवनावरील विचार तुम्हाला फार आकर्षक वाटतात. आणि तो अल्लाहला त्याच्या मनात जे आहे त्याचा साक्षीदार बनवत असतो, पण तो (निरर्थक) वाद घालणाऱ्यांपैकी, फारच जास्त वाद घालणारा आहे. 205 पण जेव्हा तो (सत्याकडे) पाठ फिरवतो तेव्हा जमिनीवर त्याची सर्व धावपळ केवळ अनाचार माजविण्यासाठी, शेतीचा आणि (मानवजातीच्या) वंशाचा विनाश करण्यासाठी असते, पण अल्लाहला उत्पात माजविणे अजिबात आवडत नाही. 206 आणि जेव्हा त्याला सांगितले जाते की, अल्लाहचे भय बाळग, तेव्हा अहंकार त्यास आणखी पाप करण्यास प्रवृत्त करतो. अशा व्यक्तीच्या वाट्याला नरकवासच येणार आहे. आणि किती वाईट स्थान आहे ते, निवास करण्यासाठी! 207 आणि लोकांमध्ये कोणी असाही असतो, जो अल्लाहला प्रसन्न करण्यासाठी, स्वतःला झोकून टाकतो. आणि अल्लाह आपल्या भक्तांप्रति फार कनवाळू आहे.

208 श्रद्धावंतांनो! अल्लाहला पूर्णपणे शरण जा (समर्पित व्हा). आणि सैतानाच्या मार्गाचे अनुसरण करू नका. निःसंशय तो तुमचा उघड शत्रू आहे. 209 आणि तुम्ही सत्याचे सर्व स्पष्ट संकेत प्राप्त झाल्यानंतरही मार्गभ्रष्ट व्हाल, तर लक्षात

असू द्या की, अल्लाह सामर्थ्यवान व बुद्धिवान आहे. [210] हे लोक या गोष्टीची प्रतीक्षा करीत आहेत काय? की, अल्लाह मेघांच्या छायेखाली स्वत: त्यांच्यासमोर प्रकट व्हावा, सोबत त्याचे दूत ही असावेत, आणि (सर्व बाबींचा) निर्णय करण्यात यावा. आणि सर्व गोष्टींना अल्लाहकडेच परतणे आहे. [211] इस्राईलच्या मुलांना विचारा, आम्ही त्यांना किती स्पष्ट संदेश दिले होते! पण जो कोणी अल्लाहच्या कृपायुक्त संदेशाला त्याच्याकडे आल्यानंतर त्यात बदल करतो. (त्याने जाणून घ्यावे) की, अल्लाह निश्चितच कठोर शिक्षा करणारा आहे. [212] जे सत्याला नाकारणारे आहेत त्यांच्यासाठी याच जगातील जीवन सुंदर वाटावे असे करण्यात आले आहे. आणि ते (मृत्यूनंतरच्या जीवनावर) श्रद्धा ठेवणाऱ्यांचा उपहास करतात, पण जे अल्लाहचे भय बाळगून आहेत ते पुनरुत्थानाच्या दिवशी श्रद्धाहीन लोकांपेक्षा श्रेष्ठ ठरतील. आणि ज्यांच्याबद्दल अल्लाह इच्छितो त्यांच्यावर कोणत्याही हिशेबाविना अमर्याद कृपावर्षाव करतो.

[213] सुरवातीला समस्त मानवजात (विविध धर्म व संप्रदायांनी मुक्त) असा एकसंध समाज होता पण पुढे त्यांच्यात मतभेद निर्माण झाले, तेव्हा अल्लाहने शुभवार्ता देणारे व सावध करणारे पैगंबर पाठवले. आणि त्यांच्याबरोबर सत्य संदेश असलेला ग्रंथ अवतीर्ण केला, ज्याद्वारे (सत्य व असत्यादरम्यान) निर्णय केला जावा, ज्यात लोक मतभेद करीत होते. आणि मतभेद त्याच लोकांनी केला ज्यांना (सत्य संदेश असलेला) ग्रंथ देण्यात आला होता आणि त्यांना स्पष्ट संकेतही प्राप्त झाले होते, केवळ परस्परांतील ईर्षेमुळे त्यांनी मतभेद केला. तेव्हा अल्लाहने आपल्या कृपेने श्रद्धावंतांना सत्याच्या बाबतीत मार्गदर्शन केले, ज्या बाबतीत इतरांनी मतभेद केला होता. आणि अल्लाह ज्यास इच्छितो (की सरळ मार्ग दाखवावे) त्यास तो सरळ मार्ग दाखवतो. [214] तुम्हाला असे वाटते की काय, कुठल्याही कष्टमय परिस्थितीतून गेल्याशिवाय तुम्ही स्वर्गात प्रवेशास असेच पात्र ठराल? पण तुमच्यावर त्या श्रद्धावंतांप्रमाणे कष्टमय परिस्थिती आलीच नाही जे

तुमच्या आधी होऊन गेले. त्यांच्यावर संकट आणि दु:खाचे प्रसंग आले, ज्यामुळे ते इतके हादरले की, पैगंबर आणि त्याच्याबरोबर असलेल्या श्रद्धावंतांच्या तोंडून असे शब्द बाहेर पडले, 'अल्लाहकडून साहाय्य येईल तरी केव्हा?' निःसंशय अल्लाहचे साहाय्य अगदी जवळ आहे.

215 (पैगंबर!) लोक तुम्हाला विचारतात की, त्यांनी (इतरांवर) काय खर्च करावे? तुम्ही त्यांना सांगा, 'जे काही धन तुम्ही खर्च कराल, त्यात (सर्वप्रथम) आई–वडील आणि जवळचे नातेवाईक आणि अनाथ व गरजू आणि वाटसरू यांच्यासाठी खर्च करा. जे कोणते सत्कर्म तुम्ही करता, अल्लाहला त्याचे पूर्ण ज्ञान आहे.' 216 (श्रद्धावंतांनो! स्वरक्षणात) युद्ध करणे हे तुमचे कर्तव्य ठरवण्यात आले आहे, जरी तुम्हाला ते करणे नापसंत वाटत असेल. असे असू शकते की, एखादी गोष्ट तुम्हाला नापसंत आहे पण ती वस्तुत: तुमच्यासाठी चांगली आहे. आणि असेही असू शकते की, तुम्हाला एखादी गोष्ट पसंत आहे पण वस्तुत: ती तुमच्यासाठी वाईट आहे. अल्लाहला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे, पण तुम्हाला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान नाही.

217 (पैगंबर!) लोक तुम्हाला पवित्र महिन्यात युद्ध करण्यासंबंधी विचारतात, तुम्ही त्यांना असे सांगा, 'या महिन्यामध्ये युद्ध करणे हे फार मोठे पाप आहे. परंतु अल्लाहच्या मार्गाने जाण्यास लोकांना प्रतिबंध करणे, आणि अल्लाहला मानण्यास नकार देणे, आणि पवित्र मशीदीत (म्हणजे काबागृहात) जाण्यास लोकांना प्रतिबंध करणे आणि त्यामधील लोकांना तेथून हुसकून लावणे, या (सर्व गोष्टी) अल्लाहच्या नजरेत त्याहूनही मोठे पाप आहे. कारण छळ करणे — हत्या करण्यापेक्षाही भयानक वाईट कृत्य आहे.'(हे लोक) तुमच्याविरुद्ध लढाई करणे थांबवणार नाहीत, त्यांना शक्य झाल्यास ते तर तुम्हाला तुमची श्रद्धा त्याग करायला लावण्यासाठी उतावीळ आहेत. आणि तुमच्यापैकी जो कोणी आपल्या धर्माकडे पाठ फिरवील आणि सत्याला नाकारणारा बनून मृत्यू पावेल

अशाच लोकांची कृत्ये या जगात आणि मृत्यूनंतरच्या जगात निष्फळ ठरतील.
हेच लोक नरकाच्या आगीचे निवासी आहेत. ते तेथेच सदैव राहतील. 218 जे
लोक श्रद्धावंत बनले आणि ज्यांनी अल्लाहसाठी स्वदेश त्याग केला आणि
अल्लाहच्या कार्यासाठी अपार कष्ट केले (म्हणजे जिहाद केला). निःसंशय हेच ते
लोक आहेत जे अल्लाहच्या कृपेची आशा ठेवून आहेत. आणि अल्लाह फार
क्षमाशील व दयाळू आहे.
219 (पैगंबर!) ते तुम्हाला दारू व जुगाराविषयी विचारतात, तुम्ही त्यांना
सांगा, 'या दोहोंमध्ये महापाप आहे आणि लोकांसाठी काही लाभही आहेत, पण
त्यांच्यापासून होणाऱ्या लाभांपेक्षा त्यांचे नुकसान फार मोठे आहे.' आणि ते
तुम्हाला विचारतात की, त्यांनी (अल्लाहच्या कार्यात) काय खर्च करावे? तुम्ही
त्यांना सांगा, 'तुमच्या गरजेपेक्षा जे अधिक आहे (ते सर्व).' अशाप्रकारे
अल्लाह, तुम्ही चिंतन करावे म्हणून आपले संदेश तुमच्यासाठी स्पष्ट करत
असतो, 220 या आणि यानंतरच्या जगासंबंधाने (चिंतन करावे म्हणून).
(पैगंबर!) लोक तुम्हाला अनाथांविषयी विचारतात. त्यांना सांगा, 'त्यांच्या
कल्याणास चालना देणे हे फार मोठे सत्कार्य आहे. आणि तुम्ही व ते एकत्र
राहिलात तर ते तुमचे भाऊबंदच आहेत. अल्लाह चांगल्याप्रकारे ओळखून आहे
की, कोण उपद्रव माजवणारा आहे आणि कोण सुधारणावादी आहे. आणि जर
अल्लाहची इच्छा झाली असती तर त्याने तुम्हाला कष्ट सोसायला लावले असते.
खरोखर अल्लाह सर्वशक्तिमान व बुद्धिवान आहे.'
221 (श्रद्धावंतांनो!) त्या स्त्रियांशी विवाह करू नका जे अल्लाहचे समकक्ष
ठरवतात, तोपर्यंत नाही जोपर्यंत ते अल्लाहवर श्रद्धा ठेवणारे बनत नाहीत.
अल्लाहचे समकक्ष ठरवणारी (ती अनेकेश्वरवादी) स्त्री तुम्हाला कितीही आवडत
असली, तरी तिच्यापेक्षा श्रद्धावंत गुलाम स्त्री चांगली आहे. आणि अल्लाहचे
समकक्ष ठरवणाऱ्या पुरुषांशी श्रद्धावंत स्त्रियांचा विवाह करू नका, जोपर्यंत ते

(पुरुष) श्रद्धावंत बनत नाहीत. जे पुरुष अल्लाहचे समकक्ष ठरवतात त्यांच्यापेक्षा श्रद्धावंत गुलाम अधिक चांगला आहे; मग तो (अनेकेश्वरवादी) पुरुष तुम्हाला किती का आवडेना. हे (अनेकेश्वरवादी) लोक तुम्हाला नरकाच्या आगीकडे बोलावीत आहेत आणि अल्लाह स्वर्गाकडे व क्षमाप्राप्तीकडे बोलावीत आहे. तो आपले संदेश लोकांसाठी स्पष्ट करीत असतो, म्हणजे ते त्यांनी नीट लक्षात ठेवावे. 222 आणि ते तुम्हाला (स्त्रियांच्या) मासिक पाळीविषयी विचारतात, तुम्ही त्यांना सांगा, 'तो एक अस्वच्छ अवस्थेचा काळ आहे. म्हणून त्या मासिक पाळीच्या काळात स्त्रियांपासून (स्वत:ला) दूर ठेवा, जोपर्यंत त्या स्वच्छ व शुद्ध होत नाहीत. आणि त्या (मासिक पाळी पूर्ण करून) स्वच्छ व शुद्ध झाल्यावर, तुम्ही अल्लाहने जशी तुम्हाला आज्ञा केलेली आहे त्यानुसार त्यांच्याकडे जा. निश्चितच अल्लाह त्यांना पसंत करतो जे त्याच्याकडे पश्चात्तापासह वळतात, आणि जे स्वत:ला स्वच्छ व शुद्ध ठेवतात त्यांनाही तो पसंत करतो. 223 तुमच्या पत्नी तुमच्यासाठी शेतजमिनीप्रमाणे आहेत, म्हणून तुम्हाला जेव्हा व जसे आवडेल तेव्हा व तसे आपल्या जमिनीकडे जा. आणि स्वत:करिता (चांगले कृत्य) पुढे पाठवा आणि अल्लाहचे भय बाळगा. आणि तुम्हाला त्याच्या समोर हजर व्हायचे आहे, हे नीट लक्षात असू द्या.' (पैगंबर!) जे आज्ञा पाळत आहेत त्यांना शुभवार्ता द्या.

224 अल्लाहच्या नावाचा उपयोग अशा शपथांसाठी करू नका की, ज्यामुळे तुम्ही सत्कर्मे करणे, सदाचाराने वागणे आणि लोकांमध्ये समेट घडविणे या कामांपासून दूर जाल. अल्लाह सर्व काही ऐकणारा आणि जाणणारा आहे. 225 अल्लाह तुमच्या अहेतुपूर्वक घेतलेल्या शपथांबद्दल तुम्हाला जाब विचारणार नाही. पण जे जाणीवपूर्वक तुम्ही करता त्याबद्दल तो तुम्हाला निश्चितच जाब विचारेल. अल्लाह हा फार क्षमाशील व संयमी आहे. 226 जे लोक आपल्या पत्नींशी संबंध न ठेवण्याची प्रतिज्ञा घेतात, त्यांच्यासाठी प्रतीक्षा करण्याचा

कालावधी चार महिने इतका आहे. त्यानंतर त्यांनी आपली प्रतिज्ञा मागे घेतली तर निश्चितच अल्लाह हा फार क्षमाशील व दयाळू आहे. 227 आणि जर त्यांनी विवाह–संबंध संपुष्टात आणण्याचा (तलाक़चा) निर्णय घेतला तर नि:संशय अल्लाह सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा आहे. 228 तलाक़ देण्यात आलेल्या स्त्रियांनी तीन मासिक पाळ्या पूर्ण होईपर्यंत स्वत:ला (दुसरा विवाह करण्यापासून) रोखावे. आणि त्या जर अल्लाहवर आणि न्यायाच्या दिवसावर श्रद्धा ठेवत असतील तर त्यांच्यासाठी हे उचित नाही की, त्यांनी ते लपवावे जे अल्लाहने त्यांच्या गर्भाशयात निर्माण केले आहे. त्यांच्या पतींना या कालावधीत पत्नींच्या स्वरूपात त्यांना परत घेण्याचा अधिकार आहे, जर त्यांच्या पतींची समेट करण्याची इच्छा असेल तर. आणि पुरुषांचे जसे स्त्रियांच्या बाबतीत अधिकार आहेत तसेच अधिकार स्त्रियांना पुरुषांच्या बाबतीत आहेत, (आणि अधिकाराप्रमाणे जबाबदाऱ्यादेखील आहेत) परंतु पुरुषांना त्याबाबतीत स्त्रियांपेक्षा थोडेसे वरचे स्थान आहे. अल्लाह सर्वशक्तिमान व बुद्धिवान आहे.

229 तलाक़ची घोषणा दोन वेळा करता येते, त्यानंतर एकतर त्यांना (वैवाहिक जीवन पुढे सुरू ठेवण्यासाठी) सन्मानपूर्वक ठेवून घ्या किंवा स्नेहपूर्वक त्यांना पाठवून द्या. तुम्ही तुमच्या पत्नींना जे काही दिलेले आहे त्यांपैकी काही परत घेणे तुमच्यासाठी उचित ठरणार नाही. पण जर दोघांनाही अल्लाहने ठरवून दिलेल्या मर्यादांचे पालन करता येणार नाही, असे भय असेल तर (अशी परिस्थिती अपवाद असू शकते). अशी भिती तुम्हालाही वाटत असेल की, ते दोघे अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादांचे पालन करू शकणार नाहीत, तर ती स्त्री स्वत:ची (पतीपासून) मुक्तता करून घेण्यासाठी जे काही देईल, त्याबद्दल दोघांपैकी कोणालाही पाप लागणार नाही. या अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादा आहेत; म्हणून त्याचे उल्लंघन करू नका. आणि जो कोणी अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादांचे उल्लंघन करील, तर असेच लोक (खऱ्या अर्थाने) अत्याचारी

आहेत. 230 आणि जर त्याने तिला (तिसऱ्यांदा) तलाक़ दिला तर ती स्त्री त्याच्यासाठी निषिद्ध असेल, जोपर्यंत ती दुसऱ्या पतीशी विवाह करीत नाही, आणि जर त्याने (म्हणजे दुसऱ्या पतीने देखील) तिला तलाक़ दिला तर त्या दोघांनी, जर त्यांना खात्री वाटत असेल की, अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादांचे पालन करणे आपणास शक्य होईल तर पुन्हा विवाह करून एकत्रित येणे, त्यांच्यासाठी पाप ठरणार नाही. या अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादा आहेत, ज्या तो, त्या लोकांसाठी स्पष्ट करून सांगत आहे, जे ज्ञानी आहेत. 231 आणि जेव्हा तुम्ही तुमच्या पत्नींना तलाक़ द्याल आणि जेव्हा त्यांचा प्रतीक्षाकाळ (इद्दत) संपायला येईल तेव्हा त्यांना एकतर उचितरित्या ठेवून घ्या किंवा उचितरित्या त्यांना निरोप द्या. पण त्यांचा छळ करण्याचा हेतूने (त्यांच्या मर्जीच्या विरुद्ध) त्यांना अन्यायाने ठेवून घेऊ नका. जो कोणी असे करेल तर त्याने निश्चितच स्वत:वर अन्याय केला. अल्लाहच्या आदेशांशी खेळ करू नका. आणि आठवा त्या कृपेला जी अल्लाहने तुमच्यावर केली आहे. आणि ते सर्व ग्रंथ व ज्ञान जे त्याने तुम्हाला उपदेश देण्यासाठी अवतीर्ण केले. आणि अल्लाहचे भय बाळगा आणि लक्षात ठेवा की, अल्लाहला प्रत्येक गोष्टीचे परिपूर्ण ज्ञान आहे.

232 जेव्हा तुम्ही स्त्रियांना तलाक़ द्याल आणि त्या प्रतीक्षेचा कालावधी पूर्ण करतील, तेव्हा त्यांना इतर पुरुषासोबत विवाह करण्यास रोखू नका, जेव्हा की, ते चांगल्या रीतीने आपसात सहमत झालेले असतील. तुमच्यापैकी जो अल्लाहवर आणि शेवटच्या दिवसावर विश्वास ठेवतो, त्याला ही ताकीद दिली जात आहे आणि ही गोष्ट तुमच्यासाठी जास्त हितकर आणि सत्त्वशील आहे. अल्लाह (ते) जाणतो, पण तुम्ही ते जाणत नाही. 233 आणि (घटस्फोटित) मातांनी पूर्ण दोन वर्षांपर्यंत आपल्या मुलांना अंगावर दूध पाजावे. हा उपदेश त्या मातांसाठी आहे, ज्या पूर्ण कालावधीपर्यंत आपल्या मुलांना अंगावर दूध पाजू इच्छितात. आणि

मूल ज्याचे आहे (त्या मुलाच्या बापावर) नियमानुसार त्यांच्या अन्न आणि वस्त्राची जबाबदारी असेल. कोणावरही त्याच्या क्षमतेपेक्षा अधिक जबाबदारी टाकण्यात येत नाही. मातेला मुलाच्या बापाकडून तिच्या मुलामुळे त्रास दिला जाऊ नये. आणि (मातेनेही) मुलाच्या बापाला (त्याच्या मुलाबद्दल) त्रास देऊ नये. आणि (बापाचा मृत्यू झाल्यास) वारसावरही असेच करण्याची जबाबदारी आहे. त्या दोघांनी विचार विनिमय करून परस्परांच्या संमतीने मुलाचे अंगावर दूध पिणे सोडवायचे ठरवले तर, असे करण्यास काही हरकत नाही. आणि तुम्हाला तुमच्या मुलांसाठी दूध पाजणारी दाई ठेवायची असेल, तर असे केल्यास काही गुन्हा नाही. पण या अटीवर की, तुम्ही तिला जे द्यायचे कबूल केले असाल, ते रास्त रीतीने (तिला) द्यावे. अल्लाहचे भय बाळगा आणि लक्षात ठेवा, तुम्ही जे काही करत आहात, ते अल्लाह पाहत आहे.

234 आणि तुमच्यापैकी जे मरण पावतात व आपल्या पत्नी मागे सोडून जातात. तेव्हा त्या पत्नींनी स्वत: चार महिने दहा दिवस प्रतीक्षा करावी (तेव्हापर्यंत पुनर्विवाह करू नये). आणि जेव्हा त्यांचा नियत कालावधी पूर्ण होईल तेव्हा त्या स्वत:च्या बाबतीत योग्य रीतीने जे काही करतील, त्याबद्दल तुम्हाला कोणतेही पाप लागणार नाही. आणि तुम्ही जे काही करत आहात त्याची अल्लाहला पूर्ण जाणीव आहे. 235 या (विधवा किंवा घटस्फोटित) स्त्रियांना विवाहाचा प्रस्ताव सूचक संकेताद्वारे दिल्यास अथवा (त्यांच्याशी विवाह करण्याची) इच्छा मनात बाळगल्यास काही गुन्हा नाही. अल्लाहला ठाऊक आहे की, तुम्ही (या संबंधात) त्यांचा विचार कराल. पण (विवाहासंबंधाने) त्यांच्याशी छुपा करार करू नका, तर तुम्ही त्यांना रास्त पद्धतीने (विवाहाचा प्रस्ताव) बोलून दाखवू शकता. आणि विहित कालावधी पूर्ण होत नाही तोपर्यंत विवाहाचा संकल्प करू नका. आणि याची जाणीव ठेवा की, अल्लाह तुमच्या मनातील सर्व गोष्टींना जाणून आहे. आणि म्हणून त्याचे भय बाळगा आणि याची जाणीव ठेवा

की, अल्लाह अतिशय क्षमाशील व संयमी आहे. 236 जर तुम्ही त्यांना स्पर्श केलेला नाही किंवा महर निश्चित केलेला नाही, अशा वेळेस तलाक़ दिला तर तुमच्यावर महर संबंधाने  काही गुन्हा नाही (अशा परिस्थितीत महर संबंधाने तुम्ही जबाबदार नाही). तरीपण चांगल्या पद्धतीने त्यांच्यासाठी काही तरतूद करा. धनवानाने आपल्या ऐपतीनुसार आणि गरिबाने आपल्या ऐपतीनुसार काही निर्वाह सामग्री द्यावी. असे करणे हे सद्‌वर्तनी लोकांचे कर्तव्य ठरविण्यात आलेले आहे.

237 आणि जर तुम्ही त्यांना स्पर्श करण्यापूर्वीच तलाक़ दिला आणि तुम्ही त्यांच्या बाबतीत महर निश्चित केलेला असेल, तर जी महरची (रक्कम) निश्चित झालेली असेल, त्या रकमेचा अर्धा भाग त्यांना द्या, ही गोष्ट वेगळी आहे की, स्त्रीनेच महर सोडून द्यावे. किंवा त्या पुरुषाने ज्याच्या हातात वैवाहिक बंधन आहे त्याने उदारता दाखवावी (आणि संपूर्ण महर द्यावा). सोडून देणे (हे कृत्य) सदाचरणाच्या अधिक जवळ आहे. एकमेकांसोबत भलेपणाचा व्यवहार करायला विसरू नका. खरोखर, अल्लाह ते सर्व पाहत आहे जे तुम्ही करीत आहात.

238 नमाज़ांची (प्रार्थना) काळजी घ्या, विशेषत: मधल्या नमाज़ाची, आणि अल्लाहसमोर पूर्ण विनम्रतेने उभे राहा. 239 जर तुम्ही भयग्रस्त असाल, तर पायी प्रवासात किंवा स्वार होऊन प्रवास करताना (जमेल तेव्हा) प्रार्थना करा (नमाज़ पढा), पण जेव्हा तुम्ही सुरक्षित स्थितीत असाल तेव्हा अल्लाहचे स्मरण करा जसे की, त्याने तुम्हाला शिकविले आहे, जे आधी तुम्ही जाणत नव्हता.
240 आणि तुमच्यापैकी जे लोक मरण पावतील आणि आपल्या पत्नींना मागे सोडून जातील, अशा लोकांनी (आपल्या अंतिमसमयी) मृत्युपत्राद्वारे अशी व्यवस्था करावी की, त्यांना एक वर्षापर्यंत त्यांच्या घरातच राहू देऊन, त्यांना

उदरनिर्वाह दिला जावा. परंतु त्या स्वत: होऊन घर सोडून निघून जातील तर त्यांच्या संबंधात, त्या जी कोणतीही उचित गोष्ट करतील, त्याबद्दल तुमच्यावर काहीही दोष असणार नाही, अल्लाह सर्वशक्तिमान व बुद्धिवान आहे. 241 आणि घटस्फोटित स्त्रियांसाठी देखील योग्य प्रकारे उदरनिर्वाहाची व्यवस्था करणे आवश्यक आहे. अल्लाहचे भय बाळगणाऱ्या लोकांचे हे कर्तव्य आहे. 242 अशाप्रकारे अल्लाह आपले संदेश स्पष्ट करून सांगत आहे, (अपेक्षित आहे) की, तुम्ही बुद्धीचा वापर कराल.

243 तुम्ही त्या लोकांना पाहिले नाही की काय? जे मृत्यूच्या भीतीने आपल्या घरांना सोडून धावत सुटले, आणि ते हजारोंच्या संख्येत होते. तेव्हा अल्लाहने त्यांना म्हटले, 'मरा'. मग त्याने त्यांना जिवंत केले. निश्चितच अल्लाह लोकांप्रति अत्यंत उदार आहे, पण बहुसंख्य लोक कृतज्ञता व्यक्त करीत नाहीत. 244 आणि अल्लाहच्या मार्गात लढा (बचावात्मक लढाई). आणि लक्षात ठेवा अल्लाह सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा आहे. 245 (तुमच्यात) असा कोण आहे जो अल्लाहला उदारपणे कर्ज देईल, (म्हणजे अल्लाहच्या कार्यात आपले धन मोठ्या प्रमाणावर लावेल). आणि अल्लाह त्याच्यासाठी कित्येक पटीने वाढ करून ते परत करेल. आणि अल्लाह (कुठल्याही गोष्टीत) घट किंवा वाढ करू शकतो. आणि (शेवटी) तुम्हाला त्याच्याकडेच परत जायचे आहे.

246 मूसानंतर बनी इस्राईल (इस्राईलची संतती) च्या नेत्यांची अवस्था काय झाली, तुम्हाला माहीत नाही का? जेव्हा त्यांनी त्यांच्या एका पैगंबराकडे मागणी घातली की, आमच्यासाठी एक राजा नियुक्त करा, म्हणजे आम्हाला अल्लाहच्या कार्यासाठी युद्ध करता येईल. पैगंबराने उत्तर दिले, 'असे होऊ नये की, तुमच्यावर युद्ध करणे बंधनकारक केले जाईल आणि तुम्ही युद्ध करण्यास

नकार द्याल.' (त्यावर) ते म्हणाले, 'हे कसे शक्य होऊ शकते की, आम्ही अल्लाहच्या कार्यासाठी युद्ध करणार नाही? जेव्हा की, आम्हाला आमचे घरदार सोडण्यास भाग पाडण्यात आले आणि आम्हाला आमच्या मुलाबाळांपासून दूर केले गेले'. पण शेवटी, जेव्हा त्यांना युद्धाचा आदेश देण्यात आला, तेव्हा त्यांच्यापैकी काही लोक वगळता अन्य सर्वांनी त्याकडे पाठ फिरवली. अल्लाह अन्यायी लोकांना चांगलेच ओळखून आहे. 247 आणि त्यांच्या पैगंबराने त्यांना म्हटले, 'अल्लाहने तालूतला तुमच्यासाठी राजा म्हणून नियुक्त केले आहे.' (त्यावर) ते म्हणाले, 'राजसिंहासनावर बसण्याचा त्याच्यापेक्षा आमचा अधिक हक्क आहे. आणि त्याच्याकडे तर मोठी धनदौलतही नाही. (असे असताना आम्हाला सोडून त्यास राजसिंहासन कसे काय मिळू शकते).' त्यावर (पैगंबराने) उत्तर दिले, 'अल्लाहने तुमच्यापेक्षा त्याला श्रेष्ठ ठरवून निवडले आहे. आणि त्याला (तालूतला) (तुमच्या तुलनेत) जास्त प्रमाणात ज्ञान आणि शारीरिक सामर्थ्य प्रदान केले आहे. अल्लाह ज्याच्या बाबतीत इच्छितो त्यास, आपल्या मुलखावर राज्य करण्याचा अधिकार प्रदान करतो. अल्लाह अत्यंत उदार आहे आणि प्रत्येक गोष्ट जाणणारा आहे.'

248 आणि त्यांच्या पैगंबराने, त्यांना असे सांगितले, तालूतची राजापदी नियुक्त झाल्याची एक खूण तुमच्यापुढे स्पष्ट होईल, ती म्हणजे तुमच्याजवळ ती पेटी येईल जिच्यामध्ये तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्यासाठी मन:शांतीची सामग्री आहे. आणि मूसा व हारूनच्या परिवारातील लोकांनी आपल्या मागे सोडलेले अवशेष आहेत. (ती पेटी) (अल्लाहचे) दूत घेऊन येतील. यामध्ये तुमच्यासाठी खचितच एक मोठी खूण आहे, पण जर तुम्ही विश्वास ठेवणारे असाल. 249 आणि जेव्हा तालूत आपली सेना घेऊन बाहेर पडला, तेव्हा तो

असे म्हणाला, ‘अल्लाह एका नदीद्वारे निश्चितच तुमची परीक्षा घेईल. तेव्हा जो कोणी नदीमधील पाणी पिईल, माझा त्याच्याशी संबंध राहणार नाही, आणि जो ते पिणार नाही त्याच्याशीच माझा संबंध राहील. तथापि एखाद्याने त्यातून आपल्या हातांनी केवळ ओंजळभर पाण्याचे घोट घेतल्यास हरकत नाही.’ परंतु त्यांच्यापैकी काही थोडे लोक वगळता अन्य सर्वांनी ते पाणी पूर्ण तृप्त होईपर्यंत प्यायले. आणि जेव्हा तालूत व त्याचे (अल्लाहवर) दृढ विश्वास ठेवणारे साथीदार नदी ओलांडून दुसऱ्या बाजूला पोहोचले. तेव्हा ते (पाणी प्यायलेले लोक) म्हणू लागले, ‘आज आमच्यामध्ये जालूत व त्याच्या सैन्याचा सामना करण्याची शक्ती नाही.’ पण त्यांच्यापैकी जे लोक असा दृढ विश्वास ठेवून होते की, अल्लाहशी त्यांची भेट अटळ आहे, ते म्हणाले, ‘कित्येक वेळेस लहान समुदायाने, अल्लाहच्या मदतीने मोठ्या समुदायावर विजय प्राप्त केले आहे. निश्चितच अल्लाह त्यांच्या सोबत आहे जे (प्रतिकूल परिस्थितीत) अढळ सहनशीलता बाळगतात.’
250 आणि जेव्हा त्यांचा सामना जालूत व त्याच्या सैन्याशी झाला तेव्हा त्यांनी प्रार्थना केली, ‘हे आमच्या पालनकर्त्या, (प्रतिकूल परिस्थितीत) सहन करण्याची शक्ती आम्हाला प्रदान कर, आणि त्यांच्यासमोर आम्हाला दृढतेने उभे कर, आणि या सत्य नाकारणाऱ्या लोकांविरुद्ध आम्हाला साहाय्य प्रदान कर.’ 251
आणि शेवटी अल्लाहच्या आज्ञेने त्यांनी त्यांचा पराभव केला. आणि दाऊदने जालूतला ठार केले. आणि अल्लाहने दाऊदला (तालूतचा उत्तराधिकारी बनवून) राजपद व विवेक प्रदान करून उपकृत केले, आणि ज्या ज्या गोष्टीसंबंधाने आवश्यक वाटले ते ज्ञान प्रदान केले. आणि अल्लाहने (वाईट) लोकांना एक–दुसऱ्यांकरवी पिटाळून लावण्याची व्यवस्था केली नसती तर भूतलावर भयंकर अराजकता माजली असती. परंतु अल्लाह जगातील लोकांवर अत्यंत कृपा करणारा

आहे.

[252] (पैगंबर!) हे अल्लाहचे संदेश आहेत जे आम्ही (सत्य उघड करण्यासाठी) तुमच्यापुढे ठेवत आहोत. निश्चितच तुम्ही त्या लोकांपैकी आहात ज्यांच्यावर संदेश पोचविण्याची जबाबदारी सोपवण्यात आलेली आहे. [253] या पैगंबरांना आम्ही (वेगवेगळ्या बाबतीत) एक-दुसऱ्यावर श्रेष्ठत्व प्रदान केले. त्यांच्यापैकी कोणी असा होता ज्याच्याबरोबर स्वत: अल्लाहने संभाषण केले. तर काहींच्या दर्जात वाढ केली. आणि मरियमपुत्र (पैगंबर) ईसा यांना स्पष्ट संकेत दिले. आणि पवित्र आत्म्याद्वारे त्यांना साहाय्य दिले. आणि जर अल्लाहने इच्छिले असते तर त्यांच्या नंतर आलेले लोक त्यांना स्पष्ट संकेत मिळाल्यानंतरही एकमेकांशी झगडले नसते. पण त्यांच्यात मतभेद निर्माण झालेच. त्यांच्यापैकी काही श्रद्धावंत बनले आणि काहींनी सत्याचा स्वीकार करण्यास नकार दिला. अल्लाहची इच्छा असती तर ते एकमेकांशी झगडले नसते परंतु अल्लाह तेच करतो जे करण्याची त्याची इच्छा असते. [254] (अल्लाहवर) विश्वास ठेवणाऱ्यांनो! आम्ही तुम्हाला जे काही दिले आहे त्यातून खर्च करा, असा दिवस येण्यापूर्वी, ज्या दिवशी कोणतीही खरेदी व विक्री होणार नाही, कोणतीही मैत्री राहणार नाही आणि कोणाची मध्यस्थी देखील चालणार नाही. आणि जे अल्लाहवर विश्वास ठेवत नाहीत ते (स्वत:चेच) नुकसान करून घेत आहेत. [255] 'अल्लाह', त्याच्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही. तो निरंतर जिवंत व आत्मनिर्भर आहे (प्रत्येक गोष्टीचा प्रारंभकर्ता आणि) प्रत्येक गोष्टीचा सांभाळकर्ता तोच आहे. ना त्याला कधी झोपेची डुलकी येते, ना झोप येते. ते सर्व त्याचेच आहे, जे आकाशात आहे आणि जे पृथ्वीवर आहे. कोण त्याच्या परवानगीशिवाय त्याच्याकडे शिफारस करू शकतो. लोकांसमोर उघड असलेल्या आणि

त्यांच्यापासून छुप्या असलेल्या सर्व गोष्टी तो जाणून आहे. आणि तो इच्छील त्याव्यतिरिक्त त्याच्या ज्ञानातून काहीच ते प्राप्त करू शकत नाहीत. त्याच्या सत्तेरूपी सिंहासनाने पृथ्वी आणि आकाश यांना व्यापून टाकलेले आहे. आणि त्यांचा सांभाळ करण्याने तो कधी थकत नाही. सर्वोच्च आहे तो! प्रचंड महानता आहे त्याची![256] धर्माच्या बाबतीत कोणतीही जबरदस्ती नाही. सदाचरणी मार्ग आणि दुराचरणी मार्ग यातील फरक आता (चांगल्याप्रकारे) स्पष्ट झालेला आहे. तर जो कोणी सैतानी मार्गदर्शनाचा धिक्कार करतो आणि अल्लाहवर विश्वास ठेवतो. त्याने निश्चितपणे एक मजबूत आधार पकडून ठेवला. तो कधीही तुटू शकणार नाही. आणि अल्लाह सर्व काही ऐकणारा व जाणणारा आहे. [257] अल्लाह (त्याच्यावर), विश्वास ठेवणाऱ्या लोकांचा आश्रयदाता आहे. तो त्यांना अंधकारातून बाहेर काढून प्रकाशाकडे आणतो. तर उलटपक्षी जे सत्य नाकारण्यावर ठाम आहेत त्यांचा मित्र सैतान आहे. तो त्यांना प्रकाशातून बाहेर काढून अंधकाराकडे घेऊन जातो. त्यांचे नरकाच्या आगीत जाणे अटळ आहे. ते त्यात सदैव राहतील.

[258] (पैगंबर!) तुम्ही त्या व्यक्ती बद्दल ऐकले नाही का? ज्याने इब्राहीमशी त्याच्या पालनकर्त्या संबंधाने वादविवाद केला, तो हे (केवळ) यासाठी करू लागला, कारण अल्लाहने त्याला राज्य दिले होते. जेव्हा इब्राहीमने म्हटले, 'माझा पालनकर्ता तो आहे, जो जीवन देतो आणि मरण देतो'. तेव्हा तो (राजा) उत्तरला, 'मी देखील जीवन देतो आणि मरण देतो.' (त्यावर) इब्राहीमने त्यास म्हटले, 'जर असे आहे, तर अल्लाह सूर्य पूर्वेला उगवितो, तू (आता) त्याला पश्चिमेकडून उगवून दाखव.' त्यावर (त्या सत्य नाकारणाऱ्या) श्रद्धाहीनाची बोलतीच बंद झाली. आणि अल्लाह (जाणूनबुजून) अत्याचारी कृत्ये करणाऱ्या

लोकांना (कदापि) सन्मार्ग दाखवीत नाही.

259 किंवा (हे पैगंबर! तुम्ही) अशा माणसासारखा (कोणी पाहिला आहात का?) जो एका गावा जवळून गेला, जे आपल्या छपरावर कोसळलेले होते. तो म्हणाला, 'याचा (पूर्ण) नाश झालेला असताना, अल्लाह हे सर्व परत जिवंत कसे करू शकतो?' तेव्हा अल्लाहने त्याला मृत्यू दिला आणि शंभर वर्षापर्यंत त्याला मृत अवस्थेत ठेवले. त्यानंतर त्याला जीवन प्रदान करून उठवले आणि विचारणा केली, 'या अवस्थेत तू किती काळ राहिला आहेस?' त्यावर तो उत्तरला, 'मी (या अवस्थेत) एक दिवस किंवा दिवसाचा काही भाग राहिलो आहे.' (त्यावर) अल्लाहने म्हटले, 'नाही, (या अवस्थेत) तू शंभर वर्ष राहिला आहेस'. आता तू आपल्या खाण्या-पिण्याच्या वस्तूंकडे पाहा, त्यामध्ये थोडादेखील फरक पडलेला नाही, (म्हणजे त्या सडल्या नाहीत) आणि आपल्या गाढवाकडेही पाहा. (आम्ही हे सर्व यासाठी केले) की, तुला लोकांसाठी एक उदाहरण म्हणून प्रस्तुत करता यावे. आणि त्या (माणसांच्या व प्राण्यांच्या) हाडांकडे पाहा, आम्ही ती कशी व्यवस्थित जोडतो आणि त्यावर मासाचे आवरण चढवतो. अशाप्रकारे जेव्हा (हे सर्व) त्याच्यासमोर स्पष्ट झाले तेव्हा तो म्हणाला, '(मला ते उमजले आहे की), अल्लाह (जे इच्छितो) ते सर्व करण्याचे सामर्थ्य त्याला प्राप्त आहे!' 260 आणि (तो प्रसंग आठवा!) जेव्हा इब्राहीमने म्हटले, 'हे माझ्या पालनकर्त्या, मृतांना तू जीवन कसा प्रदान करतोस ते मला दाखव.' (त्यावर) अल्लाहने म्हटले, 'तू विश्वास ठेवत नाहीस का?' तेव्हा इब्राहीमने उत्तर दिले, 'निश्चितपणे, मी त्यावर विश्वास ठेवतोच. (पण मला ते पाहू दे) म्हणजे माझ्या मनाला पूर्ण समाधान लाभेल.' त्यावर अल्लाहने म्हटले, 'तू चार पक्षी घे आणि त्यांना तुझी आज्ञा पाळायला शिकव (म्हणजे अशाप्रकारे त्यांना तयार कर)

आणि त्यांपैकी प्रत्येकाला (तुझ्या सभोवतालच्या) प्रत्येक टेकडीवर ठेव. नंतर त्यांना बोलव. ते तुझ्याकडे धावत येतील आणि (चांगल्याप्रकारे) जाणून घे की, अल्लाह सर्वशक्तिमान व बुद्धिवान आहे.'

261 जे अल्लाहच्या कार्यासाठी आपले धन खर्च करतात, त्यांची तुलना धान्याच्या एका दाण्याशी करता येईल, (ज्याला पेरल्यानंतर) त्याला सात कणसे येतात, आणि प्रत्येक कणसात असतात शंभर दाणे, आणि अल्लाह ज्याच्या बाबतीत इच्छितो (योग्य समजतो) अनेक पटीने वृद्धी करतो. अल्लाह अत्यंत उदार व सर्वज्ञ आहे. 262 जे आपले धन अल्लाहच्या कार्यासाठी खर्च करतात, आणि खर्च केल्यानंतर, त्यासंबंधाने कुणाला हिणवीत नाहीत, किंवा (त्या गरजू लोकांच्या भावना ज्यांना त्यांनी साहाय्य केले) दुखवीत नाहीत, ते आपल्या पालनकर्त्याकडे बक्षीस प्राप्त करतील. ना तिथे ते भयभीत होतील, ना ते दुःखी होतील. 263 एक प्रेमाचे बोल आणि क्षमाशीलतेने वागणे त्या दानकार्यापेक्षा श्रेष्ठ आहे जे केल्यानंतर (कोणालातरी) दुखवले जाते. अल्लाह स्वयंपूर्ण व संयमी आहे. 264 हे श्रद्धा बाळगणाऱ्यांनो! तुम्ही आपले दानकार्य, हिणवून किंवा (गरजू लोकांच्या भावना) दुःखवून त्या माणसाप्रमाणे व्यर्थ घालवू नका, जो केवळ आपले धन लोकांना दाखवण्यासाठी (आणि त्यांच्या तोंडून प्रशंसा ऐकण्यासाठी) खर्च करतो. आणि तो अल्लाहवर आणि (न्यायाच्या) अंतिम दिवसावर विश्वास ठेवत नाही. त्याचे उदाहरण त्या गुळगुळीत दगडासारखे आहे, ज्यावर (थोडीशी) धूळ बसलेली आहे, मग त्यावर भरपूर पाऊस पडतो. आणि त्या (दगडास) पुन्हा जसाच्या तसा, स्वच्छ, गुळगुळीत व टणक करून टाकतो. अशा लोकांना त्यांच्या (चांगल्या) कार्यापासून काहीच प्राप्त होत नाही. आणि अल्लाह सत्य स्वीकारण्यास नकार देणाऱ्या लोकांना सन्मार्ग दाखवत

नाही.

265 आणि जे लोक आपले धन अल्लाहच्या प्रसन्नता प्राप्तीसाठी आणि आपल्याला मानसिक स्वास्थ्य लाभावे म्हणून खर्च करतात, त्यांची तुलना उंचावर असलेल्या त्या बागेशी करता येईल जिथे भरपूर पाऊस पडला तर (फळांचे) दुपटीने उत्पन्न प्राप्त होते, आणि जर भरपूर पाऊस पडला नाही तर (पिकासाठी) थोडासा पाऊसही पुरेसा होतो. आणि अल्लाह ते सर्व पाहत आहे, जे तुम्ही करत आहात. 266 तुमच्यापैकी कोणी अशी इच्छा करेल काय? की, त्याचा खजुरीचा व द्राक्षांचा मळा असावा. व त्याखाली पाण्याचे कालवे वाहत असावेत त्यामध्ये त्याच्यासाठी सर्व प्रकारची फळे असावीत, आणि वार्धक्यानेही त्याला ग्रासलेले असावे, आणि (त्याची काळजी घेण्यासाठी) कमजोर मुले असावी. अशा स्थितीत त्या मळ्यावर आग ओकणारी भयंकर वावटळ यावी आणि तिने त्या मळ्याला जोरदार तडाखा द्यावा व तो मळा संपूर्णपणे जळून भस्मसात व्हावा? अशाप्रकारे अल्लाह (जीवनाच्या वास्तवाबद्दल) तुम्ही विचार करावा म्हणून आपले संदेश स्पष्ट करून सांगत आहे.

267 (अल्लाहवर) विश्वास ठेवणाऱ्यांनो! जे (धन) तुम्ही कमावले आहे आणि आम्ही जमिनीतून तुमच्यासाठी जे निर्माण केले आहे, त्यांपैकी चांगल्या वस्तू (इतरांना) दान करा. आणि अशा निरुपयोगी किंवा टाकाऊ वस्तू दान म्हणून देण्याचा विचार देखील करू नका. ज्या तुम्ही स्वत:साठी (कोणी दिल्यास) घेणार नाही. किंवा (घेतल्यास) मोठ्या नाखुषीने घ्याल. आणि लक्षात ठेवा की, अल्लाह स्वयंपूर्ण व सदा स्तुतीस पात्र आहे. 268 सैतान तुम्हाला दारिद्र्याची भिती दाखवतो, आणि तुम्हाला गलिच्छ कामे करण्याची प्रेरणा देतो. उलटपक्षी अल्लाह तुम्हाला क्षमा करण्याचे व कृपा करण्याचे वचन

देतो. आणि अल्लाह मोठा उदार व मोठा ज्ञानी आहे. 269 तो ज्यास इच्छितो त्यास विवेक प्रदान करतो, आणि ज्या कोणाला विवेक प्रदान करण्यात आले असेल, त्याला खरोखर मोठी संपत्ती प्राप्त झाली. आणि केवळ तेच लोक सदुपदेश ग्रहण करतात, जे बुद्धिमान आहेत.

270 आणि जे काही तुम्ही इतरांवर खर्च करता किंवा (पुढे खर्च करण्यासंबंधाने) नवस करता. निश्चितच अल्लाह ते जाणून आहे. आणि दुराचारी लोकांचा कोणीही साहाय्यक असणार नाही. 271 तुम्ही दानकार्य उघडपणे करा, तेही ठीक आहे. पण गुप्तपणे तुम्ही गरजू लोकांना दान द्याल, तर ते तुमच्यासाठी अधिक हितावह आहे. आणि असे करणे तुमच्या काही वाईट कृत्यांची भरपाई ठरेल. आणि अल्लाहला तुमच्या सर्व कृत्यांची जाणीव आहे. 272 हे पैगंबर! त्यांना सन्मार्ग अनुसरायला लावणे, ही (काही) तुमची जबाबदारी नाही. हे केवळ अल्लाहचे काम आहे की, तो ज्याला सन्मार्गासाठी योग्य समजतो, त्याला सन्मार्ग दाखवतो. आणि तुम्ही जे काही धन (इतरांवर) खर्च करता, ते तुमच्या स्वत:च्याच चांगल्यासाठी आहे. (तुमचा त्यात स्वत:चा फायदा तेव्हा आहे), जेव्हा तुम्ही ते केवळ अल्लाहची मर्जी संपादन करण्यासाठी खर्च करता. आणि तुम्ही जे काही धन खर्च कराल ते पुरेपूर तुम्हाला परत करण्यात येईल. आणि तुमच्यावर (मुळीच) अन्याय केला जाणार नाही. 273 अशा गरजूंना दान द्या, ज्यांनी अल्लाहच्या कार्यात स्वत:ला पूर्णपणे वाहून टाकले आहे की, त्यामुळे ते (उपजीविकेसाठी) जमिनीवर धावपळ करू शकत नाहीत. ते (याचना करण्यापासून) स्वत:ला दूर ठेवतात, आणि म्हणून त्यांच्या (खऱ्या) परिस्थितीची जाण नसलेली व्यक्ती, ते (आर्थिकदृष्ट्या) सुस्थितीत आहेत असे समजू शकते. पण तुम्ही त्यांना त्यांच्या चेहऱ्यांवरून ओळखू शकता. ते लोकांच्या मागे

लागून मागत फिरत नाहीत. आणि जे काही धन तुम्ही खर्च कराल, निश्चितच ते अल्लाह पूर्णपणे जाणून आहे. 274 जे लोक आपले धन रात्रंदिवस (अल्लाहच्या कार्यात) जाहीरपणे आणि खाजगीत खर्च करतात त्यांच्यासाठी त्याचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्याकडे आहे. (त्यांना असे जीवन लाभेल) ना (त्यात) भय असेल, ना दु:ख.

275 जे लोक व्याज खातात ते न्यायाच्या दिवशी (अल्लाहसमोर) अशा अवस्थेत येतील की, त्यांना सैतानाने आपल्या स्पर्शाने वेडा बनवून टाकले आहे. कारण ते म्हणतात की, खरेदी-विक्री चा व्यवसाय देखील व्याज आकारण्याचाच एक प्रकार आहे, पण अल्लाहने तर (खरेदी-विक्रीच्या) व्यवसायाला वैध आणि व्याज (आकारण्याला) निषिद्ध ठरवले आहे. इथून पुढे ज्याला आपल्या पालनकर्त्याकडून (ताकीदरूपी) उपदेश पोचला आणि त्यानुसार तो (व्याजाच्या व्यवहारापासून) परावृत्त झाला, तर त्याला पूर्वी मिळालेले ते (व्याज) त्याचे झाले. आणि आता त्याचे प्रकरण अल्लाहच्या सुपूर्द आहे. आणि जे लोक पुन्हा (तेच काम) करतील, तर ते नरकाच्या आगीचे रहिवासी बनतील. ते नेहमीसाठी तेथेच राहतील. 276 अल्लाह व्याजाच्या (सर्व पद्धती) रद्द ठरवतो, तर उलटपक्षी दानकार्याच्या (बक्षीसरूपी मोबदल्यात आपल्या कृपेने, कित्येक पटीने) वाढ करतो. अल्लाह अशा लोकांना पसंत करीत नाही, जे कृतघ्न व दुराचारी आहेत. 277 जे लोक श्रद्धेचा अंगीकार करून सत्कर्मे करतात आणि नित्य प्रार्थना करतात (नमाज़ पढतात) आणि दानकार्य करतात (ज़कात देतात), अशा लोकांचा मोबदला निश्चितच त्यांच्या पालनकर्त्याकडे आहे. त्यांना भयमुक्त आणि दु:खांपासून मुक्त जीवन लाभेल.

278 (अल्लाहवर) विश्वास ठेवणाऱ्यांनो! अल्लाहचे भय बाळगा, आणि जे

काही व्याज तुम्हाला (लोकांकडून) मिळणे बाकी आहे, ते सोडून द्या. (असे करा) जर तुम्ही खरोखर विश्वास ठेवणारे असाल. 279 पण जर तुम्ही असे करणार नसाल तर जाणून घ्या की, अल्लाह आणि पैगंबराकडून (तुमच्याविरुद्ध) युद्धाची घोषणा केली जात आहे. पण जर तुम्हाला (व्याज घेण्याच्या झालेल्या व्यवहाराबद्दल) पश्चात्ताप होत असेल तर तुमची मूळ रक्कम घेण्याचा तुम्हाला अधिकार आहे. तुम्ही (इतरांवर) अन्याय करू नका आणि (इतरांनीही) तुमच्यावर अन्याय करू नये. 280 आणि जर तो कर्जदार कठीण परिस्थितीत असेल तर त्याची परिस्थिती सुधारेपर्यंत (त्याला कर्ज फेडीसाठी) मुदत द्या. आणि ते तर तुमच्या स्वत:साठी अधिक हितावह असेल की, तुम्ही (ती संपूर्ण कर्जाची रक्कम दान म्हणून) माफ करून टाकाल. (हे तुमच्यासाठी चांगले आहे) जर का तुम्ही समजाल. 281 आणि त्या दिवसाचे भय बाळगा, (जाण ठेवा), जेव्हा तुम्हाला अल्लाहकडे परत पाठवले जाईल. त्या दिवशी प्रत्येकास त्याने जी काही (कर्मरूपी) कमाई केलेली असेल, तिचा पूर्ण मोबदला देण्यात येईल, आणि कोणावरही (अजिबात) अन्याय होणार नाही.

282 (अल्लाहवर) विश्वास ठेवणाऱ्यांनो! जेव्हा तुम्ही एक-दुसऱ्याबरोबर ठरावीक मुदतीसाठी उसने देण्या-घेण्याचे व्यवहार कराल, तेव्हा तो (व्यवहार) लेखी स्वरूपात करा. आणि लिहिणाऱ्याने उभयपक्षांदरम्यान प्रामाणिकपणे ते लिहावे. आणि लिहिणाऱ्याने (ज्याला लिहिता येते) लिहिण्यास नकार देऊ नये. तर त्याने जरूर लिहावे. कारण अल्लाहनेच त्याला शिकवले आहे. आणि ज्याच्यावर (कर्ज फेडण्याची जबाबदारी येते) त्याने (लिहायचा) मजकूर सांगावा. आणि (मजकूर सांगणाऱ्याने) अल्लाहचे भय बाळगावे जो त्याचा पालनकर्ता आहे. (जो करार झाला आहे) त्यात काहीही कमी-जास्त करू नका. पण ती

व्यक्ती जिच्यावर कर्ज फेडण्याची जबाबदारी आहे, कमी समज असलेली किंवा दुर्बल किंवा स्वत: मजकूर सांगण्यास असमर्थ असेल तर तिचे हितसंबंध जपणाऱ्या कोणत्याही व्यक्तीने (लिहायचा) मजकूर न्यायपूर्वक सांगावा. आणि तुमच्या पुरुषांपैकी दोन साक्षीदार बोलावून घ्या. आणि दोन पुरुष उपलब्ध होत नसतील तर तुम्हाला मान्य असलेले, एक पुरुष आणि दोन स्त्रिया साक्षीदार म्हणून असाव्यात, हे अशासाठी की, एखादीला विसर पडला तर दुसरी तिला आठवण करून देईल. आणि जेव्हा साक्षीदारांना बोलाविले जाईल तेव्हा त्यांनी (साक्ष देण्यासाठी) नकार देऊ नये. व्यवहार छोटा असो अथवा मोठा, तुम्ही त्याच्या परतफेडीची मुदत ठरवून (ते) लेखी नमूद करण्यास कंटाळा करू नका. ही गोष्ट अल्लाहच्या दृष्टीने अधिक न्यायपूर्ण आहे; (तसेच) साक्ष (टिकवून) ठेवण्यासाठी जास्त विश्वसनीय आहे, आणि (नंतर) तुमच्या मनामध्ये शंका-कुशंका निर्माण होण्याची शक्यताही उरत नाही. (देण्या-घेण्याचा प्रत्येक व्यवहार लेखी स्वरूपात करणे आवश्यक आहे), पण जो व्यवहार ताबडतोब हातोहात होत असेल, आणि जी देवाण-घेवाण तुम्ही परस्पर हातोहात करत असाल, तर तुम्ही ते लेखी नमूद न केल्यास, काही हरकत नाही. पण (वर उल्लेखित अपवाद वगळता) व्यवसायात परस्पर सौदे करीत असताना साक्षीदार ठेवा. आणि (लक्षात असू द्या) की, (मजकूर) लिहिणाऱ्याला किंवा साक्षीदाराला कोणताही त्रास होता कामा नये. आणि जर तुम्ही असे केले (म्हणजे त्यांना त्रास दिले) तर ते (तुमच्याकडून) (मोठ्या) गुन्ह्याचे कृत्य ठरेल. आणि अल्लाहचे भय (जाण) बाळगा, आणि अल्लाह (हे सर्व) तुम्हाला शिकवीत आहे. आणि अल्लाहला प्रत्येक गोष्टीचे पूर्ण ज्ञान आहे. 283 जर तुम्ही प्रवास करीत असाल आणि तुम्हाला लिहिणारा कोणी मिळत नसेल, तर काहीतरी वस्तू गहाण ठेवून व्यवहार

करा. आणि तुम्ही एकमेकांवर विश्वास करून, (एखाद्याकडे) अनामत ठेवली असेल तर त्याने ती अनामत (ठेवणाऱ्यास) (मागितल्यावर) तात्काळ परत करावी, आणि (त्याने) अल्लाहचे भय बाळगावे जो त्याचा पालनकर्ता आहे. आणि साक्ष कधीही लपवू नका. आणि जो कोणी (साक्ष) लपवून ठेवेल, तर (अशी व्यक्ती) निश्चितच मनाने पापी आहे, आणि तुम्ही जे काही करता त्याचे अल्लाहला पूर्ण ज्ञान आहे.

284 जे काही आकाशात आहे आणि जे काही पृथ्वीवर आहे ते सर्व अल्लाहचेच आहे. आणि तुमच्या मनात जे काही आहे ते तुम्ही प्रकट करा, अथवा मनामध्येच ठेवा, अल्लाह तुमच्याकडून त्याचा हिशेब घेईल. आणि इच्छील त्यास क्षमा करील आणि इच्छील त्यास शिक्षा करील. आणि अल्लाह जे इच्छितो, ते सर्व करण्याचे सामर्थ्य त्याच्याकडे आहे. 285 पैगंबर त्यावर विश्वास ठेवतो, जे काही त्याच्या पालनकर्त्याकडून त्याला प्रदान केले गेले आहे, तसेच श्रद्धावंतही (त्यावर) विश्वास ठेवतात. ते सर्व (दृढ) विश्वास ठेवतात अल्लाहवर, आणि त्याच्या दूतांवर आणि त्याच्या ग्रंथांवर आणि (सर्व) पैगंबरांवर (आणि म्हणतात), 'आम्ही त्याच्या पैगंबरांपैकी कोणाच्याही बाबतीत भेदभाव करीत नाही.' आणि ते म्हणतात, 'आम्ही ऐकतो आणि आज्ञा पाळतो, हे आमच्या पालनकर्त्या, आम्ही (केवळ) तुझी क्षमा इच्छितो. (तू आम्हाला क्षमा कर) आणि (आम्हाला) तुझ्याकडेच परतायचे आहे!' 286 अल्लाह कोणत्याही जिवावर त्याच्या क्षमतेपेक्षा अधिक ओझे टाकीत नाही. त्याच्या (कर्मरूपी) कमाईचा मोबदला त्यास मिळेल. आणि त्याने ओढवून घेतलेली (शिक्षाही) त्याला मिळेल. (श्रद्धावंत लोक अशी प्रार्थना करतात), 'हे आमच्या पालनकर्त्या, जर आमच्याकडून काही विसरले गेले किंवा आम्ही काही चूक केली असेल तर

आम्हाला शिक्षा करू नकोस. हे प्रभू! आमच्या आधी होऊन गेलेल्या लोकांवर तू ज्याप्रकारे भार टाकला होतास, तसा भार तू आमच्यावर टाकू नकोस. हे आमच्या पालनकर्त्या! जो पेलण्याची आमच्यात शक्ती नाही, तो भार आमच्यावर टाकू नकोस. (हे पालनकर्त्या!) आम्हाला क्षमा कर, आमचे गुन्हे पुसून टाक, आमच्यावर दया कर, तूच आमचा मालक आहेस, तर तूच आम्हाला सत्य नाकारणाऱ्या लोकांविरुद्ध साहाय्य कर.'

# सूरह-०३. आले-इमरान

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] अलीफ० लाम० मीम० [2] अल्लाहशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही, तो
निरंतर जिवंत आहे, स्वत: स्थिर असणारा आणि सर्वांना स्थैर्य देणारा आहे. [3]
त्याने सत्यावर आधारलेला हा ग्रंथ तुमच्याकडे पाठवला आहे. जो आधीच्या
ग्रंथांपैकी त्यांच्याकडे जे आहे, त्याची सत्यता सिद्ध करतो. आणि त्यानेच या
आधी तौरात आणि इंजील हे ग्रंथ अवतरित केले होते, [4] यापूर्वी लोकांच्या
मार्गदर्शनासाठी. त्याने (सत्य आणि असत्या दरम्यान फरक करणारी) कसोटी
अवतीर्ण केली. जे अल्लाहच्या संकेतांना नाकारतात त्यांच्यासाठी कठोर शिक्षा
निश्चित केलेली आहे. आणि अल्लाह सर्वशक्तिमान आहे व शिक्षा देण्यास समर्थ
आहे. [5] निश्चितच अल्लाहपासून कोणतीही गोष्ट लपलेली नाही, ना पृथ्वीवर, ना
आकाशात. [6] तोच आहे जो आपल्या इच्छेप्रमाणे तुम्हाला आईच्या गर्भाशयात
आकार देतो, त्या सर्वशक्तिमान व बुद्धिवान अल्लाहशिवाय दुसरा कोणीही ईश्वर
नाही.

[7] तोच आहे, ज्याने तुमच्याकडे ग्रंथ पाठवला, ज्यात सुस्पष्ट संदेश आहेत,
तोच ग्रंथाचा प्रमुख (भाग) आहे. तसेच काही गोष्टी रूपकात्मक आहेत. पण

ज्यांच्या मनात विकृती आहे ते लोक, मतभेद शोधण्याच्या उद्देशाने, आणि अंतिम अर्थ जाणण्याच्या उद्देशाने त्या भागाच्या मागे लागतात, जो रूपकात्मक भाग आहे. पण त्याचा अंतिम अर्थ अल्लाहशिवाय कोणीही जाणत नाही. आणि जे लोक सखोल ज्ञान बाळगतात, ते म्हणतात, 'आम्ही त्यावर विश्वास ठेवतो, हे सर्व आमच्या पालनकर्त्याकडूनच आलेले आहे.' आणि बुद्धीचा वापर करणारेच (यापासून) बोध घेतात. [8] 'हे आमच्या पालनकर्त्या! (आता) आमच्या मनांना विचलित होऊ देऊ नकोस, जेव्हा की, तू आम्हाला सरळ मार्ग दाखविले आहेस, आणि तू आमच्यावर कृपा कर, खरोखर तूच महान दाता आहेस. [9] हे आमच्या पालनकर्त्या! निश्चितच तू संपूर्ण मानवजातीला त्या दिवशी एकत्र आणशील, ज्याच्या येण्याविषयी कोणतीही शंका नाही. निश्चितच अल्लाह आपले वचन पूर्ण करण्यापासून कधीही मागे हटत नाही.'

[10] जे लोक सत्य नाकारण्यावर ठाम आहेत, त्यांची धनसंपत्ती आणि त्यांची मुले अल्लाहच्या विरुद्ध कोणत्याही प्रकारे त्यांच्या कामी येणार नाहीत. आणि हेच लोक (नरकाच्या) आगीचे इंधन असतील. [11] त्यांचा शेवट तसाच होईल जसा फिरऔनच्या अनुयायांचा आणि त्याच्या आधीच्या लोकांचा झाला. त्यांनी आमच्या संदेशांना खोटे ठरविले. म्हणून अल्लाहने त्यांना त्यांच्या पापांबद्दल त्यांच्या मुसक्या आवळल्या. आणि अल्लाह शिक्षा देण्याच्या बाबतीत फार कठोर आहे. [12] त्यांना सांगा, जे सत्य नाकारण्यासाठी हट्टास पेटलेले आहेत, 'तुम्हाला निश्चितच पराजित करण्यात येईल व एकत्र करून नरकाकडे नेण्यात येईल. आणि किती वाईट ठिकाण आहे ते राहण्याचे!' [13] निश्चितच तुमच्यासाठी (बद्रच्या त्या घटनेमध्ये) एक संदेशयुक्त निशाणी आहे, जेव्हा दोन गट युद्ध करण्यासाठी समोरासमोर आले होते. एक गट अल्लाहच्या कार्यासाठी युद्ध करीत होता, तर दुसरा (अल्लाहला) न मानणारा होता. ते (न मानणारे) त्यांना आपल्या डोळ्यांनी आपल्यापेक्षा दुप्पट (संख्येने) असल्याचे पाहत होते. (अशाप्रकारे)

अल्लाह ज्यास इच्छितो त्यास, आपले साहाय्य देऊन शक्ती प्रदान करतो. यामध्ये त्यांच्यासाठी मोठा धडा आहे, ज्यांच्याकडे (धडा घेण्याची) दुष्टि आहे.

14 लोकांसाठी आकर्षक बनविण्यात आल्या आहेत (त्या सर्व गोष्टी), ज्या या जगात माणसाला मनापासून आवडतात. जसे, स्त्रिया, मुले, आणि सोन्या-चांदी (सारख्या मौल्यवान वस्तूं)चे ढीग, उमदे घोडे, गुरेढोरे आणि शेती, ही सर्व या जगातील जीवनाची सामग्री आहे. पण सर्वोत्तम ठिकाण तर (मृत्यूनंतरच्या जीवनात) अल्लाहपाशी आहे. 15 (पैगंबर!) त्यांना सांगा, 'मी तुम्हाला या (सर्व इहलोकीय आनंददायी) गोष्टी पेक्षा अधिक चांगल्या गोष्टीची माहिती देऊ का? अल्लाहचे भय (जाण) बाळगणाऱ्यांसाठी त्यांच्या पालनकर्त्याकडे अशा बागा आहेत, ज्यामध्ये पाण्याचे कालवे वाहत असतील, ते तेथे नेहमीसाठी वास्तव्य करतील, आणि तेथे (त्यांच्यासाठी) शुचिर्भूत जीवनसाथी असतील, आणि अल्लाहची प्रसन्नता त्यांना लाभेल.' आणि अल्लाह आपल्या भक्तांवर नजर ठेवून आहे. 16 जे म्हणतात, 'हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही तुझ्यावर विश्वास ठेवतो. म्हणून तू आमच्या अपराधांची आम्हाला क्षमा कर. आणि आगीच्या शिक्षेपासून आम्हाला वाचव.' 17 जे सहनशीलता बाळगणारे, सत्य बोलणारे, (अढळपणे) आज्ञापालन करणारे, अल्लाहच्या कार्यात खर्च करणारे, आणि रात्रीच्या सरत्या प्रहरी क्षमायाचना करणारे आहेत.

18 अल्लाह (स्वत:) साक्ष देतो की, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही, आणि (त्याचे) दूत व ज्ञानी लोकही अशीच साक्ष देतात. तोच आहे न्याय प्रस्थापित करणारा, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच उपासनेयोग्य नाही. तो सर्वशक्तिमान व बुद्धिवान आहे. 19 निश्चितच अल्लाहच्या नजरेत एकमेव खरा धर्म, (माणसाचे) त्याच्यासमोर 'पूर्ण समर्पण' (म्हणजेच) 'इस्लाम' हा आहे. आणि ज्यांना ग्रंथ देण्यात आला होता, त्यांनी ज्ञान प्राप्तीनंतर सुद्धा केवळ आपसातील दुराग्रहापोटी मतभेद केला. आणि जो कोणी अल्लाहच्या संदेशा(द्वारे

प्रकट झालेल्या) सत्याला मानण्यास नकार देईल (तर त्याने हे जाणून घ्यावे की), अल्लाह हिशेब घेण्याच्या बाबतीत फार जलद आहे. [20] पैगंबर! आता या लोकांनी तुमच्याशी जर विवाद घातला तर त्यांना सांगा, 'मी स्वत:ला पूर्णपणे अल्लाहला समर्पित करून टाकले आहे आणि त्यांचेही असेच आहे जे माझे अनुयायी आहेत.' ज्यांना आधी ग्रंथ देण्यात आला होता त्यांना तसेच (सर्व) अशिक्षित लोकांना (म्हणजे मक्कावासीयांना) देखील विचारा, 'तुम्हीही स्वत:ला (आमच्याप्रमाणेच) अल्लाहला समर्पित करणार आहात का?' जर त्यांनी स्वत:ला (तुमच्याप्रमाणे) अल्लाहला समर्पित करून टाकले तर ते निश्चितच सन्मार्गी लागले. आणि जर त्यांनी तसे करण्यास नकार दर्शविला, तर तुमचे कर्तव्य केवळ संदेश पोचवणे एवढेच आहे. आणि अल्लाह आपल्या समस्त निर्मितीवर पूर्णपणे नजर ठेवून आहे. [21] निश्चितच ते लोक, जे अल्लाहच्या संदेशांद्वारे प्रकट झालेल्या सत्याला मानण्यास नकार दर्शवितात आणि पैगंबरांची अन्यायकारकपणे हत्या करतात, आणि न्यायाची शिकवण देण्यासाठी पुढे आलेल्या लोकांची (देखील) हत्या करतात, त्यांना तुम्ही दु:खदायी शिक्षेची सूचना द्या. [22] हेच ते लोक आहेत ज्यांची कर्मे या जगात आणि मृत्यूनंतरच्या जगात, दोन्ही ठिकाणी शून्यवत (निष्फळ) ठरतील.आणि त्यांचा कोणीही साहाय्यकर्ता असणार नाहीत.

[23] तुम्हाला त्या लोकांची माहिती नाही का? ज्यांना आधी अल्लाहच्या ग्रंथांपैकी एक भाग प्राप्त होतो आणि त्यांना अल्लाहच्या ग्रंथानुसार निर्णयाला स्वीकार करण्यासाठी सांगण्यात येते, तेव्हा त्यांच्यातील एक गट तिटकाऱ्याने तोंड फिरवतो. [24] ते असे केवळ यासाठी करत आहेत की, ते दाव्याने सांगतात की, 'काही मोजके दिवस सोडले तर आग आम्हास स्पर्श करू शकणार नाही.' अशा खोट्या कल्पनांचा यांनी शोध लावला आहे, आणि या खोट्या कल्पनांनी धर्माच्या बाबतीत त्यांची (मोठी) फसवणूक केली आहे. [25] त्या दिवशी जेव्हा आम्ही त्यांना एकत्र करू, ज्याच्या येण्याविषयी कोणतीही शंका नाही, तेव्हा

त्यांची अवस्था काय होईल? प्रत्येकाने जे काही कमावले असेल, त्या दिवशी त्यास त्याच्या कमाईचा पुरेपूर मोबदला देण्यात येईल. आणि त्यांच्यावर (अजिबात) अन्याय होणार नाही. 26 तुम्ही असे म्हणा की, हे अल्लाह! सार्वभौम सत्ता तुझीच आहे, तू ज्यास इच्छितोस त्यास सत्ता प्रदान करू शकतोस, आणि ज्याच्याकडून इच्छितोस सत्ता काढून घेऊ शकतोस, इच्छितोस त्यास सन्मानित करू शकतोस आणि इच्छितोस त्यास अपमानित करू शकतोस, तुझ्याच हाती आहे सर्व (प्रकारचे) कल्याण! खरोखर तुझ्याकडे सर्व काही करण्याचे सामर्थ्य आहे. 27 तू रात्रीला दिवसामध्ये दाखल करतोस आणि दिवसाला रात्रीमध्ये. (म्हणजे तू संपूर्ण सूर्यमालाचे नियंत्रण करीत आहेस, त्याला अतिशय संतुलित पद्धतीने कामाला लावले आहेस, ज्याद्वारे दिवस आणि रात्र घडून येतात) तू निर्जिवातून सजीव निर्माण करतोस आणि सजीवातून निर्जीव निर्माण करतोस. आणि तू ज्यास इच्छितोस, अमर्याद उपजीविकेची साधने प्रदान करतोस.

28 श्रद्धावंतांनी मैत्री करण्याच्या बाबतीत सत्य नाकारणाऱ्या लोकांना श्रद्धावंतांपेक्षा प्राधान्य देऊ नये. आणि जो कोणी असे करील, त्याचा अल्लाहशी कोणत्याही प्रकारे संबंध राहणार नाही. पण त्यांच्यापासून स्वत:चा बचाव करण्यासाठी तसे करता येईल. आणि अल्लाह तुम्हाला त्याचे भय बाळगण्याची ताकीद देतो. सर्वांना अल्लाहकडेच परतायचे आहे.

29 (पैगंबर!) त्यांना सांगा, 'तुमच्या मनामध्ये जे काही आहे, ते सर्व अल्लाहला माहीत आहे, मग तुम्ही ते मनामध्येच ठेवा किंवा प्रकट करा.' कारण त्यालाच तर माहीत आहे जे काही आकाशात आहे आणि जे काही पृथ्वीवर आहे आणि अल्लाह सर्व काही करण्याचे सामर्थ्य बाळगणारा आहे. 30 (त्या दिवसाची जाण ठेवा), ज्या दिवशी प्रत्येक जण, त्याने केलेली सत्कृत्ये आणि दुष्कृत्ये आपल्यासमोर असल्याचे (स्वत:च्या डोळ्यांनी) पाहील, बहुसंख्य लोकांना वाटेल, किती बरे झाले असते हा दिवस त्यांच्यापासून खूप लांब

असता तर! आणि अल्लाह तुम्हाला त्याचे भय बाळगण्याची ताकीद देत आहे. आणि अल्लाह आपल्या दासांप्रति अत्यंत कनवाळू आहे. 31 पैगंबर! तुम्ही सांगा, 'जर तुम्ही (खरोखर) अल्लाहबद्दल प्रेमभाव ठेवून असाल तर माझे अनुसरण करा. (आणि) अल्लाह (देखील) तुमच्यावर प्रेम करील आणि तुमच्या अपराधांना क्षमा करील, कारण अल्लाह अतिशय क्षमाशील आणि अत्यंत कृपाळू आहे.' 32 (तुम्ही) सांगा, 'अल्लाहचे आणि (त्याच्या) पैगंबराचे आज्ञापालन करा.' पण जर त्यांनी पाठ फिरवली तर (लक्षात असू द्या की), अल्लाह सत्य नाकारणाऱ्या लोकांना पसंत करीत नाही.

33 निश्चितच अल्लाहने आदम व नूहला आणि इब्राहीम व इमरानच्या संततीला जगातील सर्व लोकांवर प्राधान्य देऊन निवडले होते. 34 हे काही–काहींचे वंशज होते आणि अल्लाह सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा आहे. 35 (ती घटना आठवा) जेव्हा इमरानच्या पत्नीने प्रार्थना केली, 'हे माझ्या पालनकर्त्या! जे काही माझ्या गर्भाशयात आहे, ते मी पूर्णपणे तुझ्या सेवेसाठी अर्पण करीत आहे. म्हणून तू माझ्याकडून त्याचा स्वीकार कर. निश्चितच तू सर्व काही ऐकणारा व जाणणारा आहे.' 36 पण जेव्हा प्रसूती झाली, तेव्हा तिने म्हटले, 'हे माझ्या पालनकर्त्या, मी तर मुलीला जन्म दिला.' अल्लाह चांगल्याप्रकारे जाणून होता की, ती कोणाला जन्म देणार आहे. आणि (हे देखील अल्लाहला पूर्णपणे माहीत होते की, तिला तर मुलगा अपेक्षित होता), कारण मुलगा तर मुलीसारखा असत नाही. (ती म्हणाली), 'मी तिचे नाव 'मरियम' ठेवले आहे. आणि (आता) मला तुझ्याकडून हे अपेक्षित आहे की, तिला आणि तिच्या संततीला, धिक्कारलेल्या सैतानापासून रक्षण व्हावे म्हणून तुझ्या संरक्षणात ठेव.' 37 आणि तिच्या पालनकर्त्याने तिचा चांगल्याप्रकारे स्वीकार केला, उत्तमप्रकारे तिचे पालनपोषण व्हावे याची संपूर्ण व्यवस्था केली, तसेच ज़करियाला तिचा पालक म्हणून नेमले. ज्या–ज्यावेळी ज़करिया (मठातील)

तिच्या खोलीत यायचा, तेव्हा त्याला तिथे, तिच्याकडे (आध्यात्मिक) खाद्य असल्याचे दर्शन घडत असे, (हे पाहून) त्याने विचारले, 'या सर्व आध्यात्मिक शहाणपणाच्या गोष्टी तुला कोठून मिळतात? तिने उत्तर दिले, 'हे सर्व अल्लाहकडून मला प्राप्त होते' अल्लाह ज्याच्या बाबतीत इच्छितो त्यास (ज्ञान, धन इ.) गोष्टी अमर्याद देतो. 38 तेव्हा आणि तेथेच ज़करियाने आपल्या पालनकर्त्याकडे प्रार्थना केली, म्हणाला, 'हे माझ्या पालनकर्त्या! मलाही तुझ्या कृपेने सद्‌गुणी संतती प्रदान कर, खरोखर तू प्रार्थना ऐकणारा आहेस.' 39 त्यावर अल्लाहच्या दूतांनी त्याला हाक दिली, जेव्हा तो त्या मठाच्या खोलीत नमाज़रूपी प्रार्थना करीत होता, ते म्हणाले, 'अल्लाह तुला 'यहया'च्या जन्माची शुभवार्ता देत आहे, तो अल्लाहचे शब्द खरे करणारा, लोकांमध्ये श्रेष्ठतम असलेला, पूर्णपणे शुद्ध मनाचा असलेला आणि पैगंबर असेल आणि (अल्लाहजवळ) सदाचारी लोकांत त्याचे स्थान असेल.' 40 त्यावर ज़करिया उद्‌गारला, 'हे माझ्या पालनकर्त्या! मला पुत्र कसा होऊ शकतो? जेव्हा की, मी वृद्ध झालो आहे आणि माझी पत्नी तर वांझ आहे.' त्यावर दूताने उत्तर दिले, 'अल्लाहची अशीच इच्छा आहे, तो जे इच्छितो ते करतो.' 41 ज़करियाने प्रार्थना केली, 'हे माझ्या पालनकर्त्या! माझ्यासाठी एखादी खूण निश्चित कर'. त्यावर दूताने (अल्लाहकडून) उत्तर दिले, 'ती खूण ही आहे की, तू तीन दिवसांपर्यंत हावभाव, हातवारे व्यतिरिक्त लोकांशी बोलू शकणार नाहीस. तर तू आपल्या पालनकर्त्याची अविरत आठवण करत राहा आणि त्याच्या असीम महानतेचे सकाळ-संध्याकाळ गुणगान करत राहा.' 42 (अल्लाहचे) दूत म्हणाले, 'हे मरियम! अल्लाहने तुझी निवड केली आहे व तुला शुद्ध चारित्र्याचे बनविले आहे, आणि तुझ्या काळातील सर्व स्त्रियांत तुला श्रेष्ठ ठरविले आहे. 43 हे मरियम! आपल्या पालनकर्त्याची खरी आज्ञाधारक बनून राहा! आणि प्रार्थनेत त्याच्यासमोर नतमस्तक हो आणि त्याच्यासमोर वाकून नमन कर, नमन करणाऱ्यांसोबत.' 44 या त्या अदृश्य वार्ता होत, ज्या

आम्ही तुमच्याकडे प्रकट करीत आहोत. तुम्ही त्यांच्याबरोबर नव्हता, जेव्हा ते मरियमचा पालक निवडण्यासाठी चिठ्ठ्या टाकत होते. तेव्हाही तुम्ही त्यांच्याबरोबर नव्हता, जेव्हा ते आपसात भांडण करीत होते.

45 आणि जेव्हा अल्लाहच्या दूतांनी म्हटले, 'हे मरियम, अल्लाह तुला आपल्या एका वचनाद्वारे (एका पुत्राची) शुभवार्ता देत आहे. जो 'मरियमचा पुत्र येशू मसीह' या नावाने ओळखला जाईल. या जगात आणि मृत्यूनंतरच्या जगात तो सन्माननीय लोकांपैकी असेल आणि अल्लाहचे सान्निध्य लाभलेल्या लोकांत त्याचे स्थान असेल. 46 आणि तो पाळण्यातच लोकांशी बोलेल, व प्रौढ वयात देखील बोलेल, आणि तो सदाचरणी लोकांपैकी असेल.' 47 त्यावर मरियमने म्हटले, 'हे माझ्या पालनकर्त्या, मला पुत्र कसा होऊ शकतो, जेव्हा की, मला कोणत्याही पुरुषाने स्पर्श केलेला नाही?' (अल्लाहच्या दूताने) उत्तर दिले, 'असेच होईल, तो जे इच्छितो ते निर्माण करतो. जेव्हा तो एखादी गोष्ट निर्माण करण्याचा निर्णय घेतो, तेव्हा तो त्या गोष्टीबाबत केवळ इतकेच म्हणतो — 'अस्तित्वात ये' आणि ती गोष्ट अस्तित्वात येते. 48 आणि अल्लाह त्याला ग्रंथ व दूरदर्शीपणा आणि तौरात व इंजील यांचे शिक्षण देईल. 49 आणि त्याला इस्राईलच्या संततीकडे पैगंबर बनवून पाठवील.' (मग तो या संदेशासह त्यांच्याकडे आला आणि म्हणाला), 'मी तुमच्याकडे तुमच्या पालनकर्त्याकडून एक संदेश घेऊन आलो आहे. मी तुमच्यासाठी चिखलाचा एक पक्षी तयार करेन, आणि त्यात फुंकर मारेन तर अल्लाहच्या आदेशाने तो एक जिवंत पक्षी बनेल. आणि मी अल्लाहच्या आदेशाने जन्मजात आंधळ्या लोकांना व कुष्ठरोग्यांना बरे करीन. आणि अल्लाहच्या आदेशाने मी मृतांना जिवंत करीन. तुम्ही काय खाणार आहात आणि काय साठा करून ठेवणार आहात, हे मी तुम्हाला सांगेन. जर तुम्ही खरोखर विश्वास ठेवणारे असाल तर निश्चितच यामध्ये तुमच्यासाठी एक संदेश आहे. 50 आणि माझ्या आधी आलेल्या तौरात या ग्रंथांपैकी जे काही सत्य

अद्याप शिल्लक आहे त्याची सत्यता सिद्ध करण्यासाठी मी आलेलो आहे, आणि काही गोष्टी ज्या तुमच्यासाठी निषिद्ध ठरवण्यात आल्या होत्या त्यांना वैध ठरवण्यासाठी मी आलो आहे. आणि मी तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्यासाठी एक संदेश घेऊन आलो आहे, तर तुम्ही अल्लाहचे भय (जाण) बाळगा आणि माझी आज्ञा पाळा. 51 निश्चितच, अल्लाह माझा पालनकर्ता आहे आणि तुमचाही पालनकर्ता आहे, म्हणून त्याचीच उपासना करा, हाच सन्मार्ग आहे.'

52 आणि ते सत्य स्वीकारण्यास नकार देत आहेत याची येशूला जेव्हा जाणीव झाली, तेव्हा तो म्हणाला 'अल्लाहच्या कार्यात माझे कोण साहाय्यक बनाल'? (त्यावर, त्याच्या) अनुयायांनी उत्तर दिले, 'अल्लाहच्या कार्यात तुमची मदत करणारे आम्ही असू! आम्ही अल्लाहवर विश्वास ठेवतो, आणि तुम्ही या गोष्टीस साक्षी राहा की, आम्ही अल्लाहला समर्पित झालो आहोत. 53 हे आमच्या पालनकर्त्या! तू आपल्याकडून जे काही आमच्याकडे पाठविले आहे, त्यावर आम्ही विश्वास ठेवतो. आणि आम्ही या पैगंबराचे अनुसरण करीत आहोत, म्हणून (सत्याची) साक्ष देणाऱ्यांमध्ये आमची नावे लिहून घे.' 54 नंतर (बनी इस्राईलच्या लोकांनी येशू विरुद्ध) गुप्त योजना आखली आणि अल्लाहनेही योजना आखून (त्यांच्या कपटपूर्ण योजनांना) निष्फळ बनविले. कारण अल्लाह सर्वोत्तम योजनाकार आहे. 55 अल्लाहने म्हटले, 'हे येशू, निश्चितच मी तुला आपल्याकडे परत घेईन आणि माझ्याकडे प्रतिष्ठित स्थान प्रदान करेन आणि सत्य नाकारणाऱ्या लोकांच्या (खोट्या आरोपांतून) तुला मुक्त करेन. आणि तुझ्या अनुयायांना पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत सत्य नाकारणाऱ्या (श्रद्धाहीनां)पेक्षा श्रेष्ठ स्थानी ठेवीन. मग शेवटी, तुम्हा सर्वांना माझ्याकडे परतायचे आहे, तेव्हा मी ज्या बाबतीत तुमच्यात मतभेद होते, त्या गोष्टींचा निर्णय करीन. 56 तर जे सत्य नाकारण्यावर ठाम राहिले त्यांना या जगात आणि मृत्यूनंतरच्या जगात मी कठोर शिक्षा देईन, तसेच त्यांना साहाय्य करणारा कोणीही असणार नाही.' 57 पण जे

लोक श्रद्धावंत बनले आणि सत्कर्मे करीत राहिले, त्यांना अल्लाह त्यांच्या कार्यांचा पुरेपूर मोबदला देईल. वाईट कृत्ये करणाऱ्या लोकांना अल्लाह कधीही पसंत करीत नाही. 58 हे संदेश आम्ही तुम्हाला ऐकवीत आहोत, आणि ह्यात विवेकपूर्ण उपदेश आहेत.

59 अल्लाहच्या दृष्टीत येशूच्या निर्मिती चे उदाहरण आदमच्या निर्मिती प्रमाणेच आहे. अल्लाहने त्याला मातीपासून बनविले आणि मग (अल्लाह) त्याला म्हणाला, 'हो', आणि 'तो झाला'. (त्याला जिवंत मानव बनण्याची अल्लाहने आज्ञा केली आणि लगेच तो अल्लाहच्या आज्ञेनुसार अस्तित्वात आला) 60 हे तुमच्या पालनकर्त्याकडून आलेले सत्य आहे. म्हणून तुम्ही शंका बाळगणाऱ्यांपैकी होऊ नका. 61 आणि आता तुमच्याकडे ज्ञान आल्यानंतर जो कोणी या (सत्या)बद्दल वाद घालेल, तर त्यांना सांगा, 'चला, आपण आमच्या मुलांना आणि तुमच्या मुलांना बोलावू या, आमच्या स्त्रियांना आणि तुमच्या स्त्रियांना बोलावू या आणि स्वत: आम्हीही येतो आणि तुम्हीही या.मग आपण सर्व जण नम्रतेने व कळकळीने प्रार्थना करू या, आणि आपल्यापैकी खोटे बोलणाऱ्यांवर अल्लाहचा प्रकोप होवो असे (अल्लाहला) आवाहन करू या. 62 निश्चितच हा सत्य वृत्तांत आहे. आणि अल्लाहशिवाय दुसरा कोणीही उपासनेयोग्य नाही. अल्लाह सर्वशक्तिमान आणि बुद्धिवान आहे.' 63 आणि त्यांनी जर ह्या (सत्या)कडे पाठ फिरविली तर (लक्षात ठेवा), अल्लाह उपद्रव माजविणाऱ्यांना पूर्णपणे ओळखून आहे.

64 (पैगंबर!) (त्यांना) सांगा, आधीच्या ग्रंथांचे अनुसरण करणाऱ्या लोकांनो! आमच्या व तुमच्यामध्ये जी गोष्ट समान आहे त्या गोष्टीकडे या, आणि ती म्हणजे, आपण अल्लाहशिवाय कोणाचीही उपासना करायची नाही आणि आपण त्याच्याबरोबर इतर कोणालाही भागीदार ठरवायचे नाही, तसेच आपल्यापैकी कोणीही अल्लाहशिवाय दुसऱ्यांना पालनकर्त्याचा दर्जा देऊ नये. मग जर त्यांनी

याकडे पाठ फिरवली तर त्यांना सांगा, 'आम्ही (अल्लाहला) समर्पित झालो आहोत, त्या गोष्टीस तुम्ही साक्षी राहा.' 65 पूर्वीच्या ग्रंथाचे अनुसरण करणाऱ्यांनो! तुम्ही इब्राहीम विषयी वाद का घालता? जेव्हा की, तुम्ही पाहता, तौरात व इंजील तर इब्राहीमच्यानंतर प्रकट करण्यात आले आहेत. तुम्ही बुद्धीचा वापर करत नाही का? 66 तुम्ही तर ते लोक आहात की, तुम्हाला त्या गोष्टीचे ज्ञान होते, (म्हणजे इब्राहीमचा खरा पंथ कोणता होता), तरीही तुम्ही त्याबद्दल विवाद करत होता. तर आता तुम्ही त्या गोष्टीबद्दल विवाद का करीत आहात ज्याचे तुम्हाला मुळीच ज्ञान नाही? अल्लाह ते जाणतो पण तुम्ही जाणत नाही? 67 इब्राहीम ना ज्यू होता, ना ख्रिस्ती, तो तर (सर्व खोट्या गोष्टींपासून स्वत:ला अलग केलेला) सच्चा प्रामाणिक माणूस होता, ज्याने स्वत:ला अल्लाहच्या स्वाधीन करून टाकले होते, तसेच तो त्या लोकांपैकी नव्हता जे अल्लाहचे भागीदार ठरवतात. 68 खऱ्या अर्थाने इब्राहीमचे निकटतम लोक तेच आहेत ज्यांनी त्याचे अनुसरण केले आणि (आता) जे पैगंबर (मुहम्मद) यांचे अनुसरण करतात, आणि त्यांच्यावर विश्वास ठेवतात. अल्लाह श्रद्धावंतांचा मित्र आहे. 69 आधीच्या ग्रंथाला अनुसरणाऱ्या लोकांपैकी काही लोक तुम्हाला सन्मार्गापासून दूर करू इच्छितात, पण ते स्वत:च सन्मार्गापासून दूर जात आहेत. पण त्यांना याची जाणीव नाही. 70 आधीच्या ग्रंथाचे अनुसरण करणाऱ्यांनो! अल्लाहच्या संदेशाद्वारे प्रकट झालेल्या सत्याला तुम्ही का नाकारता? जेव्हा तुम्ही स्वत:च त्याचे साक्षी आहात. 71 आधीच्या ग्रंथाला अनुसरणाऱ्यांनो! तुम्ही सत्यावर असत्याचे आवरण चढवून सत्य का लपविता? जेव्हा तुम्ही (सत्य चांगल्याप्रकारे) जाणता?

72 आणि पूर्वीच्या ग्रंथधारी लोकांपैकी काही लोक (एकदुसऱ्याला) म्हणतात की, श्रद्धावंतांकडे जे प्रकट करण्यात आले आहे, त्यावर तुम्हीही श्रद्धा ठेवत असल्याचे सकाळी जाहीर करा आणि संध्याकाळ होता-होता (ते असत्य आहे

असे दाखवून) त्याला नाकारा, म्हणजे श्रद्धावंत (मुसलमान) देखील (गोंधळापोटी)
आपल्या श्रद्धेचा स्वतःच त्याग करून देतील. 73 (आणि ते म्हणतात), 'जे
आपल्या धर्माचे अनुयायी आहेत केवळ त्यांच्यावरच विश्वास करा.' (तुम्ही
त्यांना) सांगा, अस्सल मार्गदर्शन तर अल्लाहचेच मार्गदर्शन आहे. (पण तुम्हाला
हे अशक्य वाटते की), तुम्हाला ग्रंथ जसे प्रदान करण्यात आले होते, तसेच
दुसऱ्यालाही प्रदान केले जाऊ शकते. तर मग ते तुमच्या पालनकर्त्यासमोर
तुमच्या विरुद्ध युक्तिवाद करतील की काय? (त्यांना) सांगा, 'सर्व प्रकारची
कृपा अल्लाहच्याच हाती आहे आणि तो इच्छीतो त्यावर कृपा करतो, आणि
अल्लाह अतिशय उदार आणि सर्व काही जाणणारा आहे. 74 तो ज्याला पसंत
करतो, त्यास आपल्या कृपेसाठी खास निवडतो, आणि अल्लाह अमर्याद कृपा
करणारा आहे.' 75 आधी ग्रंथ देण्यात आलेल्या लोकांत काही असे आहेत की,
तुम्ही त्यांच्याकडे अनामत म्हणून (सोन्याचा) खजिना जरी सोपवलात, तरी ते
तुम्हाला (जशास तसे सांभाळ करून) परत करतील, पण त्यांच्यात काही
असेही आहेत की, तुम्ही त्यांच्याकडे अनामत म्हणून एखादे छोटेसे सोन्याचे
नाणे जरी सोपवलात तरी ते तुम्ही त्यांच्या मानगुटीवर बसून वसूल केल्याशिवाय
(सहजासहजी) परत देणार नाहीत. असे करण्याचे कारण ते सांगतात, 'बिगर
ज्यू लोकांसंबंधाने (आम्ही जे काही करू) त्यासाठी आमच्यावर, कोणताच
दोष येऊ शकत नाही.' अशाप्रकारे ते अल्लाहबद्दल खोटे बोलत आहेत आणि
त्यांना याची पूर्ण जाणीव आहे. 76 पण (अल्लाहला त्या लोकांची पूर्ण जाणीव
आहे) जे आपले वचन त्याच्याशी पूर्ण करतात, आणि त्याचेच भय बाळगतात.
खरोखर, अल्लाहला असेच लोक आवडतात जे त्याची जाण ठेवून आहेत.

77 जे लोक अल्लाहशी केलेल्या कराराला आणि आपल्या शपथांना क्षुल्लक
फायद्यासाठी विकतात, त्यांच्यासाठी मृत्यूनंतरच्या जीवनात (अल्लाहच्या कृपेत)
कोणताही वाटा असणार नाही. आणि न्यायाच्या दिवशी अल्लाह त्यांच्याशी

बोलणारही नाही आणि त्यांच्याकडे पाहणारही नाही, तसेच तो त्यांना (त्यांच्या पापांपासून) शुद्धही करणार नाही. आणि त्यांच्यासाठी कठोर शिक्षा (अटळ) आहे. 78 आणि निश्चितच त्यांच्यापैकी काही लोक असे आहेत, जे ग्रंथात (म्हणजे बायबलमध्ये) विपर्यास करतात पण आपल्या तोंडाने ग्रंथाला अशाप्रकारे वाचतात जेणेकरून तुम्हाला असे भासावे की, ते जे वाचत आहेत, तो (अस्सल) ग्रंथच आहे, पण ते ग्रंथांपैकी नाही. आणि ते म्हणतात, 'हे अल्लाहकडूनच आहे,' पण ते अल्लाहकडून नाही. अशाप्रकारे ते अल्लाहसंबंधाने खोटे बोलत आहेत आणि त्यांनाही याची पूर्ण जाणीव आहे, (की ते खोटे बोलत आहेत). 79 कोणताही माणूस असे करणार नाही, ज्याला अल्लाहने ग्रंथ दिला, विवेक शक्ती प्रदान केली आणि पैगंबर म्हणून त्याची नेमणूक केली की, तो म्हणायला लागेल, 'तुम्ही अल्लाहला सोडून माझे भक्त बना,' (असे तो कदापि म्हणू शकत नाही), तो तर (लोकांना) असेच म्हणेल की, अल्लाहचेच निष्ठावान भक्त बना जसे (ग्रंथात तुम्हाला शिकवण्यात आले आहे), ज्याचे तुम्ही स्वत: अध्ययन करता आणि दुसऱ्यांना त्याचे धडे देता. 80 तसेच तो असेही कदापि म्हणणार नाही की, तुम्ही दूतांना आणि पैगंबरांना आपला पालनकर्ता माना. तुम्ही स्वत:ला अल्लाहला समर्पित करून टाकल्यानंतर तो तुम्हाला सत्य नाकारण्याचा आदेश देईल का?

81 आणि (ती वेळ आठवा) जेव्हा अल्लाहने पैगंबरामार्फत तुमच्याकडून आधीच्या ग्रंथधारकांकडून प्रतिज्ञा घेतली की, मी तर तुम्हाला ग्रंथ आणि विवेक प्रदान केले आहे. पण जर यापुढे तुमच्याकडे एखादा पैगंबर येईल आणि तुमच्याकडे जे आधीपासून आहे त्याची सत्यता प्रमाणित करेल, तर तुम्ही त्याच्यावर विश्वास ठेवणारे आणि त्याला साहाय्य करणारे बना. (त्यावर अल्लाह म्हणाला) तुम्हाला हे मान्य आहे ना? आणि या बाबतीत जी जबाबदारी मी तुमच्यावर सोपवीत आहे. ती तुम्ही पार पाडाल ना? (त्यावर) ते म्हणाले.

'आम्हाला ते (निश्चितपणे) मान्य आहे.' तेव्हा अल्लाह म्हणाला, 'तर मग (आता जो करार झाला त्याबद्दल) साक्षी राहा, मी देखील तुमच्याबरोबर साक्षी आहे.' 82 आणि जो कोणी (या प्रतिज्ञेपासून) पाठ फिरवील, तर असेच लोक उल्लंघन करणारे आहेत. 83 त्यांना अल्लाहच्या धर्माव्यतिरिक्त दुसरा कोणता धर्म हवा आहे का? जेव्हा की, जे काही आकाशात आहे आणि पृथ्वीवर आहे, ते सर्व इच्छेने किंवा अनिच्छेने त्याच्याच स्वाधीन झालेले आहेत. आणि सर्वांना त्याच्याकडेच परत जायचे आहे. 84 (तुम्ही त्यांना) सांगा, 'आम्ही अल्लाहवर श्रद्धा ठेवतो आणि जे काही आमच्याकडे पाठवण्यात आले आहे त्यावर, आणि त्यावरही जे इब्राहीम व इस्माईल आणि इसहाक़ व याकूब आणि जे याकूबच्या वंशजांवर अवतीर्ण झाले. तसेच जे प्रदान केले गेले मूसा, ईसा (येशू) आणि इतर पैगंबरांना त्यांच्या पालनकर्त्याकडून (या सर्वांवर आम्ही श्रद्धा ठेवतो). आम्ही यांच्या दरम्यान कोणताही फरक करत नाही आणि आम्ही स्वत:ला अल्लाहच्या हवाली केलेले आहोत.' 85 जो कोणी इस्लाम (स्वत:ला पूर्णपणे अल्लाहच्या स्वाधीन करण्याचा धर्म) व्यतिरिक्त इतर धर्माच्या शोधात लागेल तर त्याला (अल्लाहकडून) अजिबात स्वीकृती मिळणार नाही. आणि मृत्यूनंतरच्या जगात त्याचे स्थान तोट्यात राहणाऱ्यांपैकी असेल. 86 अल्लाह त्या लोकांना कसा सन्मार्ग दाखवील, (आधीच्या ग्रंथधारकांनी) श्रद्धा धारण केल्यानंतरही सत्य नाकारण्याचा निश्चय केला. त्यांनी तर हा पैगंबर खरा असण्याची साक्ष दिली होती आणि त्यांना (त्यासंबंधाने) स्पष्ट प्रमाणही मिळाले होते. (तरीही त्यांनी पैगंबर मुहम्मद यांच्यावर प्रकट झालेले सत्य मानण्यास नकार दिला जेव्हा की, ते आधीच्या पैगंबरांना मानत होते). तर अल्लाह अशा दुराचारी लोकांना सन्मार्ग दाखवीत नाही. 87 अशा लोकांचा मोबदला हा आहे की, त्यांना अल्लाहकडून व त्याच्या दूतांकडून आणि सर्व (सदाचारी) लोकांकडून धिक्कारण्यात येईल. 88 अशाच धिक्कारलेल्या अवस्थेत ते नेहमी राहतील. त्यांची शिक्षा कमी

केली जाणार नाही किंवा त्यांना उसंत देखील मिळणार नाही. 89 पण ते लोक सोडून, जे नंतर पश्चात्ताप करतील आणि स्वतःला सुधारतील. तर अल्लाह खरोखरच अतिशय क्षमाशील आणि कृपाशील आहे. 90 पण जे लोक विश्वास ठेवल्यानंतर अविश्वास दाखवतील आणि (हट्टापोटी) त्यांचा आणखी अविश्वास वाढत जाईल, तर त्यांचा पश्चात्ताप कदापि स्वीकारला जाणार नाही. आणि हेच लोक सन्मार्गापासून फार दूर गेलेले आहेत. 91 निश्चितच जे लोक सत्याला नाकारण्यावर ठाम राहिले आणि त्याच अवस्थेत मरण पावले, जरी त्यांनी (शिक्षेपासून स्वतःची सुटका करून घेण्यासाठी) पृथ्वी इतके सोने दिले तरी ते त्यांच्याकडून स्वीकारले जाणार नाही. त्यांच्यासाठी दुखःदायी शिक्षा तयार आहे आणि त्यांचा कोणीही साहाय्यक असणार नाही.

92 (श्रद्धावंतांनो!) जोवर तुम्ही तुम्हाला सर्वात प्रिय असलेली वस्तू (अल्लाहच्या मार्गात) खर्च करीत नाही, तोवर तुम्ही (अल्लाहच्या नजरेत) सदाचारी बनू शकत नाही. आणि जे काही तुम्ही खर्च करता, निश्चितच अल्लाह ते पूर्णपणे जाणून आहे. 93 सर्व प्रकारचे अन्नपदार्थ इस्राईलच्या मुलांसाठी वैध होते, फक्त त्या शिवाय जे तौरात (हा ग्रंथ) अवतरण्यापूर्वी त्यांनीच स्वतःसाठी निषिद्ध ठरवले होते. त्यांना सांगा, 'तुम्ही सत्य बोलत असाल, तर तौरात घेऊन या आणि तो वाचा.' 94 यानंतरही जे लोक असत्य गोष्टी सांगतील आणि त्याचा संबंध अल्लाहशी जोडतील तर असेच लोक दुराचारी आहेत. 95 (तुम्ही त्यांना) सांगा, 'अल्लाहने सत्य सांगितले आहे, तर आता इब्राहीमच्या धर्माचे अनुसरण करा,' जो सर्व खोट्या गोष्टींपासून दूर होऊन (अल्लाहला) पूर्णपणे समर्पित झालेला होता. तसेच तो त्या लोकांपैकी नव्हता जे अल्लाहचे भागीदार ठरवतात, (म्हणजे तो अनेकेश्वरवादी लोकांपैकी नव्हता). 96 निश्चितच ते पहिले घर आहे जे लोकांसाठी बांधले गेले आहे, जे 'मक्का' येथे आहे, (अल्लाहच्या) कृपेने पावन झालेले ते ठिकाण आहे आणि समस्त विश्वासाठी

मार्गदर्शनाचे ते उगमस्थान आहे. 97 तिथे स्पष्ट संदेश असलेल्या खुणा आहेत, इब्राहीमचे प्रार्थना-स्थान आहे, आणि जो कोणी त्यात प्रवेश करतो, त्यास मन:शांती लाभते. जे लोक या (अल्लाहच्या घरा)पर्यंत पोहोचण्यास समर्थ आहेत, त्यांच्यावर हे बंधनकारक आहे की, त्यांनी अल्लाहसाठी हज करावा. तर सत्य नाकारणाऱ्यांनी हे लक्षात ठेवावे की, निश्चितपणे अल्लाह सर्व जगवासियांपासून निरपेक्ष आहे. (म्हणजे त्याला कोणाचीच किंवा कशाचीच गरज नाही). 98 (त्यांना) सांगा, आधीच्या ग्रंथांचे अनुसरण करणाऱ्यांनो! अल्लाहच्या संदेशाद्वारे प्रकट झालेले सत्य कबूल करण्यास तुम्ही का नकार देता, जेव्हा की, अल्लाह त्यावर लक्ष ठेवून आहे, जे काही तुम्ही करीत आहात? 99 (त्यांना) सांगा, 'आधीच्या ग्रंथाचे अनुसरण करणाऱ्यांनो! तुम्ही(अल्लाहच्या या ग्रंथावर) विश्वास ठेवणाऱ्या लोकांना अल्लाहच्या मार्गापासून का रोखता? आणि त्यामध्ये दोष शोधण्याचा प्रयत्न तुम्ही का करता, जेव्हा की, तुम्ही स्वत: साक्षी आहात (की तो सरळ मार्ग आहे)? आणि तुम्ही जे काही करीत आहात त्याविषयी, अल्लाह मुळीच अनभिज्ञ नाही.'

100 श्रद्धावंतांनो! (आधीच्या) ग्रंथधारकांपैकी काही असे आहेत, जर तुम्ही त्यांचे म्हणणे मान्य केले तर ते तुम्हाला 'सत्याचा' त्याग करायला लावतील, जेव्हा की, तुम्ही त्यावर श्रद्धा ठेवता. 101 जेव्हा अल्लाहचे संदेश तुम्हाला ऐकविले जात आहेत, तेव्हा तुम्ही सत्य कसे नाकारू शकता? आणि तुमच्यामध्ये त्याचा पैगंबर देखील उपस्थित आहे. आणि ज्याने अल्लाहशी मजबूत संबंध प्रस्थापित केले, त्यालाच सन्मार्ग प्राप्त झाला. 102 श्रद्धावंतांनो! अल्लाहचे भय बाळगा, जसे भय बाळगणे आवश्यक आहे. अल्लाहला पूर्णपणे समर्पित असलेल्या अवस्थेशिवाय इतर अवस्थेत तुम्हाला मरण येऊ नये. 103 आणि तुम्ही सर्वजण मिळून अल्लाहच्या दोरीला घट्ट धरा आणि तुमच्यात विभाजन होऊ देऊ नका. आणि अल्लाहने तुमच्यावर केलेल्या त्या उपकाराची आठवण

करा, तुम्ही तर एकमेकांचे शत्रू होता. मग त्याने स्नेह निर्माण करून तुमची मने
एकत्र आणली. त्याच्या कृपेनेच तुम्ही भाऊ भाऊ झालात. तुम्ही एका अग्निकुंडाच्या
काठावर उभे होता, अल्लाहने त्यापासून तुम्हाला वाचवले, अशाप्रकारे अल्लाह
आपले संदेश तुम्हाला स्पष्ट करून सांगत आहे, ज्यामुळे तुम्हाला (सदाचाराचे)
मार्गदर्शन होईल.

104 आणि तुमच्यामध्ये अशा लोकांचा एक गट असायला पाहिजे, जो
लोकांना सत्कृत्ये करण्याचे आवाहन करील आणि सचोटीची शिकवण देईल
आणि दुष्कृत्यांपासून परावृत्त करील, तर असेच लोक यशस्वी होतील. 105
आणि तुम्ही त्या लोकांसारखे होऊ नका ज्यांच्याकडे सत्याचे स्पष्ट प्रमाण
आल्यानंतरही त्यांच्यात दुफळी निर्माण झाली आणि त्यांनी आपापसात मतभेद
केला. अशाच लोकांसाठी फार मोठी शिक्षा आहे. 106 (न्यायाच्या) त्या
दिवशी काही चेहऱ्यांवर (आनंदमयी) तेज असेल आणि काही काही चेहरे
(दु:खाने) काळवंडलेले असतील. ज्यांचे चेहरे काळवंडलेले असतील, त्यांना
सांगितले जाईल, 'तुम्ही श्रद्धेचा अंगीकार केल्यानंतर सत्याला नाकारणारे
बनलात ना? तर मग चाखा सत्य नाकारण्याबद्दल ही शिक्षा.' 107 आणि ज्यांचे
चेहरे (आनंदाने) चमकत असतील, ते अल्लाहच्या कृपाछत्राखाली असतील,
तिथेच ते सदैव राहतील. 108 हे अल्लाहचे संदेश आहेत, जे आम्ही तुम्हाला पूर्ण
सत्यानिशी ऐकवीत आहोत आणि अल्लाह जगातील लोकांवर कोणत्याही प्रकारचा
अन्याय करू इच्छित नाही. 109 आणि जे काही आकाशात आहे आणि जे
काही पृथ्वीवर आहे, ते सर्व अल्लाहचेच आहे आणि सर्व गोष्टी अल्लाहकडेच
परतणार आहेत.

110 तुम्ही (पैगंबर मुहम्मद यांचे अनुयायी) एक सर्वोत्तम जमात आहात,
ज्यांना मानवजातीच्या कल्याणासाठी घडवून पुढे आणण्यात आले आहे. तुम्ही
(लोकांना) सत्कर्मांची शिकवण देता आणि त्यांना दुष्कृत्य करण्यास मनाई

करता आणि तुम्ही अल्लाहवर श्रद्धा ठेवता. आता जर पूर्वीचे ग्रंथधारक सुद्धा (तुमच्याप्रमाणेच) श्रद्धावान बनले असते तर त्यांच्यासाठी ते निश्चितच चांगले झाले असते. त्यांच्यापैकी फार थोडेसे खरे श्रद्धावंत आहेत, पण बहुतांश त्यांच्यापैकी आज्ञा न पाळणारे आहेत. 111 थोडीशी इजा पोहोचवण्या व्यतिरिक्त ते तुमचे कोणतेही नुकसान करू शकत नाहीत. आणि जर ते तुमच्याशी लढाई करतील, तर ते पाठ दाखवून (पळून जातील), तेव्हा त्यांना कोणाचेही साहाय्य मिळणार नाही. 112 ते जिथे कुठे आढळतील तिथे ते धिक्कारलेच जातील, पण फक्त या शिवाय की, जे अल्लाहशी (त्याच्या पैगंबरामार्फत) किंवा लोकांशी (अभय प्राप्तीचा) करार केलेले असतील. त्यांनी तर स्वत:वर अल्लाहचा कोप ओढवून घेतला आहे, (त्यासाठी स्वत:ला पात्र ठरविले आहे). म्हणूनच त्यांना अपमानित करून पूर्णपणे जेरीस आणण्यात आले आहे. हे सर्व त्यांच्यावर यासाठी ओढवले गेले, कारण ते अल्लाहच्या खुणांद्वारे स्पष्ट झालेले सत्य नाकारण्यावर ठाम राहिले आणि त्यांनी अन्यायाने पैगंबरांची हत्या केली. हे सर्व त्यांच्या आज्ञा न पाळण्याच्या आणि मर्यादा भंग करण्याच्या सवयीमुळेच घडले.

113 पूर्वीच्या ग्रंथाचे अनुसरण करणारे सर्व एकसारखे नाहीत, त्यांच्यातील एक गट आपल्या कराराशी प्रामाणिक आहे, ते रात्रीच्या वेळेत अल्लाहच्या संदेशांचे पठण करतात आणि (त्याच्यासमोर) नतमस्तक होतात. 114 ते अल्लाहवर आणि (न्यायाच्या) अंतिम दिवसावर दृढ विश्वास ठेवतात, ते सत्कर्मांची शिकवण देतात व दुष्कृत्य करण्यापासून रोखतात आणि सत्कर्मे करण्याच्या बाबतीत आपसात स्पर्धा करतात. हेच सदाचारी लोक आहेत. 115 आणि जे काही सत्कर्मे ते करतील त्याबद्दलचे उचित बक्षीस त्यांना नाकारले जाणार नाही, आणि अल्लाह त्याचे भय बाळगणाऱ्या लोकांना चांगल्याप्रकारे ओळखून आहे. 116 पण जे लोक सत्य नाकारण्यावर ठाम राहिले, त्यांची संपत्ती व

त्यांची संतती अल्लाहच्या विरोधात त्यांच्या काही उपयोगी पडणार नाही. ते लोक (नरकाच्या) आगीचे रहिवासी आहेत, तेथेच ते सदैव राहतील. 117 या जगातील जीवनात, ते जे काही खर्च करतात त्यांचे उदाहरण त्या वाऱ्यासारखे आहे, ज्यामध्ये गारठा असतो आणि तो (वारा) त्या लोकांच्या पिकांवरून जातो, ज्यांनी स्वत:वरच अन्याय केला आहे आणि त्यांचे पीक नष्ट करून टाकतो. अल्लाहने त्यांच्यावर अन्याय केलेला नाही तर ते स्वत:च आपल्यावर अन्याय करीत आहेत.

118 विश्वास ठेवणाऱ्यांनो! अपरिचित लोकांपैकी (कोणासही) तुम्ही आपला विश्वासू मित्र बनवू नका. ते तुम्हाला त्रास पोचविण्यासाठी कोणतीही संधी गमावत नाहीत. तुम्ही संकटात सापडल्याचे पाहून त्यांना आनंद होतो. त्यांच्या तोंडून जे शब्द निघतात त्यामधून त्यांचा द्वेषभाव प्रकट होतो आणि त्यांच्या मनांमध्ये जे काही दडलेले आहे, ते तर यापेक्षाही भयंकर वाईट आहे. आम्ही आमच्या खुणा  तुमच्यासाठी उघड करून टाकलेल्या आहेत. तर मग तुम्ही बुद्धीचा वापर करणार नाही का? 119 तुम्ही तर त्यांच्याशी प्रेमाने वागण्यासाठी तयार आहात, पण ते तुमच्याशी प्रेम करीत नाहीत. आणि तुम्ही तर सर्व अल्लाहच्या ग्रंथांवर विश्वास ठेवता. (पण त्यांचे तर असे आहे), जेव्हा ते तुम्हाला भेटतात, तेव्हा ते म्हणतात, 'आम्हीही श्रद्धा ठेवणारे आहोत.' पण जेव्हा ते एकांतात (आपल्या साथीदारांना) भेटतात, तेव्हा ते तुमच्यावर रागाने आपली बोटे चावू लागतात. त्यांना सांगा, 'तुम्ही आपल्या रागातच मरून जा'. निश्चितच लोकांच्या मनांमध्ये काय आहे, याचे अल्लाहला पूर्ण ज्ञान आहे. 120 आणि तुमचे काही भले होत असेल तर ते त्यांना पाहवत नाही, आणि जेव्हा तुमचे काही वाईट होत असेल तर त्याचा त्यांना आनंद होतो. पण तुम्ही धीर धराल आणि अल्लाहचे भय बाळगाल, तर त्यांची कारस्थाने तुमचे कोणतेही नुकसान करू शकणार नाहीत. ते जे काही करीत आहेत त्यास अल्लाहने

(आपल्या शक्तीने) वेढून ठेवले आहे.
121 (पैगंबर! तो दिवस आठवा) जेव्हा तुम्ही भल्या पहाटे श्रद्धावंतांना
युद्धाच्या मोर्च्यावर नियुक्त करण्यासाठी आपल्या घरून निघाला होता. आणि
अल्लाह सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा आहे. 122 त्यावेळी तुमच्यापैकी
दोन गट मनाने खचत होते, पण अल्लाह त्यांचा रक्षणकर्ता बनून उभा होता आणि
श्रद्धावंतांनी अल्लाहवरच विसंबून राहायला हवे. 123 आणि अल्लाहने बद्रच्या
(लढाईत) आधीही तुम्हाला मदत केलेली आहे, जेव्हा तुम्ही पूर्णपणे कमजोर
होता. तर अल्लाहची जाण ठेवा, म्हणजे तुम्ही त्याचे कृतज्ञ बनू शकाल. 124
(आणि आठवा) जेव्हा तुम्ही श्रद्धावंतांना असे म्हणत होता की, हे तुमच्यासाठी
पुरेसे नाही का की, तुमचा पालनकर्ता तीन हजार दूतांना पाठवून तुमची मदत
करेल? 125 तुम्ही जर सहनशीलता बाळगणारे आणि अल्लाहचे भय बाळगणारे
बनलात (तर काळजी करण्याचे काही कारण नाही). जर शत्रूने तुमच्यावर
अचानक चढाई केली, तर तुमचा पालनकर्ता पाच हजार सुसज्ज दूतांना पाठवून
तुमची मदत करेल. 126 ही गोष्ट अल्लाहने (आपल्या पैगंबराकरवी) यासाठी
सांगितली की, ती तुमच्यासाठी शुभवार्ता ठरावी, आणि तुमची मने संतुष्ट
व्हावीत. मदत तर अल्लाहकडूनच प्राप्त होते, जो सर्वशक्तिमान व बुद्धिवान आहे.
127 (तुमची मदत) यासाठी केली जाईल की, अल्लाह (तुमच्याद्वारे) त्या
लोकांचा बिमोड करेल, जे सत्य नाकारण्यावर ठाम आहेत, आणि त्यांना
अपमानित करेल, जेणेकरून ते निराश होऊन माघार घेतील. 128 पैगंबर!
तुमचा या गोष्टीशी काहीही संबंध नाही की, अल्लाह त्यांच्या पश्चात्तापाचा
स्वीकार करून (त्यांना क्षमा करील) किंवा त्यांना शिक्षा करील, कारण ते
अत्याचारी आहेत. 129 आणि आकाशात जे काही आहे व पृथ्वीवर जे काही
आहे ते सर्व अल्लाहच्याच नियंत्रणात आहे. तो इच्छील त्यास क्षमा करतो आणि
इच्छील त्यास शिक्षा करतो. आणि अल्लाह फार क्षमाशील व कृपाशील आहे.

130 श्रद्धावंतांनो! व्याजाद्वारे आपल्या संपत्तीला दुप्पट, चौपट करू नका, (म्हणजे व्याज आणि व्याजावर व्याज घेऊन आपल्या संपत्तीची वाढ करू नका) आणि अल्लाहचे भय बाळगा तरच तुम्ही यशस्वी व्हाल. 131 त्या आगीपासून स्वत:चा बचाव करा, ती तयार करण्यात आलेली आहे, त्या लोकांसाठी जे सत्य नाकारतात. 132 अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आज्ञांचे पालन करा म्हणजे तुमच्यावर कृपा केली जाईल. 133 आपल्या पालनकर्त्याकडून क्षमाप्राप्तीसाठी आणि त्या स्वर्गाच्या प्राप्तीसाठी आपसात स्पर्धा करणारे बना, जो स्वर्ग आकाश आणि जमिनीप्रमाणे विशाल आहे. जो तयार करण्यात आला आहे, अल्लाहचे भय बाळगणाऱ्यांसाठी. 134 जे (अल्लाहच्या कार्यात) खर्च करतात, संपन्न अवस्था असताना आणि हलाखीची अवस्था असताना देखील, जे आपल्या क्रोधावर नियंत्रण ठेवतात आणि लोकांना क्षमा करतात. अल्लाहला (असेच) सदाचारी लोक प्रिय आहेत. 135 आणि जेव्हा त्यांच्याकडून कोणतेही दुष्कृत्य घडते किंवा स्वत:वरच ते अन्याय करून बसतात, तेव्हा त्यांना अल्लाहची आठवण होते आणि आपल्या पापांबद्दल क्षमायाचना करू लागतात. (कारण त्यांना या गोष्टीची पूर्ण जाणीव आहे की,) अल्लाहशिवाय दुसरा कोण आहे जो पापांची क्षमा करू शकतो? आणि त्यांच्याकडून जी काही चूक घडली त्याविषयी ते जाणूनबुजून आग्रह धरत नाही. 136 अशाच लोकांना बक्षीस म्हणून त्यांच्या पालनकर्त्याकडून क्षमा आहे, आणि त्यांना अशा बागा दिल्या जातील ज्यांच्याखालून पाण्याचे (मन प्रसन्न करणारे) प्रवाह वाहत असतील आणि तिथे ते नेहमीसाठी निवास करतील. किती जबरदस्त बक्षीस आहे सत्कर्मे करणाऱ्यांसाठी! 137 विविध प्रकारची जीवनपद्धती (असलेले लोक) तुमच्या आधी होऊन गेले आहेत. (त्यांच्यात अनेक उदाहरण आहेत.) तर जमिनीवर हिंडून पाहा की, कसा शेवट झाला त्या लोकांचा ज्यांनी सत्याला असत्य ठरविले? 138 हे कुराण लोकांसाठी सुस्पष्ट निवेदन आहे आणि (अल्लाहचे)

भय बाळगणाऱ्यांसाठी मार्गदर्शन आणि सदुपदेश.

139 धीर खचू देऊ नका आणि दु:खी होऊ नका, निश्चितपणे तुमचेच पारडे जड राहील जर तुम्ही खरे श्रद्धावंत असाल. 140 जर तुम्हाला इजा पोचलेली आहे तर तुमच्या शत्रूंना देखील तशाच प्रकारची इजा पोचलेली आहे. आणि आम्ही असे (सु:ख–दु:खाचे) दिवस लोकांवर आलटून पालटून आणत असतो. हे अशासाठी की, अल्लाहने श्रद्धावंतांची चिन्हांकित करून निवड करावी आणि तुमच्यामधून काही लोकांना साक्षीदार बनवावे. आणि अल्लाहला अत्याचारी लोक प्रिय नाहीत. 141 हे यासाठी की, अल्लाहने श्रद्धावंतांना (अश्रद्धांपासून वेगळे करून) शुद्ध करावे आणि त्या सत्य नाकारणाऱ्या श्रद्धाहीनांचा नाश करावा. 142 तुमच्यापैकी कोण–कोण (अल्लाहच्या मार्गात) प्रयत्नशील राहिले आणि कोण–कोण प्रतिकूल परिस्थितीत आपले धैर्य खचू न देता अढळ राहिले, (अशी तुमची कसोटी) अल्लाहने पाहिलेली नसतानाच तुम्हाला स्वर्ग मिळून जाईल, असे तुम्हाला वाटते की काय? 143 (अल्लाहच्या मार्गात) तुम्ही मरणाची इच्छा, त्याची वेळ येण्यापूर्वीच करत होता, पण जेव्हा तुम्ही त्याला (येताना) उघड्या डोळ्यांनी पाहिले तेव्हा पाहतच राहिलात.

144 मुहम्मद तर केवळ एक पैगंबर आहेत, त्यांच्यापूर्वी अनेक पैगंबर होऊन गेले आहेत. मग जर त्यांचा मृत्यू झाला किंवा त्यांची हत्या झाली, तर तुम्ही (त्यांचे अनुसरण करणे सोडून) त्यांच्याकडे पाठ फिरवाल काय? आणि जो कोणी पाठ फिरवेल, तो अल्लाहचे कोणतेही नुकसान करणार नाही. आणि अल्लाह कृतज्ञ लोकांना नक्कीच चांगले फळ देईल. 145 आणि अल्लाहच्या परवानगीशिवाय कोणताही जीव मरण पावू शकत नाही. पण (अल्लाहकडून) अगदी ठरवलेल्या वेळेवरच (प्रत्येक जीव मरण पावेल). आणि ज्याला या जगातच फळ हवे असेल, तर ते आम्ही त्यास देऊ आणि ज्याला मृत्यूनंतरच्या जीवनात फळ हवे असेल, तर ते आम्ही त्यास देऊ. आणि कृतज्ञ लोकांना

आम्ही निश्चितच (चांगले) फळ देऊ. 146 (आधी होऊन गेलेल्या) कितीतरी पैगंबरांना (अल्लाहच्या मार्गात) अल्लाहच्या निष्ठावान भक्तांना सोबत घेऊन लढाई करावी लागली. अल्लाहचे मार्ग अनुसरताना त्यांच्यावर संकटे आली, पण ते मनाने खचले नाहीत. ना ते (शत्रूसमोर) दबले, ना त्यांनी पळपुटेपणाचे प्रदर्शन केले. आणि अल्लाहला संयमी लोक प्रिय आहेत. 147 आणि त्यांच्या तोंडून या शिवाय दुसरे शब्द निघाले नाहीत की, हे आमच्या पालनकर्त्या! जे काही अधर्म आमच्या हातून घडले त्याला क्षमा कर. आणि जो काही अतिरेक आमच्याकडून घडला त्यालाही क्षमा कर. आमच्या पायांना डगमगू देऊ नकोस, सत्य नाकारणाऱ्या लोकांच्या विरुद्ध आम्हाला साहाय्य कर. 148 तर अल्लाहने त्यांना या जगात पारितोषिक दिले आणि मृत्यूनंतरच्या जगातही एत्यांच्यासाठी फार मोठे पारितोषिक आहे. कारण अल्लाहला सत्कर्मे करणारे लोक (फार) प्रिय आहेत.

149 श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! तुम्ही जर त्यांचे म्हणणे ऐकाल, जे सत्य नाकारण्यावर ठाम आहेत, तर ते लोक तुम्हाला (ज्या सन्मार्गावर तुम्ही मार्गस्थ आहात) तिकडे पाठ फिरवायला लावतील. (आणि असे झाल्यास) तुम्ही (मोठ्या) नुकसानात राहणाऱ्यांपैकी असाल. 150 असे नाही, तर अल्लाह तुमचा रक्षणकर्ता आहे आणि तोच सर्वोत्तम साहाय्यकर्ता आहे. 151 जे लोक सत्य नाकारण्यावर ठाम आहेत (त्या श्रद्धाहीनांच्या) हृदयात आम्ही तुमचा दरारा निर्माण करू, कारण यांनी अशांना अल्लाहच्या बरोबरीचे ठरवले आहे, ज्यांच्याबद्दल अल्लाहने कोणतेही प्रमाण पाठविलेले नाही. त्यांच्या मुक्कामाचे ठिकाण नरकाची आग आहे. किती वाईट ठिकाण आहे ते अत्याचारी लोकांसाठी! 152 आणि अल्लाहने तुम्हाला दिलेले वचन पूर्ण केले, जेव्हा अल्लाहच्या परवानगीने तुम्ही तुमच्या शत्रूचा नायनाट करीत होता. पण नंतर तुम्ही दुबळेपणा दाखविलात आणि पैगंबराच्या आदेशाच्या बाबतीत आपसात मतभेद केलात. आणि (पैगंबराच्या) आज्ञेचे पालन केला नाहीत. अल्लाहने ते (युद्धातील विजय)

तुमच्या डोळ्यांसमोर आणले होते, जे तुम्हाला हवे होते. (पण तुमच्या अवज्ञेमुळे अल्लाहने आपली मदत थांबवली,) (कारण) तुमच्यापैकी काही असे होते, ज्यांची अशी इच्छा होती की, जी काही (धनसामग्री) त्यांना मिळायची आहे, ती या जगातच मिळून जावी, तर काही मात्र मृत्यूनंतरच्या जीवनाचे अभिलाषी होते.

नंतर अल्लाहने तुमची परीक्षा घेण्यासाठी तुमच्या हातून तुमच्या शत्रूचा पराभव होऊ दिला नाही. पण आता त्याने तुम्हाला क्षमा केली आहे. आणि अल्लाह श्रद्धावंतांवर अतिशय कृपा करणारा आहे. 153 (ती वेळ आठवा) जेव्हा तुम्ही (मोर्चा सोडून) पळून जात होता व कोणाकडेही मागे वळून पाहत नव्हता, आणि पैगंबर मागून तुम्हाला हाक मारत होता, (तुमच्या या वागणुकीमुळे पैगंबराला जो त्रास झाला त्याच्या ऐवज) अल्लाहने तुम्हाला दुःखावर दुःख पोचविले. म्हणजे (तुम्हाला भविष्यात हा धडा मिळावा की), तुम्ही जे गमावलेत किंवा जे संकट तुमच्यावर आले त्याबद्दल तुम्ही निराश होऊ नये. आणि तुम्ही जे काही करीत आहात, त्याची अल्लाहला पूर्ण जाणीव आहे.

154 अल्लाहने दुःखानंतर तुम्हाला मनःशांती प्रदान केली, तुमच्यापैकी काहींना झोपेची गुंगी देऊन. तुमच्यापैकी काही असे होते, ज्यांना फक्त स्वतःची चिंता होती. ते अल्लाहसंबंधाने मनोमनी चुकीच्या (निराधार) कल्पना बाळगून होते, पूर्णपणे अज्ञानावर आधारित कल्पना त्या होत्या, जशा कल्पना इस्लामपूर्व काळात होत्या. ते विचारतात, 'या बाबतीत आम्हालाही काही (निर्णय करण्याचा) अधिकार आहे का?' (त्यांना) सांगा, '(निर्णय करण्याचा) संपूर्ण अधिकार अल्लाहच्याच हाती आहे'. (पण जिथपर्यंत त्यांचा संबंध आहे). त्यांच्या मनात जे आहे, (म्हणजे अल्लाहवर दृढ श्रद्धेचा अभाव) ते तुमच्यापासून लपवू पाहत आहेत आणि ते तुमच्यासमोर उघड करणार नाहीत. ते (तुम्हाला) म्हणतात, 'आम्हालाही काही निर्णय घेण्याचा अधिकार असता तर आमच्या एवढ्या जास्त लोकांचे प्राण

(वाया) गेले नसते.' (त्यांना) सांगा, 'जरी तुम्ही तुमच्या घरीच थांबला असता, तरी ज्यांचे मरण अटळ होते, ते आपल्या मृत्युस्थळी जरूर गेले असते.' हे सर्व यासाठी घडले कारण, अल्लाहला तुमच्या मनांमध्ये जे काही आहे त्याची परीक्षा पाहायची होती आणि जे काही तुमच्या मनांमध्ये आहे त्याला (परीक्षेद्वारे) शुद्ध करायचे होते. तुमच्या मनांमध्ये काय आहे ते अल्लाह पूर्णपणे जाणून आहे. 155
दोन्हीकडील सैन्य जेव्हा एकमेकाला भिडले तेव्हा तुमच्यापैकी ज्यांनी (आपल्या कर्तव्याकडे) पाठ फिरवली होती, (त्याचे कारण म्हणजे) त्यांच्या स्वतःच्या उणिवांमुळे सैतानाने त्यांचे पाय डळमळीत केले होते. पण आता अल्लाहने त्यांना क्षमा केली आहे. खरोखर, अल्लाह फार क्षमाशील व संयमी आहे.

156 श्रद्धावंतांनो! तुम्ही त्या लोकांसारखे होऊ नका, जे सत्य नाकारण्यासाठी हट्टास पेटलेले आहेत. ते आपल्या त्या बांधवांविषयी म्हणतात, जे प्रवासादरम्यान किंवा युद्धात सामील झाले असताना मृत्यू पावतात, 'ते जर आमच्याबरोबर राहिले असते, तर ते मेले नसते किंवा मारले गेले नसते.' (हे अशासाठी घडले की), अल्लाहने त्यांच्या अशा विचारांना त्यांच्या मनात खेद निर्माण होण्यास कारणीभूत ठरवावे. तर अल्लाहच जीवन प्रदान करतो आणि मृत्यू घडवून आणतो आणि तुम्ही जे काही करत आहात, ते सर्व अल्लाह पाहत आहे. 157
जर तुम्ही अल्लाहच्या मार्गात मारले गेलात किंवा मृत्यू पावलात तर अल्लाहकडून मिळणारी क्षमा व कृपा (या गोष्टी) त्या सर्व वस्तूंपेक्षा निश्चितच श्रेष्ठ आहेत, ज्यांचा ते (या जगात) साठा करीत आहेत. 158 जरी तुम्ही मृत्यू पावलात किंवा मारले गेलात तरी तुम्हाला निश्चितच अल्लाहकडे एकत्र करून आणले जाईल.
159 पैगंबर! ही तर अल्लाहचीच कृपा आहे की, तुम्ही त्यांच्याप्रति मृदू स्वभाव असलेले आहात, आणि तुम्ही जर उग्र स्वभावाचे आणि कठोर मनाचे असता, तर ते लोक निश्चितच तुम्हाला सोडून निघून गेले असते. (पैगंबर!) त्यांना (तुम्ही) क्षमा करा आणि (अल्लाहकडे) त्यांच्यासाठी क्षमेची याचना करा आणि

(महत्त्वाच्या प्रश्नांवर) त्यांच्याशी सल्लामसलत करा. मग जेव्हा (एखाद्या कृती
योजनेविषयी) निर्णय घ्याल तर अल्लाहवर (दृढ) विश्वास ठेवा. आणि ते लोक
अल्लाहला प्रिय आहेत, जे त्याच्यावर विश्वास ठेवतात. 160 आणि जर अल्लाहने
तुम्हाला मदत केली तर कोणीही तुम्हाला मात देऊ शकत नाही, पण जर त्याने
तुमच्याकडून त्याची मदत काढून घेतली, तर त्याच्याशिवाय दुसरा कोण आहे
जो तुम्हाला मदत करू शकतो? म्हणून विश्वास ठेवणाऱ्यांनी अल्लाहवरच
विश्वास ठेवायला पाहिजे.

161 कोणताही पैगंबर असे करणे शक्य नाही की, तो (अल्लाहच्या संदेशांपैकी)
काही भाग लपवून ठेवेल, आणि जो कोणी लपवून ठेवण्याचे असे कृत्य करेल,
तो त्या लपविलेल्या गोष्टीला पुनरुत्थानाच्या दिवशी आपल्या बरोबर घेऊन
येईल. मग प्रत्येकाला, त्याने कर्मरूपी जी कमाई केली असेल, तिचा पुरेपूर
मोबदला दिला जाईल, आणि कोणावरही अन्याय केला जाणार नाही. 162
अल्लाहच्या मर्जीनुसार जीवन व्यतीत करणारा माणूस, त्या माणसासारखा कसा
होऊ शकतो, ज्याने स्वत:वर अल्लाहचा राग ओढवून घेतला? त्याचे ठिकाण
तर नरकात आहे. किती भयावह ठिकाण आहे ते! 163 अल्लाहच्या दृष्टीत त्यांचे
(पूर्णपणे) वेगवेगळे दर्जे आहेत, आणि अल्लाह ते सर्व पाहत आहे जे काही ते
करीत आहेत. 164 खरोखर अल्लाहने श्रद्धावंतांवर फार मोठी कृपा केली की,
त्याने त्यांच्यामधूनच एका पैगंबराला (निवड करून) उभे केले, जो त्यांना
अल्लाहचे संदेश ऐकवतो आणि त्यांचे मन शुद्ध करतो आणि तो त्यांना ग्रंथ
तसेच शहाणपण शिकवतो. यापूर्वी निश्चितपणे ते चुकीच्या मार्गावर होते.

165 काय! (हे खरे नाही?) जेव्हा तुमच्यावर एखादे संकट आले तर तुम्ही
असे म्हणता, 'हे संकट कोठून आले? पण या आधी तुमच्या हातून (तुमच्या
शत्रूवर) या पेक्षा दुप्पट मोठे संकट आले होते.' (त्यांना) सांगा, 'हे तुम्हीच
स्वत:वर ओढवून घेतलेले आहे.' आणि खरोखर, अल्लाह सर्व काही करण्यास

समर्थ आहे. 166 ज्या दिवशी दोन्हीकडील सैन्ये एकमेकाला भिडली, त्या दिवशी जे संकट तुमच्यावर आले, ते अल्लाहच्या परवानगीनेच तुमच्यावर आले होते. आणि हे अशासाठी (घडले की), अल्लाहला सच्च्या श्रद्धावंतांची निवड करता यावी. 167 आणि त्यांनाही चिन्हांकित करता यावे जे ढोंगी होते. जेव्हा त्यांना असे सांगण्यात आले होते की, या, अल्लाहच्या कार्यासाठी लढा आणि शत्रूपासून स्वत:चा बचाव करा. तेव्हा ते उत्तरले, 'युद्ध होईल असे आम्हाला माहीत असते, तर आम्ही अवश्य तुमच्याबरोबर आलो असतो.' त्या दिवशी ते श्रद्धेपेक्षा अश्रद्धेच्या अधिक जवळ होते. आणि जे त्यांच्या मनात नाही ते आपल्या तोंडाने बोलत आहेत. ते, जे लपविण्याचा प्रयत्न करीत आहेत, अल्लाहला ते पूर्णपणे माहीत आहे. 168 हे तर स्वत: मागे बसून राहिले (युद्धात सामील झाले नाही). (आणि युद्धात ठार झालेल्या) आपल्या बांधवाविषयी म्हणाले, 'त्यांनी जर आमचे म्हणणे ऐकले असते तर ते मारले गेले नसते.' (त्यांना) सांगा, 'तुमचे म्हणणे खरे असेल तर मृत्यूला स्वत:पासून वेगळे करून दाखवा.'

169 जे अल्लाहच्या मार्गात ठार झाले त्यांना मृत समजू नका. ते तर जिवंत आहेत आपल्या पालनकर्त्याजवळ, ते तिथे उपजीविका प्राप्त करीत आहेत. 170 अल्लाहने आपल्या कृपेने त्यांना जे दिले आहे त्यावर ते फार आनंदी आहेत. आणि (त्यांचे) जे (बांधव) मागे राहिले आहेत, ते अजून त्यांना येऊन मिळालेले नाहीत, त्यांच्याविषयी देखील शुभ वार्ता प्राप्त करून ते आनंदी होत आहेत. ते (आता) कधीही भयाने ग्रस्त होणार नाहीत किंवा कोणत्याही प्रकारच्या दु:खाला ते कधीही सामोरे जाणार नाहीत. 171 ते आनंदी होत आहेत यासाठी की, अल्लाहने त्यांच्यावर उपकार केले व फार मोठी कृपा केली. (त्यांना माहीत आहे की), अल्लाह श्रद्धावंतांच्या (सत्कर्मांचे) फळ वाया जाऊ देत नाही. 172 ज्या लोकांनी (त्यांना) आघात झालेला असताना देखील, अल्लाह आणि त्याच्या

पैगंबराच्या हाकेला प्रतिसाद दिला. अशांपैकी ज्यांनी सत्कर्मे केली आणि अल्लाहचे भय बाळगत राहिले. त्यांच्यासाठी निश्चितच फार मोठे पुण्यफळ आहे.

173 त्यांना (काही) लोकांनी (असे) सांगितले, 'शत्रूने तुमच्याविरुद्ध फार मोठा फौजफाटा एकत्रित केला आहे, तर त्यांच्यापासून सावध राहा.' (लोकांकडून असे ऐकून) त्यांचा अल्लाहवरचा विश्वास आणखी दृढ झाला. त्यावर ते (श्रद्धावंत) म्हणाले, 'अल्लाह आमच्यासाठी पुरेसा आहे आणि तोच सर्वोत्तम संरक्षणकर्ता आहे'. 174 आणि ते युद्धभूमीहून (आपल्या घरी) अल्लाहचा कृपाप्रसाद घेऊन आणि त्याची मर्जी संपादन करून परतले. त्यांना कोणत्याही प्रकारचा त्रास झाला नाही, कारण ते अल्लाहच्या इच्छेचे अनुसरण करीत होते. आणि अल्लाह फार कृपा करणारा आहे. 175 तो तर सैतान आहे, जो आपल्या साथीदारांचे भय तुमच्यामध्ये निर्माण करू पाहतो. पण तुम्ही त्यांना भिऊ नका, केवळ माझेच (अल्लाहचेच) भय बाळगा, जर तुम्ही सच्चे श्रद्धावंत असाल.

176 जे लोक सत्य नाकारण्यासाठी चढाओढ करीत आहेत त्यांच्या या कृत्याने (पैगंबर!) तुम्ही दु:खी होऊ नका. ते अल्लाहला कोणत्याही प्रकारचे नुकसान पोचवू शकत नाहीत. मृत्यूनंतरच्या जीवनात (अल्लाहच्या कृपेत) त्यांचा कसलाही वाटा असू नये, अशी अल्लाहचीच इच्छा आहे. भयावह शिक्षा त्यांची वाट पाहत आहे. 177 खरोखरच ते लोक ज्यांनी श्रद्धेच्या किमतीवर अश्रद्धा विकत घेतली, ते अल्लाहचे कोणतेही नुकसान करू शकत नाहीत; आणि त्यांना कठोर शिक्षा भोगावी लागणार आहे. 178 जे सत्य नाकारण्यावर ठाम आहेत, त्यांनी असा विचार मनात आणू नये की, आम्ही जी सवलत त्यांना देत आहोत ती त्यांच्यासाठी फार चांगली गोष्ट आहे. आम्ही त्यांना केवळ यासाठी सवड देत आहोत की, त्यांनी (स्वत:साठी) पापाचे खूप मोठे ओझे जमा करावे. त्यांच्यासाठी तर फार मोठी अपमानजनक शिक्षा आहे.

179 (हे सत्य नाकारणाऱ्यांनो!) श्रद्धावंत लोक सध्या ज्या अवस्थेत आहेत,
त्या अवस्थेत अल्लाह त्यांना कधीही सोडणार नाही. (पण फक्त) जोपर्यंत तो
चांगल्यांना दुष्टांपासून अलग करीत नाही. आणि अल्लाहची ही पद्धत नाही की,
तो तुम्हाला अदृश्य गोष्टी जाणण्याची दृष्टी द्यावी. पण (त्या कामासाठी) अल्लाह
आपल्या पैगंबरांपैकी ज्याला इच्छितो त्याची निवड करतो. म्हणून तुम्ही विश्वास
ठेवा अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरांवर, आणि जर तुम्ही (अल्लाहवर) विश्वास
ठेवणारे बनलात आणि दुष्कृत्यांपासून स्वत:ला दूर ठेवलात तर तुमच्यासाठी
फार मोठे बक्षीस आहे.

180 आणि ज्या लोकांना अल्लाहने आपल्या कृपेने जे दिले आहे त्या
बाबतीत ते आपले हात आखडून घेतात (कंजूषपणा दर्शवितात) त्यांनी असे
अजिबात समजू नये की, ते त्यांच्या हिताचे आहे. नव्हे, ते तर त्यांच्यासाठी
फार वाईट आहे. ज्या गोष्टींच्या बाबतीत ते कंजूषपणा दाखवीत आहेत, ते सर्व
पुनरुत्थानाच्या दिवशी एक गळफास बनवून त्यांच्या गळ्यात अडकवण्यात
येईल. आकाश आणि पृथ्वी केवळ अल्लाहचीच मिरास आहे. आणि तुम्ही जे
काही करीत आहात, त्याची अल्लाहला पूर्ण जाणीव आहे. 181 निश्चितपणे
अल्लाहने त्या लोकांचे म्हणणे ऐकले आहे, ज्यांनी म्हटले, 'अल्लाह तर गरीब
आहे, पण आम्ही श्रीमंत आहोत'! आम्ही त्यांच्या या वक्तव्याला लिहून ठेवू,
तसेच (त्यांच्या त्या कृत्यांचीही नोंद करून ठेवू की), त्यांनी पैगंबरांची
अन्यायाने हत्या केली. आणि (न्यायाच्या दिवशी) आम्ही त्यांना सांगू, 'आता
चाखा स्वाद, आगीच्या यातनांचा.' 182 हा तर (तुमच्या कृत्यांचा) मोबदला
आहे, जे तुम्ही आपल्या हातांनी केले आहे, कारण अल्लाह आपल्या भक्तांवर
(तिळमात्रसुद्धा) अन्याय करीत नाही. 183 जे लोक म्हणतात, 'अल्लाहने
आम्हाला आदेश दिला आहे की, कोणत्याही पैगंबरावर विश्वास ठेवू नका,
जोपर्यंत तो आमच्यासमोर असा बळी प्रस्तुत करीत नाही, ज्याला अग्नी खाऊन

टाकेल.’ (पैगंबर!) त्यांना सांगा, ‘माझ्याआधी सुद्धा सत्याचे स्पष्ट पुरावे आणि तुम्ही म्हणत आहात, ती वस्तू घेऊन अनेक पैगंबर तुमच्याकडे आले होते. तर तेव्हा तुम्ही त्यांची हत्या का केली? जर तुमचे म्हणणे खरे असेल तर (या प्रश्नाचे उत्तर द्या).’ 184 आणि जर हे लोक तुम्हाला खोटे ठरवीत आहेत तर (यात काही आश्चर्यासारखे नाही, कारण) तुमच्या आधीही अनेक पैगंबरांना खोटे ठरविण्यात आले आहे, जे त्यांच्याकडे सत्याचे स्पष्ट पुरावे आणि बोधपूर्ण व ज्ञानपूर्ण ग्रंथ घेऊन आले होते. 185 प्रत्येक मनुष्याला मृत्यूची चव चाखावी लागणार आहे. आणि पुनरुत्थानाच्या दिवशी तुम्हाला (तुमच्या कृत्यांचा) पुरेपूर मोबदला मिळणार आहे. ज्याला (नरकाच्या) अग्नीपासून वाचवून स्वर्गात प्रवेश दिले जाईल, तोच खऱ्या अर्थाने यशस्वी ठरेल. या जगातील जीवन म्हणजे दुसरे तिसरे काही नसून, केवळ स्वतःची फसवणूक करणारे सुख आहे.

186 निश्चितपणे तुमचे धन आणि तुमचे प्राण या संबंधाने तुमची परीक्षा घेण्यात येईल. आणि तुमच्यापूर्वी ज्यांना ग्रंथ देण्यात आला होता त्या लोकांकडून, आणि दुसरे म्हणजे अल्लाहचे भागीदार ठरवणारे लोक, (ह्या सर्वांकडून) तुम्हाला निश्चितच अनेक दुःखदायक गोष्टी ऐकायला मिळतील. पण जर तुम्ही संयम बाळगाल आणि अल्लाहचे भय बाळगाल तर असे करणे खरोखर मोठे धैर्यपूर्ण कार्य आहे. 187 आणि (तो प्रसंग आठवा), जेव्हा अल्लाहने आधीच्या ग्रंथधारकांकडून प्रतिज्ञा घेतली होती की, तुम्ही अल्लाहच्या ग्रंथाचा लोकांमध्ये प्रसार कराल आणि तो तुम्ही कोणत्याही प्रकारे दडवून ठेवणार नाही. पण त्यांनी (या प्रतिज्ञेकडे दुर्लक्ष करून) ग्रंथाकडे पूर्णपणे पाठ फिरवली आणि क्षुल्लक फायदा प्राप्त करण्यासाठी त्याची विक्री केली. किती वाईट सौदा केला त्यांनी!
188 जे लोक आपल्या दुष्कृत्यांवर खूश आहेत, आणि जी (सत्कर्मे) त्यांनी केलेलीच नाहीत त्यांबद्दल त्यांना श्रेय दिले जावे, अशी त्यांची इच्छा आहे तर असे लोक शिक्षेपासून सुरक्षित झालेले आहेत असा विचार तुम्ही कदापि करू

नका. त्यांना (मृत्यूनंतरच्या शाश्वत जीवनात) अतिशय कठोर शिक्षा भोगावी लागणार आहे. 189 पृथ्वी आणि आकाशांचा मालक केवळ अल्लाह आहे आणि अल्लाहलाच प्रत्येक गोष्टीवर नियंत्रण प्राप्त आहे.

190 आकाश आणि पृथ्वी यांच्या निर्मितीमध्ये आणि रात्र व दिवस यांच्या आलटून पालटून येण्यामध्ये, समजूतदार लोकांसाठी संदेश स्पष्ट करणाऱ्या खुणा आहेत. 191 जे अल्लाहचे स्मरण करतात उठता, बसता आणि पहुडलेले असताना (या सर्व स्थितीत), ते आकाश आणि पृथ्वीच्या निर्मितीसंबंधाने चिंतन करीत असतात, (आणि त्या सखोल चिंतनाद्वारे) त्यांच्या तोंडून असे उद्‌गार बाहेर पडतात, 'हे आमच्या पालनकर्त्या! तू हे उद्देशाविना व्यर्थ निर्माण केलेले नाहीस, असीम आहे तुझी महानता! (हे अल्लाह!) तू आम्हाला आगीच्या शिक्षेपासून वाचव. 192 हे प्रभू! ज्या कोणाला तू (नरकाच्या) अग्नीत टाकशील, तो खरोखर बेअब्रू होईल. आणि अन्यायी लोकांचा कोणीही साहाय्यकर्ता असणार नाही. 193 हे प्रभू! आम्ही एका हाक देणाऱ्याची हाक ऐकली, तो (लोकांना) सत्य धर्माकडे बोलावीत होता, (तो म्हणत होता) आपल्या पालनकर्त्यावर विश्वास ठेवणारे बना, (प्रभू! आम्ही त्याचे आमंत्रण स्वीकारून) श्रद्धावंत बनलो आहोत. तेव्हा तू आता आमच्या पापांना क्षमा कर आणि आमच्या दुष्कृत्यांना पुसून टाक. आणि आमचा शेवट सदाचारी लोकांसोबत कर. 194 हे प्रभू! तू आपल्या पैगंबरामार्फत जे वचन आम्हाला दिलेले आहेस, त्यांची तू पूर्तता कर, न्यायाच्या दिवशी आम्हाला अपमानित करू नकोस. निश्चितच तू दिलेले वचन कधीही मोडत नाहीस.'

195 आणि त्यांच्या पालनकर्त्याने त्यांच्या प्रार्थनेला ह्या शब्दांत स्वीकृती दिली, 'मी तुमच्यापैकी कोणाच्याही श्रमाचा मोबदला नाकारणार नाही, मग तो पुरुष असो अथवा स्त्री, तुम्ही सर्व एक दुसऱ्यांशी संबंधित आहात. मी त्यांची वाईट कृत्ये निश्चितपणे माफ करून टाकेन, ज्यांनी (माझ्या कार्यासाठी)

आपल्या घरादाराचा त्याग केला आणि ज्यांना आपल्या घरांतून बाहेर काढले गेले आणि जे माझ्या मार्गात छळले गेले आणि जे (माझ्या कार्यासाठी) लढले आणि मारले गेले, त्यांना अशा बागांत दाखल करीन, ज्याखालून (पाण्याचे नयनरम्य) प्रवाह वाहत असतील. हे बक्षीस असेल त्यांच्यासाठी अल्लाहकडून. आणि सर्वोत्तम बक्षीस तर अल्लाहकडेच मिळणार आहे. 196 सत्य नाकारणारे लोक जमिनीवर जी धावपळ करीत आहेत, त्यापासून तुम्ही स्वत:ची फसवणूक होऊ देऊ नका. 197 ही मौज काही दिवसांची आहे. नंतर ते (नेहमी) नरकातच राहणार आहेत, आणि ते ठिकाण तर खूपच वाईट आहे! 198 परंतु जे लोक आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगतात, त्यांच्यासाठी बागा आहेत, ज्यांमधून (नयनरम्य पाण्याचे) प्रवाह वाहात असतील, ते कायम तेथेच राहतील. हे अल्लाहकडून मिळणारे आतिथ्य असेल. आणि जे काही अल्लाहकडे आहे ते सदाचारी लोकांसाठी सर्वश्रेष्ठ आहे. 199 आधीच्या ग्रंथांना अनुसरणाऱ्यांमध्ये असे काही लोक आहेत, जे अल्लाहवर श्रद्धा ठेवतात आणि त्या ग्रंथाला मानतात जो तुमच्याकडे पाठविला गेला आणि त्या ग्रंथालाही मानतात, जो या पूर्वी स्वत: त्यांच्याकडेच पाठविला गेला होता. ते अल्लाहसमोर विनम्र बनून राहतात, ते क्षुल्लक फायद्यासाठी अल्लाहच्या संदेशाचा सौदा करीत नाहीत. त्यांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्याकडे निश्चित मिळणार आहे. आणि अल्लाह हिशेब घेण्याच्या बाबतीत फार शीघ्र आहे. 200 श्रद्धा बाळगणाऱ्यांनो! संयमी बना, सामना करण्यासाठी दृढ असा, आणि (अल्लाहच्या कार्यासाठी गरज पडेल तेव्हा) लढण्यासाठी तयार असा. आणि अल्लाहची जाण ठेवा म्हणजेच तुम्ही यशस्वी व्हाल.

# सूरह-०४. अन-निसा

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 लोकांनो! आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगा, ज्याने तुम्हाला एका जिवापासून निर्माण केले आणि त्यातूनच त्याचे जोडपे निर्माण केले. आणि त्या दोघांपासून असंख्य स्त्री व पुरुष निर्माण करून (जगभर) पसरवले. तर अल्लाहचे भय बाळगा ज्याच्या नावाने तुम्ही एकदुसऱ्याकडे (आपल्या हक्कांची) मागणी करता. आणि नात्याची बंधने पाळण्यासंबंधाने दक्ष राहा. निःसंदेह, अल्लाह तुमच्यावर (पूर्ण) लक्ष ठेवून आहे. 2 आणि अनाथांची संपत्ती त्यांच्या हवाली करा, चांगल्या वस्तूंशी वाईट वस्तूंनी अदलाबदल करू नका आणि अनाथांची धनसंपत्ती, तुमच्या धनसंपत्तीबरोबर मिसळून गिळंकृत करू नका. (असे करणे) निश्चितच फार मोठे पाप आहे. 3 आणि जर तुम्हाला शंका असेल की, तुम्ही अनाथ (मुलींच्या) बाबतीत न्याय करू शकणार नाही, तर (इतर) स्त्रियांपैकी आपल्या पसंतीनुसार दोन, तीन किंवा चार स्त्रियांशी विवाह करा. आणि (एकापेक्षा जास्त पत्नी असताना) आपण (प्रत्येकीला) न्याय्य वागणूक देऊ शकणार नाही, अशी तुम्हाला शंका असेल तर मग एकाच स्त्रीशी विवाह करा. किंवा त्या स्त्रियांपैकी (कोणालाही) तुम्ही आपल्या दांपत्य जीवनात आणा ज्या तुमच्या दासी आहेत. अन्याय टाळण्यासाठी हा एक योग्य मार्ग ठरू शकतो. 4 स्त्रियांना त्यांचा महर स्वखुशीने द्या. पण जर त्या स्वेच्छेने त्यातील काही भाग तुम्हाला परत देत असतील, तर त्याचा तुम्ही पूर्ण आनंदाने उपयोग करू शकता.

5 अल्लाहने ज्या संपत्तीला तुमच्या निर्वाहाचे साधन बनवले आहे, ती संपत्ती अपरिपक्व लोकांच्या हवाली करू नका. पण त्यातून त्यांच्यासाठी अन्नवस्त्राची व्यवस्था करा आणि त्यांना चांगले उपदेश द्या. 6 (तुमच्या पालकत्वात असलेल्या)

अनाथांवर विवाहयोग्य वय होईपर्यंत बारकाईने नजर ठेवा. त्यांची (पूर्ण) मानसिक वाढ झाली, असे तुम्हाला दिसून आले, तर त्यांची संपत्ती त्यांच्या हवाली करा. ते मोठे झाल्यानंतर (त्यांची संपत्ती त्यांच्या हवाली करावी लागेल या भीतीने) उधळपट्टी आणि घाई करून ती गिळंकृत करू नका. आणि जो धनवान आहे, त्याने या (अनाथाच्या) संपत्तीपासून पूर्णपणे दूरच राहावे. पण जर (तो पालक) गरीब असेल तर त्याने न्यायपूर्ण रीतीने त्यातून काही भाग घ्यावा आणि तुम्ही जेव्हा त्यांची संपत्ती त्यांच्या हवाली कराल तेव्हा त्यांच्या समक्ष साक्षीदार बोलावून घ्या. आणि हिशेब घेण्यासाठी अल्लाह पुरेसा (समर्थ) आहे. 7 आईवडील आणि जवळचे नातेवाईक (मरण पावल्यानंतर) जी मालमत्ता आपल्या मागे सोडून जातात, त्यामध्ये पुरुषांचा वाटा आहे, तसेच आईवडील आणि जवळचे नातेवाईक (मरण पावल्यानंतर) जी मालमत्ता आपल्या मागे सोडून जातात, त्यामध्ये स्त्रियांचाही वाटा आहे. मग तो कमी असो अथवा जास्त, (अल्लाहने) निश्चित केलेला वाटा आहे. 8 आणि (वारसदारांदरम्यान वडिलोपार्जित मालमत्तेची) वाटणी होत असताना (इतर) नातेवाईक किंवा अनाथ व्यक्ती किंवा गरीब व्यक्ती तिथे उपस्थित असतील तर त्या (संपत्ती) मधून त्यांनाही काही (भाग) द्या, आणि त्यांच्याशी भलेपणाने बोला. 9 लोकांनी (हा विचार करून अल्लाहचे) भय बाळगले पाहिजे की, जर ते आपल्या मुलाबाळांना दुर्बल अवस्थेत आपल्या मागे सोडून जाणार असते, तर (मृत्युसमयी) त्यांना (आपल्या दुर्बल मुलाबाळांविषयी) किती काळजी लागली असती (त्यांना इतर अनाथांसंबंधाने सुद्धा तशीच काळजी असायला हवी). त्यांनी अल्लाहचे भय बाळगायला हवे, आणि (गरिबांशी, अनाथांशी), नम्रपणे बोलायला हवे. 10 जे लोक अनाथांची मालमत्ता अन्यायकारकपणे गिळंकृत करतात, ते नक्कीच आपल्या पोटात आग भरीत आहेत. आणि लवकरच त्यांना भडकत्या आगीच्या हवाली केले जाईल.

11 तुमच्या मुलाबाळांच्या (वारसाहक्का)संबंधाने अल्लाह तुम्हाला असा आदेश

देत आहे. दोन स्त्रियां एवढा वाटा एका पुरुषाचा असेल. पण (मयत व्यक्तीला) दोनपेक्षा अधिक मुली असतील, तर मयत व्यक्तीने मागे सोडलेल्या मालमत्तेपैकी त्यांना दोन तृतीयांश भाग मिळावा, जर एकच मुलगी असेल तर तिला अर्धा भाग मिळावा, जर मृतास मूलबाळ असेल तर त्याने सोडलेल्या मालमत्तेपैकी त्याच्या आईवडलांना प्रत्येकी सहावा भाग मिळेल. आणि जर मयत व्यक्तीला मूलबाळ नसेल आणि तिचे आईवडील हेच वारस असतील, तर आईला एक तृतीयांश भाग मिळावा. आणि जर मयत व्यक्तीला बहीण भाऊ (सुद्धा) असतील, तर तिच्या आईला सहावा भाग मिळावा, ही वाटणी (मयत व्यक्तीने) मृत्युपत्राद्वारे (दुसऱ्यांना) दिलेला हिस्सा आणि तिच्यावर कर्ज (वगैरे असेल तर) ते देऊन उरलेल्या संपत्तीत केली जाईल. तुमचे (आई) वडील किंवा तुमची मुले यांपैकी तुमच्याकडून लाभप्राप्तीच्या दृष्टीने कोण जास्त योग्य आहे, हे तुम्ही जाणत नाही म्हणूनच हे सर्व भाग अल्लाहने निश्चित केलेले आहेत. खरोखर, अल्लाह प्रत्येक गोष्ट जाणणारा आणि बुद्धिमान आहे. 12 आणि तुमच्या पत्नी (त्यांच्या मृत्यूनंतर) जी काही (मालमत्ता) मागे सोडून जातील आणि त्यांना मूलबाळ नसेल तर त्यात तुम्ही अर्ध्या भागाचे वारस आहात. आणि जर त्यांना मूलबाळ असेल तर त्यांनी आपल्या मागे सोडून गेलेल्या (मालमत्तेचे) तुम्ही एक चतुर्थांश भागाचे वारस आहात. पण ही वाटणी (मयत स्त्रीने) मृत्युपत्रातील घोषणेद्वारे दुसऱ्यांना दिलेला भाग देऊन आणि (तिच्यावर) कर्ज असेल, तर ते परत करून शिल्लक राहिलेल्या संपत्तीत केली जाईल. आणि जर तुम्हाला मूल नसेल तर तुम्ही जे काही मागे सोडून जाल, त्यामधील चौथा भाग त्यांना मिळावा (म्हणजे पत्नींना मिळावा) . आणि जर तुम्हाला मूल असेल तर तुम्ही मागे सोडलेल्या संपत्तीमधील आठवा भाग त्यांना (पत्नींना) मिळावा. पण ही वाटणी तुम्ही मृत्युपत्रातील घोषणेद्वारे दुसऱ्यांना दिलेला भाग देऊन आणि तुमच्यावर (काही) कर्ज असेल, तर ते परत करून शिल्लक राहिलेल्या संपत्तीत केली जाईल. आणि जर एखादा

पुरुष किंवा स्त्री अशी आहे की, त्यांचा प्रत्यक्ष वारस कोणीही नाही, (ना मूलबाळ, ना हयात आईवडील), पण त्यांचा एक भाऊ किंवा एक बहीण असेल तर त्यांना प्रत्येकी सहावा भाग मिळावा. पण जर ते दोन पेक्षा जास्त असतील तर त्यांना एक तृतीयांश भागात समान हिस्से मिळतील, (आणि ही वाटणी) मृत्युपत्राद्वारे केलेल्या घोषणेच्या पूर्ततेनंतर किंवा (मयत व्यक्तीवर) कर्ज असेल तर त्याच्या परतफेडीनंतर, केली जाईल. (या गोष्टीची दक्षता बाळगणे आवश्यक आहे) की, कोणाचेही नुकसान होऊ नये. हा आदेश अल्लाहकडून दिला जात आहे. अल्लाह प्रत्येक गोष्ट जाणणारा आणि फार सहनशील आहे. 13 अल्लाहने घालून दिलेल्या या मर्यादा आहेत, जो कोणी अल्लाह व त्याच्या पैगंबराच्या आज्ञांचे पालन करेल, अल्लाह त्यास अशा बागांत प्रवेश देईल ज्यातून पाण्याचे प्रवाह वाहत असतील आणि नेहमी ते तेथेच राहतील. हेच सर्वोत्तम यश आहे. 14 जो कोणी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराची अवज्ञा करील, तसेच त्याने घालून दिलेल्या मर्यादांचे उल्लंघन करील, त्यास तो (नरकाच्या) आगीत फेकून देईल. त्यामध्ये तो नेहमीसाठी निवास करील. तिथे त्याला अपमानकारक शिक्षा भोगावी लागेल.

15 आणि तुमच्या स्त्रियांपैकी ज्यांनी अनैतिक कृत्य केले असेल, तर त्यासंबंधाने साक्ष देण्यासाठी तुमच्यापैकी अशा चार लोकांना बोलावून घ्या, (ज्यांनी त्यांना अपराध करताना पाहिले आहे). आणि जर त्यांनी तशी साक्ष दिली तर त्या अपराधी स्त्रियांना त्यांच्या घरात कोंडून टाका, येथपावेतो की, त्यांना मृत्यू येईल किंवा अल्लाह (त्यांच्या पश्चात्तापामुळे) त्यांच्यासाठी काही मार्ग काढील. 16 आणि कुकृत्य करणाऱ्या दोन्ही पक्षांना (स्त्री आणि पुरुष) शिक्षा करा, पण जर त्या दोघांनी पश्चात्ताप करून आपल्या वर्तनात सुधारणा केली, तर त्यांना एकटे सोडून द्या. खरोखर अल्लाह पश्चात्तापाचा स्वीकार करणारा आणि कृपा करणारा आहे. 17 अल्लाहवर फक्त अशाच लोकांचा

पश्चात्ताप स्वीकारण्याची जबाबदारी आहे, ज्यांच्या हातून अजाणतेपणे दुष्कृत्य घडले आणि ते त्याबद्दल ताबडतोब पश्चात्ताप व्यक्त करतात. आणि अशाच लोकांवर अल्लाह पुन्हा दया दृष्टी दाखवतो. अल्लाह हा सर्वज्ञ व बुद्धिवान आहे. 18
जो कोणी मृत्यू दारात येईपर्यंत दुष्कृत्य करीत असतो (आणि जेव्हा मृत्यूची चाहूल लागते) तेव्हा म्हणतो, 'आता मला माझ्या दुष्कृत्यांबद्दल पश्चात्ताप होतो.' अशा लोकांचा पश्चात्ताप स्वीकारला जाणार नाही. तसेच त्यांच्याही पश्चात्तापाला काहीच अर्थ नाही, जे अशा अवस्थेत मृत्यूला सामोरे जातात की, ते सत्याला नाकारत राहिले. हे ते लोक आहेत ज्यांच्यासाठी आम्ही यातनामय शिक्षा तयार ठेवली आहे.

19 इमान धारण केलेल्या लोकांनो! स्त्रियांच्या इच्छेविरुद्ध त्यांचे (जबरदस्तीने) वारस बनणे तुमच्यासाठी वैध नाही. आणि तुम्ही त्यांना जे काही दिले आहे, त्यापैकी काही भाग त्यांच्याकडून काढून घेण्याच्या उद्देशाने त्यांना अन्यायाने डांबून ठेवू नका, पण जर त्यांनी काही उघड अनैतिक कृत्य केले असल्यास (तुम्ही त्यांना डांबून ठेवू शकता). त्यांच्याशी चांगुलपणाने वागा. जर त्या तुम्हाला पसंत नसतील तर लक्षात असू द्या की, जी गोष्ट (तुमच्या दृष्टीने) नापसंत करण्याजोगी आहे, त्यात अल्लाहने तुमच्यासाठी पुष्कळ हित ठेवलेले असू शकते. अल्लाह त्याच नापसंतीयोग्य गोष्टीला तुमच्यासाठी फार हितकारक बनवू शकतो. 20 आणि जर तुम्ही एका पत्नीच्या जागी दुसरी पत्नी (आपल्या वैवाहिक जीवनात) आणू इच्छित असाल, तर पहिल्या पत्नीला जे काही धन (किंवा संपत्ती) तुम्ही दिलेले असाल, त्यातून काहीच परत घेऊ नका. तुम्ही ते धन किंवा संपत्ती तिच्यावर खोटे आरोप लावून आणि उघड दुष्कृत्य करून परत घ्याल का? 21 आणि तुम्ही ते कसे परत घेऊ शकता जेव्हा तुम्ही एकदुसऱ्यासोबत स्त्री–पुरुषाचे संबंध प्रस्थापित केलेले आहात. तसेच तिने तुमच्याकडून दृढ वचन देखील घेतलेले आहे. 22 याआधी जे घडले

ते घडले. यापुढे मात्र त्या स्त्रियांशी कदापि विवाह करू नका, ज्यांच्याशी तुमच्या वडिलांनी विवाह केला होता. खरोखर हे घाणेरडे कृत्य आहे व तिरस्कारजनक गोष्ट आहे, आणि भयंकर वाईट रीत आहे.

23 तुमच्यासाठी निषिद्ध ठरविण्यात आलेल्या आहेत, तुमच्या माता, तुमच्या मुली, तुमच्या बहिणी, तुमच्या आत्या, तुमच्या मावश्या, तुमच्या पुतण्या, तुमच्या भाच्या, ज्यांनी तुम्हाला अंगावर दूध पाजले असेल अशा पालक माता, तुमच्या दूध बहिणी, तुमच्या सासवा,तुमच्या सावत्र मुली ज्या तुमच्या पालकत्वाखाली आहेत आणि त्या स्त्रियांपासून जन्माला आलेले आहेत ज्यांच्याशी तुम्ही (सध्या) विवाहबद्ध आहात. पण जर तुम्ही अद्याप त्यांच्यासोबत वैवाहिक जीवन सुरू केलेले नसेल तर (त्यांच्या मुलींसोबत) विवाह केल्यास काही हरकत नाही. आणि तुमच्यासाठी निषिद्ध ठरविण्यात आलेल्या आहेत तुमच्या सख्ख्या मुलांच्या पत्नी, तसेच एकाच वेळी दोन बहिणींशी विवाह करण्यास मनाई आहे. या आधी जे घडले ते घडले, मात्र यापुढे कदापि नको. खरोखर अल्लाह अतिशय क्षमाशील व दयाळू आहे. 24 आणि त्या स्त्रियांशीही विवाह करण्यास तुम्हाला मनाई आहे, ज्या दुसऱ्यांशी विवाहबद्ध आहेत. परंतु याला अपवाद म्हणजे त्या स्त्रिया आहेत, ज्या युद्धकैद्यांच्या रूपाने तुमच्या हाती आलेल्या आहेत. हा तुमच्यासाठी अल्लाहचा अनिवार्य असा आदेश आहे. (वर नमूद केलेल्या स्त्रियांव्यतिरिक्त) इतर कोणत्याही स्त्रीशी तुम्हाला विवाह करण्यास अनुमती आहे, पण या अटीवर की, तुम्ही त्यांना आपल्या संपत्तीच्या साहाय्याने आणि रीतसर मार्गाने विवाहबंधनात आणा, व्यभिचाराद्वारे (अजिबात) नव्हे. आणि जेव्हा तुम्ही त्यांच्यासोबत वैवाहिक जीवन उपभोगायला सुरू कराल, तेव्हा त्यांना त्यांच्यासाठी निश्चित केलेला महर द्या. महर निश्चित केल्यानंतर तुम्ही (त्याची रक्कम) परस्पर सहमतीने कमी जास्त केल्यास तुम्हाला कोणतेही पाप लागणार नाही. खरोखर अल्लाह प्रत्येक गोष्ट जाणणारा आणि बुद्धिमान आहे.

25 आणि तुमच्यापैकी जे कोणी (काही कारणामुळे) स्वतंत्र श्रद्धावंत (म्हणजे एखाद्याची दासी नसलेल्या) स्त्रियांशी विवाह करण्याच्या स्थितीत नसतील, तर त्यांना तुमच्या ताब्यात रीतसर आलेल्या श्रद्धावंत दासीयांशी विवाह करू द्या, अल्लाह तुमच्या श्रद्धेला पूर्णपणे जाणून आहे. तुम्ही (आपसात) एकदुसऱ्याशी संबंधित आहात, तर त्यांच्या मालकाच्या परवानगीने त्यांच्याशी विवाह करा आणि योग्य प्रकारे त्यांचा महर त्यांना द्या. अशा प्रकारे तुम्ही त्यांच्याशी वैध विवाह संबंध स्थापित करू शकता, याउलट स्वच्छंद व्यभिचाराद्वारे किंवा गुप्त अनुचित संबंधाद्वारे त्यांच्या संपर्कात येण्याचा अजिबात विचार करू नका. पण जर त्यांनी (म्हणजे दासी स्त्रियांनी) विवाहबंधनात अडकल्यानंतर एखादे अनैतिक कृत्य केल्यास (दासी नसलेल्या) स्वतंत्र स्त्रियांसाठी जी शिक्षा निश्चित आहे, त्याची निम्मी शिक्षा यांना देण्यात यावी. (दासी मुलींशी) विवाह करण्याची (ही परवानगी) तुमच्यापैकी त्यांना आहे ज्यांना आपल्या हातून अनैतिक कृत्य घडू शकते, अशी भिती आहे. जर तुम्ही स्वत:वर संयम ठेवाल तर हे तुमच्यासाठी जास्त हितकारक आहे. अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे.

26 अल्लाह (या सर्व) गोष्टी तुमच्यासमोर स्पष्ट करू इच्छितो, तसेच तुमच्या आधी होऊन गेलेल्या त्या (सदाचारी) लोकांचा मार्ग तो तुम्हाला दाखवू इच्छितो आणि (अशाप्रकारे) तुमच्याकडे त्याच्या कृपेची दृष्टी वळवू इच्छितो. अल्लाहला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे आणि तसेच तो बुद्धिमानही आहे.
27 अल्लाह तुमच्यावर त्याच्या कृपेचा वर्षाव करू इच्छितो, पण जे लोक आपल्या इच्छा–आकांक्षांचे अंधानुकरण करीत आहेत, ते (तुमच्याबद्दल) अशी इच्छा बाळगून आहेत की, तुम्ही (दिशाहीन होऊन) सन्मार्गापासून दूर
निघून जावे. 28 अल्लाह तुमच्यावरचा भार हलका करू इच्छितो, कारण मनुष्य हा दुर्बल निर्माण करण्यात आलेला आहे.

29 इमान धारण केलेल्या लोकांनो! आपसात एकमेकांची संपत्ती अनुचित

रीतीने गिळंकृत करू नका. पण परस्पर संमतीने व्यापार करून तुम्ही (संपत्ती)
प्राप्त करू शकता. म्हणून आपसात एक–दुसऱ्याची हत्या करू नका. खरोखर
अल्लाह तुमच्च्यावर फार मेहेरबान आहे. 30 आणि जो कोणी दुष्ट हेतूने आणि
अन्यायी मार्गाने असे करील, आम्ही त्याला जरूर आगीत फेकून देऊ. (असे
करणे) अल्लाहसाठी फार सोपे आहे. 31 जर तुम्ही निषिद्ध ठरवण्यात आलेले
मोठमोठे गुन्हे करण्यापासून स्वत:ला दूर ठेवाल, तर आम्ही तुमच्या लहानसहान
चुका माफ करून टाकू आणि तुम्हाला सन्मानाची जागा देऊ. 32 ज्या गोष्टींत
अल्लाहने तुमच्यापैकी काही जणांना इतरांपेक्षा श्रेष्ठत्व दिलेले आहे, त्या गोष्टींची
तुम्ही अभिलाषा बाळगू नका. पुरुषांना मोबदला मिळेल त्यांच्या कृत्यांनुसार
आणि स्त्रियांना मोबदला मिळेल त्यांच्या कृत्यांनुसार. तर अल्लाहकडे त्याच्या
कृपेची याचना करा. खरोखर, अल्लाहला प्रत्येक गोष्टीचे परिपूर्ण ज्ञान आहे. 33
आईवडील आणि जवळचे नातेवाईक जे काही आपल्या मागे सोडून जातात,
त्या (संपत्ती)चे वारस आम्ही निश्चित केलेले आहेत. आणि ज्यांच्याशी तुम्ही
(प्रतिज्ञापूर्वक) करार केले आहेत, त्यांना त्यांचा वाटा द्या. (लक्षात असू द्या)
अल्लाह प्रत्येक गोष्टीवर नजर ठेवून आहे.

34 पुरुष स्त्रियांचे प्रतिपालक आहेत. कारण अल्लाहने एकाला दुसऱ्यावर
श्रेष्ठत्व प्रदान केले आहे. त्याचे (आणखीन) कारण (म्हणजे), पुरुष स्त्रियांवर
आपले धन खर्च करतात. तर ज्या सदाचारी स्त्रिया आहेत, (आपल्या पतीच्या)
आज्ञाधारक असतात आणि अल्लाहच्या देखरेखीत (म्हणजे अल्लाहची जाण
ठेवून) त्या (आपल्या पतींच्या) गुप्त गोष्टी सुरक्षित ठेवतात.

आणि तुम्हाला ज्या स्त्रियांकडून तुमचा विश्वासघात होण्याची शंका असेल,
त्यांना (प्रथम) ताकीद द्या, नंतर त्यांना बिछान्यात एकट्या सोडून द्या, (शेवटी)
त्यांना (सौम्यपणे) मारा. त्यानंतर जर त्या तुमच्या आज्ञांचे पालन करतील तर
त्यांच्याविरुद्ध पुढे कोणतीही कारवाई करू नका. (लक्षात ठेवा) अल्लाह हाच

सर्वोच्च व महान आहे. [35] विवाहित जोडप्यादरम्यान संबंध बिघडण्याची तुम्हाला भिती वाटत असेल तर पतीच्या नातेवाइकांमधून एक मध्यस्थ नियुक्त करा आणि पत्नीच्या नातेवाइकांमधून एक मध्यस्थ नियुक्त करा. त्या दोघांची समेट घडवून आणण्याची (मनापासून) इच्छा असेल तर अल्लाह त्यांच्यात समेट घडवून आणील. (लक्षात असू द्या) खरोखर! अल्लाहला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे, प्रत्येक गोष्टीची पूर्ण जाण आहे.

[36] (केवळ) अल्लाहची उपासना करा आणि इतर कोणालाही (कोणत्याही प्रकारे त्याच्या ईश्वरत्वात) त्याचा भागीदार बनवू नका आणि आपल्या आईवडलांशी चांगुलपणाने वागा, तसेच नातेवाइकांशी, अनाथांशी, गरिबांशी आणि नातेवाईक असलेल्या शेजाऱ्यांशी आणि नातेवाईक नसलेल्या शेजाऱ्यांशी व तुमच्या सोबत्यांशी, वाटसरूंशी (मुसाफिरांशी) आणि त्यांच्याशी जे (दास किंवा दासी म्हणून) तुमच्या ताब्यात आहेत. गर्विष्ठ आणि घमेंडी लोक अल्लाहला अजिबात प्रिय नाहीत.

[37] जे स्वत: कंजूष आहेत आणि इतरांनाही कंजूषपणाची प्रेरणा देतात. अल्लाहने जे काही आपल्या कृपेने त्यांना दिलेले आहे, ते (ती संपत्ती) लपवितात. म्हणूनच आम्ही (अशा) सत्य नाकारणाऱ्या लोकांसाठी अपमानकारक शिक्षा तयार करून ठेवली आहे.

[38] (अल्लाहला असे लोक प्रिय नाहीत), जे आपले धन दुसऱ्यांवर, केवळ दाखवण्यासाठी, खर्च करतात. (असेच लोक) ना अल्लाहवर विश्वास ठेवणारे आहेत, ना शेवटच्या दिवसावर. आणि ज्याचा सोबती सैतान बनला, त्याला किती वाईट सोबती प्राप्त झाला! [39] आणि ते जर अल्लाहवर आणि न्यायाच्या दिवसावर विश्वास ठेवणारे बनले असते, तसेच अल्लाहने जे काही दिले आहे त्यातून त्यांनी (अल्लाहच्या मार्गात) खर्च केला असता, तर त्यांचे काय नुकसान झाले असते? खरोखर अल्लाह त्यांना चांगले ओळखून आहे. [40] निश्चितच

अल्लाह कोणावरही तिळमात्र (देखील) अन्याय करीत नाही. आणि जर कोणतेही सत्कर्म करण्यात आले तर तो (त्या सत्कर्माचा) मोबदला कित्येक पटीने वाढवेल. आणि आपल्या कृपेने तो (सत्कृत्यांचा) फार मोठा मोबदला देईल.

41 (न्यायाच्या दिवशी गुन्हेगारांची) काय अवस्था होईल? जेव्हा आम्ही प्रत्येक जनसमूहामधून एक साक्षीदार घेऊन येऊ, आणि (पैगंबर!) तुम्हाला त्यांच्याविरुद्ध साक्षीदार बनवून उभे करू. 42 जे लोक सत्य नाकारण्यावर ठाम राहिले आणि ज्यांनी पैगंबराची अवज्ञा केली, तेच लोक त्या दिवशी इच्छा करतील की, पृथ्वीने आम्हाला गिळून घेतले असते, (तर किती बरे झाले असते). ते अल्लाहपासून कोणतीही गोष्ट लपवून ठेवू शकणार नाहीत. 43 श्रद्धेचा अंगीकार केलेल्या लोकांनो! नशेच्या अवस्थेत प्रार्थना करू नका.जोपर्यंत तुम्ही काय म्हणत आहात हे तुम्हाला कळत नाही. तसेच तेव्हाही नाही (जेव्हा तुम्ही) अस्वच्छ अवस्थेत असाल व जोपर्यंत तुम्ही स्नान करीत नाही. (असे करण्याला) अपवाद हा आहे की, तुम्ही प्रवासात आहात (आणि स्नान करण्यास असमर्थ आहात).

आणि जर तुम्ही आजारी असाल किंवा प्रवासात असाल किंवा तुमच्यापैकी कोणी शौच करून आला असेल किंवा तुम्ही स्त्रियांशी संगत केलेले असाल आणि तुम्हाला पाणी मिळत नसेल, तर स्वच्छ मातीला स्पर्श करून, आपले हात आपल्या चेहऱ्यांवर व हातांवर फिरवा. (आणि लक्षात असू द्या) की, खरोखर! अल्लाह अतिशय कनवाळू व अतिशय क्षमाशील आहे.

44 तुम्हाला त्या लोकांची जाणीव नाही का, ज्यांना (अल्लाहच्या) ग्रंथाचा एक भाग देण्यात आला होता? (पण आता) ते (सन्मार्गाच्या मोबदल्यात) मार्गभ्रष्टता खरेदी करत आहेत. तसेच तुम्ही देखील मार्गभ्रष्ट व्हावे, अशीच त्यांची इच्छा आहे. 45 अल्लाह तुमच्या शत्रूंना चांगले ओळखून आहे. आणि (तुमच्यासाठी) अल्लाहसारखा मित्र दुसरा कोणी असू शकत नाही. आणि

अल्लाहसारखी मदत कोणीही करू शकत नाही. 46 ज्यू लोकांमध्ये काही जण असे आहेत, जे (अल्लाहकडून प्रकट झालेल्या) शब्दांना (त्यांचे संदर्भ सोडून काहीतरी) विकृत अर्थ देतात आणि म्हणतात, 'आम्ही ऐकले आहे, पण आम्ही मानणार नाही.' किंवा 'ऐकण्याचे नाटक करा पण ऐकू नका.' आणि म्हणतात (हे मुहम्मद!) आमचे म्हणणे लक्षपूर्वक ऐका. अशा प्रकारे (ते) आपल्या जिभेने शब्दांचे खेळ खेळत आहेत. (यामागे त्यांचा उद्देश) सत्य धर्माला खोटे दर्शविण्याचा आहे. पण जर त्यांनी असे म्हटले असते, 'आम्ही ऐकले आहे आणि आम्ही आज्ञापालन करणार' आणि 'आमचे म्हणणे ऐका व आमच्याकडे (जरा) लक्ष द्या,' तर ते त्यांच्या स्वत:साठी चांगले व उचित ठरले असते. परंतु सत्य स्वीकारण्यास नकार दिल्यामुळे, अल्लाहने त्यांचा धिक्कार केला आहे. आणि म्हणून त्यांच्यापैकी अतिशय थोड्या लोकांशिवाय, (इतर सर्व) श्रद्धेचा अंगीकार करणार नाहीत.

47 (पूर्वी) ग्रंथ देण्यात आलेल्या लोकांनो! (आता) जो ग्रंथ आम्ही (तुमच्याकडे) पाठविला आहे त्यावर विश्वास ठेवा, (हा ग्रंथ) तुमच्याकडे आधीच्या ग्रंथांपैकी (जे सत्य आहे) त्याला प्रमाणित करतो. तर तुम्ही याला मानणारे बना, यापूर्वी की, आम्ही तुमचे चेहरे विद्रूप करून टाकू आणि अपमानित करून (तुमचा) तसा शेवट करू, जसा 'सबत'चा नियम मोडणाऱ्या लोकांचा आम्ही केला होता. आणि अल्लाहचा आदेश नेहमी अमलात आणण्यासाठीच असतो.

48 निश्चितच अल्लाह अशा गोष्टीला अजिबात क्षमा करणार नाही की, अन्य कोणालाही त्याच्या बरोबरीचे स्थान दिले जावे. पण याला सोडून जी काही (इतर वाईट कृत्ये) आहेत, तो ज्याच्याबाबतीत इच्छील, त्यास क्षमा करील. आणि ज्याने अल्लाहचा समकक्ष ठरविला, त्याने खरोखर भयंकर मोठा गुन्हा केला. 49 तुम्ही त्या लोकांना पाहिले नाही का, जे स्वत:ला (फार) पवित्र

समजतात. (परंतु तसे) नाही, तर अल्लाह ज्याच्या बाबतीत इच्छितो त्यास पवित्र करतो आणि कोणावरही जरासुद्धा अन्याय केला जाणार नाही. 50 पाहा, ते अल्लाहविषयी कशा खोट्या गोष्टी रचित आहेत! आणि यापेक्षा उघड (व मोठे) पाप दुसरे कोणते असू शकते?

51 तुम्हाला त्या लोकांची अवस्था माहीत नाही का, ज्यांना ग्रंथाचा काही भाग देण्यात आला होता? (पण आता) ते निराधार गोष्टींवर आणि वाईट शक्तींवर विश्वास ठेवतात आणि ते सत्य नाकारणाऱ्या श्रद्धाहीनांविषयी म्हणतात की, ते या श्रद्धावंतांपेक्षा अधिक सन्मार्गावर आहेत. 52 हेच ते लोक आहेत ज्यांना अल्लाहने धिक्कारले आहे. ज्याचा अल्लाह धिक्कार करतो, त्याचा कोणीही साहाय्यकर्ता असू शकत नाही. 53 अल्लाहच्या सत्तेत यांचा काही वाटा आहे का? असे असते तर त्यांनी लोकांना तिळमात्रसुद्धा काही दिले नसते. 54 मग ते अल्लाहने आपल्या कृपेने लोकांना जे काही दिले आहे, त्याबद्दल त्यांचा हेवा करतात की काय? जर ही गोष्ट असेल तर (त्यांना हे कळायला हवे की, या आधी) आम्ही इब्राहीमच्या कुटुंबीयांना ग्रंथ आणि विवेक देऊन भूषविले होते, तसेच मोठे राज्य ही प्रदान केले होते. 55 आणि त्यांच्यापैकी काहींनी त्याच्यावर (दृढ) विश्वास ठेवला, तर काही त्याच्यापासून दूर गेले. (त्या दूर गेलेल्या लोकांसाठी) नरकाची धगधगती आग पुरेशी आहे. 56 जे लोक आमच्या खुणांद्वारे स्पष्ट होणारे संदेश नाकारण्यासाठी आग्रही राहिले, त्यांना आम्ही (भयानक) अग्नीमध्ये प्रवेश करायला लावू. जेव्हा त्यांची त्वचा जळून जाईल, तेव्हा (पुन्हा पुन्हा) आम्ही त्यांना दुसरी नवीन त्वचा बदलून देऊ, हे यासाठी की, (सातत्यपूर्वक) त्यांनी शिक्षेची चव चाखत राहावी. निश्चितच अल्लाह सर्वशक्तिमान आहे, बुद्धिमान आहे. 57 आणि ज्यांनी श्रद्धेचा अंगीकार करून सत्कृत्ये केली, त्यांना आम्ही अशा बागांत प्रवेश देऊ ज्यात पाण्याचे प्रवाह वाहत असतील, (आणि) ते कायम तेथेच निवास करतील. तेथे त्यांना सुशील

जीवनसाथी प्राप्त होतील आणि आम्ही त्यांना रम्य व विपुल छायेच्या ठिकाणी ठेवू.

58 अल्लाह तुम्हाला असा आदेश देत आहे की, तुमच्याकडे ठेवण्यात आलेली अनामत त्यांच्या हक्कदारांना (व्यवस्थितपणे) परत करा. आणि जेव्हा तुम्ही लोकांदरम्यान (त्यांच्या आपसातील बाबींवर) निर्णय कराल, तर न्यायपूर्वक निर्णय करा. अल्लाह तुम्हाला सर्वोत्तम उपदेश देत असतो. अल्लाह सर्व काही ऐकणारा आणि सर्व काही पाहणारा आहे. 59 श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! अल्लाहच्या आज्ञेचे पालन करा आणि त्याच्या पैगंबराच्या आज्ञेचे पालन करा आणि त्यांच्याही आज्ञेचे पालन करा, जे तुमच्यामध्ये अधिकारपदावर आहेत. आणि जर कोणत्याही गोष्टीबद्दल तुमचे आपसात मतभेद झाल्यास ती गोष्ट (निर्णयासाठी) अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर सोपवा. (असे करा) जर तुम्ही (खऱ्या अर्थाने) अल्लाहवर आणि अंतिम दिवसावर विश्वास ठेवणारे असाल. हीच गोष्ट (तुमच्यासाठी) सर्वश्रेष्ठ आहे आणि तिचा शेवटही सर्वोत्तम आहे. 60 तुम्हाला त्या लोकांची जाणीव नाही का जे (एकीकडे खोटे) दावे करून सांगतात की, तुमच्यावर जे प्रकट करण्यात आले आणि तुमच्या आधी(च्या पैगंबरांकडेही) जे प्रकट करण्यात आले, आम्ही त्या सर्वांवर विश्वास ठेवणारे आहोत. (तर दुसरीकडे) हेच लोक दुष्ट लोकांकडून (म्हणजे सैतानाच्या अनुयायांकडून आपसातील) विवादांसंबंधाने निर्णय करून घेऊ इच्छितात, जेव्हा की, त्यांना (त्या विद्रोही) लोकांची आज्ञा न पाळण्याचा (अल्लाहकडून) आदेश देण्यात आला होता. आणि सैतानाची तर अशी इच्छा आहे की, त्यांना सन्मार्गापासून खूप दूर घेऊन जावे. 61 आणि जेव्हा त्यांना असे सांगण्यात येते की, त्याच्याकडे या, जे अल्लाहने अवतरित केले आहे, आणि या त्याच्या पैगंबराकडे, तेव्हा तुम्ही पाहता की, हे ढोंगी लोक तिटकाऱ्याने तुमच्याकडे पाठ फिरवतात. 62 पण तेव्हा त्यांचे काय होईल, जेव्हा त्यांच्यावर त्यांच्या

हातांच्या कमाईमुळे आलेली आपत्ती कोसळेल? त्यावेळी ते तुमच्याकडे येऊन
अल्लाहच्या शपथा घेऊन सांगतील की, आम्ही तर केवळ भले इच्छित होतो,
आणि सलोखा निर्माण करण्याव्यतिरिक्त, आमचा दुसरा कोणताही उद्देश नव्हता.
63 त्यांच्या मनात जे आहे ते सर्व अल्लाहला चांगले ठाऊक आहे. तर तुम्ही
त्यांच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करा, आणि त्यांना समजावून सांगा. आणि त्यांना
अशा पद्धतीने उपदेश द्या की, ते त्यांच्या हृदयात प्रवेश करेल.

64 आम्ही प्रत्येक पैगंबराला याच उद्देशासह पाठविले की, अल्लाहच्या
आदेशाने त्याच्या आज्ञेचे पालन केले जावे. आणि जेव्हा त्यांनी (वाईट कृत्य
करून) स्वत:वर अन्याय केला, तेव्हा जर ते तुमच्याकडे आले असते आणि
त्यांनी अल्लाहकडे क्षमाया चना केली असती, आणि पैगंबरानेही त्यांच्यासाठी
क्षमायाचना केली असती, तर त्यांना नक्कीच असे आढळले असते की, अल्लाह
तर अतिशय माफ करणारा व फार दयाळू आहे. 65 पण नाही, (पैगंबर!)
तुमच्या पालनकर्त्याची शपथ, ते तोपर्यंत (खरे) श्रद्धावंत बनू शकत नाहीत,
जोपर्यंत ते आपसातील सर्व विवादांसंबंधाने तुम्हाला निर्णय करणारा बनवीत
नाहीत. मग जो निर्णय तुम्ही कराल त्याबद्दल त्यांच्या मनात कसलीही शंका
निर्माण होता कामा नये आणि (त्यांनी) तुमचा निर्णय मनापासून स्वीकारायला
हवा. 66 आम्ही जर त्यांना आदेश दिला असता, 'आपल्या प्राणांची आहुती द्या
आणि आपल्या घरांचा त्याग करा' तर त्यांच्यातील फार थोडे लोक वगळता,
इतर (सर्वांनी) तसे केले नसते. जर त्यांनी ते केले असते, ज्याची त्यांना
ताकीद दिली जाते, तर खरोखर ते त्यांच्या स्वत:च्याच हिताचे ठरले असते.
आणि (त्यांच्या श्रद्धेला) त्यापासून अधिक बळकटी प्राप्त झाली असती. 67
तसेच तेव्हा आम्ही त्यांना आमच्याकडून फार मोठे बक्षीस दिले असते. 68
तसेच निश्चितच त्यांना सरळ मार्ग दाखवला असता. 69 जो कोणी अल्लाह
आणि त्याच्या पैगंबराच्या आज्ञेचे पालन करेल, तो त्या लोकांसोबत असेल,

ज्यांच्यावर अल्लाहने आपल्या कृपेचा वर्षाव केला आहे, म्हणजेच पैगंबर आणि ते लोक जे सत्यावर अढळपणे कायम राहिले आणि ते, ज्यांनी आपले जीवन सत्याची साक्ष देण्यासाठी वाहून टाकले आणि सदाचारी लोक. किती उत्तम सोबती आहेत हे! 70 ही आहे अल्लाहची कृपा, आणि अल्लाहला जे ज्ञान आहे, ते कोणालाच नाही.

71 इमान धारण केलेल्या लोकांनो! (स्वत:च्या बचावात) धोक्याच्या विरुद्ध पूर्णपणे सज्ज राहा. मग जसा प्रसंग असेल, तसे वेगवेगळ्या तुकड्यांच्या स्वरूपात किंवा एकत्र निघा. 72 (लक्षात असू द्या) तुमच्यात कोणी असाही आहे, जो मागे रेंगाळत राहील, आणि जर तुमच्यावर एखादे संकट कोसळले तर तो म्हणेल, 'ही अल्लाहची माझ्यावर कृपा आहे की, मी त्यांच्याबरोबर नव्हतो.' 73 आणि तुमच्यावर अल्लाहची कृपा झाल्यास, तो नक्की असे म्हणेल की, जणू तुमच्या आणि त्याच्या दरम्यान कसलाच स्नेहभाव नव्हता, 'मी देखील त्यांच्याबरोबर असतो, तर (त्यांच्याप्रमाणेच) मलाही मोठे यश प्राप्त झाले असते.' 74 तर त्या लोकांनी अल्लाहच्या कार्यासाठी लढायला पाहिजे, जे मृत्यूनंतरच्या (चिरस्थायी) जीवनातील यशासाठी सध्याच्या या जगातील जीवनाला वाहून टाकतात. आणि जो अल्लाहच्या कार्यासाठी लढेल आणि वीरगती प्राप्त करेल किंवा विजय प्राप्त करेल, तर त्यास आम्ही फार मोठे बक्षीस देऊ 75 तुम्हाला काय झाले आहे की, तुम्ही लढणार नाही अल्लाहच्या कार्यासाठी तसेच दुर्बल पुरुष, स्त्रिया व मुले यांच्यासाठी जे याचना करीत आहेत की, हे प्रभू! आम्हाला या वस्तीतून बाहेर काढ, ज्यामध्ये राहणारे अत्याचारी आहेत. आणि तुझ्या कृपेने कोणालातरी आमचा रक्षणकर्ता बनव, तसेच तुझ्या कृपेने एक साहाय्यकर्ताही आम्हाला उपलब्ध करवून दे. 76 जे श्रद्धावंत आहेत, ते अल्लाहच्या कार्यासाठी लढतात आणि जे सत्य नाकारणारे श्रद्धाहीन आहेत, ते सैतानाच्या कार्यासाठी लढतात. तर तुम्ही सैतानाच्या मित्रांशी लढा. आणि सैतानाचे डावपेच

खरोखर कमजोर आहेत.

77 तुम्हाला त्या लोकांची जाणीव नाही का, ज्यांना असे सांगण्यात आले होते की, आपल्या हातांवर नियंत्रण ठेवा आणि नमाज़रूपी नियमित प्रार्थना करणारे बना आणि ज़कात द्या? आणि जेव्हा (अल्लाहच्या कार्यासाठी) लढण्याचा त्यांना आदेश दिला गेला, तेव्हा त्यांच्यापैकी एक गट ज्याप्रमाणे अल्लाहचे भय बाळगायला हवे त्याप्रमाणे किंवा त्यापेक्षाही अधिक, माणसांना भिऊ लागला. ते म्हणू लागले, ' हे आमच्या पालनकर्त्या! तू आम्हाला लढाई करण्याचा आदेश का दिलास, तू आणखी काही काळासाठी युद्धाला पुढे ढकलले असते, (तर किती बरे झाले असते)!' तुम्ही त्यांना सांगून टाका, 'या जगातील फायदा फार थोडा आहे आणि मृत्यूनंतरचे जीवन अधिक चांगले आहे, (पण) त्यांच्यासाठी, जे अल्लाहचे भय बाळगून (जीवन व्यतीत करतात). आणि तुमच्यावर जरासुद्धा अन्याय केला जाणार नाही. 78 आणि तुम्ही जिथे कुठे असाल (तुमची ठरलेली वेळ आल्यावर), मृत्यू तुम्हाला गाठेल, मग तुम्ही मजबूत बांधलेल्या (मोठ-मोठ्या) वाड्यात का असेना.' आणि जेव्हा त्यांचा फायदा होतो, तेव्हा ते म्हणतात, 'हे अल्लाहकडून आहे.' आणि त्यांच्यावर एखादी आपत्ती आली तर ते म्हणतात, 'ही आपत्ती तुमच्यामुळे आहे.' (पैगंबर!) तुम्ही त्यांना सांगा, 'सर्व काही अल्लाहकडूनच आहे.' या लोकांना झाले आहे तरी काय? की, कोणतीच गोष्ट यांच्या लक्षात येत नाही. 79 तुमचे जे काही चांगले होत असते, ते अल्लाहकडून आहे आणि तुमच्यावर जी काही विपत्ती येत असते, ती तुमच्या स्वत:मुळेच येत असते.

(पैगंबर!) आम्ही तुम्हाला (समस्त) मानवजातीसाठी संदेशवाहक बनवून पाठविले आहे. यासाठी अल्लाह (स्वत:) साक्षी आहे.

80 जो कोणी पैगंबराच्या आज्ञेचे पालन करतो, तो (निश्चितच) अल्लाहच्या आज्ञेचे पालन करतो. आणि जो कोणी त्याकडे पाठ फिरवील, तर (पैगंबर!)

आम्ही तुम्हाला त्यांच्यावर पहारेकरी बनवून पाठविलेले नाही. 81 आणि ते म्हणतात, 'आम्ही तुमच्या आज्ञेचे पालन करणारच.' पण जेव्हा ते तुमच्यापासून दूर जातात, तेव्हा त्यांच्यापैकी एक गट रात्रीच्या वेळेस तुम्ही जे काही सांगता, त्याच्याविरुद्ध योजना आखतात. ते ज्या योजना आखीत आहेत त्यांची अल्लाह नोंद करीत आहे. तर तुम्ही त्यांच्याकडे दुर्लक्ष करा आणि अल्लाहवर (दृढ) विश्वास ठेवा. ज्याच्यावर विश्वास केला जावा असा अल्लाहसारखा दुसरा कोणीच नाही.

82 ते कुराणावर (गंभीरतापूर्वक) विचार करीत नाहीत का? जर हे कुराण अल्लाहशिवाय अन्य कोणाकडून आलेले असते, तर त्यांना निश्चितच यामध्ये अनेक विसंगत गोष्टी आढळून आल्या असत्या.

83 आणि जेव्हा त्यांच्याकडे शांतीची किंवा भयाची कोणतीही बातमी येते, तेव्हा ते ती सर्वत्र पसरवितात. पण जर त्यांनी ती बातमी पैगंबराकडे आणि त्यांच्यामधील जे लोक अधिकारपदावर आहेत, त्यांच्याकडे पोचविली असती, तर त्यांच्यापैकी जे गुप्तचर यंत्रणेशी संबंधित लोक आहेत, त्यांनी त्या बातमीचे सत्य जाणून घेतले असते. जर तुमच्यावर अल्लाहची कृपा आणि दया नसती, तर (फार) थोड्या लोकांव्यतिरिक्त इतर सर्व, सैतानाचे अनुसरण करणारे बनले असते.

84 तर तुम्ही अल्लाहच्या कार्यासाठी लढा, तुम्ही केवळ स्वत:च्या बाबतीत जबाबदार आहात, (मृत्यूच्या भयाला मात देण्याची) श्रद्धावंतांना प्रेरणा द्या. आणि अल्लाह सत्य नाकारणाऱ्या श्रद्धाहीनांच्या (हिंसेचा) जोर मोडून काढेल यात नवल नाही, कारण अल्लाह शक्तीच्या बाबतीत अधिक बलवान आहे आणि शिक्षा करण्याच्या बाबतीतही अधिक कठोर आहे. 85 जो कोणी चांगल्या कार्यासाठी शिफारस करील, त्याचा त्या कार्याच्या (चांगल्या) परिणामांमध्ये वाटा असेल आणि जो कोणी वाईट कार्यासाठी शिफारस करील, त्याचा त्या

कार्याच्या (वाईट) परिणामांमध्ये वाटा असेल. आणि अल्लाहच्या शक्तीच्या अधीन आहे प्रत्येक गोष्ट. 86 आणि जेव्हा कोणी तुम्हाला शुभचिंतनासह अभिवादन करेल तर तुम्हीही त्याला त्यापेक्षा अधिक किंवा तसेच शुभचिंतनाचे बोल बोलून अभिवादन करा. निश्चितच अल्लाह हिशेब घेण्यासाठी प्रत्येक गोष्टीची नोंद ठेवीत आहे. 87 अल्लाहच उपासनेयोग्य आहे, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच उपासनेयोग्य नाही. तो निश्चितच पुनरुत्थानाच्या दिवशी तुम्हां सर्वांना एकत्र आणेल, ज्याच्या येण्यामध्ये मुळीच शंका नाही. आणि अल्लाहच्या शब्दापेक्षा अधिक सत्य कोणाचा शब्द असू शकतो?

88 तुम्हाला झाले तरी काय की, तुम्ही (त्या) दांभिक लोकांच्या बाबतीत दोन गटात विभागले जात आहात, जेव्हा की, स्वत: अल्लाहने त्यांना त्यांच्या दुष्कृत्यांमुळे (अश्रद्धेकडे) फेकून दिले आहे. तुम्ही अशांना सन्मार्गावर आणू इच्छिता का, ज्यांना (स्वत:) अल्लाहने मार्गभ्रष्ट होण्यासाठी सोडून दिले आहे? (नाही), तुम्ही अशांना कदापि सन्मार्ग दाखवू शकत नाही ज्यांना (स्वत:) अल्लाहने मार्गभ्रष्ट केले आहे. 89 त्यांची तर अशी इच्छा आहे की, त्यांनी ज्याप्रमाणे सत्याचा अस्वीकार केला, तुम्हीही तसे करावे, म्हणजे तुम्ही सर्व सारखे होऊन जावे. तर तुम्ही त्यांच्यापैकी कोणाशीही कसल्याही प्रकारचे मैत्रीचे संबंध अजिबात ठेवू नका, जोपर्यंत ते अल्लाहसाठी आपल्या घरादाराचा त्याग करीत नाहीत, आणि जर त्यांनी याकडे पाठ फिरवली, तर त्यांना पकडा आणि जिथे ते सापडतील, तिथे त्यांना ठार करा आणि त्यांच्यापैकी कोणालाही आपला मित्र व मदतनीस बनवू नका.

90 ह्या आदेशाला अपवाद म्हणजे ते लोक आहेत, ज्यांचा संबंध त्या लोकांशी आहे, ज्यांच्याशी तुमचा करार झालेला आहे. आणि ते लोकही (अपवाद आहेत), जे तुमच्याकडे अशा अवस्थेत येतात की, तुमच्याशी किंवा (श्रद्धावंतांपैकी) आपल्याच लोकांशी युद्ध करण्याच्या (विचाराने) त्यांच्या

हृदयांना वेदना होतात. पण जर अल्लाहने इच्छिले असते, तर त्याने त्यांना तुमच्यावर प्रभुत्व दिले असते, तेव्हा ते अवश्य तुमच्याशी लढले असते. मग जर ते तुमच्यापासून दूर राहतील आणि तुमच्याशी युद्ध करणार नसतील, आणि शांततेचे धोरण अवलंबतील तर अल्लाह तुम्हालाही त्यांच्याविरुद्ध आक्रमक भूमिका घेण्याची परवानगी देत नाही. 91 तुम्हाला इतर काही असेही लोक आढळतील जे तुमच्यापासून आणि आपल्या लोकांपासून (स्वत:ला) सुरक्षित ठेवू इच्छितात. पण जेव्हाही त्यांना उपद्रव माजविण्याची संधी प्राप्त होते, तर ते त्या संधीला अजिबात गमावीत नाहीत. जर ते तुमच्यापासून दूर राहणार नसतील, आणि तुमच्याशी शांतीचे धोरण अवलंबिणार नसतील आणि आपले हात (युद्धापासून) आवरते घेणार नसतील तर तुम्ही त्यांना पकडा आणि ते जेथे सापडतील तेथे त्यांना ठार करा. हे ते लोक आहेत, ज्यांच्याविरुद्ध लढण्याचा आम्ही तुम्हाला पूर्ण अधिकार दिलेला आहे.

92 एक श्रद्धावंत दुसऱ्या श्रद्धावंताला ठार करू शकतो, हे कल्पना करण्याजोगेही नाही, पण चुकीने असे घडल्यास प्रश्न वेगळा आहे. आणि जी व्यक्ती एखाद्या श्रद्धावंताची चुकीने हत्या करून बसेल, तर त्याने (प्रायश्चित्त म्हणून) एका श्रद्धावंत दासाची मुक्तता करावी आणि ठार झालेल्या व्यक्तीच्या नातेवाइकांना नुकसान भरपाईपोटी एक रक्कम अदा करावी, पण त्याचे नातेवाईक (ती रक्कम) सोडून देत असतील तर ती गोष्ट वेगळी आहे. तो ठार झालेला श्रद्धावंत जर त्या लोकांशी संबंधित असेल जे तुमच्याशी युद्ध करणारे शत्रू आहेत, तर (ठार मारणाऱ्या व्यक्तीचे प्रायश्चित्त फक्त हे असेल की), त्याने एका श्रद्धावंत दासाला गुलामीतून मुक्त करावे. आणि जर तो (ठार झालेला श्रद्धावंत), अशा लोकांशी संबंधित असेल, ज्यांच्याशी तुमचा (शांती) करार झालेला आहे, तर ठार केलेल्या व्यक्तीने, ठार झालेल्या व्यक्तीच्या नातेवाइकांना,

नुकसान भरपाईपोटी एक रक्कम अदा करावी आणि सोबत एका श्रद्धावंत दासाला गुलामीतून मुक्त करावे. आणि जो हे करण्यास समर्थ नसेल तर त्याने दोन महिने निरंतर उपवास करावा. हा अल्लाहने ठरवलेला क्षमेचा मार्ग आहे. अल्लाह सर्व काही जाणणारा व बुद्धिमान आहे. 93 आणि जो कोणी श्रद्धावंताची जाणूनबुजून हत्या करील, तर त्याची शिक्षा फक्त नरक (आणि नरकच) आहे. जिथे तो कायम निवास करील. आणि त्याच्यावर अल्लाहची अवकृपा आणि धिक्कार असेल आणि अल्लाहने त्याच्यासाठी फार मोठी शिक्षा तयार ठेवली आहे.

94 इमान धारण केलेल्या लोकांनो! जेव्हा तुम्ही अल्लाहच्या कार्यासाठी निघाल तेव्हा योग्यप्रकारे (शत्रूंच्या कारवाया संबंधाने) तपास करून घ्या आणि जो कोणी शुभेच्छा व्यक्त करण्यासाठी तुम्हाला सलाम (प्रणाम) करील, त्यास 'तू श्रद्धावंत नाहीस' असे म्हणू नका.

तुम्हाला याच जीवनातील क्षणिक सुखांची फार लालसा आहे, पण अल्लाहकडे (शाश्वत स्वरूपाच्या) सुखदायी गोष्टी विपुल प्रमाणात आहेत. या आधी तुम्ही देखील असेच होता. परंतु अल्लाहने तुमच्यावर त्याची (विशेष) कृपा केली, तर तपास करण्याच्या बाबतीत दक्ष राहा. जे काही तुम्ही करीत असता त्याची अल्लाहला नेहमी जाणीव असते. 95 कोणतेही (विशेष) कारण नसताना घरी बसून राहणारे श्रद्धावंत आणि ते श्रद्धावंत जे आपले धन आणि प्राण पणाला लावून अल्लाहच्या मार्गात संघर्ष करतात, दोघे कदापि समान होऊ शकत नाहीत. अल्लाहने आपले धन व प्राण पणाला लावून (अल्लाहच्या कार्यासाठी) संघर्ष करणाऱ्या लोकांना, त्या लोकांवर श्रेष्ठ दर्जा प्रदान केलेला आहे. जे बसून राहणारे आहेत. अल्लाहने सर्व (श्रद्धावंतांशी) चांगला मोबदला देण्याचा वायदा केला आहे. पण त्यांचा मोबदला फार मोठा आहे, जे त्याच्या कार्यासाठी संघर्ष करीत असतात. 96 त्यांच्यासाठी अल्लाहकडून सन्मानाचे मोठमोठे स्थान आहेत, त्याच्याकडून क्षमा व कृपा (त्यांना प्राप्त होईल). अल्लाह फार माफ

करणारा व दयाळू आहे.

97 त्या लोकांनी (वाईट कृत्य करून) स्वत:वर अन्याय केला आहे, (प्राण काढणारे अल्लाहचे) दूत जेव्हा त्यांचे प्राण काढतील, तेव्हा ते दूत त्यांना विचारतील, 'तुम्ही (असे दुष्कृत्य) का करीत होता?' ते उत्तर देतील, 'आम्ही देशात असहाय अवस्थेत होतो.' ते विचारतील, 'अल्लाहची पृथ्वी इतकी विशाल नव्हती का की, तुम्ही स्थलांतर करून दुसरीकडे जाऊ शकला असतात?' हेच ते लोक आहेत (मृत्यूनंतरच्या जीवनात) ज्यांचे निवासस्थान नरक आहे, खरोखर किती वाईट ठिकाण आहे ते! 98 पण असहाय पुरुष, स्त्रिया आणि (लहान) मुले जे स्थलांतराची योजना आखण्यास असमर्थ आहेत, त्यासाठी त्यांना कोणताच मार्ग आणि साधन सापडत नाही. 99 अल्लाह अशा लोकांच्या (अपराधांना) क्षमा करू शकतो, कारण अल्लाह फार माफ करणारा आणि क्षमाशील आहे. 100 आणि जो कोणी अल्लाहसाठी आपल्या घरादाराचा त्याग करील, त्याला पृथ्वीवर आश्रयासाठी अनेक ठिकाण आणि विपुल प्रमाणात जीवनसामग्री आढळेल. आणि जो कोणी अल्लाह व त्याच्या पैगंबराच्या कार्यासाठी (मिशनसाठी) आपले घर त्याग करेल आणि जर त्याला (अल्लाहच्या मार्गात) मृत्यू येईल तर त्याचा मोबदला अल्लाहकडे तयार आहे. आणि अल्लाह खरोखर फार माफ करणारा आणि दयाळू आहे.

101 (श्रद्धावंतांनो!) जेव्हा तुम्ही देशात प्रवास करीत असाल, तेव्हा नमाज़ाची मात्रा कमी केल्यास, तुम्हाला कोणतेही पाप लागणार नाही, जेव्हा तुम्हाला अशी शंका सतावीत असेल की, श्रद्धाहीन लोक अचानकपणे (येऊन नमाज़ादरम्यान) तुमच्यावर हल्ला करू शकतात. खरोखर, सत्याचा अस्वीकार करणारे ते श्रद्धाहीन लोक तुमचे उघड शत्रू आहेत. 102 (पैगंबर!) जेव्हा तुम्ही श्रद्धावंतांबरोबर असाल आणि सामूहिक प्रार्थनेचे (नमाज़ाचे) नेतृत्व करीत असाल, तेव्हा त्यांच्यापैकी (काही लोकांच्या) एका गटाला (नमाज़ासाठी)

तुमच्याबरोबर उभे राहू द्या, त्यांनी आपआपली शस्त्रे जवळ ठेवायला हवी, मग त्यांनी (नमाज़मध्ये) नतमस्तक होण्याची (विधी म्हणजे सजदा) पूर्ण करून मागच्या बाजूस जावे, (आणि संरक्षणार्थ) उभे राहावे. मग दुसऱ्या गटाने, ज्याने नमाज़ अदा केली नाही, पुढे यावे आणि तुमच्यासोबत नमाज़ अदा करावी. आणि त्यांनी कुठल्याही धोक्याच्या विरुद्ध सावध राहावे आणि आपआपली शस्त्रे जवळ बाळगावीत. (कारण) सत्य नाकारणारे (ते) श्रद्धाहीन लोक इच्छितात की, तुम्ही तुमच्या शस्त्रांकडे व (इतर) सामग्री याकडे (काही कारणामुळे) दुर्लक्ष करावे. म्हणजे त्यांना अचानकपणे तुमच्यावर आक्रमण करता यावे. पण पावसामुळे तुम्ही अडचणीत आला असाल किंवा आजारी झाले असाल, तर नमाज़ाच्या वेळेस तुम्ही तुमचे शस्त्र बाजूला काढून ठेवल्यास (ते) चुकीचे ठरणार नाही. तथापि तुम्ही (कोणत्याही) धोक्यापासून बचाव करण्यासाठी (नेहमी) सावध राहा. निश्चितच अल्लाहने सत्याचा अस्वीकार करणाऱ्या श्रद्धाहीनांसाठी अपमानास्पद शिक्षा तयार ठेवलेली आहे. [103] आणि तुमची नमाज़ पूर्ण झाल्यानंतर अल्लाहचे स्मरण करा. उठता, बसता आणि पहुडले असता. आणि जेव्हा तुम्हाला (सर्व काही) सुरक्षित वाटेल, तेव्हा (पूर्णपणे) विधिवत नमाज़ अदा करा. निश्चितपणे, नमाज़ ठरवून दिलेल्या वेळेस अदा करणे, हे श्रद्धावंतांचे अनिवार्य कर्तव्य आहे. [104] आणि शत्रूचा पाठलाग करताना दुबळेपणा दाखवू नका. जर तुम्हाला काही त्रास सहन करावा लागत असेल, तर ते (शत्रू)ही तसाच त्रास सहन करीत आहेत. पण (तुमच्यासाठी जमेची बाजू म्हणजे) तुम्ही अल्लाहकडून ज्या अपेक्षा ठेवता, त्या अपेक्षा ते ठेवू शकत नाहीत. अल्लाह सर्व काही जाणणारा व बुद्धिमान आहे.

[105] निश्चितच आम्ही हा ग्रंथ तुमच्यासमोर 'सत्य' प्रस्तुत करण्यासाठी पाठविला आहे, यासाठी की, तुम्ही अल्लाहने तुम्हाला जे शिकवले आहे, त्याच्यानुसार लोकांसाठी निर्णय करावा. आणि तुम्ही विश्वासघात करणाऱ्या

लोकांचे समर्थक बनू नका. [106] आणि अल्लाहकडे क्षमायाचना करा. अल्लाह, खरोखर अतिशय क्षमाशील आणि दयाळू आहे. [107] आणि जे स्वत:शीच अप्रामाणिक आहेत, तुम्ही अशा लोकांची बाजू मांडू नका. अल्लाहला विश्वासघात करणारे आणि दुराचारी लोक अजिबात आवडत नाहीत. [108] त्यांना आपण (आपल्या कुकृत्यांसंबंधाने) लोकांसमोर लज्जित होत असल्याचा विचार सतावतो, पण त्यांना आपण अल्लाहसमोर लज्जित होत असल्याचा विचार सतावत नाही, जो त्यांच्यासोबत (नेहमी) असतो. आणि ते रात्रीच्या अंधारात अशा गोष्टींविषयी परामर्श करतात, ज्याला अल्लाहची मान्यता नाही. आणि जे काही ते करीत आहेत, अल्लाहने ते वेढलेले आहे.

[109] (हे जाणून असा की), तुम्ही या जगातील जीवनात त्यांचा पक्ष घेऊन वाद घालू शकता, पण पुनरुत्थानाच्या दिवशी त्यांचा पक्ष घेऊन अल्लाहशी झगडा करू शकतो असा कोण आहे? आणि (अल्लाहपासून) कोण त्यांचा बचाव करू शकतो? [110] जो कोणी दुष्कृत्य करील किंवा स्वत:वरच अन्याय करून बसेल, पण नंतर जर तो अल्लाहकडे क्षमायाचना करील, तर त्यास अल्लाह (निश्चितच) फार क्षमा करणारा आणि दयाळू असल्याचे आढळून येईल. [111] आणि जो कोणी दुष्कृत्य करतो, स्वत:च्याच विरुद्ध करतो. अल्लाह, खरोखर प्रत्येक गोष्ट जाणणारा व बुद्धिमान आहे. [112] आणि जो कोणी स्वत: अपराध किंवा पाप करून, त्याचा दोष दुसऱ्याच्या माथी मारेल, तर तो निश्चितच खोटे आरोप आणि फार मोठ्या पापाचे ओझे आपल्या डोक्यावर घेईल. [113] जर तुमच्यावर अल्लाहची कृपा आणि दया नसती, तर त्यांच्यापैकी एका गटाने तुम्हाला मार्गभ्रष्ट करण्याचा निश्चितपणे प्रयत्न केला असता कारण त्यांनी तसा संकल्प केलेला होता, पण ते दुसऱ्या कोणाला नव्हे तर स्वत:लाच मार्गभ्रष्ट करीत आहेत. आणि ते तुमचे कोणतेही नुकसान करू शकत नाहीत. अल्लाहने तुमच्याकडे हा ग्रंथ आणि ज्ञान पाठवले आहे आणि तुम्हाला विवेकशक्ती

प्रदान केली आहे, तसेच तुम्हाला ते (सर्व) शिकवले, जे तुम्हाला माहीत नव्हते. आणि खरोखरच ही अल्लाहची तुमच्यावर फार मोठी कृपा आहे.

114 ज्या गुप्त चर्चा ते करीत आहेत, त्यांपैकी बहुतांश अशा आहेत की, ज्यामध्ये काहीच चांगुलपणा नाही. चांगुलपणा तर त्याच्या चर्चेत असतो जो दानधर्म किंवा पुण्यकार्य किंवा लोकांदरम्यान समेट घडविणे (इ.) विषयी ताकीद देतो. आणि जो कोणी अल्लाहची मर्जी संपादन करण्यासाठी असे करील, त्यास आम्ही फार मोठे बक्षीस देऊ. 115 आणि जो कोणी (अल्लाहची) शिकवण स्पष्ट झाल्यानंतर देखील पैगंबराचा विरोध करतो आणि श्रद्धावंतांच्या मार्गाव्यतिरिक्त अन्य मार्गाचा अवलंब करतो, तर आम्ही त्याला त्याच (वाईट) मार्गावर मार्गस्थ ठेवू, ज्याची त्याने स्वत: निवड केली आहे. आणि (जीवनप्रवास संपल्यानंतर) त्याला नरकात फेकून देऊ आणि किती वाईट प्रवासाचे शेवट आहे ते!

116 अल्लाह निश्चितपणे त्या गोष्टीला कधीच क्षमा करणार नाही की, त्याचे समकक्ष ठरवले जावे. याव्यतिरिक्त (लहानसहान) चुका ज्याच्या बाबतीत तो इच्छील, त्यास क्षमा करील. आणि ज्याने (इतरांना) अल्लाहचे समकक्ष ठरविले तो (सन्मार्गापासून), फारच दूर भरकटत गेला. 117 ते (अनेकेश्वरवादी लोक) अल्लाहला सोडून देवी–देवतांचा धावा करतात (मदतीसाठी हाक देतात), (असे करून) ते दुसऱ्या कोणाचा नव्हे तर विद्रोही सैतानाचा धावा करीत आहेत. 118 (असे करणाऱ्या व्यक्तीचा) अल्लाहने धिक्कार केला आहे. सैतानाने (अल्लाहला) असे म्हटले होते की, मी तुझ्या सेवकांपैकी एक निश्चित भाग अवश्य घेईन. 119 (सैतानाने म्हटले होते), मी त्यांना अवश्य बहकावीन आणि त्यांच्या मनांमध्ये व्यर्थ आशा जागृत करीन. आणि मी त्यांना प्रेरित करीन, तर ते जनावरांचे कान कापतील (बळी देण्यासाठी अनेकेश्वरवादी लोकांची कुप्रथा), आणि मी त्यांना आदेश देईन तर ते अल्लाहच्या रचनेत (अनधिकृत) बदल

करतील.

आणि जो कोणी अल्लाहला सोडून सैतानाला आपला साहाय्यकर्ता बनवेल तर तो (शेवटी) पूर्णपणे बरबाद होणार. [120] तो (सैतान) त्यांना आश्वासने देतो आणि त्यांच्यामधे व्यर्थ आशा जागृत करतो. पण सैतानाची सर्व आश्वासने फसवणुकीशिवाय दुसरे काहीच नाही. [121] (शेवटी) अशा लोकांचे ठिकाण फक्त नरक आहे. आणि त्यांना त्यातून बाहेर पडण्याचा कोणताही मार्ग सापडणार नाही. [122] पण ज्या लोकांनी श्रद्धा धारण केली आणि सत्कर्मे केली, आम्ही त्यांना अशा बागांमध्ये प्रवेश देऊ, ज्यातून पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह वाहत असतील. आणि ते तेथे सदैव निवास करतील, हे अल्लाहचे सत्य वचन आहे. आणि अल्लाहशिवाय दुसरा कोण अधिक सत्यवचनी असू शकतो.

[123] (स्वर्गाची प्राप्ती) ना तुम्हां (श्रद्धावंतांच्या) इच्छेवर अवलंबून आहे, ना त्यांच्या इच्छेवर अवलंबून आहे जे आधीचे ग्रंथधारक आहेत. जो कोणी दुष्कृत्य करेल, त्याला त्याचे फळ मिळेल. आणि त्याला अल्लाहव्यतिरिक्त अन्य कोणीही समर्थक किंवा साहाय्यकर्ता म्हणून लाभणार नाही. [124] जो कोणी सत्कर्म करील, मग तो पुरुष असो वा स्त्री, पण जर तो श्रद्धावंत असेल तर अशा लोकांना स्वर्गात प्रवेश मिळेल आणि त्यांच्यावर जरासुद्धा अन्याय होणार नाही. [125] धर्मश्रद्धेच्या बाबतीत त्याच्याहून अधिक चांगला कोण असू शकतो, ज्याने (पूर्णपणे) स्वत:ला अल्लाहच्या स्वाधीन केले आणि तो सत्कर्मे करणारा आहे. आणि तो इब्राहीमच्या पंथाचे अनुसरण करतो, जो (इब्राहीम), स्वत:ला इतर सर्व (खोट्या गोष्टींशी) अलग करून पूर्णपणे अल्लाहचा बनलेला होता. आणि अल्लाहने त्याला (स्वत:चा) मित्र म्हणून निवडले होते. [126] जे काही आकाशात आहे आणि जे काही जमिनीत आहे, ते सर्वच्या सर्व अल्लाहचेच आहे आणि खरोखर अल्लाहने सर्व वस्तुमात्रांना वेढून ठेवले आहे.

[127] ते तुम्हाला स्त्रियांविषयी (धर्माचा) आदेश विचारतात, (तुम्ही त्यांना)

सांगा, ‘अल्लाह तुम्हाला त्यांच्याविषयी आदेश देत आहे. (तसेच त्या आदेशांचे स्मरण करून देत आहे), जे तुम्हाला ह्या ग्रंथामध्ये अनाथ मुलींच्या बाबतीत ऐकविले गेले आहे. त्यांना तुम्ही ते देत नाही, जे त्यांच्यासाठी (त्यांचा हक्क म्हणून) निश्चित करण्यात आले आहे. पण त्यांच्याशी विवाह तर करू इच्छिता. तसेच निराधार (असहाय) मुलांच्या बाबतीतही आदेश देण्यात आला आहे की, तुम्ही अनाथांच्या संबंधात न्यायपूर्ण व्यवहार करा. आणि तुम्ही जे कोणते सत्कर्म करता, त्याची अल्लाहला पूर्ण जाणीव आहे. 128 आणि जर एखाद्या स्त्रीला आपल्या पतीकडून आपल्यावर अत्याचार होण्याचे किंवा बेपर्वाई दाखवली जाण्याचे भय वाटत असेल, तर त्या स्त्रीने आपसात सलोखा निर्माण करण्यासाठी प्रयत्न केल्यास तसे करणे, चुकीचे ठरणार नाही. कारण आपसात सलोखा निर्माण करणे, हे सर्वोत्तम कृत्य आहे.

आणि लोभीपणा मानवाच्या प्रवृत्तीमध्ये आहेच. पण जर तुम्ही चांगल्याप्रकारे वागाल आणि अल्लाहची जाण ठेवाल (तर त्यात तुमचे भले आहे). (तर लक्षात असू द्या,) अल्लाहला त्या सर्व गोष्टींची जाणीव आहे, जे तुम्ही करता. 129 आणि तुमची कितीही इच्छा असली तरी तुम्ही तुमच्या (सर्व) पत्नींना पूर्णपणे समान न्यायाची वागणूक कधीही देऊ शकत नाही. आणि म्हणून तुम्ही एकाच पत्नीचे अशाप्रकारे (प्रिय) बनून जाऊ नका की, दुसरीकडे अजिबात लक्ष न देऊन तिला (विवाहित असूनही अविवाहिताप्रमाणे) दुर्लक्षित अवस्थेत सोडून द्याल. आणि जर तुम्ही (स्वत:मध्ये) सुधारणा कराल आणि (अल्लाहची) जाण ठेवाल, तर निश्चितच अल्लाह फार क्षमाशील (व) दयाळू आहे. 130 जर पती-पत्नी एकमेकांपासून (कायमस्वरूपी) वेगळे होतील तर अल्लाह आपल्या विपुल समृद्धीतून त्या दोघांना आपल्या पायांवर स्वतंत्र उभे करील. अल्लाह फार उदार व बुद्धिमान आहे.

131 आणि जे काही आकाशात आहे ते सर्व व जे काही पृथ्वीवर आहे ते

सर्व अल्लाहचे आहे. ज्यांना तुमच्या आधी ग्रंथ देण्यात आला होता, त्यांना आम्ही असा आदेश दिला आहे, आणि तुम्हालाही असा आदेश दिला जात आहे की, अल्लाहचे भय बाळगा. आणि जर तुम्ही अल्लाहचा आदेश मानण्यास नकार द्याल, तर (लक्षात असू द्या) आकाशात जे काही आहे ते सर्व व पृथ्वीवर जे काही आहे ते सर्व अल्लाहचेच आहे. अल्लाह स्वयंपूर्ण आहे व (सदैव) स्तुतीस पात्र आहे. 132 आणि आकाशात जे काही आहे ते सर्व व पृथ्वीवर जे काही आहे ते सर्व (फक्त) अल्लाहचेच (आणि अल्लाहचेच) आहे. आणि अल्लाहसारखा विश्वसनीय दुसरा कोणीच नाही. 133 लोकांनो! त्याने इच्छिले तर तो तुम्हा सर्वांना बाजूला सारून (तुमच्या जागी) दुसऱ्यांना आणून वसवू शकतो. असे करण्याचे त्याला पूर्ण सामर्थ्य प्राप्त आहे. 134 जो कोणी या जगातच मोबदला इच्छित असेल तर (त्याने हे लक्षात ठेवावे की), अल्लाहकडे दोन्ही ठिकाणाचे मोबदले आहेत या जगातील, आणि मृत्यूनंतरच्या (अनंतकालीन) जगातील. अल्लाह खरोखर सर्व काही ऐकणारा व सर्व काही पाहणारा आहे.

135 श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! न्यायाची बाजू घेण्याच्या बाबतीत अढळ राहा आणि अल्लाहसाठी साक्ष देणारे बना, मग ती (न्यायपूर्वक साक्ष) तुमच्या स्वत:च्या किंवा तुमच्या आई वडिलांच्या किंवा तुमच्या नातेवाइकांच्या विरुद्ध का असेना. आणि (ज्याच्याविरुद्ध साक्ष दिली जात आहे), मग तो श्रीमंत असो वा गरीब. अल्लाह तुमच्यापेक्षा जास्त, त्या दोघांचा हितचिंतक आहे. म्हणून तुम्ही क्षुद्र इच्छांच्या अधीन जाऊन न्यायबुद्धी गमावू नका. आणि जर तुम्ही सत्य दडवून ठेवाल आणि ते (प्रकट करण्याच्या बाबतीत), टाळाटाळ कराल तर (लक्षात असू द्या) की, तुम्ही जे काही करीत आहात त्याची अल्लाहला पूर्ण जाणीव आहे.136 इमान धारण केलेल्या लोकांनो! (खऱ्या अर्थाने) विश्वास ठेवणारे बना, अल्लाहवर व त्याच्या पैगंबरावर व (त्याच्या) ग्रंथावर, जो (पैगंबर मुहम्मदांवर) अवतरित केला गेला, आणि जो ग्रंथ यापूर्वी

अवतरित केला गेला त्यावर. आणि जो कोणी अल्लाहला आणि त्याच्या दूतांना आणि त्याच्या ग्रंथांना आणि त्याच्या पैगंबरांना आणि (न्यायाच्या) अंतिम दिवसाला मानण्यास नकार देईल, तर तो निश्चितपणे भरकटत (सन्मार्गापासून) फार दूर निघून गेला. 137 निश्चितच ते लोक जे (सत्यावर) विश्वास ठेवतात आणि नंतर अविश्वास दाखवतात. नंतर पुन्हा विश्वास ठेवतात आणि नंतर परत अविश्वास दाखवतात, (त्यामुळे) त्यांच्या अविश्वासात (अश्रद्धेत) वाढ होते. अशांना अल्लाह कदापि क्षमा करणार नाही, ना तो त्यांना कधी सन्मार्ग दाखवेल.
138 तुम्ही अशा ढोंगी लोकांना भयंकर शिक्षा होणार असल्याचे जाहीर करून टाका. 139 जे श्रद्धावंतांना सोडून सत्याचा अस्वीकार करणाऱ्या श्रद्धाहीनांना मित्र म्हणून स्वीकार करतात. ते त्यांच्याकडून सन्मानित होण्याची अपेक्षा ठेवून आहेत की काय? तर (मग त्यांनी लक्षात ठेवावे की), सर्व सन्मानाचा धनी फक्त अल्लाह आहे.

140 आणि अल्लाहने (आपल्या) ग्रंथामध्ये या आधीच (असा आदेश) दिलेला आहे की, जेव्हाही तुम्ही लोकांना अल्लाहचा संदेश नाकारताना किंवा त्यांचा उपहास करताना ऐकाल, तर तुम्ही अशा लोकांसोबत अजिबात बसू नका, जोपर्यंत ते एखाद्या दुसऱ्या गोष्टीकडे वळणार नाहीत. अन्यथा तुम्हीही त्यांच्यासारखेच व्हाल. (लक्षात ठेवा) सत्याचा अस्वीकार करणाऱ्या श्रद्धाहीनांना आणि दांभिक लोकांना अल्लाह नरकामध्ये एकत्र करणार आहे. 141 हे दांभिक लोक तुमच्या बाबतीत काय घडते ते पाहण्यासाठी प्रतीक्षा करीत असतात. आणि जर अल्लाहकडून तुम्हाला विजय प्राप्त झाला, तर ते म्हणतात, 'आम्ही तुमच्याबरोबर नव्हतो का?' आणि जर श्रद्धाहीनांचे पारडे जड झाले, तर ते त्यांना म्हणतात, 'आम्ही जिंकण्यासाठी तुमची मदत केली नाही का, तसेच तुमचे (त्या) श्रद्धावंतांपासून रक्षण केले नाही का?' अल्लाह पुनरुत्थानाच्या दिवशी तुमच्या दरम्यान निर्णय करेल. आणि अल्लाह सत्य नाकारणाऱ्या श्रद्धाहीनांना

कदापि श्रद्धावंतांवर वर्चस्व प्राप्त होऊ देणार नाही.

142 ढोंगी लोक अल्लाहला धोका देऊ पाहत आहेत. (पण वास्तविकता ही आहे की), अल्लाहनेच त्यांना धोक्यामध्ये ठेवलेले आहे. जेव्हा ते प्रार्थनेसाठी (नमाज़ासाठी) उभे राहतात. तेव्हा (मोठ्या) नाखुशीने उभे राहतात. (कारण) ते केवळ लोकांना दाखवण्यासाठी उभे राहतात आणि ते अल्लाहचे स्मरण करतात, पण फारच कमी. 143 त्यांची अवस्था अशी आहे की, ते दोहोंच्यामध्ये हेलकावे खात आहेत, ना इकडे आहेत, ना तिकडे. ज्याला अल्लाह भटकण्यासाठी सोडून देतो त्याच्यासाठी तुम्हाला कोणताही मार्ग सापडणार नाही. 144 श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! श्रद्धावंतांना सोडून (त्या) श्रद्धाहीनांना मित्र म्हणून स्वीकारू नका, (जे तुमच्याशी युद्ध करण्याच्या भूमिकेत आहेत) तुम्ही स्वतःच्या विरुद्ध अल्लाहला उघड पुरावा देऊ इच्छिता की काय? 145 निश्चितच, ढोंगी लोक नरकाच्या अग्नीत अगदी खालच्या तळाशी असतील, (म्हणजे नरकातील सर्वांत वाईट शिक्षा ते भोगतील), आणि तुम्हाला त्यांचा कोणीही साहाय्यकर्ता असल्याचे आढळणार नाही. 146 (ह्यात अपवाद) फक्त त्या लोकांचा आहे जे (आपल्या दुष्कृत्यांबद्दल), पश्चात्ताप करून स्वतःला सुधारतील आणि अल्लाहशी आपला संबंध दृढ करतील आणि अल्लाहची आज्ञा पाळण्यात प्रामाणिक बनतील (आपल्या श्रद्धेत गंभीर असतील), तर असेच लोक (चिरस्थायी जीवनात) श्रद्धावंतांसमवेत असतील आणि अल्लाह श्रद्धावंतांना फार मोठे बक्षीस देईल. 147 जर तुम्ही कृतज्ञ बनाल आणि श्रद्धेचा अंगीकार कराल तर अल्लाह तुम्हाला (तुमच्या भूतकालीन अपराधांबद्दल), का म्हणून शिक्षा करेल? (जेव्हा की), अल्लाह (आपल्या भक्तांना) नेहमी प्रतिसाद देणारा (गुणग्राहक) आहे, आणि सर्व काही जाणणारा आहे.

148 अपशब्दांचा उपयोग करणे अल्लाहला अजिबात प्रिय नाही, पण या व्यतिरिक्त की, एखाद्यावर अत्याचार झालेला आहे. खरोखर, अल्लाह सर्व काही

ऐकणारा आणि सर्व काही जाणणारा आहे. [149] एखादे सत्कर्म तुम्ही उघड करा किंवा लपवून ठेवा किंवा दुष्कृत्यांना क्षमा करा. निश्चितच अल्लाह (दुष्कृत्यांना) क्षमा करणारा आहे आणि तो सर्वशक्तिमान आहे. (म्हणजे शिक्षा देण्याचे पूर्ण सामर्थ्य ठेवूनही तो क्षमा करतो). [150] जे लोक अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांवर विश्वास ठेवत नाहीत. आणि अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांदरम्यान (श्रद्धा ठेवण्याच्या बाबतीत) फरक करू इच्छितात आणि म्हणतात, 'आम्ही काही पैगंबरांवर विश्वास ठेवतो आणि काहींवर ठेवत नाही.' ते यातील मधला मार्ग स्वीकारू इच्छितात. [151] असेच लोक सत्य नाकारणारे पक्के श्रद्धाहीन आहेत, यात मुळीच शंका नाही. अशा श्रद्धाहीनांसाठी आम्ही अपमानास्पद शिक्षा तयार ठेवली आहे. [152] जे लोक अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरांवर विश्वास ठेवतात आणि त्यांच्यापैकी कोणामध्येही फरक करीत नाहीत. अशांनाच अल्लाह निश्चितपणे (त्यांच्या कृत्यांचा) (पुरेपूर) मोबदला देईल. अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे.

[153] (पैगंबर!) आधीच्या ग्रंथांना अनुसरणारे लोक तुमच्याकडे मागणी करीत आहेत की, तुम्ही त्यांच्यासाठी आकाशातून एक ग्रंथ आणावा. त्यांनी मूसाकडे यापेक्षाही मोठ्या गोष्टीची मागणी केली होती. त्यांनी मूसाला म्हटले होते, 'आम्हाला अगदी अल्लाह समोरासमोर दाखव.' तेव्हा त्यांच्या या अपराधामुळे त्यांच्यावर वीजरूपी विनाशकारी शिक्षा ओढवली. त्यानंतर, सत्याचे सर्व प्रमाण त्यांच्याकडे आलेले असतानाही, त्यांनी (सोन्यापासून बनवलेल्या) वासराची (उपासनेसाठी) निवड केली, परंतु आम्ही त्या गोष्टीलाही क्षमा केली आणि मूसाला सत्याचे स्पष्ट पुरावे प्रदान केले. [154] त्यांच्याकडून प्रतिज्ञा घेण्यासाठी आम्ही त्यांच्यावर 'तूर' पर्वताला उचलून धरले. तेव्हा आम्ही त्यांना म्हणालो, 'दारातून नम्रतापूर्वक प्रवेश करा' आणि आम्ही त्यांना म्हणालो, 'सबतच्या (शनिवारी प्रार्थना दिवस पाळणे) बाबतीत मर्यादांचे उल्लंघन करू नका' आणि

आम्ही त्यांच्याकडून दृढ प्रतिज्ञा घेतली.

155 यासाठी (आम्ही त्यांना शिक्षा केली) की, त्यांनी (अल्लाहशी केलेल्या) प्रतिज्ञेचा भंग केला आणि अल्लाहच्या खुणांद्वारे स्पष्ट होणारे संदेश मानण्यास त्यांनी नकार दिला आणि त्यांनी पैगंबरांची अन्यायकारकपणे हत्या केली. ते (घमेंडीने) म्हणायचे, 'आमची हृदये आधीपासून ज्ञानाने पूर्ण भरलेली आहेत', (म्हणजे तुमच्या संदेशाला तिथे आता जागा नाही). पण तसे नाही, त्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिल्यामुळे अल्लाहनेच त्यांच्या हृदयांना सील करून टाकले आहे. फार थोडे लोक वगळता, ते विश्वास ठेवणारे नाहीत. 156 (ते यासाठी धिक्कारले गेले कारण) त्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला आणि (येशूची आई) मरियमवर फार मोठा खोटा आरोप केला. 157 आणि त्यांनी (बढाईखोरपणे) जाहीर केले की, आम्ही मरियमपुत्र येशू मसीह, जो अल्लाहचा पैगंबर (असल्याचा दावा करायचा), त्याचा वध केला आहे. पण वास्तविकता ही आहे की, ना त्यांनी त्याचा वध केला, ना क्रूसावर चढवून त्याला ठार केले, तर त्यांनी तसे केल्याचे फक्त त्यांना वाटले. आणि जे याबाबतीत भिन्न मत व्यक्त करीत आहेत, ते निश्चितच साशंक अवस्थेत आहेत. त्यांना याविषयी निश्चित ज्ञान तर नाही, पण ते केवळ अनुमानाचे अनुसरण करीत आहेत. (सत्य हे आहे की), त्यांनी त्याची हत्या केलीच नाही. 158 (तर) अल्लाहने (सन्मानपूर्वक) त्याला स्वत:कडे उचलून घेतले. खरोखर, अल्लाह सर्वशक्तिमान व बुद्धिमान आहे.

159 आधीच्या ग्रंथांना अनुसरणाऱ्यांपैकी असा कोणीही नाही, जो आपल्या मृत्यूच्या समयी (येशू संबंधाने जे सत्य आहे) त्यावर विश्वास ठेवणार नाही. आणि पुनरुत्थानाच्या दिवशी तो (येशू स्वत:) त्यांच्या विरुद्ध सत्याची ग्वाही देईल. 160 ज्यू लोकांनी अपराध केल्यामुळे, काही चांगल्या वस्तू आम्ही त्यांच्यासाठी निषिद्ध ठरविल्या, ज्यांच्या (उपयोगाची) आधी त्यांना परवानगी

होती. आणि आम्ही हे यासाठी केले कारण, ते लोकांना अल्लाहच्या मार्गाकडे
येण्यापासून रोखत असत. 161 आणि यासाठी की, निषिद्ध असतानाही ते व्याज
घ्यायचे, आणि ते लोकांची संपत्ती अन्यायाने गिळंकृत करायचे, तर आम्ही
त्यांच्यापैकी अशा श्रद्धाहीनांसाठी यातनामय शिक्षा तयार ठेवलेली आहे. 162
पण त्यांच्यापैकी ज्या लोकांना सखोल ज्ञान आहे, आणि ते श्रद्धावंत, जे खऱ्या
अर्थाने विश्वास ठेवणारे आहेत, त्याच्यावर जे तुमच्याकडे प्रकट करण्यात
आले, आणि त्यावरही (विश्वास ठेवतात) जे तुमच्याआधी प्रकट करण्यात
आले होते. आणि (त्यांचे वैशिष्ट्य म्हणजे), ते नित्य प्रार्थना (नमाज़ अदा)
करणारे आहेत आणि ज़कात (दान) देणारे आहेत. (ते हे सर्व कार्य), अल्लाह
आणि अंतिम दिवसावर विश्वास ठेवून करीत असतात. अशांना आम्ही निश्चितच
फार मोठे बक्षीस देऊ.

163 ज्याप्रकारे आम्ही (पैगंबर) नूहकडे आणि त्याच्यानंतरच्या पैगंबरांकडे
(आमचा) संदेश पाठविला होता. (हे पैगंबर!) तशाच प्रकारे आम्ही तुमच्याकडे
(आमचा) संदेश पाठविला आहे, ज्याप्रमाणे आम्ही इब्राहीम व इस्माईल आणि
इसहाक़ व याक़ूब आणि याक़ूबचे वंशज, तसेच येशू (ईसा), अय्यूब व युनूस
आणि हारून व सुलेमान (या सर्व पैगंबरांकडे) (आमचा संदेश पाठविला होता).
आणि आम्ही (पैगंबर) दाऊद यांना 'ज़बूर' (नावाचा ग्रंथ) दिला होता. 164
आणि आम्ही आधी पाठविलेल्या काही पैगंबरांविषयी तुम्हाला सांगितले आहे,
(तुमच्या समोर त्यांचे वर्णन केले आहे). आणि (असेही अनेक पैगंबर आहेत),
ज्यांचे वर्णन आम्ही तुमच्यासमोर केलेले नाही. आणि मूसा (पैगंबरांपैकी असे
पैगंबर होते) ज्यांच्याशी अल्लाहने प्रत्यक्ष संभाषण केले. 165 (आम्ही या सर्व)
पैगंबरांना शुभवार्ता देण्यासाठी तसेच (लोकांना) सावध करण्यासाठी पाठविले
होते. म्हणजे (पैगंबरांच्या या कार्यानंतर) अल्लाहसमोर सादर करण्यासाठी लोकांकडे
कोणतीही सबब शिल्लक राहू नये. आणि खरोखर, अल्लाह सर्वशक्तिमान व

बुद्धिवान आहे.

166 परंतु अल्लाह (स्वत:) त्यावर साक्षी आहे जे त्याने तुमच्याकडे पाठविले आहे. ते त्याने तुमच्याकडे आपल्या ज्ञानाने पाठविले आहे. आणि त्यासाठी त्याचे दूत देखील साक्षी आहेत. आणि अल्लाहसारखा दुसरा साक्षी कोणीही असू शकत नाही. 167 निश्चितच जे लोक सत्य न मानण्यावर (स्वत:) अडून राहिले आणि (इतरांनाही) अल्लाहने (दाखवलेले) मार्ग अनुसरण्यापासून रोखतात, ते सन्मार्गापासून फार दूर निघून गेलेले आहेत. 168 जे लोक सत्य नाकारण्यावर अडून राहिले, आणि अत्याचारी कृत्ये करीत राहिले अशांना अल्लाह कदापि क्षमा करणार नाही, तसेच त्यांना तो सन्मार्गही दाखवणार नाही. 169 तर त्यांना केवळ नरकाचाच मार्ग दाखवील. त्यात ते कायम निवास करतील. आणि (त्यांना या परिणामापर्यंत पोचविणे) अल्लाहसाठी फार सोपे आहे. 170 लोकांनो! हा पैगंबर तुमच्या पालनकर्त्याकडून सत्याचा संदेश घेऊन आला आहे. तर तुम्ही त्यावर विश्वास ठेवा, ते तुमच्या भल्याचे आहे. आणि जर तुम्ही सत्याचा अस्वीकार करीत असाल तर (लक्षात असू द्या की), ते सर्व जे आकाशात आहे आणि ते सर्व जे पृथ्वीवर आहे अल्लाहचेच आहे. आणि अल्लाह सर्व काही जाणणारा आणि बुद्धिमान आहे.

171 आधीच्या ग्रंथाला अनुसरणाऱ्यांनो! धर्माच्या बाबतीत अतिरेक करणारे बनू नका. आणि अल्लाहसंबंधाने सत्य गोष्टीशिवाय काही बोलू नका. मरियमपुत्र येशू–मसीह (दुसरा–तिसरा कोणी नव्हता) तर तो केवळ अल्लाहचा पैगंबर होता. आणि मरियमला त्याने जी शुभवार्ता पाठवली होती, त्याची पूर्तता होती. आणि (येशू मसीह) अल्लाहने निर्माण केलेला एक आत्मा होता. तेव्हा तुम्ही अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांवर विश्वास ठेवणारे बना, आणि असे म्हणू नका की, ईश्वर तीन आहेत. असे म्हणण्यापासून परावृत्त व्हा, यातच तुमचे (स्वत:चे) भले आहे. यात मुळीच संशय नाही की, उपासनेयोग्य तर केवळ अल्लाहच

आहे, ‘त्याचा (कोणी) अपत्य असावा’ या गोष्टीपासून तो पवित्र आहे. आकाशात जे काही आहे आणि जमिनीत जे काही आहे, ते सर्व त्याचेच आहे. आणि अल्लाहसारखा कार्यसाधक दुसरा कोणीच नाही. [172] येशू ला अल्लाहचा दास असल्याचा कदापि कमीपणा वाटणार नाही. आणि अल्लाहच्या निकट असलेल्या दूतांना देखील त्यात कसलाच कमीपणा वाटणार नाही. आणि जे कोणी अल्लाहची उपासना करण्यात कमीपणा समजतील व अहंकारी बनतील (तर त्यांनी हे लक्षात ठेवायला हवे की, न्यायाच्या दिवशी) अल्लाह निश्चितपणे त्या सर्वांना आपल्यासमोर एकत्रित करील. [173] तेव्हा तो त्या लोकांना पुरेपूर मोबदला देईल, ज्यांनी श्रद्धेचा अंगीकार केला होता आणि सत्कर्मे केली होती. (तो) त्यांना आपल्या कृपेने अधिकाधिक देईल. पण ज्यांनी (त्याचे दास बनण्यात) कमीपणा मानला होता व अहंकारी बनले होते, त्यांना तो यातनामय शिक्षा करील. आणि अल्लाहपासून त्यांचा बचाव करणारा कोणीही मित्र किंवा साहाय्यक (तिथे) त्यांना सापडणार नाही.

[174] लोकांनो! तुमच्या पालनकर्त्याकडून (आता) तुमच्याकडे सत्याचे स्पष्ट प्रमाण आलेले आहे. आणि (अशाप्रकारे) आम्ही तुमच्याकडे (सन्मार्ग दाखवणारा) उज्ज्वल प्रकाश पाठविला आहे.

[175] आणि ज्या लोकांनी अल्लाहवर श्रद्धा ठेवली आहे आणि त्याच्याशी दृढ संबंध प्रस्थापित केले आहे. अशांना अल्लाह निश्चितच आपल्या दयेच्या व कृपेच्या छत्राखाली घेईल. तसेच त्यांना आपल्याकडे येणारा सरळ मार्ग दाखवील.
[176] ते तुम्हाला (प्रत्यक्ष वारस नसलेल्या लोकांसंबंधाने अल्लाहचा), आदेश विचारतात, पैगंबर! (तुम्ही त्यांना) सांगा, ‘अल्लाह तुम्हाला अप्रत्यक्ष वारसासंबंधाने आदेश देत आहे की, जर मागे अपत्य नसलेली एखादी व्यक्ती मरण पावेल, पण तिला जर एक बहीण असेल तर मयत व्यक्ती जे काही आपल्या मागे सोडून जाईल, त्यापैकी तिच्या बहिणीला अर्धा भाग मिळेल

आणि (जर बहीण मरण पावल्यास व भाऊ जिवंत असल्यास) तो या बहिणीचा वारस असेल, या अटीवर की, त्या बहिणीला कोणतीही संतान नसावी. जर बहिणी दोन असतील तर त्यांना मयत व्यक्तीने जे काही मागे सोडले असेल त्याचा दोन तृतीयांश भाग मिळेल. आणि जर वारसांत अनेक भाऊ–बहिणी असतील तर पुरुषाला दोन स्त्रियांच्या हिश्शाएवढा हिस्सा मिळेल. अल्लाह तुम्हाला हे (सर्व) तपशीलवार यासाठी (समजावून) सांगत आहे की, तुम्ही सन्मार्गापासून भरकटत दूर जाता कामा नये. आणि (लक्षात असू द्या) अल्लाहला प्रत्येक गोष्टीचे (पूर्ण) ज्ञान आहे.'

# सूरह–०५. अल–माइदा

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 इमान धारण केलेल्या लोकांनो! आपल्या शब्दांशी प्रामाणिक राहा, (म्हणजे आपल्या प्रतिज्ञा पूर्ण करा). तुमच्यासाठी (पुढे) वर्णन होणाऱ्या प्राण्यांव्यतिरिक्त इतर प्राणी (जे साधारणपणे गवत खाऊन जगतात) ते तुमच्यासाठी वैध ठरवण्यात आलेले आहेत. मात्र जेव्हा तुम्ही हजचा पोषाख परिधान केलेले असाल (म्हणजे हज करीत असाल), तेव्हा शिकार करणे वैध आहे असे समजू नका. निश्चितच अल्लाह जे इच्छितो, त्याची तो आज्ञा देतो. 2 श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! अल्लाहने स्थापित केलेल्या संकेतचिन्हांचा अनादर करू नका. तसेच ना पवित्र महिन्यांचा, ना बळी देण्यासाठी आणलेल्या पशूंचा, ना त्या पशूंचा ज्यांच्या गळ्यात अल्लाहला अर्पण केल्याची खूण म्हणून पट्टे घातलेले आहेत. ना त्यांचा अनादर करा जे आपल्या पालनकर्त्याची कृपा आणि मर्जी प्राप्त करण्यासाठी त्याच्या पवित्र घराकडे येतात. आणि जेव्हा (तुम्ही हजच्या सर्व विधी पूर्ण करून), हजचा पोषाख (इहराम) काढून टाकाल, तेव्हा मात्र तुम्ही शिकार करण्यास स्वतंत्र आहात. आणि एखाद्या जातीसमूहाचे वैर, ज्यांनी

तुम्हाला पवित्र घरापासून (काबागृहापासून) रोखले होते, आता तुम्हाला अनाचार करण्यास प्रवृत्त करू नये. तुम्ही सदाचार आणि धर्मनिष्ठेच्या बाबतीत एकमेकांना मदत करा, पण तुम्ही दुराचार आणि अत्याचाराच्या बाबतीत एकमेकांना मदत करू नका. आणि अल्लाहचे भय बाळगा, निश्चितच अल्लाह शिक्षा करण्याच्या बाबतीत फार कठोर आहे.

3 तुमच्यासाठी निषिद्ध ठरवण्यात आले आहे, (स्वत:हून) मरण पावलेले प्राण्याचे (मांस), तसेच रक्त व डुकराचे मांस आणि ते जनावर ज्याला बळी देताना अल्लाहशिवाय दुसऱ्याचे नाव घेतले गेले असेल, आणि ते जनावर जे गुदमरून, किंवा मार लागल्यामुळे किंवा उंचीवरून खाली पडल्यामुळे (मरण पावले असेल). किंवा (इतर प्राण्याने आपल्या) शिंगाने भोसकून ठार केले असेल किंवा असे प्राणी आणि ज्यास जंगली जनावरांनी फाडून खाल्ले असेल, (हे सर्व निषिद्ध आहेत). पण तो प्राणी ज्यास तुम्ही (जिवंत प्राप्त करून) उचित रीतीने त्याला बळी दिला असेल तर (तो वैध आहे). आणि ज्याची कत्तल वेदीवर करण्यात आली असेल तर तेही (निषिद्ध आहे). (वेदी=तो चबुतरा जिथे अनेकेश्वरवादी लोक, देव-देवतांच्या मुर्त्यांसमोर जनावरांचे बळी देतात). तसेच (हे कृत्यही निषिद्ध ठरविण्यात आले आहे की), तुम्ही (मांसाची) विभागणी करून आपला हिस्सा जाणण्यासाठी (भविष्य दाखवणाऱ्या) शकुनी बाणांचा उपयोग करावा. कारण असे करणे पापकृत्य आहे. सत्य नाकारणारे लोक, आज तुमच्या धर्माला हानी पोचविण्याच्या बाबतीत निराश झाले आहेत, म्हणून तुम्ही त्यांचे भय बाळगू नका. तर (केवळ) माझेच भय बाळगा.

आज मी तुमच्या धर्माला परिपूर्ण केले आहे, (नेहमीसाठी सुरक्षित केले आहे). आणि असे करून तुमच्यावर नेहमीसाठी कृपा केली आहे. आणि तुमच्यासाठी धर्म म्हणून इस्लामची निवड केली आहे. (इस्लाम=अल्लाहच्या इच्छेला स्वत:ला समर्पित करून टाकणे)

तर जो कोणी भुकेने फार व्याकूळ झाला असेल, पण गुन्हा करण्याचा त्याचा मुळीच उद्देश नसेल (तर त्याने मनाई केलेल्या वस्तूंपैकी काही खाल्ल्यास), त्याला अल्लाह माफ करून टाकेल (कारण तो फार माफ करणारा आणि अत्यंत दयाळू आहे).

4 ते तुम्हाला विचारतात की, त्यांच्यासाठी कोणत्या गोष्टी वैध ठरविण्यात आल्या आहेत? तुम्ही त्यांना सांगा, 'तुमच्यासाठी सर्व स्वच्छ व शुद्ध वस्तू वैध ठरविण्यात आलेल्या आहेत'. आणि ज्या शिकारी जनावरांना तुम्ही शिकार पकडण्यासाठी प्रशिक्षित केले आहात, ज्यांना तुम्ही अल्लाहने तुम्हाला दिलेल्या ज्ञानाच्या आधारे शिकवता, ते (शिकारी प्राणी) जी शिकार तुमच्याकरिता रोखून ठेवतील त्यातून तुम्ही खा, पण त्यावर अल्लाहचे नाव (अवश्य) घ्या. आणि अल्लाहचे भय बाळगा. निश्चितच अल्लाह हिशेब करण्याच्या बाबतीत फार शीघ्र आहे. 5 आज तुमच्यासाठी सर्व स्वच्छ व शुद्ध वस्तू वैध ठरविण्यात आलेल्या आहेत. आणि ग्रंथधारक लोकांचे अन्न तुमच्यासाठी वैध आहे, आणि तुमचे अन्न त्यांच्यासाठी वैध आहे. आणि चारित्र्यवान (निष्कलंक) श्रद्धावंत स्त्रिया, तसेच ज्यांना आधी ग्रंथ देण्यात आला होता, त्यांच्यातील चारित्र्यवान स्त्रियांपैकी (कोणत्याही स्त्रीशी), विवाह करण्याची तुम्हाला परवानगी दिली जात आहे. फक्त अट ही आहे की, तुम्ही त्यांना त्यांची महरची रक्कम देऊन रीतसर विवाह करावा, ना त्यांच्याशी उघडपणे अनैतिक संबंध ठेवावा, ना गुप्तरित्या व्यभिचार करावा. जो अल्लाहवर, विश्वास ठेवण्यास नकार देईल. त्याची (सर्व) कृत्ये वाया जातील आणि मृत्यूनंतरच्या (शाश्वत) जीवनात फार मोठ्या नुकसानाशी त्याचा सामना होईल.

6 श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! जेव्हा तुम्ही नमाज़ासाठी जाता, (तर प्रार्थनेपूर्वी) आपले चेहरे, आणि कोपरापर्यंत आपले हात (पाण्याने) स्वच्छ धुवा, आणि पाण्याचे (ओले) हात आपल्या डोक्यावरून फिरवा. आणि आपले

पाय घोट्यापर्यंत पाण्याने धुवा. आणि जर तुम्ही (पत्नीशी) समागम केलेले असाल तर पूर्ण स्नान करून स्वच्छ व्हा. पण जर तुम्ही आजारी असाल किंवा प्रवासादरम्यान असाल किंवा तुमच्यापैकी कोणी शौचास जाऊन आला असेल किंवा आपल्या जीवनसाथीशी शारीरिक संपर्कात आलेले असाल, आणि तुम्हाला (स्वच्छ होण्यासाठी) पाणी मिळत नसेल तर स्वच्छ मातीला स्पर्श करून आपले हात चेहऱ्यांवर व हातांवर फिरवा. आपले चेहरे आणि हात पुसून घ्या. तुमच्यावर कष्ट लादण्याची अल्लाहची इच्छा नाही तर तुम्हाला स्वच्छ व (मनाने) शुद्ध करण्याची तसेच तुम्हाला पूर्णपणे आपल्या कृपाछत्रात घेण्याची त्याची इच्छा आहे. म्हणजे तुम्ही त्याचे आभार मानावे.

[7] आणि (नेहमी) अल्लाहने तुमच्यावर केलेल्या कृपेचे स्मरण करा. तसेच त्याने तुमच्याकडून घेतलेल्या (त्या) प्रतिज्ञेचाही विसर पडू देऊ नका. (प्रतिज्ञेच्या वेळेस) तुम्ही म्हणाले होते, ‘आम्ही ऐकले आहे आणि आम्ही आज्ञापालन करणार.’ आणि म्हणून अल्लाहचे भय बाळगून राहा, निश्चितपणे अल्लाहला तुमच्या मनामध्ये काय आहे, ते चांगले माहीत आहे. [8] सत्याचा स्वीकार केलेल्या लोकांनो! (श्रद्धावंतांनो!) अल्लाहशी आपली निष्ठा अढळ ठेवा, आणि न्यायबुद्धीने (सत्याची) साक्ष देणारे बना, तुमचे इतरांशी असलेले शत्रुत्व तुम्हाला यासाठी प्रेरित करू नये की, तुम्ही (त्यांच्यासंबंधाने) न्यायबुद्धीचा त्याग करावा. तर नेहमी न्यायपूर्ण व्यवहार करा, (कारण न्यायाने वागणे) ईश-भयाच्या अगदी जवळ आहे. तर अल्लाहची जाण ठेवा, तुम्ही जे काही करता, ते सर्व अल्लाह निश्चितपणे जाणतो. [9] ज्या लोकांनी श्रद्धेचा अंगीकार केला, आणि सत्कर्मे करीत राहिले, अशांना अल्लाहने क्षमा करण्याचे आणि फार मोठे बक्षीस देण्याचे वचन दिले आहे. [10] या उलट जे लोक सत्याचा अस्वीकार करीत राहिले आणि आमच्या संदेशांना खोटे ठरवीत राहिले, नरक अशा लोकांचे अटळ ठिकाण आहे. [11] श्रद्धेचा स्वीकार केलेल्या लोकांनो! अल्लाहने तुमच्यावर

केलेल्या उपकारांची आठवण करा, जेव्हा (तुमच्याशी शत्रुत्व ठेवणारा) समूह तुमच्यावर आक्रमण करणारच होता की, अल्लाहने त्यांचे हात तुमच्यापासून रोखून धरले. तर (तुम्ही) अल्लाहची जाण ठेवा, आणि श्रद्धावंतांनी अल्लाहवरच विश्वास ठेवायला हवे.

12 अल्लाहने इस्राईलच्या मुलांकडून प्रतिज्ञा घेतली आणि त्यांच्यादरम्यान बारा निरीक्षक नियुक्त केले. तेव्हा अल्लाहने सांगितले, (लक्षात असू द्या) 'मी तुमच्या बरोबर आहे'. जर तुम्ही नित्य प्रार्थना करीत राहाल, आणि ज़कात द्याल (दानधर्म कराल) आणि माझ्या पैगंबरांवर विश्वास ठेवाल आणि त्यांना साहाय्य कराल आणि अल्लाहला उत्तम कर्ज द्याल, (अल्लाहच्या कार्यासाठी आपले धन खर्च कराल), तर मी निश्चितपणे तुमच्या पापांना पुसून टाकेन आणि तुम्हाला अशा बागांत प्रवेश देईन, ज्यातून पाण्याचे प्रवाह वाहत असतील, पण तुमच्यापैकी जो कोणी हे (संदेश प्राप्त झाल्यानंतर), सत्याचा अस्वीकार करेल तर तो निश्चितपणे भरकटून सन्मार्गापासून दूर निघून जाईल. 13 त्यांनी आपल्या वचनांचा भंग केल्यामुळे, आम्ही त्यांचा धिक्कार केलेला आहे आणि त्यांची हृदये कठोर केली आहेत. (म्हणून) ते (आता) (अल्लाहकडून) प्रकट झालेल्या शब्दांचा योग्य तो अर्थ न लावता (त्यांच्या संदर्भाला सोडून), त्यांचा विपर्यास करीत आहेत. आणि त्यांना ज्या गोष्टींची शिकवण देण्यात आली होती, तिचा महत्त्वाचा भाग ते (आता) विसरलेले आहेत. थोड्याशा लोकांना सोडून, इतर सर्वांकडून तुम्हाला नेहमी विश्वासघाताचाच अनुभव येत असतो. पण तुम्ही त्यांना क्षमा करा आणि त्यांच्याशी संयमाने वागा. निश्चितच अल्लाहला परोपकार करणारे लोक प्रिय आहेत.

14 आणि जे लोक म्हणतात, 'आम्ही ख्रिस्ती आहोत' आम्ही त्यांच्याकडूनही प्रतिज्ञा घेतली होती. पण ते देखील, त्यांना ज्याची शिकवण देण्यात आली होती, त्याचा महत्त्वाचा भाग विसरलेले आहेत. म्हणून आम्ही पुनरुत्थानाच्या

दिवसापर्यंत, त्यांच्यामध्ये वैमनस्य आणि द्वेष चेतवून ठेवलेला आहे. आणि लवकरच अल्लाह त्यांना त्याची जाणीव करून देणार आहे. जे ते करीत राहिले.

15 (पूर्वीच्या) ग्रंथाचे अनुसरण करणाऱ्यांनो! तुमच्याकडे आता आमचा पैगंबर आलेला आहे आणि तो ग्रंथामधील पुष्कळशा गोष्टी, ज्या तुम्ही लपवीत राहिलात, त्याचा बराचसा भाग तुम्हाला स्पष्ट करून सांगत आहे. आणि (आमचा पैगंबर) तुमच्या बऱ्याच गोष्टींना दुर्लक्ष देखील करीत आहे. (आता) तुमच्याकडे अल्लाहकडून (सन्मार्ग दाखवणारा) प्रकाश व एक स्पष्ट ग्रंथ आलेला आहे. 16 याद्वारे अल्लाह त्या लोकांना शांतीचे मार्ग दाखवीत आहे, जे त्याची मर्जी संपादन करण्यासाठी प्रयत्नरत आहेत. आणि आपल्या कृपेने त्यांना सर्व (प्रकारच्या) अंधकारातून बाहेर काढून प्रकाशाकडे आणत आहे. आणि त्यांना सन्मार्गाकडे मार्गदर्शन करीत आहे. 17 निश्चितच त्या लोकांनी सत्य नाकारण्याचे कृत्य केले, ज्यांनी असे म्हटले, 'अल्लाह मरियमपुत्र येशू मसीह आहे'. (पैगंबर!) (त्यांना) सांगा, 'अल्लाहने मरियमपुत्र येशू मसीहचा आणि त्याच्या आईचा आणि पृथ्वीवर असलेल्या प्रत्येकाचा विनाश करायचे ठरवले, तर कोणाकडे असे सामर्थ्य आहे की, अल्लाहला असे करण्यापासून रोखू शकेल? आकाश आणि जमीन तसेच त्यांच्यामध्ये असलेल्या समस्त सृष्टीवर अल्लाहचीच सत्ता आहे. तो जे इच्छितो ते निर्माण करतो. अल्लाहला काहीही करण्याचे सामर्थ्य प्राप्त आहे.'

18 ज्यू आणि ख्रिस्ती असे म्हणतात की, आम्ही अल्लाहचे पुत्र आहोत आणि त्याचे लाडके आहोत. (पैगंबर!) (तुम्ही त्यांना) विचारा, 'मग तो तुम्हाला तुमच्या अपकृत्यांबद्दल शिक्षा का करतो?' नव्हे, तुम्ही सुद्धा तसेच मनुष्य आहात, जसे त्याने इतर मनुष्यांना निर्माण केले आहे. तो इच्छितो त्यास क्षमा करतो आणि तो इच्छितो त्यास शिक्षा करतो. (समस्त) पृथ्वीवर आणि आकाशात, तसेच त्यांच्यामध्ये जे काही आहे, त्यावर (फक्त) अल्लाहचीच

सत्ता आहे. आणि सर्वांना त्याच्याकडेच परत जायचे आहे. 19 आधीच्या ग्रंथाचे अनुसरण करणाऱ्यांनो! बराच काळ पैगंबरांच्या आगमनात खंड पडल्यानंतर आता आमचा, (हा) पैगंबर तुमच्याकडे आलेला आहे, तो (सत्याचा संदेश) तुमच्यासमोर स्पष्ट करून सांगत आहे. हे अशासाठी की, तुम्ही असे म्हणू नये की, आमच्याकडे कोणीही शुभवार्ता देणारा किंवा आम्हाला सावध करणारा आलेला नाही. तर आता तुमच्याकडे (सत्कर्मे करणाऱ्यांना) शुभवार्ता देणारा आणि (दुष्कर्मे करणाऱ्यांना) सावध करणारा (आमचा प्रतिनिधी) आलेला आहे. आणि अल्लाहला काहीही करण्याचे पूर्ण सामर्थ्य प्राप्त आहे.

20 आणि (ती वेळ आठवा) जेव्हा मूसा आपल्या लोकांना म्हणाला, 'माझ्या समाजबांधवांनो! अल्लाहने तुमच्यावर केलेल्या उपकारांचे स्मरण करा की, त्याने तुमच्यामधून पैगंबरांची नियुक्ती केली, आणि तुमच्या हातात सत्ता दिली, आम्ही तुम्हाला ते (सर्व) दिले, जे जगातील इतर कोणालाही दिले नव्हते. 21 माझ्या समाजबांधवांनो! ह्या पवित्र भूमीत प्रवेश करा, जी अल्लाहने तुमच्यासाठी निश्चित केलेली आहे आणि मागे फिरू नका, नाहीतर (फार मोठ्या) अपयशाला तोंड द्याल.' 22 त्यांनी उत्तर दिले, 'हे मूसा (तुम्ही सांगत आहात) त्या भूमीत निर्दयी (आणि शक्तिशाली) लोक आहेत, जोपर्यंत ते तिथून निघून जात नाहीत, तोपर्यंत आम्ही तिथे अजिबात प्रवेश करणार नाही. पण ते जर तिथून निघून गेले, तर आम्ही अवश्य तिथे प्रवेश करू.' 23 (पण) दोन जण असे होते, जे अल्लाहचे भय बाळगणाऱ्यांपैकी होते, आणि (त्या दोघांवर) अल्लाहने कृपा केलेली होती, ते म्हणाले, 'तुम्ही त्यांच्या विरुद्ध चढाई करीत शहराच्या द्वारातून त्यात प्रवेश करा, एकदा का तुम्ही तिथे प्रवेश केला की, निश्चितपणे तुम्हीच विजयी व्हाल. आणि तुम्ही जर सच्चे श्रद्धावंत असाल तर तुम्ही अल्लाहवर विश्वास ठेवायलाच पाहिजे.' 24 ते म्हणाले, 'हे मूसा आम्ही तिथे कदापि प्रवेश करणार नाही, जोपर्यंत ते लोक तिथे आहेत. (तुम्हाला चढाई

करायचीच असेल) तर तुम्ही व तुमचा पालनकर्ता दोघे जाऊन तिथे युद्ध करा, आम्ही तर इथेच बसून राहणार.'

25 मूसाने अल्लाहकडे प्रार्थना केली, 'हे माझ्या पालनकर्त्या, मी स्वतः आणि माझा भाऊ (हारून)च्या व्यतिरिक्त अन्य कोणावरही मला अधिकार प्राप्त नाही, तर (हे अल्लाह!) तू आम्हाला या विद्रोही लोकांपासून दूर कर.' 26 अल्लाहने उत्तर दिले, 'निश्चितच ती भूमी चाळीस वर्षांपर्यंत, त्यांच्यासाठी प्रतिबंधित राहील, ते (निराश होऊन) पृथ्वीवर भटकत राहतील, तर तुम्ही त्या विद्रोही लोकांच्या बाबतीत दुःखी होऊ नका.'

27 त्यांना आदमच्या दोन मुलांची खरीखुरी गोष्ट सांगा, त्या दोघांनी अल्लाहसमोर बलिदान प्रस्तुत केले, तर त्यांच्यापैकी एकाचे बलिदान स्वीकारण्यात आले, तर दुसऱ्याचे बलिदान स्वीकारण्यात आले नाही. दुसऱ्याने (पहिल्याला, ज्याचे बलिदान स्वीकारले गेले त्याला) म्हटले, 'मी तुला अवश्य ठार करीन' त्यावर पहिल्या भावाने उत्तर दिले, 'अल्लाह फक्त सदाचारी लोकांकडूनच (बलिदान) स्वीकारतो. 28 जर तू मला ठार करण्यासाठी माझ्यावर हात उचलशील, तरी मी तुला ठार करण्यासाठी तुझ्यावर हात उचलणार नाही, मी तर अल्लाहचे भय बाळगतो, जो समस्त सृष्टीचा पालनकर्ता आहे. 29 मी असे इच्छितो की, तू माझ्या पापाचे तसेच तुझ्या पापाचे ओझे तुझ्या शिरावर घ्यावेस आणि तू नरकाच्या आगीत (खितपत पडलेल्या) लोकांत सामील व्हावेस. अत्याचारी लोकांचा हाच मोबदला आहे.'

30 शेवटी त्याच्या द्वेष भावनेने, त्याला आपल्या भावाची हत्या करण्यास उद्युक्त (प्रवृत्त) केले, त्याने त्याची हत्या केली.असे करून त्याने आपल्यावर (फार मोठे) नुकसान ओढवून घेतले. 31 तेव्हा अल्लाहने एक डोंबकावळा पाठवला, तो जमीन उकरू लागला हे यासाठी की, (अल्लाहला) त्यास दाखवायचे होते की, त्याने आपल्या भावाचे शव कसे लपवावे. (त्या कावळ्याला तसे

करताना पाहून) तो ओरडला, 'अरेरे, काय ही माझी अवस्था! मी या कावळ्यासारखा देखील नाही की, आपल्या भावाचे शव लपवून टाकले असते? आणि तो (आपल्या कृत्यावर) फार पश्चात्तापदग्ध झाला.'

32 यामुळेच आम्ही इस्राईलच्या वंशजांसाठी असा नियम करून टाकला होता की, जो कोणी एखाद्याची हत्या करेल, या कारणाशिवाय की, त्याने एखाद्याचा खून केलेला असेल किंवा पृथ्वीवर उपद्रव माजविण्याचे कृत्य केलेले असेल (तर त्यास मृत्युदंड दिल्यास चुकीचे नाही, पण या स्पष्ट कारणांशिवाय जर एखाद्या निष्पाप माणसाची हत्या केली गेली), तर त्याचे हे कृत्य (अल्लाहच्या दृष्टीत असे आहे की), त्याने जणू समस्त मनुष्यजातीची हत्या करून टाकली, (याउलट) एखाद्याने, एखाद्याचे प्राण वाचविले, तर त्याने जणू समस्त मनुष्यजातीचे प्राण वाचविले.
आणि आमचे पैगंबर त्यांच्याकडे सत्याचे स्पष्ट पुरावे घेऊन आले, पण बहुसंख्य लोक पृथ्वीवर असे आहेत, जे अतिरेक करीत असतात. 33 जे लोक अल्लाह आणि त्याच्या पैगंबराविरुद्ध युद्ध करतात, आणि पृथ्वीवर अराजकता माजविण्यासाठी प्रयत्नरत असतात, अशांसाठी योग्य शिक्षा हीच आहे की, त्यांना (एकतर) ठार मारण्यात यावे किंवा सुळावर चढविले जावे किंवा त्यांचे विरुद्ध बाजूंचे हात व पाय कापून टाकले जावे किंवा त्यांना देशातून हाकलून लावले जावे, त्यांच्यासाठी या जगातही अपमानास्पद शिक्षा आहे, पण मृत्यूनंतरच्या जीवनात तर याहूनही भयावह शिक्षेला त्यांना सामोरे जावे लागणार आहे. 34 (पण याला अपवाद म्हणजे ते लोक आहेत) जे, तुम्ही त्यांच्यावर नियंत्रण मिळविण्यापूर्वी पश्चात्ताप करतील. तर हे लक्षात असू द्या की, अल्लाह अतिशय क्षमाशील व दयाळू आहे. 35 श्रद्धेचा अंगीकार केलेल्या लोकांनो! अल्लाहचे भय बाळगा, आणि त्याच्या समीप येण्याचे मार्ग शोधा. आणि त्याच्या कार्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करा, तरच तुम्ही यशस्वी व्हाल. 36 निश्चितच ते लोक,

जे सत्य न मानण्यावर अडून राहिले, त्यांच्याकडे पृथ्वीवर जे काही आहे, ते सर्व आणि तेवढेच आणखी (धन किंवा संपत्ती) असती आणि ते सर्व, त्यांनी पुनरुत्थानाच्या दिवशी भोगाव्या लागणाऱ्या शिक्षेपासून (स्वतःची) सुटका करून घेण्यासाठी मुक्तिदंड म्हणून देऊ केले असते, तरी ते त्यांच्याकडून (कदापि) स्वीकारण्यात आले नसते. आणि त्यांच्यासाठी कठोर शिक्षा अटळ आहे. 37 ते (नरकाच्या) अग्नीतून बाहेर पडू इच्छितील, पण त्यांना त्यातून बाहेर पडणे कदापि शक्य होणार नाही आणि त्यांच्यासाठी कायम स्वरूपाची शिक्षा अटळ आहे. 38 चोरी करणाऱ्यांचे हात कापून टाका, मग ती स्त्री असो वा पुरुष. हा त्यांच्या कमाईचा मोबदला आहे आणि इतरांसाठी बोध असलेली अल्लाहकडून शिक्षा. आणि अल्लाह सर्वशक्तिमान आहे, बुद्धिमान आहे.
39 पण जो कोणी आपल्या अपराधानंतर पश्चात्ताप करील आणि स्वतःची सुधारणा करील, तर (अशा व्यक्तीवर) अल्लाह निश्चितपणे दया करील. (आणि त्याच्या पश्चात्तापाचा स्वीकार करील). खरोखर, अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे. 40 तुम्ही जाणत नाही का की, अल्लाहचीच सत्ता आहे आकाशात व पृथ्वीवर? तो इच्छितो त्यास शिक्षा करतो आणि इच्छितो त्यास क्षमा करतो. अल्लाहला काहीही करण्याचे सामर्थ्य प्राप्त आहे. 41 पैगंबर! त्या लोकांमुळे तुम्ही दुःखी होऊ नका, जे सत्य नाकारण्यासाठी एकमेकांशी चढाओढ करीत आहेत. जे तोंडाने तर म्हणतात, 'आम्ही विश्वास ठेवणारेच आहोत' पण त्यांच्या हृदयात तसे काहीच नाही, (आणि) ज्यू लोकांत देखील असे आहेत, जे कोणत्याही खोट्या गोष्टीला मोठ्या उत्साहाने ऐकतात आणि (त्यांच्यात असेही आहेत), जे तुमचे म्हणणे (आपल्या धर्मपंडितांना) कळविण्यासाठी ऐकतात, जे (केवळ अहंकारापोटी) तुमच्याकडे येत नाहीत. (आणि) त्यांचे ते (धर्मपंडित) (अल्लाहकडून) प्रकट झालेल्या शब्दांचा संदर्भाशिवाय अर्थ काढून त्याचा विपर्यास करतात (आणि) ते लोकांना म्हणतात की, तुम्हाला अमुक-अमुक शिकवण

देण्यात आली तरच तिचा तुम्ही स्वीकार करा, आणि जर तशी शिकवण देण्यात न आल्यास, तुम्ही (स्वतःला) त्यापासून दूर ठेवा.

आणि अल्लाह एखाद्याची परीक्षा घेऊ इच्छित असेल, तर त्याच्या बाबतीत अल्लाहपुढे तुमचे काहीही चालू शकणार नाही. हे असे लोक आहेत की, (आता) अल्लाहही त्यांची हृदये शुद्ध करू इच्छित नाही. त्यांना या जगात अपमान सहन करावा लागणार आहे आणि मृत्यूनंतरच्या (शाश्वत) जगात तर त्यांना कठोर शिक्षा भोगावी लागणार आहे.

42 ते खोट्या गोष्टी नेहमी मोठ्या उत्साहाने ऐकतात, तसेच ते गैरमार्गाने कमावलेल्या वस्तू फार आवडीने खातात. जर ते तुमच्याकडे (कोणत्याही निर्णयासाठी) आले तर तुम्ही त्यांच्यामध्ये निर्णय करा किंवा त्यांच्यापासून दूर राहा. आणि जर तुम्ही त्यांच्यापासून दूर राहिलात, तर ते तुमचे कोणतेही नुकसान करू शकणार नाहीत. आणि जर तुम्ही त्यांच्यामध्ये निर्णय कराल, तर न्यायपूर्वक निर्णय करा. जे न्यायपूर्ण व्यवहार करतात ते अल्लाहला प्रिय आहेत.
43 ते (पूर्वीचे ग्रंथधारक) निर्णय घेण्यासाठी तुमच्याकडे कशाला येतात? जेव्हा की, त्यांच्याकडे तौरात (पूर्वीचा ईश्वरीय ग्रंथ) आहे ज्यात अल्लाहचे आदेश आहेत, आणि नंतर (तुमच्या निर्णयाकडेही) ते पाठ फिरवतात. (कारण वस्तुस्थिती अशी आहे की), ते सच्चे श्रद्धावंत नाहीतच.

44 आम्ही (आधी) तौरात (या ग्रंथाला) प्रकट केले होते. ज्यात (अल्लाहचा) उपदेश आणि (सन्मार्ग दाखवणारा) प्रकाश होता. आमचे आज्ञाधारक पैगंबर याच्याच आधारे, ज्यू लोकांदरम्यान निवाडा करीत असत. तसेच (नंतर) धर्माचारी व (धार्मिक कायद्याचे ज्ञान असलेले) विद्वान लोकही (त्याच्याच आधारे निर्णय करीत असत). कारण अल्लाहच्या ग्रंथाचे जतन करण्याची जबाबदारी त्यांच्यावर सोपविण्यात आलेली होती व यावर ते साक्षी होते. तर (इस्राईलच्या मुलांनो!) तुम्ही लोकांचे भय बाळगू नका, तर माझेच भय बाळगा. आणि

क्षुल्लक फायदा प्राप्त करण्यासाठी माझ्या संदेशांचा सौदा करू नका. आणि जो कोणी अल्लाहने पाठवलेल्या ग्रंथा नुसार निर्णय करणार नाही, तर असेच लोक सत्य नाकारणारे आहेत. 45 आम्ही तौरातमध्ये (पैगंबर मूसाकडे आलेल्या अल्लाहच्या ग्रंथात) त्यांच्यासाठी असा नियम निश्चित केला होता की, प्राणाच्या बदल्यात प्राण, डोळ्याच्या बदल्यात डोळा, नाकाच्या बदल्यात नाक, कानाच्या बदल्यात कान, दाताच्या बदल्यात दात आणि जखमेच्या बदल्यात तशीच जखम (म्हणजे जशाला अगदी तसेच नुकसान बदला घेताना पोचविता येईल) पण जो कोणी आपला हा बदला घेण्याचा अधिकार सोडून देईल, तर (माफ करण्याचे त्याचे) हे (कृत्य) त्याच्या (स्वत:च्या पापांचे) प्रायश्चित्त ठरेल. आणि जे कोणी अल्लाहने पाठवलेल्या (ग्रंथानुसार) निर्णय करणार नाहीत, तर तेच लोक खरे दुराचारी आहेत. 46 आणि आम्ही येशू मसीहला (आधीच्या पैगंबरांच्या) पदचिन्हांचे अनुसरण करण्यासाठी तसेच तौरात(पैकी जे काही लोकांकडे शिल्लक होते), त्याची सत्यता प्रमाणित करण्यासाठी पाठविले होते. आम्ही त्याला गॉस्पेल (बायबल) हा ग्रंथ प्रदान केला होता, ज्यात (अल्लाहचा) उपदेश व (सन्मार्ग दाखवणारा) प्रकाश होता. आणि तौरात (या ग्रंथापैकी) जे (लोकांजवळ) शिल्लक राहिले होते त्याची सत्यता प्रमाणित करणारे होते. आणि त्या (ग्रंथात) अल्लाहचे भय बाळगणाऱ्यांसाठी (पुरेपूर) मार्गदर्शन व हितोपदेश होते. 47 आणि गॉस्पेलचे अनुसरण करणाऱ्यांनी (गॉस्पेल मध्ये) अल्लाहने जे काही प्रकट केलेले आहे, त्यानुसार (आपसातील वादासंबंधाने) निर्णय करावेत. आणि जो कोणी अल्लाहने प्रकट केलेल्या (मार्गदर्शक तत्त्वांनुसार) निर्णय करणार नाही, तर असेच लोक विद्रोही आहेत.

48 (पैगंबर!) आम्ही तुमच्याकडे सत्यावर आधारित हा ग्रंथ पाठविला आहे. आणि (हा ग्रंथ) आधीच्या ग्रंथापैकी जे काही सत्य अद्याप शिल्लक आहे, ते प्रमाणित करणारा आहे, आणि त्यातील सत्य उघड करणारा आणि त्याचे

रक्षण करणारा आहे. आणि म्हणून तुम्ही, अल्लाहने जे काही प्रकट केले आहे, त्यानुसारच त्यांच्यामध्ये निर्णय करा. आणि तुमच्याकडे जे सत्य आलेले आहे, त्याला सोडून तुम्ही त्यांच्या दुष्ट प्रवृत्तींचे अनुसरण करू नका.

तुमच्यापैकी प्रत्येक समूहाकरिता आम्ही एक (वेगळा) कायदा व मार्ग निश्चित केलेला आहे.

अल्लाहने इच्छिले असते तर तुम्हा सर्वांना एकाच संप्रदायाचे लोक बनवले असते. (पण त्याने असे यासाठी केले नाही कारण,) तो त्यात तुमची परीक्षा पाहू इच्छितो, जे त्याने तुम्हाला दिलेले आहे. (तर) तुम्ही सत्कृत्ये करण्याच्या बाबतीत एकमेकाच्या पुढे जाण्याचा प्रयत्न करा. तुम्हा सर्वांना अल्लाहकडेच परत जायचे आहे. तेव्हा तो ज्याबाबतीत तुम्ही मतभेद करीत होता, त्या सर्व गोष्टींची (वस्तुस्थिती) तुमच्यासमोर स्पष्ट करेल.

49 आणि (पैगंबर!) (अल्लाहकडून तुम्हाला असा आदेश दिला जात आहे की), जे काही अल्लाहने तुमच्याकडे पाठविले आहे, त्याआधारे तुम्ही त्यांच्यामध्ये निर्णय करा. त्यांच्या दुष्ट प्रवृत्तींचे अनुसरण करू नका, तसेच त्यांच्यापासून सावध राहा, (म्हणजे असे अजिबात होऊ नये) की, जे काही अल्लाहने तुमच्याकडे पाठविले आहे, त्याच्या एखाद्या भागापासून (आदेशापासून) त्यांनी तुम्हाला दूर न्यावे. आणि जर ते तुमच्या निर्णयाकडे पाठ फिरवतील, (जो तुम्ही अल्लाहच्या मार्गदर्शनाच्या आधारे केला आहात), तर लक्षात ठेवा की, (आता) अल्लाह त्यांना त्यांच्या पापांची शिक्षा करू इच्छित आहे. निश्चितच (लोकांमध्ये) बहुसंख्य लोक आज्ञा न पाळणारे आहेत. 50 (हा अल्लाहचा ग्रंथ प्रकट होण्यापूर्वी अनेकेश्वरवादी लोक) ज्या कायद्यांच्या आधारे (निर्णय करायचे) त्या आधारे (आता) हे निर्णय करवून घेऊ इच्छितात की काय? पण जे लोक दृढ विश्वास ठेवणारे आहेत, त्यांच्यासाठी अल्लाहपेक्षा श्रेष्ठ दुसरा कोण न्यायाधीश असू शकतो?

51श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! ज्यू आणि ख्रिस्ती यांच्याशी मित्रत्वाचे संबंध प्रस्थापित करू नका. ते एकमेकांचे मित्र आहेत. आणि तुमच्यापैकी जो कोणी त्यांच्याशी मित्रत्वाचे संबंध प्रस्थापित करेल, तर तो निश्चितच त्यांच्यापैकी होईल. अल्लाह अन्यायी लोकांना कदापि मार्ग दाखवीत नाही.

52 आणि तुम्ही पाहाल ज्यांच्या हृदयात विकृती आहे (म्हणजे जे खरे श्रद्धावंत नाहीत), ते (इस्लामशी वैर ठेवणारे ज्यू व ख्रिस्ती यांची मर्जी संपादन करण्यासाठी) एकमेकांशी चढाओढ करीत आहेत. आणि म्हणतात, '(आम्ही श्रद्धावंतांसोबत राहिलो तर) आमच्यावर विपत्ती येईल, असे आम्हाला भय वाटते.' पण अल्लाह श्रद्धावंतांसाठी निर्णायक विजय घडवून आणील किंवा आपल्यातर्फे एखादी अनुकूल घटना प्रकट करील. तेव्हा त्यांनी आपल्या मनात जे लपवले होते, त्याबद्दल त्यांना पश्चात्ताप होईल. 53 तेव्हा श्रद्धा धारण केलेले लोक (एकमेकांना) म्हणतील, 'हेच ते लोक आहेत का, जे मोठ्या उत्साहाने अल्लाहच्या शपथा घेऊन, खात्री पटवून द्यायचे की, आम्ही तुमच्याबरोबर आहोत?' त्यांचे कर्म वाया जाणार आहेत, आणि त्यांच्या वाट्याला (फक्त) नुकसानच येणार आहे.

54 इमान धारण केलेल्या लोकांनो! तुमच्यापैकी जो कोणी आपल्या श्रद्धेचा त्याग करील तर (त्याने हे लक्षात ठेवावे की), अल्लाह (तुमच्या जागी) लवकरच अशा लोकांना घेऊन येईल की, जे अल्लाहला प्रिय असतील आणि त्यांनाही अल्लाह प्रिय असेल. ते श्रद्धावंतांच्या बाबतीत नम्रभाव बाळगणारे असतील, तर सत्य नाकारणाऱ्या श्रद्धाहीनांच्या बाबतीत खंबीर असतील, (म्हणजे त्यांच्या श्रद्धाहीनतेचा प्रभाव स्वीकारणारे नसतील). ते अल्लाहच्या कार्यासाठी आपले प्राण पणाला लावतील, आणि कोणी टिका (किंवा निंदा) करीत असेल तर त्याची त्यांना (अजिबात) पर्वा नसेल. ही अल्लाहची कृपा आहे, तो इच्छितो त्यास ती प्रदान करतो. अल्लाह अतिशय उदार आहे, सर्व काही जाणणारा आहे. 55 तुमचे मित्र

(साहाय्यक) तर केवळ अल्लाह आणि त्याचा पैगंबर आणि ते (लोक) आहेत ज्यांनी श्रद्धा धारण केली आहे, जे (नमाज़रूपी) नित्य प्रार्थना करणारे आहेत, आणि ज़कातरूपी (दानकार्य करणारे) आहेत, आणि ते (अल्लाहसमोर नमाज़ामध्ये) नमन करणारे आहेत. 56 आणि जो कोणी अल्लाहला आणि (त्याचा प्रतिनिधी असलेल्या) पैगंबराला आणि श्रद्धावंतांना मित्र बनवील, तर (त्याने हे जाणून घ्यावे की), अल्लाहचाच पक्ष निश्चितपणे विजयी होणार आहे.

57 इमान धारण केलेल्या लोकांनो! तुमच्यापूर्वी ज्यांना ग्रंथ देण्यात आला होता त्यांच्यापैकी ज्या लोकांनी तुमच्या धर्माला थट्टेचा व करमणुकीचा विषय बनविला आहे त्या लोकांशी, तसेच (अनेकेश्वरवादी) श्रद्धाहीन लोकांशी मित्रत्वाचे संबंध प्रस्थापित करण्याचा (अजिबात) प्रयत्न करू नका. आणि (नेहमी) अल्लाहच्या (उपस्थितीची) जाण ठेवा, जर तुम्ही (सच्चे) श्रद्धावंत असाल. 58 आणि जेव्हा तुम्ही (लोकांना) नमाज़ासाठी बोलावता, तेव्हा ते लोक त्यास थट्टेचा व करमणुकीचा विषय बनवतात. याचे साधे कारण म्हणजे ते आपल्या बुद्धीचा वापर करीत नाहीत. 59 (तुम्ही त्यांना) सांगा, '(पूर्वीच्या) ग्रंथांना मानणाऱ्यांनो! तुम्हाला आमचा केवळ यासाठी संताप येतो का की, आम्ही अल्लाहवर आणि आमच्याकडे जे पाठविण्यात आले आहे त्यावर, आणि यापूर्वी जे पाठविण्यात आले होते त्यावर विश्वास ठेवणारे आहोत? आणि (वास्तविकता ही आहे की), तुमच्यापैकी बहुसंख्य लोक आज्ञा न पाळणारेच आहेत.' 60 (तुम्ही त्यांना) विचारा, 'मी तुम्हाला ते सांगू का की, अल्लाहकडे याहूनही अधिक वाईट मोबदला कोणाला मिळणार आहे? त्यांना, ज्यांना अल्लाहने धिक्कारले आहे, ज्यांच्यावर तो क्रोधीत झालेला आहे आणि ज्यांच्यातून काहींना त्याने माकड आणि डुक्कर बनवले आहे, कारण त्यांनी सैतानाची उपासना केली, त्यांची खरोखरच फार वाईट अवस्था आहे आणि ते सन्मार्गापासून फार

दूर गेलेले आहेत.’

61 आणि जेव्हा ते तुमच्याकडे येतात, तेव्हा ते म्हणतात, ‘आम्ही तर श्रद्धावंतांपैकीच आहोत.’ पण ते तर तुमच्याकडे सत्याचा स्वीकार न करण्याच्या निश्चयाने येतात, आणि सत्य नाकारत निघून जातात. आणि ते जे काही लपवीत आहेत, ते सर्व अल्लाहला चांगले ठाऊक आहे. 62 आणि त्यांच्यापैकी अनेकांना तुम्ही अशा अवस्थेत पाहाल की, ते पाप आणि अत्याचार यांच्या बाबतीत एकदुसऱ्यापेक्षा जास्त उत्साह दाखवीत आहेत. तसेच जे निषिद्ध आहे, ते गिळंकृत करण्यासाठी (मोठी तत्परता दाखवीत आहेत). खरोखर, किती वाईट कृत्य आहेत, जे ते करीत आहेत! 63 त्यांचे धर्मपंडित आणि जाणकार लोक त्यांना अभद्र शब्दांचा उपयोग करण्यापासून, तसेच प्रतिबंधित गोष्टी गिळंकृत करण्यापासून का रोखत नाहीत? निश्चितच किती वाईट कृत्य आहेत, जे ते करीत आहेत!

64 आणि ज्यू म्हणतात, ‘अल्लाहचे हात बांधलेले आहेत.’ त्यांचेच हात बांधले जावो! आणि त्यांच्यावर अल्लाहकडून धिक्कार होवो, त्यासाठी की, ते अल्लाहसंबंधाने अनुचित शब्द आपल्या (तोंडून) बोलत आहेत. खरोखर, अल्लाहचे हात पूर्णतः खुले आहेत. तो ज्याप्रमाणे इच्छितो त्याप्रमाणे आपली (कृपा लोकांवर) करतो. (पैगंबर!) तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याकडे जे काही पाठविण्यात आलेले आहे, त्यामुळे त्यांच्यापैकी अनेकांच्या मनात विद्रोहाची व अश्रद्धेची भावना निश्चितपणे वाढीस लागणार आहे. आणि आम्ही पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत त्यांच्यामध्ये वैमनस्याची व द्वेषाची भावना (यांच्या सत्य नाकारण्याच्या हट्टापोटी) निर्माण केली आहे.

ज्या-ज्यावेळी ते युद्धाची आग भडकवतात, त्या-त्यावेळी अल्लाह ती विझवून टाकतो. आणि ते पृथ्वीवर अराजकता माजविण्याचा प्रयत्न करीत असतात. आणि जे लोक अराजकता निर्माण करतात, ते अल्लाहला (अजिबात)

प्रिय नाहीत.

65 आधी ग्रंथ देण्यात आलेले लोक, जर (सत्य) श्रद्धेचा अंगीकार केले असते आणि अल्लाहचे भान ठेवून जीवन व्यतित केले असते, तर निश्चितच आम्ही त्यांच्याकडून (आधी घडलेली) वाईट कृत्ये पुसून टाकली असती. आणि आम्ही त्यांना अर्थातच निर्भेळ आनंदाच्या बागांत प्रवेश दिला असता. 66 आणि जर त्यांनी (अल्लाहकडून पूर्वी आलेले ग्रंथ) तौरात आणि इंजील आणि (आता) जे काही त्यांच्या पालनकर्त्याकडून पाठविण्यात आले, त्यांचे अनुपालन केले असते, तर त्यांना आकाश व पृथ्वीवरील (अल्लाहच्या) कृपाप्रसादांतून खाण्या–पिण्यासाठी (भरपूर वाटा) प्राप्त झाला असता. त्यांच्यापैकी काही जण सन्मार्ग लाभलेले आहेत. पण त्यांच्यापैकी बहुसंख्य लोक जे काही करीत आहेत, ते खरोखर (फार) वाईट आहे.

67 पैगंबर! जे काही तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याकडे पाठविण्यात आले आहे, ते (लोकांपर्यंत) पोचवा. आणि जर तुम्ही असे केले नाही तर तुम्ही अल्लाहचा संदेश पोचविण्याची जबाबदारी पार पाडलीच नाही, (असा त्याचा निष्कर्ष असेल, म्हणजे ते पोचविणे तुमचे अटळ कर्तव्य आहे, त्याचसाठी तुम्हाला नियुक्त करण्यात आलेले आहे). (आणि या कार्यात) अल्लाह तुमचे लोकांपासून संरक्षण करेल. निश्चितच अल्लाह सत्य स्वीकारण्यास नकार देणाऱ्या लोकांना सन्मार्ग दाखवीत नसतो.

68 (तुम्ही त्यांना) सांगा, पूर्वीच्या ग्रंथांना मानणाऱ्यांनो! तुमच्या श्रद्धेला तोपर्यंत कुठलाही वैध आधार प्राप्त होणार नाही. जोपर्यंत तुम्ही तौरात व इंजील यांचे तसेच तुमच्या पालनकर्त्याकडून (या पैगंबरामार्फत आता) जे काही पाठविण्यात आलेले आहे, त्याचे अनुपालन करीत नाही.

(पैगंबर!) जे काही तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्यावर प्रकट करण्यात आले आहे, त्यामुळे त्यांच्यापैकी अनेकांच्या मनात निश्चितपणे विद्रोहाची व

अश्रद्धेची भावनाच वाढीस लागणार आहे. तेव्हा तुम्ही सत्य नाकारणाऱ्या लोकांच्या बाबतीत दुःखी होऊ नका. 69 (या ग्रंथावर) श्रद्धा ठेवणारे (म्हणजे मुसलमान) तसेच ज्यू व साबी आणि ख्रिस्ती यांच्यापैकी जे कोणी अल्लाहवर व अंतिम दिवसावर विश्वास ठेवतील आणि सत्कर्मे करतील तर अशांना (मृत्यूनंतरच्या नेहमीच्या जीवनात) कसलेही भय किंवा दुःख (कधीही) पोहोचणार नाही.

70 आम्ही इस्राईलच्या मुलांकडून प्रतिज्ञा घेतली. आणि त्यांच्याकडे अनेक पैगंबर पाठविले. पण जेव्हाही पैगंबर त्यांच्याकडे अशी शिकवण घेऊन आला की, जी त्यांच्या मनाला आवडत नव्हती. तेव्हा (त्यांनी विद्रोही भूमिका घेऊन) काहींना खोटे ठरविले, तर काही पैगंबरांची त्यांनी हत्या केली. 71 आणि त्यांना वाटले की, (असे केल्यामुळे) त्यांना कोणतीही शिक्षा होणार नाही. अशाप्रकारे ते (मनाने) आंधळे व बहिरे बनले. नंतर अल्लाहने (त्यांच्यावर दयादृष्टी दाखवून) त्यांच्या पश्चात्तापाचा स्वीकार केला. तरीही पुन्हा त्यांच्यापैकी अनेक (जाणूनबुजून) आंधळे व बहिरे बनले. अल्लाहला त्यांच्या सर्व कृत्यांची पूर्ण जाणीव आहे.

72 निश्चितपणे 'सत्य' नाकारत आहेत ते लोक, जे म्हणतात, 'मरियमपुत्र येशू मसीहच अल्लाह आहे.' पण स्वतः येशू मसीहनेच असा संदेश दिला होता, 'इस्राईलच्या मुलांनो! (केवळ) अल्लाहची उपासना करा, जो माझाही पालनकर्ता आहे आणि तुमचाही पालनकर्ता आहे.' (आणि लक्षात असू द्या), जो कोणी इतरांना अल्लाहचा समकक्ष ठरवेल, अशा व्यक्तीला अल्लाह स्वर्गात कदापि प्रवेश देणार नाही आणि अशा व्यक्तीचे ठिकाण (तर केवळ नरकाची) आग आहे. अत्याचारी लोकांचा कोणीही साहाय्यकर्ता असणार नाही. 73 निश्चितपणे ते(ही) सत्य नाकारणारे आहेत, जे म्हणतात, 'अल्लाह तिघांपैकी एक आहे.' (पण सत्य एकच आणि एकच आहे, आणि ते म्हणजे) अल्लाहशिवाय दुसरा कोणीही ईश्वर नाही. आणि ते जे म्हणतात, त्यापासून जर ते परावृत्त झाले

नाहीत, तर त्यांच्यापैकी सत्य नाकारण्यावर ठाम असलेल्या त्या श्रद्धाहीनांवर फार मोठे संकट (शिक्षा) ओढवेल. [74] ते (आपल्या भूतकाळाबद्दल) पश्चात्ताप करीत अल्लाहकडे का वळत नाहीत? तसेच त्याच्याकडे माफीसाठी याचना का करीत नाहीत? (जेव्हा की), अल्लाह (तर) अतिशय क्षमाशील व दयाळू आहे. [75] मरियमपुत्र येशूमसीह हा (अल्लाहच्या) संदेशवाहकाव्यतिरिक्त अन्य कोणीही नव्हता. त्याच्या सारखे अनेक पैगंबर आधी होऊन गेले. आणि त्याची आई (मरियम) (सत्यापासून कधीही न ढळणारी) एक सदाचारी स्त्री होती. (अन्य लोकांप्रमाणेच) ते दोघेही (येशू व त्याची आई) जेवण करीत असत.

पाहा, आम्ही त्यांच्या भल्यासाठी या संदेशांना त्यांच्यासमोर स्पष्ट करून सांगत आहोत. आणि पाहा, त्यांची बुद्धी कशाप्रकारे मारली जात आहे. [76] (त्यांना) सांगा, 'अल्लाहला सोडून तुम्ही अशाची उपासना कराल का, ज्याच्याकडे तुम्हाला ना नुकसान पोचविण्याची शक्ती आहे, ना लाभ पोचविण्याची. (वास्तविकता ही आहे की), केवळ अल्लाह सर्व काही ऐकणारा आणि सर्व काही जाणणारा आहे.'

[77] (त्यांना) सांगा, 'पूर्वीच्या ग्रंथांना मानणाऱ्यांनो! धर्माच्या बाबतीत अतिरेक करू नका, आणि त्या लोकांच्या दुष्ट प्रवृत्तींचे अनुसरण करू नका, जे यापूर्वी (स्वत:) सन्मार्गापासून दूर गेले, तसेच त्यांनी इतर अनेकांनाही सन्मार्गापासून दूर नेले आणि अद्याप सन्मार्गापासून (भरकटत) दूरच जात आहेत.'

[78] इस्राईलच्या मुलांपैकी जे लोक सत्य नाकारण्यावर ठाम राहिले त्यांना (पैगंबर) दाऊद आणि (पैगंबर) मरियमपुत्र येशू मसीह यांनी शाप दिलेला आहे. हे यासाठी की, त्यांनी अवज्ञा केली आणि ते मर्यादांचे उल्लंघन करणारे होते. [79] जी पापकृत्ये ते करीत असत त्यापासून एकमेकांना ते रोखत नसत. किती वाईट होते ते, जे ते करीत होते! [80] (आणि आता) तुम्ही त्यांच्यात अनेक लोक असे

पाहू शकता, जे सत्य नाकारणाऱ्या श्रद्धाहीनांसोबत मित्रत्वाचे संबंध ठेवतात. आणि फार वाईट आहे ते, जे त्यांनी स्वत:साठी पुढे पाठविलेले आहे. (अशाप्रकारे) त्यांनी अल्लाहच्या क्रोधाला (स्वत:वर) ओढवून घेतले. आणि ते नेहमीसाठी शिक्षा भोगत राहतील. 81 आणि जर ते अल्लाहवर तसेच पैगंबरावर आणि त्यावरही जे पैगंबराकडे (लोकांच्या मार्गदर्शनासाठी) पाठविले गेले, (खऱ्या अर्थाने) विश्वास ठेवणारे बनले असते, तर त्यांनी सत्य नाकारणाऱ्या श्रद्धाहीनांसोबत मित्रत्वाचे संबंध प्रस्थापित केलेच नसते. (पण सत्य हे आहे की), त्यांच्यात अनेक आज्ञा न पाळणारेच आहेत.

82 तुम्हाला निश्चितच असे आढळून येईल की, ज्यू लोक आणि इतरांना (अल्लाहचे) समकक्ष ठरवणारे (अनेकेश्वरवादी) लोक, श्रद्धावंतांच्या बरोबर वैमनस्य ठेवण्याच्या बाबतीत सर्वात अधिक कट्टर आहेत. आणि निश्चितच, हे ही तुम्हाला आढळेल की, स्वत:ला ख्रिस्त म्हणवणारे लोक, श्रद्धावंतांशी मैत्री करण्याच्या बाबतीत सर्वात अधिक जवळचे आहेत. त्याचे कारण त्यांच्यामध्ये धर्मपंडित व तपस्वी लोक आहेत आणि ते अहंकारी नाहीत. 83 आणि जेव्हा ते या पैगंबराकडे जे प्रकट करण्यात आले आहे ते ऐकतात, तेव्हा तुम्ही पाहाल त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहत आहेत. (या कारणास्तव त्यांची अशी अवस्था झाली आहे की), त्यांना सत्याची (पूर्णपणे) ओळख पटली आहे. (तेव्हा) त्यांच्या तोंडून असे उद्‌गार बाहेर पडतात, ‘हे प्रभू! आम्ही श्रद्धेचा अंगीकार केला आहे, तू आमचा त्या लोकांत समावेश कर, जे सत्याची साक्ष देतात. 84 आणि आम्ही अल्लाहवर आणि आमच्याकडे जे सत्य आलेले आहे, त्यावर का म्हणून विश्वास ठेवू नये? आमची तर मनापासून ही इच्छा आहे की, आमच्या पालनकर्त्याने आमचा समावेश सदाचरणी लोकांत करावा.’ 85 तर अल्लाह त्यांना त्यांच्या श्रद्धेच्या मोबदल्यात अशा बागा प्रदान करेल, ज्यातून पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह वाहत असतील. त्यांमध्ये ते कायम निवास करतील. आणि

हाच आहे मोबदला सदाचारी लोकांचा. 86 पण जे लोक सत्याचा अस्वीकार करण्यावर ठाम राहिले, आणि आमच्या संदेशांना खोटे ठरविले. तर असेच लोक नरकवासी आहेत.

87 श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! ज्या (आरोग्यवर्धक) चांगल्या वस्तू अल्लाहने तुमच्यासाठी वैध ठरवलेल्या आहेत, त्या तुम्ही अवैध ठरवून (त्यांपासून स्वत:ला वंचित करू नका). आणि मर्यादांचे उल्लंघन करू नका. मर्यादांचे उल्लंघन करणारे लोक अल्लाहला (अजिबात) प्रिय नाहीत. 88 आणि अल्लाहने तुम्हाला ज्या (आरोग्यदायी) चांगल्या वस्तू दिलेल्या आहेत त्यातून खा, आणि अल्लाहचे भय बाळगा, ज्याच्यावर तुम्ही विश्वास ठेवता. 89 अल्लाह तुमच्या निरर्थक शपथांबद्दल तुम्हाला जाब विचारणार नाही, पण निश्चयपूर्वक घेतलेल्या शपथांबद्दल मात्र तो तुम्हाला अवश्य जाब विचारील. तर याचे परिमार्जन हे आहे की, तुम्ही दहा गरिबांना ते भोजन द्यावे, जे साधारणपणे तुम्ही तुमच्या कुटुंबीयांना देता, किंवा त्यांना वस्त्र पुरवावे किंवा गुलामगिरीतून एका माणसाला मुक्त करावे. परंतु ज्या कोणाची हे करण्याची (ऐपत) नसेल त्याने तीन दिवस उपवास करावा. हे तुम्ही घेतलेल्या शपथांचे परिमार्जन आहे, (जेव्हा तुम्ही त्या मोडाल). पण तुम्ही आपल्या शपथा पाळा.

अशा प्रकारे अल्लाह त्याचे संदेश तुम्हाला स्पष्ट करून सांगत आहे. ते यासाठी की, तुम्ही त्याच्या उपकारांची जाण ठेवावी.

90 श्रद्धेचा अंगीकार केलेल्या लोकांनो! मादक द्रव्ये, जुगार, मूर्ती आणि शकुनी बाणांचा (उपयोग) ही सर्व गलिच्छ व सैतानाची कामे आहेत. म्हणून तुम्ही या सर्व गोष्टींपासून दूर राहा, म्हणजे तुमचा उत्कर्ष होईल. 91 सैतान तर दारू आणि जुगार यांच्या साहाय्याने तुमच्यामध्ये वैमनस्य आणि द्वेष निर्माण करू इच्छितो आणि अल्लाहचे स्मरण आणि नमाज़ (प्रार्थना)पासून तो तुम्हाला परावृत्त करू इच्छितो. मग तुम्ही या गोष्टींपासून अलिप्त राहणार का? 92 (तर तुम्ही)

अल्लाहच्या आज्ञेचे पालन करा आणि पैगंबराच्या आज्ञेचे पालन करा आणि दुष्ट शक्तींच्या विरुद्ध नेहमी सावध राहा. पण जर तुम्ही याकडे पाठ फिरवाल तर लक्षात असू द्या की, आमच्या पैगंबराचे कर्तव्य, संदेश स्पष्ट करून पोचवणे एवढेच आहे. 93 जे लोक (सत्य) श्रद्धेचा अंगीकार करून सत्कर्मे करीत आहेत, अशांना त्यांनी (भूतकाळात) (वैध, अवैध जे काही) भक्षण केले असेल त्याबद्दल (आता श्रद्धावंत बनल्यानंतर) त्यांच्यावर दोष असणार नाही. (कारण आता) ते अल्लाहचे भय बाळगतात आणि त्याच्यावर विश्वास ठेवतात आणि सत्कर्मे करतात. (आणि पुढे अधिक प्रकर्षाने) अल्लाहचे भय बाळगतात आणि दृढ विश्वास ठेवतात. (म्हणजे सत्य त्यांना उमजल्यामुळे त्यांच्यात असा बदल आलेला आहे. आणि त्यांचे जीवन अशा प्रकारे सुरू आहे की), ते भय बाळगतात आणि सत्कर्मे करतात. आणि सत्कर्मे करणारे लोक अल्लाहला प्रिय आहेत.

94 श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! (तुम्ही हजच्या प्रवासात असताना, जेव्हा शिकार करणे प्रतिबंधित आहे) अल्लाह तुमची अशा शिकाराद्वारे परीक्षा घेईल, ज्याच्यापर्यंत तुमचे हात आणि भाले पोचू शकतात. म्हणजे अल्लाहला हे पाहता यावे की, (तुमच्यापैकी) कोण त्याला न पाहता त्याचे भय बाळगतो. मग यानंतरही जो कोणी मर्यादांचे उल्लंघन करील, त्यास यातनामयी शिक्षा दिली जाईल. 95 इमानधारकांनो! तुम्ही हजचा पोषाख परिधान केलेले असताना (म्हणजे हज करीत असताना) शिकार मारू नका, आणि तुमच्यापैकी जो कोणी जाणूनबुजून शिकार मारील, तर त्यास भरपाई म्हणून तसाच प्राणी द्यावा लागेल, जशा प्राण्याला त्याने ठार केले आहे. व याचा निर्णय तुमच्या मधील दोन न्यायी व्यक्ती करतील. आणि त्या प्राण्याला (बळी देण्यासाठी) काबागृहाकडे पोचवावे. किंवा (त्या प्रतिबंधित कृत्याचे) परिमार्जन म्हणून काही गरजू लोकांना भोजन द्यावे लागेल. किंवा त्या प्रमाणात उपवास करावा, ज्यायोगे त्याला त्याच्या कृत्याची शिक्षा भोगता यावी. आधी झालेल्या (चुकांबद्दल) अल्लाहने क्षमा केलेली आहे.

परंतु जो कोणी पुन्हा असे करील, तर (त्या अपराधाबद्दल) अल्लाह त्यास शिक्षा करेल. अल्लाह सर्वशक्तिमान आहे आणि (अपराधांबद्दल) बदला घेणारा आहे.

96 समुद्रातील मासे पकडणे आणि ते खाणे तुमच्यासाठी वैध आहे (प्रतिबंधित नाही). तुमच्यासाठी (म्हणजे स्थानिकांसाठी) आणि समुद्री मार्गाने यात्रा करणाऱ्यांसाठी निर्वाहाची तरतूद म्हणून, (ते वैध ठरविण्यात आले आहे). पण जेव्हा तुम्ही हज करीत असाल, तेव्हा (हजच्या ठरावीक कालावधीमध्ये) जमिनीवरील शिकार (करणे) तुमच्यासाठी प्रतिबंधित आहे. आणि अल्लाहचे भय बाळगा ज्याच्यासमोर तुम्हाला हजर केले जाणार आहे. 97 अल्लाहने, (मक्कास्थित) काबा या अभेद्य घराला, लोकांसाठी साहाय्याचे व उन्नतीचे साधन बनविले. तसेच पवित्र महिने व बळीच्या जनावरांना आणि (अल्लाहला अर्पण करण्यासाठी गळ्यात पट्टे घालून चिन्हांकित केलेल्या) जनावरांना. हे यासाठी की, तुम्हाला ही जाणीव व्हावी की, जमिनीत आणि आकाशात जे काही आहे, त्याची अल्लाहला पूर्ण जाणीव आहे. त्याला प्रत्येक गोष्टीचे (परिपूर्ण) ज्ञान आहे. 98 लक्षात ठेवा की, अल्लाह शिक्षा देण्याच्या बाबतीत फार कठोर आहे आणि (तसेच) अल्लाह फार क्षमाशील व दयाळू (देखील) आहे. 99 पैगंबराचे एकमेव कर्तव्य केवळ संदेश पोचवणे एवढेच आहे. आणि तुम्ही जे काही उघड करता व जे काही लपविता ते (सर्व) अल्लाहला माहीत आहे. 100 (त्यांना) सांगा, 'वाईट आणि चांगले हे समान असू शकत नाही. मग वाईट गोष्टी विपुल प्रमाणात असणे तुम्हाला कितीका चांगले वाटेना. तर बुद्धी बाळगणाऱ्या लोकांनो, अल्लाहचे भय बाळगा, तरच तुम्ही यशस्वी व्हाल.'

101 श्रद्धावंतांनो! अशा गोष्टींविषयी प्रश्न विचारू नका, ज्या तुमच्याकडे प्रकट करण्यात आल्या, तर त्या तुम्हाला आवडणार नाहीत. आणि जेव्हा तुमच्याकडे कुराण पाठविण्याची (प्रक्रिया) सुरू आहे, तेव्हा जर तुम्ही त्यांविषयी विचारले तर त्या (गोष्टी) तुमच्यासमोर स्पष्ट करून टाकण्यात येतील. (म्हणजे

त्या गोष्टी अल्लाहचा आदेश म्हणून पाळाव्याच लागतील). (पण) अल्लाहने या गोष्टी बाजूला ठेवून (तुमच्यावर कृपा केलेली आहे). आणि अल्लाह फार क्षमाशील व सहिष्णू आहे. 102 तुमच्यापूर्वी देखील इतर लोकांनी अशा गोष्टींविषयी प्रश्न विचारले होते. पण जेव्हा त्या गोष्टी त्यांच्यावर उघड करण्यात आल्या, तेव्हा त्यांनी त्या अमलात आणण्यास नकार दिला. 103 हा अल्लाहचा आदेश (अजिबात) नव्हे की, विशिष्ट प्रकारच्या प्राण्यांना *बहिरा, सायबा, वसीला आणि हाम* अशी नावे द्या (आणि त्यांना पवित्र समजून लोकांच्या उपयोगापासून दूर ठेवा). पण सत्य नाकारणारे लोक अल्लाहच्या नावावर खोट्या गोष्टी रचून सांगत आहेत. आणि त्यांच्यापैकी बहुतांश लोक बुद्धीचा वापर करतच नाहीत. 104 आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते की, अल्लाहने जे काही प्रकट केलेले आहे, त्याकडे आणि पैगंबराकडे या, तर ते म्हणतात, 'आमचे पूर्वज ज्या रीतिरिवाजावर आम्हाला आढळून आले, ते आमच्यासाठी पर्याप्त आहे.' काय? जरी त्यांच्या पूर्वजांना ज्ञान व मार्गदर्शन प्राप्त झालेले नव्हते (तरीही ते त्यांच्याच मार्गाने जाणार आहेत?) 105 श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! स्वत:ची काळजी घ्या. (कारण तुम्ही आपल्या कृत्यांविषयी जबाबदार आहात). तुम्ही जेव्हापर्यंत स्वत: सन्मार्गावर आहात, तेव्हापर्यंत मार्गभ्रष्ट झालेले (लोक) तुमचे कोणतेही नुकसान करू शकणार नाहीत. तुम्हा सर्वांना अल्लाहकडेच परत जायचे आहे. तेव्हा तो तुम्हाला (त्या गोष्टींची) जाणीव करून देईल, ज्या तुम्ही करीत होता.

106 इमान धारण केलेल्या लोकांनो! जेव्हा तुमच्यापैकी एखाद्याचा मृत्यू जवळ आलेला असेल (म्हणजे तसे संकेत प्राप्त होत असल्यास), तेव्हा मृत्युपत्र करतेवेळी साक्ष अशाप्रकारे असावी की, तुमच्यामधील (तुमच्या जमातीचे) दोन विश्वसनीय व्यक्ती साक्षीदार म्हणून असावेत. किंवा जर तुम्ही प्रवासात असाल व तुमच्यावर मृत्यूचे संकट येईल तर इतर जमातीचे दोन साक्षीदार बनवावेत. पण जर तुम्हाला त्यांच्याविषयी संशय आल्यास, प्रार्थनेनंतर (साक्ष

देण्यासाठी) तुम्ही त्यांना थांबवून ठेवा. आणि त्या दोघांनीही अल्लाहची शपथ घेऊन असे म्हणावे की, आम्ही कोणतेही मूल्य घेऊन ‘साक्ष’ विकणार नाही, या बाबतीत (कोणत्याही) नातेवाइकाचीही पर्वा करणार नाही. आणि अल्लाहसमोर दिलेली साक्षही लपविणार नाही. जर आम्ही असे केले तर आमचा समावेश निश्चितच पापी लोकांमध्ये होईल. 107 जर आधीचे दोन (साक्षीदार) हे खोटी साक्ष देऊन (काही लाभ) हडप केल्याचे दोषी आढळून आले, तर ज्यांना त्यांच्या हक्कापासून वंचित करण्यात आलेले असेल, त्यांच्यामधून दोन साक्षीदारांनी साक्ष देण्यासाठी पुढे यावे. आणि त्यांनी अल्लाहची शपथ घेऊन सांगावे की, आमची साक्ष या दोघांच्या साक्षीपेक्षा अधिक सत्य आहे. आणि आम्ही कुठल्याही प्रकारे अन्याय केलेला नाही, आम्ही तसे केल्यास आमचा समावेश अत्याचारी लोकांत होईल. 108 या पद्धतीने अशी आशा बाळगली जाऊ शकते की, ते यथायोग्य साक्ष देतील. किंवा ते या गोष्टीपासून भय बाळगतील की, (जर त्यांनी खोटी साक्ष दिल्यास) इतरांच्या शपथांद्वारे त्यांनी शपथेवर दिलेली (साक्ष) खोटी ठरेल. तर अल्लाहचे भय बाळगा, आणि (त्याचे म्हणणे लक्षपूर्वक) ऐका. अल्लाह आज्ञा न पाळणाऱ्या लोकांना सन्मार्ग दाखवीत नाही.

109 (त्या दिवसाची कल्पना करा), ज्या दिवशी अल्लाह (सर्व) पैगंबरांना एकत्रित करून विचारेल, ‘तुम्हाला (लोकांकडून) काय प्रतिसाद मिळाला होता?’ ते उत्तर देतील, ‘(हे प्रभू!) आम्हाला त्याचे ज्ञान नाही, पण केवळ तुलाच त्या सर्व गोष्टींचे परिपूर्ण ज्ञान आहे, जिथपर्यंत कोणाचीही बुद्धी पोहोचू शकत नाही.’ 110 ज्यावेळी अल्लाह म्हणेल, ‘हे मरियमपुत्र येशू! मी तुझ्यावर व तुझ्या आईवर जी कृपा केलेली आहे, त्याचे स्मरण कर. जेव्हा मी पवित्र आत्म्याद्वारे तुला साहाय्य केले होते. (ज्यायोगे) तू बालपणी (आईच्या कुशीत) आणि मोठेपणीही लोकांशी (आध्यात्मिक) गोष्टी करीत होतास. आणि जेव्हा मी तुला ग्रंथ आणि ज्ञानाच्या गोष्टी शिकवल्या होत्या, तसेच तौरात व इंजील

शिकवले होते. आणि तू माझ्या आज्ञेने मातीपासून पक्ष्याची आकृती बनवून त्यात फुंकर मारत असे तर ती माझ्या आज्ञेने (जिवंत) पक्षी बनत असे. आणि माझ्या परवानगीने तू आंधळ्याला व महारोग्याला बरे करीत असे. आणि तू माझ्या परवानगीने मेलेल्यांना जिवंत करून उभे करीत असे. आणि मी इस्राईलच्या मुलांना तुला इजा पोचविण्यापासून रोखले होते, जेव्हा तू त्यांच्याकडे सत्याचे स्पष्ट प्रमाण घेऊन आला होतास. आणि त्यांच्यामध्ये जे श्रद्धाहीन होते, त्यांनी असे म्हटले की, हे दुसरे काही नाही तर उघड उघड एक जादू आहे.'

111 आणि (ती वेळ आठवा) जेव्हा मी (येशूच्या) शिष्यांना माझ्यावर आणि माझ्या पैगंबरावर (दृढ) विश्वास ठेवण्याची प्रेरणा दिली, तेव्हा त्यांनी म्हटले, 'आम्ही श्रद्धा धारण करतो, तू (यास) साक्षी राहा की, आम्ही शरण जात आहोत.' 112 जेव्हा शिष्यांनी म्हटले, 'हे मरियमपुत्र येशू! तुझा पालनकर्ता आकाशातून आमच्यासाठी जेवणाचे एक (मोठे) ताट पाठवू शकतो का?' त्यावर त्याने उत्तर दिले, 'जर तुम्ही (सच्चे) श्रद्धावंत असाल तर अल्लाहचे भय बाळगा.' 113 ते म्हणाले, 'आम्हाला त्यातून काही खावेसे वाटते. आणि ज्याद्वारे आमच्या मनांना शांती लाभेल. आणि आम्हाला विश्वास होईल की, तू आमच्याशी सत्य बोलला आहेस, आणि त्यास आम्ही साक्ष असू.' 114 मरियमपुत्र येशूने अल्लाहकडे प्रार्थना केली, 'हे अल्लाह, आमच्या पालनकर्त्या, आमच्याकडे आकाशातून अन्नाने भरलेले असे एक ताट पाठव, जे आमच्यासाठी (नेहमी लक्षात असावी) अशी मेजवानी ठरेल. आमच्या अग्रणी (लोकांसाठी) आणि नंतरच्या (लोकांसाठी) आणि (ते ताट आमच्यासाठी) तुझ्याकडून प्रकट झालेली एक खूण असेल. आणि आमच्या उपजीविकेची तरतूद कर, कारण तूच सर्वश्रेष्ठ प्रबंधक आहेस.' 115 अल्लाहने उत्तर दिले, 'मी निश्चितच तुमच्याकडे ते (अन्नाने भरलेले मोठे ताट) पाठवीन. पण त्यानंतर तुमच्यापैकी जो कोणी सत्याचा अस्वीकार करील, त्याला (मात्र) मी अशी शिक्षा करीन, जशी

(शिक्षा) मी अद्याप जगामध्ये कोणालाही केलेली नाही.'

116 आणि जेव्हा अल्लाह विचारेल, 'हे मरियमपुत्र येशू मसीह! तू लोकांना असे म्हणाला होता का की, अल्लाहशिवाय माझी व माझ्या आईची उपासना करा, (आम्हा दोघांना उपासनेयोग्य माना)?' त्यावर असे उत्तर देईल, '(हे प्रभू!) असीम आहे तुझी महिमा! मी ती गोष्ट कशी काय सांगू शकतो, जी सांगण्याचा मला मुळीच अधिकार नाही, जर मी अशी गोष्ट सांगितली असेल तर तिचे ज्ञान तुला निश्चितपणे असणारच, माझ्या मनात जे आहे ते तू जाणतोस, पण तुझ्या मनात जे आहे ते मी जाणत नाही. अदृश्य गोष्टींचा जाणणारा केवळ तूच आहेस. 117 इतर कोणतीही नव्हे तर तू ज्या (गोष्टींची) मला आज्ञा दिली होतीस, केवळ तीच गोष्ट मी त्यांना सांगितली होती; ती अशी की, (त्या) अल्लाहची उपासना करा जो माझा पालनकर्ता आहे आणि तुमचाही पालनकर्ता आहे; आणि जोपर्यंत मी त्यांच्यामध्ये राहिलो तोपर्यंत त्यांनी जे काही केले त्यावर मी साक्षी होतो; पण नंतर जेव्हा तू मला तुझ्याकडे बोलावून घेतले, त्यानंतर तूच त्यांचा निरीक्षक होतास आणि प्रत्येक गोष्टीवर केवळ तूच साक्षी आहेस. 118 जर तू त्यांना शिक्षा करशील, तर ते तुझेच भक्त आहेत आणि जर तू त्यांना क्षमा करशील, तर खरोखर केवळ तूच सर्वशक्तिमान आणि बुद्धिमान आहेस.' 119 (आणि न्यायाच्या दिवशी) त्यावर अल्लाह असे म्हणेल, 'आज असा दिवस आहे की, जेव्हा केवळ सत्यवचनी लोकांना त्यांच्या सत्यवचनीपणाबद्दल लाभ मिळेल. त्यांच्यासाठी अशा बागा आहेत की, ज्यातून पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह वाहत आहेत. तेथे ते सदैव निवास करतील. अल्लाह त्यांच्यावर प्रसन्न आहे आणि तेही (अल्लाहचे बक्षीस प्राप्त करून) त्याच्यावर खूप खूश आहेत. हेच आहे सर्वश्रेष्ठ यश.' 120 आकाश आणि जमीन आणि या दोहोंमध्ये जे काही आहे त्यावर केवळ अल्लाहचीच सत्ता (राज्य) आहे. आणि त्याला काहीही करण्याचे सामर्थ्य प्राप्त आहे.

# सूरह–०६. अल–अनआम

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] सर्व प्रकारच्या स्तुतीचा हक्क केवळ अल्लाहलाच प्राप्त आहे, ज्याने आकाश आणि पृथ्वीला निर्माण केले; आणि (ज्याने) काळोख आणि प्रकाश निर्माण केला. तर (अशी अर्थपूर्ण सृष्टी उघड असताना) सुद्धा सत्याचा अस्वीकार करण्यावर ठाम असलेले लोक इतरांना आपल्या पालनकर्त्याच्या बरोबरीचे स्थान देतात. [2] तोच आहे (अल्लाह), ज्याने तुमची मातीपासून निर्मिती केली, आणि त्याने (जीवनाचा) एक अवधी निश्चित केला आणि त्या निश्चित केलेल्या अवधीचे ज्ञान फक्त त्यालाच आहे. तरीदेखील तुम्ही शंका बाळगता. [3] तोच आहे अल्लाह, पृथ्वीवर आणि आकाशात, (तो) ते सर्व जाणतो जे तुम्ही गुप्त ठेवता आणि तेही सर्व, जे तुम्ही प्रकट करता. आणि जे (चांगले–वाईट) तुम्ही कमविता, (तेही) तो जाणून आहे.

[4] आणि जेव्हाही त्यांच्यासमोर त्यांच्या पालनकर्त्याचा संदेश स्पष्ट करणारी खूण येते, (तेव्हा सत्य नाकारण्यावर ठाम असलेले लोक) त्याकडे आपली पाठ फिरवितात. [5] जेव्हाही सत्य त्यांच्याकडे आले, त्यांनी त्याचा स्वीकार करण्यास नकार दिला. ते ज्या गोष्टीची थट्टा करीत होते, त्या गोष्टींविषयीची वार्ता लवकरच त्यांच्याकडे येणार आहे. [6] त्यांना याची जाणीव नाही का की, त्यांच्या आधी (वेगवेगळ्या काळातील) कित्येक जनसमूह आम्ही नष्ट केले आहेत? त्यांना तर आम्ही पृथ्वीवर असे भक्कम स्थायित्व दिले होते, जसे तुम्हाला (मुळीच) दिलेले नाही. आणि आकाशातून त्यांच्यावर फार मोठ्या प्रमाणावर कृपावर्षाव केला होता, आणि त्यांच्या खालून पाण्याचे प्रवाह वाहण्याची व्यवस्था केली होती, (पण) नंतर त्यांच्या दुष्कृत्यांमुळे आम्ही त्यांना नष्ट केले आणि त्यांच्यानंतर दुसरे लोक उभे केले.

7 (पैगंबर!) जरी आम्ही चर्मपत्रावर (आधीच्या काळातील कागद) लिहिलेला एक ग्रंथ (देखील) तुमच्याकडे पाठविला असता, आणि त्यास त्यांनी आपल्या हातांनी स्पर्श करूनही पाहिले असते तरी (ते) सत्य नाकारण्यावर ठाम असलेले श्रद्धाहीन लोक असे निश्चितपणे म्हणाले असते, 'हे दुसरे काही नसून (फसवणूक करणारा) जादूचा प्रकार आहे.' 8 आणि ते म्हणतात की, त्याच्याकडे (पैगंबराकडे) एखादा (अल्लाहचा) दूत (दृश्य रूपात) का पाठविण्यात आला नाही? पण जर आम्ही (आमच्या) दूताला पाठविले असते तर सर्व गोष्टींचा निर्णय झाला असता आणि त्यांना (स्वत:ला सुधारण्यासाठी मुळीच) सवड दिली गेली नसती. 9 आणि जर आम्ही (स्वर्गातील) दूताला पैगंबर बनवून पाठविले असते, तर आम्ही त्याला मनुष्याचे रूप देऊनच पाठविले असते. आणि (त्याद्वारे) त्यांच्या संशयात अधिक भर टाकली असती, ज्यात ते सध्या आहेत. 10 आणि तुमच्यापूर्वी देखील जे पैगंबर होऊन गेले, त्यांना उपहासाचे लक्ष करण्यात आले. तर त्यांच्यापैकी जे लोक, ज्या गोष्टीबद्दल उपहास करीत राहिले, (शेवटी) तीच गोष्ट त्यांच्यावर चालून आली, (आणि तिने त्यांना घेरले). 11 (त्यांना) सांगा, 'पृथ्वीवर संचार करा (प्रवास करा) आणि पाहा की, त्या लोकांचा शेवट कसा झाला, ज्यांनी सत्याला असत्य ठरविण्याचा प्रयत्न केला.'

12 (त्यांना) विचारा, 'आकाशात आणि पृथ्वीवर जे काही आहे ते कोणाचे आहे?' सांगा, 'सर्व काही अल्लाहचेच आहे.' त्याने दया व कृपेची नीती स्वत:साठी बंधनकारक ठरविली आहे. याविषयी तिळमात्र शंका नाही की, तो पुनरुत्थानाच्या दिवशी तुम्हा सर्वांना एकत्रित करेल. पण ज्या लोकांनी स्वत:ला नुकसानात लोटले, ते श्रद्धा धारण करणारे नाहीत. 13 रात्रीच्या (अंधारात) आणि दिवसाच्या (प्रकाशात) जे काही स्थिरावते, ते सर्व अल्लाहचेच आहे. आणि तो सर्व काही ऐकणारा आणि सर्व काही जाणणारा आहे. 14 सांगा, 'मी

अल्लाहशिवाय दुसऱ्या कोणाला माझा कैवारी बनवू का? जो आकाश आणि पृथ्वी यांचा निर्माता आहे. तो सर्वांना भरवतो, पण त्याला स्वत:ला कोणीही भरवण्याची गरज नाही. सांगा, 'मला अशी आज्ञा करण्यात आलेली आहे की, मी सर्वात प्रथम स्वत:ला त्याच्या सुपूर्द करणारा बनावे, आणि (पैगंबर!) तुम्ही कदापि त्या लोकांपैकी होऊ नका, जे अल्लाहचे समकक्ष ठरवितात.' 15 सांगा, 'मी जर माझ्या पालनकर्त्याची अवज्ञा केली तर मला कठोर शिक्षेच्या दिवसाचे भय आहे.' 16 त्या दिवशी जो शिक्षेपासून वाचविला गेला, त्यावर अल्लाहने खरोखर फार मोठी दया केली. हेच सर्वश्रेष्ठ यश आहे.

17 अल्लाहने तुम्हाला दु:ख दिले तर ते दु:ख त्याच्याशिवाय अन्य कोणीही दूर करू शकत नाही. आणि जर अल्लाहने तुमचे भले केले (तर लक्षात असू द्या आपल्या इच्छेप्रमाणे) सर्व काही करण्याचे सामर्थ्य त्याला प्राप्त आहे. 18 आणि त्याच्या भक्तांवर त्याचीच सत्ता आहे. तो आहे अस्सल ज्ञानी आणि त्यालाच आहे प्रत्येक गोष्टीची जाणीव. 19 त्यांना (तुम्ही) विचारा, '(साक्ष देण्याच्या बाबतीत) सर्वात श्रेष्ठ साक्ष कुणाची आहे?' त्यांना सांगा, 'केवळ अल्लाहची! माझ्या आणि तुमच्यामध्ये तो साक्षी आहे आणि हे कुराण माझ्याकडे अशासाठी प्रकट करण्यात आले आहे की, त्याद्वारे मी तुम्हाला आणि ज्यांच्यापर्यंत हे पोचेल, त्या सर्वांना सावध करावे.' काय! तुम्ही या गोष्टीची साक्ष देता की, अल्लाहव्यतिरिक्त दुसरे देखील उपासनेयोग्य आहेत? (पैगंबर!) तुम्ही त्यांना सांगा, 'मी अशी साक्ष अजिबात देत नाही!' सांगा, 'तोच आहे एकमेव ईश्वर! आणि तुम्ही इतरांना अल्लाहचे समकक्ष ठरविण्याचे जे (दुष्)कृत्य करीत आहात, त्याच्याशी माझा मुळीच संबंध नाही.'

20 ज्या लोकांना आम्ही आधी ग्रंथ दिलेला आहे ते या (ग्रंथाला–अल्लाहचा ग्रंथ म्हणून, तसेच पैगंबराला) अशाप्रकारे ओळखतात, जसे आपल्या (पोटच्या) मुलांना ओळखतात. पण ज्यांनी स्वत:ला नुकसानात लोटले आहे, ते त्याला

मानणार नाहीत. 21 आणि त्याहून मोठा अत्याचारी कोण असू शकतो? जो स्वत:हून रचलेल्या खोट्या गोष्टींचा अल्लाहशी संबंध जोडतो आणि त्याच्या खुणांद्वारे स्पष्ट होणाऱ्या संदेशांना खोटे ठरवितो. खरोखर असे अन्यायी लोक कधीही यशस्वी होणार नाहीत. 22 आणि त्या दिवशी आम्ही त्या सर्वांना एकत्रित करू, तेव्हा ज्यांनी इतरांना (अल्लाहचे) समकक्ष ठरविले होते त्यांना आम्ही विचारू, 'जे (आमचे) समकक्ष असल्याचा तुम्ही दावा करीत होते, ते आता कुठे आहेत?' 23 तेव्हा ते पूर्णपणे गोंधळलेल्या अवस्थेत असतील, ते केवळ इतकेच म्हणू शकतील की, अल्लाहची शपथ, जो आमचा पालनकर्ता आहे, आम्ही (अल्लाहचे) समकक्ष कधीही ठरवलेले नाही. 24 पाहा, हे कसे स्वत: विरुद्धच खोटे बोलू लागले, आणि त्यांनी (अल्लाहविषयी) स्वत:हून ज्या खोट्या गोष्टी रचल्या होत्या, त्या सर्व त्यांच्यापासून नाहीशा झालेल्या असतील.

25 आणि त्यांच्यात असे काही (ढोंगी) लोक आहेत जे तुमचे म्हणणे कान देऊन ऐकतात, पण (पैगंबर!) आम्ही त्यांना ते (सत्य) समजू नये यासाठी, त्यांच्या मनावर पडदे घातले आहेत. आणि त्यांच्या कानांमध्ये बधीरता निर्माण केली आहे. आणि त्यांनी (सत्य स्पष्ट करणारी) प्रत्येक खूण जरी पाहिली, तरी ते त्यावर विश्वास ठेवणार नाहीत. जेव्हा हे सत्य नाकारणारे (श्रद्धाहीन) तुमच्याकडे विवाद घालण्यासाठी येतात, तेव्हा म्हणतात, 'हे दुसरे काही नसून केवळ पूर्वजांपासून चालत आलेल्या कथा आहेत.' 26 आणि ते इतरांना त्यावर श्रद्धा ठेवण्यास प्रतिबंध करतात आणि आपण स्वत:देखील त्यापासून दूर राहतात. आणि (असे करून) ते दुसऱ्या कोणाला नव्हे तर स्वत:लाच विनाशात लोटत आहेत, पण त्यांना याची जाणीव नाही. 27 आणि जेव्हा त्यांना (नरकाच्या) आगीसमोर उभे केले जाईल, तर त्यावेळेस तुम्ही त्यांना पाहाल, तर (तुम्हाला दिसेल) ते (आपल्या आधीच्या जीवनाबद्दल पश्चात्ताप करीत) म्हणत असतील, 'आम्हाला परत एकदा (संधी देऊन) (आधीच्या जगात) पाठविले गेल्यास

किती बरे होईल, आणि यानंतर आम्ही कधीही आमच्या पालनकर्त्याच्या (संदेश असलेल्या) खुणांकडे दुर्लक्ष करणार नाही. आणि आम्ही श्रद्धावंतांपैकीच होऊन राहू.' 28 पण नाही, (ते केवळ यासाठी असे म्हणतील कारण), त्यांच्यासमोर सत्य उघड झालेले असेल, जे आधी ते लपवीत असत. आणि यांना जरी परत पाठविले गेले तर पुन्हा तेच करतील, ज्या गोष्टींची त्यांना मनाई होती. निश्चितच हे खोटारडे आहेत.

29 आणि ते म्हणतात, 'जीवन तर फक्त याच जगातील जीवन आहे. (या जीवनापलीकडे जीवन वगैरे काही नाही). आणि (मृत्यूनंतर) पुन्हा उठवले जाण्याचा प्रश्नच नाही.' 30 आणि जर तुम्ही ते दृश्य पाहू शकाल, जेव्हा त्यांना त्यांच्या पालनकर्त्यासमोर उभे केले जाईल, तो त्यांना विचारील, 'हे (दुसरे जीवन) सत्य नाही का?' ते उत्तर देतील, 'होय! आमच्या पालनकर्त्याची शपथ, हे सत्य आहे.' त्यावर अल्लाह म्हणेल, 'तर मग आता चाखा (ती) शिक्षा जी सत्य स्वीकारण्यास नकार दिल्यामुळे तुमच्या वाटी आलेली आहे.' 31 निश्चितच नुकसानात सापडले ते लोक ज्यांनी अल्लाहशी (होऊ घातलेल्या अटळ) भेटीला खोटे ठरविले. आणि जेव्हा अचानक त्यांच्यावर ती वेळ येईल, तेव्हा ते ओरडतील, 'काय हे आमचे दुर्दैव! या वेळेचे भान आम्ही ठेवले नाही.' आणि ते आपल्या पापांचे ओझे आपल्या पाठीवरच वाहतील, जे ओझे ते वाहतील, निश्चितच किती वाईट आहे ते!

32 आणि या जगातील जीवन इतर काही नसून, केवळ खेळ आणि (क्षणिक आनंद देणारा) तमाशा आहे. आणि मृत्यूनंतरचे (अनंतकालीन) जीवन अल्लाहची जाण असणाऱ्या लोकांसाठी, निश्चितच सर्वोत्तम आहे. तर मग तुम्ही बुद्धीचा उपयोग करणार नाही का?

33 (पैगंबर!) आम्हाला पूर्ण जाणीव आहे की, ते जे काही म्हणतात, त्यामुळे तुम्हाला खरोखर दुःख होते. पण ते तुम्हाला खोटे ठरवीत नाहीत, तर ते

दुराचारी लोक अल्लाहच्या (संदेश असलेल्या) खुणांना नाकारत आहेत. 34 आणि तुमच्यापूर्वीही इतर पैगंबर नाकारले गेले, तर त्यांनी त्यांच्या नाकारण्यावर (फार) संयम दाखवला आणि त्यांचा (पैगंबरांचा) छळ केला गेला त्यावर ते सहनशील राहिले, येथपावेतो की, आमचे साहाय्य त्यांना पोचले. अल्लाहच्या वचनात बदल करू शकेल असा कोणीही नाही. आणि (पूर्वी होऊन गेलेल्या) काही पैगंबरांच्या वार्ता तुमच्यापर्यंत आधीच पोचलेल्या आहेत. 35 आणि त्यांचे (श्रद्धाहीन लोकांचे) तुमच्याकडे पाठ फिरवणे तुम्हाला असह्य होत असेल आणि जर तुमच्यामध्ये सामर्थ्य असेल तर जमिनीत भुयार करून किंवा आकाशात एखादी शिडी लावून त्यांच्यासाठी (अधिक खात्रीलायक) खूण शोधून आणा. अल्लाहने इच्छिले असते तर (त्या) सर्वांना सन्मार्गावर एकत्र आणले असते. म्हणून तुम्ही अज्ञानी लोकांपैकी होऊ नका. 36 जे (अंतःकरणातून) ऐकतात तेच, हाकेला प्रतिसाद देऊ शकतात. आणि जे मृत आहेत, अल्लाह त्यांना जीवन प्रदान करून (उभे करील). मग ते त्याच्याकडेच परतविले जातील.

37 आणि ते म्हणतात, ‘पैगंबराकडे त्याच्या पालनकर्त्याकडून (काही चमत्कारिक) खूण का पाठविण्यात आली नाही?’ (त्यांना) सांगा, ‘आपल्याकडून (चमत्कारिक) खूण पाठविण्यास अल्लाह निश्चितपणे समर्थ आहे.’ पण अनेकांना (अल्लाहच्या सामर्थ्याची) जाणीव नाही. 38 आणि जमिनीवर चालणारा कोणताही प्राणी असो किंवा आपल्या दोन पंखावर उडणारा कुठलाही पक्षी असो, (याशिवाय दुसरे काही नाही की), ते सर्व तुमच्याप्रमाणेच (अल्लाहने निर्माण केलेल्या) प्राणिमात्रांपैकी (विविध) समूह आहेत. आम्ही ग्रंथात कुठल्याही गोष्टीकडे दुर्लक्ष केलेले नाही. मग सर्वांना त्यांच्या पालनकर्त्याकडे एकत्रित करून नेण्यात येईल. 39 आणि ज्यांनी आमच्या (संदेश प्रकट करणाऱ्या) खुणांना खोटे ठरविले, ते बहिरे व मुके आहेत. आणि ते घोर अंधकारात खितपत पडलेले आहेत. अल्लाह ज्याच्याबद्दल इच्छितो त्यास सन्मार्गापासून दूर भरकटत जाऊ

देतो आणि ज्याच्याबद्दल इच्छितो, त्यास सन्मार्गी लावतो.

40 सांगा, 'तुम्हाला काय वाटते? जर तुमच्यावर अल्लाहकडून (या जगात) (एखादी) शिक्षा आली किंवा ती शेवटची घटका (क़यामत) तुमच्यावर आली, तेव्हा तुम्ही अल्लाहला सोडून अन्य कोणाचा (मदतीसाठी) धावा करता का? (मला) याचे उत्तर द्या, जर तुम्ही खरे असाल.' 41 नाही, तुम्ही तर केवळ त्याचाच धावा करता, तेव्हा त्याची इच्छा झाल्यास तो त्या (दु:खाचे) निवारण करतो, ज्यासाठी तुम्ही त्याला हाक देता. आणि त्यावेळेस मात्र तुम्हाला त्यांचा विसर पडतो, ज्यांना तुम्ही त्याचे समकक्ष ठरवता.

42 (पैगंबर!) तुमच्या आधी होऊन गेलेल्या लोकांकडे आम्ही (अनेक पैगंबर) पाठवले होते. मग आम्ही त्यांना दु:ख आणि कष्ट दिले यासाठी की, त्यांनी विनम्रतेचा अंगीकार करावा. 43 मग जेव्हा आमच्याकडून त्यांना दु:ख पोचले, तेव्हा ते विनम्र का बनले नाहीत? तर उलट त्यांची मने आणखी कठोर झाली. आणि सैतान त्यांना दिलासा देत राहिला की, तुम्ही जे काही करीत आहात, ते उत्तमच करीत आहात. 44 ज्या उपदेशपर गोष्टींनी त्यांच्या हृदयात वास्तव्य करायला पाहिजे होते, त्या सर्व गोष्टींचा त्यांना विसर पडला. तेव्हा आम्ही त्यांच्यासाठी (त्यांना हव्या असलेल्या) सर्व वस्तूंची दारे खुली केली. (आणि येथपर्यंत ती खुली ठेवली की), त्यांना दिल्या गेलेल्या सुखसमृद्धीत ते खूप मग्न झाले, तेव्हा आम्ही त्यांना अचानकपणे पकडले आणि ते फार मोठ्या नैराश्यात सापडले. 45 अशा प्रकारे (शेवटी) त्या लोकांचे समूळ उच्चाटन करण्यात आले, जे दुष्कृत्ये करण्यावर ठाम होते. सर्व प्रकारच्या स्तुतीचा अधिकारी केवळ अल्लाह आहे, जो सर्व जगांचा पालनकर्ता आहे.

46 (त्यांना) सांगा, 'कधी तुम्ही याबद्दल विचार केला आहात का? की, जर अल्लाहने तुमची श्रवणशक्ती आणि तुमची दृष्टी हिरावून घेतली आणि तुमची मने मोहोरबंद केली तर तेव्हा अल्लाहशिवाय दुसरा कोण उपास्य (पूजनीय)

आहे, जो या गोष्टी तुम्हाला परत देऊ शकेल?' पाहा, किती वेगवेगळ्या प्रकारे आम्ही आमच्या संदेशांना स्पष्ट करून सांगत आहोत. तरीही ते त्याकडे (तिटकाऱ्याने) पाठ फिरवीत आहेत. 47 सांगा, 'तुम्ही कल्पना करू शकता का की, जर अल्लाहचा प्रकोप तुमच्यावर अचानक किंवा जाहीरपणे चालून आल्यास, तेव्हा तुमची काय अवस्था होईल? (आणि तेव्हा) अत्याचारी लोकांशिवाय दुसरा कोण असेल ज्यांचा विनाश होईल.' 48 आणि आम्ही पैगंबरांना केवळ (लोकांना) शुभवार्ता देण्यासाठी आणि सावध करण्यासाठी पाठवतो. मग ज्यांनी श्रद्धा धारण केली आणि स्वतःची सुधारणा केली (सदाचारी बनले) ते कधीही भयग्रस्त होणार नाहीत, ना त्यांना कधी दुःख पोचेल. 49 उलटपक्षी ज्यांनी आमच्या संदेशांना खोटे ठरविले त्यांच्यावर आमची शिक्षा ओढवेल, यासाठी की, ते आज्ञाभंग करीत असत. 50 (पैगंबर!) (त्यांना) सांगा, 'मी तुम्हाला असे म्हणत नाही की, माझ्याकडे अल्लाहचे खजिने आहेत. आणि (मी असेही म्हणत नाही की), मला मानवी आकलनशक्ती पलीकडील गोष्टींचे (म्हणजे अदृश्याचे) ज्ञान आहे. तसेच मी तुम्हाला असेही म्हणत नाही की, मी स्वर्गदूत आहे. मी तर केवळ त्याचेच अनुसरण करतो, जे माझ्याकडे प्रकट करण्यात आले आहे.' (त्यांना) सांगा, 'आंधळा आणि दृष्टी असलेला माणूस दोघे समान असू शकतात का? मग तुम्ही विचार करत नाही का?'

51 आणि तुम्ही या (अल्लाहच्या) संदेशाद्वारे त्या लोकांना सावध करा, ज्यांना असे भय वाटते की, त्यांना एकत्रित करून त्यांच्या पालनकर्त्याकडे नेण्यात येईल. आणि तेव्हा अल्लाहशिवाय दुसरा कोणीही त्यांचा साहाय्यक वा समर्थक असणार नाही. अशी आशा आहे की, (या उपदेशाने सावध होऊन) ते अल्लाहचे भय बाळगणारे बनतील. 52 तुम्ही त्या लोकांना आपल्यापासून दूर करू नका, जे आपल्या पालनकर्त्याची आपल्यावर कृपादृष्टी व्हावी म्हणून सकाळ व संध्याकाळ त्याचा धावा करीत असतात, त्यांच्या कोणत्याही गोष्टीबद्दल

तुम्ही जबाबदार नाही आणि तुमच्या कोणत्याही गोष्टीबद्दल ते जबाबदार नाहीत.
आणि तुम्ही त्यांना दूर कराल तर तुमचा समावेश अन्यायी लोकांत होईल. 53
आणि अशा प्रकारे आम्ही त्यांच्यापैकी काही लोकांची इतरांकरवी अशी परीक्षा
घेतली आहे की, त्यांनी म्हणावे, ‘आमच्यापैकी याच लोकांवर अल्लाहने कृपा
केली आहे की काय?’ अल्लाहला कोण कृतज्ञ आहेत, हे चांगल्याप्रकारे ठाऊक
नाही की काय?

54 आणि जेव्हा ते लोक तुमच्याकडे येतील, जे आमच्याकडून प्रकट
झालेल्या संदेशांवर विश्वास ठेवतात, तेव्हा (तुम्ही त्यांना) सांगा, तुम्हाला
(मन) शांती लाभो, (तुम्हाला सलाम)! तुमच्या पालनकर्त्याने तुमच्यावर दया
व कृपा करणे हे स्वत:चे दायित्व म्हणून निश्चित केले आहे. तुमच्यापैकी जो
कोणी अजाणतेपणे दुष्कृत्य करील आणि नंतर पश्चात्ताप करून आपल्यात
सुधारणा करील तर (त्याच्याबाबतीत) तो अत्यंत क्षमाशील व दयाळू आहे. 55
अशाप्रकारे आम्ही आमचे संदेश स्पष्ट करून सांगत आहोत. हे यासाठी की,
(सत्य स्पष्ट व्हावे आणि) पापी लोकांचा मार्ग उघड व्हावा.

56 (श्रद्धाहीन लोकांना) सांगून टाका, ‘तुम्ही अल्लाहव्यतिरिक्त ज्यांचा
धावा करता त्यांची उपासना करण्यास मला मनाई करण्यात आलेली आहे.
(तसेच हे देखील) सांगून टाका की, मी तुमच्या इच्छांचे अनुसरण (कदापि)
करू शकत नाही; आणि जर मी असे केले तर मी मार्गभ्रष्ट होईन आणि सन्मार्गी
लोकांमध्ये मला स्थान नसेल.’ 57 (त्यांना) सांगा, ‘माझ्या पालनकर्त्याकडून
मिळालेल्या स्पष्ट प्रमाणाच्या आधारे मी माझी भूमिका ठरवीत असतो. आणि
तुम्ही (म्हणजे) ते स्पष्ट प्रमाण नाकारता. तुम्ही ज्या गोष्टीकरिता घाई करीत
आहात, ती माझ्या अधिकारात नाही. निर्णय करण्याचा अधिकार केवळ अल्लाहकडे
आहे. तोच सत्य स्पष्ट करून सांगतो आणि तोच सर्वोत्तम न्यायाधीश आहे.’ 58
(त्यांना) सांगा, ‘ज्या गोष्टीकरिता तुम्ही एवढी घाई करीत आहात, ती जर

माझ्या अधिकारात असती तर माझ्या व तुमच्यामध्ये केव्हाच निर्णय झाला असता, पण अल्लाह अत्याचारी लोकांना चांगल्याप्रकारे ओळखून आहे.’ 59
अदृश्याच्या किल्ल्या त्याच्याचकडे आहेत, त्याच्याशिवाय त्यांना (म्हणजे मानवासाठी अदृश्य असलेल्या गोष्टी) कोणीही जाणत नाही. आणि जमिनीवर व समुद्रामध्ये जे काही आहे, ते अल्लाहलाच माहीत आहे. झाडावरून गळून पडणारे एकही पान असे नाही, ज्याचे त्याला ज्ञान नाही. आणि एक दाणा ही असा नाही, जो जमिनीच्या अंधकारात सामावतो किंवा कोणतीही ओली किंवा सुकी वस्तू अशी नाही, ज्याची (त्याच्या) नोंद करायच्या रजिस्टर मध्ये नोंद असत नाही.

60 आणि तोच आहे जो रात्रीच्या वेळी तुम्हाला अचेतावस्था (मृत्यूसमान अवस्था) देतो, आणि जी कामे तुम्ही दिवसा करता, ते (सर्व) जाणतो. तो दिवसा तुम्हाला जागे करीत असतो, (असे दररोज सुरू असते येथपावेतो) जीवनाची (त्याने) निश्‍चित केलेली मुदत पूर्ण व्हावी. शेवटी तुम्हाला त्याच्याकडेच परतायचे आहे. तेव्हा तो तुमच्यासमोर उघड करील, जे तुम्ही करीत होता. 61
आणि त्याचे आपल्या भक्तांवर संपूर्ण नियंत्रण आहे. आणि तुमच्यावर लक्ष ठेवण्यासाठी तो (स्वर्गदूतांना) निरीक्षक बनवून पाठवतो, (जे तुमचे निरीक्षण करीत असतात), येथपावेतो तुमच्यापैकी कोणा एकाची मृत्यूची वेळ येते. तेव्हा आमचे पाठविलेले दूत त्याचे प्राण काढून घेतात. आणि ते आपल्या कर्तव्यात कधीही कसूर करीत नाहीत. 62 मग सर्व (मृत्यू पावलेले) अल्लाहकडे परत आणले जातील, जो त्यांचा खराखुरा मालक आहे. जाणून घ्या, निर्णयाचे सर्व अधिकार त्यालाच प्राप्त आहेत, आणि तो सर्वात जलद हिशेब करणारा आहे.

63 (पैगंबर!) यांना विचारा, ‘तो कोण आहे, जो जमीन आणि समुद्राच्या (भयावह) अंधारात तुमचे रक्षण करून (बाहेर आणतो). तेव्हा तुम्ही फार नम्र

बनून त्याला हाक मारता आणि मनातल्या मनात त्याच्याशी अशा गोष्टी करू लागता की, जर त्याने या (संकटा)तून आमची सुटका केली तर निश्चितच आम्ही त्याचे कृतज्ञ (भक्त) बनू?' 64 (त्यांना) सांगा, 'तो अल्लाह आहे, जो तुम्हाला यापासून आणि दुसऱ्या प्रत्येक संकटापासून वाचवतो. तरीही तुम्ही इतरांना त्याचे सहभागी ठरवता.' 65 सांगा, 'अल्लाहला हे सामर्थ्य प्राप्त आहे की, तो तुमच्यासाठी तुमच्या वरून किंवा तुमच्या पायाखालून एखादे संकट पाठवू शकतो, किंवा (तो असेही करू शकतो की), तुमच्यामध्ये आपसात दुफळी निर्माण करून तुम्हाला एकदुसऱ्याच्या शक्तीची चव चाखावयास लावू शकतो.' पाहा, त्यांना समजावे म्हणून आम्ही हे प्रमाण कसे वेगवेगळ्या प्रकारे स्पष्ट करून सांगत असतो. 66 आणि ते सत्य असतानाही तुमच्या लोकांनी त्याला नाकारले आहे. (तुम्ही त्यांना) सांगून टाका, 'मी तुमच्यावर पहारेकरी नाही.' 67 प्रत्येक भविष्यवाणी पूर्ण होण्याची एक निर्धारित वेळ आहे, आणि लवकरच तुम्हाला हे कळून चुकेल.

68 आणि जेव्हा तुम्ही त्या लोकांना पाहाल जे आमच्या संदेशाविषयी वायफळ गोष्टी करण्यात गुंतलेले आहेत, तर तुम्ही त्यांच्यापासून तोपर्यंत दूर राहा, जोपर्यंत ते लोक त्याव्यतिरिक्त इतर विषयांवर बोलू लागत नाहीत. आणि (एखाद्या वेळेस) सैतानाने जर तुम्हाला विसरायला लावले तर ज्या क्षणी तुम्हाला या चुकीची जाणीव होईल तेव्हा या अन्यायी लोकांबरोबर बसू नका. 69 आणि जे अल्लाहचे भय (जाण) बाळगतात त्यांच्यावर अपराधी लोकांच्या बाबतीत कोणतीही जबाबदारी नाही. तथापि त्यांनी (म्हणजे अपराधी लोकांनी) (अल्लाहचे) भय बाळगावे म्हणून, त्यांना उपदेश करणे हे (सदाचारी लोकांचे) कर्तव्य आहे. 70 त्या लोकांना सोडून द्या ज्यांनी आपल्या धर्मास खेळ व करमणुकीचे साधन बनवले आहे, आणि या जगातील जीवनाने त्यांना धोक्यात टाकले आहे. पण (तुम्ही त्यांना) या कुराणाद्वारे उपदेश करणे सुरू ठेवा की,

(मृत्यूनंतरच्या जीवनात) प्रत्येक माणसाला त्याने केलेल्या (चुकीच्या) कामाबद्दल जबाबदार धरले जाईल. त्यांची स्थिती अशी असेल की, अल्लाहपासून रक्षण करणारा आणि त्यांच्यासाठी मध्यस्थी करणारा कोणीही असणार नाही. आणि त्यांनी (स्वत:ची सुटका करून घेण्यासाठी) कितीही मोठ्या प्रमाणात मुक्तिदंड दिला, तरी तो त्यांच्याकडून स्वीकारला जाणार नाही. हे असे लोक आहेत ज्यांना त्यांच्याच कुकृत्यांनी (चहूबाजूंनी) वेढले आहे. त्यांना पिण्यासाठी उकळते पाणी असेल व त्यांना दु:खदायक शिक्षा भोगावी लागेल, हे यासाठी की, त्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला.

71 (त्यांना) विचारा, 'आम्ही अल्लाहला सोडून त्याची आराधना करावी काय, जो आम्हाला कोणताही लाभ पोचवू शकत नाही आणि आमचे कोणतेही नुकसान करू शकत नाही.

अल्लाहने आम्हाला सन्मार्ग दाखविल्यानंतर देखील आम्ही त्या व्यक्तीसारखे उलट्या पावलांनी परत फिरावे का, जिला सैतानांनी वाळवंटात भरकटायला लावले आणि तो संभ्रमित अवस्थेत फिरत असावा? आणि त्याचे सोबती त्याला 'आमच्याकडे ये' म्हणून सरळ मार्गाकडे बोलावत असावेत.' सांगा, 'अल्लाहने दाखविलेला मार्ग हाच खरा मार्ग आहे, आणि आम्हाला अशी आज्ञा दिली गेली आहे की, आम्ही सर्व जगांच्या पालनकर्त्याला स्वत:ला समर्पित करून टाकावे.
72 आणि (आम्हाला अशी आज्ञा देण्यात आलेली आहे की), नित्य प्रार्थना करा (नमाज़ पढा) आणि अल्लाहचे भय बाळगा.' कारण त्याच्याकडेच तुम्हाला एकत्रित करून नेण्यात येईल.
73 आणि तोच होय, ज्याने आकाश व पृथ्वीला सहेतुकपणे निर्माण केले. आणि त्या दिवशी तो म्हणेल, 'अस्तित्वात ये' तेव्हा (ती गोष्ट) अस्तित्वात येईल, त्याचे वचन हेच सत्य आहे, आणि ज्या दिवशी (म्हणजे पुनरुत्थानाच्या दिवशी) तुतारीत फुंकर मारली जाईल, तेव्हा त्याचेच राज्य (संपूर्ण नियंत्रण) असेल. दृश्य आणि अदृश्य सर्वांचा जाणणारा तो आहे.

तोच अस्सल बुद्धिमान आहे व प्रत्येक गोष्टीची जाणीव असलेला आहे. 74 आणि (ती वेळ आठवा), जेव्हा इब्राहीमने आपला पिता आज़र यास म्हटले, 'तुम्ही मूर्तींना पूजनीय ठरवता का? खचितच मी तुम्हाला आणि तुमच्या जमातीच्या लोकांना स्पष्टरित्या सन्मार्गापासून दूर गेल्याचे पाहत आहे.'

75 आणि अशा प्रकारे आम्ही इब्राहीमला (सन्मार्गाची समज लाभावी) आणि त्याने दृढ विश्वास ठेवणाऱ्या लोकांपैकी व्हावे म्हणून, त्याला आकाशात आणि पृथ्वीवर असलेल्या आमच्या राज्याचे दर्शन घडविले. 76 आणि जेव्हा त्याच्यावर रात्रीचा काळोख दाटला, तेव्हा त्याला एक तारा दिसला, ताऱ्याला पाहून तो म्हणाला, 'हा आहे माझा पालनकर्ता!' परंतु जेव्हा तो तारा अस्त पावला, तेव्हा तो म्हणाला, 'जे अस्त पावतात ते मला प्रिय नाहीत.' 77 नंतर जेव्हा त्याने प्रकाश पसरवीत उदय पावणारा चंद्र पाहिला, तेव्हा तो म्हणाला, 'हा आहे माझा पालनकर्ता!' पण जेव्हा चंद्र अस्त पावला, तेव्हा तो म्हणाला, 'जर माझ्या पालनकर्त्याने मला सन्मार्ग दाखवला नाही तर मी निश्चितपणे वाट चुकलेल्या लोकांत सामील होईन.' 78 नंतर (पुन्हा) जेव्हा त्याने सूर्याला प्रकाशमान होताना पाहिले, तेव्हा तो म्हणाला, 'हा माझा पालनकर्ता आहे; आणि हा सर्वात मोठा आहे.' पण जेव्हा सूर्याचा अस्त झाला, तेव्हा तो आपल्या लोकांना म्हणाला, 'लोकांनो! मी त्या सर्वांपासून स्वत:ला वेगळा घोषित करतो, ज्यांना तुम्ही अल्लाहचे समकक्ष ठरवता. 79 (आता) मी एकाग्रचित्त होऊन (पूर्ण) निष्ठेने त्याच्याकडे वळलो आहे, ज्याने आकाशांना आणि पृथ्वीला निर्माण केले. आणि मी त्यांच्यात सामील नाही, जे इतरांना अल्लाहचे समकक्ष ठरवतात.' 80 आणि त्याच्या जमातीच्या लोकांनी त्याच्याशी वादविवाद केला. तेव्हा तो म्हणाला, 'तुम्ही अल्लाहविषयी माझ्याशी वाद घालता का, जेव्हा की, त्याने मला सन्मार्ग दाखविलेला आहे. आणि मी त्यांना (अजिबात) भीत नाही, ज्यांना तुम्ही अल्लाहचे सहभागी ठरवता, होय जर माझ्या पालनकर्त्यानेच इच्छिले

तर मात्र मला अवश्य नुकसान पोचू शकतो. माझ्या पालनकर्त्याने सर्व गोष्टींना आपल्या ज्ञानात सामावून घेतले आहे. तर मग तुम्ही यावर विचार करून बोध घेणार नाही का?'

81 आणि मी त्यांचे का म्हणून भय बाळगावे, ज्यांना तुम्ही अल्लाहचे समकक्ष मानता, जेव्हा तुम्हाला इतरांना अल्लाहचे समकक्ष ठरवताना भय वाटत नाही. ज्यासाठी त्याने तुमच्याकडे कोणतेही प्रमाण पाठवलेले नाही. मग तुम्हाला जर खरोखरच काही ज्ञान असेल तर (मला सांगा) की, दोन पक्षांपैकी कोणात अधिक सुरक्षेची भावना आहे. (एकेश्वरवादी की, अनेकेश्वरवादी) 82 ज्या लोकांनी (सत्य) श्रद्धेचा अंगीकार केला आणि त्या श्रद्धेमध्ये अपकृत्यांची भेसळ केली नाही, अशांनाच मनःशांती लाभेल आणि तेच सन्मार्गावर आहेत. 83 हा आहे आमचा युक्तिवाद जो इब्राहीमला आम्ही त्याच्या जमातीच्या विरोधात दिला होता. आम्ही इच्छितो त्याच्या दर्जात वाढ करतो. तुझा पालनकर्ता बुद्धिमान व ज्ञानी आहे, यात मुळीच शंका नाही. 84 आम्ही इब्राहीमला इसहाक़ व याकूब दिले होते. आणि प्रत्येकाला सन्मार्ग दाखवला होता. आणि त्याआधी आम्ही नूहला सन्मार्ग दाखवला होता. आणि त्याच्या वंशातील दाऊद, सुलेमान, अय्यूब, यूसुफ, मूसा आणि हारून यांना देखील (आम्ही सन्मार्ग दाखवला होता). आणि आम्ही सदाचाराचे वर्तन अंगीकारणाऱ्या लोकांना अशाप्रकारे मोबदला देत असतो.

85 आणि आम्ही ज़करिया व यहया आणि ईसा (येशू) व इलियास यांना देखील सन्मार्ग दाखवला होता. त्यांच्यापैकी प्रत्येक जण सत्प्रवृत्त होता. 86 आणि आम्ही इस्माईल व अलयसआ आणि यूनुस व लूत यांनादेखील सन्मार्ग दाखवला होता आणि त्यांच्यापैकी प्रत्येकास आम्ही सर्व लोकांवर श्रेष्ठत्व प्रदान केले होते. 87 तसेच आम्ही त्यांच्या काही पूर्वजांना आणि वंशजांना व भाऊबंदांना श्रेष्ठत्व प्रदान केले होते. आणि आम्ही त्या सर्वांची (पैगंबर म्हणून) निवड केली

होती आणि त्यांना सरळ मार्गावर लावले होते. 88 हे आहे अल्लाहचे मार्गदर्शन, याद्वारे तो आपल्या भक्तांपैकी ज्यांना इच्छितो त्यांना सन्मार्गी लावतो. आणि जर त्यांनी त्याचे सहभागी ठरविले असते, तर त्यांनी जे काही केले (जी सत्कर्मे केली), ते सर्व निष्फळ ठरले असते. 89 (पण) हे असे लोक आहेत, ज्यांना आम्ही ग्रंथ आणि विवेक प्रदान केले आणि (आमचे) पैगंबर म्हणून नियुक्ती केली. आता जर हे मक्कावासी याला मानण्यास नकार देतील तर (काही पर्वा नाही). कारण आम्ही ते (सन्मान) अशा लोकांना सोपवले आहे, जे त्याला स्वीकारण्यास कदापि नकार देणार नाहीत. 90 पैगंबर! हेच ते लोक (म्हणजे आधी आलेले पैगंबर) आहेत, ज्यांना अल्लाहने सन्मार्गी लावले होते, तर तुम्हीही यांचे अनुसरण करा. (आणि) सांगून टाका की, मी यासाठी तुमच्याकडून कोणताही मोबदला मागत नाही. हे अन्य काही नसून समस्त मानवजातीसाठी एक उपदेश आहे. 91 त्यांना अल्लाहच्या श्रेष्ठत्वाची खरी समजच नाही, (म्हणून) ते म्हणतात, 'अल्लाहने कोणत्याही मनुष्याकडे काहीही प्रकट केलेले नाही' (त्यांना) सांगा, 'तो ग्रंथ ज्याला मूसा घेऊन आला होता, कोणी प्रकट केले होते, ज्यात लोकांना (सन्मार्ग दाखवणारा) प्रकाश आणि मार्गदर्शन होते. ज्याला तुम्ही विविध भागात विभागून टाकलात, त्यांपैकी काही भाग (लोकांना) दाखवता पण बराचसा भाग लपवून ठेवता. तुम्हाला तर (त्याद्वारे) त्या गोष्टी शिकवण्यात आल्या ज्या ना तुम्ही, ना तुमचे पूर्वज जाणत होते, (तर तो ग्रंथ प्रकट करणारा कोण होता?)' सांगा, 'अल्लाह होता तो.' आणि मग (तुम्ही) त्यांना, त्यांच्या व्यर्थ संभाषणात मग्न अवस्थेत सोडून द्या की, त्यात ते खेळत राहावे.

92 आणि हा ग्रंथ देखील आमच्या कृपेने समृद्ध असा आहे, ज्याला आम्हीच प्रकट केले आहे, (हा ग्रंथ) त्यांची सत्यता प्रमाणित करतो, जे (ग्रंथ) याच्या आधी आले होते, म्हणजे तुम्ही प्रमुख शहरातील लोकांना (म्हणजे

मक्कावासीयांना) आणि त्याच्या सभोवार राहणाऱ्या सर्व लोकांना सावध करून टाका. आणि जे मृत्यूनंतरच्या जीवनावर दृढ विश्वास ठेवतात तेच या (ग्रंथावरदेखील) विश्वास ठेवतात. आणि तेच आपल्या नमाज़ांची सदैव काळजी घेतात (म्हणजे नियमितपणे प्रार्थना करतात). 93 आणि त्याच्यापेक्षा अधिक अन्यायी कोण असू शकतो की, जो अल्लाहविषयी खोट्या गोष्टी रचून सांगतो? किंवा (खोटा) दावा करतो की, हे माझ्यावर (अल्लाहकडून) प्रकट करण्यात आले आहे, जेव्हा की, त्याच्याकडे काहीही प्रकट करण्यात आलेले असत नाही, किंवा जो असे म्हणतो, 'अल्लाहने जे अवतरित केलेले आहे, तसेच मी देखील अवतरित करू शकतो.' आणि तुम्ही या अत्याचारी लोकांना त्या वेळेस पाहू शकले तर (तुम्हाला त्यांची दयनीय अवस्था पाहायला मिळेल), जेव्हा (यांच्यासमोर मृत्यू उभा असेल) आणि हे मृत्यूच्या यातना भोगत असतील, आणि तेव्हा (प्राण काढणारे) दूत आपले हात पुढे करून म्हणतील की, चला आणा आपले प्राण, आज तुम्हाला अपमानजनक शिक्षा दिली जाईल, आणि ती यासाठी की, तुम्ही अल्लाहविषयी खोट्या गोष्टी रचून सांगत होता, आणि त्याच्या संदेश असलेल्या खुणांकडे (मोठ्या) घमेंडीने पाठ फिरवीत होता.

94 (आणि अल्लाह म्हणेल) 'आता तुम्ही आमच्याकडे ते सर्व सोडून अगदी एकटे आलात, जे आम्ही तुम्हाला (तुमच्या जीवनकाळात) दिले होते.' (म्हणजे जसे एकटे) तुम्ही अगदी सुरुवातीला होता, जेव्हा आम्ही तुम्हाला निर्माण केले होते. आणि (आज) आम्हाला तुमच्यासोबत ते तुमचे मध्यस्थ दिसत नाहीत ज्यांच्याविषयी तुम्ही असे समजत होता की, तुमचे कार्य सिद्धीस नेण्यात (अल्लाहसह) त्यांचाही वाटा आहे. तुमचे आणि तुमच्या पृथ्वीवरील जीवनाचे सर्व संबंध आता संपुष्टात आलेले आहेत. आणि तुमच्या आधीच्या सर्व सुंदर कल्पनांनी (आता) तुमचा साथ सोडलेला आहे. 95 खरोखर, तोच आहे अल्लाह जो (धान्याच्या) दाण्यांना आणि फळांच्या (टणक) गुठळीला फाडतो. तो

निर्जिवातून सजीव बाहेर काढतो. आणि तोच सजीवातून निर्जीव बाहेर काढणारा आहे. असा आहे तुमचा अल्लाह, तर मग तुम्ही सत्यापासून दूर कुठे भरकटत जात आहात?

96 तोच दिवसाचा उदय घडवून आणतो, आणि त्यानेच विश्रांतीसाठी रात्र बनविली. आणि सूर्य व चंद्राला एका ठरावीक कक्षेत कामाला लावले. सर्वशक्तिमान व सर्वज्ञ असलेल्या (अल्लाहने) हे ठरवून दिलेले आहे. 97 आणि तोच आहे ज्याने तुमच्यासाठी (आकाशात) ताऱ्यांना स्थापित केले, म्हणजे त्यांच्या साहाय्याने तुम्हाला जमीन आणि समुद्राच्या घोर अंधकारात मार्ग प्राप्त व्हावा. आम्ही हे प्रमाण समजू इच्छिणाऱ्या लोकांसाठी स्पष्ट करून सांगितले आहे. 98 आणि त्यानेच तुम्हा (सर्वांना) एका जिवापासून निर्माण केले आहे, नंतर (त्याने) तुमच्यापैकी प्रत्येकाला (पृथ्वीवर ठरावीक कालावधीपर्यंत) मुक्काम करण्यासाठी जागा दिली आणि (मृत्यूनंतर) विश्रांतीचे ठिकाण (ही दिले). खरोखर, आम्ही हे प्रमाण त्या लोकांसाठी (सविस्तर) स्पष्ट करून सांगितले आहे, जे चिंतन करणारे आहेत.

99 तोच आहे (अल्लाह) जो आकाशातून (ढगांद्वारे) पाण्याचा वर्षाव करतो, आणि त्यापासून आम्ही सर्व प्रकारचे वनस्पती उगवतो. मग आम्ही त्यांना हिरव्यागार पालव्या फोडतो, (पुढे) त्यापासून आम्ही धान्याची कणसे निर्माण करतो. आणि खजुरीच्या (झाडाच्या) गाभ्यातून खजुरीचे लटकणारे घड (आम्ही बाहेर काढतो). आणि बागा द्राक्षांच्या व जैतून च्या आणि डाळिंब्याच्या (आम्हीच फुलवतो व) पिकवतो, ज्यांची (फळे दिसायला) एक सारखीही आहेत व भिन्न प्रकारचीही आहेत, जेव्हा यांना फळ येते, तेव्हा त्यांच्या त्या फळाकडे आणि पिकण्याच्या अवस्थेकडे पाहा. या सर्वांमध्ये विश्वास ठेवणाऱ्यांसाठी संदेश असलेल्या खुणा आहेत. 100 काही लोकांनी (अल्लाहची एक अदृश्य निर्मिती असलेल्या) जिन्नांना अल्लाहचे समकक्ष ठरविले. (पण वास्तविकता तर

ही आहे की), अल्लाहनेच त्यांना निर्माण केले. आणि ते (लोक) त्यांना काहीच ज्ञान नसतानाही त्याचे पुत्र व पुत्री असल्याचे दर्शवतात. असीम आहे त्याची महिमा आणि फार उदात्त आहे तो त्यापेक्षा, ज्या गोष्टींचे हे वर्णन करतात.

101 तो आकाश आणि पृथ्वीचा प्रारंभकर्ता (आद्यप्रवर्तक) आहे. त्याला पत्नीच नाही तर त्याला मूल कसा असू शकेल? त्यानेच प्रत्येक वस्तुमात्राची निर्मिती केलेली आहे, आणि त्यालाच प्रत्येक वस्तुमात्राचे ज्ञान आहे. 102 असा आहे अल्लाह, तुमचा पालनकर्ता, त्याच्याशिवाय (दुसरा) कोणीच ईश्वर नाही. तोच सर्व वस्तुमात्रांचा निर्माता आहे. म्हणून (तुम्ही) केवळ त्याचीच उपासना करा. तोच प्रत्येक वस्तूचा कैवारी (सांभाळकर्ता) आहे. 103 दृष्टी त्याच्यापर्यंत पोचू शकत नाही, परंतु तो सर्वांच्या दृष्टीपर्यंत पोचतो (सर्वांच्या नजरा त्याच्या आवाक्यात आहेत) तोच एकटा (असा) आहे जो अथांग आहे, प्रत्येक गोष्टीचा जाणकार आहे. 104 आता तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याकडे (या ग्रंथाच्या माध्यमातून) दिव्यदृष्टीचे साधन आलेले आहे. मग जो कोणी डोळसपणे (कार्य करण्याचा) पर्याय निवडेल, तर (असे करणे) त्याच्याच भल्याचे असेल आणि जो कोणी आंधळाच राहू इच्छील, तर तो स्वत:चेच नुकसान करून घेईल. आणि (सांगून टाका), मी तुमच्यावर काही पहारेकरी नाही. 105 आणि अशाप्रकारे आम्ही आमचे संदेश विविध प्रकारे स्पष्ट करून सांगत आहोत, (जेणेकरून सत्य प्रस्थापित व्हावे) आणि (परिणामत:) त्यांनी असे म्हणावे की, तुम्ही उत्तम प्रकारे आमच्यासमोर पठण करून दाखवले आहे. म्हणजे जे जाणण्यास उत्सुक आहेत, त्यांच्यासमोर आम्ही हे स्पष्ट करून टाकावे (की, हेच सत्य आहे).

106 तुम्ही फक्त त्याचेच अनुसरण करा जे तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याकडे प्रकट करण्यात आले आहे. त्याच्याशिवाय दुसरा कोणीही ईश्वर नाही, (उपासनेयोग्य नाही). आणि (तुम्ही) अनेकेश्वरवाद्यांपासून दूर राहा. 107

आणि अल्लाहने इच्छिले असते तर त्यांनी इतरांना अल्लाहच्या बरोबरीचे स्थान दिले नसते. आणि आम्ही तुम्हाला त्यांच्यावर पहारेकरी म्हणून नियुक्त केलेले नाही. आणि त्यांच्या वागणुकीबद्दल तुम्ही जबाबदारही नाही. 108 आणि ते अल्लाहव्यतिरिक्त ज्यांची प्रार्थना करतात (धावा करतात), त्यांना तुम्ही अपशब्द बोलू नका, म्हणजे (त्याच्या प्रतिक्रियेत) असे होऊ नये की, ते मर्यादेचे उल्लंघन करून, अज्ञानतेपोटी अल्लाहविषयी अपशब्द बोलू लागतील.

अशाप्रकारे आम्ही प्रत्येक समाजाला त्याचे कर्म चांगल्या रूपात दर्शविले आहे. शेवटी त्या सर्वांना त्यांच्या पालनकर्त्याकडे परत जायचे आहे. तेव्हा अल्लाह त्यांच्या समोर त्यांच्या सर्व कृत्यांचे सत्य उघड करील. 109 आणि ते मोठ्या दृढतेने अल्लाहची शपथ घेऊन सांगतात, जर त्यांना एखादा चमत्कार दाखवला गेला तर ते निश्चितच (या ग्रंथावर) विश्वास ठेवतील. (त्यांना) सांगा, 'चमत्कार केवळ अल्लाहच्या अखत्यारीत आहेत.' आणि (पैगंबर!) तुम्ही कसे सांगू शकता की, (काही) चमत्कार दाखवल्यानंतर ते निश्चितपणे त्यावर विश्वास ठेवणारे बनतील? नाही, तेव्हाही ते विश्वास ठेवणार नाहीत.

110 आणि आम्ही त्यांची मने आणि दृष्टी सत्यापासून विन्मुख करून टाकू. कारण पहिल्या वेळेस यांनी त्यावर विश्वास ठेवण्यास नकार दिला. आणि आम्ही त्यांना सोडून देऊ म्हणजे ते त्यांच्या विद्रोहात आंधळ्याप्रमाणे भटकत राहतील. 111 आणि जरी आम्ही त्यांच्याकडे स्वर्गदूत पाठवले असते, आणि मृतांनी त्यांच्याशी संभाषण केले असते आणि (सत्य सिद्ध करण्यासाठी जरी आम्ही) सर्व गोष्टी त्यांच्यापुढे समोरासमोर आणल्या असत्या तरीही अल्लाहची इच्छा असल्याशिवाय ते त्यावर श्रद्धा ठेवणारे बनले नसते. पण त्यांच्यापैकी बहुतांश लोक (पूर्णपणे) अज्ञानी आहेत. 112 आणि अशाप्रकारे आम्ही दुष्ट प्रवृत्ती असलेल्या माणसांना आणि जिन्नांना (अदृश्य निर्मिती) प्रत्येक पैगंबराचे शत्रू बनविले आहे. फसवणूक करण्याच्या उद्देशाने, ते एकमेकांना वाईट सूचना

करीत असतात. आणि जर तुझ्या पालनकर्त्याने इच्छिले असते तर त्यांनी असे केले नसते. तर तुम्ही त्यांना सोडून द्या की, त्यांनी खोट्या गोष्टी रचण्याचा खेळ खेळत राहावा.

113 आणि (हे सर्व काही आम्ही त्यांना यासाठी करू देत आहोत की), जे मृत्यूनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवत नाहीत, त्यांची मने या (फसवणुकीकडे) आकर्षित व्हावीत, आणि त्यापासून (त्यांनी) खूष व्हावे, आणि ते जे काही कमवीत आहेत, ते त्यांनी कमवून घ्यावे. 114 (तुम्ही त्यांना सांगा), 'मी अल्लाहव्यतिरिक्त दुसऱ्याला न्यायदाता म्हणून शोधावे काय? जेव्हा की, त्याने तर सुस्पष्ट वर्णन असलेला ग्रंथ तुमच्याकडे पाठविला आहे.' आणि ज्यांना आम्ही आधी ग्रंथ दिला होता, त्यांना चांगले ठाऊक आहे की, हा ग्रंथही तुमच्या पालनकर्त्याकडूनच सत्यासह पाठविण्यात आलेला आहे. म्हणूनच तुम्ही शंका बाळगणाऱ्यांपैकी होऊ नका.

115 आणि तुमच्या पालनकर्त्याचे वचन (शब्द) सत्य व न्यायाच्या दृष्टीने परिपूर्ण ठरलेले आहे, कोणीही त्याच्या शब्दांत बदल करू शकत नाही. आणि फक्त तोच सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा आहे. 116 या जगात राहणाऱ्या बहुसंख्य लोकांच्या म्हणण्याचे तुम्ही अनुसरण कराल तर ते तुम्हाला अल्लाहच्या मार्गापासून दूर घेऊन जातील. ते दुसरे काही नाही तर केवळ (इतरांच्या) अनुमानाचे अनुसरण करतात. आणि ते स्वत:(ही) केवळ कल्पना विलास करतात. 117 निश्चितपणे तुमचा पालनकर्ता त्यांना चांगल्याप्रकारे जाणतो, जे त्याच्या मार्गापासून दूर गेलेले आहेत. आणि ज्यांना सन्मार्ग प्राप्त झालेला आहे, त्यांनाही तो चांगल्याप्रकारे जाणतो. 118 (तुम्ही) त्यातून खा, ज्यावर अल्लाहचे नाव घेण्यात आले आहे, जर तुम्ही त्याच्याकडून प्रकट झालेल्या संदेशावर खरोखर विश्वास ठेवणारे असाल.

119 आणि का म्हणून तुम्ही त्यातून खाऊ नये, ज्यावर अल्लाहचे नाव

घेण्यात आले आहे? जेव्हा की, अल्लाहने तुमच्यासाठी निषिद्ध ठरवण्यात आलेल्या गोष्टी आधीच सविस्तर स्पष्ट करून सांगितले आहे. पण जर परिस्थितीनुसार (निषिद्ध वस्तू भक्षण करण्यास) तुम्हाला विवश व्हावे लागले (तर ते क्षम्य असेल) आणि ज्ञानाच्या अभावी अनेक लोक त्यांच्या वाईट इच्छेनुसार (इतरांना) बहकावीत असतात. निश्चितपणे तुमचा पालनकर्ता मर्यादांचे उल्लंघन करणाऱ्या लोकांना चांगले जाणतो. 120 तुम्ही सर्व प्रकारच्या पापांपासून दूर राहा, मग ते पापकृत्य उघड असो किंवा लपून केले जाणारे असो. जे लोक पापांची कमाई करीत आहेत, त्यांनी जे काही केले असेल त्याचा, त्यांना लवकरच मोबदला मिळून जाईल. 121 आणि ज्यावर अल्लाहचे नाव घेण्यात आलेले नसेल त्यातून तुम्ही काहीही खाऊ नका, कारण (तसे करणे म्हणजे) स्पष्ट आज्ञाभंग आहे. आणि सैतानी प्रवृत्तीचे लोक आपल्या अनुयायांना तुमच्याशी विवाद घालण्यासाठी प्रवृत्त करीत असतात. आणि जर तुम्ही त्यांचे म्हणणे ऐकले तर तुमचा समावेश निश्चितपणे त्या लोकांत होईल, जे इतरांना अल्लाहचे सहभागी ठरवतात. 122 तो माणूस जो (मनाने) मेलेला होता, त्याला आम्ही जीवन दिले आणि (सन्मार्ग दाखवणारा) प्रकाश दिला ज्यासह तो लोकांच्या दरम्यान चालतो तर असा व्यक्ती त्या माणसासारखा होऊ शकतो का, जो घोर अंधकारात खितपत पडलेला आहे, त्यातून तो कधीही बाहेर पडू शकत नाही? तर अशाप्रकारे सत्य नाकारणाऱ्या लोकांची वाईट कृत्ये, त्यांना सत्कृत्ये दिसावीत असे करण्यात आले आहे.

123 अशाप्रकारे प्रत्येक वस्तीत आम्ही त्यातील प्रमुख अपराध्यांना परवानगी दिली की, त्यांनी षड्यंत्र रचावीत. आणि जे षड्यंत्र ते रचत असतात, वस्तुतः स्वतःच्याच विरुद्ध रचत असतात, परंतु त्यांना ते कळत नाही. 124 आणि जेव्हा त्यांच्याकडे संदेश असलेली एखादी खूण येते, तेव्हा ते म्हणतात, 'आम्ही तोपर्यंत विश्वास ठेवणार नाही, जोपर्यंत आम्हालाही तेच दिले जात नाही, जे

अल्लाहच्या (इतर) पैगंबरांना देण्यात आले आहे.' आपला संदेशवाहक कोणाला नियुक्त करावे हे अल्लाहला चांगले ठाऊक आहे. (आणि) जे लोक अपराधी आहेत, त्यांना निश्चितपणे अल्लाहकडे (म्हणजे मृत्यूनंतरच्या जीवनात) अपमान व कठोर शिक्षेला तोंड द्यावे लागेल. हे यासाठी की, ते कुटिल कारस्थाने करणारे लोक होते. 125 (आणि) अल्लाह ज्यास सन्मार्ग दाखवू इच्छितो त्याच्या मनाची दारे इस्लामसाठी (म्हणजे त्याच्या इच्छेला पूर्णपणे समर्पित होण्यासाठी) खुले करतो. आणि ज्यास सन्मार्गापासून (भरकटत) दूर जाऊ देऊ इच्छितो, त्याच्या मनाची दारे संकुचित करून टाकतो, म्हणजे त्याला असे वाटावे की, (सन्मार्गाचा अंगीकार करणे) जणू आकाशात चढण्यासारखे (कार्य) आहे. अशाप्रकारे जे विश्वास ठेवण्यास नकार देतात अल्लाह त्यांच्यावर नामुष्कीचा वर्षाव करतो.

126 आणि हा आहे थेट तुझ्या पालनकर्त्याकडे घेऊन जाणारा मार्ग. चिंतन करणाऱ्या लोकांसाठी आम्ही संदेश असलेल्या खुणा उघड करून टाकलेल्या आहेत. 127 त्यांच्यासाठी त्यांच्या पालनकर्त्याकडे शांतीचे निवासस्थान आहे. आणि तो त्यांचा रक्षणकर्ता असेल त्या कर्मांच्या मोबदल्यात जे ते करत आलेत. 128 आणि ज्या दिवशी अल्लाह त्या सर्वांना एकत्रित करील, (तेव्हा) तो म्हणेल, 'हे जिन्न समुदाय! तुम्ही मानवजातीतील फार मोठा वर्ग आपल्याकडे वळवला!' आणि माणसांपैकी त्यांचे मित्र म्हणतील, 'हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही एकमेकांपासून (जगातील जीवनात) लाभान्वित होत राहिलो. आणि (शेवटी आता) तू आमच्यासाठी जो अवधी निश्चित केला होतास त्या अवधीपर्यंत आम्ही येऊन पोचलो आहोत.' (त्यावर) अल्लाह म्हणेल, आता तुमच्या (कायम) मुक्कामाचे ठिकाण नरकाची आग आहे, तुम्ही कायम तिथेच राहाल; पण जे अल्लाह इच्छील. खरोखर तुमचा पालनकर्ता बुद्धिवान आहे, सर्वज्ञ आहे.

129 आणि अशाप्रकारे आम्ही (मृत्यूनंतरच्या जीवनात) दुराचारी लोकांना,

इतर दुराचारी लोकांच्या जवळ आणू, (आणि असे आम्ही) त्यांनी केलेल्या (वाईट) कृत्यांचा परिणाम म्हणून करू. 130 (आणि अल्लाह पुढे म्हणेल) हे जिन्न व मानव समुदाय! तुमच्यामधूनच तुमच्याकडे पैगंबर आले नव्हते का, ज्यांनी माझे संदेश तुम्हाला वाचून दाखवले होते, आणि आजच्या या दिवसाला तुम्हाला सामोरे जावे लागणार असल्याचा इशारा देत होते. ते म्हणतील, 'आम्ही (आज) स्वत:, स्वत:विरुद्ध साक्षीदार आहोत.' आणि सांसारिक जीवनाने त्यांची फसवणूक केली. आणि ते स्वत:विरुद्धच अशी साक्ष देतील की, ते सत्य नाकारत राहिले. 131 तुमचा पालनकर्ता वस्त्यांना (म्हणजे वस्त्यांत राहणाऱ्या लोकांना) त्यांच्या अत्याचारापोटी या अवस्थेत उध्वस्त करत नाही की, तेथील लोक (अद्याप) अनभिज्ञ आहेत (म्हणजे त्यांना सावध केले गेले नाही). 132 आणि प्रत्येक व्यक्तीचे आपआपल्या कर्मांनुसार (अल्लाहकडे) दर्जानिहाय स्थान असेल. आणि तुमचा पालनकर्ता लोकांच्या कर्मांपासून (अजिबात) अनभिज्ञ नाही.

133 आणि (फक्त) तुमचा पालनकर्ताच स्वयंपूर्ण व असीम दयावान आहे. त्याने इच्छिल्यास तो तुम्हाला (पृथ्वीवरून बेदखल) करून दूर नेऊ शकतो आणि ज्याच्या बाबतीत इच्छील त्यांना तुमचे स्थान बहाल करू शकतो. ज्याप्रमाणे त्याने तुम्हाला इतर जातीच्या वंशातून उभे केले. 134 ज्या गोष्टीचे तुम्हाला वचन दिले जात आहे, ती गोष्ट खरोखर होणार आहे, (म्हणजे कयामत निश्चितपणे येणार आहे). आणि तुम्ही (अल्लाहच्या विरुद्ध उभे राहून) ती (कदापि) रोखू शकत नाही. 135 (तुमच्या समाजातील श्रद्धा न ठेवणाऱ्या लोकांना) सांगा, 'हे माझ्या समाजबांधवांनो! तुम्ही तुमच्या पद्धतीने कार्य करत राहा, मी देखील (माझ्या पद्धतीने अल्लाहच्या मार्गात) कार्य करीत आहे. आणि लवकरच तुम्हाला कळून चुकेल, (शेवटी) कोणाचे भविष्य उज्ज्वल आहे. दुराचारी लोक निश्चितपणे यशस्वी होणार नाहीत.' 136 आणि अल्लाहने जी पिके

व गुरेढोरे निर्माण केलेली आहेत, त्यांपैकी त्यांनी अल्लाहसाठी एक भाग निश्चित केलेला आहे. आणि ते आपल्या कल्पनेनुसार म्हणतात, ‘हा भाग अल्लाहचा आहे. आणि हा भाग आम्ही ज्यांना अल्लाहचे समकक्ष मानतो त्यांच्यासाठी आहे.’ जो भाग त्यांच्या उपास्यांसाठी असतो तो अल्लाहला पोचू शकत नाही, पण जो भाग अल्लाहसाठी आहे, तो मात्र त्यांच्या उपास्यांना पोचू शकतो. खरोखर, किती वाईट निर्णय आहे, जो ते करतात!

137 आणि अशाच प्रकारे अनेकेश्वरवादी लोकांच्या दृष्टीत, त्यांच्या ठरवलेल्या उपास्यांनी आपल्याच अपत्यांची हत्या करण्याला, योग्य कृत्य असे भासवले आहे, अशासाठी की, त्यांचा सर्वनाश करावा आणि त्यांच्या धर्माच्या बाबतीत त्यांच्यात संभ्रम निर्माण करावा. आणि जर अल्लाहने इच्छिले असते तर त्यांनी असे केले नसते. म्हणून तुम्ही त्यांना सोडून द्या की, ते आपल्या लबाड कृत्यांत लिप्त राहावेत. 138 आणि ते म्हणतात, ‘हे प्राणी आणि ही पिके निषिद्ध आहेत, ज्यांना आम्ही खाऊ द्यावे त्यांच्या व्यतिरिक्त हे कोणीही खाऊ शकत नाहीत.’ ते असा (खोटा) दावा करतात आणि (असे जाहीर करतात की), काही प्राणी असे आहेत ज्यांच्या पाठी (बसण्यासाठी किंवा ओझे लादण्यासाठी) निषिद्ध आहेत. आणि काही प्राणी असे आहेत की, ज्यांच्यावर ते अल्लाहचे नाव घेत नाहीत. अशाप्रकारे ते अल्लाहविषयी खोट्या गोष्टी रचून सांगत आहेत. त्यांनी जे काही खोटे रचून सांगितले आहे, त्याबद्दल त्यांना अल्लाह लवकरच शिक्षा करील.

139 आणि ते म्हणतात, ‘अमुक–अमुक प्राण्याच्या गर्भात जे काही आहे, ते केवळ आमच्या पुरुषांसाठी राखून ठेवलेले आहे आणि ते आमच्या स्त्रियांसाठी निषिद्ध आहे. पण जर ते मृतावस्थेत जन्माला आले तर त्याच्या भक्षणात सर्व सहभागी होऊ शकतात.’ अल्लाह त्यांना लवकरच या खोट्या गोष्टी बोलल्याबद्दल शिक्षा करेल. (लक्षात ठेवा) तो बुद्धिमान आहे, सर्वज्ञ आहे. 140 खरोखर, ते

लोक (फार मोठा) तोटा प्राप्त करणारे बनले, ज्यांनी मूर्खपणाने (व) ज्ञानाच्या अभावी आपल्या अपत्यांची हत्या केली. आणि अल्लाहने जी उपजीविका त्यांना प्रदान केली होती, ती त्यांनी अल्लाहविषयी खोट्या गोष्टी रचून (स्वत:साठी) अवैध ठरविली. ते खरोखरच मार्गभ्रष्ट झालेले आहेत आणि ते सदाचरणी बनले नाहीत. 141 तो अल्लाह आहे, ज्याने बागा निर्माण केल्या, काही असे आहेत (जसे द्राक्षांच्या बागा) ज्यांच्या वेली मांडवावर चढविल्या जातात. आणि काही ज्यांना (मांडवावर) चढविले जात नाही. तसेच खजुराचे वृक्ष व (विविध) धान्यांची शेते निर्माण केली. ज्यांची फळे स्वादात विभिन्न प्रकारची आहेत. आणि त्याने एका प्रकारचे आणि भिन्न प्रकारचे जैतून व डाळिंब निर्माण केले. खा त्यांची फळे जेव्हा ती फळाला येतील, पण पीक कापणीच्या (फळ काढण्याच्या) दिवशी अल्लाहचा हक्क त्याला देऊन टाका, (म्हणजे गरिबांना देऊन). आणि (अल्लाहने दिलेल्या वस्तूंचा) अपव्यय करू नका (कारण) अपव्यय करणारे (लोक) अल्लाहला अजिबात प्रिय नाहीत.

142 आणि गुराढोरांपैकी त्याने काहींना ओझे वाहण्यासाठी आणि काहींना (माणसाचे) अन्न म्हणून निर्माण केले. तर अल्लाहने तुमच्यासाठी ज्याची तरतूद केलेली आहे, त्यातून खा. आणि सैतानाच्या पदचिन्हांचे अनुसरण करू नका, खरोखर तो तुमचा जाहीर शत्रू आहे. 143 आणि अल्लाहने आठ नर-माद्या निर्माण केल्या आहेत; दोन जोड्या मेंढ्यांच्या आणि दोन बकऱ्यांच्या. तुम्ही त्यांना विचारा, 'त्याने त्या दोन नरांना निषिद्ध ठरवलेले आहे की, दोन माद्यांना अथवा त्या दोन माद्यांच्या गर्भात जे काही आहे त्यांना? मला ज्ञानाच्या आधारे प्रमाण दाखवा, जर तुमच्या बोलण्यात सत्यता आहे.'

144 आणि ते याचप्रमाणे उंटाच्या दोन आणि बैलाच्या दोन (नर व मादी अशा जोड्या ज्या अल्लाहने निर्माण केलेल्या आहेत, त्यांना अवैध घोषित करतात). (तुम्ही) त्यांना विचारा, 'त्याने त्या दोन नरांना निषिद्ध ठरवलेले

आहे की, दोन माद्यांना अथवा त्या दोन (उंट व गाय) माद्यांच्या गर्भात जे काही आहे ते? अल्लाहने या गोष्टीचा जेव्हा तुम्हाला आदेश दिला होता, तेव्हा तुम्ही स्वत: उपस्थित होता का?' तर मग त्या माणसापेक्षा अधिक दुष्ट कोण असू शकतो, जो कुठल्याही ज्ञानपूर्ण आधाराशिवाय अल्लाहविषयी (स्वत:) खोट्या गोष्टी रचून लोकांना सांगतो, म्हणजे त्याद्वारे लोकांना सन्मार्गापासून दूर करावे. खरोखर, अल्लाह अशा अत्याचारी लोकांना सरळ मार्ग दाखवीत नाही. 145 पैगंबर! त्यांना तुम्ही सांगा, 'माझ्याकडे जे काही प्रकट करण्यात आलेले आहे. त्यात मला अशी कोणतीही वस्तू आढळत नाही, जी खाणाऱ्यांसाठी निषिद्ध आहे, पण फक्त या व्यतिरिक्त की, ते प्राणी जे स्वत: मरण पावले असतील किंवा वाहणारे रक्त किंवा डुकराचे मास, (कारण) हे सर्व अस्वच्छ (अशुद्ध) आहेत. किंवा तो अपवित्र बळी ज्यावर अल्लाहव्यतिरिक्त अन्य कोणाचे नाव घेण्यात आले असेल.' पण जो कोणी भुकेने व्याकूळ होऊन त्या निषिद्ध वस्तू खाण्यासाठी विवश झाला असेल, आणि आज्ञा भंग करण्याचा त्याचा हेतू नसेल व तो मर्यादांचे उल्लंघन करणारा नसेल तर (अशा व्यक्तीच्या बाबतीत) तुझा पालनकर्ता निश्चितपणे क्षमाशील व दयाळू आहे. 146 आणि (फक्त) ज्यू लोकांसाठी आम्ही नखदार पंजे असणारी सर्व जनावरे निषिद्ध ठरविली होती. तसेच गाय–बैल व शेळ्यामेंढ्या यांची चरबी देखील निषिद्ध होती, पण फक्त या व्यतिरिक्त की, ती (चरबी) पाठीला वा आतड्यांवर लागून असेल किंवा हाडांना चिकटलेली असेल (तर निषिद्ध नव्हती). त्यांनी केलेल्या द्रोहाबद्दल आम्ही त्यांनाही शिक्षा केली होती. आणि आम्ही सत्यवचनी आहोत, यात मुळीच शंका नाही.

147 जर आतादेखील ते तुम्हाला खोटे ठरवत असतील तर तुम्ही त्यांना सांगा की, तुमचा पालनकर्ता अनंत करुणेचा सागर आहे. पण अपराधी लोकांवरून त्याची शिक्षा टाळली जाऊ शकत नाही. 148 जे लोक अल्लाहचे समकक्ष

ठरविण्यावर ठाम आहेत, ते म्हणतील, ‘अल्लाहची इच्छा असती तर आम्ही किंवा आमच्या पूर्वजांनी अल्लाहचे समकक्ष ठरविलेच नसते, किंवा (अल्लाहच्या दृष्टीत वैध असलेली) कोणतीही वस्तू आम्ही निषिद्ध ठरविली नसती.’ अगदी अशाचप्रकारे यांच्या आधीचे लोक तोपर्यंत खोटा वादविवाद करीत राहिले, जोपर्यंत त्यांना आमच्या शिक्षेची गोडी चाखावी लागली नाही. त्यांना सांगा, ‘तुमच्याकडे कोणतेही (खात्रीलायक) ज्ञान आहे का? असल्यास ते आमच्या समोर प्रस्तुत करा. तुम्ही तर केवळ भ्रमाचे अनुसरण करत आहात आणि फक्त तर्क लढवीत आहात.’

149 (त्यांना) सांगा, (या गोष्टीची जाण ठेवा की), केवळ अल्लाहचाच (सत्याविषयीचा) युक्तिवाद अंतिम (आणि निर्णायक) आहे. जर त्याने त्याची इच्छा लादली असती तर निश्चितच तुम्हा सर्वांना सन्मार्ग दाखवला असता (पण त्याला तर तुमची परीक्षा घ्यायची आहे). 150 (त्यांना) सांगा की, ‘अल्लाहने हे निषिद्ध ठरवलेले आहे,’ अशी साक्ष देणारे तुमचे साक्षीदार पुढे आणा. आणि जरी त्यांनी पुढे येऊन अशी खोटी साक्ष दिली तरी तुम्ही त्यांच्याबरोबर राहून (त्यांच्या समर्थनात) साक्ष देऊ नका. आणि तुम्ही त्यांच्या दुष्टप्रवृत्तीचे अनुसरण करू नका, ज्यांनी आमच्या संदेशांना खोटे ठरविले आणि जे मृत्यूनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवत नाहीत आणि ज्यांनी इतरांना आपल्या पालनकर्त्याच्या बरोबरीचे स्थान दिले. 151 (त्यांना) सांगा की, या, तुमच्या पालनकर्त्याने ज्या गोष्टी तुमच्यासाठी (खरोखर) निषिद्ध ठरवल्या आहेत त्या मी तुमच्यासमोर ठेवतो. त्या म्हणजे, तुम्ही कोणत्याही प्रकारे इतरांना त्याच्या बरोबरीचे स्थान देऊ नका (त्याचे समकक्ष ठरवू नका) आणि आपल्या आईवडलांशी भलेपणाने वागा आणि गरिबीच्या भीतीने तुम्ही आपल्या अपत्यांची हत्या करू नका. कारण आम्हीच तुम्हालाही उपजीविका प्रदान करतो आणि त्यांनाही. अश्लील कृत्य करण्यापासून स्वत:ला दूर ठेवा, मग ते उघड असो वा

गुप्त. आणि ज्या जिवाला अल्लाहने पवित्र ठरविलेले आहे, त्याची हत्या करू नका, पण फक्त याव्यतिरिक्त की, तसे करणे न्यायोचित असेल. ह्या आहेत, त्याने तुम्हाला दिलेल्या आज्ञा. म्हणजे तुम्ही तुमच्या बुद्धीचा उपयोग करावा (ही तुमच्याकडून अपेक्षा).

152 अनाथाच्या संपत्तीपासून पूर्णपणे दूर राहा (म्हणजे जवळही फिरकू नका), पण फक्त याशिवाय की, त्यासंबंधाने तुमचे चांगले हेतू आहेत, जोपर्यंत (अनाथ) सज्ञान होत नाही तोपर्यंत. आणि (तुमच्या सर्व व्यवहारात) माप आणि वजन देण्याच्या बाबतीत न्यायाचे पालन करा. आम्ही कोणत्याही व्यक्तीवर तिच्या क्षमतेपेक्षा जास्त भार टाकत नाही. जेव्हा तुम्ही (कोणत्याही गोष्टीबाबत) मत द्याल तर न्यायाचे पालन करा, मग ती गोष्ट तुमच्या जवळच्या नातेवाइकांशी संबंधित का असेना. आणि (तुम्ही) अल्लाहशी केलेल्या प्रतिज्ञेशी (नेहमी) बांधील राहा. या त्या गोष्टी आहेत ज्याची अल्लाहने तुम्हाला आज्ञा केलेली आहे, तर या गोष्टी (नेहमी) लक्षात ठेवा.

153 अल्लाहने असा आदेश दिला आहे की, हाच माझ्याकडे येणारा सरळ मार्ग आहे. तर याच मार्गाचे अनुसरण करा आणि इतर मार्गांनी जाऊ नका. ते तुम्हाला त्याच्या (अल्लाहच्या) मार्गापासून दूर घेऊन जातील. हा आहे त्याने तुम्हाला दिलेला आदेश, म्हणजे तुम्ही स्वत:ला (मार्गभ्रष्ट होण्यापासून) वाचवावे.
154 मग आम्ही सद्‌वर्तनी लोकांवर (आमच्या कृपेची) पूर्तता करण्यासाठी (पैगंबर) मूसाला ग्रंथ प्रदान केला होता. ज्यात सर्व गोष्टींचे स्पष्टीकरण आणि मार्गदर्शन व कृपा होती. म्हणजे (त्यांनी) आपल्या पालनकर्त्याशी होणाऱ्या भेटीवर दृढ विश्वास ठेवावा.

155 आणि अशाचप्रकारे हा ग्रंथही आम्ही प्रकट केला आहे, जो आमच्या कृपा–आर्शीवादाने संपन्न असा ग्रंथ आहे. तर याचे अनुसरण करा. आणि अल्लाहचे भय बाळगा, म्हणजे तुमच्यावर त्याचा कृपावर्षाव होईल. 156 (हा

ग्रंथ तुम्हाला यासाठी देण्यात आला आहे) म्हणजे तुम्ही असे म्हणू नये की, ग्रंथ तर केवळ आमच्या आधीच्या दोन जमातींकडेच पाठविण्यात आला होता. आणि आम्ही त्यांच्या शिकवणुकीपासून खरोखर अनभिज्ञ होतो. 157 कदाचित तुम्ही असेही म्हणू नये की, जर आमच्याकडे ग्रंथ पाठविण्यात आला असता तर आम्ही निश्चितपणे त्यांच्यापेक्षा अधिक, त्या मार्गदर्शनाचे पालन केले असते. आता तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याकडे सत्याचे सुस्पष्ट प्रमाण आणि उपदेशपर संदेश आणि कृपा (असलेला ग्रंथ) पोचलेला आहे. (आता) त्याच्यापेक्षा अधिक अत्याचारी माणूस कोण असू शकतो, जो अल्लाहच्या संदेशांना खोटे ठरवितो आणि तिरस्काराने त्याकडे पाठ फिरवतो? (तर) जे लोक आमच्या संदेशाकडे तिरस्कारपूर्वक दुर्लक्ष करतील, अशांना आम्ही त्यांच्या या कृत्याच्या मोबदल्यात फार कठोर शिक्षा देऊ. 158 ते या प्रतीक्षेत आहेत का की, त्यांच्याकडे स्वर्गदूत यावेत किंवा (स्वतः) तुमच्या पालनकर्त्यानेच त्यांच्यासमोर प्रकट व्हावे किंवा तुमच्या पालनकर्त्याच्या खुणांपैकी एखादी (मोठी) खूण प्रकट व्हावी. (पण) ज्या दिवशी तुमच्या पालनकर्त्याच्या खुणांपैकी एखादी खूण प्रकट होईल, तेव्हा सत्याचा स्वीकार करणे अशा व्यक्तीला लाभदायक ठरणार नाही, ज्याने त्याआधी श्रद्धा धारण केलेली नसेल आणि त्या श्रद्धेनुसार काही सत्कर्मे केलेली नसेल. (त्यांना) सांगा, 'तुम्ही (त्या दिवसाची) प्रतीक्षा करा आणि आम्ही देखील प्रतीक्षा करीत आहोत.' 159 त्यांच्याशी तुमचा काहीही संबंध नाही, ज्यांनी आपल्या धर्मात वेगवेगळे मार्ग काढले व अनेक पंथामध्ये विभाजित झाले. त्यांचे प्रकरण अल्लाहच्याच हवाली आहे आणि तो (लवकरच) त्यांना दाखवून देईल, जे ते करीत राहिले.

160 जो कोणी सत्कर्म करून (अल्लाहसमोर) येईल तर त्यास त्याच्या कृत्याच्या दहापट (मोबदला) मिळेल. पण जो कोणी दुष्कृत्य करून येईल तर त्यास तेवढाच मोबदला दिला जाईल. आणि कोणावरही (अजिबात) अन्याय केला जाणार नाही. 161 (त्यांना) सांगा, 'माझ्या पालनकर्त्याने मला सरळ मार्ग

दाखवलेला आहे, सचोटीच्या धर्माचा मार्ग, (सत्यनिष्ठ) इब्राहीमचा मार्ग, ज्याने सर्व खोट्या गोष्टींपासून स्वत:ला पूर्णपणे दूर केले होते.' आणि तो त्या लोकांपैकी मुळीच नव्हता, ज्यांनी इतरांना अल्लाहचे समकक्ष ठरविले होते.

162 (त्यांना) सांगा, माझी प्रार्थना (नमाज़) तसेच माझ्या सर्व प्रकारच्या उपासना, सर्व प्रकारचा त्याग तसेच माझे जगणे आणि माझे मरणे (सर्व) केवळ विश्वाचा पालनकर्ता असलेल्या अल्लाहसाठीच आहे. 163 त्याच्या बरोबरीचा कोणीच नाही, आणि मला असाच आदेश प्राप्त झाला आहे. आणि मी त्याला समर्पित होणाऱ्या लोकांत (नेहमी) अग्रणी राहीन. 164 (त्यांना) सांगा, 'जेव्हा अल्लाह सर्व वस्तुमात्रांचा पालनकर्ता आहे तर मी पालनकर्ता म्हणून त्याच्याशिवाय दुसऱ्याला का बरे शोधू? आणि प्रत्येकाला त्याच्या कर्माचा परिणाम भोगावाच लागणार आहे. आणि ओझे वाहणारी कोणतीही व्यक्ती दुसऱ्याचे ओझे आपल्या शिरावर घेत नाही. मग तुम्हाला तुमच्या पालनकर्त्याकडेच परत जायचे आहे. आणि तेव्हा तो तुमच्यासमोर त्या गोष्टीचे सत्य उघड करेल, ज्याबद्दल तुमचे मतभेद होते. 165 आणि तोच आहे, ज्याने या भूतलावर तुम्हाला (इतरांचे) वारस बनविले आणि तुमच्यापैकी काहींना इतरांपेक्षा श्रेष्ठ दर्जा यासाठी प्रदान केला की, त्याने जे काही तुम्हाला दिलेले आहे त्याद्वारे त्याला तुमची परीक्षा घेता यावी. आणि तुमचा पालनकर्ता खरोखर शिक्षा करण्यात शीघ्र आहे. आणि तो निश्चितच अतिशय क्षमाशील व दयाळू आहे.

# सूरह–०७. अल–आराफ़

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 अलीफ० लाम० मीम० सॉद० 2 हा (अल्लाहचा) ग्रंथ आहे, जो तुमच्याकडे प्रकट करण्यात आलेला आहे. (तर आता) तुमच्या मनात या संबंधाने कोणत्याही प्रकारे शंका उद्भवू नये. (हा ग्रंथ अशासाठी प्रकट करण्यात आला आहे) की,

तुम्ही याद्वारे लोकांना सावध करा. आणि (हा ग्रंथ) श्रद्धावंतांसाठी आठवणपर उपदेश आहे. 3 तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याकडे जे पाठविण्यात आले आहे, त्याचे अनुसरण करा. आणि त्याच्याव्यतिरिक्त दुसऱ्या कोणालाही पालनहार मानून त्याचे अनुसरण करू नका. पण तुम्ही खूप कमी उपदेश ग्रहण करता! 4 आणि कितीतरी (विद्रोही) वस्त्यांना आम्ही नष्ट करून टाकले. आमची शिक्षा त्यांच्यावर रात्रीच्या वेळी किंवा दुपारच्या वेळी चालून आली, जेव्हा ते आराम करीत होते. 5 आणि जेव्हा आमची शिक्षा त्यांच्यावर चालून आली, तेव्हा ते याव्यतिरिक्त अन्य काहीच बोलू शकले नाही की, खरोखर आम्ही पापी होतो! 6 (आणि न्यायाच्या दिवशी) आम्ही त्या लोकांना अवश्य जाब विचारणार आहोत, ज्यांच्याकडे आमचा संदेश पाठविण्यात आला होता. आणि आम्ही संदेशवाहकांना (पैगंबरांना) देखील निश्चितपणे जाब विचारणार आहोत. 7 आणि तेव्हा आम्ही आमच्या ज्ञानाने त्यांना त्यांची कृत्ये कथन करू, कारण आम्ही त्यांच्यापासून कधीही दूर नव्हतो (गैरहजर नव्हतो). 8 आणि त्या दिवशी सत्याचेच पारडे जड असेल. तर त्यावेळी ज्यांचे (सत्कर्मांचे) पारडे जड असतील तेच (लोक) यश प्राप्त करणारे ठरतील. 9 उलटपक्षी ज्यांचे पारडे हलके असतील, तर हेच ते लोक असतील ज्यांनी स्वत:चे जीवन वाया घालविले. (त्यांची अशी अवस्था यासाठी झाली), कारण त्यांनी जाणूनबुजून आमच्या संदेशांना नाकारले.

10 (लोकांनो!) आम्हीच तुम्हाला भूतलावर जागा दिली. जिथे (आमच्या कृपेने) तुमच्यासाठी जीवनदायी व्यवस्था स्थापित केली. पण तुम्हाला याची फारच कमी जाण आहे (म्हणून तुम्ही फार कमी आभार मानणारे आहात). 11 आणि आम्हीच तुम्हाला निर्माण केले आणि मग आम्ही तुम्हाला आकार दिला. नंतर आम्ही स्वर्गदूतांना म्हटले, ‘आदमपुढे नतमस्तक व्हा’ तेव्हा ते सर्व त्याच्या पुढे नतमस्तक झाले, पण इब्लीस सोडून, तो नतमस्तक होणाऱ्यांमध्ये सामील झाला नाही. 12 आणि अल्लाहने म्हटले, ‘मी तुला आदेश दिलेला

असताना कोणत्या गोष्टीने तुला नतमस्तक होण्यापासून रोखले?' त्यावर इब्लीस म्हणाला, 'मी त्याच्यापेक्षा श्रेष्ठ आहे. तू मला अग्नीपासून निर्माण केले आहेस, तर आदमला मातीपासून निर्माण केले आहेस.' 13 (अल्लाहने) म्हटले, 'येथून खाली उतर, तू मगरूरीचे प्रदर्शन करावेस, अशी ही जागा नाही. येथून चालता हो! खरोखर तू नीच आहेस!' 14 तेव्हा सैतान म्हणाला, 'ज्या दिवशी सर्व लोक उठविले जातील त्या दिवसापर्यंत (म्हणजे पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत) मला संधी दे.' 15 आणि अल्लाहने उत्तर दिले, 'तुला संधी देण्यात आली!' 16 तेव्हा सैतान म्हणाला, 'आता जेव्हा तू मला नष्टप्राय ठरवलेले आहेस (म्हणजे माझे बरबाद होणे आता अटळ आहे) तर मीही तुझ्या सरळ मार्गात त्यांच्यासाठी अडसर निर्माण करेन. 17 मी निश्चितच त्यांच्या समोरून, त्यांच्या मागून आणि त्यांच्या उजव्या व डाव्या बाजूने त्यांच्याकडे येईन (आणि त्यांना मार्गभ्रष्ट करून सोडेन).परिणामी त्यांच्यात तुला बहुसंख्य लोक कृतज्ञ नसल्याचेच आढळेल. 18 (आणि अल्लाहने) म्हटले, 'चालता हो येथून, हाकलून लावलेल्या आणि तिरस्कृत अशा (सैताना)! त्यांच्यापैकी जे कोणी तुझे अनुसरण करतील तर मी तुम्हा सर्वांनी नरक भरून टाकीन.'

19 आणि (अल्लाह) आदमला म्हणाला, 'हे आदम तू आणि तुझी पत्नी या बागेत राहा आणि हवे तेथून तुम्हाला पाहिजे ते खा, मात्र या एका वृक्षाच्या निकट फिरकू नका, अन्यथा तुम्ही दुराचारी लोकांपैकी व्हाल.' 20 पण नंतर सैतानाने त्यांना मोहात टाकले, यासाठी की, त्यांची लज्जास्थाने, जी त्यांच्यापासून लपविली गेली होती (म्हणजे त्यांना त्यांची जाणीवच नव्हती), त्यांच्यावर उघड करता यावी, सैतान त्यांना म्हणाला, 'तुमच्या पालनकर्त्याने तुम्हाला या वृक्षापासून केवळ यासाठी मनाई केली आहे की, तुम्ही दोघे स्वर्गदूतांप्रमाणे होऊ नये किंवा तुम्हाला अमरत्व प्राप्त होऊ नये.' 21 आणि (त्या ढोंगी) सैतानाने त्यांना शपथ घेऊन सांगितले की, मी तुमचा (खरा) हितचिंतक आहे.

[22] अशाप्रकारे त्याने (मोठ्या) धूर्तपणे त्यांना चुकीचे पाऊल टाकण्यास प्रवृत्त केले. आणि जेव्हा त्या दोघांनी वृक्षाच्या फळाची चव चाखली, तेव्हा त्यांच्या लज्जास्थानांची त्यांना जाणीव झाली आणि त्या गोष्टी त्यांच्यावर उघड झाल्या, ते बागेतील पाने घेऊन आपल्या लज्जास्थानांवर झाकू लागले. तेव्हा त्यांच्या पालनकर्त्याने हाक दिली आणि म्हणाला, 'मी तुम्हाला त्या वृक्षाकडे (जाण्यास) मनाई केली नव्हती का? आणि तुम्हाला असे म्हटले नव्हते का की, सैतान हा तुमचा उघड शत्रू आहे? (तो शत्रूशिवाय दुसरा कोणीच नाही)
[23] त्यावर त्या दोघांनी उत्तर दिले, 'हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही स्वत:वर फार मोठा अत्याचार करून बसलो आहोत आणि तू जर आम्हाला क्षमा केली नाहीस आणि आमच्यावर दया दाखवली नाहीस तर खरोखर आमचा सर्वनाश होईल.' [24] अल्लाहने म्हटले, 'उतरा येथून खाली! (या बागेतून) आणि (येथूनपूढे) तुम्ही (पृथ्वीवर) एकमेकांचे शत्रू असाल. आणि विशिष्ट काळापर्यंत तुमच्यासाठी भूतलावर वास्तव्याचे ठिकाण व काही काळ (जीवनातील गोष्टींचा) उपभोग करता येणार आहे.' [25] (अल्लाहने म्हटले), 'याच भूतलावर तुम्ही (आता) जीवन व्यतीत कराल आणि येथेच तुम्ही मरण येईल आणि (पुनरुत्थानाच्या दिवशी) येथूनच तुम्हाला उठविण्यात येईल.'

[26] हे आदमच्या मुलांनो! आम्ही तुम्हाला पोषाख प्रदान केला (म्हणजे वस्त्रे बनविण्याचे तुम्हाला ज्ञान दिले) म्हणजे त्याद्वारे तुम्ही आपली लज्जास्थाने झाकावीत व ते पाहणाऱ्या डोळ्यांनाही सुंदर दिसावे. पण सदाचरणी वृत्तीचा अंगीकार हेच सर्वोत्तम वस्त्र आहे. ही खूण अल्लाहच्या खुणांपैकी एक आहे. यासाठी की, लोकांनी यापासून धडा घ्यावा. [27] हे आदमच्या मुलांनो! असे होऊ नये की, सैतानाने तुमची (पुन्हा) तशीच फसवणूक करावी ज्याप्रमाणे त्याने तुमच्या आईवडिलांना स्वर्गातून बाहेर काढले होते आणि त्यांना (एकमेकांची) लज्जास्थाने दाखवण्यासाठी विवस्त्र व्हायला लावले होते. तो

आणि त्याचे साथीदार तुम्हाला तेथून पाहतात, जेथून तुम्ही त्यांना पाहू शकत नाही. आम्ही सैतानांना त्या लोकांचे मित्र बनवले आहे, जे श्रद्धावंत नाहीत. 28 आणि जेव्हा ते निर्लज्जतेचे एखादे कृत्य करतात, तेव्हा ते म्हणतात, 'आम्ही आमच्या पूर्वजांना असे करताना पाहिले आहे. आणि अल्लाहनेच आम्हाला असे करण्याची आज्ञा केलेली आहे.' (त्यांना) सांगा, 'अल्लाह कधीही अपकृत्ये करण्याची आज्ञा देत नाही. तुम्ही अल्लाहविषयी अशा गोष्टींचा संबंध जोडता का, ज्याचे तुम्हाला मुळीच ज्ञान नाही?' 29 (पैगंबर! त्यांना) सांगा, 'माझ्या पालनकर्त्याने न्यायाने वागण्याची आज्ञा केली आहे; प्रत्येक वेळेस आणि प्रत्येक ठिकाणी प्रार्थना करीत असताना (नमाज़ पढताना) आपले चेहरे (पूर्ण लक्ष केंद्रित करून) त्याच्याकडेच वळवा. आणि धर्माच्या बाबतीत पूर्ण समर्पणभाव बाळगून त्याचाच धावा करा. ज्याप्रमाणे त्याने तुम्हाला पहिल्या वेळेस निर्माण केले, त्याचप्रमाणे तुम्हाला दुसऱ्या वेळेसही निर्माण करण्यात येईल, (म्हणजे मृत्यूनंतर पुन्हा जिवंत केले जाईल).' 30 (तुमच्यापैकी) काही लोकांना त्याने सन्मार्ग दाखवला आहे. तर काहींसाठी सन्मार्गापासून भटकणे अटळ ठरले, (त्यांच्या कमाईपोटी). त्यांनी अल्लाहला सोडून सैतानांची आपले मित्र म्हणून निवड केली. आणि (ते) समजतात की, आपण सन्मार्गावर आहोत.

31 हे आदमच्या मुलांनो! नमाज़ाच्या प्रत्येक वेळी उचितप्रकारे वस्त्र धारण करा आणि (नंतर मुक्तपणे) खा व प्या, पण अपव्यय करू नका. निश्चितच अल्लाहला अपव्यय करणारे लोक (अजिबात) प्रिय नाहीत. 32 (पैगंबर! त्यांना) सांगा, 'अल्लाहने आपल्या भक्तांसाठी निर्माण केलेल्या शोभेच्या वस्तूंना, तसेच उदरनिर्वाहाच्या स्वच्छ शुद्ध वस्तूंना निषिद्ध ठरवणारा कोण आहे?' (त्यांना) सांगा, 'या सर्व चांगल्या वस्तू या जगातील जीवनातही श्रद्धावंतांसाठी (वैध) आहेत आणि मृत्यूनंतरच्या जीवनात तर केवळ त्यांच्यासाठीच असतील.' अशाप्रकारे आम्ही आमचे संदेश ज्ञान असणाऱ्या लोकांसाठी स्पष्ट करून सांगत

आहोत. 33 (त्यांना) सांगा, 'माझ्या पालनकर्त्याने तर केवळ निर्लज्जतेची कृत्ये करण्यास मनाई केली आहे, मग ती कृत्ये खुली असोत वा छुपी, तसेच (सर्व प्रकारची) पापकृत्ये व (एखाद्याचा) अन्यायाने छळ आणि अल्लाहने कोणतेही प्रमाण (पुरावा) पाठविलेले नसताना त्याच्या बरोबरीचे स्थान इतरांना देण्याच्या कृत्याला, आणि अशा गोष्टींचा संबंध तुम्ही अल्लाहशी जोडावा, ज्याचे तुम्हाला काहीही ज्ञान नाही. (या सर्व गोष्टी हराम आहेत, निषिद्ध आहेत).'

34 प्रत्येक जनसमूहासाठी एक अवधी निश्चित आहे. आणि जेव्हा त्यांच्या अवधीचा (शेवट) येईल, तेव्हा ते एका क्षणानेही मागे राहू शकणार नाहीत किंवा पुढेही जाऊ शकणार नाहीत. 35 हे आदमच्या मुलांनो! जर तुमच्याकडे तुमच्यामधूनच पैगंबर येतील, जे तुम्हाला माझे संदेश ऐकवतील तर जे कोणी माझे भय बाळगतील व स्वत:मध्ये सुधारणा करून घेतील तर त्यांना (मृत्यूनंतरच्या जीवनात) कोणतेही भय पोचणार नाही, आणि ते (कधी) दु:खीही होणार नाहीत. 36 आणि जे लोक आमच्या संदेशांना खोटे ठरवतील आणि मगरुरीने त्यांकडे पाठ फिरवतील तर असेच लोक नरकाच्या आगीचे निवासी बनतील, ते कायम तेथेच राहतील. 37 तर मग त्या माणसापेक्षा अधिक दुष्ट कोण असू शकतो, जो अल्लाहविषयी खोट्या गोष्टी रचून सांगतो. किंवा त्याच्या संदेशांना खोटे ठरवितो. त्यांच्यासाठी (या जगात) जो काही वाटा निश्चित झालेला आहे, तो त्यांना अवश्य मिळेल, येथपावेतो की, आमचे दूत त्यांचे प्राण काढण्यासाठी त्यांच्याकडे येतील तेव्हा ते (मृत्युदूत) त्यांना विचारतील, 'अल्लाहला सोडून ज्यांचा तुम्ही धावा करीत होता ते (आता) कोठे आहेत?' (त्यावर) ते (अपराधी) उत्तर देतील, 'ते आमच्यासाठी आता हरपलेले आहेत.' आणि ते स्वत:च्याचविरुद्ध अशी साक्ष देतील की, ते सत्य नाकारणारे श्रद्धाहीनच आहेत.

38 त्यावर अल्लाह म्हणेल, 'सामील व्हा त्या जिन्न आणि मानवाच्या समूहात

जे तुमच्या आधी नरकाच्या आगीत प्रविष्ट झाले.' कोणताही समूह जेव्हा नरकात प्रवेश करेल तर तो आपल्या सोबतच्या समूहाची निर्भर्त्सना करेल (आणि) जेव्हा ते सर्व तिथे एकत्र आलेले असतील, तेव्हा सर्वात शेवटी प्रवेश केलेल्या समूहातील लोक त्यांच्याआधी प्रवेश केलेल्याबद्दल म्हणतील, 'हे आमच्या पालनकर्त्या! हेच ते (लोक) आहेत, ज्यांनी आम्हाला सन्मार्गापासून दूर नेले, तर तू यांना आगीची दुप्पट शिक्षा कर.' त्यावर अल्लाह म्हणेल, '(आता) सर्वांसाठीच दुप्पट शिक्षा आहे, पण तुम्हाला तसे प्रतीत होत नाही.'
*39* आणि त्यांच्यापैकी (त्यात) आधी गेलेले आपल्या नंतर आलेल्यांना म्हणतील, 'आमच्यापेक्षा तुम्ही कोणत्याही प्रकारे श्रेष्ठ नाही, तेव्हा आता चाखा शिक्षेची गोडी, आपल्या केलेल्या कमाईपोटी.'

*40* ज्या लोकांनी आमच्या संदेशांना खोटे ठरविले आणि (मोठ्या) तिरस्काराने त्याकडे पाठ फिरविली, निश्चितच त्यांच्यासाठी आकाशाची दारे कदापि उघडली जाणार नाहीत आणि त्यांना स्वर्गात प्रवेश मिळणार नाही, जोपर्यंत उंट सुईच्या छिद्रातून पार जात नाही (म्हणजे त्यांना स्वर्गात प्रवेश मिळणे अगदी अशक्य आहे). अपराध्यांना आम्ही अशाच प्रकारे मोबदला देत असतो. *41* त्यांच्यासाठी नरकाचेच अंथरूण असेल आणि वरून त्याचेच (आगीचेच) पांघरूण असेल. आम्ही अशाच प्रकारे अन्यायी लोकांना मोबदला देतो. *42* पण ज्यांनी श्रद्धेचा अंगीकार केला, व सत्कर्मे केली, आम्ही कोणावरही त्याच्या क्षमतेपेक्षा जास्त भार टाकत नाही. हेच लोक स्वर्गात वास्तव्य करणारे आहेत. ते तेथेच कायम वास्तव्य करतील. *43* आणि आम्ही त्यांच्या मनांमध्ये जो काही (एक दुसऱ्याप्रति) द्वेषभाव (किंवा अनुचित विचार) असतील, ते काढून टाकू, त्यांच्या खालून (पाण्याचे नयनरम्य) प्रवाह वाहत असतील, आणि ते म्हणतील, 'सर्व स्तुतीचा अधिकारी अल्लाह आहे, ज्याने आम्हाला सन्मार्ग दाखवून इथपर्यंत पोहोचविले. जर अल्लाहने आम्हाला सरळ मार्ग दाखविला नसता तर आम्हाला मार्गदर्शन प्राप्त

होऊ शकले नसते. आमच्या पालनकर्त्याचे पैगंबर खरोखर सत्याचा (संदेश) घेऊन आले होते.' आणि एक पुकारा करून त्यांना सांगण्यात येईल, 'हा आहे स्वर्ग, ज्याचे वारस तुम्हाला ठरविण्यात आले आहे, तुम्ही केलेल्या कर्मांच्या मोबदल्यात.'

44 आणि स्वर्गाचे निवासी, नरकवासीयांना हाक देऊन म्हणतील की, आमच्या पालनकर्त्याने आम्हाला जे वचन दिले होते, ते (आता) आमच्यासाठी प्रत्यक्षात आले आहे. तुमच्या पालनकर्त्याने तुम्हाला दिलेले वचनही प्रत्यक्षात आले आहे का? ते (नरकवासी) उत्तर देतील, 'होय'. मग त्यांच्या दरम्यान एक पुकारा करणारा, पुकारा करून सांगेल की, अल्लाहकडून धिक्कार आहे दुराचारी लोकांवर. 45 जे लोकांना अल्लाहच्या मार्गापासून रोखत असत आणि त्यात (काही) वाकडेपणा काढण्यासाठी प्रयत्न करीत असत आणि ते मृत्यूनंतरच्या जीवनाला नाकारीत असत. 46 आणि त्या दोघांच्यामध्ये (म्हणजे स्वर्ग आणि नरक यांच्यामध्ये) एक (उंच) विभाजक (आराफ़) असेल आणि त्यावर काही माणसे असतील, जी सर्वांना त्यांच्या खुणांनी ओळखत असतील आणि ती स्वर्गातील लोकांना पुकारा करून सांगतील की, तुमच्यावर शांती होवो! त्यांनी अद्याप स्वर्गात प्रवेश केलेला नसेल, पण त्यात प्रवेश करण्याची अपेक्षा बाळगून असतील. 47 आणि जेव्हा त्यांच्या नजरा नरकवासी लोकांकडे वळतील, तेव्हा ते म्हणतील, 'हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला या अत्याचारी लोकांत सामील करू नकोस.' 48 त्या उंचावर असलेले लोक त्या लोकांना हाक मारतील, ज्यांना ते त्यांच्या खुणांनी ओळखून घेतील, ते (आराफवाले) म्हणतील, 'तुमचा जनसमुदाय तुमच्या कामी आला नाही, ना तुमचा खोटा अभिमान (आज) तुमच्या कामी आला. 49 हेच ते लोक आहेत का, ज्यांच्याविषयी तुम्ही शपथा घेऊन सांगत होता की, त्यांना अल्लाह आपल्या कृपेने कधीही उपकृत करणार नाही.' (पण आज त्यांना सांगितले गेले की), स्वर्गात प्रवेश

करा, तिथे तुम्हाला कोणतेही भय पोचणार नाही, ना तुम्ही तिथे कधी दुःखी होणार.

50 आणि नरकवासी स्वर्गनिवासीयांना हाक मारून म्हणतील, ‘काही पाणी किंवा अल्लाहने (स्वर्गात निर्वाहासाठी) तुम्हाला जे काही दिले आहे, त्यामधील काहीतरी आम्हाला द्या.’ त्यावर स्वर्गनिवासी उत्तर देतील, ‘या दोन्ही वस्तू अल्लाहने सत्य नाकारणाऱ्या लोकांवर निषिद्ध ठरवलेल्या आहेत.’ 51 (त्यांच्यासाठी) ज्यांनी आपल्या धर्माला करमणुकीचा व खेळाचा विषय बनवला होता व ज्यांना (या) जगातील जीवनाने धोक्यात टाकले होते. (अल्लाह म्हणेल) ‘तर आज आम्हीही त्यांना विसरून जाऊ, जसे ते या (फैसल्याच्या) दिवसाच्या भेटीस विसरले आणि आमच्या संदेशांना नाकारीत राहिले.’

52 आणि आम्ही निश्चितच त्यांना एक असा ग्रंथ प्रदान केला आहे व त्यात आम्ही ज्ञानाच्या आधारे सविस्तर वर्णन केलेले आहे व तो (ग्रंथ) श्रद्धा ठेवणाऱ्या लोकांसाठी मार्गदर्शन व कृपा आहे. 53 ते (अश्रद्धावंत लोक) त्यामध्ये दिलेला इशारा प्रत्यक्षात येण्याची प्रतीक्षा करीत आहेत की काय? ज्या दिवशी तो (इशारा) प्रत्यक्षात येईल त्या दिवशी, पूर्वी ज्यांना त्याचा विसर पडला होता, ते म्हणतील, ‘आमच्या पालनकर्त्याकडून आलेले पैगंबर खरोखर सत्याचा संदेश घेऊन आले होते, तर आता आम्हाला आमची मध्यस्थी करणारे कोणी मध्यस्थ लाभतील का? किंवा आम्हाला जगात परत पाठवणे शक्य आहे का, म्हणजे आम्ही पूर्वी जी (वाईट) कृत्ये करीत होतो, त्यापेक्षा वेगळी कृत्ये आम्हाला करता यावी?’ त्यांनी खरोखरच स्वतःच्या जिवाचे नुकसान करून घेतले आहे आणि ज्या खोट्या गोष्टी त्यांनी रचल्या होत्या, (आता) त्यांच्यापासून नाहीशा झालेल्या आहेत.

54 यात मुळीच शंका नाही की, तुमचा पालनकर्ता अल्लाह आहे ज्याने सहा दिवसात (म्हणजे सहा कालखंडात) आकाश आणि पृथ्वी यांची निर्मिती केली. मग तो सिंहासनावर विराजमान झाला. तो रात्रीने दिवसाला झाकून टाकतो, (ते)

एकमेकाच्या मागे वेगाने येत असतात. आणि त्याने सूर्य व चंद्र आणि तारे निर्माण केले. सर्व त्याच्या आज्ञेच्या अधीन आहेत. लक्षात ठेवा, (सर्व) त्याचीच निर्मिती आहे म्हणून (सर्वांवर) आदेश त्याचाच असणार आहे. फार समृद्धशाली आहे अल्लाह, जो सर्व जगांचा पालनकर्ता आहे. 55 अतिशय लीनतेने आणि गुप्तपणे (आत्म्याच्या आवाजाने) आपल्या पालनकर्त्यासमोर विनवणी करा. निश्चितच मर्यादांचे उल्लंघन करणारे लोक त्याला प्रिय नाहीत. 56 (लोकांनो!) सुव्यवस्था असलेल्या भूतलावर उत्पात माजवू नका. आणि मनात भय व आशा ठेवून त्याचाच धावा करा. निश्चितच अल्लाहची कृपा सत्कर्मे करणाऱ्या लोकांच्या नेहमी समीप आहे.

57 आणि तो अल्लाहच आहे, जो आपल्या कृपेआधी शुभवार्ता म्हणून (मोसमी) वारे पाठवीत असतो आणि जेव्हा हे वारे आपल्यासोबत (पाण्याने भरलेले) ढग घेऊन येतात, तेव्हा आम्ही त्या ढगांना मृत जमिनीच्या दिशेने वळवतो. मग त्याद्वारे आम्ही जमिनीवर पाण्याचा वर्षाव करतो. आणि त्यापासून आम्ही सर्व प्रकारची फळे निर्माण करतो. अगदी अशाच प्रकारे आम्ही मृतांना जिवंत करून बाहेर काढू. कदाचित तुम्ही (या निरीक्षणापासून) धडा घ्यावा, (ही अपेक्षा). 58 जी जमीन चांगली आहे, तिचे (भरपूर) पीक तिच्या पालनकर्त्याच्या आज्ञेने येते. तर उलटपक्षी जी जमीन निकृष्ट आहे तिच्यामध्ये दुसरे काही नाही तर फक्त निरुपयोगी असे पीक येते. अशाप्रकारे आम्ही आमच्या संदेशांचे विविध पैलू स्पष्ट करून दाखवत असतो, (त्यांच्या भल्यासाठी) जे आभार व्यक्त करणारे आहेत.

59 आम्ही 'नूह' ला त्याच्या लोकांकडे पाठवले, आणि तो म्हणाला, 'हे माझ्या समाजबांधवांनो! केवळ अल्लाहची उपासना करा, त्याच्याशिवाय दुसरा कोणीही तुमच्यासाठी उपासनेयोग्य नाही. मला तुमच्या बाबतीत त्या भयंकर दिवसाच्या शिक्षेची भिती वाटते.' 60 त्याच्या समाजातील प्रमुखांनी म्हटले, 'आम्ही तर पाहत आहोत की, तू उघडपणे वाट चुकलेला आहेस.' 61 (त्यावर)

नूह म्हणाला, 'माझ्या समाज बांधवांनो! मी वाट चुकलेलो नाही, मी तर संपूर्ण
विश्वाच्या पालनकर्त्याकडून पाठविण्यात आलेला एक संदेशवाहक आहे. 62
मी माझ्या पालनकर्त्याचे संदेश तुमच्यापर्यंत पोचवीत आहे, आणि मी तुमचा
हितचिंतक आहे. कारण अल्लाहकडून मला अशा (गोष्टी) माहीत झालेल्या
आहेत, ज्या तुम्हाला माहीत नाहीत. 63 तुम्हाला याचे नवल वाटते का की,
तुमच्यामधीलच एका व्यक्तीद्वारे तुमच्याकडे तुमच्या पालनकर्त्याचे संदेश यावेत,
यासाठी की, त्याद्वारे त्याने तुम्हाला सावध करावे, म्हणजे तुम्ही अल्लाहचे भय
बाळगावे, आणि तुमच्यावर (त्याची) कृपा व्हावी. (यातील कोणतीही गोष्ट
आश्चर्य वाटण्यासारखी नाही).' 64 पण त्यांनी त्याला खोटे ठरवले, म्हणून
आम्ही त्यास आणि नौकेत त्याच्याबरोबर असलेल्या लोकांना वाचवले. आणि
ज्यांनी आमच्या संदेशांना खोटे ठरविले होते, त्यांना आम्ही बुडवले; खरोखर ते
आंधळे लोक होते.

65 आणि 'आद' (या जमातीकडे) आम्ही त्यांचा भाऊ हूद यास पाठवले.
तो म्हणाला, 'हे माझ्या लोकांनो! केवळ अल्लाहचीच उपासना करा, त्याच्याशिवाय
तुमचा कोणीही उपास्य नाही, तर मग तुम्ही अल्लाहचे भय बाळगत नाही का?
66 त्याच्या जमातीतील प्रमुख लोक जे सत्य नाकारणाऱ्यांपैकी होते, म्हणाले,
'आम्ही तर तुला मूर्ख असल्याचे पाहत आहोत. आणि आम्हाला (असेही)
वाटते की, तू खोटारडा आहेस.' 67 (त्यावर) हूद म्हणाला, 'हे माझ्या
समाजबांधवांनो! माझ्यामध्ये कसलाही मूर्खपणा नाही. उलट मी तर संपूर्ण
विश्वाच्या पालनकर्त्याकडून आलेला संदेशवाहक (पैगंबर) आहे. 68 मी माझ्या
पालनकर्त्याचे संदेश तुमच्यापर्यंत पोचवीत आहे. आणि मी तुमचा हितचिंतक व
प्रामाणिक (संदेशवाहक) आहे. 69 तुम्हाला या गोष्टीचे आश्चर्य वाटते का की,
तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्यामधीलच एका व्यक्तीद्वारे तुमच्याकडे एक
उपदेश आला आहे यासाठी की, (त्या उपदेशाद्वारे) त्याने तुम्हाला सावध

करावे. तर (ती वेळ) आठवा, जेव्हा त्याने तुम्हाला नूहच्या लोकांनंतर उत्तराधिकारी बनवले, तसेच तुम्हाला जबरदस्त शारीरिक बळ प्रदान केले. तर तुम्ही अल्लाहच्या कृपाप्रसादांचे स्मरण करा म्हणजे तुमचे भले होईल.'

70 हूदच्या लोकांनी म्हटले, 'तू आमच्याकडे केवळ यासाठीच आला आहेस का की, आम्ही केवळ अल्लाहचीच उपासना करावी आणि आमचे वाडवडील ज्यांची उपासना करीत असत, त्यांना सोडून द्यावे? ज्या शिक्षेची धमकी तू आम्हाला देतोस, ती शिक्षा आमच्याकडे घेऊन ये, जर तू तुझ्या बोलण्यात खरा आहेस तर.' 71 (त्यावर) हूद म्हणाला, 'तुम्ही आधीच तुमच्या पालनकर्त्याकडून धिक्काराने आणि संतापाने वेढले गेलेले आहात. तुम्ही त्या (पोकळ) नावांच्या बाबतीत माझ्याशी विवाद घालत आहात का, जी नावे तुम्ही आणि तुमच्या वाडवडिलांनी ठेवली आहेत व ज्यांच्यासंबंधात अल्लाहने कोणतेही प्रमाण पाठवलेले नाही? तर मग प्रतीक्षा करा, मीही तुमच्याबरोबर प्रतीक्षा करीत आहे.' 72 मग आम्ही आमच्या कृपेने हूदला व त्याच्याबरोबर असलेल्या लोकांना वाचवले आणि त्यांना समूळ नष्ट करून टाकले जे आमच्या संदेशांना खोटे ठरवीत होते आणि ते विश्वास ठेवणारे (लोक) नव्हते.

73 तसेच समूद (या जमाती)कडे आम्ही त्यांचा भाऊ सालेहला पाठवले. तो म्हणाला, 'हे माझ्या समाजबांधवांनो! केवळ अल्लाहचीच उपासना करा, त्याच्याशिवाय दुसरा तुमचा कोणीही उपास्य नाही. आता तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याकडे सत्याचे स्पष्ट प्रमाण आलेले आहे. ही अल्लाहची सांडणी तुमच्यासाठी एक खूण आहे. तर अल्लाहच्या जमिनीवर चरण्यासाठी तिला सोडून द्या. तिला कसलीही इजा पोचवू नका, अन्यथा तुम्हाला फार मोठ्या शिक्षेला सामोरे जावे लागेल.' 74 आणि आठवा, जेव्हा त्याने तुम्हाला 'आद' (या जमाती) नंतर त्यांचे उत्तराधिकारी बनविले. आणि (या) पृथ्वीवर तुम्हाला वसविले, तुम्ही तिच्या मैदानावर स्वत:साठी महाल उभे करता आणि पर्वतांना कोरून त्यात घरे

बनविता. तर अल्लाहच्या कृपाप्रसादांचे स्मरण करा आणि जमिनीवर उत्पात माजवू नका.

75 पण त्याच्या जमातीतील गर्विष्ठ प्रमुख, त्या श्रद्धावंतांना म्हणाले जे (समाजात) दुर्बल मानले जायचे, 'सालेह, आपल्या पालनकर्त्याकडून आलेला पैगंबर असेल असा विश्वास (खरोखर) तुम्हाला वाटतो का?' त्यांनी उत्तर दिले, 'ज्या संदेशासह त्यांना पाठविण्यात आले आहे त्यावर आम्ही निश्चितपणे विश्वास ठेवतो.' 76 (त्यावर) ते गर्विष्ठ लोक म्हणाले, 'पण आम्ही तर (तो संदेश) नाकारत आहोत, ज्यावर तुम्ही विश्वास ठेवता.' 77 आणि मग त्यांनी (क्रूररित्या) त्या सांडणीची कत्तल केली आणि मोठ्या मगरुरीने आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाला आव्हान दिले. म्हणाले, 'हे सालेह, तू जर खरोखरच पैगंबर असशील तर तू ज्या शिक्षेची आम्हाला धमकी देत होतास, ती (शिक्षा) आमच्यावर घेऊन ये.' 78 त्यानंतर (अचानक) भूकंपाचे संकट त्यांच्यावर चालून आले, आणि ते (त्या सकाळी) आपल्या घरांत पालथे पडून राहिले. 79 आणि (पैगंबर) सालेह, असे म्हणत त्यांच्यापासून दूर निघून गेला की, माझ्या समाज बांधवांनो! मी माझ्या पालनकर्त्याचा संदेश तुमच्यापर्यंत पोचविला आहे. आणि तुमचे (खूप खूप) हित चिंतिले, पण (तुम्ही लोक असे आहात की), तुम्ही हितचिंतकांना पसंत करीत नाही.

80 आणि (आठवा) जेव्हा आम्ही (पैगंबर) लूतला पाठविले, तेव्हा तो आपल्या लोकांना म्हणाला, 'जगात तुमच्यापूर्वी कोणीही केले नाही, असे उघड निर्लज्जतेचे कृत्य तुम्ही करीत आहात? 81 तुम्ही स्त्रियांना सोडून पुरुषांकडे कामवासनेच्या पूर्तीसाठी जाता. (एवढेच) नव्हे तर, तुम्ही सर्व प्रकारच्या मर्यादांचे उल्लंघन करणारे लोक आहात.' 82 पण त्याच्या लोकांनी या शिवाय दुसरे उत्तर दिले नाही, (म्हणाले), 'यांना आपल्या वस्तीतून बाहेर हाकलून लावा, हे स्वतःला मोठे पवित्र समजत आहेत.' 83 शेवटी आम्ही 'लूत' ला

आणि त्याच्या कुटुंबातील सर्वांना वाचवले, फक्त त्याच्या पत्नीला सोडून, जी मागे राहणाऱ्यांपैकी होती. 84 आणि आम्ही (विनाशकारी) पावसाचा त्यांच्यावर वर्षाव केला, तर पाहा, पापी लोकांचा शेवटी अंत कसा झाला!

85 आणि मदियन (नावाच्या जमातीकडे) आम्ही त्यांचा भाऊ शुऐब या (पैगंबराला) पाठविले, तो म्हणाला, 'हे माझ्या लोकांनो! फक्त अल्लाहची उपासना करा, त्याच्याशिवाय तुमचा दुसरा कोणीही उपास्य नाही. आता तुमच्याकडे तुमच्या पालनकर्त्याकडून सत्याचे स्पष्ट प्रमाण आलेले आहे. तर तुम्ही (तुमच्या सर्व व्यवहारात) वजन आणि माप (अगदी) बरोबर द्या आणि लोकांना द्यावयाच्या (त्यांच्या हक्कांच्या) वस्तूंमधून कोणताही भाग त्यांना कमी करून देऊ नका. तसेच धरतीवर अराजकता पसरवू नका, जेव्हा की, इथे सर्व सुव्यवस्था प्रस्थापित करण्यात आलेली आहे. हे (सर्व उपदेश) तुमच्या हिताचे आहेत, जर तुम्ही सच्चे श्रद्धावंत असाल. 86 आणि श्रद्धावंतांना भयभीत करण्याच्या हेतूने आणि त्यांना अल्लाहच्या मार्गापासून दूर नेण्यासाठी तसेच अल्लाहच्या मार्गात वाकडेपणा काढण्यासाठी रस्त्यांवर दबा धरून बसू नका, (टपून बसू नका). आणि (ती वेळ) आठवा जेव्हा तुम्ही फार अल्प संख्येत होता. तेव्हा (कशाप्रकारे) त्याने तुमच्या संख्येत वाढ केली. तर समजून घ्या की, ज्यांनी अराजकतापूर्ण कृत्ये केली, त्यांचा शेवट कसा झाला! 87 आणि जर तुमच्यामध्ये एखादा गट असा असेल की, ज्याचा माझ्याबरोबर जे संदेश पाठवण्यात आले आहे, त्यावर विश्वास आहे आणि एखादा गट त्यावर विश्वास ठेवत नाही. तर अल्लाह आमच्यामध्ये निर्णय करीपर्यंत धीर धरा. आणि तो सर्वात श्रेष्ठ निर्णय करणारा आहे.'

88 त्याच्या समाजातील प्रमुख, जे उद्धट होते, म्हणाले, 'हे शुऐब तुला आणि तुझ्याबरोबर असलेल्या श्रद्धावंतांना आम्ही निश्चितपणे आमच्या वस्तीतून बाहेर घालवून देऊ. किंवा तुला आमच्या धर्मात परत यावे लागेल.' त्यावर

शुऐब म्हणाला, ‘आम्हाला तुमच्या धर्माचा तिटकारा असला तरी देखील (आम्ही त्यात परत यावे) का? 89 आम्ही आता तुमच्या मार्गावर परत आलो तर आम्ही अल्लाहविरुद्ध (जाणूनबुजून) खोट्या गोष्टी रचणारे ठरू, जेव्हा की, अल्लाहने आम्हाला (त्या खोट्या गोष्टींपासून) मुक्ती दिली. आम्ही आता त्या मार्गांवर परतावे, ही कल्पनाही करवत नाही, पण आमच्या पालनकर्त्या अल्लाहचीच तशी इच्छा झाल्यास (गोष्ट वेगळी आहे). प्रत्येक वस्तूला आमच्या पालनकर्त्याच्या आपल्या ज्ञानाने वेढलेले आहे. आम्ही आमच्या पालनकर्त्यावर विश्वास ठेवतो. हे प्रभू! सत्य उघड करून आमच्या व आमच्या लोकांमध्ये तू निर्णय कर. तू सर्वात श्रेष्ठ निर्णय करणारा आहेस.’ 90 त्याच्या जमातीतील प्रमुख जे सत्य नाकारण्यावर ठाम होते, म्हणाले, ‘जर तुम्ही शुऐबचे अनुसरण कराल तर तुम्ही निश्चितच नाश पावाल.’ 91 त्यानंतर (शेवटी) ते भूकंपाच्या तावडीत सापडले. (आणि जेव्हा) सकाळ झाली ते आपल्या घरांत पालथ्या अवस्थेत पडलेले होते. 92 ज्यांनी शुऐबला खोटे ठरविले होते, (त्यांची अशी अवस्था झाली) की, जणू काही ते तेथे कधी वास्तव्य करीतच नव्हते. ज्यांनी शुऐबला खोटे ठरविले तेच (शेवटी) सर्व गमावणारे बनले. 93 आणि शुऐब असे म्हणत त्यांच्यापासून दूर निघून गेला, ‘माझ्या समाजबांधवांनो! मी माझ्या पालनकर्त्याचे संदेश तुमच्यापर्यंत पोचवले आहे. आणि पूर्ण कळकळीने तुम्हाला उपदेश केला आहे, (अशाप्रकारे गंभीरतापूर्वक मी माझी जबाबदारी पूर्ण केलेली आहे). तर आता मी त्या लोकांबद्दल कशाला शोक करू ज्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला?’

94 जेव्हाही आम्ही कोणत्याही वस्तीत एखादा पैगंबर पाठविला, त्या वस्तीतील लोकांना आम्ही कष्ट आणि विपत्तीने ग्रासून टाकले, या हेतूने की, त्यांनी विनम्र होऊन (अल्लाहसमोर) शरण यावे. 95 आणि मग आम्ही त्यांच्या वाईट स्थितीला सुस्थितीत परिवर्तित केले, ज्याद्वारे त्यांची फार भरभराट झाली

व ते म्हणू लागले, 'अशा प्रकारची सुख–दु:खे आमच्या वाडवडिलांच्या देखील वाट्याला आली होती.' मग आम्ही त्यांच्या अचानक मुसक्या आवळल्या. आणि याची त्यांना (जराशीही) कल्पना नव्हती. 96 आणि त्या वस्त्यांमधील लोकांनी जर श्रद्धेचा अंगीकार केला असता आणि (अल्लाहचे) भय बाळगले असते, तर आम्ही निश्चितच आकाश व धरतीतून त्यांच्यावर कृपावर्षाव केला असता (आणि आमच्या कृपाप्रसादांची दारे त्यांच्यासाठी खुली केली असती), परंतु त्यांनी सत्य नाकारले, म्हणून आम्ही त्यांना त्यांच्या कमाईच्या मोबदल्यात फैलावर घेतले. 97 या वस्त्यांतील लोक यापासून स्वत:ला सुरक्षित समजतात का की, आमची शिक्षा रात्रीच्या वेळी त्यांच्यावर चालून येऊ शकते, जेव्हा ते झोपलेले असतील. 98 किंवा ते यापासून (स्वत:ला) सुरक्षित समजतात का, (म्हणजे ते असे समजून आहेत का) की, आमच्या शिक्षेचे (संकट) त्यांच्यावर भरदिवसा येऊ शकत नाही, जेव्हा ते खेळत असतील. (म्हणजे त्यांनी स्वत:ला कधीही सुरक्षित समजू नये). 99 तर हे लोक अल्लाहच्या युक्त्यांपासून स्वत:ला सुरक्षित समजतात का? अल्लाहच्या युक्त्यांपासून तेच लोक स्वत:ला सुरक्षित समजतात, जे बरबाद होणारे आहेत.

100 त्या लोकांना काही बोध लाभला नाही का, जे पूर्वी होऊन गेलेल्या लोकांच्या जागी जमिनीचे वारस बनले की, आम्ही इच्छिले तर त्यांच्या पापांच्या शिक्षेपोटी आम्ही त्यांना तावडीत घेऊ, पण आम्ही त्यांच्या हृदयाची कवाडे अशाप्रकारे बंद करू शकतो, ज्यामुळे त्यांना मार्गदर्शनाचे बोल ऐकू येणार नाहीत. 101 (पूर्वीच्या) या अशा काही वस्त्या होत्या, ज्यांचे वृत्तांत आम्ही तुम्हाला ऐकवीत आहोत. त्यांचे पैगंबर सत्याचे सर्व स्पष्ट प्रमाण घेऊन त्यांच्याकडे आले होते, पण ज्याला त्यांनी एकदा खोटे ठरविले होते, त्यावर ते (कधीही) विश्वास ठेवणारे नव्हते. अशाप्रकारे अल्लाह अविश्वास दाखवणाऱ्यांच्या हृदयाची कवाडे (सत्यासाठी) बंद करून टाकतो. (म्हणजे त्यानंतर त्यांच्या

हृदयात 'सत्य' कधी दाखल होत नाही). 102 आणि आम्हाला त्यांच्यापैकी बहुतेक आपल्या वायद्याशी इमान न राखणारेच आढळले आहेत. तसेच बहुतेक आज्ञा भंग करणारे (विद्रोही) असल्याचेच आढळले आहेत.

103 आणि त्यांच्यानंतर आम्ही मूसाला आमचे संदेश देऊन फिरऔन (त्या काळातील राजा) व त्याचे सरदार यांच्याकडे पाठविले. पण त्यांनी (आमच्या संदेशांना) जाणूनबुजून नकार दिला. तर पाहा, या उपद्रवी लोकांचा शेवट कसा झाला. 104 मूसा म्हणाला, 'हे फिरऔन! मी समस्त विश्वाच्या पालनकर्त्याचा संदेशवाहक म्हणून आलो आहे. 105 मला अल्लाहविषयी सत्याशिवाय अन्य काही बोलणे शक्यच नाही. मी तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याकडे स्पष्ट प्रमाण घेऊन आलो आहे. तर तू बनी इस्राईल (या जमातीला) माझ्या सोबत जाऊ दे.'

106 त्यावर फिरऔन (राजा) म्हणाला, 'तू (एखादे) संकेतचिन्ह घेऊन आला आहेस. आणि तू जर सत्यवचनी आहेस तर ते (आमच्यासमोर) प्रस्तुत कर.' 107 (पैगंबर) मूसाने आपली लाठी जमिनीवर टाकली, आणि पाहावे तर काय ती (लाठी) सापाच्या रूपात प्रकट झाली. 108 आणि त्याने आपला हात बाहेर काढला तर पाहणाऱ्यांना तो अतिशय चकचकीत दिसू लागला. 109 फिरऔनच्या जमातीच्या प्रमुखांनी (म्हणजे सरदारांनी) म्हटले की, हा फार कुशल जादूगार आहे. 110 तो तुम्हाला तुमच्या देशाबाहेर घालवून लावू इच्छितो, (फिरऔनने आपल्या सरदारांना म्हटले) 'तर (याबद्दल) आता तुमचे काय मत आहे?' 111 ते म्हणाले, 'मूसाला आणि त्याच्या भावाला थोडा वेळ संधी द्यावी आणि सर्व शहरांत दवंडीवाले पाठवावेत. 112 त्यांनी सर्व पारंगत जादूगारांना तुमच्याकडे घेऊन यावे.'

113 आणि ते (सर्व) जादूगार फिरऔनकडे आले आणि म्हणाले, 'आम्ही यशस्वी झालो तर आम्हाला बक्षीस मिळणार ना?' 114 (त्यावर) फिरऔन म्हणाला, 'हो अवश्य मिळेल आणि तसेच तुम्हाला माझ्या निकटवर्तीयांमध्येही

स्थान मिळेल.' 115 जादूगार म्हणाले, 'हे मूसा! एकतर तू (तुझी लाठी) प्रथम फेकशील की, आम्ही (प्रथम) फेकावे.' 116 मूसाने म्हटले, 'तुम्हीच (आधी) फेका.' आणि जेव्हा त्यांनी आपल्या (दोऱ्या व लाठ्या) फेकल्या, तेव्हा त्यांनी लोकांच्या डोळ्यांना भुरळ पाडली. आणि त्यांनी लोकांना भयचकित केले व जादूचा फार मोठा खेळ सादर केला 117 आणि आम्ही मूसाला (आमच्याकडून) प्रेरणा देऊन म्हटले, 'तुझी लाठी खाली फेक,' आणि तेव्हा पाहावे तर काय? त्यांनी सोंग करून उभ्या केलेल्या गोष्टी, तिने गिळून टाकल्या. 118 अशाप्रकारे सत्य प्रबळ ठरले (सत्याचा विजय झाला) आणि त्यांनी जे काही बनविले होते, ते सर्व संपुष्टात आले. 119 अशाप्रकारे फिरऔन आणि त्याची माणसे (पूर्णपणे) पराभूत व अपमानित झाली. 120 आणि जादूगार (लगेच) नतमस्तक झाले. 121 आणि म्हणाले, 'आम्ही (आता) समस्त विश्वाच्या पालनकर्त्यावर विश्वास ठेवणारे बनलो आहोत. 122 मूसा व हारूनच्या पालनकर्त्यावर.'

123 (हे सर्व पाहून) फिरऔन म्हणाला, 'मी तुम्हाला परवानगी देण्यापूर्वीच तुम्ही त्याच्यावर विश्वास व्यक्त करीत आहात, हा नक्कीच (तुम्ही सर्वांनी) रचलेला कट आहे, (तो कट) या शहरात तुम्ही या हेतूने रचला आहे की, यातील रहिवाशांना येथून बाहेर घालवावे. पण तुम्हाला (याचा परिणाम) लवकरच दिसून येईल. 124 मी निश्चितपणे तुमचे हात आणि पाय विरुद्ध बाजूंनी कापून टाकीन, (म्हणजे उजवा हात तर डावा पाय), त्यानंतर तुम्हा सर्वांना एकत्रित सुळावर चढवीन.' 125 त्यांनी उत्तर दिले, 'तर मग आम्ही निश्चितच आमच्या पालनकर्त्याकडे परत जाऊ.' 126 (हे फिरऔन!) तू आमच्यावर केवळ याच कारणावरून सूड उगवू इच्छितोस की, आमच्या पालनकर्त्याचे संदेश जेव्हा आमच्यासमोर आले, तेव्हा त्याचा आम्ही स्वीकार केला. हे प्रभू! आम्हाला धैर्य (सहनशक्ती) प्रदान कर आणि आम्हाला तुला शरण आलेल्या स्थितीतच मरण येऊ दे.

[127] फिरऔनच्या जमातीतील सरदार (प्रमुख) (फिरऔनला) म्हणाले, 'तू मूसा आणि त्याच्या लोकांना राज्यात अनाचार माजविण्यासाठी, तसेच तू व तुझ्या उपास्यांपासून (तुझ्या लोकांना) दूर करण्यासाठी, मोकाट सोडून देणार आहेस की काय?' (त्यावर) फिरऔन म्हणाला, 'आम्ही (मूसाच्या जमातीतील) पुत्रांची हत्या करू आणि त्यांच्या स्त्रियांना जिवंत ठेवू. आम्हाला त्यांच्यावर पूर्ण सामर्थ्य प्राप्त आहे.' [128] मूसा आपल्या लोकांना म्हणाला, 'अल्लाहकडे साहाय्याची याचना करा आणि धैर्य बाळगा, संपूर्ण जमीन अल्लाहचीच आहे, तो आपल्या भक्तांपैकी इच्छितो त्यास तिचा वारस बनवतो. आणि अल्लाहचे भय बाळगणाऱ्यांचेच शेवटी भले होणार आहे.' [129] मूसाच्या लोकांनी (मूसाला) म्हटले, 'तू आमच्याकडे येण्यापूर्वीही आमचा छळ केला गेला, तू आमच्याकडे आल्यानंतरही आमचा छळ होत आहे.' मूसा म्हणाला, 'लवकरच तुमचा पालनकर्ता तुमच्या शत्रूचा नायनाट करेल आणि तुम्हाला जमिनीचा वारस बनवेल, मग पाहील की, तुम्ही कशा प्रकारचे कर्म करता.'

[130] आणि आम्ही फिरऔनच्या लोकांना दुष्काळ आणि फळांची टंचाई निर्माण करून शिक्षा दिली, म्हणजे ज्यायोगे त्यांनी बोध घ्यावा. [131] पण जेव्हा त्यांना सुखाचे दिवस येत, तेव्हा ते म्हणत की, हे तर आमचे हक्कच आहे. आणि जेव्हा त्यांच्यावर एखादे संकट कोसळत असे, तर ते त्यास मूसा व त्याच्यासह असलेल्या लोकांचा अशुभपणा म्हणत. खरे तर त्यांच्या अशुभपणाचे प्रयोजन अल्लाहकडे आहे, पण त्यांच्यापैकी अनेकजण जाणत नाहीत. [132] आणि ते (मूसाला) म्हणाले, 'आमच्यावर भुरळ पाडण्यासाठी तू कोणतीही निशाणी आमच्यासमोर प्रस्तुत केलास, तरी आम्ही तुझ्यावर (कदापि) विश्वास ठेवणार नाही.'

[133] मग आम्ही त्यांच्यावर वादळ, टोळ, उवा आणि बेडूक व (पाण्यापासून परिवर्तित झालेले) रक्त (इ.) प्रकारच्या वेगवेगळ्या खुणा (सावध करण्यासाठी)

पाठविल्या. तरीसुद्धा त्यांनी गर्व केला, ते होतेच पापी लोक. [134] आणि जेव्हा त्यांच्यावर एखादे संकट कोसळत असे, तेव्हा ते म्हणायचे, 'हे मूसा, तू आपल्या पालनकर्त्याकडे आमच्यासाठी प्रार्थना कर, त्या वचनाच्या आधारे, जे त्याने तुला दिले आहे.'जर तू हे आमच्यावरचे संकट दूर करशील तर आम्ही निश्चितच तुझ्यावर विश्वास ठेवणारे बनू आणि इस्राईलच्या मुलांना (म्हणजेच जमातीला) तुझ्याबरोबर अवश्य जाऊ देऊ.' [135] पण जेव्हाही, आम्ही त्यांच्यावर येणारे शिक्षेचे संकट, त्यांना जो कालावधी पूर्ण करावयाचा होता, त्या कालावधी पुरते दूर केले, तेव्हा लगेच ते आपल्या वचनांचा भंग करीत असत.

[136] शेवटी आम्ही त्यांना शिक्षा केली आणि त्यांना समुद्रात बुडवून टाकले, कारण त्यांनी आमच्या संदेशांना खोटे ठरविले होते आणि त्यांच्याकडे त्यांनी दुर्लक्ष केले होते. [137] आणि आम्ही दुर्बल समजल्या जाणाऱ्या लोकांना, जमिनीच्या पूर्व व पश्चिम भागाचे वारस बनवले, ज्याला आम्ही (आमच्या कृपेने) समृद्ध व संपन्न केले होते. आणि अशाप्रकारे इस्राईलच्या मुलांच्या बाबतीत तुझ्या पालनकर्त्याने दिलेले चांगले वचन पूर्ण झाले, कारण त्यांनी संयम बाळगला होता, आणि आम्ही फिरऔन व त्याच्या लोकांनी जे काही बनवले होते आणि उभारले होते, ते सर्व नष्ट करून टाकले.

[138] आणि आम्ही इस्राईलच्या मुलांना समुद्र पार करून आणले, मग ते अशा लोकांच्या संपर्कात आले, जे आपल्या मूर्तींच्या उपासनेत मग्न झालेले होते. तेव्हा ते (बनी इस्राईल) म्हणाले, 'हे मूसा, यांच्या मूर्तींप्रमाणेच आमच्या उपासनेसाठी देखील एक मूर्ती तयार कर.' (त्यावर) मूसा म्हणाला, 'खरोखरच तुम्ही अज्ञानी लोक आहात.' [139] ते ज्या कामात गुंतलेले आहेत, ते (काम) नष्ट होणे अटळ आहे. आणि ते जे काही करीत आहेत, ते निष्फळ ठरणार आहे. [140] (आणि) तो म्हणाला, 'मी तुमच्यासाठी अल्लाहशिवाय दुसरा एखादा उपास्य शोधू की काय, जेव्हा त्यानेच तुम्हाला सर्व लोकांवर श्रेष्ठत्व प्रदान केले आहे?' [141]'आम्ही

तुम्हाला फिरऔनच्या लोकांपासून मुक्ती दिली, जे तुमचा फार छळ करीत होते, ते तुमच्या पुत्रांची हत्या करीत होते आणि तुमच्या स्त्रियांना जिवंत ठेवत असत. यात तुमच्या पालनकर्त्याकडून तुमची फार मोठी परीक्षा होती.'

142 आणि आम्ही मूसाला (सिनाई पर्वतावर) तीस रात्रींचे वचन दिले होते, (पण) त्यात आणखी दहाची भर घातली. अशाप्रकारे त्याच्या पालनकर्त्याने नेमून दिलेला कालावधी चाळीस रात्रीत पूर्ण झाला. (सिनाई पर्वताकडे जाताना) मूसा, आपला भाऊ हारूनला म्हणाला, '(माझ्या अनुपस्थितीत) माझ्या लोकांमध्ये माझी जागा घे, (माझे प्रतिनिधित्व कर), आणि (त्यांच्यादरम्यान) सुधारणेचे कार्य करीत राहा, आणि अनाचार घडविणाऱ्यांच्या मार्गाचा अवलंब करू नकोस.' 143 आणि जेव्हा मूसा (सिनाई पर्वतावर) आमच्या निर्धारित केलेल्या वेळी पोहोचला. आणि त्याच्या पालनकर्त्याने त्याच्याशी संभाषण केले, तेव्हा तो म्हणाला, 'हे माझ्या पालनकर्त्या! तू मला स्वत:चे दर्शन घडव, म्हणजे मी तुला पाहू शकेन.' त्यावर (अल्लाह) म्हणाला, 'तू मला कदापि पाहू शकत नाहीस, पण तू त्या पर्वताकडे पाहा, तो जर आपल्या ठिकाणी स्थिर राहिला तरच, तू मला पाहू शकशील.' जेव्हा त्याचा पालनकर्त्याचे दिव्य तेज प्रकट झाले, तेव्हा त्या पर्वताचे तुकडे–तुकडे होऊन धुळीत रूपांतर झाले. आणि (ते पाहून) मूसा बेशुद्ध होऊन खाली पडला. आणि जेव्हा तो शुद्धीवर आला तेव्हा म्हणाला, 'असीम आहे तुझी महिमा, मी तुझ्याकडे क्षमायाचना करतो आणि तुझ्यावर विश्वास ठेवणाऱ्या लोकांत मी (नेहमी) सर्वप्रथम असेन.'

144 (त्यावर अल्लाहने) म्हटले, 'हे मूसा मी माझ्या संदेशांनी, जे मी तुला सोपवले आहे, तसेच मी तुझ्याशी केलेल्या संभाषणाद्वारे तुला सर्व लोकांमध्ये श्रेष्ठत्व प्रदान केले आहे. तर मी तुला जे काही दिलेले आहे, ते दृढतापूर्वक पकडून ठेव आणि माझे आभार व्यक्त करणाऱ्या लोकांपैकी हो.' 145 आणि आम्ही त्याच्यासाठी लेखशिलांवर  प्रत्येक गोष्टीचे स्पष्टीकरण व सर्व प्रकारचे

उपदेश, (सर्व प्रकारचे कायदे) लिहून दिले. (आणि आम्ही म्हणालो), ‘तू (आपल्या) पूर्ण शक्तीनिशी त्यांना दृढतापूर्वक पकडून ठेव, आणि आपल्या लोकांना आज्ञा दे की, (त्यांनी) याच्या उत्कृष्ट अर्थाचे अनुसरण करावे. लवकरच मी तुला दुराचारी लोकांचे ठिकाण दाखवणार आहे.’

146 जे लोक अकारण जमिनीवर घमेंडीने वागतात, त्या लोकांना मी (लवकरच) माझ्या संदेशांपासून (वंचित करून) दूर करणार आहे. आणि जरी त्यांनी (सत्य उलगडणारी) प्रत्येक खूण पाहिली, तरी ते त्यावर विश्वास ठेवणार नाहीत. आणि जरी त्यांनी सदाचरणाचा मार्ग पाहिला, तरी त्याचा ते अवलंब करणार नाहीत. पण उलटपक्षी त्यांनी जर चुकीचा मार्ग पाहिला तर ते आपला मार्ग म्हणून त्याचा (अवश्य) अवलंब करतील. त्याचे कारण असे की, त्यांनी आमच्या संदेशांना खोटे ठरविले आणि त्याकडे (पूर्ण) दुर्लक्ष करीत राहिले.
147 ज्यांनी आमचे संदेश असलेल्या खुणांना खोटे ठरविले, तसेच अंतिम दिनी (आमच्या समोर) हजर होण्यालाही खोटे मानले, त्यांची (सर्व) कृत्ये वाया गेली. आणि त्यांना तोच मोबदला मिळेल, जो ते करीत राहिले.

148 आणि (पैगंबर) मूसाच्या लोकांनी त्याच्या अनुपस्थितीत आपल्या दागिन्यांपासून एक वासरू ची आकृती तयार केली. (त्याची अशी संरचना केली की), त्यातून (वारा गेल्यास) (गाई–बैलाच्या) हंबरण्याचा आवाज येत असे. त्यांनी हे पाहिले नाही का की, तो त्यांच्याशी ना बोलत आहे, ना त्यांना कोणत्याही प्रकारे मार्ग दाखवीत आहे? (तरीसुद्धा) त्यांनी त्याला उपास्य
मानले, ते फारच अत्याचारी लोक होते. 149 आणि (नंतर) जेव्हा त्यांना
पश्चात्ताप झाला आणि आपण खरोखरच चुकलो आहोत याची जाणीव झाली, तेव्हा ते म्हणाले जर आमच्या पालनकर्त्याने आमच्यावर दया दाखवून आम्हाला
माफ केले नाही तर निश्चितच आम्ही नाश पावणार. 150 आणि जेव्हा पैगंबर
मूसा क्रोधीत व दुःखी होऊन आपल्या लोकांकडे परतला, तेव्हा तो म्हणाला,

'तुम्ही माझ्या अनुपस्थितीत ज्या मार्गाचा अवलंब केला तो फार वाईट आहे. तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाची प्रतीक्षा न करता (स्वतःच मार्ग शोधण्याची) घाई केली का?' तेव्हा त्याने त्या (ईश्वरीय आदेशाच्या) लेखशिला खाली टाकून दिल्या आणि (रागाच्या भरात) आपल्या भावाचे केस पकडून स्वतःकडे खेचू लागला. (तेव्हा) हारून म्हणाला, 'हे माझ्या मातेच्या पुत्रा! लोकांनी मला दुर्बल समजले आणि ते मला ठार मारण्याच्या बेतात होते. म्हणून तू शत्रूंना माझ्यावर हसण्याची संधी देऊ नकोस. आणि मला अत्याचारी लोकांमध्ये सामील करू नकोस.' 151 (त्यावर) मूसा म्हणाला, 'हे माझ्या पालनकर्त्या! मला आणि माझ्या भावाला क्षमा कर, आणि आम्हाला तुझ्या कृपाछत्राखाली जागा दे आणि तू सर्व दया दाखवणाऱ्यांमध्ये सर्वात जास्त दयाळू आहेस.'

152 ज्या लोकांनी वासराला उपास्य बनवले आहे, त्यांच्यावर त्यांच्या पालनकर्त्याचा (अवश्य) प्रकोप होणार आणि या जगातील जीवनातही अपमानित होणे, त्यांचं नशीब आहे. कारण खोट्या गोष्टी रचणाऱ्यांना आम्ही अशीच शिक्षा करीत असतो. 153 पण ज्यांना दुष्कृत्ये केल्यानंतर पश्चात्ताप झाला, मग त्यांनी श्रद्धा धारण केली. (तर अशा लोकांच्या बाबतीत) तुझा पालनकर्ता अत्यंत क्षमाशील व दयाळू आहे.

154 आणि जेव्हा मूसाचा राग शमला, तेव्हा त्याने त्या लेखशिला उचलल्या, आणि त्यात जे काही लिहिलेले होते. त्यात अशा लोकांसाठी मार्गदर्शन आणि कृपेचा (संदेश) होता, जे आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगतात. 155 आणि मूसाने आम्ही ठरवलेल्या (ठिकाणी व) ठरवलेल्या वेळेवर सोबत घेऊन जाण्यासाठी आपल्या लोकांपैकी सत्तर जणांची निवड केली. पण जेव्हा जबरदस्त भूकंपाने त्यांना गाठले, तेव्हा मूसाने (अल्लाहकडे) प्रार्थना केली. 'हे माझ्या पालनकर्त्या! तुझी इच्छा असती तर याआधीच त्यांना व मला तू नष्ट करू शकला असता, आमच्यातील मूर्ख लोकांनी जे काही केले, त्याची शिक्षा म्हणून, तू आम्हाला

नष्ट करून टाकशील का? ही तर तुझ्याकडून घेतली जाणारी एक परीक्षा आहे, त्याद्वारे तू इच्छील त्यास मार्गभ्रष्ट करू शकतोस आणि इच्छील त्यास सन्मार्गी लावू शकतोस. तूच आमचा रक्षणकर्ता आहेस. तर तू आम्हाला क्षमा कर आणि आमच्यावर दया कर, कारण तूच सर्वश्रेष्ठ क्षमा करणारा आहेस.
156 आणि तू या जगात व तसेच मृत्यूनंतरच्या जगातही आम्हाला चांगल्या गोष्टी प्रदान कर, (आमचे भले कर). आम्ही (पश्चात्तापदग्ध) होऊन तुझ्याकडेच वळलो आहोत. त्यावर अल्लाहने उत्तर दिले, 'मी ज्याच्याबद्दल इच्छितो त्याच्यावरच माझी शिक्षा लादतो. पण माझ्या दयेचे छत्र सर्व वस्तुमात्रांवर आहे. तर मी (माझी कृपा) अशा लोकांवर निश्चित करीन, जे सदाचाराने वागतात, आणि दानकार्य करतात (ज़कात देतात) आणि आमच्या संदेशांवर विश्वास ठेवतात.'

157 आणि जे लोक (या) निरक्षर असलेल्या पैगंबराचे अनुसरण करतील, ज्याचे वर्णन त्यांच्याकडे असलेल्या तौरात व इंजील मध्ये त्यांना आढळून येते. तो (पैगंबर) त्यांना भले कृत्य करण्याचा आदेश देतो आणि वाईट कृत्यापासून त्यांना रोखतो, तसेच तो जीवनोपयोगी चांगल्या वस्तू त्यांच्यासाठी वैध ठरवतो, आणि वाईट वस्तू त्यांच्यासाठी निषिद्ध ठरवतो. (तो) त्यांच्यावर असलेले ओझे दूर करतो व आधी ज्या बंधनात ते जखडलेले होते, त्यातून त्यांना मुक्त करतो. मग जे लोक त्याच्यावर विश्वास ठेवतील आणि त्याला (अल्लाहचा प्रतिनिधी म्हणून) सन्मान देतील आणि त्याचे समर्थन करतील व त्याला मदत करतील आणि त्याच्याकडे पाठविण्यात आलेल्या प्रकाशज्योतीचे अनुसरण करतील, तर असेच लोक यशस्वी होणार आहेत.

158 (हे मुहम्मद!) तुम्ही त्यांना सांगा, 'लोकांनो! मी समस्त मानवजातीसाठी अल्लाहचा पैगंबर (संदेशवाहक) आहे, ज्याची सत्ता आकाश आणि पृथ्वीवर (सर्वत्र) आहे. त्याच्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही, तोच जीवन देतो

आणि तोच मृत्यू देतो. तर (तुम्ही) अल्लाहवर विश्वास ठेवणारे बना आणि त्याच्या पैगंबरावर, जो उम्मी आहे, (आणि) जो अल्लाहवर आणि त्याच्या वचनांवर विश्वास ठेवतो. आणि त्याचेच (पैगंबराचेच) अनुसरण करा, म्हणजे तुम्हाला सन्मार्ग लाभेल.’

159 आणि मूसाच्या जमातीमध्ये लोकांचा एक गट असाही आहे जो (लोकांना) सत्याचा उपदेश करतो आणि त्यानुसारच न्याय करीत असतो.

160 आम्ही त्यांची बारा जमातीत विभागणी करून त्यांचे वेगवेगळे गट बनवले. आणि जेव्हा मूसाच्या लोकांनी पाणी मागितले, तेव्हा आम्ही मूसाकडे संदेश पाठविला की, अमुक खडकावर आपल्या काठीने प्रहार करा. (जेव्हा मूसाने तसे केले), तेव्हा त्यातून पाण्याचे बारा स्रोत बाहेर आले. प्रत्येक समूहाने आपले पाणी घेण्याचे ठिकाण जाणून घेतले आणि आम्ही त्यांच्यावर ढगांद्वारे सावली केली आणि त्यांना (खाद्य म्हणून) मन्न व सलवा पाठवले (आणि आम्ही म्हणालो) खा ते स्वच्छ व शुद्ध पदार्थ, जे आम्ही तुम्हाला तुमच्या उपजीविकेसाठी दिलेले आहे. (त्यांनी जी काही दुष्कृत्ये केली त्याद्वारे) त्यांनी आमचे काहीही नुकसान केलेले नाही, तर ते स्वत:वरच अन्याय करीत असत. 161 आणि (आठवा) जेव्हा त्यांना असे सांगितले गेले की, त्या वस्तीत जाऊन वास्तव्य करा आणि जेथून तुमची खाण्याची इच्छा होईल तेथून खा. आणि म्हणा, ‘(हे अल्लाह!) आमच्या पापाचे ओझे (आमच्यापासून) दूर कर.’ आणि विनम्र भावाने दरवाजातून प्रवेश करा. तर आम्ही तुमच्या पापांना माफ करून टाकू आणि जे भले कृत्य करणारे आहेत, त्यांना अधिक प्रदान करू. 162 पण त्यांच्यापैकी जे लोक अत्याचारी कृत्य करण्यावर आग्रही होते त्यांनी, त्यांना जे काही सांगितले गेले होते, त्याला बदलून वेगळेच रूप दिले. तेव्हा आम्ही त्यांच्या अत्याचारापायी त्यांच्यावर आकाशातून शिक्षा पाठविली.

163 आणि त्यांना त्या शहराबद्दल विचारा जे समुद्र किनाऱ्यावर होते, जेव्हा ते

'सबत' (शनिवारच्या दिवसाच्या) नियमाचे उल्लंघन करीत होते. जेव्हा मासे 'सबत'च्या दिवशी पृष्ठभागाकडे पाण्यावर यायची, पण इतर दिवशी जेव्हा 'सबत' नसायचा तर ती त्यांच्याजवळ येत नसत. अशाप्रकारे आम्ही त्यांची परीक्षा घेतली, कारण ते आज्ञाभंग करीत होते. 164 आणि जेव्हा त्यांच्यातील काही लोकांनी म्हटले, 'तुम्ही अशा लोकांना कशाला उपदेश करता, ज्यांना अल्लाह नष्ट करणार आहे किंवा भयंकर शिक्षेने दंडित करणार आहे?' तेव्हा त्या (उपदेश करणाऱ्या सदाचारी लोकांनी) उत्तर दिले, '(एक तर) तुमच्या पालनकर्त्यासमोर दोषमुक्त होण्यासाठी आणि (दुसरा उद्देश असा) की, त्यांनी (उपदेश ग्रहण करून) त्याचे भय बाळगावे.'

165 आणि नंतर जेव्हा ते (अपराधी लोक), त्या सर्व उपदेशांना विसरून बसले, जे त्यांना (नेहमी लक्षात ठेवण्यासाठी) करण्यात आले होते. तेव्हा आम्ही त्या लोकांना वाचविले जे वाईट कृत्य करणाऱ्यांना त्यापासून रोखत असत.

आणि जे लोक अत्याचारी कृत्य करण्यावर आग्रही राहिले त्यांना भयंकर शिक्षेने गाठले. कारण ते विद्रोही लोक होते. 166 आणि जेव्हा ते पूर्ण शिरजोरीने, तीच कृत्ये करीत राहिले, ज्यापासून त्यांना मनाई करण्यात आली होती. (तेव्हा) आम्ही त्यांना म्हणालो, 'तुम्ही तुच्छ माकडे व्हा!'

167 आणि (ती वेळ आठवा), जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने घोषणा केली की, तो पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत त्यांच्यावर (म्हणजे ज्यू लोकांवर) अशा लोकांना नियुक्त करत राहील, जे त्यांना अतिशय यातनामय दु:ख देत राहतील. निश्चितच तुमचा पालनकर्ता शिक्षा करण्याच्या बाबतीत अति शीघ्र आहे. आणि तो अतिशय क्षमाशील व दयाळू(ही) आहे. 168 आणि आम्ही त्यांना वेगवेगळ्या (अनेक) समूहात संपूर्ण पृथ्वीवर विखुरून टाकले. त्यांच्यात काही लोक सदाचरणी आहेत तर काही याहून भिन्न आहेत. आणि आम्ही त्यांची परीक्षा घेतली चांगल्या आणि वाईट दोन्ही प्रकारच्या स्थितीद्वारे, म्हणजे त्यांनी

सन्मार्गाकडे वळावे (ही अपेक्षा).

169 मग त्यांच्यानंतर अशा दुराचारी पिढ्या पुढे आल्या, ज्या ग्रंथाच्या वारस बनल्या, (पण) ते याच जगाच्या क्षुल्लक गोष्टींच्या मागे धावतात. आणि म्हणतात, 'आम्हाला निश्चितच क्षमाप्राप्ती होणार.' पण जर अशाच तुच्छ फायद्याच्या वस्तू त्यांच्यासमोर पुन्हा आल्या तर त्या ते लगबगीने घेऊ लागतील. यांच्याकडून ग्रंथाद्वारे प्रतिज्ञा घेण्यात आली नव्हती का की, त्यांनी अल्लाहविषयी सत्याशिवाय अन्य कोणतीही गोष्ट बोलू नये? आणि जे ग्रंथात लिहिलेले आहे. यांनी (स्वत: पुन्हा–पुन्हा) अध्ययन केले नाही का? (अल्लाहचे) भय बाळगणाऱ्यांसाठीच मृत्यूनंतरच्या जीवनात उत्तम स्थान आहे. मग तुम्ही आपल्या बुद्धीचा उपयोग करणार नाही का? 170 आणि ज्या लोकांनी (अल्लाहच्या) ग्रंथाचा दृढतापूर्वक अंगीकार केला व (जे) नित्य प्रार्थना करतात (नमाज़ पढतात) तर आम्ही (अशा) सदाचरणी लोकांना त्यांचा मोबदला कदापि नाकारत नाही. 171 आणि जेव्हा (सिनाई) पर्वताला आम्ही त्यांच्यावर (म्हणजे इस्राईलच्या मुलांवर) अशाप्रकारे उचलून धरले की, जणू काही तो एक मंडप आहे, आणि त्यांना वाटू लागले की, तो त्यांच्यावर कोसळू शकतो. (तेव्हा आम्ही त्यांना म्हणालो) 'पूर्ण दृढतेने ते (सर्व) पकडून ठेवा, जे आम्ही तुम्हाला दिलेले आहे. आणि त्यात जे काही आहे, ते (नेहमी) लक्षात ठेवा, म्हणजे तुम्ही अल्लाहची जाण ठेवणारे बनाल.'

172 आणि जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने (प्रथम मानव) आदमच्या मुलांच्या पाय आणि कमरेच्या मधल्या भागातून त्यांच्या संततीला बाहेर काढले आणि त्यांना स्वत:बद्दल साक्ष द्यायला लावली. (तेव्हा अल्लाहने त्यांना विचारले). मी तुमचा पालनकर्ता नाही का? (त्यावर सर्वांनी) उत्तर दिले, 'होय! (निश्चितपणे तू आमचा पालनकर्ता आहेस) या गोष्टीस आम्ही साक्षी आहोत.' हे (अल्लाहने) अशासाठी केले की, पुनरुत्थानाच्या दिवशी तुम्ही असे म्हणू नये की, आम्ही

याविषयी खरोखर अनभिज्ञ होतो. [173] किंवा तुम्ही असे कारणही पुढे करू नये की, आमच्या पूर्वजांनी इतरांना अल्लाहच्या बरोबरीचे स्थान दिले आणि आम्ही त्यांच्यानंतर त्यांचे वंशज बनलो (आणि त्यांचे अनुसरण करत राहिलो) तर तू आम्हाला त्या लोकांच्या कृत्यांपायी नष्ट करून टाकशील की काय, ज्यांनी (तुझ्या विषयी) खोट्या गोष्टी रचल्या?

[174] आणि अशाप्रकारे आम्ही आमचे हे संदेश स्पष्ट करून सांगत आहोत. हे यासाठी की, त्यांनी आमच्याकडे परत यावे.

[175] आणि यांच्यासमोर त्या माणसाच्या स्थितीचे वर्णन करा, ज्याला आम्ही आमचे संदेश प्रदान केले होते, पण तो त्यापासून दूर निघून गेला. मग सैतान त्याच्या मागे लागला. आणि तो मार्गभ्रष्ट झालेल्या लोकांत सामील झाला. [176] आणि जर आम्ही इच्छिले असते तर त्याला त्या संदेशाद्वारे अत्युच्च स्थान प्रदान केले असते. पण जमिनीवरील (म्हणजे या जगातील इच्छा-आकांक्षांकडेच) त्याचा नेहमी कल होता. आणि आपल्या दुष्टप्रवृत्तीचे त्याने अनुसरण केले. म्हणून त्याचे उदाहरण त्या कुत्र्यासारखे आहे; जर तुम्ही त्याला हाकलून लावले, तरी तो जीभ बाहेर काढून धापा टाकीत असतो आणि जर तुम्ही त्याला सोडून दिले तरी देखील, तो धापा टाकीत असतो. त्या लोकांची देखील अशीच अवस्था आहे, ज्यांनी आमच्या संदेशांना खोटे ठरविले. तर तुम्ही त्यांना हे सांगून टाका, म्हणजे त्यांनी (याद्वारे) चिंतन करावे. [177] किती वाईट उदाहरण आहे त्या लोकांचे, जे आमच्या संदेशांना खोटे ठरविण्यावर आग्रही राहिले. (पण) ते स्वत:चेच नुकसान करीत राहिले. [178] अल्लाह ज्याला मार्ग दाखवितो, केवळ त्यालाच सन्मार्ग प्राप्त होतो. उलटपक्षी ज्यांना तो भटकण्यासाठी सोडून देतो तर असेच लोक विफल होणारे आहेत.

[179] जिन्न आणि मनुष्यांपैकी बहुसंख्य आम्ही नरकासाठीच निर्माण केले आहेत (म्हणजे त्यांचा शेवट नरकच असेल). ज्यांना हृदय (मन) आहेत पण

त्यांद्वारे त्यांना सत्याचे आकलन होत नाही. त्यांना डोळे आहेत पण त्यांद्वारे ते पाहत नाहीत. त्यांना कान आहेत पण त्यांद्वारे ते ऐकत नाहीत. ते गुराढोरांसारखे आहेत, एवढेच नव्हे तर त्यांच्यापेक्षाही जास्त बहकलेले आहेत. ते फारच बेसावध स्थितीत पडलेले आहेत. 180 आणि सर्व गुणविशेषणे केवळ अल्लाहसाठीच आहेत. तर अशाच नावांनी त्याचा धावा करा. आणि त्या लोकांना सोडून द्या, जे त्याच्या नावांविषयी विपर्यास करू पाहतात. आणि ते जे करीत आहेत. त्यांना त्यांच्या कर्मांचा मोबदला अवश्य मिळणार. 181 आणि आम्ही निर्माण केलेल्यांमध्ये काही लोक असेही आहेत, जे (इतरांना) सत्याचा मार्ग दाखवतात व त्यानुसार न्याय देखील करतात. 182 पण जे लोक आमच्या संदेश असलेल्या खुणांना खोटे ठरविण्यावर आग्रही राहिले, त्यांना कळणारही नाही अशाप्रकारे आम्ही त्यांना हळू–हळू (विनाशाकडे) घेऊन जाऊ. 183 आणि मी त्या (अपराधी लोकांना काही काळासाठी भरपूर) उसंत देत असतो. पण माझी रणनीती फारच भक्कम आहे.

184 आपल्या साथीदाराला कोणत्याही प्रकारचे वेड नाही, याचा त्यांनी (कधी) विचार केला नाही का? तो तर केवळ स्पष्टपणे सावध करणारा आहे. 185 आकाश व पृथ्वीवर (सर्वत्र सामर्थ्यशाली अल्लाहची) सत्ता असल्याचे त्यांना (कधी) आढळले नाही का? तसेच अल्लाहने ज्या काही वस्तू निर्माण केल्या आहेत (त्यांना दिसत नाहीत का?) आणि आपला शेवट जवळ येऊन ठेपला असेल, (याबद्दल ते कधी विचार करीत नाहीत का?) मग यानंतर कोणत्या गोष्टीवर ते विश्वास ठेवणार आहेत? 186 ज्याला अल्लाह भटकण्यासाठी सोडून देतो, त्याला कोणीही (सन्मार्गाकडे) मार्गदर्शन करू शकत नाही. आणि तो त्यांना त्यांच्या उद्दामपणेत भटकत राहण्यासाठी सोडून देतो. 187 (हे पैगंबर!) ते तुम्हाला कयामती  विषयी विचारतात की, ती केव्हा येईल? (त्यांना) सांगा, त्याचे ज्ञान केवळ माझ्या पालनकर्त्यालाच आहे. आणि केवळ तोच तिला

तिच्या नियत वेळेवर प्रकट करणार आहे. आकाश आणि जमिनीत ती ओझे बनली आहे.

आणि जेव्हा ती (घटिका) तुमच्यावर येईल तर (अगदी) अचानक येईल. ते तुम्हाला अशाप्रकारे विचारतात जसे (तिची) पूर्ण चौकशी करून तुम्ही (तिचे) ज्ञान जाणून घेतले. याचे ज्ञान फक्त अल्लाहलाच आहे, पण अधिकांश लोकांना याची जाण नाही. 188 (पैगंबर! त्यांना) सांगा, 'स्वत:चे भले किंवा वाईट करण्याचा अधिकार माझ्याकडे (अजिबात) नाही. मात्र अल्लाह इच्छील त्याप्रमाणेच (भले अथवा वाईट) घडेल. आणि जर मला अदृश्याचे ज्ञान असते तर मी माझे भरपूर कल्याण करून घेतले असते, आणि दु:खांचा मला स्पर्शही झाला नसता. मी तर केवळ सावध करणारा आणि शुभवार्ता देणारा आहे, त्या लोकांना जे (माझ्या म्हणण्यावर) विश्वास ठेवतील.'

189 तोच आहे (अल्लाह) ज्याने तुम्हा सर्वांना एका जिवापासून निर्माण केले आहे आणि त्यापासूनच त्याचा जोडीदार बनविला, जेणेकरून त्यास तिच्या सहवासात संतोष प्राप्त व्हावा. आणि जेव्हा तो (पुरुष) तिला झाकून टाकतो, तेव्हा ती हलकेसे ओझे धारण करते आणि ते (ओझे) घेऊन ती फिरत असते. आणि जेव्हा ती (गर्भामुळे) आणखी जड होते तेव्हा ते दोघे (पती-पत्नी) आपला पालनकर्ता असलेल्या अल्लाहकडे प्रार्थना करू लागतात, 'तू जर आम्हाला सुदृढ बालक दिल्यास आम्ही तुझे आभारी राहू.' 190 पण जेव्हा अल्लाह त्यांना सुदृढ अपत्य प्रदान करतो, तेव्हा ते त्याने त्यांना जे दिलेले असते त्याच्यासंबंधात इतरांना त्याचे सहभागी ठरवितात.

पण ते ज्यांना त्याच्या बरोबरीचे स्थान देतात. त्यांच्यापेक्षा अल्लाह कितीतरी श्रेष्ठ आहे! 191 ते अशांना अल्लाहच्या बरोबरीचे स्थान देत आहेत का, जे कशाचीही निर्मिती करीत नाहीत? तर (वस्तुस्थिती ही आहे की), ते स्वत:च निर्माण केले गेलेले आहेत. 192 ते त्यांना कोणतेही साहाय्य करण्यास समर्थ तर

नाहीतच आणि ते स्वत:लाही साहाय्य करण्यास (तितकेच) असमर्थ आहेत. [193] आणि जर तुम्ही त्यांना सन्मार्गाकडे येण्याचे आवाहन कराल तर ते तुमच्या आवाहनाला प्रतिसाद देणार नाहीत. तुम्ही त्यांना आवाहन करा किंवा गप्प राहा (या दोन्ही गोष्टी अगदी) सारख्याच आहेत. [194] ज्यांचा तुम्ही अल्लाहव्यतिरिक्त धावा करता, ते तुमच्याप्रमाणेच निर्माण केले गेलेले (त्याचे) दास आहेत. मग तुम्ही तुमच्या दाव्यात सच्चे असाल तर त्यांचा धावा करा (त्यांना हाक द्या), आणि त्यांना तुमच्या हाकेचे उत्तर देऊ द्या.

[195] ज्या (प्रतिमांची अल्लाहला सोडून तुम्ही पूजा करता) त्यांना पाय आहेत का, ज्याद्वारे ते चालतात किंवा त्यांना हात आहेत का, ज्याद्वारे ते (काही) पकडतात किंवा त्यांना डोळे आहेत का, ज्याद्वारे ते पाहतात किंवा त्यांना कान आहेत का, ज्याद्वारे ते ऐकतात? (पैगंबर!) (त्यांना) सांगा, ‘तुम्ही ज्यांना अल्लाहच्या बरोबरीचे स्थान दिले आहे, त्यांना बोलवा, आणि मग तुम्ही सर्व जण माझ्याविरुद्ध (वाटेल ती) शक्कल लढवा आणि मला मुळीच सवड देऊ नका. [196] निश्चितच माझा रक्षणकर्ता अल्लाह आहे, ज्याने हा ग्रंथ प्रकट केला आहे. तोच (आपल्या) सदाचारी भक्तांचे रक्षण करतो. [197] तर उलटपक्षी तुम्ही त्याच्याव्यतिरिक्त ज्यांचा धावा करता त्यांच्याकडे ना तुम्हाला मदत करण्याचे सामर्थ्य आहे, ना ते स्वत:ची मदत करू शकतात. [198] आणि जर तुम्ही त्यांना सन्मार्गाकडे बोलवाल तर ते तुमचे म्हणणे ऐकणार नाहीत. आणि तुम्हाला असे वाटते (भास होतो) की, ते तुमच्याकडे टक लावून पाहत आहेत, पण वस्तुत: ते काहीच पाहत नाहीत.’

[199] (पैगंबर!) (तुम्ही त्यांच्याशी) क्षमाशीलतापूर्वक व्यवहार करा, आणि भले कृत्य करण्याची ताकीद द्या, आणि अशा लोकांपासून दूर राहा, ज्यांनी स्वत:ला अज्ञानी ठेवणेच पसंत केले. [200] आणि जर सैतानी विचाराने तुमचे मन विचलित केले तर अल्लाहकडे शरण मागा, निश्चितच तो सर्व काही

ऐकणारा आणि सर्व काही जाणणारा आहे. 201 आणि जे लोक अल्लाहच्या
उपस्थितीची जाण ठेवणारे आहेत, त्यांना जेव्हा सैतानी विचारांचा स्पर्श होतो
तेव्हा ते ताबडतोब सतर्क होतात आणि लगेच त्यांचे डोळे उघडतात.

202 पण जे सैतानाचे (अनुसरण करणारे) भाऊबंद आहेत, ते वाममार्गाकडे
खेचले जातात. आणि ते त्यात कसलीही कसर बाकी ठेवत नाहीत.

203 आणि (पैगंबर!) जेव्हा तुम्ही त्यांच्यासमोर एखादे चमत्कार सादर करीत
नाही (म्हणून) काही (लोक) म्हणतात, ‘तुम्ही (अल्लाहकडून) ते प्राप्त करण्यासाठी
(म्हणजे एखादे चमत्कार प्राप्त करण्यासाठी), प्रयत्न का करीत नाही?’ (त्यांना)
सांगा, ‘मी तर केवळ त्याचेच अनुसरण करतो, जे माझ्याकडे माझ्या पालनकर्त्याकडून
प्रकट केले जाते. हा ग्रंथ म्हणजे तुमच्या पालनकर्त्याकडून आलेले प्रबोधन आहे.
आणि सच्च्या श्रद्धावंतांसाठी (त्यात) मार्गदर्शन व कृपा आहे. 204 आणि जेव्हा
कुराणाचे पठण केले जाईल, तेव्हा ते (अतिशय) लक्षपूर्वक ऐका आणि (ते ऐकत
असताना) (पूर्ण) शांतता पाळा, हे अशासाठी की, तुमच्यावर कृपा केली जावी.’
205 आणि आपल्या मनात आपल्या पालनकर्त्याचे सकाळी व संध्याकाळी पूर्ण
नम्र भावाने व त्याचे भय बाळगून हळू आवाजात स्मरण करीत राहा. आणि
गाफील लोकांपैकी होऊ नका. 206 जे (स्वर्गदूत) तुझ्या पालनकर्त्याच्या सान्निध्यात
आहेत, ते त्याच्या उपासनेकडे उद्धटपणे पाठ फिरवीत नाहीत, तर ते त्याच्या
असीम पावित्र्याचे गुणगान करतात आणि त्याच्या समोरच स्वत: नतमस्तक
होतात.

# सूरह–०८. अल–अनफ़ाल

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 ते तुम्हाला युद्धात शत्रूपासून हाती लागलेल्या संपत्तीविषयी विचारतात,
(त्यांना) सांगा, ‘युद्धात शत्रूपासून हाती आलेला (सर्व) माल अल्लाह आणि

पैगंबराचा आहे.' म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि आपसातील संबंध
सुधारण्यासाठी प्रयत्न करा, आणि अल्लाह व त्याच्या पैगंबराच्या आज्ञांचे पालन
करा, जर तुम्ही सच्चे श्रद्धावंत असाल. 2 खरे श्रद्धावंत तर ते (लोक) आहेत,
जेव्हा (त्यांच्यापुढे) अल्लाहचा उल्लेख होतो, तेव्हा (भीतीयुक्त आदराने) त्यांच्या
हृदयांचा थरकाप उडतो. आणि जेव्हा अल्लाहची संदेश(वचने) त्यांच्या कानी
पडतात, तेव्हा त्यांची श्रद्धा अधिक बळकट होते. आणि ते आपल्या पालनकर्त्यावर
दृढ विश्वास ठेवतात. 3 जे (नमाज़रूपी) नित्य प्रार्थना करतात आणि जी (काही
धनसंपत्ती) आम्ही त्यांना दिली आहे, त्यातून (इतरांवर) खर्च करतात. 4 हेच
लोक अस्सल श्रद्धावंत आहेत. त्यांच्यासाठी त्यांच्या पालनकर्त्याकडे अत्युच्च
स्थान व क्षमाशीलता आहे आणि सन्मानपूर्वक (दिली जाणारी) जीवनसामग्री
आहे.

5 (आणि बद्रच्या युद्धाच्या वेळेस) तुमच्या पालनकर्त्याने तुम्हाला उचित
उद्देशासह तुमच्या घरातून बाहेर आणले. जरी (युद्ध करणे) श्रद्धावंतांपैकी
काहींना फार जड जात होते (तरीही त्याने तुमचे साहाय्य करून तुम्हाला युद्ध
करण्यासाठी घराबाहेर काढले). 6 सत्य उघड झाल्यानंतरही ते त्याविषयी
तुमच्याशी वाद घालीत होते. जणू काही त्यांना मृत्यूच्या दारात लोटले जात आहे
आणि (त्यांची अशी अवस्था झाली की, जणू ते) उघड डोळ्यांनी मृत्यूला
पाहत आहेत. 7 आणि (तो प्रसंग आठवा) जेव्हा अल्लाहने तुम्हाला वचन दिले
होते की, (शत्रूच्या) त्या दोन गटांपैकी एक गट तुम्हाला मिळेल आणि तुमची
अशी इच्छा होती की, कमी शक्तिशाली गट (नि:शस्त्र गट) तुम्हाला मिळावा.
पण अल्लाहची अशी इच्छा होती की, त्याने आपल्या शब्दांनी सत्य प्रस्थापित
करावे, (उघड करावे). आणि सत्य नाकारत राहिलेल्या श्रद्धाहीनांना समूळ नष्ट
करावे. 8 म्हणजे 'सत्य' सत्य सिद्ध व्हावे आणि जे 'असत्य' आहे ते असत्य
सिद्ध व्हावे. मग अपराधी लोकांना (ते) किती का अप्रिय असेना.

[9] जेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याकडे साहाय्यासाठी विनवणी करीत होता, तेव्हा त्याने तुमच्या विनवणीला अशाप्रकारे प्रतिसाद दिला, 'मी निश्चितपणे एका पाठोपाठ एक, अशा एक हजार स्वर्गदूतांना तुमच्या मदतीसाठी पाठवीत आहे.' [10] आणि अल्लाहने हे केवळ यासाठी केले की, ते तुमच्यासाठी शुभवार्ता ठरावी, जेणेकरून तुमची मने संतुष्ट व्हावीत. आणि साहाय्य तर फक्त अल्लाहकडूनच येत असते. अल्लाह खरोखर सामर्थ्यशाली व बुद्धिमान आहे. [11] (आठवा ते कसे घडले) जेव्हा अल्लाहने तुम्हाला त्याच्याकडून मन:शांती लाभावी यासाठी झोपेची गुंगी तुमच्यावर उतरविली.

आणि त्याने आकाशातून तुमच्यावर पाण्याचा वर्षाव केला, यासाठी की, त्याद्वारे तुम्हाला स्वच्छ करावे व तुमच्यापासून सैतानाची मलिनता दूर करून टाकावी. आणि तुमच्या मनाला बळकटी द्यावी आणि अशाप्रकारे तुमची पावले दृढ करता यावीत. [12] आणि (तो प्रसंगही आठवा) जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने स्वर्गदूतांना (हा संदेश श्रद्धावंतांपर्यंत पोचविण्यासाठी) आज्ञा केली की, 'मी तुमच्यासह आहे' (तसेच त्याने स्वर्गदूतांना ही देखील आज्ञा केली की, हा माझा संदेश देऊन) तुम्ही श्रद्धावंतांना दृढता प्रदान करा. मी त्या सत्य नाकारण्यावर आग्रही असलेल्या श्रद्धाहीन लोकांच्या मनात दहशत निर्माण करीन. तर (श्रद्धावंतांनो!) तुम्ही त्यांच्या मानेवर प्रहार करा. आणि त्यांच्या बोटांची सांधे छाटून टाका. [13] ही (शिक्षा त्यांना यासाठी आहे) की, त्यांनी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराला आव्हान दिले. आणि जो कोणी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराला आव्हान देतो तर अल्लाह (अशांना) शिक्षा देण्याच्या बाबतीत निश्चितच फार कठोर आहे. [14] (हे अल्लाहच्या शत्रूंनो!) ही (शिक्षा) आहे (तुमच्यासाठी), ती तुम्ही आता चाखा. आणि लक्षात ठेवा सत्य नाकारणाऱ्यांसाठी नरकाच्या आगीची शिक्षा (अटळ) आहे.

[15] श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! जेव्हा युद्धभूमीत तुमचा सामना सत्य

नाकारणाऱ्या श्रद्धाहीनांशी होईल, तेव्हा त्यांना (अजिबात) आपली पाठ दाखवू
नका. 16 आणि अशा प्रसंगी जो कोणी आपली पाठ दाखवील, पण फक्त हे की, तसे करणे युद्धाच्या रणनीतीचा एक भाग असेल किंवा (श्रद्धावंतांच्या) दुसऱ्या सेनासमूहात सामील होण्याचा प्रयत्न असेल (या व्यतिरिक्त जो कोणी पाठ दाखवील) तर तो आपल्यावर निश्चितपणे अल्लाहचा कोप ओढवून घेईल. तर अशा व्यक्तीचे निवासस्थान नरक आहे. आणि किती वाईट स्थान आहे ते (राहण्यासाठी)!

17 (श्रद्धावंतांनो! हे जाणून घ्या) शत्रूला तुम्ही ठार केले नाही तर अल्लाहनेच त्यांना ठार केले. आणि (पैगंबर!) जेव्हा तुम्ही त्यांच्याकडे (वाळूचे कण) फेकले त्याद्वारे (त्यांच्या मनात) तुम्ही (दहशत) निर्माण केली नाही तर अल्लाहने केली. (म्हणजे वस्तुत: वाळूचे कण तुम्ही फेकले नाही तर अल्लाहनेच फेकले). त्याने हे सर्व यासाठी केले की, त्याच्याकडून श्रद्धावंतांवर भरपूर कृपावर्षाव करता यावा. निश्चितच अल्लाह सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा
आहे. 18 ही (होती अल्लाहची योजना) हे (दाखवून देण्यासाठी) की, अल्लाह सत्य नाकारणाऱ्या श्रद्धाहीनांचे कट–कारस्थान कशाप्रकारे निष्फळ ठरवतो.
19 (श्रद्धावंतांनो!) तुम्ही विजय प्राप्त करू इच्छित होता, तर तो विजय आता तुम्हाला प्राप्त झालेला आहे. आणि जर तुम्ही (स्वत:ला दुष्कृत्यांपासून) दूर ठेवाल तर ते तुमच्या हिताचे असेल. पण जर तुम्ही पुन्हा तीच (अवज्ञा) करायला लागाल तर आम्ही देखील (आमच्या मदतीचे हात) मागे घेऊ. आणि तुमचा समूह कितीका मोठा असेना तो मुळीच तुमच्या कामी येणार नाही. आणि लक्षात ठेवा अल्लाह निश्चितपणे श्रद्धावंतांच्या सोबत आहे.

20 इमान धारण केलेल्या लोकांनो! अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आज्ञेचे पालन करा, आणि आदेश ऐकल्यानंतर त्याच्याकडे पाठ फिरवू नका.
21 आणि त्या लोकांसारखे होऊ नका जे म्हणतात, ‘आम्ही ऐकत आहोत, पण

वस्तुत: ते काहीच ऐकत नाहीत. 22 निश्चितच अल्लाहच्या दृष्टीत, प्राणिमात्रात
सर्वात वाईट ते लोक आहेत, जे (कान असून) बहिरे आहेत, (तोंड असून)
मुके आहेत, (म्हणजे) जे आपल्या बुद्धीचा वापरच करीत नाहीत. 23 जर
अल्लाहला त्यांच्यामध्ये किंचितही भलेपणा दिसून आला असता तर त्याने
निश्चितच त्यांना ऐकण्याची सद्‌बुद्धी प्रदान केली असती. आणि जर त्याने
त्यांना (आपले संदेश) ऐकविले तर ते तिरस्काराने त्याकडे पाठ फिरवतील.

24 श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या
हाकेला (पूर्णपणे) प्रतिसाद द्या, (जेव्हा पैगंबर तुम्हाला हाक देईल), तो
तुम्हाला अशा गोष्टीकडे बोलावीत आहे ज्याद्वारे तुम्हाला (नवे) जीवन प्राप्त
होणार आहे. आणि याची जाण ठेवा की, अल्लाह, मनुष्य आणि त्याच्या
हृदयाच्यामध्ये उभा आहे (म्हणजे मानवाच्या सर्व इच्छा-आकांक्षा यांचे त्याला
पूर्ण ज्ञान आहे). आणि (शेवटी) तुम्हा सर्वांना त्याच्यासमोर एकत्रित केले
जाणार आहे. 25 आणि त्या विपत्तीचे भय बाळगा, जी तुमच्यातील केवळ
दुराचारी लोकांवर प्रहार करणार नाही, (म्हणून तुम्ही वाईटाच्या मोहापासून
सावध राहा). आणि या गोष्टीची जाणीव ठेवा की, अल्लाह शिक्षा देण्याच्या
बाबतीत फार कठोर आहे.

26 आणि ती वेळ आठवा जेव्हा तुम्ही संख्येने कमी होता आणि देशात
दुर्बल समजले जात होता. आणि तुम्हाला नेहमी हे भय सतावत होते की, तुमचे
शत्रू अचानक तुमच्यावर झडप तर घालणार नाहीत ना? मग अल्लाहने तुम्हाला
राहण्यासाठी आश्रय प्रदान केला. आणि आपले साहाय्य देऊन तुम्हाला समर्थ
केले आणि उपजीविकेसाठी चांगल्या वस्तू दिल्या. (हे सर्व यासाठी की), तुम्ही
त्याचे आभार मानावे. 27 (तर) हे श्रद्धावंतांनो! अल्लाह आणि त्याच्या पैगंबराशी
विश्वासघात करू नका. आणि जाणूनबुजून आपल्या विश्वासार्हता धुळीस मिळू
देऊ नका.

28 आणि लक्षात ठेवा की, तुमची संपत्ती आणि संतती केवळ तुमच्या परीक्षेसाठी आहेत आणि अल्लाहकडेच फार मोठा मोबदला (प्राप्त होणार) आहे.

29 श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! जर तुम्ही अल्लाहची जाण ठेवणारे बनाल, तर तो तुम्हाला योग्य आणि अयोग्य मध्ये फरक करण्याची शक्ती (अशी कसोटी) प्रदान करेल आणि तुमच्या वाईट कृत्यांना तुमच्यापासून दूर करील आणि तुमच्या अपराधांना माफ करील. आणि अल्लाह असीम कृपा करणारा आहे. 30 (पैगंबर! ती वेळ आठवा) जेव्हा सत्य नाकारण्यावर आग्रही असलेले श्रद्धाहीन लोक तुमच्याविरुद्ध कट रचित होते. (ते म्हणजे) तुम्हाला (तुमच्या कार्यापासून रोखण्यासाठी) कैद करावे किंवा तुम्हाला ठार करावे किंवा तुम्हाला देशाबाहेर घालवून द्यावे. (या विविध पर्यायांवर ते विचार करीत होते). तर (दुसरीकडे) अल्लाहही आपल्या योजना आखत होता. आणि अल्लाह सर्व योजना आखणाऱ्यांत सर्वश्रेष्ठ आहे.

31 आणि जेव्हा त्यांच्यासमोर आमचे संदेश वाचून ऐकविले जातात, तेव्हा ते म्हणतात, ‘आम्ही (ते सर्व) आधी ऐकले आहोत, आम्ही इच्छिले तर आम्ही देखील यासारखी वचने सादर करू शकतो. या (सर्व गोष्टी) पूर्वजांच्या कथांशिवाय दुसरे काहीच नाही.’ 32 त्यांनी असे देखील म्हटले, ‘हे अल्लाह! तुझ्याकडून आलेले खरोखर हेच सत्य असेल तर आमच्यावर आकाशातून दगडांचा वर्षाव कर किंवा इतर एखादी भयानक विपत्ती आमच्यावर पाठव.’ 33
पण (पैगंबर!) तुम्ही त्यांच्यामध्ये असताना अल्लाह त्यांना शिक्षा करणार नव्हता. तसेच अल्लाहची अशी रीत नाही की, लोक क्षमायाचना करत असतील आणि तो त्यांना शिक्षा करेल. 34 पण (आता) अल्लाहने त्यांना शिक्षा का करू नये? जेव्हा की, ते (श्रद्धावंतांना) पवित्र मशीद (काबा) पासून रोखतात. ते तर त्या (काबागृहाचे) (खरे) विश्वस्तही नाहीत. त्याचे विश्वस्त तर अल्लाहचे भय बाळगणारे (लोकच) असू शकतात. पण अनेकांना याची जाण नाही. 35 आणि

काबागृहाजवळील त्यांची प्रार्थना (नमाज़) म्हणजे दुसरे काही नसून,केवळ शिट्या आणि टाळ्या वाजविणे आहे. तर आता चाखा (सत्य नाकारणाऱ्यांनो) आपल्या सत्य नाकारण्याची शिक्षा.

36 निश्चितच जे लोक 'सत्य' नाकारण्यावर ठाम आहेत, ते आपले धन लोकांना अल्लाहच्या मार्गापासून दूर करण्यासाठी खर्च करीत असतात. आणि ते अशाच प्रकारे आपले धन खर्च करीत राहतील, येथपावेतो की, तेच धन त्यांच्यासाठी तीव्र पश्चात्तापाचे साधन बनेल. आणि शेवटी त्यांचा पाडाव केला जाईल. आणि जे लोक (आपल्या मृत्यूपर्यंत) सत्य नाकारत राहिले त्यांना नरकात एकत्र केले जाईल.
37 ते अशासाठी की, अल्लाहला वाईट (लोकांना) चांगल्यापासून वेगळे करता यावे. आणि तो, दुष्ट (लोकांना) एकावर दुसरे ठेवून ढीग तयार करेल आणि त्या सर्वांना नरकात फेकून देईल. हेच लोक खऱ्या अर्थाने नाश पावणारे आहेत.

38 सत्य नाकारणाऱ्या लोकांना सांगा, जर त्यांनी (सध्या मार्गस्थ असलेल्या मार्गाला) सोडून दिल्यास त्यांच्या भूतकाळातील (सर्व अपराध) माफ करून टाकण्यात येतील. पण जर ते पुन्हा त्याच मार्गाकडे वळतील तर (त्यांनी नेहमी लक्षात असू द्यावे की), त्यांच्या आधी होऊन गेलेल्या (अपराधी लोकांच्या बाबतीत) आमचा काय निर्णय झाला.
39 आणि त्यांच्याशी तोपर्यंत युद्ध करा, जोपर्यंत (धार्मिक) छळ पूर्णपणे थांबत नाही आणि धर्म संपूर्णपणे अल्लाहसाठीच होत नाही, (म्हणजे पूर्णपणे धार्मिक स्वातंत्र्य प्राप्त होत नाही). आणि जर त्यांनी (धार्मिक छळ) करणे थांबविले तर ते जे काही करतील त्याकडे अल्लाहची निश्चितपणे दृष्टी असेल.
40 पण जर त्यांनी (सदाचाराकडे) पाठ फिरवली तर लक्षात ठेवा अल्लाह तुमचा संरक्षणकर्ता आहे. (निश्चितच) सर्वश्रेष्ठ संरक्षणकर्ता व सर्वश्रेष्ठ साहाय्यकर्ता!

41 आणि याची जाणीव ठेवा की, युद्धात जे काही धन तुम्हाला प्राप्त होईल

त्याचा पाचवा हिस्सा अल्लाह आणि त्याचा पैगंबर व (पैगंबराचे) नातेवाईक आणि अनाथ, गरजू आणि वाटसरू (मुशाफर) यांचा असेल. जर तुम्ही अल्लाहवर आणि जे (संदेश) आम्ही आमचा भक्त (मुहम्मद) यांच्याकडे त्या निर्णायक दिवशी पाठविले, जेव्हा दोन्हीकडील सैन्य एकमेकांना भिडले होते, त्यावर विश्वास ठेवणारे असाल, तर (यावर कृती करणे हे तुमच्यासाठी आवश्यक आहे). (आणि नेहमी लक्षात ठेवा) अल्लाहला सर्व काही करण्याचे सामर्थ्य प्राप्त आहे.

42 (तो बदरच्या युद्धाचा दिवस आठवा) जेव्हा तुम्ही दरीच्या जवळच्या काठावर होता आणि ते दूरच्या काठावर होते. आणि (मक्कावासी व्यावसायिकांचा) काफिला तुमच्या खालच्या बाजूस (काही अंतरावर) होता. आणि जर तुम्हाला (युद्धाची) वेळ माहीत असती तर त्याचे आव्हान स्वीकारण्याच्या बाबतीत तुमच्यात (अवश्य) मतभेद झाले असते. पण जे घडले ते यासाठी घडले की, अल्लाहने त्या गोष्टीचा निर्णय करून टाकावा की, जी गोष्ट (युद्ध) होणे अटळ होते. (आणि म्हणूनच दोन सैन्यांची समोरासमोर गाठ पाडण्यात आली). म्हणजे ज्याला नष्ट व्हायचे आहे, त्याने सत्याचे स्पष्ट प्रमाण पाहून नष्ट व्हावे आणि जो जिवंत राहणार आहे, त्याने सत्याच्या स्पष्ट प्रमाणासह जिवंत राहावे. निश्चितच अल्लाह सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा आहे. 43 अल्लाह त्यांची (शत्रूची) संख्या तुम्हाला (धैर्य देण्यासाठी) तुमच्या स्वप्नात कमी (असल्याचे) दाखवत होता. आणि जर त्याने तुम्हाला त्यांची संख्या जास्त दाखविली असती तर निश्चितच तुमचे धैर्य खचले असते. आणि त्याविषयी तुम्ही आपसात वाद केला असता. पण अल्लाहने तुम्हाला यापासून वाचविले. निश्चितच (मानवाच्या) मनात काय आहे, याची त्याला पूर्ण जाणीव असते. 44 आणि युद्धाच्या ऐनवेळेस अल्लाहने (शत्रू) अल्पसंख्येत आहेत, असे तुम्हाला दर्शवले आणि (शत्रूलाही) तुम्ही (श्रद्धावंत) अल्पसंख्येत आहात असे दर्शवले. हे यासाठी

की, अल्लाहला त्या गोष्टीचा निर्णय करता यावा, जी गोष्ट घडून येणे (अगदी) निश्चित होती. आणि सर्व गोष्टी (अंतिम निर्णयासाठी) अल्लाहकडेच पाठविल्या जातात.

45 इमान धारण केलेल्या लोकांनो! जेव्हा (युद्धात) एखाद्या सैन्याशी तुमचा सामना झाला तर तुम्ही (पूर्ण धैर्यानिशी) दृढ राहा, आणि अल्लाहचे खूप स्मरण करा, म्हणजे तुम्ही यशस्वी व्हाल. 46 आणि अल्लाह व त्याच्या पैगंबराच्या आज्ञांचे पालन करा आणि आपसात वादविवाद करणे टाळा, अन्यथा तुमचे धैर्य खचेल व तुमचा दरारा नाहीसा होईल. तेव्हा संयम ठेवा, निश्चितच अल्लाह संयम बाळगणाऱ्या लोकांसह आहे. 47 तुम्ही त्या लोकांसारखे होऊ नका, जे आपल्या घरून (मोठ्या ऐटीने) तोरा मिरवीत व (लोकांना) डामडौल दाखवीत बाहेर पडले. आणि जे (इतरांना) अल्लाहच्या मार्गापासून रोखतात. पण ते जे काही करीत आहेत, त्यास अल्लाहने वेढलेले आहे.

48 आणि सैतानाने त्यांची (वाईट) कृत्ये त्यांना चांगल्या स्वरूपात दर्शविली आणि तो म्हणाला, 'आज लोकांमध्ये असा कोणीही नाही, जो तुमच्यावर विजय प्राप्त करू शकतो आणि मी तुमचा रक्षणकर्ता आहे!' पण जेव्हा दोन्हीकडील सैन्ये एकमेकांसमोर आली तेव्हा तो (सैतान) (तिथून) उलट्या पावली परत फिरला, आणि म्हणाला, 'निश्चितच माझे तुमच्याशी काही देणे-घेणे नाही, मी ते पाहत आहे, जे तुम्हाला दिसत नाही, मी (तर) अल्लाहचे भय बाळगतो आणि अल्लाह कठोर शिक्षा करणारा आहे.' 49 दांभिक लोक आणि ज्यांच्या मनामध्ये विकृती आहे, असे लोक म्हणत होते, 'या (श्रद्धावंतांची) त्यांच्या धर्माने फसवणूक केली आहे.' पण जो कोणी अल्लाहवर विश्वास ठेवील त्याला निश्चितच (या गोष्टीची अनुभूती होईल की), अल्लाह हा सामर्थ्यशाली व बुद्धिमान आहे.

50 आणि तुम्ही जर त्या स्थितीला पाहू शकले असते, जेव्हा (आमचे) दूत सत्य नाकारण्यावर (आयुष्यभर) आग्रही राहिलेल्या लोकांचे (मृत्युसमयी) प्राण

काढतात, तेव्हा ते दूत त्यांच्या चेहऱ्यांवर आणि पाठींवर प्रहार करून म्हणतात,
'आता जळण्याची शिक्षा चाखा!' 51 ही त्या (कर्मांची) शिक्षा आहे, जी तुम्ही
आपल्या हातांनी केली होती. अल्लाह आपल्या भक्तांवर कदापि अन्याय करीत
नाही. 52 (त्यांची अवस्था) फिरऔनच्या लोकांप्रमाणे आणि त्यांच्या पूर्वीच्या
लोकांप्रमाणे होईल. त्यांनी अल्लाहच्या संदेशाद्वारे प्रकट झालेल्या सत्याचा अस्वीकार
केला, परिणामी अल्लाहने त्यांना त्यांच्या पापकृत्याबद्दल त्यांच्या मुसक्या
आवळल्या. खरोखर! अल्लाह सामर्थ्यशाली आहे आणि शिक्षा करण्याच्या
बाबतीत फार कठोर आहे. 53 हे अशासाठी झाले की, अल्लाहने एखाद्या
जनसमूहावर आपली जी कृपा प्रदान केलेली असते, तो ती कृपा तोपर्यंत मागे
घेत नाही, जोपर्यंत ते लोक स्वत:च्या अवस्थेत बदल करीत नाहीत. आणि
(लक्षात ठेवा) अल्लाह सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा आहे. 54
(त्या अपराध्यांची अवस्था तशीच होणार) जशी फिरऔनच्या लोकांची व त्या
पूर्वीच्या लोकांची झाली. त्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या संदेशांना खोटे ठरविले.
आणि म्हणून आम्ही त्यांच्या अपराधांपोटी त्यांना नष्ट केले. आणि फिरऔनच्या
लोकांना आम्ही बुडवून टाकले, कारण ते सर्व पापकृत्य करणारे लोक होते.

55 निश्चितच अल्लाहच्या दृष्टीत, सर्वात वाईट प्राणी ते आहेत जे सत्याचा
अस्वीकार करण्यावर आग्रही आहेत आणि जे सत्य मान्य करणारे नाहीत. 56 जे
तुमच्याशी करारबद्ध असूनही आपल्या कराराचा प्रत्येक वेळेस भंग करतात
आणि ते (अल्लाहचे) भय बाळगत नाहीत. 57 असे लोक युद्धात तुमच्या हाती
लागले तर त्यांना अशी शिक्षा करा की, जे लोक त्यांच्या मागे आहेत, त्यांनी
ते पाहून तिथून पळ काढावा (म्हणजे त्यांनी आपल्या कटकारस्थानाच्या
कारवायांपासून परावृत्त व्हावे) जेणेकरून त्यांना धडा मिळावा. 58 आणि जर
तुम्हाला त्या जमातीकडून (ज्यांच्याशी तुम्ही करार केलेले आहे), विश्वासघाताचे
भय वाटत असेल तर त्यांचा करार त्यांच्याकडे (यथायोग्य रीतीने) फेकून द्या.

म्हणजे ते आणि तुम्ही करारमुक्त होऊन जाल. अल्लाहला वचनभंग करणारे लोक (अजिबात) प्रिय नाहीत.

59 आणि सत्य नाकारणाऱ्या लोकांनी (कदापि) असा विचार मनात आणू नये की, ते (अल्लाहच्या) तावडीतून (स्वत:ची) सुटका करून घेऊ शकतील. ते (अल्लाहच्या योजनेला कदापि) विफल करू शकत नाहीत. (कारण) त्यांना असे करण्याचे (मुळीच) सामर्थ्य प्राप्त नाही. 60 आणि त्यांना लढा देण्यासाठी तुम्हाला शक्य असेल तेवढे सैन्यबल आणि युद्धासाठी सुसज्ज असलेले घोडे या सर्वांची जमवाजमव करून ठेवा, ज्याद्वारे तुम्हाला अल्लाहच्या शत्रूच्या आणि (स्वत:) तुमच्या शत्रूच्या मनात भय निर्माण करता यावे. तसेच (सध्या समोर उभ्या असलेल्या शत्रू व्यतिरिक्त) इतरांवरही दरारा निर्माण व्हावा, ज्यांची तुम्हाला जाणीव नाही. (पण) अल्लाहला त्यांची जाणीव आहे.

आणि तुम्ही अल्लाहच्या कार्यात जे काही (धन व वेळ) खर्च कराल त्याचा पुरेपूर मोबदला तुम्हाला देण्यात येणार. आणि तुमच्यावर मुळीच अन्याय होणार नाही. 61 आणि जर ते शांतताकरार करण्याची इच्छा दर्शवतील, तर तुम्ही देखील त्यासाठी पुढे या आणि अल्लाहवर (पूर्ण) विश्वास ठेवा. खरोखर! तोच सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा आहे. 62 आणि ते जर (शांती स्थापित करण्याचे नाटक करून) तुम्हाला धोका देण्याचे उद्देश बाळगून असतील तर निश्चितच अल्लाह तुमच्यासाठी पुरेसा आहे. त्यानेच तर तुम्हाला आपली मदत पुरवून आणि विश्वासू अनुयायी प्रदान करून तुम्हाला बळकटी दिली. 63 आणि त्यानेच त्यांच्या मनात (म्हणजे श्रद्धावंतांच्या मनात) परस्परांविषयी प्रेमाची भावना निर्माण केली. पृथ्वीवर जे काही आहे, तुम्ही ते सर्व खर्च करूनही त्यांच्या मनात परस्परांविषयी प्रेमाची भावना (कदापि) निर्माण करू शकले नसते. पण अल्लाहने त्यांच्या मनात परस्परांविषयी प्रेमाची भावना निर्माण केली आहे. तो निश्चितच सामर्थ्यशाली आहे, बुद्धिवान आहे.

64 पैगंबर! अल्लाह तुमच्यासाठी आणि तुमचे अनुसरण करणाऱ्या श्रद्धावंतांसाठी पुरेसा आहे. 65 पैगंबर! श्रद्धावंतांना (आता बचावात्मक) युद्ध करण्यासाठी प्रेरित करा. जर तुमच्यापैकी वीस माणसे धैर्यानिशी (युद्ध भूमीवर) टिकाव धरतील तर ती दोनशे लोकांवर मात करतील आणि जर तुमच्यापैकी शंभर माणसे अशी असतील तर ती त्या सत्य नाकारण्यावर आग्रही असलेल्या हजार श्रद्धाहीन लोकांवर मात करतील, कारण ते समज नसलेले लोक आहेत.

66 आता अल्लाहने तुमचा भार हलका केला आहे, कारण त्याला माहीत आहे की, तुमच्यात काही कमजोरी आहे. (आणि) म्हणून जर तुमच्यापैकी शंभर माणसे धैर्यशील राहून (युद्धभूमीवर टिकाव धरतील) तर ती दोनशे लोकांवर मात करतील आणि जर तुमच्यापैकी हजार माणसे अशी असतील तर ती अल्लाहच्या आज्ञेने दोन हजार लोकांवर मात करतील. आणि अल्लाह (प्रतिकूल परिस्थितीत) अढळ राहणाऱ्या लोकांबरोबर असतो.

67 पैगंबराकरिता हे उचित नाही की, त्याने शत्रूला कैदी बनवावे, (त्याच्यासाठी तर आवश्यक आहे की), त्याने पृथ्वीवर (अल्लाहच्या योजनेविरुद्ध पेटून उठलेल्या शत्रूंचा पूर्णपणे) बिमोड केल्याशिवाय थांबता कामा नये. तुम्ही या जगातील लाभांची अपेक्षा करता, पण अल्लाह मृत्यूनंतरच्या जीवनात (तुमचे कायमसाठी भले) इच्छितो. अल्लाह सर्वशक्तिमान आहे, बुद्धिमान आहे. 68 आणि अल्लाहने (शेवटच्या पैगंबरासंबंधाने आपली योजना) आधीपासून लिहून टाकलेली नसती, तर ज्या मार्गाचा तुम्ही अवलंब केला, त्याचे परिणाम म्हणून तुमच्यावर फार मोठी आपत्ती चालून आली असती. 69 (युद्ध जिंकल्यानंतर शत्रूकडून) ज्या काही वस्तू तुमच्या हाती आलेल्या आहेत, त्यांपैकी वैध आणि चांगल्या (वस्तूंचा) तुम्ही उपभोग करा. आणि (नेहमी) अल्लाहचे भय बाळगा. निश्चितच अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे.

70 पैगंबर! ज्यांना तुम्ही कैदी बनविले आहात त्यांना सांगा, ‘अल्लाहला

तुमच्या मनात जरासाही भलेपणा असल्याचे आढळून आल्यास, तुमच्याकडून जे काही घेण्यात आले आहे त्यापेक्षा अधिक चांगले, तुम्हाला तो प्रदान करील. आणि तुमच्या (अपराधांना) तो माफ करून टाकेल. कारण अल्लाह आहेच फार क्षमाशील व दयाळू.' 71 आणि जर त्यांची तुमच्याशी विश्वासघात करण्याची योजना असेल तर (यात आश्चर्यकारक काहीच नाही कारण), त्यांनी या आधी (स्वत:) अल्लाहशी विश्वासघात केलेला आहे. आणि म्हणून (अल्लाहने त्याचीच त्यांना शिक्षा केली व) त्यांच्यावर तुम्हाला आधिपत्य दिले. आणि अल्लाहला प्रत्येक गोष्टीची जाणीव आहे व तो बुद्धिमान आहे.

72 निश्चितच ज्या लोकांनी श्रद्धा धारण केली आणि (अल्लाहसाठी) आपल्या घरादाराचा त्याग केला आणि अल्लाहच्या कार्यासाठी आपले धन व प्राण पणाला लावले. आणि ते लोक(ही) ज्यांनी (अल्लाहसाठी आपल्या घरादाराचा त्याग करून आलेल्या लोकांना) आश्रय दिला व (पूर्ण) साहाय्य दिले. (तर) हे लोक एकमेकांचे (सच्चे) मित्र (हितचिंतक) व रक्षणकर्ते आहेत. आणि ते लोक ज्यांनी श्रद्धा धारण केली, पण (पैगंबर व इतर श्रद्धावंतांबरोबर) घरादाराचा त्याग केला नाही. तर अशा लोकांच्या संरक्षणाची जबाबदारी तुमच्यावर तोपर्यंत मुळीच येणार नाही, जोपर्यंत ते घरादाराचा त्याग करून (तुमच्याकडे) येत नाहीत. पण धार्मिक (छळाच्या विरुद्ध) ते तुमची मदत मागत असतील तर तुम्ही त्यांची मदत करणे अत्यावश्यक आहे. पण या गोष्टीला अपवाद म्हणजे ते लोक आहेत, ज्यांच्याशी तुमचा करार झालेला आहे (म्हणजे तुम्ही करार मोडून श्रद्धावंतांची मदत करू शकत नाही).आणि जे काही तुम्ही करत आहात ते सर्व अल्लाह पाहत आहे. 73 यासोबत (हेही लक्षात असू द्या) की, जे लोक सत्य नाकारण्यावर आग्रही आहेत, ते एकमेकांचे मित्र (हितचिंतक) आहेत. आणि जर तुम्ही असे केले नाही तर पृथ्वीवर (तुम्हा लोकांत) फार मोठा उत्पात व उपद्रव माजेल.

[74] आणि ज्या लोकांनी श्रद्धा धारण केली आणि (अल्लाहसाठी) घरादाराचा त्याग केला. आणि अल्लाहच्या कार्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली (म्हणजेच जिहाद केला). तसेच ज्या लोकांनी (आपल्या घरादाराचा त्याग केलेल्या लोकांना) आश्रय दिला व साहाय्य केले, तेच लोक अस्सल श्रद्धावंत आहेत. (अल्लाहपाशी) त्यांच्यासाठी क्षमा आणि सर्वश्रेष्ठ उपजीविका आहे. [75] आणि ज्या लोकांनी उशिरा श्रद्धा धारण केली आणि आपल्या घरादाराचा त्याग केला आणि तुमच्यासोबत मिळून (अल्लाहच्या कार्यात) प्रयत्नांची पराकाष्ठा केली. तर हे देखील तुमच्यापैकीच आहेत (म्हणजे अल्लाहच्या नजरेत श्रद्धावंत आहेत).

आणि रक्ताचे नातेसंबंध असलेले लोक हे अल्लाहच्या ग्रंथानुसार दुसऱ्या लोकांपेक्षा अधिक निकटचे आहेत, (हक्कदार आहेत). खरोखर अल्लाहला प्रत्येक गोष्टीचे पूर्ण ज्ञान आहे.

## सूरह-०९. अत-तौबा

[1] ही घोषणा आहे अल्लाह आणि त्याच्या पैगंबरातर्फे की, (यापुढे) (अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा) त्या लोकांशी काहीही संबंध असणार नाही, जे इतरांना अल्लाहचे समकक्ष ठरवतात, ज्यांच्याशी (आधी) तुम्ही करार केले होते. (पण आता त्यांच्या सर्व दायित्वांतून मुक्त झाल्याची ही घोषणा आहे). [2] (त्यांना हे स्पष्ट सांगून टाका की) आता तुम्ही देशामध्ये चार महिने हिंडा-फिरा, पण हे जाणून घ्या की, तुम्ही अल्लाहची योजना कदापि विफल करू शकत नाही. आणि अल्लाह सत्याचा स्वीकार करण्यास नकार देणाऱ्या श्रद्धाहीनांना अपमानित करून सोडणार आहे. [3] अल्लाह आणि त्याच्या पैगंबरातर्फे मोठ्या हजच्या दिवशी सर्व लोकांसमोर ही जाहीर घोषणा केली जात आहे की, अल्लाह व तसेच त्याचा पैगंबर (अल्लाहचे समकक्ष ठरवत राहिलेल्या त्या) अनेकेश्वरवादी लोकांच्या (सर्व) दायित्वांमधून मुक्त झालेले आहेत. जर आताही तुम्ही पश्चात्ताप व्यक्त कराल, तर ते तुमच्याच स्वत:च्या हिताचे आहे. पण जर तुम्ही त्याकडे पाठ

फिरवाल तर याची जाणीव असू द्या की, तुम्ही अल्लाहच्या योजनेला कदापि विफल करू शकत नाही. (पैगंबर!) तुम्ही त्या सत्य नाकारण्यावर आग्रही असलेल्या श्रद्धाहीनांना भयावह शिक्षेची बातमी ऐकवून टाका (की, भयावह शिक्षा त्यांची वाट पाहत आहे).
4 पण यास ते अनेकेश्वरवादी लोक अपवाद आहेत जे तुमच्याशी केलेल्या कराराचा सन्मान करत राहिले, (म्हणजे त्याचे पालन करण्यात कोणतीही कसर केलेली नाही) आणि तुमच्या विरोधात कोणालाही मदत केली नाही. तर तुमचा अशा लोकांशी झालेला करार, त्याची मुदत पूर्ण होईपर्यंत पालन करा. खरोखर, अल्लाहला ते लोक प्रिय आहेत जे (प्रत्येक कार्य करताना) त्याच्या उपस्थितीची जाण ठेवतात.

5 (युद्धासाठी) निषिद्ध असलेले महिने उलटून गेल्यानंतर त्या अनेकेश्वरवाद्यांना (ज्यांनी तुमच्याशी युद्ध छेडले आहे), जिथे-कुठे ते सापडतील ठार करून सोडा आणि त्यांना पकडा व त्यांना वेढा घाला व हल्ला होण्याच्या प्रत्येक जागी त्यांच्या पाळतीवर राहा. (त्यांच्यावतीने एवढे सर्व झाल्यानंतरही) जर ते पश्चात्ताप करतील आणि (नमाज़रूपी) नित्य प्रार्थना करू लागतील व ज़कात (दान) देतील तर त्यांचा रस्ता मोकळा सोडा. खरोखर! अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे.
6 आणि जर अनेकेश्वरवाद्यांपैकी कोणी तुमच्याकडे संरक्षण मागितले तर त्याला संरक्षण द्या. जेणेकरून त्याला (तुमच्याकडून) अल्लाहची वाणी ऐकता यावी. नंतर त्याला त्याच्या सुरक्षित ठिकाणी पोहोचवा. कारण हे असे लोक आहेत, ज्यांना (सत्याचे) ज्ञान नाही.

7 या अनेकेश्वरवादी लोकांशी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा करार कशा प्रकारे कायम राहू शकतो. मात्र त्या लोकांव्यतिरिक्त ज्यांच्याशी तुम्ही (आधी मक्कास्थित) पवित्र मशीदीजवळ करार केलेला होता (म्हणजे तो करार आपल्या मुदतीपर्यंत पूर्ण करा). (ज्यांच्याशी करार झालेला आहे), ते जोपर्यंत खरेपणाने वागतील तुम्हीही त्यांच्याशी खरेपणाने वागा. निश्चितच अल्लाहला सदाचारी

(पापभीरू) लोक प्रिय आहेत.

[8] कशाप्रकारे (करार कायम राहील), जेव्हा त्यांची अवस्था अशी आहे की, जर त्यांना तुमच्यावर नियंत्रण प्राप्त झाले तर ते तुमच्याबाबतीत कोणत्याही नातेसंबंधाचे किंवा कराराचे पालन करीत नाहीत? ते फक्त आपल्या तोंडच्या गोष्टींनी तुम्हाला खूश करू पाहतात, पण त्यांच्या मनामध्ये तुमच्याविषयी त्याउलट (भावना) आहेत. त्यांच्यापैकी अधिकांश लोक विश्वासघातकी आहेत. [9] त्यांनी अल्लाहच्या संदेशांना क्षुल्लक किमतीच्या मोबदल्यात विकून टाकले आहे. तसेच इतरांना त्यांनी अल्लाहच्या मार्गापासून प्रतिबंध केला. फारच वाईट आहे, जे ते करीत आहेत. [10] ते कोणत्याही श्रद्धावंतांच्या बाबतीत नातेसंबंधाचे किंवा कराराच्या बंधनाचे (मुळीच) पालन करीत नाहीत. हेच मर्यादांचे उल्लंघन करणारे लोक आहेत. [11] (हे सर्व झाल्यावरही) जर ते पश्चात्ताप व्यक्त करतील आणि (नमाज़रूपी) नित्य प्रार्थना करू लागतील व ज़कात (दान) देऊ लागतील, तर तेव्हा मात्र ते तुमचे धर्मबांधव आहेत. आम्ही (आमच्या) या संदेशांना स्पष्ट करून सांगत असतो, त्या लोकांसाठी जे बोध घेणारे आहेत.

[12] आणि प्रतिज्ञा घेतल्यानंतरही जर ते आपल्या शपथांचा भंग करतील आणि तुमच्या धर्माविषयी अपशब्दांचा प्रयोग करतील तर अशा श्रद्धाहीनांच्या या पुढाऱ्यांशी लढा. ते यासाठी की, त्यांनी त्यापासून परावृत्त व्हावे, कारण त्यांना त्यांच्या शपथांबद्दल अजिबात आस्था नाही. [13] तुम्ही अशा लोकांशी लढणार नाही का, ज्यांनी आपल्या करारांचा भंग केला आणि ज्यांनी पैगंबराला त्याच्या (मातृभूमीतून) घालवून लावण्याचा कट केला आणि त्यांनीच तुमच्याविरुद्ध युद्धाची सुरुवात केली. तुम्हाला त्यांचे भय वाटते का? तुम्ही जर खरोखर श्रद्धावंत असाल, तुम्हाला याची जाणीव असायला हवी की, अल्लाह या गोष्टीस सर्वाधिक पात्र आहे की, तुम्ही त्याचेच भय बाळगावे. [14] त्यांच्याशी युद्ध करा, अल्लाह त्यांना तुमच्या हातून शिक्षा करील आणि त्यांना अपमानित करील

आणि त्यांच्यावर विजय प्राप्त करण्यासाठी तुम्हाला साहाय्य करील आणि श्रद्धावंतांचे काळीज थंड करील. 15 तसेच त्यांच्या मनातून क्रोध काढून टाकील आणि अल्लाह त्याच्यावर आपली कृपादृष्टी टाकेल, ज्याच्याबाबतीत तो इच्छील. अल्लाह सर्व काही जाणणारा व बुद्धिमान आहे.

16 (श्रद्धावंतांनो!) तुम्ही असे समजून आहात का की, तुम्हाला असेच सोडून देण्यात येईल. कारण अल्लाहने अद्याप त्या लोकांना चिन्हांकित केलेच नाही, ज्यांनी (अल्लाहच्या कार्यासाठी) प्रयत्नांची पराकाष्ठा केली (म्हणजे जिहाद केला) आणि त्यांनी अल्लाह व त्याचा पैगंबर आणि श्रद्धावंत लोक यांच्याव्यतिरिक्त इतरांशी मित्रत्वाचे संबंध स्थापित केले नाही (म्हणजेच यांच्याव्यतिरिक्त कोणाकडूनही साहाय्य घेतले नाही). तुम्ही जे काही करीत आहात, ते सर्व अल्लाह जाणून आहे.

17 अनेकेश्वरवादी लोकांसाठी हे उचित नाही की, त्यांनी अल्लाहच्या मशीदींना (पुन्हा-पुन्हा) भेट द्यावी किंवा त्यांची देखभाल करावी.

पण (त्यांच्या बाबतीत वास्तविकता तर ही आहे की, आपल्या कृत्यांद्वारे) ते स्वत:विरुद्ध साक्षी आहेत की, ते सत्य नाकारणाऱ्यांपैकी आहेत. हे असे लोक आहेत, ज्यांची कर्मे निष्फळ ठरणार आहेत. आणि ते आगीत सदैव वास्तव्य करतील. 18 अल्लाहच्या उपासनास्थळांना (म्हणजे मशीदींना) त्यानेच भेट द्यायला पाहिजे आणि त्यांची देखभाल करायला पाहिजे जो अल्लाहवर आणि अंतिम दिवसावर विश्वास ठेवतो व नित्य प्रार्थना करतो आणि दानकार्य करतो, (ज़कात देतो) आणि दुसऱ्या कोणाचे नव्हे तर केवळ अल्लाहचेच भय बाळगतो. अशाच लोकांना सन्मार्ग लाभलेल्या लोकांमध्ये स्थान मिळू शकतो. 19 (मक्का येथे) हजसाठी येणाऱ्या लोकांना पाणी पाजणे व (काबा) या पवित्र मशीदीची देखभाल करणे (ही कामे) तुम्ही (श्रद्धावंतांच्या त्या कामासमान) समजता की काय, जो अल्लाहवर आणि अंतिम दिवसावर (दृढ) विश्वास ठेवतो आणि

अल्लाहच्या कार्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करतो. अल्लाहच्या नजरेत ते दोघे समान असू शकत नाहीत. आणि अल्लाह अन्यायी लोकांना (कधीही) सन्मार्ग दाखवीत नाही.
20 ज्या लोकांनी श्रद्धा धारण केली आणि (अल्लाहच्या कार्यासाठी) आपल्या घरादाराचा त्याग केला आणि आपले धन व प्राण पणाला लावून अल्लाहच्या कार्यात प्रयत्नांची पराकाष्ठा केली. अल्लाहच्या नजरेत त्यांचे स्थान (फार) मोठे आहे. आणि (शेवटी) हेच लोक (फार मोठे) यश प्राप्त करणारे आहेत.
21 त्यांचा पालनकर्ता त्यांना शुभवार्ता देतो आहे, (शुभवार्ता) त्याच्याकडून होणाऱ्या कृपेची आणि त्याच्या प्रसन्नतेची व (त्यांची वाट पाहत असलेल्या) नंदनवनांची ज्यांत सदैव सुखसमाधान असेल.
22 त्यात ते सदैव निवास करतील. खरोखर, अल्लाहकडेच (आपल्या भक्तांसाठी) फार मोठा मोबदला आहे.

23 इमान धारण केलेल्या लोकांनो! आपले वडील व भाऊ यांच्याशी मित्रत्वाचे संबंध स्थापित करू नका, जर त्यांना श्रद्धा अंगीकार करण्यापेक्षा, सत्य नाकारणे जास्त प्रिय आहे. आणि तुमच्यापैकी जे त्यांच्याशी मैत्री करतील तर निश्चितच असे लोक अत्याचारी आहेत.
24 (पैगंबर!) त्यांना (स्पष्ट) सांगून टाका, 'जर तुमचे वडील आणि तुमची मुले आणि तुमचे भाऊ आणि तुमचे जीवनसाथी (म्हणजे पती किंवा पत्नी) आणि तुमचे गोत्र व ते धन जे तुम्ही कमविले आहे आणि तो व्यापार ज्याच्या मंदीचे तुम्हाला भय वाटते आणि (ती) तुम्हाला प्रिय असलेली घरे (ज्यांत तुम्ही आनंद उपभोगता) हे सर्व जर तुम्हाला अल्लाह व त्याचा पैगंबर यांच्यापेक्षा आणि त्याच्या कार्यात प्रयत्नांची पराकाष्ठा करण्यापेक्षा (म्हणजे जिहाद करण्यापेक्षा) अधिक प्रिय असतील तर मग (आता) फक्त अल्लाह आपला निर्णय जाहीर करण्याची प्रतीक्षा करा आणि (लक्षात ठेवा) अल्लाह आज्ञा भंग करणाऱ्या (विद्रोही) लोकांना (कधीही) सन्मार्ग दाखवीत नाही.'

[25] खरोखर, अल्लाहने तुम्हाला अनेक प्रसंगी साहाय्य केलेले आहे. (जेव्हा तुम्ही संख्येच्या दृष्टीने फार कमी होते) आणि हुनैनच्या दिवशी देखील (त्यानेच तुमची मदत केली) जेव्हा तुमची संख्या अधिक असल्याचा तुम्हाला गर्व होता, पण ते (बहुसंख्य लोक) तुमच्या काही कामी आले नाही. आणि भूमी विशाल असूनदेखील तुमच्यासाठी (फार) आकुंचित झाली आणि तुम्ही माघार घेत पळ काढलात. [26] मग अल्लाहने आपल्याकडून आपल्या पैगंबरावर आणि श्रद्धावंतांवर (कृपेच्या स्वरूपात) मन:शांती अवतीर्ण केली आणि अशा सैन्याला (तुमच्या मदतीसाठी) पाठवले, जे तुम्ही पाहू शकत नव्हते. आणि अल्लाहने त्या सत्य नाकारण्यावर आग्रही असलेल्या श्रद्धाहीनांना शिक्षा केली. आणि श्रद्धाहीनांसाठी हाच मोबदला आहे. [27] पण त्यानंतरही अल्लाह इच्छील त्याच्याकडे, तो आपली कृपादृष्टी वळवू शकतो, (म्हणजे त्याला पश्चात्तापाची सद्बुद्धी देऊ शकतो). अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे. [28] श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! (हे जाणून घ्या की), अनेकेश्वरवादी (म्हणजे इतरांना अल्लाहच्या बरोबरीचे स्थान देणारे) लोक (आध्यात्मिक दृष्टीने पूर्णपणे) अपवित्र आहेत. आणि म्हणून या वर्षानंतर त्यांनी (मक्कास्थित काबा या) पवित्र मशीदीच्या निकट येऊ नये. आणि तुम्हाला जर गरिबीचे भय वाटत असेल तर अल्लाहने इच्छिल्यास तो आपल्या कृपेने तुम्हाला समृद्ध बनवून टाकेल, निश्चितच अल्लाह सर्व काही जाणणारा आहे, बुद्धिमान आहे.

[29] तर आधीच्या त्या ग्रंथधारकांशी लढा, जे ना अल्लाहवर श्रद्धा ठेवतात, ना अंतिम दिवसावर, तसेच अल्लाह व त्याच्या पैगंबराने ज्या गोष्टी निषिद्ध म्हणून जाहीर केल्या आहेत, त्यांना निषिद्ध मानत नाहीत आणि सत्य धर्माचे पालन करीत नाहीत (ज्याचे पालन करण्याचे अल्लाहने त्यांना आदेश दिले आहे). (त्यांच्याशी तोपर्यंत लढा) जोपर्यंत ते (तुमच्यासमोर) शरणागती पत्करून, स्वेच्छेने (तुमचे राजकीय वर्चस्व स्वीकारून) सरकारी कर (म्हणजे जिज़या)

देत नाहीत. 30 आणि ज्यू म्हणतात की, उजैर अल्लाहचा पुत्र आहे. तर ख्रिस्ती म्हणतात की, येशू अल्लाहचा पुत्र आहे. ते त्यांच्या तोंडचे, (काहीच आधार नसलेले) शब्द आहेत. हे (असे म्हणणारे लोक) यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या त्या सत्य नाकारणाऱ्या लोकांची केवळ नक्कल करीत आहेत. ‘अल्लाह त्यांना नष्ट करो!’ ते (वास्तवापासून) कसे दूर जात आहेत. 31 त्यांनी अल्लाहला सोडून आपल्या धर्मपंडितांना आणि संन्याशांना तसेच मरियमपुत्र येशू मसीहला आपला विधाता म्हणून मान्य केले आहे. त्यांना तर केवळ एका अल्लाहची उपासना करण्याचा आदेश देण्यात आला होता. त्याच्याशिवाय दुसरा कोणीच उपासनेयोग्य नाही (जे लोक) इतरांना अल्लाहचे समकक्ष ठरवितात त्यांच्या या कृत्याशी त्याचा काहीच संबंध नाही. (तो त्यापासून पूर्णपणे पवित्र आहे).

32 ते (तर) अल्लाहच्या (सन्मार्ग दाखवणाऱ्या) प्रकाशज्योतीला आपल्या तोंडच्या फुंकरेने विझवून टाकू इच्छितात, (पण अल्लाह असे कधीही होऊ देणार नाही), तो तर आपल्या प्रकाशज्योतीला परिपूर्ण रीतीने (सर्वत्र) पसरविल्याशिवाय राहणार नाही, मग सत्य नाकारणाऱ्यांना (अल्लाहची प्रकाश–ज्योत सर्वत्र पसरत असल्याबद्दल) कितीका वाईट वाटेना. 33 त्यानेच तर आपल्या पैगंबराला मार्गदर्शन आणि सत्य धर्म देऊन पाठवले, ते यासाठी की, सत्य (व सुरक्षित) धर्मालाच (वैचारिक दृष्ट्या नेहमी) इतर सर्व धर्मांवर वर्चस्व प्राप्त व्हावे, मग (त्याबद्दल) अनेकेश्वरवाद्यांना कितीका वाईट वाटेना.

34 इमान धारण केलेल्या लोकांनो! (आधीच्या ग्रंथधारकांमध्ये) असे अनेक धर्मपंडित व साधू आहेत, जे लोकांची धनसंपत्ती अनुचित मार्गाने गिळंकृत करीत असतात आणि लोकांना अल्लाहच्या मार्गापासून दूर करीत असतात. आणि जे लोक सोने व चांदीचा साठा करून ठेवतात आणि ते अल्लाहच्या कार्यासाठी खर्च करीत नाहीत. त्यांना (मृत्यूनंतर येणाऱ्या जीवनात) भयावह शिक्षेची वार्ता ऐकवा. 35 त्या दिवशी जेव्हा (त्यांच्या साठवून ठेवलेल्या

संपत्तीला) नरकाच्या आगीत तापवले जाईल आणि त्याद्वारे त्यांचे कपाळ त्यांच्या बाजू आणि त्यांच्या पाठी डागल्या जातील. (आणि त्या अपराध्यांना सांगितले जाईल) 'हाच तो तुमचा खजिना आहे, जो तुम्ही स्वत:साठी साठवून ठेवला होता. तर (आता) चाखा त्याचा स्वाद, जे तुम्ही साठवून ठेवत होता.'

36 ज्या दिवशी अल्लाहने आकाश व पृथ्वीला निर्माण केले, त्या दिवसापासून त्याने आपल्या ग्रंथात महिन्यांची संख्या 'बारा' निश्चित करून टाकली आहे. आणि यांपैकी चार महिने पवित्र आहेत. आणि (अल्लाहचा आदेशच) आहे — 'सत्य धर्म'. या (चार महिन्यांत) तुम्ही स्वत:वर अत्याचार करू नका. आणि (श्रद्धावंतांनो!) अनेकेश्वरवादी लोकांशी एकत्र मिळून लढा, जसे ते एकत्र मिळून तुमच्याशी लढतात. आणि लक्षात ठेवा अल्लाह त्या लोकांबरोबर आहे ज्यांना त्याच्या (उपस्थितीची नेहमी) जाण असते. 37 (पवित्र महिन्यांना) पुढे ढकलण्याचे कृत्य, सत्य स्वीकारण्यास नकार देण्याचेच एक कृत्य आहे. याद्वारे सत्य नाकारण्यावर आग्रही असलेले लोक सन्मार्गापासून (आणखी) दूर जातात. ते एखाद्या वर्षी त्या महिन्यांना वैध ठरवितात आणि दुसऱ्या वर्षी अवैध ठरवितात. ते यासाठी की, अल्लाहने पवित्र ठरविलेल्या (महिन्यांची) संख्या (वरवर) पूर्ण करून, त्याने जे अवैध ठरविलेले आहे, त्यांना वैध ठरवावे (असा त्यांचा उद्देश असतो). त्यांची पापकृत्ये त्यांना सत्कृत्ये दिसू लागतात. आणि अल्लाह सत्य स्वीकारण्यास नकार देणाऱ्या लोकांना सन्मार्ग दाखवत नाही.

38 श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! तुम्हाला काय झाले आहे की, जेव्हा तुम्हाला सांगण्यात येते की, अल्लाहच्या कार्यासाठी बाहेर पडा. तेव्हा (तुमचा असा प्रतिसाद असतो की), तुम्ही जमिनीशी खिळून बसता. तुम्ही मृत्यूनंतरच्या (अमर्याद जीवना)पेक्षा या जगातील (क्षणभंगुर) जीवनालाच प्राधान्य देत आहात की काय? पण (वास्तविकता ही आहे की), मृत्यूनंतरच्या जीवनाच्या तुलनेत या जगाच्या जीवनातील लाभ फारच क्षुल्लक आहे. 39 जर तुम्ही (अल्लाहच्या

कार्यासाठी) पुढे आला नाहीत तर तो तुम्हाला यातनामयी शिक्षा करेल आणि तुमच्या जागी इतर लोकांना (त्या कार्यासाठी) पुढे आणेल. आणि तुम्ही अल्लाहला काहीही नुकसान पोचवू शकत नाही. आणि अल्लाहला प्रत्येक गोष्टीवर पूर्ण सामर्थ्य प्राप्त आहे. 40 जर तुम्ही पैगंबराला मदत करणार नसाल तर (लक्षात असू द्या, अल्लाह स्वत: त्याची मदत करेल जसे) त्याने त्याची तेव्हा मदत केलेली आहे, जेव्हा सत्य नाकारण्यावर आग्रही असलेल्या त्या श्रद्धाहीन लोकांनी त्याला (मक्केतून) बाहेर घालवून दिले होते. आणि (त्यावेळेस) तो फक्त दोनपैकी दुसरा होता. जेव्हा ते दोघे (त्या) गुहेत होते; तेव्हा (पैगंबर) आपल्या साथीदाराशी म्हणत होता. काळजी करू नकोस, कारण अल्लाह आपल्याबरोबर आहे. तेव्हा अल्लाहने त्याच्याकडे आपल्याकडून मन:शांती अवतीर्ण केली. आणि असे सैन्य पाठवून त्याला साहाय्य प्रदान केले, जे तुम्हाला दिसत नव्हते. आणि सत्य नाकारण्यावर आग्रही असलेल्या त्या श्रद्धाहीनांचा शब्द खाली पडला (म्हणजे त्यांचे मनसुबे फोल ठरले), कारण अल्लाहचेच शब्द सर्वोच्च आहेत. आणि अल्लाह सामर्थ्यशाली आहे, बुद्धिमान आहे.

41 (अल्लाहच्या मार्गात लढण्यासाठी) निघा, मग (तुमच्यासाठी) ते सोपे असेल किंवा अवघड असेल, आणि आपले धन आणि प्राण यांसह अल्लाहच्या मार्गात प्रयत्नांची पराकाष्ठा करा. जर तुम्हाला ते कळल्यास, (असे करणे) तुमच्यासाठी फार चांगले आहे. 42 जर लाभ ताबडतोब होणार असता आणि प्रवासही अल्पकालीन असता तर ते अवश्य तुमच्या बरोबर आले असते. पण (पैगंबर!) तो प्रवास त्यांना फारच लांब पल्ल्याचा (व खडतर) वाटत होता. आता ते अल्लाहची शपथ घेऊन सांगतील, ‘आम्हाला जर शक्य असते, तर आम्ही अवश्य तुमच्याबरोबर निघालो असतो.’ (आणि ते खोट्या शपथा घेऊन) स्वत:लाच केवळ विनाशात लोटत आहेत. आणि ते खरोखर खोटारडे आहेत, हे अल्लाहला (चांगले) ठाऊक आहे.

43 (पैगंबर!) अल्लाह तुम्हाला क्षमा करो! तुम्ही त्यांना (मागे राहण्याची) परवानगी का बरे दिली? (तुम्ही त्यांना परवानगी दिली नसती तर) तुमच्यासमोर या गोष्टीचा उलगडा झाला असता की, कोण-कोण सत्यवादी आहेत आणि खोटे बोलणारे कोण-कोण आहेत, त्यांचीही तुम्हाला (अवश्य) ओळख पटली असती. 44 जे लोक अल्लाहवर आणि अंतिम दिवसावर (खऱ्या अर्थाने) विश्वास ठेवतात, ते आपले धन व प्राण यासह अल्लाहच्या मार्गात प्रयत्नांची पराकाष्ठा (म्हणजे जिहाद) करण्यापासून आपल्याला (वगळावे), अशी तुम्हाला कधीही विनंती करणार नाहीत. अल्लाह त्या लोकांना चांगले जाणून आहे, जे त्याच्या उपस्थितीची (नेहमी) जाणीव बाळगतात. 45 आपल्याला यातून वगळावे अशी तुम्हाला विनंती केवळ तेच लोक करतात, जे अल्लाहवर व अंतिम दिवसावर (खऱ्या अर्थाने) विश्वास ठेवणारे नाहीत आणि त्यांची मने संशयग्रस्त झालेली आहेत आणि आपल्या संशयामुळे त्यांची अवस्था डळमळीत झालेली आहे. 46 आणि जर त्यांची (खरोखर) (तुमच्याबरोबर) निघण्याची इच्छा असती तर त्यांनी त्यासाठी काहीतरी तयारी निश्चित केली असती. पण अल्लाहला त्यांचे निघणे पसंत नव्हते, म्हणून त्यानेच त्यांना मागे ठेवले. आणि (त्यांना) असे सांगितले गेले की, (आपल्या घरी) बसून राहा, घरी राहणाऱ्यांसोबत.

47 जर ते (ढोंगी लोक) तुमच्याबरोबर निघाले असते तर (हे श्रद्धावंतांनो!) त्यांनी तुमच्या त्रासात भर घालण्याशिवाय दुसरे काही केले नसते. आणि त्यांनी तुमच्यामध्ये (आपसात) फाटाफूट निर्माण करण्याच्या हेतूने (भरपूर) धावपळ केली असती. तुमच्यामध्ये असेही (काही) लोक आहेत, जे त्यांचे म्हणणे ऐकण्यात रस घेतात. आणि अल्लाह दुराचारी लोकांना चांगले ओळखून आहे.
48 (पैगंबर!) त्यांनी पूर्वीदेखील फाटाफूट निर्माण करण्याचे प्रयत्न केलेले आहेत. आणि तुमच्याविरुद्ध ते तोपर्यंत कट-कारस्थाने करीत राहिले, येथपावेतो की, सत्य प्रकट झाले, आणि अल्लाहची इच्छा प्रबळ ठरली, खरे पाहता असे

घडणे त्यांना अप्रियच होते.

49 आणि त्यांच्यामध्ये काही असेही आहेत, जे म्हणतात, 'आम्हाला (घरी थांबण्याची) परवानगी देऊन टाका, आणि आम्हाला कठीण परीक्षेत लोटू नका.' (पण सत्य वस्तुस्थिती ही आहे की), (अशी विनंती करून) त्यांनी (स्वत:ला) आधीच परीक्षेत लोटले आहे. निश्चितच नरकाने सत्य स्वीकारण्यास नकार देणाऱ्या (लोकांना) वेढून ठेवले आहे. 50 (पैगंबर!) तुमचे काही भले होत असल्याचे (पाहून) त्यांना दु:ख होते. पण जर तुमच्या बाबतीत एखादी दु:खद घटना घडल्यास, ते म्हणतात, '(बरे झाले!) आम्ही आधीपासूनच सावधगिरी बाळगली होती.' आणि ते आनंद व्यक्त करीत निघून जातात. 51 (त्यांना) सांगा, अल्लाहने आमच्याबाबतीत जे (घडणे) निश्चित करून ठेवलेले आहे, त्याव्यतिरिक्त आमच्याबाबतीत काहीही घडू शकत नाही. तोच आमचा (एकमेव) मालक आहे, (तारणहार आहे). आणि श्रद्धावंतांनी अल्लाहवरच विश्वास ठेवायला पाहिजे. 52 (त्यांना) सांगा, 'तुम्ही आमच्या बाबतीत काहीतरी (वाईट) घडण्याची प्रतीक्षा करीत आहात, पण आमच्याबाबतीत जी गोष्ट घडेल ती दोन चांगल्या गोष्टींपैकी एक चांगली गोष्ट (निश्चितपणे) असेल. (पहिली गोष्ट म्हणजे या जगात विजय किंवा दुसरी गोष्ट म्हणजे मृत्यूनंतरच्या जगात स्वर्गप्राप्ती याव्यतिरिक्त दुसरे काही घडणार नाही) पण आम्ही मात्र तुमच्याबाबतीत अशी प्रतीक्षा करीत आहोत की, अल्लाह एकतर स्वत: होऊन किंवा आमच्या हातून तुम्हाला शिक्षा करील. तर मग तुम्ही प्रतीक्षा करा, आम्ही देखील तुमच्या बरोबर प्रतीक्षा करीत आहोत.'

53 (त्यांना) सांगा, 'तुम्ही (आपले धन) स्वेच्छेने खर्च करा किंवा अनिच्छेने, तुम्ही जे काही खर्च कराल, ते अल्लाहकडून अजिबात स्वीकारले जाणार नाही. कारण तुम्ही आज्ञा भंग करणारे लोक आहात.' 54 केवळ यासाठी त्यांचे योगदान  स्वीकारार्ह नाही, कारण त्यांनी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराला

मानण्यास नकार दिला. आणि नमाज़ाकरिता जाणे त्यांच्या फार जिवावर येते, आणि अगदी तसेच ते कोणतेही दानकार्य करीत नाहीत, केलेच तर फार नाखुशीने करतात. 55 तुम्ही त्यांची (अवाढव्य) संपत्ती आणि त्यांची संतती पाहून प्रभावित होऊ नका, (म्हणजे त्यास अजिबात महत्त्व देऊ नका). अल्लाहची इच्छा तर अशी आहे की, याद्वारे त्यांना या जगातील जीवनातच शिक्षा करावी, आणि त्यांचे प्राण अशा अवस्थेत निघावेत की, ते सत्य नाकारत असतील. 56 आणि ते अल्लाहची शपथ घेऊन सांगतात की, ते तुमच्याप्रमाणेच श्रद्धा ठेवणारे आहेत. पण वस्तुत: ते तुमच्याप्रमाणे श्रद्धा ठेवणारे नाहीत. (वस्तुस्थिती ही आहे की), ते असे लोक आहेत, जे अतिशय भ्याड आहेत.

57 जर त्यांना एखादे आश्रयस्थान किंवा गुहा किंवा (दुसरे) कोणतेही लपण्याचे ठिकाण मिळाले, तरी ते (तिथे जाऊन लपण्यासाठी) वेड्यासारखे धावत सुटतील.

58 (पैगंबर!) त्यांच्यामध्ये काही असेही लोक आहेत, जे दान वाटपाच्या संदर्भात तुमच्यावरही ठपका ठेवतात, (म्हणजे तुम्ही न्यायोचित वाटप केले नाही, असे त्यांचे म्हणणे असते). जर त्यांना त्यामधील काही भाग देण्यात आला तर मात्र ते संतुष्ट होतात. पण त्यांना त्यातून काहीच दिले गेले नाही तर ते लगेच असंतुष्ट होतात. 59 अल्लाह आणि त्याच्या पैगंबराने त्यांना जे काही दिले, त्यावर ते संतुष्ट झाले असते, तर किती बरे झाले असते. व म्हणाले असते की, अल्लाह आमच्यासाठी पर्याप्त आहे, अल्लाह आम्हाला आपल्या कृपेने (जे काही इच्छील) ते आम्हाला देईल, तसेच आपल्या पैगंबराला देखील (आम्हाला द्यायला लावेल). आम्ही आशा (आणि अपेक्षेसह) फक्त अल्लाहकडेच वळतो आहोत (आम्हाला तर त्याची प्रसन्नता हवी आहे) 60 दान (ज़कातीची रक्कम) फक्त गरीब व गरजू यांना देण्यासाठी आहे, तसेच जे लोक (ज़कातीची रक्कम) गोळा करण्यासाठी नियुक्त केलेले आहेत त्यांच्यासाठी, व ज्यांच्या मनात

(सत्य धर्माविषयी) सलोख्याची भावना निर्माण करावयाची आहे अशा लोकांसाठी, आणि गुलामांना मुक्त करण्यासाठी, व कर्जात बुडालेल्या लोकांच्या मदतीसाठी, आणि अल्लाहच्या कार्यात होणाऱ्या (प्रत्येक प्रयासासाठी) आणि गरजू वाटसरूंसाठी (यांपैकी कोणावरही ज़कातीची रक्कम खर्च केली जाऊ शकते). हा अल्लाहकडून आदेश आहे. आणि अल्लाह सर्व काही जाणणारा आहे, बुद्धिमान आहे.

61 आणि (सत्याच्या विरोधकांमध्ये) असेही लोक आहेत, जे आपल्या शब्दांनी पैगंबरास दुःख देतात, म्हणतात, ‘हा माणूस असा आहे, जो प्रत्येकाचे फार लक्ष देऊन ऐकतो’ त्यांना सांगा, ‘तो तुमच्या भल्यासाठी प्रत्येकाचे फार लक्ष देऊन ऐकतो.’ तो अल्लाहवर श्रद्धा ठेवतो आणि श्रद्धावंतांच्या (गोष्टींवर) विश्वास ठेवतो, आणि तुमच्यापैकी जे (खरे) श्रद्धावंत आहेत त्यांच्यासाठी ‘तो’ (पैगंबर) म्हणजे (अल्लाहकडून प्रदान केलेली) कृपा आहे.

आणि जे लोक अल्लाहच्या पैगंबराला त्रास देतात, त्यांच्यासाठी (मृत्यूनंतरच्या जीवनात) भयावह शिक्षा आहे. 62 ते (ढोंगी लोक) तुम्हाला खूष करण्यासाठी अल्लाहच्या नावाने शपथा घेऊन सांगतात (की तेही इतरांप्रमाणे श्रद्धा बाळगणारे आहेत). पण (श्रद्धावंतांनो!) अल्लाह आणि त्याचा पैगंबर यासाठी सर्वाधिक पात्र आहेत की, त्यांनी (अल्लाह व त्याच्या पैगंबरास) प्रसन्न करावे, जर ते खरोखर श्रद्धा ठेवणारे असतील. 63 ते हे जाणत नाहीत का की, जो कोणी अल्लाहचा व त्याच्या पैगंबराचा विरोध करतो, त्याच्यासाठी नरकाची आग आहे, ज्यात तो कायम वास्तव्य करेल, ही भयंकर मोठी अवहेलना आहे.

64 दांभिकां(पैकी काही लोकांना) असे भय वाटत आहे की, (कुराणात) त्यांचे आंतरिक सत्य (त्यांचा अस्सल चेहरा) उघड करणारा एखादा अध्याय अवतीर्ण होईल की काय? (त्यांना) सांगा, ‘तुम्ही थट्टा करीत राहा, अल्लाह ती गोष्ट निश्चितच प्रकट करील जिचे तुम्हाला भय वाटत आहे.’ 65 आणि जर तुम्ही त्यांना विचाराल तर ते अवश्य असे उत्तर देतील, ‘आम्ही तर केवळ

गप्पागोष्टी व थट्टा करीत होतो.' (त्यांना) सांगा, 'तुम्ही अल्लाह व त्याचे संदेश आणि त्याचा पैगंबर यांच्याविषयी थट्टामस्करी करीत होता का? 66 (आता) सबब सांगू नका, तुम्ही सत्याचा स्वीकार केल्यानंतरही (आपल्या कृतीने) सत्याला नाकारले आहे.' जरी आम्ही तुमच्यातील एका गटाला क्षमा केली, तरी दुसऱ्या गटाला मात्र आम्ही अवश्य शिक्षा करू; कारण ते अपराधी लोक आहेत.

67 दांभिक पुरुष आणि दांभिक स्त्रिया सर्व अगदी सारखे आहेत; ते वाईट कृत्य करण्याचा आदेश देतात आणि चांगले कृत्य करण्यापासून रोखतात आणि (अल्लाहच्या कार्यासाठी खर्च करण्याची जेव्हा त्यांच्यासमोर संधी येते), तेव्हा ते कंजूषपणा दाखवतात. त्यांनी अल्लाहकडे दुर्लक्ष केलेले आहे, (आणि) म्हणून अल्लाहनेही त्यांच्याकडे दुर्लक्ष केले आहे. खरोखर (हे) दांभिक लोक फार मोठे अवज्ञाकारी आहेत. 68 अल्लाहने दांभिक पुरुष व दांभिक स्त्रिया आणि सत्य नाकारण्यावर आग्रही असलेले लोक, यांना नरकाच्या आगीचे वचन दिले आहे, ज्यात ते कायमस्वरूपी निवास करतील, ही त्यांच्यासाठी पुरेशी (शिक्षा) आहे. आणि अल्लाहने त्यांचा धिक्कार केला आहे आणि त्यांना शाश्वत स्वरूपी शिक्षा मिळणार आहे. 69 (त्यांना सांगून टाका की), तुम्ही अगदी त्याप्रमाणेच (दांभिक आहात) ज्याप्रमाणे तुमच्या पूर्वीचे लोक (दांभिक) होते, ते तुमच्यापेक्षा अधिक सामर्थ्यशाली आणि संपत्ती व संततीच्या दृष्टीने तुमच्यापेक्षा अधिक समृद्ध होते. या जीवनात त्यांच्यासाठी जो वाटा (निश्चित) होता, तो त्यांनी उपभोगला आणि तुम्हीदेखील अगदी त्याचप्रमाणे तुमच्यासाठी (निश्चित) असलेला वाटा उपभोगत आहात, ज्याप्रमाणे तुमच्या पूर्वीच्या लोकांनी उपभोगला होता, तुम्ही व्यर्थ गोष्टी त्याचप्रमाणे करीत आहात ज्याप्रमाणे ते (तुमच्या पूर्वीचे दांभिक लोक) व्यर्थ गोष्टी करीत असत. हेच ते लोक होत, ज्यांनी केले सवरलेले (सर्व शेवटी) वाया गेले, या जगात व मृत्यूनंतरच्या जगातही. आणि

हेच लोक नाश पावणारे आहेत. [70] या (दांभिक व सत्य नाकारणाऱ्या लोकांनी) त्यांची कहाणी कधी ऐकली नाही का, जे त्यांच्यापूर्वी होऊन गेले? (जसे) नूहच्या लोकांची (कहाणी) आणि आद व समूद या जमातींची व इब्राहीमच्या लोकांची व मदियनच्या जनसमूहाची आणि उलथवून टाकलेल्या वस्त्यांची. त्या सर्वांकडे त्यांचे पैगंबर सत्याचे स्पष्ट प्रमाण घेऊन आले होते. (पण त्या सर्वांनी पैगंबरांना नाकारले) अल्लाह तर त्यांच्यावर अन्याय करणारा नव्हता, पण त्यांनीच स्वत:वर अन्याय केला.

[71] आणि (जिथपर्यंत श्रद्धावंतांचा संबंध आहे), श्रद्धावंत पुरुष व स्त्रिया हे एकमेकांचे मित्र (व साहाय्यक) आहेत, ते (एकमेकाला) चांगले कृत्य करण्यास प्रेरित करतात आणि वाईट कृत्य करण्यापासून रोखतात, तसेच ते (नित्य) प्रार्थना करतात (नमाज़ पढतात) व दान (ज़कात) देतात. आणि अल्लाह व त्याच्या पैगंबराच्या आज्ञेचे पालन करतात. हेच लोक (यासाठी पात्र) आहेत की, त्यांच्यावर अल्लाहकडून कृपावर्षाव केला जाईल, खरोखर अल्लाह सामर्थ्यशाली आहे, बुद्धिमान आहे. [72] श्रद्धावंत पुरुष आणि श्रद्धावंत स्त्रिया यांच्याशी अल्लाहने बागांचा वायदा केलेला आहे. ज्यांत पाण्याचे (मन प्रसन्न करणारे) प्रवाह वाहत असतील, त्यांत ते कायम निवास करतील. तसेच त्यांच्यासाठी वायदा आहे की, त्यांना अनंतकालीन स्वर्गामध्ये सुंदर घरे राहण्यासाठी उपलब्ध केले जातील. आणि तिथे त्यांना सर्वात मोठी गोष्ट लाभेल, ती म्हणजे अल्लाहची प्रसन्नता होय. आणि हेच आहे सर्वोत्तम यश!

[73] पैगंबर! सत्य नाकारणारे व दांभिक लोक यांच्याविरुद्ध लढा आणि त्यांच्याशी कठोरतापूर्वक व्यवहार करा. आणि (जर त्यांनी मरण्यापूर्वी पश्चात्ताप केला नाही तर) त्यांचे निवासस्थान नरक हेच आहे, (खरोखर) किती वाईट आहे ते ठिकाण! [74] (ते दांभिक लोक) अल्लाहची शपथ घेऊन सांगतात की, त्यांनी काहीही (चूक) म्हटलेले नाही. पण (वस्तुस्थिती याच्या विपरीत आहे).

(सत्यधर्म) इस्लामचा अंगीकार केल्यानंतरही, सत्य नाकारण्याची भाषा वापरून ते अश्रद्ध बनले. ते अशा गोष्टीचा बेत करीत होते, ज्याला अमलात आणणे त्यांच्यासाठी शक्य नव्हते. ते अल्लाहच्या बाबतीत केवळ द्वेषभावनायुक्त प्रतिसाद देत होते, ज्याने त्यांना आपल्या कृपेने समृद्ध केले होते आणि पैगंबराच्या बाबतीतही त्यांचे असेच होते. आणि जर ते (आपल्या दुष्कृत्यांबद्दल) पश्चात्ताप करतील तर ते त्यांच्या हिताचे असेल. पण जर त्यांनी पाठ फिरवली तर अल्लाह त्यांना या जगात आणि मृत्यूनंतरच्या जगातही दु:खदायक शिक्षा करील. आणि या भूतलावर त्यांचा कोणीही समर्थक किंवा साहाय्यकर्ता असणार नाही.

75 आणि त्यांच्यामध्ये काही जण असेही आहेत, ज्यांनी अल्लाहशी प्रतिज्ञा केली होती, (व म्हटले होते की), जर त्याने आपल्या कृपेने आम्हाला (काही) दिले तर निश्चितच आम्ही दानधर्म करू — आणि सदाचारी बनून राहू. 76 पण जेव्हा अल्लाहने आपल्या कृपेने त्यांना दिले, तेव्हा ते कंजूष बनले आणि (त्यांनी केलेल्या प्रतिज्ञेशी) ते विमुख झाले. 77 म्हणून अल्लाहने त्यांच्या मनामध्ये ढोंगीपणेला घर करू दिले, (आणि हा ढोंगीपणा त्यांच्या मनात तोपर्यंत घर करून राहील), जोपर्यंत त्यांना त्या दिवशी त्याच्यासमोर आणण्यात येईल. हे यासाठी की, त्यांनी अल्लाहला दिलेल्या वचनांचा भंग केला, आणि ते खोटे बोलणारे लोक होते. 78 त्यांना हे माहीत नाही का की, अल्लाह त्यांची (सर्व) रहस्ये आणि त्यांच्या (सर्व) गुप्त वार्ता जाणतो. आणि अल्लाह (मानवासाठी अदृश्य असलेल्या) सर्व गोष्टींना जाणतो. 79 (दांभिक लोक) त्या श्रद्धावंतांची खिल्ली उडवितात, जे (अल्लाहची मर्जी संपादन करण्यासाठी) मोठ्या मनाने भरपूर दानकार्य करतात, आणि त्यांची थट्टा करतात, जे केवळ आपल्या परिश्रमाने मिळवलेल्या कमाईतून दानकार्य करतात. अल्लाह त्यांच्या थट्टेला त्यांच्यावरच उलटवील आणि त्यांच्यासाठी दु:खदायक शिक्षा (निश्चित) आहे. 80 (पैगंबर!) तुम्ही त्यांच्यासाठी क्षमेची याचना करा किंवा करू नका (अगदी) सारखे आहे.

तुम्ही त्यांच्यासाठी सत्तर वेळा जरी क्षमेची याचना केली, तरी अल्लाह त्यांना (अजिबात) माफ करणार नाही. हे अशासाठी की, ते अल्लाह आणि त्याच्या पैगंबराला नाकारण्यावर आग्रही आहेत. अल्लाह अवज्ञा करणाऱ्या लोकांना कधीही सन्मार्ग दाखवीत नाही.

81 अल्लाहचा पैगंबर (आपल्या साथीदारांसोबत अल्लाहच्या मार्गात लढण्यासाठी रवाना झाल्यानंतर), जे (दांभिक लोक) घरीच बसून राहिले, ते (त्याबद्दल) फार आनंदी झाले (की ते पैगंबरासोबत न जाता युद्धापासून सुरक्षित राहू शकले). त्या गोष्टीची त्यांना (फार) चीड आली की, त्यांनी आपले धन आणि प्राण यांसह अल्लाहच्या कार्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करावी (म्हणजे जिहाद करावा). आणि त्यांनी (इतरांनाही) सांगितले होते. या (भयंकर) उन्हाळ्यात (युद्धासाठी) जाऊ नका. (पैगंबर!) (त्यांना) सांगा, ‘नरकाची उष्णता याहूनही कितीतरी भयंकर आहे.’ कदाचित त्यांना हे सत्य उमजले असते! 82 त्यांना थोडे हसू द्या, कारण ते आपल्या कमाईच्या मोबदल्यात खूप–(खूप) रडणार आहेत. 83 (पैगंबर!) (यापुढे) जर (कधी) अल्लाहने (पुन्हा) तुम्हाला आणि त्यांच्यापैकी काहींना समोरासमोर आणले आणि तेव्हा त्यांनी जर तुमच्यासोबत येण्याची परवानगी मागितली, तर (तुम्ही त्यांना) सांगून टाका, आता तुम्ही कधीही माझ्याबरोबर निघू शकत नाही आणि माझ्यासोबत राहून शत्रूशी कधीही तुम्ही लढणार नाही. आधीदेखील तुम्हाला (घरी) बसून राहणेच प्रिय होते, तर आताही मागे राहणाऱ्यांबरोबर बसून राहा. 84 आणि त्यांच्यापैकी जो कोणी मरण पावेल, त्याच्यासाठी तुम्ही अंत्यसंस्काराची प्रार्थना कधीही करू नका, ना कधी त्याच्या कबरीजवळ उभे राहा. कारण त्यांनी अल्लाहला आणि त्याच्या पैगंबराला नाकारले. आणि विद्रोही अवस्थेत मृत्यूला सामोरे गेले.

85 आणि त्यांची (विपुल) संपत्ती आणि संतती पाहून तुम्ही आश्चर्यचकित होण्याचे कारण नाही, अल्लाह तर केवळ हे इच्छितो की, यांद्वारे त्यांना या जगात

शिक्षा करावी, आणि त्यांचे प्राण अशा अवस्थेत निघावेत की, ते सत्य नाकारत आहेत. 86 आणि जेव्हा (कुराणात) एखादे प्रकरण प्रकट केले जाते, (ज्यात म्हटलेले असते की), अल्लाहवर श्रद्धा ठेवणारे बना, आणि त्याच्या पैगंबराबरोबर (अल्लाहच्या कार्यात) प्रयत्नांची पराकाष्ठा करा, तेव्हा त्यांच्यामधील संपन्न लोक तुमच्याकडे परवानगी मागू लागतात, म्हणतात, 'आम्हाला येथेच त्यांच्यासोबत थांबण्याची परवानगी द्या, जे घरीच थांबणारे आहेत.' 87 त्यांनी मागे राहिलेल्या स्त्रियांबरोबर राहण्यालाच प्राधान्य दिले, त्यांच्या मनाची दारे (अल्लाहचा संदेश ग्रहण करण्यासाठी) बंद झालेली आहेत, म्हणून (आता) ते सत्याचा संदेश ग्रहण करू शकणार नाहीत. 88 पण पैगंबर आणि ते लोक, ज्यांनी पैगंबराबरोबर अल्लाहवर (दृढ) विश्वास ठेवला (आणि) त्यांनी आपले धन व प्राण यासह (अल्लाहच्या कार्यात) प्रयत्नांची पराकाष्ठा केली. (मृत्यूनंतरच्या जीवनात) सर्व प्रकारच्या चांगल्या गोष्टी त्यांनाच प्राप्त होतील आणि खरोखर हेच लोक यश प्राप्त करणारे आहेत. 89 त्यांच्यासाठी अल्लाहने अशा बागा तयार ठेवलेल्या आहेत ज्यांच्यामधून पाण्याचे (मन प्रसन्न करणारे) प्रवाह वाहत असतील. त्यांत ते कायम निवास करतील. हेच आहे सर्वात मोठे यश!

90 आणि (पैगंबराकडे) वाळवंटी भागात (राहणाऱ्या) अरब लोकांपैकी काही, सबबी घेऊन आले, म्हणजे त्यांना (युद्धात सामील होण्यापासून) सूट मिळावी असा त्यांचा हेतू आणि जे अल्लाह आणि त्याच्या पैगंबराशी खोटे बोलले होते, ते घरी बसून राहिले. (आणि) त्यांच्यापैकी जे सत्य नाकारण्यावर आग्रही राहिले. त्यांना (लवकरच) दु:खदायक शिक्षेला तोंड द्यावे लागेल. 91 पण जे दुर्बल आहेत, आजारी आहेत आणि ज्यांच्याकडे खर्च करण्यासाठी काहीही नाही, त्यांच्यावर कोणताही दोष येणार नाही, पण ते अल्लाह आणि त्याचा पैगंबर यांच्याविषयी प्रामाणिक असतात, तसेच चांगले कृत्ये करणाऱ्यांवरही कसलाही दोष असणार नाही. अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे. 92 (पैगंबर!)

त्यांच्यावरही कसलाही दोष असणार नाही, जे तुमच्याकडे येऊन, सवारीसाठी (एखादा घोडा त्यांना मिळावा म्हणून) विनंती करीत होते, आणि जेव्हा तुम्ही त्यांना म्हणाले होते, 'तुम्हाला ज्यावर मी बसवून द्यावे, असे माझ्याकडे काही नाही', तेव्हा ते अशा अवस्थेत परत गेले की, त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहत होते, कारण त्यांना या गोष्टीचे दु:ख होत होते की, (अल्लाहच्या कार्यात) योगदान देण्यासाठी त्यांच्याकडे कोणतेही साधन नाही. 93 (अल्लाहच्या कार्यात सामील न झाल्याबद्दलचा) दोष तर केवळ त्या लोकांवरच असणार आहे, जे श्रीमंत असूनही (घरी) राहण्याची परवानगी तुम्हाला मागतात. ते यावर संतुष्ट झालेले आहेत की, मागे राहणाऱ्या स्त्रियांबरोबर मागे राहावे. अल्लाहने त्यांच्या मनाची दारे बंद करून टाकली आहेत, (ते काय करीत आहेत हे) त्यांना समजत नाही.

94 (आणि) जेव्हा तुम्ही (मोहिमेवरून) परतून त्यांच्याकडे याल, (तेव्हाही) ते सबबी सांगत असतील (म्हणजे त्यांना त्यांच्या कृत्याचा पश्चात्ताप झालेला नसेल). (त्यांना) सांगा, 'पोकळ सबबी सांगू नका, कारण आम्ही (आता) तुमच्यावर विश्वास करणार नाही.' अल्लाहने आधीच आम्हाला तुमच्या अवस्थेची माहिती दिली आहे, आणि आता अल्लाह तुमच्या आचरणावर लक्ष ठेवणार आहे, तसेच त्याचा पैगंबरही. मग शेवटी तुम्हाला त्याच्याकडे परत आणण्यात येईल, ज्याला दृश्य आणि अदृश्य (दोन्ही गोष्टींचे) पूर्ण ज्ञान आहे आणि तो तुम्हाला ते सर्व काही सांगून टाकेल, जे तुम्ही करीत असत. 95 जेव्हा तुम्ही परत आलेले असाल तेव्हा ते तुमच्यासमोर अल्लाहच्या (नावाच्या) शपथा घेऊ लागतील, (या हेतूने की), तुम्ही त्यांना सोडून द्यावे. तर तुम्ही त्यांना सोडून द्या, निश्चितच ते (फार) अपवित्र लोक आहेत. आणि आपल्या (कर्मरूपी) कमाईच्या मोबदल्यात, नरक हेच त्यांचे निवासस्थान होय. 96 ते तुमच्यासमोर शपथा घेतील (या हेतूने की), तुम्ही त्यांच्यावर प्रसन्न व्हावे, पण तुम्ही

त्यांच्यावर प्रसन्न झालात, तरी अल्लाह मात्र अशा विद्रोही लोकांवर कधीही प्रसन्न होणार नाही.

97 ग्रामीण भागात राहणारे अरब लोक (शहरी भागातील लोकांच्या तुलनेत) सत्य स्वीकारण्यास नकार देण्याच्या बाबतीत व दांभिकपणाच्या बाबतीत फार दुराग्रही आहेत (आणि म्हणूनच) अल्लाहने आपल्या पैगंबराकडे जे काही मर्यादा स्पष्ट करणारे (आदेश) प्रकट केले आहेत, ते समजण्याची त्यांची लायकी नाही. अल्लाह सर्व काही जाणणारा आहे, बुद्धिमान आहे. 98 आणि ग्रामीण अरब लोकांमध्ये काही असेही आहेत, ते (अल्लाहच्या कार्यासाठी) जे काही खर्च करतात त्यास दंड देण्यासारखे समजतात आणि ते तुमच्यावर (एखादी) विपत्ती कोसळण्याची वाट पाहत आहेत, (पण हे श्रद्धावंतांनो!) विपत्ती तर त्यांच्यावरच कोसळेल! अल्लाह सर्व काही ऐकणारा, सर्व काही जाणणारा आहे. 99 आणि ग्रामीण भागातील अरबांमध्ये काही असेही लोक आहेत, जे अल्लाहवर व अंतिम दिवसावर विश्वास ठेवतात आणि जे काही (धन) ते (अल्लाहच्या कार्यासाठी) खर्च करतात, ते त्यास अल्लाहचे सान्निध्य प्राप्त करण्याचे व पैगंबराकडून आशीर्वाद प्राप्त करण्याचे साधन समजतात. होय! निश्चितच ते त्यांच्याकरिता (अल्लाहचे) सान्निध्य प्राप्त करण्याचे साधन आहे. अल्लाह (अवश्य) त्यांना आपल्या कृपाछत्राखाली (जागा) देईल. खरोखर! अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे.

100 आणि (अल्लाहसाठी) स्वदेश त्याग करून आलेले (श्रद्धावंत) आणि त्यांना साहाय्य करणारे व आश्रय देणारे (स्थानिक श्रद्धावंत) (सदाचाराच्या बाबतीत) अग्रणी व सर्वात पुढे असलेले लोक आहेत. आणि ते लोकही ज्यांनी उत्कृष्टपणे सन्मार्गावर असलेल्यांचे अनुसरण केले. अल्लाह यांच्यावर (अत्यंत) प्रसन्न झाला आहे आणि तेही त्याच्यावर प्रसन्न आहेत. आणि अल्लाहने त्यांच्यासाठी अशा बागा तयार केलेल्या आहेत, ज्यातून पाण्याचे (मन प्रसन्न करणारे) प्रवाह

वाहत असतील. ते त्यात कायम निवास करतील आणि हेच आहे सर्वात मोठे यश! 101 तुमच्या आसपास जे ग्रामीण अरब लोक राहतात, त्यांच्यामध्ये (काही) दांभिक आहेत. आणि (पैगंबराचे शहर असलेल्या) मदिनेच्या लोकांमध्येही (काही) दांभिक आहेत, ते दांभिकपणेच्या बाबतीत पक्के झालेले आहेत. तुम्ही त्यांना ओळखत नाही, आम्ही त्यांना ओळखतो. आम्ही त्यांना (या जगात) दुपटीने शिक्षा करू. (शेवटी) त्यांना (मृत्यूनंतरच्या जीवनात) फार मोठ्या शिक्षेकडे नेण्यात येईल.

102 आणि अन्य काही असे (लोक) आहेत, ज्यांनी आपल्या वाईट कृत्यांची कबुली दिली आहे. ज्यांनी काही वाईट आणि काही चांगली कामे केलेली आहेत. आशा आहे की, अल्लाह त्यांच्याबाबतीत अनुकंपा दाखवील. निश्चितच, अल्लाह हा अतिशय क्षमाशील व दयाळू आहे. 103 (पैगंबर!) तुम्ही त्यांच्या संपत्तीतून (जे) दान (ते देत आहेत त्याचा) स्वीकार करा. म्हणजे तुम्ही त्याच्या साहाय्याने त्यांचे चित्त शुद्ध व पवित्र कराल. आणि तुम्ही त्यांच्यासाठी प्रार्थना करा. तुमची प्रार्थना त्यांच्यासाठी खरोखरच मन:शांतीचे साधन बनेल. अल्लाह सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा आहे. 104 त्यांना हे माहीत नाही का की, अल्लाह आपल्या भक्तांच्या पश्चात्तापाचा स्वीकार करतो. आणि त्यांच्या दानास स्वीकृती प्रदान करतो. आणि (तो) केवळ अल्लाह आहे (जो) पश्चात्तापाचा स्वीकार करतो. आणि (तो) कृपाळू आहे. 105 (त्यांना) सांगा, '(जशी तुम्हाला करायची आहेत तशी) कामे करा, अल्लाह तुमच्या आचरणावर लक्ष ठेवेल, तसेच त्याचा पैगंबर व श्रद्धावंतांचेही (तुमच्या आचरणावर) लक्ष असेल. आणि (शेवटी) तुम्हाला त्याच्या समोरच हजर केले जाईल, जो दृश्य व अदृश्याचे संपूर्ण ज्ञान बाळगतो. तेव्हा तो तुम्हाला जे काही तुम्ही करीत होता, त्याविषयी अवगत करेल.' 106 आणि काही अन्य असे आहेत ज्यांचे प्रकरण अल्लाहचा निर्णय येईपर्यंत लांबणीवर टाकण्यात आलेले आहे. एकतर तो त्यांना

शिक्षा करेल किंवा (त्यांच्या पश्चात्तापाचा स्वीकार करून), त्यांना (पुन्हा) आपल्या कृपाछत्राखाली जागा देईल. अल्लाह सर्व काही जाणणारा आहे, बुद्धिमान आहे.

107 आणि काही (दांभिक) असेही आहेत, ज्यांनी एक (वेगळी) मशीद बनविली, या हेतूने की, त्याद्वारे (श्रद्धावंतांदरम्यान) उपद्रव माजवता यावे, तसेच लोकांना (सत्यधर्माचा) त्याग करण्यास प्रेरित करता यावे. आणि श्रद्धावंतांदरम्यान आपसात फूट पाडण्याच्या हेतूने, आणि त्यास दबा धरून बसण्याचे स्थान उपलब्ध करून देण्यासाठी, जो पूर्वीपासून अल्लाह आणि त्याच्या पैगंबराशी लढत आहे. (श्रद्धावंतांनो!) ते (तुमच्यासमोर) शपथा घेऊन सांगतील की, आमचा हेतू केवळ चांगले करण्याचाच होता, पण अल्लाह (स्वत:) या गोष्टीस साक्षी आहे की, ते खोटे बोलणारे लोक आहेत. 108 त्या ठिकाणी तुम्ही कधीही पाय ठेवू नका, (म्हणजे तिथे प्रार्थनेसाठी उभे राहणे तुमच्यासाठी कदापि उचित नाही) पण ज्या मशीदीचा पाया पहिल्याच दिवसापासून ईश-भयावर ठेवण्यात आलेला आहे, केवळ तीच मशीद यासाठी अधिक योग्य आहे की, तिच्यामध्ये तुम्ही (प्रार्थनेसाठी) उभे राहावे. तिच्यात असे लोक आहेत जे (मनाने) स्वच्छ व शुद्ध राहणे पसंत करतात, आणि (असेच) स्वच्छ व शुद्ध राहणारे लोक अल्लाहला प्रिय आहेत. 109 मग (दोघांत) कोण श्रेष्ठ आहे? ज्याने आपल्या इमारतीचा पाया अल्लाहच्या भयावर आणि त्याच्या प्रसन्नतेवर रचला तो मनुष्य, की, ज्याने आपल्या इमारतीची उभारणी (पाण्याने) भुसभुशीत झालेल्या अशा (दरीच्या) काठावर केली की, त्याच्यासह ती (इमारत) सरळ नरकाच्या आगीत जाऊन कोसळणार आहे. अल्लाह (जाणूनबुजून) वाईट कृत्ये करणाऱ्यांना सन्मार्ग दाखवीत नाही. 110 आणि जी इमारत त्यांनी उभी केली, त्यांच्या मनामध्ये सदैव द्विधा मनःस्थितीचे कारण बनून राहील, येथपावेतो की, त्यांच्या मनाचे तुकडे-तुकडे होऊन जातील, (म्हणजे ते मरण पावतील तोपर्यंत

ते संभ्रमाच्या अवस्थेत राहतील). आणि अल्लाह सर्व काही जाणणारा आहे, बुद्धिमान आहे.

111 खरेतर, अल्लाहने श्रद्धावंतांचे प्राण आणि (त्यांची) संपत्ती स्वर्गाच्या मोबदल्यात खरेदी केली आहे.

ते अल्लाहच्या कार्यासाठी लढतात, ठार करतात आणि ठार होतात, हे (अल्लाहने) स्वत:चे कर्तव्य मानलेले एक असे सत्य वचन आहे. जे तौरात, इंजील व कुराण (या सर्व त्याच्या ग्रंथांत नमूद आहे). आणि कोण असा आहे, जो अल्लाहपेक्षा अधिक आपल्या वचनाशी पूर्तता करू शकतो. मग तुम्ही जो सौदा त्याच्याशी केलेला आहे, त्याबद्दल आनंद साजरा करा. कारण हेच आहे सर्वश्रेष्ठ यश! 112 (हे यश त्यांना प्राप्त होईल), जे (आपल्या वाईट कृत्यांबद्दल) पश्चात्तापदग्ध होऊन (अल्लाहकडे) वळतात, (तसेच जे) त्याची उपासना करतात व त्याचे स्तुतिगान करतात, (त्याला प्रसन्न करण्यासाठी) त्याच्या मार्गात प्रवास करीत असतात, जे त्याच्यासमोर नमन करतात व जे त्याच्यापुढे नतमस्तक होतात, जे चांगली कामे करण्याचे आदेश देतात आणि वाईट कामांपासून रोखतात. आणि जे अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादांचे पालन करतात, (म्हणजे या गोष्टी अंगी असलेला माणूस स्वर्गासाठी पात्र ठरेल), (पैगंबर!) तुम्ही श्रद्धावंतांना (या अल्लाहच्या वायद्याची) शुभवार्ता द्या.

113 पैगंबर आणि श्रद्धावंत लोक यांच्यासाठी हे उचित नाही की, त्यांनी अनेकेश्वरवादी लोकांच्या क्षमाप्राप्तीसाठी (अल्लाहकडे) प्रार्थना करावी, मग ते त्यांचे जवळचे नातलग का असेनात. जेव्हा की, त्यांच्यासमोर हे स्पष्ट करण्यात आलेले आहे की, या (अट्टल गुन्हेगारांचा) नरकप्रवेश अटळ आहे. 114 आणि इब्राहीमने आपल्या (अनेकेश्वरवादी) पित्यासाठी (अल्लाहकडे) क्षमायाचना केवळ यासाठी केली होती की, त्याने त्यास तसे करण्याचे शब्द दिले होते. पण जेव्हा इब्राहीमला हे कळून आले की, त्याचा पिता अल्लाहचा शत्रू आहे, तेव्हा तो

त्याच्यापासून वेगळा झाला. खरोखर! इब्राहीम अतिशय कोमल मनाचा व
सहनशील होता. 115 अल्लाहची ही पद्धत नव्हे की, एखाद्या जातीसमूहास
मार्गदर्शन केल्यानंतर, त्यांना तोपर्यंत मार्गभ्रष्ट करत नाही, जोपर्यंत त्यांना,
त्यांनी ज्या गोष्टींपासून स्वत:ला अलिप्त ठेवायचे आहे, त्या गोष्टी स्पष्ट करून
तो सांगत नाही. खरोखर, अल्लाहला प्रत्येक गोष्टीचे पूर्ण ज्ञान आहे. 116
निश्चितच, आकाश आणि पृथ्वीवर (म्हणजे समस्त विश्वावर) केवळ अल्लाहचीच
सत्ता आहे. तोच जीवन देतो आणि तोच मृत्यूही देतो. आणि अल्लाहशिवाय दुसरा
कोणीच तुमचा रक्षणकर्ता किंवा साहाय्यकर्ता नाही.

117 अल्लाहने पैगंबर व आपल्या घरादाराचा त्याग करून आलेले (श्रद्धावंत)
व आलेल्यांना साहाय्य करणारे स्थानिक (श्रद्धावंत) या सर्वांवर आपली कृपादृष्टी
टाकली आहे. ज्यांनी कठीण परिस्थितीत पैगंबराला साथ दिली. अशी अवस्था
असतानाही, (साथ दिली) की, त्यांच्यापैकी काही श्रद्धावंतांची मने डळमळीत
झालेली होती, आणि पुन्हा एकदा अल्लाहने त्यांच्यावर कृपादृष्टी टाकली. निश्चितच
अल्लाह त्यांच्याबाबतीत कनवाळू व क्षमाशील आहे. 118 आणि (त्याने आपला
कृपावर्षाव) त्या तिघांवरही केला, ज्यांचा निर्णय लांबणीवर टाकण्यात आला
होता. जेव्हा (त्यांची अवस्था अशी झाली होती की), पृथ्वी फार विस्तृत असून
देखील, त्यांच्यासाठी (फार) आकुंचित बनली होती आणि त्यांचे जीव त्यांच्यासाठी
ओझे बनले होते, (म्हणजे त्यांना जगावेसे वाटत नव्हते). आणि (शेवटी)
त्यांची (पूर्ण) खात्री पटली होती की, (आता) अल्लाहच्या प्रकोपापासून वाचण्यासाठी
(स्वत:) अल्लाहशिवाय दुसरे कोणतेही आश्रयस्थान नाही. मग अल्लाह (आपल्या
दयेसह) त्यांच्याकडे वळला, यासाठी की, त्यांनी पश्चात्तापदग्ध होऊन त्याच्याकडे
वळावे. खरोखर! अल्लाह त्याच्याकडे परत येणाऱ्यांना सदैव माफ करणारा आणि
फार दयाळू आहे.

119 इमान धारण केलेल्या लोकांनो! अल्लाहचे भय बाळगा आणि सत्यवचनी

लोकांच्या पाठीशी उभे राहा. [120] (पैगंबराचे) शहर मदिना येथील लोकांसाठी तसेच (मदिनेच्या) आसपास ग्रामीण भागात राहणाऱ्या अरब लोकांसाठी हे उचित नव्हते की, अल्लाहच्या पैगंबराला सोडून मागे (घरी) बसून राहावे. आणि हे की, त्याच्या (म्हणजे पैगंबराच्या) जिवापेक्षा स्वत:च्या जिवाला प्राधान्य द्यावे. हे अशासाठी की, अल्लाहच्या मार्गात जेव्हाही त्यांना तहान लागते, थकवा जाणवतो आणि भुकेने व्याकूळ होतात (म्हणजे इत्यादी प्रकारच्या समस्यांना त्यांना तोंड द्यावे लागते) आणि जेव्हाही, सत्य नाकारणाऱ्यां (शत्रूंवर) आपला वचक बसविणारे पाऊल (ते) उचलतात व शत्रूला कोणत्याही प्रकारे नुकसान पोचवितात, त्याच्या फलस्वरूप त्यांच्या नावे चांगल्या कामाची नोंद केली जाते. निश्चितच जे सत्कर्म करतात, त्यांचे फळ अल्लाह (कधीही) वाया जाऊ देत नाही. [121] आणि जेव्हाही ते कमी किंवा जास्त प्रमाणात (अल्लाहच्या कार्यासाठी) खर्च करतात आणि जेव्हाही ते (अल्लाहच्या मार्गात) जे काही अंतर पार करतात, त्याची त्यांच्या नावे नोंद केली जाते. यासाठी की, अल्लाहने त्यांच्या कर्मांचा त्यांना पुरेपूर मोबदला द्यावा.

[122] (युद्धाच्या वेळी) सर्व श्रद्धावंतांनी मिळून निघावे हे इष्ट नव्हते. मग असे का घडले नाही की, त्यांच्या प्रत्येक गटातून काही लोक (पैगंबराकडे) येऊन, धर्माची चांगली जाण प्राप्त करून, परत आपल्या लोकांत जाऊन, त्यांना सावध केले असते, यासाठी की, त्यांनी (स्वत:ला दुष्कृत्यांपासून) वाचवावे.

[123] श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! त्या सत्य नाकारणाऱ्या (श्रद्धाहीनांशी) युद्ध करा, जे तुमच्या सभोवताली आहेत. (आणि) त्यांच्याशी कठोरतापूर्वक व्यवहार करा. आणि लक्षात असू द्या की, अल्लाह सदाचारी लोकांच्या बरोबर आहे. [124] आणि जेव्हा (कुराणात) एखादे प्रकरण (अध्याय) प्रकट केले जाते, तेव्हा त्यांच्यापैकी काही लोक (असे) म्हणतात, ‘या प्रकरणातील

(संदेशाने) तुमच्यापैकी कोणाची श्रद्धा (अधिक) बळकट केली?'
निश्चितच जे श्रद्धावंत आहेत, त्यांच्या श्रद्धेमध्ये त्या (प्रकरणाद्वारे) वाढ झाली आहे. आणि ते त्या शुभवार्तेबद्दल खूश होत आहेत, (जी अल्लाहने त्यांना दिली आहे).
125 पण ज्यांच्या मनात विकृती आहे, तर (त्याद्वारे) त्यांच्यात (आधीपासून असलेल्या) मलिनतेमध्ये आणखी मलिनतेची भर पडली आहे. आणि ते सत्य नाकारत असलेल्या अवस्थेत मृत्यूला सामोरे जातात.
126 त्यांना हे दिसत नाही का की, प्रत्येक वर्षी एकदा किंवा दोनदा त्यांची परीक्षा घेतली जाते. तरीसुद्धा ना ते पश्चात्तापदग्ध होतात, ना त्यापासून बोध घेतात.
127 आणि जेव्हा (कुराणात) एखादे प्रकरण प्रकट केले जाते, तेव्हा ते एकमेकांकडे पाहतात, आणि (विचारतात की), तुम्हाला कोणी पाहत तर नाही ना? मग ते (त्याकडे पाठ फिरवून) निघून जातात, अल्लाहने (सत्यापासून) त्यांची मने (दुसरीकडे) वळविली आहेत, त्याचे कारण म्हणजे, ते असे लोक आहेत, जे समजत नाहीत.

128 तुमच्याकडे एक पैगंबर आलेला आहे, जो तुमच्यापैकीच आहे. (मृत्यूनंतरच्या जीवनात) तुम्ही (फार) मोठ्या संकटात सापडू शकता (या विचाराने) तो दु:खी होतो. तुमचे भले व्हावे, अशी त्याची (मनापासून) इच्छा आहे आणि श्रद्धावंतांसाठी तो अतिशय प्रेमळ व कनवाळू आहे.
129 (असे असूनही) जर या लोकांनी पाठ फिरवली तर (त्यांना) सांगून टाका, 'अल्लाह माझ्यासाठी पर्याप्त आहे, त्याच्याशिवाय दुसरा कोणीही उपासनेयोग्य नाहीच. मी त्याच्यावरच (दृढ) विश्वास ठेवतो, आणि तोच मालक आहे महान सिंहासनाचा!'

# सूरह-१०. यूनुस

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 अलीफ० लाम० रा० हे संदेश आहेत अशा ग्रंथाचे, जो ज्ञानाने परिपूर्ण

आहे. [2] लोकांना हे विचित्र वाटते का की, आम्ही त्यांच्यातीलच एका व्यक्तीकडे (आमचा) संदेश प्रकट केला? (की, त्याद्वारे समस्त) मानवजातीला सावध करा. आणि श्रद्धा धारण करणाऱ्यांना शुभवार्ता ऐकवा की, त्यांच्या पालनकर्त्याकडे त्यांच्यासाठी सन्मानाचे खरे स्थान आहे. (यावर) सत्य नाकारणारे लोक म्हणतात की, ही व्यक्ती एक उघडउघड जादूगार आहे.

[3] निश्चितच, तुमचा पालनकर्ता अल्लाह आहे, ज्याने सहा दिवसांत (म्हणजे सहा टप्प्यांत) आकाश आणि पृथ्वीची निर्मिती केली, मग तो (समस्त सृष्टीचा मालक म्हणून) सिंहासनावर विराजमान झाला, तोच प्रत्येक गोष्टीचे आयोजन करतो. त्याच्या समक्ष त्याच्या परवानगीशिवाय कोणीही (कोणाचीही) शिफारस करू शकत नाही, असा आहे अल्लाह, तुमचा पालनकर्ता. म्हणून तुम्ही (केवळ) त्याचीच उपासना करा, तुम्ही याकडे लक्ष देणार नाही का? [4] त्याच्याकडेच तुम्हा सर्वांना परत जायचे आहे, हे अल्लाहचे पक्के वचन आहे. नि:संदेह तोच निर्मितीची सुरुवात करतो आणि तोच (ती निर्मिती संपुष्टात आल्यानंतर) तिला पुन:स्थापित करेल. हे यासाठी की, ज्यांनी श्रद्धा धारण केली आणि सत्कर्मे केली त्यांना न्यायपूर्वक फळ देता यावे. आणि ज्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला (तर त्यांच्या) त्या नकारापोटी त्यांना (पिण्यासाठी) उकळते पाणी व यातनामयी शिक्षा मिळेल.

[5] तोच आहे अल्लाह, ज्याने सूर्याला तेजस्वी प्रकाशाचे स्रोत बनविले आणि चंद्राला (प्रतिबिंबित) प्रकाशाचे साधन बनविले आणि (चंद्राच्या) अवस्था निश्चित केल्या, म्हणजे (त्याद्वारे) तुम्हाला वर्षांची गणना आणि काल गणना करता यावी. अल्लाहने हे सर्व हेतूविना निर्माण केलेले नाही. तो (त्या लोकांसाठी) हे संदेश स्पष्ट करून सांगत आहे, जे समजूतदारपणा बाळगणारे आहेत. [6] निश्चितच, रात्र व दिवस यांच्या आलटून–पालटून येण्यात आणि अल्लाहने आकाश व पृथ्वी यांमध्ये जे काही निर्माण केले आहे. त्या सर्वांत (अल्लाहच्या)

संदेश उलगडणाऱ्या खुणा आहेत. त्या लोकांसाठी जे (अल्लाहची) जाण ठेवणारे आहेत.

7 निश्चितच जे लोक आमच्या भेटीवर विश्वास ठेवून नाहीत, आणि या जगातील जीवनावरच संतुष्ट व समाधानी झालेले आहेत, आणि आमच्या संदेश असलेल्या खुणांकडे दुर्लक्ष केलेले आहेत. 8 (शेवटी) त्यांचे ठिकाण (नरकाची) आग आहे, त्या कमाईपोटी जे ते करीत राहिले. 9 पण ज्या लोकांनी श्रद्धा धारण केली आणि सत्कर्मे केली. त्यांचा पालनकर्ता त्यांच्या श्रद्धेपोटी त्यांना (मृत्यूनंतरच्या जीवनात यशोशिखरावर) पोचवेल. परम सुखाच्या नंदनवनात, त्यांच्या पायाखालून पाण्याचे (मन प्रसन्न करणारे) प्रवाह वाहत असतील. 10 त्या (आनंददायी अवस्थेत) त्यांच्या तोंडून असे शब्द बाहेर पडतील, हे अल्लाह! तू असीम कीर्तिवान आहेस! आणि तेथे त्यांचे (एकमेकांना) अभिवादन असेल — 'सलाम'! (शांती!) आणि प्रत्येक गोष्टीचा शेवट ते या शब्दांनी करतील, 'सर्व स्तुतीचा अधिकारी संपूर्ण विश्वाचा (चा) मालक असलेला 'अल्लाह' हाच होय!'

11 जर अल्लाहने लोकांना त्यांच्या (कर्मांच्या) कमाईपोटी शिक्षा करण्यात घाई केली असती, ज्याप्रमाणे तो त्यांच्यावर कृपा करण्याची घाई करतो, तर त्यांच्या आयुष्याची कालावधी केव्हाच संपुष्टात आली असती. पण जे आमच्याशी (त्यांची) भेट होणे अटळ आहे, हे जाणून नाहीत, त्यांना आम्ही मोकळे सोडून देतो, (ते यासाठी) की, त्यांनी आपल्या विद्रोहात भटकत राहावे. 12 आणि जेव्हा मनुष्यास पीडा पोचते, तेव्हा तो उठता-बसता किंवा पहुडला असता आमचा धावा करतो. पण जेव्हा आम्ही त्याच्यापासून त्याचा त्रास दूर करतो, तेव्हा तो (आमच्याकडे पाठ फिरवून) अशाप्रकारे निघून जातो, जणू काही त्याने आपल्या वाईट अवस्थेत आमचा कधी धावा केलाच नव्हता. अशाप्रकारे मर्यादांचे उल्लंघन करणाऱ्या लोकांना (त्यांची वाईट) कृत्ये चांगली बनवून

दाखविण्यात आली आहे.

13 आणि आम्ही तुमच्यापूर्वी होऊन गेलेल्या कितीतरी पिढ्यांना नष्ट केले आहे, जेव्हा त्यांनी (सातत्यपूर्वक) वाईट कृत्ये केली. त्यांच्याकडे पाठविण्यात आलेले पैगंबर सत्याचे सर्व स्पष्ट प्रमाण घेऊन त्यांच्याकडे आले होते तरीसुद्धा त्यांनी (पैगंबरांना) मानण्यास नकार दिला. अशाचप्रकारे अपराध्यांना आम्ही (त्यांच्या कर्मांचा) बदला देत असतो. 14 मग त्यांच्यानंतर आम्ही तुम्हाला पृथ्वीवर (त्यांचे) उत्तराधिकारी बनवले, म्हणजे आम्हाला हे पाहता यावे की, तुम्ही कसे आचरण करता.

15 आणि जेव्हा आमचे स्पष्ट संदेश त्यांना ऐकविले जातात. तेव्हा ते लोक जे आमच्याशी होणाऱ्या भेटीला अटळ मानत नाहीत, ते म्हणतात, 'या व्यतिरिक्त दुसरे एखादे कुराण आणा किंवा यात बदल करून टाका.' (पैगंबर! त्यांना) सांगा, 'माझ्यातर्फे त्यात काही बदल करण्याची मी कल्पनाही करू शकत नाही. मी तर केवळ त्याचेच अनुसरण करतो, जे माझ्याकडे प्रकट केले जाते; जर मी माझ्या पालनकर्त्याची अवज्ञा करेन तर मला त्या कठोर दिवसाच्या शिक्षेचे भय वाटते.' 16 (त्यांना) सांगा, 'जर अल्लाहने तसे इच्छिले असते तर ना मी तुम्हाला ते कथन केले असते, ना त्याने तुम्हाला त्याची जाणीव करून दिली असती. मी या अगोदर (म्हणजे हे संदेश प्रकट होण्यापूर्वी), माझ्या आयुष्याचा एक मोठा भाग तुमच्यामध्ये व्यतीत केला आहे. तर मग, तुम्ही आपल्या बुद्धीचा उपयोग करणार नाही का?' 17 त्या माणसापेक्षा अधिक दुष्ट कोण असू शकतो, जो अल्लाहविषयी खोट्या गोष्टी रचून सांगतो किंवा जो अल्लाहच्या संदेशांना खोटे ठरवितो. नि:संदेह, अपराधी लोक कधीही यश प्राप्त करू शकणार नाहीत.

18 आणि ते अल्लाहला सोडून अशांची उपासना करतात, जे (त्यांना) ना लाभ पोचवू शकतात, ना हानी. आणि ते म्हणतात की, ते अल्लाहकडे आमची

शिफारस करणारे आहेत. (पैगंबर! त्यांना) सांगा, तुम्ही अल्लाहला अशा गोष्टीविषयी माहिती देत आहात का की, जी गोष्ट आकाशामध्ये किंवा पृथ्वीवर आहे, (पण) ती (गोष्ट) त्याला माहीत नाही? असीम आहे त्याची महिमा! ते ज्यांना त्याचे (अल्लाहचे) समकक्ष ठरवतात त्यांच्यापेक्षा कितीतरी तो श्रेष्ठ आहे. 19 आणि (हे जाणून घ्या की), समस्त मानवजात (प्रारंभी) एकच जमात होती, नंतर त्यांच्यात मतभेद झाले. आणि जर तुझ्या पालनकर्त्याकडून आधीपासून एक गोष्ट निश्चित केलेली नसती, तर ज्या गोष्टीत ते परस्पर मतभेद करीत आहेत (त्यांचे मतभेद लगेच) निकाली लावले असते.

20 आता ते (सत्य नाकारणारे लोक) विचारतात, 'पैगंबराकडे त्याच्या पालनकर्त्याकडून एखादी (चमत्कारिक) खूण का पाठविण्यात आली नाही?' (त्यांना) सांगा, 'अदृश्याचे ज्ञान केवळ अल्लाहलाच आहे. म्हणून (आता) तुम्ही लोक (अल्लाहचा हेतू उघड होईपर्यंत) प्रतीक्षा करा, आणि मी देखील तुमच्याबरोबर प्रतीक्षा करीत आहे.' 21 आणि जेव्हा आम्ही लोकांना, त्यांना पोहोचलेल्या दुःखानंतर आपल्या कृपेची गोडी चाखवितो, तेव्हा ते लगेच आमच्या संदेशांच्या विरुद्ध खोटे युक्तिवाद शोधायला लागतात. (पैगंबर!) त्यांना सांगा, 'अल्लाह प्रतियोजना करण्यात (तुमच्यापेक्षा) अधिक शीघ्र आहे.' निःसंदेह, आमचे दूत तुम्ही ज्या योजना रचता, त्यांची नोंद करीत असतात.

22 तो (दुसरा कोणी नसून) अल्लाह आहे, जो जमिनीवर व समुद्रावर प्रवास करणे तुमच्यासाठी शक्य बनवतो. आणि जेव्हा तुम्ही नौकांमध्ये स्वार होऊन प्रवास करताना (पाहता) की, (त्या नौका) अनुकूल वाऱ्यांच्या साहाय्याने चालू लागतात व (त्यातील प्रवासी) आल्हाददायक वाऱ्यांच्या (स्पर्शाने) आनंदित होत असतात, तोच (अचानक) वादळी वारे वाहू लागतात आणि प्रत्येक बाजूने त्यांच्यावर लाटा चालून येतात. आणि त्यावेळेस त्यांना वाटू लागते की, (मृत्यूने) चहूबाजूंनी त्यांना वेढले आहे. तेव्हा ते धर्माप्रति मोठे

समर्पणभाव दाखवून, अल्लाहकडे याचना करू लागतात, म्हणतात, ‘(हे अल्लाह!) जर तू या (संकटातून) आम्हाला मुक्त केलेस तर निश्चितच आम्ही तुझे आभार व्यक्त करणारे दास बनू.’ 23 पण जेव्हा तो त्या (संकटातून) त्यांना मुक्ती देतो, तर ते लगेच पृथ्वीवर अनाचार माजविण्यासाठी (पुढे) सरसावतात. लोकांनो! तुमचे अत्याचारी कृत्य (शेवटी) तुमच्यावरच उलटणार आहेत. (तुम्हाला शक्य असेल तेवढा) या जीवनाचा क्षणिक लाभ आपल्या पदरी पाडून घ्या. (पण हे लक्षात ठेवा,)शेवटी तुम्हाला आमच्याकडेच परत यायचे आहे. त्यावेळेस आम्ही तुम्हाला ते सर्व दाखवून देऊ जे तुम्ही (आयुष्यात) करीत राहिले.

24 या जगातील जीवनाचे उदाहरण त्या पाण्यासारखे आहे, ज्याचा आम्ही ढगांतून खाली वर्षाव करतो, तेव्हा जमिनीवरील वनस्पती (ते पाणी) शोषून घेतात, (आणि त्या पाण्याद्वारे आलेले पीक) मनुष्य व गुरे खात असतात. पण जमीन (स्वत:वर सर्व बाजूंनी) अलंकार चढवून जेव्हा सुंदर दिसू लागते, तेव्हा तिचे निवासी समजतात की, ती (जमीन) आता पूर्णपणे त्यांच्या नियंत्रणात आहे, (आणि तिची कापणी करून धान्य मिळविण्यासाठी, ते सक्षम आहेत). तेव्हा अचानक रात्रीच्या किंवा दिवसाच्या वेळी (तिच्यासाठी) आमचा आदेश येतो आणि तिचा असा सफाया होतो, जणू त्या दिवसापूर्वी तिथे काहीच अस्तित्वात नव्हते. अशाप्रकारे आम्ही आमचे संदेश (त्या लोकांसाठी) स्पष्ट करून सांगत आहोत, जे चिंतन करतात.

25 आणि (हे जाणून घ्या की), अल्लाह (मानवाला) शांतिगृहाकडे बोलावितो आहे. आणि तो इच्छितो त्यास सरळ मार्ग दाखवितो.

26 जे लोक चांगले कृत्य करतात, त्यांच्यासाठी चांगले फळ तर आहेच, शिवाय त्यापेक्षा बरेच काही (आणखी) त्यांना मिळेल. (न्यायाच्या दिवशी सदाचारी लोकांच्या) चेहऱ्यांवर ना निराशा पसरेल, ना ते अपमानित केले जातील, हेच स्वर्गाचे निवासी आहेत. ते त्यात सदैव वास्तव्य करतील. 27 पण

ज्यांनी वाईट कृत्ये केली तर (अशा लोकांना त्यांच्या) वाईट कृत्यांचा, त्याच
प्रमाणात (वाईट) मोबदला मिळेल आणि नामुष्कीत ते बुडालेले असतील.
त्यांना अल्लाहच्या (शिक्षेपासून) वाचविणारा कोणीही नसेल. (त्यांचे चेहरे असे
दिसतील) की, जणू काही त्यांच्या चेहऱ्यांवर रात्रीच्या काळोख्या पडद्यांनी
आवरण घातलेले आहे. हेच लोक आगीचे निवासी आहेत, (म्हणजे आगीचे
निवासी बनणे त्यांचे अटळ नशीब आहे). त्यात ते सदैव वास्तव्य करतील.
28 आणि ज्या दिवशी (म्हणजे न्यायाच्या दिवशी) आम्ही त्या सर्वांना
एकत्रित करू, मग ज्यांनी इतरांना अल्लाहचे समकक्ष ठरविले होते, त्यांना
आम्ही सांगू, 'तिथेच थांबा जिथे तुम्ही आहात, तुम्ही आणि ते, ज्यांना (तुम्ही)
अल्लाहचे समकक्ष ठरविले होते.' मग आम्ही त्यांना एकमेकांपासून वेगळे करू.
(तेव्हा) ते (लोक) ज्यांना (जगामध्ये) अल्लाहच्या बरोबरीचे स्थान देण्यात
आले होते, (आपल्या त्या उपासकांना) म्हणतील, 'तुम्ही (अजिबात) आमची
उपासना करीत नव्हता. 29 अल्लाह आमच्या व तुमच्या दरम्यान साक्ष म्हणून
पर्याप्त आहे. तुमच्या उपासनेची आम्हाला (मुळीच) जाणीव नव्हती.' 30
त्यावेळी प्रत्येकाला (भूतकाळात) त्याने (काय-काय) केले होते, त्याची पूर्ण
जाणीव होईल. आणि सर्व लोकांना त्यांचा खरा स्वामी असलेल्या अल्लाहकडे
परत आणण्यात येईल. ज्या-ज्या असत्य गोष्टी त्यांनी रचल्या होत्या, त्या सर्व
(त्यांच्यापासून) नाहीशा होतील.
31 (त्यांना) विचारा, 'तो कोण आहे, जो तुम्हाला आकाश व जमीन
यांतून उपजीविका प्रदान करतो? तो कोण आहे, ज्याला (तुमच्या) कानांवर
आणि डोळ्यांवर पूर्ण नियंत्रण आहे? तो कोण आहे, जो मृतातून सजीवास आणि
सजीवातून मृतास बाहेर काढतो? तो कोण आहे, जो (अस्तित्वात असलेल्या)
सर्व गोष्टींच्या व्यवस्थापनावर नियंत्रण ठेवून आहे?' ते (निश्चितपणे) उत्तर
देतील, '(तो) 'अल्लाह' आहे.' (त्यांना) सांगा, 'मग तुम्ही अल्लाहची जाण

ठेवून (जीवन व्यतीत करीत) नाही का? 32 तर हा आहे 'अल्लाह' तुमचा खराखुरा पालनकर्ता, (हे आहे त्याच्या संबंधीचे अंतिम सत्य). कारण सत्याचा त्याग केल्यानंतर मार्गभ्रष्टतेशिवाय काय बाकी राहणार? मग तुम्ही (सत्यापासून) दूर कसे बरे जाऊ शकता?' 33 अशाप्रकारे विद्रोही लोकांच्या बाबतीत तुझ्या पालनकर्त्याचा शब्द खरा ठरला की, ते (कदापि) श्रद्धावंत बनणार नाहीत.

34 (त्यांना) विचारा, 'अल्लाहचे सहभागी ठरवण्यात आलेल्या तुमच्या उपास्यांमध्ये कोणी असा आहे का, जो निर्मितीचा प्रारंभ करू शकतो आणि त्याची पुनरावृत्ती देखील करू शकतो?' (त्यांना) सांगून टाका, 'तो केवळ 'अल्लाह' आहे, जो (कोणत्याही गोष्टीला शून्यापासून) प्रारंभ करतो, आणि त्याची पुनरावृत्ती देखील करतो. मग तुम्ही (या सत्यापासून) दूर भटकत कुठे जात आहात?' 35 (पैगंबर!) (त्यांना) विचारा, 'अल्लाहचे समकक्ष ठरवण्यात आलेल्या तुमच्या उपास्यांत कोणी असा आहे का, जो सत्याकडे मार्गदर्शन करू शकतो?' (त्यांना) सांगून टाका, 'तो केवळ अल्लाह आहे जो सत्याचा मार्ग दाखवितो. तर मग जो सत्याचा मार्ग दाखवितो, तो अनुसरण केला जाण्यास अधिक पात्र आहे की, तो ज्यास स्वत:ला (इतराने) मार्ग दाखवल्याशिवाय मार्ग सापडत नाही? मग तुम्हाला झाले तरी काय? तुम्ही किती चुकीचा निर्णय करता!' 36 त्यांच्यापैकी अनेक जण केवळ अनुमानाचे अनुसरण करीत आहेत. आणि अनुमान कधीही सत्याचा पर्याय असू शकत नाही. नि:संदेह, अल्लाहला, ते जे काही करीत आहेत, त्याची पूर्ण जाणीव आहे.

37 आणि हे कुराण अशी वस्तू नव्हे ज्याची रचना अल्लाहशिवाय अन्य कोणी करू शकेल. हे (कुराण) त्या (भविष्यवाण्यांची) पूर्तता आहे, ज्या या पूर्वीच्या ग्रंथात करण्यात आलेल्या आहेत. आणि यात (ईश्वरीय) ग्रंथाचे स्पष्ट विवरण आहे. यात मुळीच शंका नाही की, ते विश्वाच्या पालनकर्त्याकडून आलेले आहे. 38 (त्या सत्य नाकारणाऱ्यांचे) असे म्हणणे आहे की काय? 'या

व्यक्तीने (म्हणजे पैगंबराने) स्वत: होऊन ते रचले आहे?' (पैगंबर! तुम्ही त्यांना) सांगा, 'तुम्ही तुमच्या म्हणण्यात प्रामाणिक असाल तर अशीच गुणवत्ता असलेला एखादा अध्याय (रचून माझ्याकडे) घेऊन या, आणि (या कार्यासाठी) अल्लाहला सोडून कोणालाही तुमच्या मदतीसाठी बोलावून घ्या, ज्यांना बोलावणे शक्य आहे.'
39 पण (वस्तुस्थिती अशी आहे की), ते अशा गोष्टीला खोटे ठरविण्यावर आग्रही आहेत, जी त्यांच्या आकलना पलीकडची आहे. आणि त्याची वास्तविकताही त्यांच्यावर अद्याप उघड झालेली नाही. अशाचप्रकारे त्यांच्या पूर्वी होऊन गेलेल्या लोकांनीही सत्य स्वीकारण्यास नकार दिला. तर पाहा, त्या दुराचाऱ्यांचा शेवट कसा झाला?

40 आणि त्यांच्यात असे काही लोक आहेत, जे कुराणावर विश्वास ठेवणारे आहेत, आणि त्यांच्यामध्ये काही असेही आहेत, जे यावर विश्वास ठेवत नाहीत. आणि तुझा पालनकर्ता अनाचार माजवणाऱ्यांना चांगले ओळखून आहे.
41 आणि (पैगंबर!) जर ते तुम्हाला खोटे ठरवीत असतील तर तुम्ही (त्यांना) सांगून टाका, 'माझ्या कर्मांविषयी मी उत्तरदायी आहे आणि तुमच्या कर्मांविषयी तुम्ही उत्तरदायी आहात. मी जे काही करीत आहे, त्याबद्दल तुम्हाला जबाबदार धरले जाणार नाही. आणि तुम्ही जे काही करीत आहात, त्याबद्दल मला जबाबदार धरले जाणार नाही.'
42 आणि त्यांच्यात काही असे आहेत जे तुमच्या गोष्टी कान देऊन ऐकत असतात, तर तुम्ही बहिऱ्यांना ऐकवाल की काय? कारण ते (लक्षपूर्वक ऐकण्याचा दिखाऊपणा करणारे, जे ऐकतात त्यासंबंधाने) बुद्धीचा वापर करीत नाहीत.
43 आणि त्यांच्यात काही लोक असे आहेत, जे तुमच्याकडे पाहत असल्याचे (सोंग करतात), तर तुम्ही त्या आंधळ्यांना मार्ग दाखवाल की काय? जर त्यांना त्या पाहण्यापासून काहीही उमजत नसले तरी? (तुम्ही मार्ग दाखवू शकाल?)
44 (वस्तुस्थिती ही आहे की), अल्लाह लोकांवर मुळीच अन्याय करीत नाही, पण लोकच स्वत:च्या जिवावर अन्याय करीत

असतात.

45 आणि ज्या दिवशी अल्लाह त्यांना एकत्र करील, त्या दिवशी (त्यांना वाटायला लागेल) जणू केवळ घटकाभरच, (मृत्यूपूर्वीच्या) जगामध्ये ते राहिले. ते (तिथे) एकमेकांना ओळखतील. खरोखर असफल होणारे ते लोक आहेत, जे अल्लाहशी होणाऱ्या (अटळ) भेटीला (आपल्या आयुष्यात) नाकारत राहिले. आणि (अशाप्रकारे) सन्मार्ग अंगीकारण्यास अपयशी ठरले. 46 आणि ज्या गोष्टीचे (म्हणजे ज्या शिक्षेचे) आम्ही त्यांना वचन दिले आहे, त्यांपैकी काही (म्हणजे त्याची झलक) आम्ही तुम्हाला (या जगातच) दाखविली तर (तुम्हाला दिसून येईल की, आम्ही सत्य नाकारणाऱ्यांसाठी काय तरतूद करून ठेवली आहे). किंवा असेही होऊ शकते की, आम्ही (त्या शिक्षेची झलक दाखविण्यापूर्वी) तुम्हाला मृत्यू देऊ शकतो. पण (लक्षात ठेवा शेवटी) त्यांना आमच्याकडेच परत यायचे आहे. आणि ते जे काही करीत आहेत, त्या सर्वांस (स्वत:) अल्लाह साक्षी आहे. 47 आणि प्रत्येक जनसमुदायासाठी एक पैगंबर आहे. आणि जेव्हा त्यांचा पैगंबर त्यांच्याकडे येतो, (व आमचा संदेश त्यांना पोचवतो). तेव्हा (पूर्ण न्यायानिशी) त्यांचा निर्णय लावला जातो. आणि त्यांच्यावर तिळमात्र देखील अन्याय केला जात नाही.

48 आणि ते (सत्य नाकारणारे लोक) विचारतात, '(पुनरुत्थान व न्यायाच्या दिवसाचा) वायदा केव्हा पूर्ण केला जाईल? (आम्हाला या प्रश्नाचे उत्तर द्या) जर तुम्ही सत्यवचनी असाल.' 49 (पैगंबर) (त्यांना) सांगा, 'माझा स्वत:चा फायदा किंवा नुकसानही माझ्या अखत्यारीत नाही. पण घडणार तेच, जे अल्लाह इच्छील.' प्रत्येक जनसमूहाकरिता एक अवधी निश्चित केलेला आहे. आणि जेव्हा त्यांच्या ठरलेल्या अवधीचा शेवट येतो, तेव्हा ना एक क्षण ते मागे राहू शकतात, ना एक क्षण पुढे जाऊ शकतात (म्हणजे त्यात क्षणाचाही बदल करू शकत नाहीत). 50 (त्यांना) सांगा, '(याबद्दल तुम्ही कधी विचार केला आहे

का?) जर अल्लाहची शिक्षा (अचानकपणे) रात्री किंवा दिवसा तुमच्यावर येऊन ठेपली, तर अपराधी लोक त्यापासून (स्वत:ची सुटका करण्याचे कितीही प्रयत्न केले तरी), सुटका कशी करून घेतील,ज्यासाठी ते घाई करीत आहेत. 51 मग जेव्हा ती शिक्षा (तुमच्यावर) येऊन ठेपेल, तेव्हा तुम्ही तिच्यावर विश्वास ठेवणार आहात? (न्यायाच्या दिवशी जेव्हा शिक्षा समोर असेल तेव्हा तुम्हाला विचारले जाईल), आता यावर विश्वास ठेवता! (कारण या आधी तर) तुम्ही ती लवकर यावी असे म्हणत होता.’ 52 तेव्हा त्या लोकांना सांगितले जाईल, जे (आपल्या आयुष्यात) पापकृत्ये करण्यास पेटून उठले होते. ‘आता चाखा अनंतकालीन शिक्षेची चव. हा केवळ तुमच्या कमाईचाच मोबदला आहे, जी कमाई तुम्ही (आपल्या हातांनी करीत राहिलात).’

53 आणि काही लोक तुम्हाला विचारतात, ‘हे सर्व सत्य आहे का?’ (त्यांना) सांगा, ‘होय माझ्या पालनकर्त्याची शपथ! ते अगदी सत्य आहे, आणि तुम्ही ते (अंतिम हिशेब) आपल्यावरून (कदापि) टाळू शकत नाही. 54 आणि (आपल्या आयुष्यात) वाईट कृत्ये करीत राहिलेल्या प्रत्येक व्यक्तीला (न्यायाच्या दिवशी असे वाटू लागेल की), पृथ्वीवर जे काही आहे, ते सर्व तिला प्राप्त झाले, तर ते (सर्व) आपल्या सुटकेच्या मोबदल्यात देऊन टाकू इच्छील. (पण वस्तुत: कोणाकडेही तेव्हा काहीच असणार नाही). आणि जेव्हा ते ती शिक्षा पाहतील, तेव्हा ते आपला पश्चात्ताप व्यक्त करण्यास असमर्थ असतील. आणि त्यांच्यादरम्यान न्यायपूर्वक निर्णय करण्यात येईल. आणि त्यांच्यावर (मुळीच) अन्याय केला जाणार नाही. 55 लक्षात असू द्या, आकाशात आणि पृथ्वीवर जे काही आहे, ते सर्व अल्लाहच्याच मालकीचे आहे. लक्षात ठेवा की, अल्लाहचे वचन नि:संदेह सत्य आहे. पण बहुसंख्य लोकांना याची जाण नाही. 56 तोच आहे जो जीवन प्रदान करतो आणि त्याच्याच (आदेशाने) तुम्हाला मृत्यू येतो. आणि (शेवटी) तुम्हा सर्वांना त्याच्याकडेच परत जायचे

आहे.

57 लोकांनो! (आता) तुझ्या पालनकर्त्याकडून तुझ्याकडे उपदेश आलेला आहे, व (हा उपदेशपूर्ण ग्रंथ), अंत:करणामध्ये जे काही (विकार) आहेत, त्यावर एक उपाय आहे. आणि विश्वास ठेवणाऱ्यांसाठी मार्गदर्शन व कृपा आहे.
58 (त्यांना) सांगा, 'हा (ग्रंथ) अल्लाहची कृपा व त्याच्या दयेने अवतरित झालेला आहे. तर (श्रद्धावंतांनी) याबद्दल आनंदित व्हावे, (कारण) हा (ग्रंथ जगातील) त्या सर्व गोष्टींपेक्षा श्रेष्ठ आहे, जे ते गोळा करण्याच्या मागे लागलेले आहेत.'
59 (पैगंबर!) (त्यांना) विचारा, 'तुम्ही याविषयी कधी विचार केला आहे का? की, अल्लाहने तुमच्यासाठी उपजीविकेची (सर्व) तरतूद केली होती, मग तुम्ही (स्वत:हून) त्यातून काही (वस्तू) निषिद्ध ठरवल्या आणि काही वैध.' (त्यांना) विचारा, 'अल्लाहने तुम्हाला (असे करण्याची) परवानगी दिली होती का की, तुम्ही (स्वत:) खोट्या गोष्टी रचून त्याचा संबंध अल्लाहशी जोडत आहात?'
60 ते लोक, जे अल्लाहविषयी खोट्या गोष्टी रचतात, पुनरुत्थानाच्या दिवसाबद्दल काय धारणा बाळगून आहेत? नि:संदेह, अल्लाह लोकांप्रति असीम कृपाशील आहे, पण लोकांत बहुसंख्य (अल्लाहचे) आभार मानणारे नाहीत.

61 (पैगंबर!) तुम्ही ज्या कोणत्या अवस्थेत असता आणि (लोकांना) कुराणाचा जो कोणता भाग ऐकवीत असता आणि जे काही कार्य तुम्ही (सर्व जण) करीत असता. (तर लक्षात असू द्या की), जेव्हा तुम्ही त्यात मग्न असता, आम्ही तुम्हाला पाहत असतो. आकाशात व पृथ्वीवर (म्हणजे समस्त विश्वात) अगदी कणाइतकी वस्तू देखील तुमच्या पालनकर्त्याच्या दृष्टीपासून लपून राहू शकत नाही. आणि त्यापेक्षा लहान किंवा मोठी अशी कोणतीही वस्तू नाही जी एका सुस्पष्ट ग्रंथात नमूद केलेली नाही.
62 (हे जाणून घ्या की), जे अल्लाहचे मित्र आहेत, त्यांना कसलेही भय पोचणार नाही, ना ते (कधी) दु:खी होणार.
63 कारण हेच ते लोक आहेत, ज्यांनी श्रद्धा धारण केली आणि (नेहमी)

अल्लाहची जाण ठेवून (त्यांनी जीवन व्यतीत केले). 64 त्यांच्यासाठी शुभवार्ता आहे, या जीवनात आणि मृत्यूनंतरच्या जीवनातही. अल्लाहच्या शब्दांत (कधीही) बदल होत नसतो. आणि हेच आहे सर्वश्रेष्ठ यश! 65 (सत्य नाकारणाऱ्या लोकांच्या) शब्दांनी तुम्ही दु:खी होऊ नका. नि:संदेह, सर्व शक्ती आणि कीर्तीचा मालक केवळ अल्लाह आहे. आणि तोच सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा आहे.

66 (या गोष्टीची जाण ठेवा की), जे काही आकाशात आहे व जे काही जमिनीवर आहे, ते सर्व अल्लाहचेच आहे. आणि जे लोक अल्लाहला सोडून, त्यांचा धावा करतात, ज्यांना त्याच्या बरोबरीचे स्थान दिले जाते, तर असे लोक कशाचे अनुसरण करीत आहेत? ते केवळ (इतरांच्या) भ्रामक कल्पनांचे अनुसरण करीत आहेत. आणि ते केवळ अटकळी बांधीत आहेत. 67 अल्लाह तर तो आहे, ज्याने तुमच्यासाठी रात्र बनवली, यासाठी की, तुम्हाला विश्रांती लाभावी. आणि दिवसाला प्रकाशमय बनविले. निश्चितच यामध्ये त्या लोकांसाठी संदेश असलेल्या खुणा आहेत, जे (गंभीरतापूर्वक) ऐकतात.

68 (अल्लाहची महिमा उघड असतानाही) ते म्हणतात, 'अल्लाहने स्वत:साठी पुत्र बनविला आहे!' तो असीम महिमावान आहे! तो आत्मनिर्भर आहे (स्वयंपूर्ण आहे). आकाशात जे काही आहे व पृथ्वीवर जे काही आहे, ते सर्व त्याचेच आहे. (या वक्तव्यासंबंधाने) तुमच्याकडे कोणताच पुरावा नाही. तुम्ही अल्लाहशी अशा गोष्टीचा संबंध जोडणार का, ज्याचे तुम्हाला (मुळीच) ज्ञान नाही? 69 (पैगंबर!) सांगून टाका, 'जे लोक अल्लाहविषयी खोट्या गोष्टी रचतात, ते कधीच यशस्वी होऊ शकत नाहीत.' 70 त्यांना (या) जगात काही क्षणिक लाभ प्राप्त होतील, (पण) नंतर त्यांना आमच्याकडेच परत यायचे आहे. आणि तेव्हा आम्ही त्यांना सत्य नाकारण्यावर आग्रही राहिल्याबद्दल कठोर शिक्षेची चव चाखायला लावू.

71 (तुम्ही) त्यांना (पैगंबर) नूहची कहाणी ऐकवा, जेव्हा त्याने आपल्या लोकांना म्हटले होते, ‘माझ्या बांधवांनो! तुमच्या दरम्यान माझी उपस्थिती तसेच अल्लाहच्या संदेशांद्वारे तुम्हाला तुमच्या कर्तव्यांची जाणीव करून देण्याचे माझे कार्य तुम्हाला असह्य होत असेल तर (हे जाणून घ्या की), मी केवळ अल्लाहवरच विश्वास ठेवतो. मग तुम्ही (आता माझ्या विरुद्ध) काय करणार आहात, हे पूर्ण सहमतीने (आधी) ठरवून घ्या, आणि (या कार्यात मदतीसाठी) त्यांनाही बोलावून घ्या, ज्यांना तुम्ही अल्लाहचे समकक्ष ठरवता. आणि तुम्ही कृती–योजना बनविल्या नंतर त्यात कोणतीही संदिग्धता राहू देऊ नका. आणि मग माझ्या विरुद्धच्या तुमच्या योजना अमलात आणा. आणि मला किंचितही सवड देऊ नका. 72 जर तुम्ही (मी तुम्हाला ऐकवीत असलेल्या संदेशाकडे) पाठ फिरवाल तर (स्वत:चेच नुकसान करून घ्याल). मी तुमच्याकडे कोणताही मोबदला मागितलेला नाही. मला माझा मोबदला तर केवळ अल्लाहकडून प्राप्त होणार आहे. आणि मला आज्ञा देण्यात आलेली आहे की, मी (पूर्णपणे) स्वत:ला अल्लाहच्या स्वाधीन करून टाकावे.’ 73 मग त्यांनी त्याला (म्हणजे पैगंबर नूहला) खोटे ठरविले. तेव्हा आम्ही नूहला व त्या लोकांना जे त्याच्याबरोबर नौकेत होते, वाचविले आणि त्यांना (पृथ्वीवर) उत्तराधिकारी बनवले. आणि त्या लोकांना बुडवून टाकले, ज्यांनी आमच्या संदेश असलेल्या खुणांना खोटे ठरविले. तर पाहा, त्या लोकांचा शेवट कसा झाला, ज्यांना सावध करण्यात आले होते.

74 मग आम्ही नूहच्या नंतर (इतर) अनेक पैगंबरांना त्यांच्या लोकांकडे पाठवले, ते त्यांच्याकडे सत्याचे स्पष्ट प्रमाण घेऊन आले. पण (त्या लोकांनी) सत्याचा स्वीकार करण्यास नकार दिला, कारण त्यांनी आधीही सत्य नाकारले होते. अशाप्रकारे आम्ही मर्यादांचे उल्लंघन करणाऱ्यांच्या मनांची (कवाडे) सीलबंद करून टाकीत असतो (म्हणजे ते सत्याचा संदेश कदापि ग्रहण करणार

नाहीत).

75 मग त्यांच्यानंतर आम्ही मूसा व हारून यांना फिरऔन व त्याचे सरदार यांच्याकडे आमचे संदेश देऊन पाठविले. पण त्यांनी मगरुरीचे वर्तन केले. कारण ते पापी लोक होते. 76 आणि जेव्हा आमच्याकडून त्यांच्याकडे सत्याचा (संदेश) पोचला, तेव्हा ते म्हणाले, 'ही तर साफ जादू आहे.' 77 मूसाने म्हटले, 'तुम्ही (अल्लाहकडून) तुमच्याप्रत आलेल्या (उघड) सत्याला जादू म्हणता? ही जादू असू शकते का? वस्तुत: जादूगार कधीच यशस्वी होऊ शकत नाहीत.' 78 (त्यावर) त्यांनी उत्तर दिले, 'तुम्ही आमच्याकडे यासाठी आला आहात का की, आमचे वाडवडील ज्याचे अनुसरण करताना आम्हाला आढळून आले त्या मार्गापासून आम्हाला दूर न्यावे? (तुमचा असा हेतू आहे का की), तुम्हा दोघांना या देशात मोठेपणा प्राप्त व्हावा? पण आम्ही तुमचे म्हणणे (अजिबात) मान्य करणार नाही.'

79 तेव्हा फिरऔन म्हणाला, '(देशातील) सर्व निष्णात जादूगारांना माझ्याकडे घेऊन या' 80 आणि जेव्हा जादूगार तेथे आले, तेव्हा मूसाने त्यांना म्हटले, 'तुम्हाला जे काही फेकायचे आहे, फेका.' 81 आणि जेव्हा जादूगारांनी आपल्या लाठ्या व दोऱ्या फेकून (लोकांची नजरबंदी केली) तेव्हा मूसाने म्हटले, 'तुम्ही हे जे काही सादर केले आहे, ती केवळ जादू आहे, जिला अल्लाह निश्चितपणे निष्फळ ठरवील. कारण अल्लाह अनाचार माजविणाऱ्यांची कामे कधीही सफल होऊ देत नाही.' 82 आणि अल्लाह आपल्या आदेशाने सत्याला सत्य म्हणून प्रस्थापित करतो, मग त्याबद्दल दुराचारी लोकांना कितीका वाईट वाटेना.

83 तथापि मूसाचे म्हणणे, त्याच्या लोकांपैकी काही तरुणांखेरीज कोणीही मान्य केले नाही. कारण त्यांना (राजा) फिरऔन व त्याच्या सरदारांचे भय वाटत होते की, कदाचित ते त्यांचा (क्रूररित्या) छळ करतील. निश्चितच फिरऔन देशात अतिशय जुलमी (राजाप्रमाणे वावरत होता). आणि तो त्या

लोकांपैकी होता, ज्यांनी सर्व मर्यादांचा भंग केला. 84 आणि मूसा म्हणाला, 'माझ्या समाजबांधवांनो! जर तुम्ही अल्लाहवर (सच्ची) श्रद्धा ठेवणारे असाल व तुम्ही (खरोखर) स्वत:ला त्याला समर्पित केलेले असाल तर केवळ त्याच्यावरच (दृढ) विश्वास ठेवा. 85 त्यावर त्यांनी उत्तर दिले, 'आम्ही अल्लाहवरच विश्वास ठेवलेला आहे, हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला अत्याचारी लोकांसाठी छळाचे साधन बनवू नकोस. 86 आणि तुझ्या कृपेने आम्हाला सत्य नाकारणाऱ्या लोकांपासून मुक्त कर.'

87 आणि (अशाप्रकारे) आम्ही मूसा व त्याचा भाऊ (हारून) यांच्याकडे (आमचा आदेश) पाठविला की, आपल्या लोकांसाठी शहरात काही घरांची निवड करा आणि त्या घरांना प्रार्थनागृह बनवा, व (त्यात) नित्य प्रार्थना करा (म्हणजे नमाज़ पढा)आणि (हे मूसा!) श्रद्धावंतांना (अल्लाहच्या कृपेची) शुभवार्ता दया.

88 आणि मूसाने (अल्लाहकडे) प्रार्थना केली, 'हे आमच्या पालनकर्त्या! तू फिरऔन व त्याच्या सरदारांना या जगातील जीवनात (भरपूर) थाटामाटाची साधने आणि धन-दौलत देऊन ठेवली आहेस. (पण) हे आमच्या पालनकर्त्या! त्याचा परिणाम असा झालेला आहे की, ते लोकांना तुझ्या मार्गापासून दूर नेत आहेत. हे आमच्या पालनकर्त्या! त्यांच्या धन-दौलतीचा समूळ नाश कर, आणि त्यांच्या हृदयांना पाषाणासारखे करून टाक, म्हणजे त्यांनी तोपर्यंत श्रद्धा धारण करू नये, जोपर्यंत ते त्या दु:खदायी शिक्षेला (आपल्या डोळ्यांनी) पाहत नाहीत.'

89 (अल्लाहने) उत्तर दिले, 'तुम्हा दोघांच्या प्रार्थनेला (विनंतीला) स्वीकृती देण्यात आली आहे. तर (आता) तुम्ही दोघे धैर्यशील राहा. आणि त्या लोकांच्या मार्गाचे (अजिबात) अनुसरण करू नका, ज्यांना ज्ञान नाही.'

90 आणि आम्ही इस्राईलच्या मुलांना समुद्र पार करण्यास साहाय्य केले.

तेव्हा फिरऔन व त्याच्या सैन्याने मोठ्या घमेंडीने आणि आक्रमकतेने त्यांचा पाठलाग केला. (व) तोपर्यंत (पाठलाग करीत राहिले) की, जेव्हा फिरऔन (हतबल झाला व) बुडू लागला, तेव्हा (मात्र) त्याने उद्‌गारले, 'मी (सत्य) श्रद्धेचा अंगीकार करतो की, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही, ज्याच्यावर इस्राईलची मुले विश्वास ठेवतात. (आता) मी ही त्यांच्यात सामील होतो आहे जे त्यास शरण गेलेले आहेत.' 91 (पण अल्लाहने उत्तरादाखल म्हटले), 'आता..... ? (तू श्रद्धावंत बनणार आहेस ?) या आधी तर तू नेहमी (आमच्या विरुद्ध) विद्रोह करीत राहिलास. आणि (तू) त्या लोकांपैकी होतास जे (पृथ्वीवर) उत्पात माजवतात. 92 तर आज आम्ही तुझे केवळ शरीर वाचवू, म्हणजे तू तुझ्यानंतर येणाऱ्यांसाठी बोधपर चिन्ह व्हावेस. खरोखर बहुतांश लोक आमच्या संदेश व्यक्त करणाऱ्या खुणांकडे दुर्लक्ष करीत असतात.'

93 आणि (त्यानंतर) आम्ही इस्राईलच्या मुलांना पवित्र भूमीत (म्हणजे ज्यावर अल्लाहची विशेष कृपा झाली– वास्तव्य करण्यासाठी जागा दिली. आणि त्यांना सर्वोत्तम उपजीविका प्रदान केली. आणि त्यांच्याप्रत (अल्लाहकडून प्रकट झालेले) ज्ञान पोहोचले तोपर्यंत, त्यांनी मतभेद केला नाही. (म्हणजे अल्लाहकडून प्रकट झालेले ज्ञान पोचल्यानंतर त्यांनी मतभेद करायला सुरुवात केली). तुझा पालनकर्ता पुनरुत्थानाच्या दिवशी त्यांच्या दरम्यान अवश्य फैसला करील, ज्याबाबतीत ते मतभेद करीत होते.

94 आणि जर तुम्हाला तुमच्याकडे पाठवण्यात आलेल्या या ग्रंथाविषयी (जराशीही) शंका असेल तर तुमच्यापूर्वी प्रकट झालेल्या ग्रंथाचे पठण करणाऱ्यांना विचारा. (आणि तुम्हाला आढळेल की), नि:संदेह, तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याकडे 'सत्य' आलेले आहे, म्हणून तुम्ही शंका घेणाऱ्यांपैकी होऊ नका.
95 आणि तुम्ही त्या लोकांपैकी होऊ नका, जे अल्लाहच्या संदेशांना खोटे ठरविण्यावर आग्रही राहिले. अन्यथा तुमचा समावेश नाश पावणाऱ्या लोकांत

होईल.

96 नि:संदेह, ज्यांच्याबाबतीत तुमच्या पालनकर्त्याचा फैसला झाला (की ते श्रद्धावंत बनणार नाहीत), तर (असे लोक) कदापि श्रद्धा धारण करणार नाहीत. 97 मग त्यांच्याकडे 'सत्या' चा संदेश असलेल्या सर्व प्रकारच्या खुणा का येत नाहीत. जोपर्यंत ते भयानक शिक्षेला (त्यांच्याकडे येताना) पाहणार नाहीत (तोपर्यंत ते कदापि श्रद्धा धारण करणार नाहीत). 98 मग (मानवाच्या इतिहासात असे) कधीही घडले नाही की, एखाद्या जनसमूहाने (अल्लाहच्या) प्रकोपाला पाहून श्रद्धा धारण केली आणि त्यांची श्रद्धा त्यांच्यासाठी फायद्याची ठरली. याला अपवाद फक्त (पैगंबर) यूनुसचा जनसमूह आहे. जेव्हा त्यांनी (अल्लाहच्या प्रकोपाला ओळखून) श्रद्धा धारण केली, तेव्हा आम्ही या जगात (त्यांच्यावर कोसळणारी) अवहेलनेची शिक्षा (त्यांच्यापासून) दूर केली. आणि आम्ही त्यांना एका कालावधीपर्यंत जीवनाचा उपभोग करण्याची संधी दिली.

99 आणि जर तुझ्या पालनकर्त्याने इच्छिले असते, तर पृथ्वीवर निवास करणाऱ्या सर्वच्या सर्व लोकांनी श्रद्धा धारण केली असती. तर मग तुम्ही लोकांना श्रद्धा धारण करण्यासाठी विवश करणार की काय? (म्हणजे तुझ्या पालनकर्त्याची परीक्षा पाहण्याची योजना आहे).

100 अल्लाहच्या इच्छेशिवाय श्रद्धावंत बनावे हे कोणासाठीही शक्य नाही, आणि अल्लाह बुद्धीचा वापर न करणाऱ्या लोकांना (शंका-कुशंकेच्या) घाणीत लोटून देतो.

101 (त्यांना) सांगा, 'आकाशात व पृथ्वीवर जे काही अस्तित्वात आहे त्याकडे पाहा (त्यावर विचार करा).' पण संदेश असलेल्या खुणा व सावध करणारे इशारे, त्या लोकांसाठी (अजिबात) लाभदायी ठरत नाहीत, जे विश्वास ठेवणारे नाहीत. 102 ज्या प्रकारचे दिवस यांच्यापूर्वीच्या लोकांवर आले होते, त्याच प्रकारचे दिवस त्यांच्यावरही येण्याची ते (आपल्या आचरणांद्वारे) प्रतीक्षा

करीत आहेत की काय? (म्हणजे विनाशाचे जे दिवस सत्य नाकारणाऱ्या लोकांवर आले होते). (त्यांना) सांगा, 'मग प्रतीक्षा करा, मी देखील तुमच्यासह प्रतीक्षा करणाऱ्यांमध्ये सामील आहे.' 103 तेव्हा आम्ही आमच्या पैगंबरांना आणि श्रद्धा धारण केलेल्या लोकांना वाचवतो (आणि त्या सर्वांना जे सत्य नाकारतात व आमच्या संदेशांना खोटे ठरवतात, नष्ट करून टाकतो). श्रद्धावंतांना वाचवणे हे आमचे कर्तव्य आहे.

104 (पैगंबर!) त्यांना सांगा, 'लोकांनो! जर तुम्ही माझ्या धर्माबाबत साशंक असाल तर (लक्षात ठेवा), तुम्ही अल्लाहला सोडून ज्यांची उपासना करता, त्यांची उपासना मी करीत नाही. तर मी फक्त (एका) अल्लाहचीच उपासना करतो, जो तुम्हाला मृत्यू देतो. आणि मला अशी आज्ञा करण्यात आलेली आहे की, मी श्रद्धावंतांपैकी व्हावे.' 105 आणि आपले ध्यान सदैव (सत्य) श्रद्धेकडे पूर्ण एकाग्रतापूर्वक ठेवा (म्हणजे अढळपणे सत्य श्रद्धेवर कायम राहा). आणि अशा लोकांत (अजिबात) सामील होऊ नका, जे इतरांना अल्लाहचे सहभागी ठरवतात.
106 आणि अल्लाहशिवाय अन्य कोणाचाही धावा करू नका जे ना तुम्हाला लाभ पोचवू शकत, ना नुकसान पोचवू शकत. आणि जर तुम्ही असे कराल तर तुमचा समावेश दुराचारी लोकांत होईल. 107 आणि (याची जाण ठेवा की,) जर अल्लाहने तुमच्यावर एखादे संकट पाठवले तर त्याच्याशिवाय असा दुसरा कोणीही नाही, जो ते दूर करू शकेल. तसेच जर त्याने तुमचे भले करण्याचे ठरवले तर त्याच्या कृपेस रोखू शकेल असा कोणीही नाही. तो आपल्या भक्तांपैकी ज्याच्या बाबतीत इच्छितो, त्यास ती कृपा प्रदान करतो. तो फार क्षमाशील व दयाळू आहे.

108 (पैगंबर!) (लोकांना) सांगून टाका, 'लोकांनो! आता तुमच्या पालनकर्त्याकडून सत्य तुमच्याप्रत येऊन पोचले आहे. तेव्हा जो कोणी आलेल्या मार्गदर्शनाचा अंगीकार करतो, तर स्वत:च्याच भल्यासाठी करतो. आणि जो कोणी त्यापासून स्वत:ला दूर नेईल तर स्वत:लाच संकटात लोटेल. आणि मी

तुमच्या आचरणासाठी जबाबदार नाही.’ 109 आणि (हे पैगंबर!) तुम्ही फक्त त्याचेच अनुसरण करा जे तुमच्याकडे प्रकट करण्यात येत आहे. आणि अल्लाह आपला निर्णय सुनावण्यापर्यंत संयम ठेवा. आणि तो सर्वश्रेष्ठ न्यायाधीश आहे.

# सूरह-११. हूद

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 अलीफ० लाम० रा० हा आहे अल्लाहचा ग्रंथ ज्यातील संदेश-वचन (सर्व बाजूंनी) स्पष्ट आहेत. तसेच त्याचे तपशीलवार स्पष्टीकरण अशा जाणकाराद्वारे करण्यात आलेले आहे, जो बुद्धिवंत आहे, सर्व काही जाणणारा आहे. 2 (हा ग्रंथ तुम्हाला, ही शिकवण देतो की), तुम्ही अल्लाहशिवाय इतर कोणाचीही उपासना करू नये. (पैगंबर! त्यांना सांगा), मी त्याच्याकडून तुम्हाला सावध करण्यासाठी आणि शुभवार्ता देण्यासाठी आलेलो आहे. 3 आणि तुम्ही आपल्या पालनकर्त्याकडे क्षमायाचना करा आणि आपल्या (भूतकाळाबद्दल) पश्चात्ताप व्यक्त करीत त्याच्याकडे वळा. (तर) तो तुम्हाला एका निर्धारित कालावधीपर्यंत (या जीवनात) चांगली जीवनसामग्री देईल आणि (मृत्यूनंतरच्या जीवनात) तो प्रत्येकाला त्याच्या गुणवत्तेनुसार भरपूर मोबदला देईल. पण जर तुम्ही पाठ फिरवाल, तर खचितच मला त्या भयावह दिवशी तुमच्या बाबतीत मोठ्या शिक्षेचे भय वाटते. 4 (लक्षात ठेवा) तुम्हा सर्वांना अल्लाहकडेच परत जायचे आहे आणि सर्व वस्तुमात्रांवर त्याचेच (पूर्ण) नियंत्रण आहे.

5 पाहा, ते लोक (जे या ग्रंथातील सत्य नाकारण्यावर आग्रही आहेत) स्वत:ला झाकण्याचे प्रयत्न करीत आहेत, म्हणजे (आपल्या विचारांना) (अल्लाहपासून) लपवावे. जेव्हा ते वस्त्रांनी स्वत:स झाकून घेतात, तेव्हा देखील अल्लाह जाणतो, जे काही ते लपवीत असतात, आणि जे ते उघड करीत असतात. निश्चितच त्यांच्या मनात जे काही आहे, त्याचेही त्याला पूर्ण ज्ञान

आहे. 6 आणि पृथ्वीवर संचार करणारा असा कोणताही जीव नाही, ज्याच्या
उपजीविकेची जबाबदारी अल्लाहवर नाही. आणि तो जाणतो (पृथ्वीवरील) त्याच्या
(जीवनकालाचा) निर्धारित अवधी आणि त्याचे (मृत्यूनंतरचे अंतिम) वास्तव्याचे
ठिकाण(ही). आणि हे सर्व एका स्पष्ट ग्रंथात नमूद करून ठेवलेले आहे.
7 आणि तोच आहे (अल्लाह), ज्याने आकाश व पृथ्वी ला सहा दिवसात
(म्हणजे सहा कालखंडात) निर्माण केले. त्याचे सिंहासन पाण्यावर होते.

(निर्मितीमागचा हेतू असा आहे की), तुमची परीक्षा घ्यावी व पाहावे की,
तुमच्यापैकी कोण उत्तम आचरण करणारा ठरतो. आणि जेव्हा तुम्ही म्हणता
की, मृत्यूनंतर तुम्हाला अवश्य पुन्हा जिवंत केले जाईल, तेव्हा सत्य नाकारण्यावर
आग्रही असलेले लोक, नक्की हे उत्तर देतील, ‘ही तर निव्वळ जादू (फसवणूक)
आहे.’ 8 आणि जर आम्ही त्यांची शिक्षा एका निर्धारित अवधीपर्यंत लांबणीवर
टाकली, तर ते अवश्य असे म्हणतील, ‘ती कोणती गोष्ट आहे जी (आमच्या
शिक्षेला) लांबणीवर टाकत आहे?’ (लक्षात ठेवा निर्धारित मुदत संपल्यानंतर)
जेव्हा ती (शिक्षा) त्यांच्यावर कोसळेल, तेव्हा त्यांच्यापासून त्या दिवशी ती
कोणीही रोखू शकणार नाही. ती गोष्ट त्यांना वेढून टाकेल, जिची ते थट्टा करीत
असत.
9 जेव्हा आम्ही मानवाला आमच्या कृपेची गोडी चाखवतो आणि नंतर
जेव्हा ती कृपा त्याच्याकडून काढून घेतो तर तो तेव्हा हताश व कृतघ्न बनतो.
10 आणि जर आम्ही त्याच्यावर आपत्ती आल्यानंतर त्याला सुखाची गोडी
चाखवतो, तर तो असे म्हणू लागतो की, आता माझ्यावरचे सर्व संकट दूर
झाले. (असे म्हणत) तो शेखी मिरवू लागतो व घमेंड करू लागतो. 11 पण जे
संयमी व सत्कर्मे करणारे आहेत त्यांना क्षमा व फार मोठा मोबदला प्राप्त होणार.
12 (पैगंबर!) असे होऊ नये की, अल्लाहच्या संदेशाचा एखादा भाग तुम्ही
सोडून द्यावे, जो तुमच्याकडे प्रकट करण्यात आला आहे (या भीतीने की, सत्य

नाकारणारे लोक त्याला पसंत करणार नाहीत). (आणि असेही होऊ नये की), त्यांच्या अशा म्हणण्याने तुमच्या मनाला वेदना व्हाव्यात की, या (पैगंबरावर अल्लाहकडून) एखादा खजिना का पाठविला गेला नाही? किंवा त्याच्यासह एखादा (सर्वांना दिसेल असा) स्वर्गदूत का पाठविला गेला नाही? (पैगंबर! त्यांना ही साधी गोष्ट कळत नाही की), तुम्ही तर फक्त खबरदार करणारे आहात, (आणि) प्रत्येक गोष्टीचा सांभाळकर्ता (प्रतिपालक) केवळ अल्लाह आहे. 13 त्यांचे असे म्हणणे आहे का की, पैगंबराने स्वत: या कुराणाची रचना केली आहे? (तुम्ही त्यांना) सांगा, 'तुम्हीही असेच (म्हणजे अशाच गुणवत्तेचे) दहा प्रकरण (अध्याय) रचना करून आणा. (आणि या कार्यात) तुमची मदत करण्यासाठी अल्लाहला सोडून ज्यांना तुम्ही बोलावू शकता, बोलावून घ्या (आणि असे तुम्ही कराच जर) तुम्ही आपल्या म्हणण्यात खरे असाल.' 14 आणि जर त्यांनी (ज्यांना तुम्ही मदतीसाठी बोलवाल) (ते) तुमची मदत करण्यात असमर्थ ठरले, तर जाणून घ्या की, (हे कुराण) (अल्लाहकडून) त्याच्या ज्ञानासह प्रकट करण्यात आले आहे. (तो अल्लाह) ज्याच्याशिवाय दुसरा कोणीही ईश्वर नाही. मग आता तुम्ही स्वत:ला त्याच्या हवाली करणार ना?

15 जो कोणी याच जगातील जीवनाची व त्याच्या थाटामाटाची इच्छा बाळगतो, अशांना आम्ही त्यांच्या कर्मांचे फळ याच जीवनात देऊन टाकतो. आणि या बाबतीत त्यांच्या उचित हक्कात मुळीच कमतरता केली जाणार नाही. 16 (आणि) हेच असे लोक आहेत, ज्यांच्या वाट्याला (मृत्यूनंतरच्या जीवनात) आगीशिवाय दुसरे काहीही येणार नाही. आणि त्यांनी या जगात जे काही केले असेल, ते व्यर्थ ठरेल आणि जी कर्मे केली, ती सर्व निष्फळ ठरतील.

17 तो मनुष्य ज्याला त्याच्या पालनकर्त्याकडून सुस्पष्ट प्रमाण मिळालेले आहे. (आणखी त्यात भर म्हणजे) त्याच्यानंतर अल्लाहकडून सत्याची साक्ष देणारा देखील आला आहे (म्हणजे ग्रंथ), जसे (यापूर्वी) पैगंबर मूसाला ग्रंथ

देण्यात आला होता, त्यात (लोकांसाठी) मार्गदर्शन आणि कृपा होती, (तर अशा व्यक्तीची तुलना त्या श्रद्धाहीन लोकांशी कशी होऊ शकते?) असे लोकच त्यावर विश्वास ठेवतात. आणि जे (लोकांचे) समूह त्यावर अविश्वास दाखवतील, त्यांचे अटळ ठिकाण नरकाची आग आहे. म्हणून तुम्ही त्याविषयी शंका घेऊ नका. निश्चितच तुमच्या पालनकर्त्याकडून आलेले हे सत्य आहे. पण बहुसंख्य लोक विश्वास ठेवत नाहीत.

18 आणि त्यापेक्षा अधिक दुष्ट कोण असू शकतो, जो अल्लाहविषयी खोट्या गोष्टी रचून सांगतो? अशा लोकांना (न्यायाच्या दिवशी) त्यांच्या पालनकर्त्यासमोर सादर केले जाईल, आणि (त्यांच्याबद्दल) साक्ष देण्यासाठी ज्यांना बोलाविले जाईल, ते म्हणतील, 'हेच ते लोक आहेत ज्यांनी आपल्या पालनकर्त्याविषयी खोट्या (निराधार) गोष्टी पसरवल्या.' ऐका! अल्लाहकडून धिक्कारले जाण्यास पात्र आहेत, असे अत्याचारी लोक. 19 (धिक्कार आहे) त्यांच्यावर जे लोकांना अल्लाहच्या मार्गापासून रोखतात, आणि त्यात (काहीतरी) वाकडेपणा निर्माण करू पाहतात, हेच ते लोक आहेत जे मृत्यूनंतरच्या जीवनाला नाकारतात. 20 असे लोक पृथ्वीवर अल्लाह(च्या योजने)ला विफल करू शकत नाहीत. आणि अल्लाहपासून वाचवणारा त्यांना कोणीही आढळणार नाही. आणि (मृत्यूनंतरच्या जीवनात) त्यांना दुप्पट शिक्षा दिली जाईल, कारण (सत्याचा संदेश) ऐकण्याची योग्यता ते गमावून बसले होते, तसेच (त्याच्या खुणांत, त्याचे संदेश) त्यांना दिसत नव्हते. 21 हेच ते लोक आहेत ज्यांनी स्वत:ला विनाशात लोटले आहे (आणि पुनरुत्थानाच्या दिवशी) ते सर्व, जे त्यांनी रचले होते त्यांच्यापासून हरवलेले असेल. 22 यात मुळीच शंका नाही की, हेच लोक मृत्यूनंतरच्या जीवनात सर्वात जास्त वाईट अवस्थेत असतील.

23 पण ज्या लोकांनी श्रद्धा धारण केली आणि ज्यांनी सत्कर्मे केली, आणि आपल्या पालनकर्त्याला (पूर्ण) नम्रतेने (समर्पित) झाले. हेच लोक स्वर्गातील

वास्तव्यास पात्र ठरतील. आणि ते त्यात सदैव वास्तव्य करतील. 24 या दोन गटांचे उदाहरण असे आहे, जणू एक आंधळा व बहिरा, तर दुसरा डोळस व ऐकणारा आहे. हे दोन गट समान होऊ शकतात की काय? (या उदाहरणांपासून) तुम्ही बोध घेणार नाही का?

25 आणि आम्ही (पैगंबर) नूहला (हाच संदेश देऊन) त्याच्या लोकांकडे पाठविले होते. तो (त्यांना म्हणाला), 'मी तुमच्याकडे एक स्पष्ट खबरदार करणारा म्हणून आलो आहे.' 26 'तर तुम्ही अल्लाहशिवाय दुसऱ्या कोणाचीही उपासना करू नका, मला तुमच्या बाबतीत एका दुःखदायी दिवसाच्या शिक्षेचे भय वाटते.' 27 यावर त्याच्या समाजातील (त्या) प्रमुखांनी उत्तर दिले, ज्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला होता, 'आम्ही तर तुला आमच्याप्रमाणेच एक माणूस असल्याचे पाहत आहोत. तसेच आम्ही हेही पाहत आहोत की, तुझे अनुसरण अन्य कोणी नव्हे तर केवळ आमच्यातील (फार) दरिद्री (आणि निर्बुद्ध) लोकांनी केले आहे. तसेच आम्हाला तुझ्यामध्ये आमच्या तुलनेत कोणतेही श्रेष्ठत्व असल्याचे दिसून येत नाही. उलटपक्षी आमचा (तुझ्याविषयी) असा विचार आहे की, तू खोटारडा (माणूस) आहेस.'

28 त्यावर नूहने म्हटले, 'हे माझ्या समाजबांधवांनो! मला सांगा, मी (जे म्हणतो ते) माझ्या पालनकर्त्याकडून (आलेल्या) स्पष्ट प्रमाणावर आधारित आहे. आणि त्याने माझ्यावर आपली असीम कृपा केलेली आहे. (पण) तुम्हाला हे दिसत नसेल तर आणि तुम्हाला त्याचा तिरस्कार वाटत असेल तर (तो संदेश) आम्ही तुमच्यावर जबरदस्तीने थोडेच लादू शकतो. 29 हे माझ्या समाजबांधवांनो! या (संदेशाच्या) मोबदल्यात मी तुमच्याकडे कोणत्याही धन-संपत्तीची मागणी करीत नाही. मला माझा मोबदला केवळ अल्लाहकडूनच प्राप्त होणार आहे. मी त्या लोकांपैकी (कोणालाही) ज्यांनी श्रद्धा धारण केली आपल्यापासून कदापि हाकलून लावणार नाही. ते निश्चितच आपल्या

पालनकर्त्याला भेटणार आहेत. पण मी पाहतो आहे की, तुम्ही अज्ञानग्रस्त लोक आहात. [30] आणि हे माझ्या समाजबांधवांनो! जर मी (त्या अल्लाहच्या भक्तांना) हाकलून लावले तर मला अल्लाहच्या (अवकृपेपासून) वाचविण्यास कोण मदत करेल? ही (साधी गोष्ट) तुम्हाला समजत नाही? [31] आणि मी तुम्हाला असे सांगत नाही की, माझ्याकडे अल्लाहचे खजिने आहेत. तसेच (मी असेही म्हणत) नाही की, मला अदृश्याचे ज्ञान आहे. तसेच मी असेही म्हणत नाही की, मी तर स्वर्गदूत आहे. तसेच जे तुमच्या नजरेत तुच्छ आहेत त्यांच्याबाबतीत मी असे म्हणू शकत नाही की, अल्लाह त्यांचे कोणतेही कल्याण करणार नाही. त्यांच्या मनात काय आहे, ते अल्लाहला चांगले ठाऊक आहे, मी (त्यांच्या बाबतीत) असे विधान करेन तर निश्चितपणे माझा समावेश अत्याचारी लोकांत होईल.'

[32] (त्याच्या समाजातील प्रमुखांनी) म्हटले, 'हे नूह, तू आमच्याशी (बराच काळ) विवाद घालत राहिलास, आता ते अति झाले. तू तुझ्या बोलण्यात प्रामाणिक असशील तर आता आमच्यावर ती गोष्ट (म्हणजे ईश्वरीय आपत्ती) घेऊन ये, जिचे तू आम्हाला भय दाखवीत राहिलास.' [33] (पैगंबर) नूहने उत्तर दिले, 'जर अल्लाह इच्छील तर तोच ते (संकट) तुमच्यावर आणेल. आणि तेव्हा त्यातून तुम्ही (स्वत:ची) सुटका (कदापि) करून घेऊ शकणार नाही. [34] (आणि हे जाणून घ्या की), माझ्या उपदेश करण्याने तुम्हाला काहीही फायदा होणार नाही, मग मी (कितीही तळमळीने) तुम्हाला चांगले उपदेश का करीत नाही, कारण जेव्हा (स्वत:) अल्लाहचीच (अशी) मर्जी असेल की, तुम्ही सन्मार्गापासून दूर जाऊन भटकत राहावे (तेव्हा माझ्या उपदेशाने तुम्हाला सन्मार्ग कसा लाभणार?) तोच आहे तुमचा पालनकर्ता, आणि (शेवटी) त्याच्याकडेच जायचे आहे तुम्हाला परतून.'

[35] (सत्य नाकारणाऱ्या लोकांचे) असे म्हणणे आहे का? की, हे सर्व पैगंबरानेच (स्वत: होऊन) रचले आहे. (त्यांना) सांगा, 'जर (हे सर्व) मी

रचले असेन तर माझ्या पापाचे ओझे माझ्यावरच असणार (पण हे लक्षात ठेवा), जे पापकृत्य तुम्ही करीत आहात, त्यापासून मी मुक्त आहे.'

36 आणि (अल्लाहकडून) (पैगंबर) नूहकडे (शेवटी) असा संदेश पाठविण्यात आला की, आता (यापुढे) तुझ्या लोकांपैकी कोणीही श्रद्धा धारण करणार नाही, त्यांच्या व्यतिरिक्त जे आधीच श्रद्धावंत बनलेले आहेत. तर (आता) तू त्याबद्दल दु:खी होऊ नकोस, जी (पापकृत्ये) ते करीत आहेत. 37 आणि (आता) तू आमच्या नजरेसमोर आणि आम्ही तुझ्याकडे पाठविलेल्या मार्गदर्शनानुसार (एक) नौका तयार कर (ज्याद्वारे तुझे आणि तुझ्या अनुयायांचे रक्षण केले जाईल). आणि दुराचारी लोकांविषयी माझ्याकडे काहीही याचना करू नकोस. निश्चितच त्यांचे बुडणे आता अटळ आहे. 38 आणि (अशाप्रकारे) नूहने नौका बनविण्यास सुरुवात केली, आणि त्याच्या समाजातील प्रतिष्ठित समजले जाणारे लोक जेव्हा तेथून जायचे, तेव्हा ते (पैगंबर नूहवर) हसत असत. (त्यावर) नूहने म्हटले, '(आज) तुम्ही आमच्यावर हसत आहात (पण लवकरच) आम्ही तुमच्यावर हसत असू, जसे तुम्ही आमच्यावर हसत आहात. 39 जे संकट येण्यास (अगदी) तयार आहे, (आणि ज्यावर आज तुम्ही हसत आहात), तुम्हाला लवकरच कळून चुकेल की, ते कोणावर येऊन कोसळेल, आणि कोणाला अपमानित करून सोडेल. तसेच (हे ही लवकरच स्पष्ट होऊन जाईल की, मृत्यूनंतरच्या) अनंतकालीन (जीवनात) कोणावर कायमच्या शिक्षेची आपत्ती येणार आहे.'

40 (मग असे घडले) ज्याक्षणी आमचा निर्णय झाला, लगेच पाण्याचे (पृथ्वीतील) स्रोत उसळून वाहू लागले. आम्ही नूहला म्हटले, 'प्रत्येक प्रकारच्या प्राण्याची एक-एक जोडी (म्हणजे नर व मादी) नौकेत बसवून घे आणि आपल्या कुटुंबीयांना देखील, पण फक्त त्यांना सोडून ज्यांच्याविषयी (अल्लाहच्या शिक्षेचा) आधीच निर्णय झालेला आहे. तसेच सर्व श्रद्धावंतांना देखील (नौकेत

स्वार करवून घे).' आणि (त्याच्या लोकांपैकी) (फारच) थोडे लोक होते, जे
त्याच्यासोबत श्रद्धावंत बनले होते. 41 आणि नूहने (आपल्या अनुयायांना)
म्हटले, 'नौकेत बसून घ्या! अल्लाहच्याच नावाने ती चालेल आणि थांबण्यासाठी
नांगर टाकेल. नि:संदेह, माझा पालनकर्ता फार क्षमाशील व दयाळू आहे.' 42
आणि (ती) नौका पर्वतांसारख्या लाटांदरम्यान त्यांना घेऊन चालू लागली,
आणि (त्याक्षणी) (पैगंबर) नूहने आपल्या पुत्राला हाक मारली, जो (त्याच्यापासून)
दूर उभा होता, (व म्हणाला), हे माझ्या मुला! आमच्याबरोबर नौकेत ये, आणि
त्या लोकांबरोबर राहू नकोस, जे सत्य नाकारणारे आहेत. 43 (पण मुलाने)
उत्तर दिले, 'मी एखाद्या पर्वतावर चढून जाईन, जो मला बुडण्यापासून वाचवेल.'
(यावर) नूहने म्हटले, 'आज अल्लाहच्या निर्णयापासून कोणीही वाचवू शकत
नाही, पण फक्त तोच वाचविला जाईल, ज्यावर (स्वत:) अल्लाह कृपा करेल.'
(त्यानंतर) एक (प्रचंड) लाट त्या दोघांमध्ये आली आणि (पैगंबर नूहचा
मुलगा) बुडणाऱ्या लोकांत सामील झाला. 44 आणि (मग) (पृथ्वी व आकाशाला
त्यांचा मालक असलेल्या अल्लाहकडून) आज्ञा झाली, 'हे धरती! (तू) तुझे
पाणी शोषून घे, आणि हे आकाश! (तू) पाण्याचा वर्षाव बंद कर' आणि (सर्व)
पाणी ओसरून गेले. (अशाप्रकारे) (अल्लाहच्या) निर्णयाची अंमलबजावणी
झाली, आणि ती नौका जूदी (या) पर्वतावर येऊन थांबली, आणि असे सांगण्यात
आले, 'दुराचाऱ्यांनो दूर व्हा.'

45 तेव्हा नूहने आपल्या पालनकर्त्याला हाक मारली, म्हणाला, 'हे माझ्या
पालनकर्त्या! माझा मुलगा माझ्या कुटुंबाचाच एक घटक आहे, (प्रभु!) तुझे
अभिवचन नि:संशय खरे आहे, तसेच न्याय करणाऱ्यांमध्ये तू सर्वोत्तम न्यायाधीश
आहेस.' 46 (अल्लाहने) उत्तर दिले, 'हे नूह! तो तुझ्या परिवारातील मुळीच
नाही, त्याचे आचरण फार वाईट आहे. म्हणून तू माझ्याकडे असे काही मागू
नकोस, ज्याचे तुला ज्ञान नाही, (तसेच) मी तुला, ही ताकीद देतो की, तू

अज्ञानी लोकांपैकी होऊ नकोस.' 47 (त्यावर) नूहने म्हटले, 'हे माझ्या पालनकर्त्या! (पुन्हा कधी) मी तुझ्याकडे अशी गोष्ट मागण्यापासून माझे रक्षण कर, ज्याचे मला ज्ञान नाही. आणि जर तू मला माफ केले नाहीस, व माझ्यावर दया केली नाहीस तर मी निश्चितपणे बरबाद होऊन जाईन.'

48 अल्लाहने म्हटले, 'हे नूह नौकेतून खाली उतर, आमच्याकडून तुला आणि तुझ्याबरोबर असलेल्यांना शांती व समृद्धी लाभणार. आणि त्या (सदाचाऱ्यांनाही जे यांच्यापासून) जन्माला येतील, आम्ही (त्या सर्वांना) फायदा पोचवू. पण (जिथपर्यंत वाईट कृत्ये करणाऱ्यांचा संबंध आहे, जे यांच्यात जन्माला येऊ शकतात) त्यांनाही अल्प काळापर्यंत आम्ही जीवनाचा उपभोग करू देऊ, पण (शेवटी) त्यांच्यासाठी दु:खदायी शिक्षा (अटळ) आहे.' 49 (पैगंबर!) या अदृश्याच्या वार्ता आहेत, ज्या आम्ही तुमच्याकडे प्रकट केल्या आहेत. यापूर्वी त्या (वार्ता) ना तुम्ही, ना तुमचे लोक जाणत होते, तर (नूह प्रमाणे) तुम्हीही संयम ठेवणारे बना, कारण (शेवटी उज्ज्वल भविष्य) अल्लाहची जाण ठेवून जगणाऱ्यांसाठीच आहे.

50 आणि आद या जनसमूहाकडे आम्ही त्यांचा भाऊ हूद यास (पैगंबर बनवून पाठवले), तो म्हणाला, 'हे माझ्या लोकांनो! केवळ अल्लाहचीच उपासना करा, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच असा नाही की, ज्याची उपासना तुम्ही करावी. तुम्ही तर केवळ खोट्या गोष्टी रचणारे (लोक) आहात. 51 माझ्या बांधवांनो! मी या (संदेश पोचविण्याच्या कार्यापोटी) तुमच्याकडे कोणत्याही मोबदल्याची मागणी करीत नाही, मोबदला तर मला माझ्या निर्मात्याकडूनच मिळणार आहे. तर मग तुम्ही तुमच्या बुद्धीचा उपयोग का करीत नाही?'

52 'माझ्या बांधवांनो! आपल्या पालनकर्त्याकडे (आपल्या अपराधांबद्दल) क्षमा याचना करा, तसेच पश्चात्तापदग्ध होऊन त्याच्याकडेच वळा, तो तुमच्यावर भरपूर कृपावर्षाव करेल. आणि तुम्हाला अधिकाधिक सामर्थ्य प्रदान करेल.

आणि पापी लोकांप्रमाणे त्याच्याकडे पाठ फिरवू नका.’

53 (त्यावर) ते म्हणाले, ‘हे हूद! तू आमच्याकडे कोणतेही सुस्पष्ट प्रमाण घेऊन आलेला नाही आहेस, आणि आम्ही केवळ तुझ्या म्हणण्यावरून आमच्या उपास्यांचा त्याग करणार नाही. आम्ही तुझ्यावर कदापि विश्वास ठेवू शकत नाही. 54 ‘(तुझ्याविषयी) आम्ही तर केवळ असे म्हणू शकतो की, आमच्या उपास्यांपैकी एखाद्याचा तुझ्यावर शाप झालेला आहे.’ (त्यावर) (पैगंबर हूदने) उत्तर दिले, ‘मी अल्लाहला साक्षी मानतो आणि तुम्हीही या गोष्टीस साक्षी असा की, मी त्यांच्याशी माझे काहीच संबंध नसल्याचे स्पष्ट करतो, ज्यांना तुम्ही (लोक) अल्लाहच्या बरोबरीचे स्थान देता. 55 अल्लाहला सोडून, तुम्ही सर्वजण मिळून (तुमची जशी इच्छा असेल त्याप्रमाणे) माझ्याविरुद्ध, योजना आखा आणि कोणत्याही प्रकारे मला सवड देऊ नका. 56 माझा अल्लाहवर (पूर्ण) विश्वास आहे, जो माझा पालनकर्ता आहे आणि तुमचा पालनकर्ता देखील. असा कोणताही जीव (पृथ्वीतलावर) नाही, ज्याची शेंडी त्याच्या हातात नाही (म्हणजे प्रत्येक जीव पूर्णपणे अल्लाहवर अवलंबून आहे, तसेच अल्लाहचे त्यावर पूर्ण नियंत्रण आहे). नि:संदेह माझ्या पालनकर्त्याचाच मार्ग — सरळ मार्ग आहे.’

57 ‘पण जर तुम्ही पाठ फिरवण्याचाच पर्याय निवडाल, तर (लक्षात ठेवा) मी तो संदेश तुमच्याप्रत (पूर्णपणे) पोहोचवलेला आहे जो देऊन मला पाठविले गेले. (यात नवल नाही) की, माझा पालनकर्ता दुसऱ्या लोकांना (तुमचा) उत्तराधिकारी बनवेल, पण तुम्ही त्याचे काहीही वाईट करू शकत नाही. नि:संदेह माझा पालनकर्ता सर्व वस्तुमात्रांचा रक्षणकर्ता आहे.’ 58 आणि जेव्हा आमचा निर्णय येऊन धडकला, तेव्हा आम्ही आपल्या कृपेने (पैगंबर) हूद व त्याच्यासह असलेल्या त्या लोकांना वाचविले, ज्यांनी श्रद्धा धारण केली होती. तसेच आम्ही त्यांना (मृत्यूनंतरच्या जीवनातील) भयंकर शिक्षेपासूनही वाचविले.

59 आणि असा झाला आद (नावाच्या जमातीचा शेवट), ज्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या (संदेश असलेल्या) खुणांकडे (तिरस्कारपूर्वक) दुर्लक्ष केले होते. आणि त्याच्या पैगंबरांविरुद्ध विद्रोह केला होता, तसेच (सत्याच्या) प्रत्येक उद्दाम शत्रूच्या आज्ञेचे पालन केले. 60 आणि (अल्लाहच्या) धिक्काराने या जगातच त्यांचा पाठलाग केला आणि पुनरुत्थानाच्या दिवशी (तर ते पूर्णपण) नेहमीसाठी धिक्कारपात्र ठरतील. खरोखर! आद (नावाच्या या जनसमूहाने) आपल्या पालनकर्त्याला नकार दिला. निश्चितच! दूर हो (हे) आद, जो (पैगंबर) हूदचा जनसमूह होता.

61 आणि समूद (नावाच्या जमातीकडे) आम्ही त्यांचा भाऊ सालेह यास (पैगंबर नियुक्त करून) पाठवले. तो म्हणाला, 'माझ्या (जमात) बांधवांनो! केवळ अल्लाहचीच उपासना करा, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच असा नाही, ज्याची तुम्ही उपासना करावी. त्यानेच तुम्हाला मातीपासून (म्हणजे मातीतील रासायनिक घटकांपासून) निर्माण केले आणि पृथ्वीवर तुम्हाला वसविले. तर (तुम्ही) त्याच्याकडे क्षमा याचना करा, (आणि) पश्चात्तापदग्ध होऊन त्याच्याकडे वळा, नि:संदेह, माझा पालनकर्ता नेहमी जवळ असतो आणि (त्याला हाक देणाऱ्याला) प्रतिसाद देत असतो.' 62 (त्यावर) ते म्हणाले, 'हे सालेह! यापूर्वी तर आम्हाला तुझ्याकडून भरपूर अपेक्षा होत्या! तू आम्हाला त्यांच्या उपासनेपासून रोखतोस, ज्यांची उपासना आमचे वाडवडील करीत राहिले? आणि ज्या गोष्टीकडे तू आम्हाला येण्यासाठी सांगत आहेस त्याविषयी आम्ही फार संशयी आहोत,त्या संशयाने आम्हाला खूप गोंधळवून सोडले आहे.' 63 त्यावर (पैगंबर सालेहने म्हटले), माझ्या बांधवांनो! (मला सांगा), तुमचे (याविषयी) काय मत आहे? की, मी माझ्याकडे माझ्या पालनकर्त्याकडून आलेल्या स्पष्ट प्रमाणावर उभा आहे व त्याने मला आपल्याकडून (असीम) कृपा प्रदान केलेली आहे. (आता) मी जर त्याची अवज्ञा केली, (त्याच्याविरुद्ध विद्रोह केला) तर

त्याच्यापासून माझे कोण रक्षण करू शकतो? (अर्थातच कोणीच नाही). (तर तुम्ही जी गोष्ट मला देऊ करीत आहात), त्यामुळे तुम्ही अन्य काही नव्हे तर केवळ माझ्या विनाशात भर घालाल.

64 माझ्या बांधवांनो! ही अल्लाहची उंटीण आहे, जी तुमच्यासाठी (अल्लाहची एक) खूण आहे. तर तिला मोकळी सोडून द्या जेणेकरून (तिने) अल्लाहच्या भूमीवर चरत राहावे. तिला कोणत्याही प्रकारे त्रास देऊ नका, अन्यथा तुमच्यावर (ईश्वरीय) शिक्षा धावून येईल. 65 पण त्यांनी (मोठ्या) क्रूरतेने तिच्या पायाच्या शिरा कापून टाकल्या. त्यावर सालेह म्हणाला, '(आणखी) (फक्त) तीन दिवस आपल्या घरांत मौजमजा करून घ्या. हा असा निर्णय आहे, जो खोटा ठरणार नाही.' 66 जेव्हा आमचा निर्णय अमलात आला, तेव्हा आम्ही आपल्या कृपेने (पैगंबर) सालेह ला व त्या लोकांना वाचविले ज्यांनी त्याच्याबरोबर श्रद्धा धारण केली होती. तसेच (आम्ही त्यांना) (पुनरुत्थानाच्या) त्या (भयंकर) दिवसाच्या अपमानापासूनही (वाचविणार). खरोखर, केवळ तुझा पालनकर्ताच सामर्थ्यशाली व शक्तिशाली आहे. 67 आणि जे लोक अत्याचारी कृत्ये करीत राहिले, त्यांना (ईश्वरीय शिक्षेच्या) जबरदस्त स्फोटाने ग्रासून टाकले आणि ते आपल्या घरांत तोंडघशी पडून राहिले. 68 (त्यांची अशी अवस्था झाली की), जणू काही त्यात ते कधी राहिलेच नव्हते. पाहा, समूद (या जमातीने) आपल्या पालनकर्त्याचा (संदेश) मानण्यास नकार दिला, (म्हणजेच कृतघ्नतेचे वर्तन केले). तर पाहा, धिक्कारली गेली समूद (नावाची ही जमात).

69 आणि आमचे संदेशवाहक (म्हणजे स्वर्गदूत) इब्राहीमकडे शुभवार्ता घेऊन आले होते. (तेव्हा) त्यांनी त्याला 'सलाम' सांगितला. (सलाम म्हणजे तुम्हाला शांती लाभो) इब्राहीमनेही (उत्तरादाखल) 'सलाम' म्हटले. तेव्हा (इब्राहीमने आलेल्या पाहुण्यांसाठी) उशीर न करता लगेच एक भाजलेला वासरू खाण्यासाठी प्रस्तुत केला.

70 पण जेव्हा इब्राहीमने पाहिले की, ते खाण्यासाठी आपले हात पुढे करीत नाहीत, यावरून त्याला त्यांचे वर्तन काहीसे संशयास्पद वाटले आणि त्याच्या मनात त्यांच्याविषयी (घेतलेल्या शंकेपोटी) भय निर्माण झाले. (ते पाहून), ते स्वर्गदूत म्हणाले घाबरण्याचे काही कारण नाही, आम्हाला पैगंबर लूत च्या लोकांकडे पाठविण्यात आले आहे. 71 तिथे इब्राहीमची पत्नीदेखील उभी होती, जेव्हा आम्ही तिला (आमच्या दूतांकरवी) (पुत्र) इसहाक़ व (पुढे) इसहाक़नंतर (नातू) याक़ूबच्या जन्माची शुभवार्ता सांगितली, तेव्हा ती (आनंदाने) हसू लागली. 72 ती म्हणाली, छे! माझे दुर्भाग्य! मला (आता) मूल होणार? जेव्हा की, मी म्हातारी झाले आहे, आणि माझे पतीदेखील म्हातारे आहेत. खरोखर, ही तर फार विचित्र गोष्ट वाटते! 73 (त्यावर) स्वर्गदूतांनी उत्तर दिले, 'तुम्हाला अल्लाहच्या आदेशाचे आश्चर्य वाटते का? इब्राहीमच्या कुटुंबीयांनो! तुम्हांवर अल्लाहची कृपा होवो व त्याच्या कृपाप्रसादांचाही तुमच्यावर (वर्षाव) होवो! नि:संदेह, अल्लाह (सदा) स्तुतीस पात्र आहे, गौरवशाली आहे.'

74 आणि जेव्हा (आलेले पाहुणे, अल्लाहकडून आलेले स्वर्गदूत आहेत, हे स्पष्ट झाल्यानंतर) इब्राहीमचे भय दूर झाले. आणि (त्या दूतांमार्फत) त्यास शुभवार्ता प्राप्त झाली. (आणि स्वर्गदूतांचा पुढील कार्यक्रम लूतच्या लोकांना समूळ नष्ट करणे हे आहे, हे जाणून) तो आमच्याकडे लूतच्या लोकांसाठी आर्जव करू लागला. 75 कारण, इब्राहीम फार संयमी, कनवाळू आणि सदा–सर्वदा ईश्वराभिमुख असलेला (माणूस) होता (म्हणजे कायम अल्लाहचीच ओढ असलेला असा होता इब्राहीम)! 76 (यावर) आम्ही म्हणालो, 'हे इब्राहीम, (अशी विनवणी) करणे थांबव, कारण, (लूतच्या लोकांविषयी) तुझ्या पालनकर्त्याचा निर्णय आधीच झालेला आहे. आणि (आता) त्यांच्यावर अशा शिक्षेचे संकट अवश्य कोसळणार आहे. जे कोणत्याही प्रकारे टाळले जाणे शक्य नाही (म्हणजे अल्लाहचा एकदा झालेला निर्णय रद्द कधीच होत नाही).'

77 आणि जेव्हा आमचे दूत (पैगंबर) लूतकडे पोहोचले, तेव्हा त्यांच्या येण्याने तो (फार) चिंतित झाला, तसेच (आलेल्या पाहुण्यांचे आपल्या पापी लोकांपासून आपण) रक्षण करण्यास असमर्थ असल्याचे त्याला जाणवले. तो उद्गारला, 'आजचा दिवस तर संकटाचा दिवस आहे!'

78 (या पाहुण्यांचे आगमन होताच) लूतचे लोक (दुष्ट-वासनेच्या हेतूने) त्याच्याकडे धावत आले, कारण ते (दुष्ट-वासनेने प्रेरित) पापकृत्ये पूर्वीपासून करीत आलेले होते. लूतने म्हटले, 'माझ्या लोकांनो! या माझ्या मुली आहेत, (तुम्ही यांना विवाहबंधनात आणू शकता) याच तुमच्यासाठी पवित्रतम आहेत. म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझ्या अतिथींसमोर (लाजिरवाणे वर्तन करून) मला अपमानित करू नका. तुमच्यात सद्‌बुद्धी असलेला एक ही माणूस नाही का?'

79 त्या (वासनांध लोकांनी) उत्तर दिले, 'तुला हे चांगले ठाऊक आहे की, आम्हाला तुझ्या मुलींची अजिबात गरज नाही. तसेच आम्हाला काय हवे
आहे, हेही तुला चांगले ठाऊक आहे.' 80 (त्यावर) लूतने म्हटले, 'तुम्हाला पिटाळून लावण्याची शक्ती (कदाचित) माझ्यातच असती किंवा मला एखादे शक्तिशाली आश्रयस्थान लाभले असते. (तर ही वेळ माझ्यावर आली नसती).'
81 (त्यावर) ते स्वर्गदूत म्हणाले, 'हे लूत! आम्ही तुझ्या पालनकर्त्याचे पाठविलेले दूत आहोत, (तुझे) ते (शत्रू) तुझ्यापर्यंत कदापि पोहोचू शकणार नाहीत. म्हणून तू (पहाट होण्यापूर्वी) रात्रीच्या अंधारातच आपल्या परिवाराला घेऊन (येथून) निघून जा. आणि तुमच्यापैकी कोणीही मागे वळून पाहू नये. (आपल्या संपूर्ण कुटुंबाला सोबत घे), पण फक्त तुझ्या पत्नीला सोडून. (कारण) जे (संकट) या सर्व (पापी) लोकांवर येणार आहे, तेच (संकट) तिच्यावरही येणार. यांच्या (बरबादीची) ठरलेली वेळ सकाळची आहे, आणि (आता) सकाळ जवळ
नाही आहे का?' 82 आणि जेव्हा आमचा निर्णय येऊन पोहोचला, तेव्हा आम्ही

(त्या अपराधी लोकांची) वस्ती उलथून टाकली. आणि आम्ही तिच्यावर मातीच्या दगडांचा निरंतर वर्षाव केला. 83 (ते दगड) पालनकर्त्याच्या नजरेत (अपराधी लोकांसाठी) चिन्हांकित केलेले होते आणि ही वस्ती (मक्केतील) दुराचाऱ्यांपासून फारशी दूर नाही (म्हणजे हे बोध–स्थळ त्यांच्यापासून जवळच आहे).

84 आम्ही 'मदियन' या जमातीकडे त्यांचा भाऊ शुऐब यास (पैगंबर बनवून) पाठविले. तो म्हणाला, 'माझ्या बांधवांनो! केवळ अल्लाहचीच उपासना करा, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच उपासनेयोग्य नाही, ज्याची तुम्ही उपासना करावी. (जेव्हाही तुम्ही लोकांशी व्यवहार कराल) वजन आणि माप कमी करून देऊ नका. मी तुम्हाला (सध्या तुम्ही) चांगल्या अवस्थेत असल्याचे पाहत आहे. पण मला तुमच्याबाबतीत एका विनाशकारी दिवसाचे भय वाटते, जो (लवकरच) तुम्हाला आपल्या आवाक्यात घेईल. 85 आणि हे माझ्या बांधवांनो! (व्यवहारात नेहमी) न्यायोचित पद्धतीने पूर्ण माप व पूर्ण वजन द्या. लोकांना त्यांच्या हक्काच्या वस्तू कमी करून देऊ नका आणि भूतलावर उपद्रव माजवू नका. 86 जर तुम्ही (खरोखर) श्रद्धावंत असाल तर जे काही अल्लाहने तुमच्याकडे शेष ठेवलेले आहे, तेच तुमच्यासाठी सर्वोत्तम आहे. मला काही तुमच्यावर रखवालदार म्हणून नियुक्त करण्यात आलेले नाही.'

87 (त्यावर) ते म्हणाले, 'हे शुऐब! तुझी नमाज़ तुला अशी शिकवण देते का की, आम्ही त्या सर्व उपास्यांना सोडून द्यावे, ज्यांची आमचे वाड–वडील उपासना करीत असत. तसेच आम्ही आमच्या धनसंपत्तीच्या बाबतीत (तिचा) हवा तसा उपभोग करणे बंद करून टाकावे (असे म्हणायचे की काय तुला)? बरे; तूच एकमेव बुद्धिमान व सदाचारी आहेस! (असे आम्ही मानायचे?)'

88 (पैगंबर) शुऐबने उत्तर दिले, 'माझ्या बांधवांनो! मला सांगा की, जर मी (खरोखर) माझ्या पालनकर्त्याकडून (प्राप्त झालेल्या) स्पष्ट प्रमाणावर उभा

आहे. तसेच त्याने मला आपल्याकडून उत्तम उपजीविका प्रदान केलेली आहे. (तेव्हा मी तुम्हाला त्याद्वारे मार्गदर्शन करायला नको का?) मी असे (अजिबात) इच्छित नाही की, मी (स्वत:) त्याच गोष्टी कराव्यात, ज्यापासून मी तुम्हाला रोखत आहे. मी तर केवळ शक्य तेवढी सुधारणा करू इच्छितो. मला सद्‌बुद्धि तर अल्लाहकडूनच प्राप्त होईल, मी त्याच्यावरच (दृढ) विश्वास ठेवतो आणि त्याच्याकडेच माझी (नेहमी) ओढ असणार. 89 माझ्या बांधवांनो! माझ्याबद्दलची तुमची शत्रुत्वाची भावना तुम्हाला अशी कृत्ये करण्यास प्रेरित न करो की, ज्यामुळे तुमच्यावर त्या आपत्ती सारखी आपत्ती यावी, जी नूहच्या लोकांवर किंवा हूदच्या लोकांवर किंवा सालेहच्या लोकांवर आली होती. आणि लूतच्या लोकांवर आपत्ती येऊन फार काळही लोटलेला नाही. 90 तर (तुम्ही) आपल्या पालनकर्त्याकडे क्षमेची याचना करा, आणि (आपल्या भूतकाळाबद्दल) पश्चात्ताप करीत त्याच्याकडेच वळा. (कारण) माझा पालनकर्ता फार दयाळू व प्रेमळ आहे, यात मुळीच शंका नाही.’

91 त्याच्या लोकांनी उत्तर दिले, ‘हे शुऐब! तू जे काही सांगत आहेस, त्यातले फारसे आम्हाला कळतच नाही, उलटपक्षी आम्ही तर हे उघडरित्या पाहत आहोत की, तू आमच्यादरम्यान केवळ एक असहाय व्यक्ती आहेस. जर तुझ्या जमातीचे लोक नसते, तर आम्ही तुला निश्चितच दगडांनी मारून ठार करून टाकले असते. कारण तू आमचे काहीही बिघडवू शकत नाहीस.’ 92 (यावर) शुऐबने म्हटले, ‘माझ्या लोकांनो! माझी जमात तुमच्या नजरेत अल्लाहपेक्षा अधिक शक्तिशाली आहे की काय? (कारण) तुम्ही अल्लाहकडे दुर्लक्ष करून, त्याच्याकडे पाठ केलेले आहात, (म्हणजे अल्लाहला पूर्णपणे विसरून बसलेले आहात). (पण वास्तविकता तर ही आहे की), तुम्ही जे काही करीत आहात त्याला माझ्या पालनकर्त्याने वेढून ठेवलेले आहे. 93 माझ्या बांधवांनो! तुम्ही (माझ्या बाबतीत) जे करू शकता ते करा, मी तर (अल्लाहच्या मार्गात) कार्य

करीत राहीन. लवकरच तुम्हाला कळून चुकेल की, अपमानित करून सोडणारी शिक्षा (आमच्यापैकी) कोणावर येणार. (तसेच हेही उघड होईल की, आमच्यापैकी) कोण खोटे बोलणारा आहे. तर मग प्रतीक्षा करा, मी देखील तुमच्याबरोबर प्रतीक्षा करीत आहे.'

94 आणि जेव्हा आमच्या (शिक्षेचा) निर्णय येऊन पोहोचला, तेव्हा आम्ही आपल्या कृपेने शुऐबला व त्याच्यासोबत श्रद्धा धारण केलेल्या लोकांना वाचविले आणि जे लोक वाईट कृत्ये करण्यावर आग्रही होते, अशांना (आमच्या शिक्षेच्या) स्फोटाने वेढले, जेव्हा त्यांच्यावर दिवस उजाडला तेव्हा ते आपल्या घरांत (मृत अवस्थेत) तोंडघशी पडलेले होते. 95 जणू काही ते त्यांत कधी वसलेच नव्हते. पाहा, धिक्कारली गेली 'मदियन' ही जमात, जशी (यापूर्वी) 'समूद' (ही जमात) धिक्कारली गेली होती.

96 आणि आम्ही (पैगंबर) मूसालाही आपल्या संदेशांसह आणि स्पष्ट प्रमाणासह पाठविले होते. 97 (इजिप्तचा राजा) फिरऔन व त्याच्या सरदारांकडे, पण त्यांनी फिरऔनच्याच आदेशाचे पालन केले, फिरऔनचा आदेश (सत्याला) धरून नसताना देखील. 98 तो पुनरुत्थानाच्या (म्हणजे क़यामतीच्या) दिवशी आपल्या लोकांच्या अग्रस्थानी असेल. व तो त्यांना नरकाच्या आगीत घेऊन जाईल. किती वाईट ठिकाण आहे ते, ज्याकडे (तो) त्यांचे नेतृत्व करेल! 99 या जगातही (अल्लाहकडून) धिक्कार त्यांचा पाठलाग करीत राहील आणि पुनरुत्थानाच्या दिवशी देखील. किती वाईट बक्षीस आहे, जे त्यांना प्राप्त होईल!

100 हा (प्राचीन) वस्त्यांपैकी काहींचा (थोडक्यात) वृत्तांत होता, ज्याचे आम्ही तुमच्यासमोर कथन केले आहे (म्हणजे तुम्ही यापासून बोध घ्यावा). यांपैकी अद्याप काही उभ्या आहेत तर काही नष्ट झालेल्या आहेत. 101 आम्ही त्यांच्यावर अन्याय केला नाही, तर त्यांनीच स्वत:वर अन्याय केला होता. जेव्हा तुझ्या पालनकर्त्याच्या (शिक्षेचा) निर्णय (त्यांच्याकडे) पोचला, तेव्हा

त्यांची ती उपास्ये, त्यांच्या काहीच कामी आली नाहीत, ज्यांचा ते अल्लाहव्यतिरिक्त धावा करीत असत, (त्यांच्या उपास्यांनी) त्यांच्या विनाशात भर घालण्याशिवाय दुसरे काहीच केले नाही.

102 तुझ्या पालनकर्त्याची शिक्षा अशीच असते. जेव्हाही तो पापकृत्यांत बुडालेल्या वस्त्यांना शिक्षा करतो. निश्‍चितच त्याची शिक्षा करण्याची पद्धत दु:खदायी व कठोर असते. 103 या (घटनेत) त्या लोकांसाठी संदेश दडलेला आहे, जे मृत्यूनंतरच्या जीवनातील शिक्षेचे भय बाळगतात. तो असा दिवस आहे, जेव्हा समस्त मानवजातीला एकत्र आणले जाईल. त्या (न्यायाच्या) दिवशी सर्वजण हजर असतील. 104 आणि आम्ही तो दिवस (आमच्याकडून) निर्धारित केलेल्या अवधीच्या पुढे ढकलणार नाही. 105 जेव्हा तो दिवस येईल, तेव्हा कोणीही त्याच्या (म्हणजे अल्लाहच्या) परवानगीशिवाय बोलू शकणार नाही. मग (तिथे एकत्रित झालेल्या लोकां)पैकी काही लोक अभागी ठरतील आणि काही (अल्लाहच्या) कृपाप्रसादास पात्र ठरतील.

106 ज्यांच्या वाट्याला (आपल्या कृत्यांपोटी) अभागीपणा आलेला असेल. ते नरकाच्या आगीत निवास करतील, तिथे ते विलाप करतील व (दु:खाने) विव्हळत असतील. 107 त्यात ते सदैव राहतील, जोपर्यंत आकाश व पृथ्वी अस्तित्वात आहेत. मात्र त्या व्यतिरिक्त जे तुझा विधाता इच्छील. निश्‍चितच तुझा पालनकर्ता जे इच्छितो ते करतो. 108 पण जे (आपल्या कृत्यांमुळे) सुदैवी ठरतील, ते स्वर्गात असतील. तेथे ते सदैव राहतील जोपर्यंत आकाश व पृथ्वी अस्तित्वात आहेत, मात्र त्याव्यतिरिक्त जे तुझा पालनकर्ता इच्छील. हा असा कृपाप्रसाद आहे, जो कधीही खंडित होणार नाही. 109 (पैगंबर!) ते (मार्गभ्रष्ट लोक) ज्यांची उपासना करीत आहेत, त्याबाबतीत तुम्ही कुठल्याही शंकेत पडू नका. ते तर (पूर्णपणे अविचारपूर्वक) जशी उपासना त्यांचे वाडवडील करीत होते तशीच उपासना करीत आहेत. आम्ही त्यांना त्यांच्या (दुष्कृत्यांच्या

मोबदल्यात) त्यांचा हिस्सा निश्चितपणे पुरेपूर देऊ. त्यात मुळीच कमतरता केली जाणार नाही.

110 आणि (तेव्हाही असेच घडले होते जेव्हा) आम्ही (पैगंबर) मूसाला ग्रंथ दिला होता. पण त्याच्या लोकांपैकी काहींनी त्यात मतभेद निर्माण केले. आणि जर तुझ्या पालनकर्त्याकडून एक गोष्ट आधीपासून निश्चित केली गेली नसती तर त्यांच्याबाबतीत लगेच निर्णय सुनावला गेला असता (ज्या बाबतीत ते मतभेद करीत होते). आणि आता हे (लोक) त्यासंबंधात अस्वस्थ करणाऱ्या संशयात आहेत. 111 आणि तुमचा पालनकर्ता प्रत्येकास त्याने (केलेल्या चांगल्या किंवा वाईट) कर्मांबद्दल पुरेपूर मोबदला अवश्य देईल. (आणि) त्याला प्रत्येकाच्या कृत्यांची पूर्ण जाणीव आहे.

112 तर तुम्ही पूर्ण दृढतेने सन्मार्गावर कायम राहा, जसा आदेश (अल्लाहने) तुम्हाला दिलेला आहे. (तसेच) त्यांनीही (सन्मार्गावर कायम राहावे), जे क्षमा याचना करून तुमच्यासोबत आले आहेत.तर मर्यादांचे उल्लंघन करू नका. कारण तो (ते सर्व) पाहत आहे, जे काही तुम्ही करीत आहात. 113 आणि अपराधी लोकांकडे कदापि तुमचा कल असू नये, अन्यथा (मृत्यूनंतरच्या जीवनात अपराध्यांसाठी असलेली) नरकाची आग तुम्हालाही आपल्या आवाक्यात घेईल. तेव्हा अल्लाहपासून तुम्हाला वाचविणारा कोणीही असणार नाही, तसेच तुम्हाला (कोणाकडूनही कोणत्याही प्रकारचे) साहाय्य प्राप्त होणार नाही. 114 सकाळी व संध्याकाळी तसेच रात्रीच्या काही भागात (नियमितपणे) प्रार्थना करा (नमाज़ पढा). निश्चितच सत्कृत्ये दुष्कृत्यांचा नायनाट करतात. बोध घेणाऱ्यांसाठी (हा संदेश म्हणजे एक) स्मरणपत्र आहे. 115 आणि (प्रतिकूल परिस्थितीत) सहनशीलता बाळगा, कारण अल्लाह सत्कर्मे करणाऱ्यांचा मोबदला कधीही वाया जाऊ देत नाही.

116 असे का बरे झाले नाही की, तुमच्याआधी होऊन गेलेल्या पिढ्यांमध्ये

असे काही सद्‌बुद्धी लाभलेले लोक झाले असते, जे जमिनीवर उपद्रव माजविणाऱ्यांना रोखण्यासाठी पुढे सरसावले असते. पण फक्त फारच थोडे असे होते, ज्यांना आम्ही वाचविले. आणि अत्याचारी कृत्ये करणाऱ्या लोकांनी तोच मार्ग अनुसरला, ज्याने त्यांना सुख समाधान मिळवून दिले. हे लोक होतेच पापी. 117 तुझा पालनकर्ता अन्यायाने वस्त्या कधीही नष्ट करीत नाही, जेव्हा त्यांमधील लोक (एकमेकांची) सुधारणा करीत असतील.

118 तुझ्या पालनकर्त्याने इच्छिले असते तर समस्त मानवजातीला एकच जमात बनविले असते. पण ते मतभेद करत राहतील. (कारण त्याच्या योजनेनुसार त्याला मानवाची परीक्षा घ्यावयाची आहे).

119 पण त्यामध्ये त्यांचा समावेश नसेल, ज्यांच्यावर तुझ्या पालनकर्त्याने कृपा केलेली असेल. त्याने सर्वांना यासाठीच निर्माण केले. (म्हणजे या परीक्षेसाठी की, कोण स्वत:ला त्याच्या कृपेस पात्र बनवतो व कोण बनवत नाही). पण जे लोक (ईश्वरीय मार्गदर्शन स्वीकारण्यास नकार देतात, अशांसाठी) तुझ्या पालनकर्त्याचे (हे) शब्द प्रत्यक्षात येतील की, 'मी जिन्न आणि माणसे या सर्वांनी नरक भरून टाकीन.'

120 (पैगंबर!) आम्ही तुम्हाला (आधीच्या) पैगंबरांच्या वार्ता यासाठी ऐकवीत आहोत, त्यांद्वारे तुमच्या मनाला खंबीर करणे (हा उद्देश आहे). आणि या वृत्तांतातून तुमच्याकडे सत्य (ही) प्रकट झालेले आहे, तसेच (त्यांत) श्रद्धावंतांसाठी उपदेश व स्मरण करून देणाऱ्या गोष्टी आहेत. 121 आणि जे विश्वास ठेवणारे नाहीत, त्यांना सांगा, '(तुम्हाला अल्लाहचा मार्ग नकोच असेल तर ठीक आहे) तुम्ही तुमच्या मार्गाने कार्य करीत राहा आणि आम्ही आमच्या मार्गाने (म्हणजे अल्लाहच्या मार्गाने) कार्य करीत आहोत. 122 आणि (अल्लाहकडून जे येणार आहे) त्याची प्रतीक्षा करा. आम्ही देखील प्रतीक्षा करीत आहोत.'
123 आकाश आणि पृथ्वी यांच्यात असलेली सर्व रहस्ये केवळ अल्लाहलाच

माहीत आहेत. (कारण जे काही अस्तित्वात आहे, त्यांची सुरुवात करणारा तोच आहे) आणि सर्व गोष्टी शेवटी त्याच्याकडेच परतविल्या जातील. म्हणून तुम्ही त्याचीच उपासना करा आणि त्याच्यावरच विश्वास ठेवा. आणि तुम्ही जे काही करीत आहात त्यापासून, तुमचा पालनकर्ता मुळीच अनभिज्ञ नाही.

# सूरह-१२. यूसुफ़

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 अलीफ० लाम० रा० हे (अल्लाहकडून प्रकट झालेले) स्पष्ट संदेश आहेत.
2 आम्ही (हा गंभीर संदेश) अरबी भाषेत असलेल्या कुराणाच्या स्वरूपात
प्रकट केला आहे. म्हणजे तुम्ही त्यापासून बोध ग्रहण करावे (हा उद्देश). 3
(पैगंबर!) आम्ही तुम्हाला या कुराणाद्वारे, जे आम्ही तुमच्याकडे पाठवीत आहोत,
त्यात (आधीच्या) सर्वोत्तम वृत्तांतांपैकी एक वृत्तांत ऐकवीत आहोत. यापूर्वी
निश्चितच तुम्ही यापासून अनभिज्ञ होता.

4 जेव्हा यूसुफने आपल्या पित्यास म्हटले, 'हे माझ्या पित्या! मी असे स्वप्न
पाहिले आहे की, अकरा तारे आणि सूर्य व चंद्र आहेत, व ते मला वंदन करीत
आहेत.' 5 (हे ऐकून पैगंबर याकूबने) म्हटले, 'माझ्या मुला! हे स्वप्न आपल्या
भावांसमोर सांगू नकोस, नाहीतर ते (मत्सरापोटी) तुझ्याविरुद्ध एखादा कट
रचतील. कारण सैतान हा मनुष्याविरुद्ध पेटून उठलेला शत्रू आहे. 6 कारण
(जसे तुला स्वप्नात दाखवण्यात आले) त्याप्रमाणे तुझा पालनकर्ता तुझी निवड
करील आणि तुला घटनांचे आतील सत्य जाणण्यास शिकवील. तो तुझ्यावर व
याकूबच्या वंशजावर आपली पूर्ण कृपा करील ज्याप्रमाणे त्याने तुझे पूर्वज -
इब्राहीम व इसहाक़ यांच्यावर आपली पूर्ण कृपा केलेली आहे. निःसंदेह तुझा
पालनकर्ता सर्व काही जाणणारा आहे, बुद्धिमान आहे.'

7 खरे पाहता, यूसुफ आणि त्याच्या भावांच्या घटनेत विचारणाऱ्यांसाठी

संदेश असलेल्या खुणा आहेत. 8 (यूसुफचे) भाऊ एकमेकांना म्हणू लागले, 'यूसुफ आणि त्याचा भाऊ (बेंजामीन) हेच आमच्या पित्यास आमच्यापेक्षा अधिक प्रिय आहेत; जरी आम्ही एक मोठा समूह असलो तरी (ते दोघेच त्यांना जास्त प्रिय आहेत). निश्चितच (या बाबतीत) आमचे वडील उघड-उघड चूक करीत आहेत.' 9 (त्यांच्यापैकी एक जण म्हणाला) यूसुफला संपवून टाका किंवा त्याला दूरच्या एखाद्या ठिकाणी (नेऊन) फेकून द्या. म्हणजे (त्यानंतर) पित्याचे लक्ष फक्त तुमच्याकडेच राहील. एकदा हे काम उरकून (तसेच त्याबद्दल पश्चात्ताप व्यक्त करून) तुम्ही सदाचारी लोकांप्रमाणे जीवन जगा. 10 त्यांच्यापैकी दुसऱ्या एकाने म्हटले, 'नका, यूसुफची हत्या करू नका. पण जर तुम्ही काही करण्याचे ठरविलेलेच असेल तर त्याला एखाद्या (खोल) कोरड्या विहिरीच्या तळाशी फेकून द्या, म्हणजे एखादा जवळून जाणारा प्रवाशांचा जथा त्याला बाहेर काढून (सोबत) नेईल.'

11 (यावर ते सहमत झाले, नंतर एके दिवशी) ते आपल्या वडिलास म्हणाले, 'हे आमच्या पित्या, यूसुफच्या बाबतीत तू आमच्यावर विश्वास का ठेवत नाहीस? आम्ही तर केवळ त्याचे (मनापासून) हितचिंतक आहोत. (असे असतानाही तू असे का करतोस?) 12 उद्या त्याला आमच्याबरोबर पाठवून दे, म्हणजे तो (रानातील फळे वगैरे) खाईल, (जरा) रमेल, खेळेल. (त्याच्याबाबतीत तू अगदी निश्चिंत राहा) आम्ही त्याचा चांगल्याप्रकारे सांभाळ करू.' 13 (याकूबने) उत्तर दिले, 'तुम्ही त्यास (आपल्याबरोबर) घेऊन जाण्याच्या (विचारानेच) मला दु:ख होते. आणि मला (या गोष्टीचेही) भय वाटते, (असे होऊ नये) की, तुमचे त्याच्याकडे लक्ष नसताना, एखादा लांडगा त्याला खाऊन टाकेल.' 14 (त्यावर) त्यांनी म्हटले, 'आम्ही एवढा मोठा समूह असतानाही जर खरोखर लांडग्याने त्याला खाऊन टाकले तर आम्ही अगदीच निकामी ठरू!'

15 अशाप्रकारे जेव्हा ते यूसुफला सोबत घेऊन गेले. आणि त्यांनी असा निश्चय केलेला होता की, त्याला एका (खोल) कोरड्या विहिरीच्या तळाशी टाकायचे. (अशाप्रकारे त्यांनी आपली दुष्ट योजना पार पाडली) तेव्हा आम्ही यूसुफला दिव्य प्रकटनाद्वारे हे कळविले की, (विश्वास ठेव, एक दिवस असा येईल) जेव्हा तू त्यांना त्यांच्या या कृत्याची जाणीव करून देशील, पण ते तुला ओळखणार देखील नाहीत. 16 आणि ते संध्याकाळी आपल्या पित्याकडे रडत–रडत आले (अर्थातच रडण्याचे नाटक करत). 17 (आणि) म्हणाले, 'हे आमच्या पित्या! आम्ही यूसुफला आमच्या सामानाजवळ सोडून एकमेकांशी धावण्याची स्पर्धा करीत होतो. तेव्हाच (नेमकी ही दुर्दैवी घटना घडली की,) लांडग्याने येऊन त्यास खाऊन टाकले. (आम्हाला माहीत आहे) तुम्ही आमच्यावर विश्वास ठेवणारच नाही, मग आम्ही कितीका खरे म्हणत नाही.' 18 त्यांनी यूसुफच्या शर्टवर खोटेनाटे रक्तही लावून आणले होते. (त्यावर याकूबने) उद्‌गारले, 'नाही! असे नाही! तर तुमच्या मनाने या (भयानक) कटाच्या घटनेला तुमच्यासाठी एका छोट्याशा घटनेचे स्वरूप दिलेले आहे. पण (मी तर हेच मानतो की, प्रतिकूल परिस्थितीत) संयमपूर्वक वर्तन करणे, हेच (अल्लाहच्या नजरेत) चांगले (कृत्य) आहे. तुम्ही जे काही सांगत आहात त्याबाबतीत आता केवळ अल्लाहकडेच मदतीची याचना करतो.'

19 आणि तिकडे एक (प्रवाशांचा) काफिला आला आणि त्यांनी आपल्या पाणक्याला पाणी आणण्यासाठी तिथे पाठवले. त्या पाणक्याने पाणी काढायचे भांडे विहिरीत सोडले. तोच, तो म्हणाला, 'अहो! किती शुभ गोष्ट! येथे तर एक (देखणा) मुलगा आहे.' (त्या कापिल्या वाल्यांनी) त्या मुलाला व्यापाराची वस्तू असल्याप्रमाणे स्वत:कडे (सुरक्षित) ठेवून घेतले. ते जे काही करीत होते, त्याची अल्लाहला पूर्ण जाणीव होती. 20 नंतर त्यांनी त्यास अगदी क्षुल्लक किमतीत (म्हणजेच) काही चांदीच्या दिरहमच्या मोबदल्यात विकून टाकले.

त्यांना त्याच्यापासून कोणताही लाभ मिळवण्यात स्वारस्य नव्हते.

21 आणि इजिप्तच्या ज्या माणसाने त्यास विकत घेतले होते, तो आपल्या पत्नीला म्हणाला, 'हा (आमच्याबरोबर) सन्मानाने राहील याची काळजी घे, आपण अशी आशा करू या की, तो आपल्यासाठी लाभदायी सिद्ध होईल. किंवा आपण (पुढे) त्याला आपला पुत्र म्हणूनही स्वीकारू शकतो.' अशाप्रकारे आम्ही यूसुफचे पाय त्या भूमीवर स्थिरावले. आणि (आम्ही हे यासाठी केले की), आम्ही त्यास घटनांचे आतील सत्य जाणण्यास शिकवावे. अल्लाह आपले ध्येय तडीस नेण्याच्या बाबतीत नेहमी प्रभुत्वशाली आहे, पण अनेकांना याची जाण नाही. 22 आणि जेव्हा तो (मनाने) परिपक्व झाला, तेव्हा आम्ही त्यास निर्णय शक्ती व ज्ञान प्रदान केले. आणि आम्ही चांगले कार्य करणाऱ्यांना असाच मोबदला देत असतो.

23 आणि (पुढे असे घडले की), ज्या स्त्रीच्या घरात तो राहत होता, तिने त्यास कुकर्मास प्रवृत्त करण्याचा विचार केला आणि एके दिवशी दार बंद करून म्हणाली, 'ये माझ्याजवळ.' त्यावर त्याने म्हटले, 'अल्लाह माझे (त्यापासून) रक्षण करो! (ज्यासाठी तू मला बोलावीत आहेस). तो (तुझा पती) माझा मालक आहे, त्याने मला इथे (या घरात) चांगल्याप्रकारे ठेवलेले आहे (मी त्याचा विश्वासघात करू शकत नाही). कारण अत्याचारी कृत्ये करणारे कधीही सफल होत नाहीत.' 24 आणि तिने तर या गोष्टीचा निश्चय केलेलाच होता. आणि तो देखील (म्हणजे यूसुफही) तिच्याकडे सरसावला असता, जर त्याने आपल्या पालनकर्त्याच्या सत्याचे स्पष्ट प्रमाण पाहिले नसते. आम्ही हे यासाठी केले की, दुष्कर्म व निर्लज्जता त्याच्यापासून दूर ठेवावी. खरोखर तो आमच्या निवडक भक्तांपैकी (एक) होता.

25 मग ते दोघेही दरवाजाकडे धावले. तेव्हा तिने यूसुफचा शर्ट (पकडला व) मागच्या बाजूने फाडून टाकला. (पाहता तर काय,) तिचा पती दारावर उभा

होता. ती (बदचलन, ढोंगी) स्त्री म्हणाली, 'जो तुझ्या पत्नीशी अनैतिक कर्म करण्याची इच्छा बाळगतो त्याची शिक्षा याशिवाय आणखी कोणती असायला हवी की, एकतर त्यास कैदेत टाकून दिले जावे किंवा त्यास (कठोर) दु:खदायी शिक्षा केली जावी?' 26 यूसुफने म्हटले, 'तिनेच (स्वत:) मला अनैतिक कृत्यासाठी प्रवृत्त करण्याचा प्रयत्न केला.' तेव्हा तिच्याच कुटुंबातील एका व्यक्तीने असे सूचक वक्तव्य केले, 'जर त्याचा शर्ट पुढच्या बाजूने फाटला असेल तर (हे समजावे की), ती खरे बोलत आहे व तो खोटे बोलत आहे. 27 पण जर त्याचा शर्ट मागच्या बाजूने फाटला असेल तर (हे समजावे की), स्त्री खोटे बोलत आहे व तो सत्य बोलत आहे.' 28 जेव्हा (तिच्या पतीने) पाहिले की, त्याचा शर्ट मागच्या बाजूने फाटलेला आहे, (ते पाहून) तो म्हणाला, 'हे तर तुम्हा स्त्रियांचे कारस्थान आहे (म्हणजे तुम्हा स्त्रियांच्या दुर्गुणांचे, हे एक उदाहरण होय). खरोखर तुमची कारस्थानं (फार) मोठी असतात. 29 (मग तो यूसुफला म्हणाला), 'यूसुफ, याकडे दुर्लक्ष कर, (आणि तू हे स्त्रीये!) आपल्या अपराधाबद्दल क्षमा माग, कारण चूक खरोखर तुझीच आहे.'

30 आता शहरातील स्त्रियांदरम्यान (आपसात या विषयावर) चर्चा सुरू झाली, 'उमरावाची बायको आपल्या तरूण गुलामास (स्वत:कडे) आकर्षित करण्याच्या मागे लागली आहे, त्याच्यासाठी ती प्रेमात आंधळी झाली आहे. आम्ही पाहतो आहोत की, ती तर उघडपणे वाममार्गाला लागली आहे.' 31 नंतर जेव्हा तिला (इतर स्त्रिया आपली) कुचेष्टा करीत असल्याचे कळाले, तेव्हा तिने (त्या स्त्रियांना) (आपल्या येथे येण्यासाठी) बोलावणे पाठविले. आणि त्यांच्यासाठी एका मेजवानीची तयारी केली. मग (फळ वगैरे कापून खाण्यासाठी) प्रत्येकाच्या हातात एक-एक सुरी दिली. तेव्हा ती यूसुफला म्हणाली, 'यांच्यासमोर ये'. आणि जेव्हा (त्या स्त्रियांनी) त्यास पाहिले, तेव्हा (त्याचे देखणे व्यक्तिमत्त्व पाहून) त्या आश्चर्याने (इतक्या) दंग झाल्या की, त्यांनी (फळ कापता-

कापता) आपली बोटे कापून घेतली. त्या म्हणाल्या, 'अल्लाह आमचे रक्षण करो! हा कोणी साधारण माणूस नव्हे, हा तर एक थोर स्वर्गदूत वाटतो.' 32 ती म्हणाली, 'हाच आहे तो, ज्याच्याबाबतीत तुम्ही (स्त्रिया) माझी निंदा करीत होत्या. होय मी त्याला आपल्याकडे आकृष्ट करण्याचा प्रयत्न केला होता, पण तो स्वत:ला त्यापासून वाचवीत राहिला. आता जर त्याने, मी जसे सांगत आहे तसे केले नाही तर तो निश्चितपणे कैदखान्यात जाऊन पडेल, आणि अपमानित केला जाईल. 33 यूसुफने (अल्लाहकडे प्रार्थना केली,) म्हणाला, 'हे माझ्या स्वामी! ज्या गोष्टीकडे त्या मला बोलावीत आहेत त्या गोष्टीपेक्षा मला तुरुंगात राहणेच अधिक आवडेल. तू माझ्यावर त्यांच्या मोहिनी घालण्याच्या कारस्थानांना दूर सारले नाहीस तर मी त्यांच्या मोहिनीला बळी पडू शकतो. (परिणामत:) माझा समावेश नादान लोकांत होईल.' 34 तेव्हा त्याच्या स्वामीने त्याची प्रार्थना ऐकली आणि त्या (स्त्रियांच्या) भुरळ घालणाऱ्यां योजनांपासून त्याला मुक्त केले. खरोखर, तो सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा आहे.

35 मग (तो उमराव आणि तेथील इतर लोकांनी यूसुफच्या निष्कलंकतेचे) सर्व प्रमाण पाहिल्यानंतर देखील, ते (सर्व) यावरच सहमत झाले की, काही काळासाठी याला तुरुंगवासातच ठेवून द्यावे (म्हणजे तो या स्त्रियांच्या नजरेपासून दूर राहील). 36 त्याच्याबरोबरच त्या कारागृहात अन्य दोन तरुणही दाखल झाले. (एके दिवशी) त्यांच्यातील एक जण म्हणाला, 'मी एक स्वप्न पाहिले (त्यात पाहतो तर काय की), मी (द्राक्षांपासून) दारू पिळून काढत आहे' आणि दुसरा म्हणाला, 'मी स्वप्नात असे पाहिले की, मी माझ्या डोक्यावर ठेवून भाकरी घेऊन जात आहे आणि पक्षी त्यातून खात आहेत.' (त्या दोघांनी यूसुफला विनवणी केली) की, आम्हाला त्यांचा अर्थ समजावून सांगा, कारण आम्ही पाहत आहोत की, तुम्ही एक सदाचारी व्यक्ती आहात.

37 यूसुफने म्हटले, 'येथे (दररोज) तुम्हाला जे भोजन दिले जाते, ते

येण्यापूर्वीच मी तुम्हाला त्या (स्वप्नांचा) अर्थ सांगून टाकेन. हे त्या ज्ञानांपैकी होय जे माझ्या पालनकर्त्याने मला शिकवले आहे. मी त्या लोकांचा धर्म सोडून दिलेला आहे, जे अल्लाहवर विश्वास ठेवत नाहीत आणि ते मृत्यूनंतरच्या जीवनावरही विश्वास ठेवत नाहीत.
38 आणि मी तर माझे वाडवडील इब्राहीम व इसहाक़ आणि याक़ूब यांच्या धर्माचा अवलंब केलेला आहे. आमच्यासाठी हे (मुळीच) उचित नाही की, आम्ही (इतरांना) अल्लाहच्या बरोबरीचे स्थान द्यावे. (अल्लाहचे हे मार्गदर्शन) आमच्यावर आणि मनुष्यजातीवर अल्लाहची कृपा आहे. पण बहुसंख्य लोक कृतज्ञ नाहीतच.
39 कारागृहातील माझ्या मित्रांनो! (कोणती श्रद्धा बुद्धीला जास्त पटणारी आहे) अनेक वेगवेगळ्या उपास्यांवर श्रद्धा ठेवणे चांगले की, एक सर्वशक्तिमान अल्लाहवर श्रद्धा ठेवणे चांगले? (तो सर्वशक्तिमान ज्याच्या नियंत्रणात ते सर्व आहे, जे अस्तित्वात आहे).
40 एका (सर्वशक्तिमान) अल्लाहशिवाय ज्यांचीही तुम्ही उपासना करता, ते अन्य काही नसून तुम्ही आणि तुमच्या वाडवडिलांनी रचलेली केवळ (काल्पनिक) नावे आहेत. त्यासंबंधाने अल्लाहने कोणतेही प्रमाण पाठवलेले नाही. (चूक काय आणि बरोबर काय?) हे ठरवण्याचा अधिकार केवळ अल्लाहचाच आहे. त्याने तुम्हाला असा आदेश दिलेला आहे की, त्याच्याशिवाय कोणाचीच उपासना करू नका.(नेहमीसाठी) हीच एकमेव सत्य श्रद्धा आहे. पण बहुसंख्य लोक हे जाणत नाहीत.

41 कारागृहातील माझ्या मित्रांनो! (तुमच्या स्वप्नांचा अर्थ हा आहे की,) तुमच्यापैकी ज्याने (स्वप्नात स्वत:ला दारू पिळताना पाहिले तो) आपल्या धन्यास (म्हणजे राजाला पुन्हा) मद्यपान करवील. पण दुसरा सुळावर चढवला जाईल व ज्यामुळे पक्षी त्यांच्या डोक्याचे मांस खातील. ज्या गोष्टीच्या संबंधात तुम्ही विचारीत होता, त्याचा निर्णय (अल्लाहकडून आधीच) झालेला आहे.’
42 मग यूसुफ त्या (कैद्याला) म्हणाला ज्याची सुटका होणार, असे त्याला वाटले होते, ‘(जेव्हा तू सुटून जाशील) तेव्हा तुझ्या धन्याकडे (म्हणजे राजाकडे) माझा

उल्लेख कर.' पण सैतानाने (त्या सुटून गेलेल्या माणसाला) त्याच्या धन्यासमोर (यूसुफचा) उल्लेख करण्याचा विसर पाडला. त्यामुळे (यूसुफला) (आणखी) काही वर्ष कारागृहातच राहावे लागले.

43 आणि (एके दिवशी) राजा (आपल्या दरबाऱ्यांना) म्हणाला, 'मी एक स्वप्न पाहिले (स्वप्नात पाहतो तर काय?) सात धष्टपुष्ट गाई आहेत. ज्यांना सात दुबळ्या गाई खात आहेत. (तसेच दुसरी गोष्ट मी पाहिली) धान्याची सात हिरवी कणसे आहेत आणि सात सुकलेली कणसे आहेत.' हे दरबारी लोकांनो! तुम्हाला स्वप्नांची अर्थ निष्पत्ती करता येत असेल तर मला माझ्या स्वप्नांचा अर्थ समजावून सांगा. 44 (त्यावर) त्यांनी उत्तर दिले, 'ही तर गोंधळून टाकणारी स्वप्ने आहेत, आणि अशा स्वप्नांचा खरा अर्थ आम्ही लावू शकत नाही.' 45 त्या दोन कैद्यांपैकी ज्याची सुटका झाली होती, त्याला एका दीर्घ कालावधीनंतर (अचानक यूसुफची) आठवण आली. तो म्हणाला, 'मी तुम्हाला या स्वप्नाचा खरा अर्थ सांगू शकतो, पण त्यासाठी फक्त मला (तुरुंगात यूसुफकडे) जाण्याची परवानगी द्या.'

46 (आणि तो यूसुफला भेटण्यासाठी तुरुंगात आला आणि म्हणाला) हे यूसुफ! हे सत्यनिष्ठ माणसा! मला या स्वप्नांचा अर्थ समजावून सांग की, सात धष्टपुष्ट गाईंना सात दुबळ्या गाई खात आहेत आणि धान्याची सात हिरवी कणसे आहेत व दुसरी सात सुकलेली आहेत, यावरून काय अर्थ अभिप्रेत आहे. म्हणजे मी परत जाऊन (तुझे स्पष्टीकरण) (दरबारातील) लोकांना सांगेन, म्हणजे त्यांना कळेल (की तू कसा माणूस आहेस)! 47 (त्यावर यूसुफने) उत्तर दिले, '(त्या स्वप्नांचा अर्थ असा आहे,) तुम्ही (लोक) सतत सात वर्षांपर्यंत नेहमीप्रमाणे शेती कराल, या अवधीत तुम्ही जी पिके कापाल (त्यातील सर्व धान्य) त्यांच्या कणसांतच राहू द्या, पण फक्त जे तुम्हाला खाण्यासाठी लागेल (तितकेच कणसांतून धान्य काढून घ्या). 48 मग (भरभराटीच्या त्या सात

वर्षानंतर) भयंकर दुष्काळाची अशी सात वर्षे येतील की, जे काही तुम्ही गोळा करून ठेवलेले असेल, ते सर्व (म्हणजे तो सर्व अन्नसाठा) संपून जाईल, पण फक्त तेच थोडेसे धान्य उरेल जे (बियाण्याच्या उद्देशाने) तुम्ही जतन करून ठेवले असाल. 49 मग त्यानंतर एक वर्ष असे येईल की, ज्यात भरपूर (लाभदायी) पर्जन्यवृष्टी होईल. तेव्हा परत लोक (आधीप्रमाणे) मद्य (व तेल) गाळतील.

50 मग (जेव्हा यूसुफने सांगितलेला स्वप्नांचा अर्थ राजाला कळविण्यात आला तेव्हा) राजा म्हणाला, 'त्याला माझ्याकडे घेऊन या' तर जेव्हा (राजाचा) दूत (यूसुफला राजाकडे नेण्यासाठी) यूसुफपाशी पोहोचला. तेव्हा यूसुफ त्याला म्हणाला, 'तू तुझ्या धन्याकडे परत जा आणि त्याला सांग की, ज्या स्त्रियांनी (मला पाहून) स्वत:चे हात कापून घेतले होते (त्यांच्याबद्दलचे सत्य आधी समोर आणावे). माझ्या पालनकर्त्याला निश्चितच त्यांच्या कारस्थानांची पूर्ण जाणीव आहे.' 51 (मग राजाने त्या स्त्रियांना दरबारात बोलावून) विचारले, 'त्या घटनेची काय हकिगत आहे, ज्यात तुम्ही यूसुफला मोहित करण्याचा प्रयत्न केला होतात?' त्या स्त्रिया म्हणाल्या, 'अल्लाह आमचे रक्षण करो! (सत्य हे आहे की), आम्हाला त्याच्या अंगी वाईट अशी कोणतीही गोष्ट आढळली नाही.' (त्या) उमरावाची बायको म्हणाली, 'आता जेव्हा सत्य प्रकाशात आलेलेच आहे! (तर मी खरे ते सांगून टाकते) मीच त्याला माझ्याकडे आकृष्ट करण्याचा प्रयत्न केला होता. (पण त्याने स्वत:ला त्या अनैतिक कर्मापासून वाचविले!) खरोखर तो एक प्रामाणिक माणूस आहे.'

52 (राजाच्या दरबारात झालेल्या या चौकशीबद्दल जेव्हा यूसुफला कळाले, तेव्हा तो म्हणाला), 'मी (चौकशी करण्याची मागणी केवळ यासाठी केली होती) की, माझ्या धन्यासमोर हे स्पष्ट व्हावे की, त्याच्या गैरहजेरीत मी त्याचा विश्वासघात केलेला नाही. कारण अल्लाह विश्वासघात करणाऱ्यांचे कारस्थान

कधीही यशस्वी होऊ देत नाही. [53] मी माझ्या मनाला (पूर्णपणे) निर्दोष ठरवीत नाही. (साधारणपणे) मनाचा कल तर वाईट गोष्टींकडेच असतो, पण फक्त (ती व्यक्ती वाईट कृत्य करण्यापासून वाचू शकेल) जिच्यावर अल्लाहची कृपा होईल. नि:संदेह, माझा विधाता फार क्षमाशील व कृपाळू आहे.'

[54] मग राजा म्हणाला, 'त्याला माझ्याकडे घेऊन या, म्हणजे मी त्याच्याकडून माझी विशेष सेवा करवून घेईन,' मग जेव्हा राजाचे यूसुफशी बोलणे झाले, (तेव्हा राजाला यूसुफच्या योग्यतेची जाणीव झाली) तो म्हणाला, 'आजपासून तुझ्यासाठी आमच्याकडे सन्मानाचे स्थान असेल, आणि तू आमचा (खास) विश्वासू पदाधिकारी असशील.' [55] (त्यावर) यूसुफने म्हटले, '(तर मग) देशाच्या खजिन्यावर माझी नेमणूक करून टाका, कारण मी खजिन्याचा सांभाळ चांगल्याप्रकारे करू शकतो आणि मला (त्याचे बऱ्यापैकी) ज्ञान आहे.' [56] अशाप्रकारे आम्ही यूसुफला (इजिप्त या) देशामध्ये सत्ताधिकारासह स्थापित केले, तो तेथे इच्छील त्या ठिकाणी राहू शकत होता. (अशाप्रकारे) आम्ही इच्छितो त्यावर आमची कृपा करत असतो. आम्ही चांगली कृत्ये करणाऱ्या लोकांचा मोबदला कधीही व्यर्थ जाऊ देत नाही. [57] मृत्यूनंतरच्या जीवनातील मोबदला तर त्या लोकांकरिता (या जगातील मोबदल्यापेक्षा) कितीतरी पटीने चांगला आहे, ज्यांनी श्रद्धा धारण केली आणि नेहमी अल्लाहची जाण ठेवून (जीवन व्यतीत केले).

[58] आणि (काही वर्षानंतर) यूसुफचे (सावत्र) भाऊ (धान्य खरेदी करण्यासाठी) इजिप्तला आले आणि यूसुफसमोर ते हजर झाले. यूसुफने त्यांना (पाहताक्षणी) ओळखले, पण त्यांनी यूसुफला ओळखले नाही. [59] मग जेव्हा त्याने त्यांना (धान्य वगैरे) देण्याचे कार्य आटोपले तेव्हा त्यांना म्हणाला, '(पुढच्या वेळेस तुम्ही इथे याल तर) आपल्या सावत्र भावाला देखील बरोबर घेऊन माझ्याकडे या, तुम्ही पाहत नाही का की, मी माप पुरेपूर भरून देतो,

तसेच मी उत्तम पाहुणचार करणारादेखील आहे.

60 पण जर तुम्ही त्या (सावत्र भावास) माझ्याकडे घेऊन आला नाहीत तर तुम्हाला माझ्याकडून मुळीच धान्य मिळणार नाही. (त्याला जर तुम्ही आणणार नसाल) तर माझ्याकडे (पुन्हा) येऊही नका.'

61 (त्यावर) त्यांनी उत्तर दिले की, 'आम्ही त्याला आमच्याबरोबर पाठविण्यासाठी, त्याच्या पित्यास राजी करण्याचा (पूर्ण) प्रयत्न करू. आणि आम्ही हे काम अवश्य करू.'

62 आणि (यूसुफने) आपल्या सेवकांना म्हटले, '(धान्यासाठी) त्यांनी दिलेले मूल्य, त्यांच्या सामानात ठेवून द्या.' कारण जेव्हा ते आपल्या घरी परततील, तेव्हाच त्यांना कळावे (की त्यांचे पैसे देखील परत देऊन टाकण्यात आले आहेत). (हा औदार्याचा व्यवहार पाहून) कदाचित ते पुन्हा येतील. 63
आणि जेव्हा ते आपल्या पित्याकडे परत आले, तेव्हा (आपल्या पित्यास) म्हणाले, 'हे आमच्या पित्या! (यापुढे) आम्हाला धान्य देण्यास नकार देण्यात आलेला आहे (जोपर्यंत आम्ही आमच्याबरोबर आमचा भाऊ बेंजामीन ला नेत नाही). तर (तू) आमच्याबरोबर आमच्या भावाला पाठव, म्हणजे आम्ही (यापुढेही) धान्य आणू शकू. तसेच आम्ही त्याचा चांगल्याप्रकारे सांभाळ करू.' 64
(त्यावर) (पैगंबर याकूबने) म्हटले, 'मी याच्याबाबतीतही तुमच्यावर त्याचप्रमाणे विश्वास करू की काय, ज्याप्रमाणे याच्या भावाच्या बाबतीत या आधी, मी तुमच्यावर विश्वास केला होता? पण (मी तर हेच मानता की,) अल्लाह सर्वोत्तम सांभाळ करणारा आहे. (व तोच आहे) सर्वाधिक कृपा करणारा.'

65 नंतर जेव्हा त्यांनी आपले सामान सोडले, तेव्हा त्यांना असे आढळले की, त्यांनी (धान्यासाठी दिलेले) मूल्यही परत करण्यात आलेले आहे. (हे पाहून) ते (आपल्या पित्यास) म्हणाले, 'हे आमच्या पित्या! यापेक्षा आणखी आम्हाला काय हवे? आमचे धनदेखील आम्हाला परत करण्यात आलेले आहे.

आम्ही पुन्हा (अवश्य) जाऊ, आणि आपल्या कुटुंबीयासाठी शिधासामग्री घेऊन येऊ. (पण हे पित्या! हे तेव्हाच शक्य आहे जेव्हा तू आमच्याबरोबर बेंजामीनला पाठवशील). (आम्ही तुला खात्रीपूर्वक सांगत आहोत की,) आम्ही आपल्या भावाचा काळजीपूर्वक सांभाळ करू आणि आम्हाला एका उंटाच्या (बोजाचे) धान्य जास्त मिळेल, ते आम्ही आणू. (या वेळेस जे धान्य आम्ही आणले आहे) ते फार थोडे आहे.' 66 (त्यावर याकूबने) म्हटले, 'जोपर्यंत तुम्ही अल्लाहच्या नावाने मला असे पक्के वचन देत नाही की, तुम्ही त्याला निश्चितपणे माझ्याकडे परत आणाल, तोपर्यंत मी त्याला तुमच्याबरोबर कदापि पाठविणार नाही. पण जर तुम्ही सर्वच जण एखाद्या अनपेक्षित संकटाला सामोरे जाल तर मात्र गोष्ट वेगळी आहे.' मग जेव्हा त्यांनी त्यास पक्के वचन दिले, तेव्हा त्याने म्हटले, 'आम्ही जे काही म्हणत आहोत, त्यास अल्लाह साक्षी आहे.'

67 मग त्याने म्हटले, 'माझ्या मुलांनो, (शहरात) प्रवेश करताना (सर्व जण एकत्र) एकाच दरवाजाने प्रवेश करू नका, तर वेगवेगळ्या दरवाजांनी प्रवेश करा. (पण ही वास्तविकता नेहमी लक्षात ठेवा, मी तुमचा हितचिंतक असलो तरी) अल्लाहने तुमच्यासाठी जे काही (ठरविलेले असेल) त्याबाबतीत मी तुमची कोणत्याही प्रकारे मदत करू शकत नाही. (काय घडणार या संबंधाने) निर्णय तर अल्लाहचाच असणार आहे. मी केवळ त्याच्यावरच विश्वास ठेवलेला आहे आणि विश्वास ठेवणाऱ्यांनी त्याच्यावरच विश्वास ठेवायला हवा.' 68 आणि त्यांच्या पित्याने जशी आज्ञा केली होती, त्याचप्रकारे ते (यूसुफच्या शहरात) (सुरक्षितरित्या) दाखल झाले. अल्लाहने निर्धारित केलेल्या गोष्टीच्या विरुद्ध जाऊन, तो त्यांचा (अजिबात) बचाव करू शकत नव्हता. ती केवळ याकूबच्या मनातली एक इच्छा होती, जी त्याने अशाप्रकारे बोलून दाखविली. खरोखर, आम्ही त्याला दिलेल्या ज्ञानामुळेच तो ज्ञानी होता. पण बहुतेक लोकांना याची जाणीव होत नाही.

69 आणि जेव्हा ते यूसुफपाशी पोहोचले, तेव्हा त्याने आपल्या भावास आपल्याजवळ बोलावून बसविले. (आणि) तो त्याला म्हणाला, 'मी तुझा भाऊ यूसुफ आहे. म्हणून तू (आता) ते जे काही (चुकीचे वर्तन) करीत आलेले आहेत, त्याबद्दल व्यथित होऊ नकोस.' 70 मग जेव्हा त्याने त्यांना त्यांची शिधासामग्री दिली, तेव्हा त्याने (आपला) पाणी प्यायचा एक प्याला आपला (लहान भाऊ बेंजामीनच्या) सामानात ठेवून दिला. आणि (जेव्हा ते शहर सोडून जात होते, तेव्हा अचानकपणे) एक दवंडी देणारा ओरडला, '(थांबा!) हे काफिलेवाल्यांनो! तुम्ही लोक चोर आहात.' 71 (दवंडी देणाऱ्याकडे) वळून ते म्हणाले, 'तुमची कोणती वस्तू हरवली आहे?' 72 त्यावर (राजवाड्यातील कर्मचाऱ्यांनी) उत्तर दिले, 'आम्हाला राजाचा माप सापडत नाहीये. जो कोणी तो आणून देईल, त्यास (एका) उंटावर (जेवढे धान्य लादले जाते) तेवढे धान्य (बक्षीस म्हणून) देण्यात येईल. मी त्याची हमी घेत आहे.' 73 (ते भाऊ) म्हणाले, 'अल्लाहची शपथ! तुम्हाला चांगले माहीत आहे की, आम्ही या देशात उपद्रव माजविण्यासाठी आलेलो नाही आहोत. तसेच (यापूर्वीही कधी) आम्ही चोरी केलेली नाही.' 74 (त्यावर राजवाड्यातील कर्मचारी) म्हणाले, 'तुम्ही खोटे बोलत आहात, हे सिद्ध झाल्यास तुम्हाला कोणती शिक्षा दिली जावी?' 75 (त्या भावांनी) उत्तर दिले, 'त्याची शिक्षा ही असावी की, ज्याच्या सामानात (ती हरवलेली वस्तू) सापडेल, तर त्याला स्वत:लाच त्याच्या शिक्षेपायी (गुलाम बनवून रोखून) ठेवले जावे. अत्याचारी कृत्ये करणाऱ्यांना आम्ही अशाचप्रकारे शिक्षा करीत असतो.'

76 मग त्यांना (तपासासाठी यूसुफसमोर आणण्यात आले आणि तपास करणाऱ्याने) त्याच्या (लहान) भावाच्या आधी, त्याच्या (सावत्र) भावांच्या थैल्यांचा तपास सुरू केला. मग शेवटी यूसुफच्या (लहान) भावाच्या थैलीतून तो बाहेर काढला. अशाप्रकारे आम्ही यूसुफसाठी युक्ती योजिली. (कारण)

(इजिप्तच्या) राजाच्या नियमाप्रमाणे तो आपल्या भावाला (आपल्यापाशी) ठेवून
घेऊ शकत नव्हता. पण (त्याचे रोखले जाणे) अल्लाहला मंजूर होते (म्हणूनच
असे घडले). आम्ही ज्याच्याकरिता इच्छितो त्यास श्रेणीत वरचे स्थान देत
असतो. आणि सर्व ज्ञानी लोकांवर अशा एका शक्तीचे (नियंत्रण आहे) जी परम
ज्ञानी आहे. 77 (त्यावर) त्यांनी म्हटले, ‘जर याने चोरी केली असेल तर (यात
आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही) कारण यापूर्वी याच्या भावाने देखील चोरी
केली होती.’ पण यूसुफने (हे ऐकल्यानंतरही आपल्या मनातील गोष्ट) आपल्या
मनातच ठेवली, ती त्यांच्यासमोर प्रकट केली नाही. त्याने (स्वत:ला मनातल्या
मनात) केवळ एवढेच म्हटले. ‘तुम्ही स्वत:च वाईट लोक आहात. आणि जे
काही तुम्ही आरोप करीत आहात, त्याची हकिगत अल्लाहला चांगल्याप्रकारे
ठाऊक आहे.’ 78 ते म्हणाले, ‘हे मान्यवर! याचे पिता फारच वृद्ध झालेले
आहेत, म्हणून तुम्ही याच्याजागी आमच्यापैकी कोणालाही ताब्यात घ्या. आपण
आम्हाला फारच परोपकारी (सत्पुरुष) दिसता.’ 79 यूसुफने उत्तर दिले, ‘अल्लाह
(तसे करण्यापासून) आमचे रक्षण करो! आमची वस्तू ज्याच्याकडे सापडली
आहे, त्यास सोडून अन्य कोणालाही ताब्यात घेणे (आमच्यासाठी शक्य नाही).
तसे आम्ही केल्यास (अल्लाहच्या नजरेत) अत्याचारी ठरू.’

80 जेव्हा ते त्याच्या (उत्तराने) निराश झाले, तेव्हा (थोडेसे) बाजूला
होऊन आपसात विचारविमर्श करू लागले. मग त्यांच्यातील जो सर्वात मोठा
(भाऊ) होता तो म्हणाला, ‘तुम्हाला हे आठवत नाही का की, तुमच्या पित्याने
अल्लाहच्या नावाने (बेंजामीन संबंधाने) तुमच्याकडून पक्के वचन घेतले आहे,
यापूर्वीही यूसुफच्या बाबतीतही (तुमच्या हातून) अत्याचारी कृत्य घडले (हे
तुम्ही विसरलात की काय)? म्हणून मी तर येथून हालणार नाही, जोपर्यंत माझा
पिता मला परवानगी देत नाही किंवा अल्लाह माझ्याबाबतीत एखादा निर्णय करीत
नाही. कारण तोच सर्वोत्तम निर्णय करणारा आहे.’ 81 (आणि बाकी तुम्ही

लोक) आपल्या पित्याकडे परत जा आणि त्याला सांगा की, हे आमच्या पित्या! तुझ्या मुलाने चोरी केली आहे, आम्हाला जे माहीत झाले आहे, फक्त तेच आम्ही तुला सांगत आहोत. (खरे आहे की, आम्ही त्याचा सांभाळ करण्याचे तुला वचन दिले होते), पण जे आमच्यासाठी अदृश्य आहे त्यावर तर आमचे नियंत्रण नाही. 82 आणि आम्ही ज्या शहरात थांबलो होतो तेथील लोकांना आणि ज्या काफिल्यासोबत प्रवास करून आम्ही आलो, त्यांच्याशी तू विचारपूस कर. आम्ही अगदी सत्य बोलत आहोत.

83 (आणि जेव्हा ते आपल्या पित्याकडे परतले आणि जे घडले होते, ते सर्व त्यास सांगितले, ते ऐकून) पित्याने म्हटले, 'नाही, (असे नाही) किंबहुना तुम्ही तुमच्या मनाने एक गोष्ट रचून आणली आहे. मी तर सबुरीच्याच मार्गाचा अवलंब करेन.' (मला पूर्ण विश्वास आहे) की, अल्लाह (यूसुफसह) त्या सर्वांना माझ्याकडे परत घेऊन येईल. नि:संदेह, तोच सर्व काही जाणणारा आहे, (अस्सल) बुद्धिमान आहे. 84 आणि त्याने त्यांच्याकडे पाठ फिरवली व म्हटले, 'अरेरे यूसुफ!' (वर्षानुवर्षांच्या) दु:खाने त्याचे डोळे पांढरे झाले होते. आणि मनातल्या मनात त्याला दु:ख दाटून येत होते (अशा अवस्थेत त्याचे जीवन व्यतीत होत होते). 85 (पित्याची अशी स्थिती पाहून त्याची मुले) म्हणाली, 'अल्लाहची शपथ! तू अशाचप्रकारे यूसुफची आठवण करीत राहशील, येथपावेतो की, तुझे आरोग्य बरबाद होऊन जाईल किंवा तू संपून जाशील.' 86 (त्यावर) तो उत्तरला, 'मी तर माझ्या त्रासाचे व दु:खाचे गाऱ्हाणे केवळ अल्लाहसमोरच मांडत असतो आणि मी अल्लाहकडून त्या गोष्टी जाणत असतो, ज्या तुम्ही जाणत नाही. 87 हे माझ्या मुलांनो! (परत इजिप्तला) जा व जाऊन, यूसुफ व त्याच्या भावाचा शोध घ्या आणि अल्लाहच्या कृपेपासून निराश कधीही होऊ नका. कारण अल्लाहच्या कृपेच्या बाबतीत अन्य कोणी नव्हे तर केवळ सत्य नाकारणारेच लोक निराश होतात.'

88 आणि जेव्हा ते (इजिप्त देशात) यूसुफपाशी आले, तेव्हा ते (विनवणी करीत) म्हणाले, 'हे मान्यवर! आम्ही व आमचे कुटुंबीय (दुष्काळामुळे) फार व्यथित झालेले आहोत. आम्ही थोडीशी रक्कम घेऊन आलो आहोत, पण तुम्ही आम्हाला पुरेपूर शिधासामग्री द्या, तसेच आम्हाला धर्मदान (म्हणून जे देणे शक्य आहे तेही) द्या. निश्चितच अल्लाह धर्मदान करणाऱ्यांना चांगला मोबदला देतो.'
89 त्याने म्हटले, 'तुम्ही नादानीच्या अवस्थेत असताना यूसुफ व त्याच्या भावाशी कशाप्रकारे वर्तन केलात, हे तुम्हाला आठवते का?' 90 ते म्हणाले, 'आपणच यूसुफ आहात का?' त्याने उत्तर दिले, 'होय, मीच यूसुफ आहे आणि हा माझा भाऊ आहे. खरोखर! अल्लाहने आमच्यावर (अपार) कृपा केलेली आहे. (सत्य हे आहे की), जो कोणी त्याचे भय बाळगतो आणि (प्रतिकूल परिस्थितीत) धैर्यशील राहतो, तर अल्लाह (अशा) सत्कर्मी लोकांचा मोबदला कधीही वाया जाऊ देत नाही.'

91 (यूसुफचे भाऊ) म्हणाले, 'अल्लाहची शपथ! अल्लाहने तुम्हाला आमच्यावर श्रेष्ठत्व प्रदान केले आहे. खरोखर, आम्हीच चुकीच्या (मार्गावर) होतो.' 92 (त्यावर) यूसुफने म्हटले, '(माझ्याकडून) आज तुमच्याविरुद्ध कोणताही दोषारोप केला जाणार नाही, अल्लाह तुम्हाला क्षमा करो, तोच दया करणाऱ्यांत सर्वाधिक दयाळू आहे. 93 माझा हा शर्ट घेऊन जा आणि माझ्या पित्याच्या चेहऱ्यावर टाका. त्याची गेलेली दृष्टी (अल्लाहच्या कृपेने) परत येईल. मग तुम्ही सहकुटुंब माझ्याकडे परत या.'

94 मग जेव्हा काफिला (इजिप्तहून) रवाना झाला, तेव्हा इकडे (कनानमध्ये) त्यांच्या पित्याने (लोकांना) म्हटले, 'तुम्ही असे समजू शकता की, मला म्हातारचळ लागल्यामुळे मी बहकलेल्याप्रमाणे गोष्टी करतो, पण मला यूसुफचा सुगंध येत आहे.' 95 त्यावर (त्याच्या आसपासचे लोक) म्हणाले, 'अल्लाहची शपथ! तुम्ही अद्याप आपल्या पूर्वीच्याच भ्रमात ग्रस्त आहात!' 96 आणि जेव्हा

शुभवार्ता देणारा (तेथे) पोहोचला, त्याने (यूसुफचा) शर्ट याकूबच्या चेहऱ्यावर घातला, (लगेच) त्याची दृष्टी परत आली. तेव्हा याकूबने म्हटले, 'मी तुम्हाला सांगत नव्हतो का की, मी अल्लाहकडून त्या गोष्टी जाणतो, ज्या तुम्ही जाणत नाही?' 97 (याकूबची मुले आपल्या पित्यास) म्हणाली, हे आमच्या पित्या! अल्लाहकडे आमच्यासाठी आमच्या पापांची क्षमा माग. खरोखर आम्ही पापी होतो! 98 याकूबने म्हटले, 'मी आपल्या पालनकर्त्याकडे तुमच्यासाठी अवश्य क्षमायाचना करीन. नि:संदेह तो फार क्षमाशील व दयाळू आहे.'

99 जेव्हा हे सर्व (इजिप्तमध्ये) यूसुफपाशी पोहोचले; तेव्हा त्याने आपल्या आईवडिलांस आपल्याजवळ बसवून घेतले. (तो त्यांना) म्हणाला, 'इजिप्तमध्ये आपले स्वागत आहे, अल्लाहने इच्छिल्यास शांती व समाधानाने राहा.' 100 आणि (यूसुफने) आपल्या आईवडिलांस (सन्मानपूर्वक) उच्च आसनांवर बसविले आणि ते सर्व (साष्टांग नमस्कार घालीत) त्याच्यासमोर नतमस्तक झाले. तेव्हा यूसुफने म्हटले, 'हे माझ्या पित्या! हा आहे अर्थ माझ्या त्या स्वप्नाचा, जे मी पूर्वी पाहिले होते. ज्याला माझ्या पालनकर्त्याने (आज) वास्तवात परिवर्तित केले. त्यानेच माझ्यावर कृपा करून मला कारागृहातून बाहेर काढले. सैतानाने माझ्यात व माझ्या भावांत बेबनाव निर्माण करून (एकमेकांपासून दूर) केल्यानंतरही (अल्लाहनेच आज) तुम्हा सर्वांना वाळवंटातून (माझ्याकडे) आणले. निश्चितच माझा पालनकर्ता जे (करू) इच्छितो, त्यासाठी फार चांगली योजना आखतो. केवळ तोच आहे सर्व काही जाणणारा व (तोच आहे) खरोखर बुद्धिमान!'

101 मग यूसुफने (अल्लाहकडे) प्रार्थना केली, 'हे माझ्या पालनकर्त्या! तूच मला सत्ताधिकार प्रदान केलेस, तसेच मला स्वप्नांच्या अर्थाचा उलगडा करण्यास शिकवलेस. हे आकाश आणि पृथ्वीच्या निर्मात्या! या जगात आणि मृत्यूनंतरच्या जगातही तूच माझा पाठीराखा, उद्धारकर्ता आहेस. मी (पूर्णपणे) तुला समर्पित होऊन जीवन जगत असतानाच मला मृत्यू दे, (म्हणजे अशा अवस्थेतच मला

मृत्यू यावे) आणि माझा समावेश (तुझ्या) सदाचारी भक्तांमध्ये कर!’

102 (पैगंबर!) हे (वृत्तांत) अदृश्याच्या वार्तापैकी आहे, जे आम्ही तुमच्याकडे प्रकट करीत आहेत. (कारण) तुम्ही तेव्हा यूसुफच्या भावांजवळ (उपस्थित) नव्हता, जेव्हा यूसुफच्या भावांनी यूसुफविरुद्ध कट रचला आणि (त्याला तडीस नेण्यासंबंधाने) एका योजनेवर एकमत झाले.
103 (लोकांनी सत्य श्रद्धेचा अंगीकार करावा म्हणून) तुम्ही कितीका तीव्र इच्छा बाळगत नाही, (त्यासाठी कितीका प्रयत्न करीत नाही) पण बहुसंख्य लोक श्रद्धा धारण करणारच नाहीत.
104 आणि तुम्ही (या मार्गदर्शनापोटी) त्यांच्याकडून कोणताही मोबदला मागत नाही. हे तर केवळ (अल्लाहचे) उपदेश आहेत समस्त मानवजातीकरिता.

105 आणि आकाशात व पृथ्वीवर कितीतरी (संदेश असलेल्या) खुणा (पसरलेल्या) आहेत. ज्यांच्या जवळून ते लोक जात असतात, पण त्यांच्याकडे अजिबात लक्ष देत नाहीत.
106 बहुतेक लोक असे आहेत, जे अल्लाहवर श्रद्धा ठेवतात, पण (त्याचबरोबर) इतरांनाही अल्लाहच्या बरोबरीचे स्थान देतात. (म्हणजे अशी भेसळ व बनावटी श्रद्धा बाळगून आहेत, बहुसंख्य लोक).

107 हे लोक (स्वत:ला) सुरक्षित समजून बसलेत की काय? की, त्यांच्यावर अल्लाहच्या शिक्षेचे एखादे भीषण संकट येऊ शकत नाही, किंवा ती भयानक घटका (म्हणजेच कयामत) त्यांच्यावर अकस्मातपणे येणार नाही, जेव्हा की, ते तिच्या येण्याची कल्पना देखील करीत नसतील.
108 (पैगंबर!) (त्यांना) सांगा, ‘हा माझा मार्ग आहे, (म्हणजे हे माझे काम आहे की), मी लोकांना अल्लाहकडे बोलावीत असतो, (आणि माझे लोकांना अल्लाहकडे येण्याचे आवाहन करणे) निश्चित ज्ञानावर आधारित आहे. मीही व माझे अनुयायीही (हे आवाहन-कार्य करीत असतात). (सांगा), असीम आहे अल्लाहची महिमा! आणि मी त्या लोकांपैकी नाही, जे अल्लाहचे समकक्ष ठरवितात.’

109 (पैगंबर!) आम्ही तुमच्यापूर्वी पाठविलेले पैगंबर माणूसच होते, ते

वेगवेगळ्या वस्त्यांच्या निवासितांपैकीच होते. ज्यांच्याकडे आम्ही (आमचे संदेश) प्रकट केले होते. तर हे लोक जमिनीवर हिंडले-फिरले असते तर ते पाहू शकले असते की, यांच्यापूर्वीच्या (सत्य नाकारणाऱ्या लोकांचा) शेवट कसा झाला?

(त्यांना हे माहीत नाही का?) जे लोक अल्लाहची जाण ठेवून (जीवन व्यतीत करीत आहेत) त्यांना (या जगापेक्षा कितीतरी पटीने) चांगले जीवन मृत्यूनंतरच्या जगात लाभणार आहे. तुम्ही लोक बुद्धीचा वापर करीत नाही का?
110 (आधी आलेल्या पैगंबरांना दीर्घ काळापर्यंत छळ सहन करावे लागले) आणि शेवटी जेव्हा ते (आपल्या लोकांच्या बाबतीत) अगदी निराश झाले, आणि त्यांना वाटू लागले, (की आम्ही या लोकांना ऐकविलेल्या धमक्या) खोट्या ठरणार की काय? तेव्हा आमचे साहाय्य त्यांच्याकडे पोचले. ज्यांच्याबाबतीत आम्ही इच्छिले होते, ते वाचविले गेले (आणि सत्य नाकारणारे सर्व जण नष्ट केले गेले) कारण अपराधी लोकांवरून आमची शिक्षा (कदापि) टाळली जाऊ शकत नाही.

111 खरोखर, त्यांच्या अहवालात बुद्धिमान लोकांसाठी बोध आहे. (जिथपर्यंत) या (कुराणाचा संबंध आहे) ही काही एखाद्या व्यक्तीने रचलेली काल्पनिक कहाणी नव्हे. तर हा (सुरक्षित ईश्वरीय ग्रंथ आहे जो) आधीच्या ग्रंथापैकी जे काही शिल्लक राहिलेले आहे त्यांची सत्यता प्रमाणित करणारा आहे. यात सर्व (आवश्यक) गोष्टींचे स्पष्टीकरण आहे. तसेच (यात) मार्गदर्शन व कृपा आहे विश्वास ठेवणाऱ्यांसाठी.

# सूरह-१३. अर-रअद

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 अलीफ० लाम० मीम० रा० (अल्लाहकडून) प्रकट करण्यात आलेले हे

संदेश आहेत. (पैगंबर!) जे काही तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याकडे पाठविण्यात
आले आहे, ते 'सत्य' आहे. पण अनेक लोक यावर विश्वास ठेवत नाहीत. 2
तो अल्लाह आहे ज्याने आकाशांना कोणत्याही आधाराशिवाय उंच उभे केले,
ज्यांना तुम्ही पाहू शकाल (म्हणजे तुम्हाला असा कोणताही आधार दिसत नाही,
ज्यावर आकाश उभा आहे). तो (महाशक्तिमान) सिहांसनावर आरूढ झाला
(म्हणजे समस्त सृष्टीचे नियंत्रण आपल्याकडे घेतले). त्यानेच सूर्य आणि
चंद्राला (आपल्या) नियमांच्या अधीन केले. (त्याने) निर्धारित केलेल्या
अवधीप्रमाणे प्रत्येक आपल्या क्रमानुसार चालत असतो. जे जे अस्तित्वात आहे
त्यांना अल्लाहच नियंत्रित करीत असतो. तो हे संदेश स्पष्ट करून सांगत आहे, ते
यासाठी की, तुम्ही (न्यायाच्या दिवशी) आपल्या पालनकर्त्याशी भेट (अटळ)
आहे, यावर दृढ विश्वास ठेवावा.

3 तोच आहे (अल्लाह) ज्याने पृथ्वीला विस्तृत केले आणि तिच्यात पर्वत
स्थापित केले व नद्या (प्रवाहित केल्या) आणि यावर सर्व प्रकारच्या फळांना
(व वनस्पतींना) जोडीच्या रूपाने (म्हणजे नर व मादी असे) निर्माण केले. तो
दिवसावर रात्रीचे आवरण घालतो (व रात्रीवर दिवसाचे). खरोखर, या सर्व
(प्रकारच्या निर्मिती मध्ये संदेश असलेल्या) खुणा आहेत, त्या लोकांसाठी, जे
चिंतन करतात.

4 आणि पृथ्वीवर एकमेकांस लागून असलेले कित्येक भूप्रदेश आहेत,
तसेच द्राक्षांच्या बागा व धान्याने भरलेली शेतं, खजुरीची झाडे आहेत.
(त्यांच्यापैकी काहींची फळे) एक-एक असतात तर काही घोसदार असतात,
ते सर्व एकाच प्रकारच्या पाण्याने तृप्त होतात. तरीसुद्धा चवीच्या बाबतीत
आम्ही काहींना दुसऱ्यांपेक्षा श्रेष्ठत्व देतो. खरोखर, (या सर्वांमध्ये संदेश असलेल्या)
खुणा आहेत, त्या लोकांसाठी जे आपल्या बुद्धीचा वापर करतात.

5 आणि (पैगंबर!) तुम्हाला जर कशावर आश्चर्य वाटायला पाहिजे तर

यांच्या या म्हणण्यावर आश्चर्य वाटायला पाहिजे, 'काय! जेव्हा आम्ही (मेल्यानंतर) माती होऊन जाऊ, तेव्हा आम्हाला परत नव्याने निर्माण केले जाणार?' (असे वक्तव्य करणारे) हेच ते लोक आहेत, ज्यांनी आपल्या पालनकर्त्याला मानण्यास नकार दिला. हेच ते लोक आहेत, ज्यांच्या मानेवर (त्यांच्या कर्मरूपी कमाईपोटी) जोखड पडलेले असतील. हेच नरकाच्या आगीचे निवासी आहेत. ते त्यात सदैव वास्तव्य करतील.

6 (पैगंबर! हे सत्य नाकारण्यावर आग्रही असलेले लोक) भल्या गोष्टींची आशा करणे सोडून, वाईटाला त्यांच्यावर आणण्यासाठी घाई करण्याचे, ते तुम्हाला आव्हान देत आहेत. वस्तुतः यांच्यापूर्वी (अशाप्रकारच्या) लोकांना (अल्लाहकडून) शिक्षा करण्यात आल्याची अनेक उदाहरणे आहेत. खरोखर, तुमचा पालनकर्ता लोकांना (त्यांच्याकडून) दुराचारी कृत्ये घडल्यानंतरही क्षमा करणारा आहे (अर्थातच क्षमेसाठी याचना करणाऱ्यांना क्षमा करणारा आहे). तसेच यातही मुळीच शंका नाही की, तो शिक्षा करण्याच्या बाबतीतही फार कडक आहे.

7 सत्य नाकारण्यावर आग्रही असलेले लोक म्हणतात, 'या माणसाकडे त्याच्या पालनकर्त्याकडून एखादी चमत्कारिक निशाणी का पाठविण्यात आली नाही?' (पैगंबर!) तुम्ही (लोकांना) फक्त सावध करण्यासाठी आहात. आणि प्रत्येक जनसमूहाकरिता (अल्लाहकडून) एक मार्गदर्शक पाठविण्यात आलेला आहे.

8 जी स्त्री (आपल्या पोटात) गर्भ धारण करते आणि गर्भाशयात जे काही घटते व जे काही वाढते त्यास अल्लाह (पूर्णपणे) जाणतो. (निर्माण करावयाच्या) प्रत्येक गोष्टीसाठी त्याच्याजवळ योग्य ते प्रमाण निश्चित आहे. 9 तोच दृश्य आणि अदृश्याचा जाणकार आहे, (तोच आहे) अतुलनीय महान व सर्वोच्च असा. 10 (त्याच्यासाठी) हे सारखे आहे की, तुमच्यापैकी कोणी आपली गोष्ट

लपवीत असेल किंवा उघडपणे सांगत असेल (त्याला काही फरक पडत नाही). (अशाच प्रकारे) जो कोणी तुमच्यापैकी रात्रीच्या अंधारात लपून बसलेला असेल किंवा कोणी दिवसाढवळ्या वाटेने (राजरोसपणे) चालत जात असेल. अल्लाहसाठी दोघेही अगदी समान आहेत.

11 (मनुष्य कोणत्याही स्थितीत असो) त्याच्या पुढे व मागे असे निरीक्षक दूत  नियुक्त आहेत, जे अल्लाहच्या आज्ञेने त्याच्यावर देखरेख करीत असतात. निश्चितच अल्लाह लोकांच्या स्थितीत बदल करत नाही, जोपर्यंत ते त्यांच्या मनात जे आहे, त्यात (स्वत:) बदल करीत नाहीत. तसेच जेव्हा अल्लाह लोकांवर(त्यांच्या दुष्कृत्यांपोटी) एखादे वाईट प्रसंग आणू इच्छित असेल, तर तेव्हा त्याला कोणीही दूर सारू शकत नाही. तेव्हा त्यांना असा कोणीही साहाय्यकर्ता लाभणार नाही, जो अल्लाहपासून त्यांचे रक्षण करू शकेल.

12 तोच आहे जो तुम्हाला (आकाशात) विजा कडाडत (असल्याचे दृश्य) दाखवतो, ज्याद्वारे भय वाटू लागते, तसेच आशाही जागृत होते. तोच आहे (अल्लाह), जो पाण्याने भरलेल्या ढगांना उंचावर नेतो. 13 मेघगर्जना त्याची स्तुती करीत, त्याच्या पावित्र्याचे गुणगान करीत असतात. स्वर्गदूत  देखील भीतीयुक्त आदरासहित (त्याचे गुणगान करीत असतात). तो कोसळणाऱ्या विजा पाठवितो आणि इच्छितो त्यावर त्याद्वारे प्रहार करतो. तरीही ते अल्लाहच्या बाबतीत केवळ हट्टापोटी वादविवाद करीत आहेत. (हे उघड असतानादेखील की,) केवळ तोच जबरदस्त शक्तिशाली आहे.

14 केवळ त्याचाच धावा करणे, हेच सत्याला धरून आहे. त्याला सोडून ज्यांचा लोक धावा करतात, ते त्यांना कोणत्याही प्रकारे प्रतिसाद देऊ शकत नाहीत. त्यांचा धावा करणे असे आहे की, एखाद्या माणसाने पाण्याकडे आपले हात पसरवून त्याला (विनंती करावी) की, ते त्याच्या तोंडापर्यंत यावे, पण ते तेथपर्यंत कदापि पोचणार नाही. सत्य नाकारणाऱ्या लोकांचा धावा अगदीच

व्यर्थ आहे.

15 आकाशात व जमिनीवर असलेले सर्व स्वेच्छेने किंवा अनिच्छेने अल्लाहपुढेच नतमस्तक होत असतात. तसेच त्यांच्या सावल्या देखील, सकाळ–संध्याकाळ (त्याच्याच समोर नतमस्तक होत असतात). 16 (पैगंबर! त्यांना) विचारा, 'आकाश व पृथ्वीचा (स्वामी आणि) पालनकर्ता कोण आहे?' (त्यांना) सांगा, '(तो) अल्लाह आहे.' तर (त्यांना) विचारा, 'मग तुम्ही त्याला सोडून अशांना आपले कार्यसाधक का बनविले, ज्यांना खुद्द स्वतःच्याच बाबतीत, ना नफ्याचा, ना तोट्याचा अधिकार प्राप्त आहे?' (त्यांना) सांगा, 'आंधळा आणि डोळस दोघे सारखे होऊ शकतात का? तसेच अंधार व प्रकाश सारखे असू शकतात का? ज्यांना लोकांनी अल्लाहचे सहभागी ठरविले आहे, त्यांनी देखील अल्लाहप्रमाणेच निर्मिती केलेली आहे का? की, दोन्ही निर्मिती यांना एकसमान भासत आहेत, म्हणून ते गोंधळात पडले असावे, (असे तर झाले नाही ना)?' (पैगंबर!) (त्यांना) सांगा, 'केवळ अल्लाह आहे प्रत्येक वस्तूचा निर्माता, तोच एकटा आहे, सर्वांवर प्रभुत्व ठेवणारा आहे.'

17 (जेव्हाही) अल्लाह आकाशातून पाण्याचा वर्षाव करतो, त्याद्वारे ओढे आपापल्या व्याप्तीनुसार वाहू लागतात. मग पुराचा प्रवाह पाण्याच्या पृष्ठभागावर उफाळणारा फेस वाहून आणतो. अशाच प्रकारचा फेस तेव्हाही वर येत असतो, जेव्हा लोक दागिने किंवा भांडी (वगैरे) बनविण्यासाठी विस्तवात (धातू) वितळवितात. अशाप्रकारे अल्लाह सत्य आणि असत्याचे उदाहरण (तुमच्यासमोर) प्रस्तुत करतो आहे. (अल्लाहचा या जगासाठी असा नियमच आहे की,) जो फेस असतो, तो टाकाऊ म्हणून फेकून दिला जातो, मग लोकांच्या लाभाच्या ज्या वस्तू आहेत त्या भूमीवर टिकून राहतात. अशाप्रकारे अल्लाह (विविध) उदाहरणांद्वारे समजावून सांगतो.

18 ज्या लोकांनी आपल्या पालनकर्त्याला योग्य तो प्रतिसाद दिला,

त्यांच्यासाठी कल्याण (आणि कल्याणच) आहे आणि ज्या लोकांनी त्याला प्रतिसाद दिला नाही, त्यांच्याकडे पृथ्वीवर जे-जे आहे, ते सर्व असेल व आणखी तेवढेच जास्त देखील असेल, तर ते सर्व शिक्षेपासून आपली सुटका करून घेण्यासाठी (मुक्ती-दंड) म्हणून देऊ इच्छितील (तरीदेखील त्यांची सुटका होणार नाही). (न्यायाच्या दिवशी) यांना फार कठोर स्वरूपाच्या हिशेबाला तोंड द्यावे लागेल. त्यांच्या निवासाचे ठिकाण नरक हेच असेल. किती वाईट आहे ते ठिकाण राहण्याचे!

19 एक मनुष्य, जो हे जाणतो की, जे काही तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याकडे प्रकट करण्यात आलेले आहे, ते 'सत्य' आहे, त्या माणसासारखा असू शकतो का, जो आंधळा आहे? उपदेश तर बुद्धीची देणगी लाभलेले लोकच ग्रहण करतात.

20 हे असे लोक आहेत की, ते अल्लाहशी केलेल्या (त्याचा भक्त होण्याच्या) करारावर खरे ठरतात, तसेच (ते) आपल्या कराराला कदापि मोडत नाहीत. 21 तसेच जे (संबंध) अल्लाहने जोडण्याची आज्ञा केलेली आहे, ते जोडतात. आणि आपल्या पालनकर्त्याविषयी (नेहमी) उत्तरदायित्वाचा भाव बाळगून असतात, तसेच (पुनरुत्थानाच्या दिवशी आपल्याकडून) कठोरपणे हिशेब घेतला जाऊ शकतो, अशी भितीही बाळगून असतात 22 आणि जे आपल्या पालनकर्त्याची मर्जी संपादन करण्यासाठी सहनशीलतेचे वर्तन अंगीकारतात व नित्य प्रार्थना करतात आणि जे काही आम्ही त्यांना दिलेले आहे, त्यातून (अल्लाहच्या कार्यासाठी) जाहीरपणे व गुप्तपणे खर्च करतात. तसेच जे चांगल्या कृत्यांद्वारे वाईट कृत्यांचे निरसन करतात. हेच ते लोक आहेत, ज्यांच्यासाठी मृत्यूनंतरच्या जगात चांगले स्थान आहे. 23 कायम राहण्याच्या बागा, ज्यात ते दाखल होतील, त्यांच्याबरोबर त्यांचे वाडवडील, त्यांच्या पत्नी व त्यांची मुले यांच्यापैकी जे सदाचरणी असतील (त्यात दाखल होतील). स्वर्गदूत प्रत्येक द्वारातून त्यांच्याकडे

येतील (व म्हणतील), 24 'तुम्हाला शांती लाभो, कारण तुम्ही (अल्लाहखातर)
अढळपणे (सर्व काही) सहन करीत राहिलात. (खरोखर) किती उत्तम आहे
त्यांचे (नेहमी राहण्याचे) ठिकाण!'

25 आणि जे लोक अल्लाहशी पक्के करार केल्यानंतर मोडून टाकतात आणि
ज्याला जोडण्याची अल्लाहने आज्ञा केली आहे, ते तोडून टाकतात आणि
धरतीवर उपद्रव माजवितात. अशा लोकांवर (अल्लाहचा) शाप आहे आणि
त्यांच्यासाठी (मृत्यूनंतरच्या जगात) फार वाईट स्थान आहे. 26 अल्लाह
ज्याच्याबाबतीत इच्छितो त्याला विपुल प्रमाणात उपजीविका प्रदान करतो.
तसेच ज्याच्याबाबतीत इच्छितो त्याला तुटपुंज्या प्रमाणात प्रदान करतो. (ज्यांना
विपुल प्रमाणात उपजीविका प्राप्त झालेली आहे) ते याच जगातील जीवनाबद्दल
अगदी खूष आहेत. (पण वस्तुस्थिती अशी आहे की), हे जीवन मृत्यूनंतरच्या
जीवनाच्या तुलनेत क्षणभंगुर सुखाच्या पलीकडे काहीच नाही.

27 आणि ते लोक, जे (पैगंबराद्वारे पाठविण्यात आलेल्या संदेशाला) मानण्यास
तयार नाहीत. ते म्हणतात, 'या माणसाकडे त्याच्या पालनकर्त्याकडून एखादी
चमत्कारिक निशाणी का पाठविण्यात आली नाही?' (त्यांना) सांगा, 'निश्चितच
अल्लाह ज्याच्या बाबतीत इच्छितो, त्यास पथभ्रष्ट होऊ देतो. तो त्यांना आपल्याकडे
येण्याचा मार्ग दाखवितो, जे स्वत:हून त्याच्याकडे वळतात (त्याची ओढ
बाळगतात). 28 जे विश्वास ठेवणारे आहेत, त्यांच्या मनांस अल्लाहच्या स्मरणाने
शांती लाभते. (होय!) जाणून असा! अल्लाहच्याच स्मरणाने मनाला समाधान
लाभते. 29 जे लोक श्रद्धा धारण करतात आणि चांगली कामे करतात,
त्यांच्यासाठी शुभवार्ता आहे आणि (मृत्यूनंतरच्या शाश्वत जगात फार) चांगले
स्थान आहे.

30 (हे मुहम्मद!) अशाप्रकारे आम्ही तुम्हाला अशा लोकांतून आमचा
पैगंबर बनवून उभे केले, (जे श्रद्धाहीन होते). यापूर्वीही (अशा प्रकारचे) अनेक

लोकसमूह होऊन गेले. (तुम्हाला पैगंबर म्हणून नियुक्त करण्याचा उद्देश हा आहे की,) आम्ही तुमच्याकडे जे काही प्रकट केले आहे, ते तुम्ही लोकांसमोर प्रस्तुत करून टाकावे. (ते केवळ तुम्ही पैगंबर असण्याला नाकारत आहेत, असे नाही तर मुळात) कृपावंत अल्लाहवर श्रद्धा धारण करण्यास नकार देत आहेत. (त्यांना) सांगा, 'तोच माझा पालनकर्ता आहे, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही. मी त्याच्यावरच दृढ विश्वास ठेवून आहे आणि मला त्याच्याकडेच परत जायचे आहे.'

31 जर एखादे असे कुराण (अल्लाहकडून) प्रकट झाले असते. (ज्याच्या प्रभावाने) पर्वत चालू लागले असते किंवा पृथ्वीचे तुकडे-तुकडे झाले असते. किंवा मृत्यू पावलेले लोक बोलायला लागले असते. पण काय घडावे, हे ठरविण्याचा अधिकार केवळ अल्लाहलाच आहे. तर ज्या लोकांनी श्रद्धा धारण केलेली आहे, त्यांना (आणखी) या गोष्टीची जाणीव झालेली नाही का की, जर अल्लाहने इच्छिले असते तर सर्व लोकांना सरळ मार्ग दाखविला असता? पण जिथपर्यंत सत्य नाकारण्यावर आग्रही असलेल्या लोकांचा संबंध आहे, त्यांच्यावर त्यांनी केलेल्या वाईट कृत्यांपोटी कोणती ना कोणती आपत्ती अचानकपणे नेहमी येत राहील. किंवा त्यांच्या घरांच्या जवळपास तिचा प्रहार होत राहील. (आणि हे तेव्हापर्यंत सुरू राहील) येथपावेतो की, अल्लाहचे (अंतिम) वचन पूर्णत्वास पोचेल. अल्लाह कधीही आपल्या वचनाच्या उलट करीत नसतो.
32 तुमच्यापूर्वीही इतर पैगंबरांची थट्टा करण्यात आली, पण जे (अशाप्रकारे) सत्य नाकारण्यावर आग्रही होते, त्यांना मी काही काळ उसंत दिली. मग नंतर मी त्यांच्या मुसक्या आवळल्या. तर पाहा, किती भयंकर होती माझी शिक्षा!

33 तो (सर्वशक्तिमान) जो प्रत्येक मनुष्याच्या (प्रत्येक) कृत्यावर नजर ठेवून आहे, (आणि त्याच्या प्रत्येक कृत्याचा हिशेब घेणार आहे. तो इतरांसारखा असू शकतो का?) (तरीही) लोकांनी इतरांना अल्लाहच्या बरोबरीचे स्थान दिले

आहे. (त्यांना) म्हणा, ‘जरा त्यांची नावे सांगा, (पण तुम्हाला असे मुळीच वाटायला नको) की, तुम्ही अल्लाहला अशा गोष्टीबद्दल माहिती देत आहात, जी पृथ्वीवर असूनही त्याला माहीत नाही. किंवा हे सर्व तुमच्या शब्दांचा खेळ आहे?’ नव्हे! तर वस्तुस्थिती अशी आहे, जे सत्य नाकारण्यावर आग्रही आहेत, त्यांना आपली कटकारस्थाने चांगली कृत्ये असल्याचे प्रतीत होत असते, त्यांना सन्मार्गापासून दूर ठेवण्यात आलेले आहे. त्यांना कोणीही मार्गदर्शक लाभू शकत नाही, ज्यांना अल्लाह मार्गभ्रष्ट करतो. 34 अशांना या जगातील जीवनात(ही) शिक्षा होणार आहे, पण मृत्यूनंतरच्या जीवनात दिली जाणारी शिक्षा यापेक्षा (कितीतरी पटीने) भयंकर आहे. त्यांना अल्लाहपासून वाचवणारा कोणीही असणार नाही. 35 ‘स्वर्ग’ ज्याचे वचन अल्लाहची जाण ठेवून जीवन जगणाऱ्यांना देण्यात आले आहे, ते असे आहे की, त्यातून पाण्याचे (मन प्रसन्न करणारे) प्रवाह वाहत असतील. (पृथ्वीवरील बागांपेक्षा वेगळी) त्याची फळे सदाबहार असतील आणि (अशाच तऱ्हेची) त्याची सावली असेल. हा त्यांचा मोबदला आहे, जे अल्लाहची जाण ठेवून आहेत. तर सत्य नाकारणाऱ्या लोकांचे नशीब नरकाची आग आहे.

36 ज्या लोकांना आम्ही पूर्वी ग्रंथ दिला होता, (त्यांपैकी काही असे आहेत की), ते यावर आनंद व्यक्त करीत आहेत, जे तुमच्यावर प्रकट करण्यात आले आहे, पण (विभिन्न) गटात असेही काही लोक आहेत, जे त्यातील काही गोष्टी मानण्यास नकार देत आहेत. (त्यांना) सांगा, ‘(तुम्हाला मानणे किंवा न मानणे याचे स्वातंत्र्य आहे पण) मला तर अशीच आज्ञा करण्यात आलेली आहे की, मी केवळ अल्लाहचीच उपासना करावी आणि कोणालाही त्याचा सहभागी ठरवू नये. मी (सर्व लोकांना) त्याच्याकडेच बोलावीत आहे आणि मला त्याच्याकडेच परत जायचे आहे.’ 37 आणि अशाप्रकारे आम्ही हा (ग्रंथ) स्पष्ट आदेशाच्या स्वरूपात अरबी भाषेतून प्रकट केला आहे. आता हे ज्ञान तुमच्यापर्यंत येऊन

पोचलेले असताना देखील, जर तुम्ही त्यांच्या इच्छा-आकांक्षांचे अनुसरण कराल तर असा कोणीही असणार नाही, जो अल्लाहविरुद्ध तुमची मदत करेल किंवा त्याच्यापासून तुम्हाला वाचवेल.

38 तुमच्यापूर्वी आम्ही कित्येक पैगंबर पाठविले आणि आम्ही त्यांना पत्नी व अपत्ये दिली. कोणत्याही पैगंबरासाठी हे शक्य नव्हते की, अल्लाहच्या आज्ञेविना एखादा चमत्कार आणून दाखववावा. प्रत्येक युगाकरिता एक लिखित आहे (म्हणजे प्रत्येक कालखंडाकरिता त्याचे निर्णय ग्रंथ स्वरूप असत). 39
(त्यातून) अल्लाह इच्छितो, ते खोडून टाकतो आणि इच्छितो ते कायम ठेवतो. सर्व काही नमूद केलेलं अस्सल ग्रंथ त्याच्यापाशीच आहे.

40 आणि आम्ही त्यांना (ज्या शिक्षेचे) वचन दिले आहे, तिची (एखादी) झलक आम्ही तुम्हाला (तुमच्या हयातीत) दाखवू किंवा (असेही होऊ शकते की, त्यापूर्वीच) आम्ही तुम्हाला मरण देऊ.
(पैगंबर!) तुमची जबाबदारी तर केवळ संदेश पोचविणे हीच आहे. (त्यांचा) हिशेब घेणे हे आमचे काम आहे.

41 (सत्य नाकारणाऱ्यांना) हे दिसत नाही का की, आम्ही (त्यांचा) भूभाग त्याच्या चहूबाजूंनी कशाप्रकारे घटवीत आहोत? आणि अल्लाह निर्णय देत असतो, त्याचा निर्णय रद्द करू शकेल असा कोणीही नाही. तसेच तो हिशेब घेण्याच्या बाबतीत फार शीघ्र आहे! 42 आणि यांच्या आधीच्या लोकांनीही
(पैगंबरांच्या विरोधात) योजना आखल्या होत्या. पण यशस्वी होणाऱ्या योजनेची आखणी करणे तर अल्लाहच्याच हातात आहे. तोच जाणतो की, प्रत्येक माणूस काय करीत आहे (आणि कशास पात्र ठरणार आहे). सत्य नाकारणाऱ्यांना लवकरच कळून चुकेल की, मृत्यूनंतरच्या जीवनात (उज्ज्वल) भविष्य कोणाचे आहे?

43 सत्य नाकारण्यावर ठाम असलेले श्रद्धाहीन लोक (तुम्हाला) म्हणतात,

‘तुम्ही (अल्लाहचे) पैगंबर नाही.’ (त्यांना) सांगा, ‘माझ्या व तुमच्या दरम्यान अल्लाहची साक्ष पर्याप्त आहे, तसेच तेही साक्षी आहेत जे (अल्लाहच्या) ग्रंथाचे ज्ञान बाळगून आहेत.’

# सूरह–१४. इब्राहीम

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 अलीफ० लाम० रा० (पैगंबर!) हा अल्लाहचा ग्रंथ आहे, जो आम्ही तुमच्याकडे यासाठी प्रकट केला आहे की, तुम्ही समस्त मानवजातीला तिच्या पालनकर्त्याच्या आज्ञेने (सर्व प्रकारच्या) अंधकारातून बाहेर काढून प्रकाशाकडे आणावे. अर्थातच त्या मार्गाकडे, जो सर्वशक्तिमान अल्लाहकडे जातो, (तो सर्वशक्तिमान) जो सर्व स्तुतीस पात्र आहे. 2 त्या अल्लाहच्या (मार्गाकडे) जो, जे काही आकाशात आहे व जे काही पृथ्वीवर आहे, त्यांचा मालक आहे. पण फार भयंकर अरिष्ट कोसळणार आहे, त्या लोकांवर जे सत्य स्वीकारण्यास नकार देत आहेत. 3 जे मृत्यूनंतरच्या (अनंतकालीन) जीवनापेक्षा याच जगातील जीवनाला सर्व काही समजून प्राधान्य देतात. तसेच ते (लोकांना) अल्लाहच्या मार्गापासून रोखतात आणि त्यात काही विकृत शोधून काढण्यासाठी प्रयत्नरत असतात. हेच ते लोक आहेत, जे सन्मार्गापासून फार दूर भटकत गेलेले आहेत.

4 आम्ही पाठवलेल्या प्रत्येक पैगंबराने (आमचा संदेश) लोकांना त्यांच्या मातृभाषेतूनच संवाद साधून पोचविलेला आहे. हे यासाठी की, त्यांच्याप्रत (सत्याचा) संदेश स्पष्टपणे पोचून जावा. मग अल्लाह इच्छील त्यास भटकत राहू देईल आणि इच्छील त्यास सन्मार्ग दाखवील. तोच आहे सर्वशक्तिमान व अस्सल बुद्धिमान.

5 (पैगंबर) मूसाला आम्ही आमच्या संदेशासह पाठविले होते (आणि अशी आज्ञा केली होती की), आपल्या लोकांना सर्व प्रकारच्या अंधकारातून बाहेर

काढून प्रकाशाकडे आण आणि त्यांना अल्लाहच्या दिवसांची आठवण करून दे. खरोखर, या (स्मरणिकेत) त्या प्रत्येकासाठी संदेश असलेल्या खुणा आहेत, जो संयम बाळगणारा व कृतज्ञता व्यक्त करणारा आहे.

6 मूसा आपल्या लोकांना म्हणाला, 'अल्लाहने तुमच्यावर केलेल्या त्या उपकारांची आठवण करा, जेव्हा त्याने तुम्हाला फिरऔनच्या लोकांपासून वाचवले, जे तुमचा वाईट रीतीने छळ करीत होते, आणि ते तुमच्या मुलांची हत्या करीत असत आणि फक्त तुमच्या मुलींना जिवंत ठेवीत असत, यात तुमच्या पालनकर्त्याकडून (तुमच्या सहनशीलतेची) मोठी परीक्षा होती.'
7 (ती वेळ आठवा) जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने बजावून दिले होते, 'जर तुम्ही (माझ्याप्रति) कृतज्ञता व्यक्त कराल तर मी निश्चितपणे तुमच्यावर आणखी अधिकाधिक (उपकार) करीन, पण जर तुम्ही कृतघ्न व्हाल तर (लक्षात ठेवा) माझी शिक्षा खरोखर फार कठोर आहे!'
8 मूसाने म्हटले, 'जरी तुम्ही आणि या पृथ्वीवर असलेल्या सर्वांनी अल्लाहवर श्रद्धा ठेवण्यास नकार दिला (म्हणजेच त्याच्याप्रति कृतघ्नता व्यक्त केली तरी) अल्लाहला याची यत्किंचितही पर्वा नाही, (कारण तो स्वतःहून महान आहे), सदा स्तुतीस पात्र आहे.

9 तुमच्या आधी होऊन गेलेल्या (त्या श्रद्धाहीन) लोकांच्या वार्ता तुमच्यापर्यंत पोहोचल्या नाहीत का? जसे नूहचे लोक, आद व समूद (या जमाती) आणि जे लोक यांच्यानंतर होऊन गेले. त्यांना आता अल्लाहशिवाय दुसरा कोणीही जाणत नाही. त्यांच्याकडे पैगंबर सत्याचे सर्व स्पष्ट प्रमाण घेऊन आले होते. (तेव्हा त्यांच्या लोकांचा प्रतिसाद असा होता) त्यांनी आपले हात आपल्या तोंडावर, असे म्हणत ठेवून घेतले, 'जो संदेश देऊन तुम्हाला पाठविण्यात आले आहे, तो आम्ही (कदापि) मानणार नाही. तसेच ज्या गोष्टीकडे तुम्ही आम्हाला बोलवत आहात, त्याबद्दल आम्ही फार गोंधळलेल्या अवस्थेत आहोत.'

10 (त्यावर) त्यांच्या पैगंबरांनी उत्तर दिले, 'तुम्ही अल्लाहविषयी साशंक

आहात का, जो आकाश आणि पृथ्वी यांचा अविष्कारक (प्रारंभकर्ता) आहे. तो तुम्हाला यासाठी बोलावत आहे की, तुमच्या(कडून भूतकाळात घडलेल्या) अपराधांना माफ करून टाकावे आणि तुमच्यासाठी निर्धारित असलेल्या अवधीपर्यंत तुम्हाला उसंत द्यावी.' (पण त्यावर) त्यांनी उत्तर दिले, 'तुम्ही तर आमच्या सारखीच माणसे आहात, त्यापेक्षा वेगळे काही नाही. आमचे वाडवडील ज्यांची उपासना करीत होते, त्यांपासूनच तुम्ही आम्हाला दूर करू इच्छिता, तर मग (तुम्ही अल्लाहचे संदेशवाहक असल्याचे) स्पष्ट प्रमाण आमच्याकडे घेऊन या.'

11 (त्यावर) त्यांच्या पैगंबरांनी उत्तर दिले, 'खरे आहे, आम्ही तुमच्यासारखीच माणसे आहोत, पण अल्लाह आपल्या भक्तांपैकी ज्यांची निवड करतो त्यांच्यावर आपली कृपा करतो. अल्लाहच्या परवानगीशिवाय तुमच्याकडे एखादे चमत्कार आणून दाखवणे, ही गोष्ट आमच्या अखत्यारीत मुळीच नाही. तर श्रद्धावंतांनी अल्लाहवरच विश्वास ठेवला पाहिजे. 12 आम्ही का म्हणून अल्लाहवर विश्वास ठेवू नये, जेव्हा त्यानेच आम्हाला आमचे मार्ग दाखविले आहेत (ज्यावर आम्ही मार्गस्थ आहोत). तुम्ही जो काही त्रास आम्हाला पोचवाल, तो आम्ही (पूर्ण) संयमाने सहन करू. तर विश्वास ठेवणाऱ्यांनी अल्लाहवरच विश्वास ठेवायला पाहिजे.'

13 पण ज्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला, ते आपल्या पैगंबरांना (अशाप्रकारे) म्हणाले, 'तुम्ही आमच्या मार्गावर (म्हणजे आमच्या संप्रदायात) परत आला नाहीत तर आम्ही तुम्हाला निश्चितपणे आमच्या देशाबाहेर घालवून देऊ.' तेव्हा त्यांच्या पालनकर्त्याने आपल्या पैगंबरांकडे (हा संदेश पाठविला की), आम्ही या शिरजोर लोकांना अवश्य गारद करून टाकू. 14 मग त्यांच्यानंतर भूतलावर तुम्हाला वसवू. हे (माझे वचन) त्याच्यासाठी आहे जो माझ्या भेटीचे भय बाळगतो, तसेच माझ्या इशाऱ्यांना भितो (म्हणजे अल्लाहसमोर जाब द्यावे लागणार, अशी चिंता त्यांना सतावीत असते).

[15] शेवटी त्यांनी सत्याचा विजय व्हावा यासाठी (अल्लाहकडे) प्रार्थना केली. तेव्हा (त्याच्या परिणामी सत्याचा) प्रत्येक शिरजोर शत्रू विफल ठरला. [16] त्याच्यापुढे नरक त्याची वाट पाहत आहे, जिथे त्याला पू (सारखे दुर्गंधीयुक्त) पाणी प्यायला भाग पाडण्यात येईल. [17] तो (ते पाणी) घोट–घोट करून पिईल आणि त्याला ते सहजपणे गिळता येणार नाही. चहूबाजूंनी मृत्यूने त्यास वेढलेले असेल, पण तो (कधीही) मरणार नाही (म्हणजे तो भयानक स्वरूपाच्या गुदमरून टाकणाऱ्या अवस्थेत असेल) आणि पुढे त्याला अत्यंत कठोर शिक्षेला तोंड द्यावे लागेल.

[18] जे लोक आपल्या पालनकर्त्याला मानीत नाहीत, त्यांचे उदाहरण असे आहे की, त्यांची कृत्ये त्या राखेसारखी आहेत, जिला वादळी दिवसाचा वारा झपाट्यासरशी उडवून लावतो. (मृत्यूनंतरच्या जीवनात) त्यांनी जे काही कमावले असेल, त्यांपैकी काहीही त्यांच्या हाती येणार नाही. अशा प्रकारे कृती करणे म्हणजे (खरोखर) पराकोटीची मार्गभ्रष्टता आहे. [19] तुम्हाला याची जाणीव नाही का की, अल्लाहने आकाश व पृथ्वी यांची निर्मिती सहेतुकपणे केलेली आहे? त्याने ठरविले तर तो तुम्हाला नष्ट करून, तुमच्याजागी एक नवीन मानवजात आणून (वसवू) शकतो. [20] असे करणे अल्लाहसाठी मुळीच कठीण नाही.

[21] (न्यायाच्या दिवशी) समस्त मानवजात अल्लाहसमोर हजर होईल. तेव्हा जे (या जगात नैतिकदृष्ट्या) दुर्बल होते, ते अहंकाराने वागलेल्या लोकांना म्हणतील. ‘आम्ही तर केवळ तुमचे अनुसरण करणारे होतो, तर (आज) तुम्ही अल्लाहच्या शिक्षेपासून काही प्रमाणात तरी वाचवू शकाल का?’ (त्यावर) ते उत्तर देतील, ‘जर अल्लाहने आम्हाला (मुक्ती) मार्ग दाखविला असता तर आम्ही तुम्हाला देखील अवश्य (तो) मार्ग दाखविला असता. आता (आमच्या कर्मामुळे जे वाट्याला आलेले आहे) ते मुकाट्याने सहन करीत राहावे. किंवा उतावीळपणे आक्रोश करीत राहावे, दोन्ही गोष्टी आपल्याकरिता सारख्याच आहेत. यातून आमची सुटका

होईल असा (आता) कोणताही मार्ग नाही!'

22 मग जेव्हा फैसला सुनावून टाकला जाईल, तेव्हा सैतान म्हणेल, 'अल्लाहनेच तुम्हाला सत्य वचन दिले होते (जे आज पूर्ण झाले), मी देखील तुम्हाला वचन दिले होते, पण मी त्याचा भंग केला (कारण माझे वचन म्हणजे केवळ फसवणूक होती). (खरेतर) मला तुमच्यावर कोणत्याही प्रकारे नियंत्रण प्राप्त नव्हते. पण (झाले असे) मी तुम्हाला बोलावले आणि तुम्ही माझे म्हणणे मान्य केले. म्हणून आता मला दोष देऊ नका. तर स्वत:लाच दोष द्या. आता ना मी तुमची (काही) मदत करू शकतो, ना तुम्ही माझी काही मदत करू शकता. तुम्ही (आधी) मला अल्लाहच्या बरोबरीचे स्थान दिले होते, मला ते कधीही मान्य नव्हते. (मी तुमच्या त्या कृत्याचा धिक्कार करतो).' (सर्व) दुराचाऱ्यांकरिता निश्चितच फार कठोर शिक्षा आहे.

23 पण ज्या लोकांनी श्रद्धा धारण केली होती आणि सत्कर्मे केली होती, त्यांना (स्वर्गाच्या अशा) बागांत दाखल केले जाईल, ज्यांतून पाण्याचे (मन प्रसन्न करणारे) प्रवाह वाहत असतील. ते तेथे आपल्या पालनकर्त्याच्या परवानगीने कायम वास्तव्य करतील. तिथे जेव्हा ते एकमेकांशी भेटतील तेव्हा ते एक दुसऱ्याला सलाम करतील.

24 तुम्ही यावर कधी चिंतन केले नाही का की, कशाप्रकारे अल्लाहने चांगल्या वचनाची (सत्यावर आधारित वचनाची) तुलना चांगल्या झाडाशी केलेली आहे. ज्याचे मूळ जमिनीत भक्कम रोवलेले आहे आणि त्याच्या फांद्या आकाशाला भिडलेल्या आहेत. 25 तो (वृक्ष) आपल्या पालनकर्त्याच्या परवानगीने सदा सर्वकाल आपली फळे देत असतो. अल्लाह (या उद्देशाने) लोकांकरिता उदाहरणे प्रस्तुत करतो की, त्यांनी (यावर) चिंतन करून बोध घ्यावा. 26 तसेच (सत्यावर आधारित नसलेले) वाईट वचन, त्या वाईट वृक्षासारखे आहे, जे जमिनीच्या पृष्ठावरून (सहज) उपटून फेकून टाकले जाते. त्याच्या (मुळात)

कसलीही पकड नसते.

27 (अशाप्रकारे) अल्लाह श्रद्धावंतांना दृढ वचनाद्वारे या जीवनात आणि मृत्यूनंतरच्या जीवनात बळकटी देतो. तसेच तो दुराचाऱ्यांना मार्गभ्रष्ट होऊ देतो. अल्लाह जे इच्छितो ते करतो.

28 तुम्ही त्या लोकांच्या स्थितीचे अवलोकन केले नाही का, ज्यांनी अल्लाहच्या वरदानांना कृतघ्नतेने प्रतिसाद दिला? (अशाप्रकारे) आपल्या लोकांना विनाशाच्या घरात लोटले. 29 (अर्थातच) त्या नरकामध्ये, ज्यात ते प्रवेश करतील. किती वाईट ठिकाण आहे, ते वास्तव्यासाठी! 30 त्यांनी इतरांना अल्लाहच्या बरोबरीचे ठरविले (या उद्देशाने) की, लोकांना अल्लाहच्या मार्गापासून दूर न्यावे. (त्यांना) सांगा, 'काही काळ (या जगात) मौज करून घ्या, शेवटी तुमचे ठिकाण नरक आहे.'

31 (पैगंबर!) माझ्या ज्या भक्तांनी श्रद्धा धारण केली, त्यांना सांगा की, त्यांनी नित्य प्रार्थना करावी (नमाज़ पढावी) आणि जे काही आम्ही त्यांना दिले आहे त्यातून जाहीररित्या व गुप्तरित्या (आमच्या मार्गात त्यांनी) खर्च करावा; तो दिवस येऊन ठेपण्यापूर्वी ज्या दिवशी ना कुठली सौदेबाजी होईल, ना कोणती मैत्री कामी येईल.

32 तोच आहे अल्लाह ज्याने आकाश व पृथ्वी यांची निर्मिती केली आणि आकाशातून (ढगांद्वारे) पाण्याचा वर्षाव केला (आणि त्या पाण्याद्वारे) तुमच्या उपजीविकेसाठी (सर्व प्रकारची) फळे उपजविली, (त्यानेच) समुद्रात नौका चालविणे तुमच्यासाठी शक्य बनविले की, त्याच्या आदेशाने (समुद्रावर) (नौका) संचार कराव्यात. त्यानेच नद्यांनाही (अशा नियमांच्या अधीन केले आहे की, ज्याद्वारे त्या) तुमच्या उपयोगी ठराव्यात. 33 त्यानेच सूर्य व चंद्र यांनाही अशा नियमांत बांधून टाकले आहे की, ते तुमच्यासाठी उपयोगी ठरत आहेत, ते सातत्य स्वरूप आपल्या मार्गांवर मार्गस्थ आहेत. तसेच त्याने रात्र व दिवस

यांनाही तुमच्या सेवेत लावले आहे. 34 तुम्ही जे जे त्याच्याकडे मागितले, ते सर्व त्याने तुम्हाला दिले.

जर तुम्ही अल्लाहच्या उपकारांची गणती करू पाहाल तर तुम्ही कदापि त्यांची गणती करू शकणार नाही. (तरीसुद्धा) मनुष्य खरोखर, फार अन्यायी आणि फार कृतघ्न आहे.

35 (ती वेळ आठवा) जेव्हा इब्राहीमने (अल्लाहकडे) प्रार्थना केली. ‘हे माझ्या पालनकर्त्या! या शहराला शांतीचे शहर बनव आणि मला व माझ्या मुलांना मूर्तींच्या पूजेपासून (कायम) दूर ठेव. 36 हे माझ्या पालनकर्त्या! त्या मूर्तींनी अनेकांना सन्मार्गापासून (फार) दूर नेऊन सोडले. तर जो कोणी माझ्या (श्रद्धेचे) अनुसरण करेल, (केवळ) तोच खऱ्या अर्थाने माझ्या सोबत आहे. आणि ज्याने माझे आज्ञापालन केले नाही तर – त्याच्याबाबतीत, (तुला निर्णय करायचा आहे). खरोखर तू फार क्षमाशील व दयाळू आहेस.

37 हे माझ्या पालनकर्त्या! मी माझ्या अपत्यांपैकी काहींना, तुझ्या पवित्र घराजवळ, एका नापीक खोऱ्यात वसवले आहे. ते यासाठी की, हे प्रभू, त्यांनी नित्य नमाज़ पढावी. तू असे कर की, जेणेकरून लोकांच्या मनात त्यांच्याप्रति ओढ निर्माण व्हावी. तसेच त्यांना फळांची उपजीविका प्रदान कर, म्हणजे ते तुझ्याप्रति आभार व्यक्त करणारे बनतील.

38 हे आमच्या पालनकर्त्या! जे काही आम्ही (आमच्या मनात) दडवून ठेवतो आणि जे काही प्रकट करतो ते, तू सर्व जाणतोस. आणि अल्लाहपासून कोणतीही गोष्ट लपलेली नाही, मग ती पृथ्वीवर असो वा आकाशात. 39 आभार त्या अल्लाहचे! (सर्व स्तुती त्याच्यासाठीच आहे) ज्याने मला वृद्धापकाळ असतानाही इस्माईल व इसहाक़ (ही मुले) दिली. खरोखर! माझा पालनकर्ता (आपल्या भक्तांची) प्रार्थना ऐकणारा आहे. 40 हे प्रभू! मला नित्य नमाज़ाचे पालन करणारा बनव आणि माझ्या मुलांना देखील. हे प्रभू! माझ्या प्रार्थनेचा

स्वीकार कर. 41 हे आमच्या पालनकर्त्या! मला माफ कर! माझ्या आईवडलांना माफ कर आणि सर्व श्रद्धावंतांना माफ कर, त्या दिवशी, ज्या दिवशी (तू) हिशेब घेशील.'

42 आणि हे अत्याचारी लोक जे काही करीत आहेत, त्याची अल्लाहला जाणीव नाही, असा विचार कदापि मनात येऊ देऊ नका. तो त्यांना केवळ त्या दिवसापर्यंत सवड देत आहे, ज्या दिवशी त्यांचे डोळे (भयामुळे) उघडे ते उघडेच राहतील. 43 (तेव्हा त्यांची अवस्था अशी असेल की), ते आपल्या माना वर करून भयग्रस्त अवस्थेत (इकडे तिकडे) धावत सुटलेले असतील. (जिकडे टक लावून पाहत असतील त्यापासून) त्यांची दृष्टी त्यांच्याकडे परत येत नसेल, त्यांची मने मरणासन्न झालेली असतील.

44 (पैगंबर!) लोकांना त्या दिवसासंबंधाने सावधानतेची सूचना देऊन टाका, ज्या दिवशी (नियत केलेल्या) शिक्षेचे संकट त्यांच्याप्रत येऊन ठेपेल, त्यावेळी ते लोक, ज्यांनी (आपल्या जीवनकाळात) वाईट कृत्ये केलेली असतील, म्हणतील, 'हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला काही काळासाठी सवड दे, म्हणजे आम्ही तुझ्या बोलावण्याला प्रतिसाद देऊ आणि पैगंबरांचे अनुसरण करू.' (त्यांना उत्तर मिळेल), यापूर्वी देखील तुम्ही शपथा घेऊन सांगितले नव्हते काय की, तुमचे कधीही पतन होणार नाही? 45 आणि तुम्ही अशा लोकांच्या वस्तीत वास्तव्य केले होते, ज्यांनी स्वत:च स्वत:वर अन्याय केला होता. तुम्हाला हे ही स्पष्टपणे कळून चुकले होते की, आम्ही त्यांच्याशी कशाप्रकारे व्यवहार केला होता. तसेच आम्ही तुमच्यासाठी (अनेक) बोधपर उदाहरणे समोर ठेवली आहेत. 46 ते सर्व प्रकारची कट कारस्थाने करीत असत, पण त्यांची ही सर्व कारस्थाने अल्लाहला ठाऊक होती, जरी ती पर्वतांना हालवण्याजोगीही (मोठी) असती, तरी अल्लाह त्यांना शून्यवत करण्यास (समर्थ आहे).

[47] तुम्ही असा विचार मनात कदापि येऊ देऊ नका, अल्लाह आपल्या पैगंबरांना दिलेले आपले वचन पाळणार नाही. यात मुळीच शंका नाही की, अल्लाह हा सर्वशक्तिमान आहे, शिक्षा करण्यास समर्थ आहे. [48] त्या दिवशी ही पृथ्वी बदलून दुसरी पृथ्वी (समोर) आणण्यात येईल, तसेच आकाश देखील. तेव्हा सर्व लोक त्या अल्लाहसमोर हजर होतील, ज्याला समस्त निर्मितीवर संपूर्ण नियंत्रण प्राप्त आहे. [49] त्या दिवशी तुम्ही अपराध्यांना बेड्यामध्ये जखडलेल्या अवस्थेत पाहाल. [50] त्यांचे कपडे डांबराचे असतील आणि अग्नी त्यांच्या चेहऱ्यांना लपेट्यात घेईल. [51] (त्या दिवशी सर्वांना अल्लाहच्या न्यायालयात सादर केले जाईल) हे यासाठी की, अल्लाहने प्रत्येक मनुष्यास त्याच्या (कर्मरूपी) कमाईचा मोबदला द्यावा. खरोखर, अल्लाह हिशेब घेण्याच्या बाबतीत फार शीघ्र आहे.

[52] हा (अल्लाहकडून) समस्त मानवजातीसाठी संदेश आहे. ज्याद्वारे लोकांना सावध करून टाकण्यात यावे, म्हणजे त्यांनी हे (चांगल्याप्रकारे) जाणून घ्यावे की, तोच एकमेव ईश्वर आहे. म्हणजे बुद्धीची देणगी लाभलेल्यांनी (यावर) चिंतन करावे.

# सूरह-१५. अल-हिज्र

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] अलीफ० लाम० रा० ही (अल्लाहकडून) प्रकट झालेल्या ग्रंथातील संदेशवचने आहेत, म्हणजे कुराणाची, ज्यात सत्याचे स्पष्ट वर्णन आहे. [2] एक वेळ निश्चितपणे येईल जेव्हा, सत्य नाकारण्यावर आग्रही असलेले लोक अशी इच्छा करतील की, आपण अल्लाहला समर्पित (जीवन जगलो) असतो (तर किती बरे झाले असते) [3] तर त्यांना सोडून द्या की, त्यांनी खावे (प्यावे), मौजमजा करावी, आणि व्यर्थ आशेसह गाफील राहावे, कारण लवकरच (खरे काय आहे,) हे त्यांना कळून चुकेल. [4] आम्ही यापूर्वी ज्या कोणत्या वस्तीला

नष्ट केले आहे तिच्याबाबतीत आधीच निर्णय झालेला होता. [5] (पण हे लक्षात ठेवा की), कोणताही जनसमूह आपल्या निर्धारित काळाच्या ना पुढे जाऊ शकतो, ना मागे राहू शकतो.

[6] ते (सत्य नाकारणारे लोक) म्हणतात, 'हे माणसा! तुझ्यावर जी ही स्मरणिका (म्हणजे कुराण) प्रकट करण्यात आले आहे, तू खरोखर वेडा आहेस! [7] जर तू सत्यवचनी (व्यक्ती) आहेस तर आमच्यासमोर स्वर्गदूतांना का घेऊन येत नाहीस?' [8] आम्ही स्वर्गदूतांना केवळ आमच्या फैसल्यासह पाठवतो,मग एकदा (त्यांना पाठवल्यानंतर, ज्यांच्याकडे पाठविण्यात आले त्या लोकांना) मुळीच सवड दिली जात नाही.

[9] खरोखर! या स्मरणिकेला (म्हणजे या कुराणाला) आम्हीच प्रकट केले आहे आणि आम्हीच त्याला सुरक्षित ठेवणार.

[10] (पैगंबर!) आम्ही तुमच्या आधीच्या लोकांकडेही (आमचे अनेक पैगंबर) पाठविले होते. [11] तर असे कधीही झाले नाही की, त्यांच्याकडे एखादा पैगंबर आला, पण त्यांनी त्याची खिल्ली उडविली नसेल. [12] अशाप्रकारे आम्ही पापी लोकांच्या मनात (थट्टामस्करी करण्याच्या प्रवृत्तीला) घर करू देतो. [13] ते यावर विश्वास ठेवणारच नाहीत, जरी त्यांच्यासमोर पूर्वी होऊन गेलेल्या (अपराधी) लोकांची अशीच उदाहरणे आहेत. [14] आम्ही जर त्यांच्यासाठी आकाशाचे एखादे द्वार उघडले असते व ते त्यातून वर चढून जाऊ लागले असते. [15] तेव्हाही त्यांनी निश्चितपणे असे म्हटले असते, 'आमची तर नजरबंदी करण्यात आलेली आहे. नाही, आमच्यावर तर जादू करण्यात आली आहे.'

[16] आणि खरोखर, आम्ही आकाशात नक्षत्रांचे समूह बनवले. आणि पाहणाऱ्यांसाठी ते सुशोभित केले. [17] त्यास प्रत्येक शापित सैतानापासून आम्ही सुरक्षित केलेले आहे. [18] पण जर एखादा कोणी चोरून-लपून ऐकण्याचा प्रयत्न करीत असेल तर एक पेटती उल्का त्याचा पाठलाग करते.

19 आम्ही पृथ्वीचा विस्तार केला आणि तिच्यामध्ये भक्कम पर्वत रोवून टाकले आणि तिच्यात प्रत्येक प्रकारचे (जीवन) संतुलित प्रमाणात वाढीस लागण्याची व्यवस्था केली. 20 मग (हे मानवा!) आम्ही तुझ्यासाठी (पृथ्वीवर) उदरनिर्वाहाचे (सर्व आवश्यक) साधन उपलब्ध करून दिले. तसेच त्यांच्याही उदरनिर्वाहाची व्यवस्था केली, ज्यांना तुम्ही निर्वाहाची सामग्री देत नाही (म्हणजे मानवाखेरीज सर्व प्राणिमात्रांसाठी).

21 कारण, अशी एकही वस्तू नाही जिचे खजिने (जिच्या असीम खाणी) आमच्याजवळ नसाव्यात. पण आम्ही ती एका निश्चित प्रमाणातच पाठवीत असतो. 22 आम्हीच त्या वाऱ्यांना पाठवतो जे पाण्याने भरलेल्या ढगांना (आम्ही इच्छितो तिकडे) वाहून नेतात. मग आम्ही ढगांतून पाण्याचा वर्षाव करतो, व त्याद्वारे तुम्हाला तृप्त करतो. हे तुमच्यासाठी शक्य नव्हते की, तुम्ही ते साठवून ठेवू शकले असते.

23 खरोखर, आम्हीच जीवन प्रदान करतो आणि आम्हीच मृत्यू घडवून आणतो आणि सर्वांचे वारस केवळ आम्हीच असू. 24 आम्ही जे तुमच्यापूर्वी होऊन गेले, त्यांनाही जाणतो आणि जे तुमच्यानंतर येणारे आहेत, त्यांनाही जाणतो. 25 यात मुळीच शंका नाही की, तुमचा पालनकर्ता (न्यायाच्या दिवशी) त्या सर्वांना एकत्रित करील. तोच अस्सल बुद्धिमान आहे, सर्व काही जाणणारा आहे.

26 आम्ही मानवाला खणखणणाऱ्या मातीच्या सडलेल्या चिखलापासून निर्माण केले आहे

27 आणि (मानवापूर्वी) आम्ही जिन्न (नावाची) एक अदृश्य निर्मिती धगधगणाऱ्या आगीपासून निर्माण केली.

28 (ती वेळ आठवा) जेव्हा तुझ्या पालनकर्त्याने स्वर्गदूतांना म्हटले, 'मी सडलेल्या चिखलाच्या खणखणीत मातीपासून मानवाची निर्मिती करणार आहे.'

29 जेव्हा मी त्याला पूर्ण आकार देऊन, त्यात माझ्या आत्म्याची फुंकर मारेन, तेव्हा तुम्ही त्याच्यासमोर नतमस्तक व्हा. 30 तेव्हा सर्व स्वर्गदूत (साष्टांग नमस्कार घालीत) नतमस्तक झाले. 31 पण इब्लीसने तसे केले नाही. त्याने नतमस्तक होणाऱ्यांमध्ये सहभागी होण्यास नकार दिला. 32 अल्लाहने त्याला विचारले, 'हे इब्लीस! (इब्लीस–सैतानाचे नाव) तू नतमस्तक होणाऱ्यांमध्ये सहभागी न होण्याचे कारण काय?' 33 त्याने उत्तर दिले, 'मी असा नाही की, अशा मानवासमोर नतमस्तक व्हावे, ज्याला तू खणखणणाऱ्या मातीच्या सडलेल्या गाऱ्यापासून निर्माण केले आहेस.'

34 अल्लाहने म्हटले, 'तू येथून चालता हो, (म्हणजे स्वर्गीय परिसरातून), आणि (लक्षात ठेव), तू (येथूनपूढे) शापग्रस्त असशील. 35 आणि न्यायाच्या दिवसापर्यंत (माझा) शाप तुझ्यावर राहील.' 36 (त्यावर) सैतान म्हणाला, 'हे माझ्या पालनकर्त्या! तू मला पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत उसंत दे.' 37 (त्यावर) अल्लाहने म्हटले, 'तुला उसंत दिली जात आहे. 38 त्या दिवसापर्यंत ज्याची वेळ ठरलेली आहे.'

39 (त्यावर) सैतान म्हणाला, 'हे माझ्या पालनकर्त्या! ज्याप्रकारे तू मला सन्मार्गापासून दूर केलेस तर मीही पृथ्वीवर (जे जे वाईट आहे) त्यांना ते चांगले वाटायला लावीन आणि सर्वांची (वाईटरित्या) फसवणूक करून सोडीन. 40 फक्त त्यांना सोडून, जे तुझे सच्चे भक्त आहेत.'

41 अल्लाहने म्हटले, 'हा माझ्याकडे येण्याचा सरळ मार्ग आहे. 42 निश्चितच जे माझे सच्चे भक्त आहेत, त्यांच्यावर तुझे काही चालणार नाही. पण फक्त जे बिघडलेले आहेत, ते मात्र तुझ्या मार्गाचे अनुसरण करतील. 43 आणि अशा सर्वांसाठी नरक हेच वचन दिलेले ठिकाण आहे. 44 त्याचे सात दरवाजे आहेत. प्रत्येक दरवाजातून प्रवेश करणाऱ्या (नरकवासी लोकांच्या) टोळ्या विभागलेल्या आहेत.'

45 नि:संदेह, अल्लाहची जाण ठेवून (जीवन व्यतीत केलेले) लोक (मृत्यूनंतरच्या जीवनात) बागांमध्ये व (मन प्रसन्न करणाऱ्या) प्रवाहांच्या सान्निध्यात असतील. 46 (त्यांना सांगितले जाईल) शांती आणि सुरक्षिततेसह यात दाखल व्हा. 47 आम्ही त्यांच्या अंत:करणात जी काही (द्वेषभावना किंवा) जे काही अनुचित विचार असतील, ते सर्व आम्ही काढून टाकू. ते तिथे भावा–भावाप्रमाणे वावरतील. ते (एकमेकांप्रति शुद्ध मन घेऊन) एकमेकांसमोर आसनांवर बसलेले असतील. 48 तेथे त्यांना (त्या आनंदी अवस्थेत) ना कोणत्याही प्रकारचा त्रास जाणवेल, ना कधी त्यांना तेथून बाहेर काढण्यात येईल. 49 माझ्या भक्तांना सांगून टाका की, मी फार क्षमाशील व दयाळू आहे, यात मुळीच शंका नाही. 50 तसेच जी शिक्षा मी (अपराध्यांना) देईन. ती खरोखर फारच कठोर आहे.

51 त्यांना (पुन्हा एकदा) इब्राहीमच्या अतिथींची कहाणी ऐकवा. 52 जेव्हा ते त्याच्याकडे आले, तेव्हा म्हणाले, ‘तुम्हांस आमचा सलाम.’ (त्यावर) इब्राहीमने उत्तर दिले, ‘आम्हास तुमचे भय वाटते.’ 53 (त्यावर) ते म्हणाले, ‘भिण्याची (मुळीच) गरज नाही, आम्ही तुम्हाला अशा मुलाच्या (जन्माची) शुभवार्ता देण्यासाठी आलो आहोत, ज्याला सखोल ज्ञानाची देणगी लाभलेली असेल.’ 54 (त्यावर) इब्राहीमने म्हटले, ‘तुम्ही मला अशा वृद्धावस्थेत ही शुभवार्ता देत आहात? किती (विचित्र) आहे ती (गोष्ट) ज्याची तुम्ही मला शुभवार्ता देत आहात!’ 55 त्यांनी उत्तर दिले, ‘आम्ही तुम्हाला अशी शुभवार्ता देत आहोत, जी वास्तवात परिवर्तित होणे अटळ आहे. म्हणून तुम्ही आशा सोडणाऱ्यांपैकी होऊ नका.’ 56 (त्यावर) इब्राहीम उद्‌गारला, ‘सन्मार्गापासून पूर्णपणे दूर गेलेल्या लोकांव्यतिरिक्त दुसरा कोण आपल्या पालनकर्त्याच्या कृपेपासून निराश होऊ शकतो!’

57 नंतर त्याने विचारले, ‘हे स्वर्गदूतांनो! आता तुमच्यापुढे (आणखी)

कोणते कार्यक्रम आहे?' 58 त्यांनी उत्तर दिले, 'कुकर्मात ग्रस्त झालेल्या लोकांकडे आम्हाला पाठविण्यात आले आहे (जे आमच्याद्वारे नष्ट केले जाणार आहेत).' 59 फक्त लूतचे कुटुंबीय सोडून, त्या सर्वांना आम्ही वाचवू. 60 पण (त्याच्या कुटुंबीयांत) त्याच्या पत्नीस सोडून (आम्ही सर्वांना वाचवू). (जिच्याबाबतीत अल्लाह म्हणतो) 'आम्ही असा निर्णय केला आहे की, ती अवश्य मागे राहणाऱ्या अपराधी लोकांपैकी असेल.'

61 जेव्हा हे (अल्लाहचे) पाठवलेले दूत लूतच्या कुटुंबीयांकडे आले, 62 तेव्हा त्याने म्हटले, 'तुम्ही (इथे) अनोळखी लोक वाटता.' 63 (तेव्हा) त्यांनी उत्तर दिले, 'नाही, पण आम्ही तर तुमच्याकडे ती गोष्ट घेऊन आलो आहोत, जिच्याबाबतीत हे लोक नेहमी संशय घेत राहिले. 64 तसेच आम्ही तुमच्याकडे (त्या गोष्टीच्या पूर्ततेसाठी अल्लाहचा) निर्णय घेऊन आलो आहोत आणि आम्ही अगदी खरे बोलणारे आहोत. 65 तर तुम्ही (पहाट होण्यापूर्वी) रात्र असतानाच आपल्या कुटुंबीयांना घेऊन (वस्ती सोडून) निघून जा. मग तुम्ही स्वत: त्यांच्या मागोमाग राहा. तुमच्यापैकी कोणीही मागे वळून पाहू नये. जेथे जाण्याची तुम्हाला आज्ञा देण्यात आली, तर तुम्ही तेथे निघून जा.' 66 आम्ही (आमच्या दूतांकरवी) (पैगंबर) लूतकडे हा आदेश पाठविला की, सकाळ होता-होता (त्या अपराध्यांची) पाळेमुळे कापून टाकली जातील.

67 तेव्हा शहरातील लोक आनंदविभोर होऊन (लूत) कडे आले. 68 तो म्हणाला, 'हे पाहा! हे माझे अतिथी आहेत, म्हणून मला लज्जित व्हावे लागेल असे काही करू नका. 69 तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि मला लांछन लावू नका.' 70 ते म्हणाले, 'आम्ही तुला अनोळखी लोकांना (आश्रय) देण्यास मनाई केली नव्हती काय?' 71 लूत म्हणाला, 'जर तुम्ही (कुकर्म) करण्याच्या हेतूने आला असाल तर (हे पाहा!) या माझ्या मुली आहेत, (यांच्याशी वैध विवाह संबंध स्थापित करा).'

[72] तुझ्या जिवाची शपथ, हे लोक आपल्या कामुकतेच्या नशेत आंधळे झालेले होते. [73] मग दिवस उजळताच (आमच्या शिक्षेच्या) स्फोटाने त्यांना जखडून टाकले. [74] मग आम्ही (त्या अपराधी लोकांच्या वस्त्यांना) खालचा भाग वर आणि वरचा भाग खाली असे करून टाकले आणि त्यांच्यावर मातीच्या दगडांचा वर्षाव केला. [75] खरोखर, या सर्व (घटनांमध्ये) संदेश असलेल्या खुणा आहेत, त्या लोकांसाठी जे बोध प्राप्त करणारे आहेत. [76] ती (ओसाड) वस्ती अद्याप रहदारीच्या मार्गाच्या बाजूलाच आहे. [77] खरोखर, यात संदेश असलेली एक खूण आहे, त्यांच्यासाठी जे (अल्लाहवर) विश्वास ठेवणारे आहेत.

[78] (लूतच्या लोकांप्रमाणेच, मदियन जवळील) अरण्यात राहणारे लोक (ही) अत्याचारी होते. [79] म्हणूनच आम्ही त्यांचा सूड घेतला. (अपराधी लोकांच्या) त्या दोन्ही वस्त्या, आजही रहदारीच्या मार्गाच्या बाजूला, (जमिनीत पुरलेल्या अवस्थेत) आहेत. [80] अशाच प्रकारे अल-हिज्र च्या लोकांनीही पैगंबरांना खोटे ठरविले. [81] आम्ही त्यांना आमच्या संदेश असलेल्या खुणा प्रदान केल्या, पण ते त्यांकडे पाठ फिरवीत राहिले. [82] ते पर्वतांमध्ये कोरून आपली घरे बनवीत असत, म्हणजे त्यांना सुरक्षित राहता यावे. [83] सकाळ झाल्या-झाल्या, त्यांना (आमच्या शिक्षेच्या) स्फोटाने जखडून टाकले. [84] परिणामी जे काही त्यांनी कमविले होते, त्यांच्या काही कामी आले नाही.

[85] (लक्षात ठेवा की), आम्ही आकाश व पृथ्वी यांना आणि त्या दोहोंच्यामध्ये जे काही आहे, ते सर्व केवळ सत्य (उद्देशासहित) निर्माण केलेले आहे. ती घटका (म्हणजेच कयामत) येणार यात मुळीच शंका नाही, (जेव्हा, हे सर्व सर्वांसमोर उघड होऊन जाईल). म्हणून तुम्ही चांगल्या रीतीने त्यांच्या (चुकांकडे) दुर्लक्ष करा. [86] नि:संदेह तुमचा पालनकर्ता, सर्वांचा पालनकर्ता आहे, तसेच तो सर्वांच्या (स्थितीची पूर्ण) जाणीव ठेवून आहे.

[87] (पैगंबर!)आम्ही तुम्हाला वारंवार पठण केली जाणारी सात वचने आणि हा अत्युच्च असा कुराण प्रदान केलेला आहे. [88] तर या जगातील (क्षणिक) उपभोगाची जी काही सामग्री आम्ही (त्या सत्य नाकारणाऱ्या) लोकांपैकी काहींना देऊन ठेवली आहे, त्याकडे तुम्ही (अभिलाषेने) आपल्या नजरा (कदापि) वळवू नका. तसेच त्यांच्याबाबतीत दु:खीही होऊ नका (की, ते तुमच्या म्हणण्याकडे लक्ष देत नाहीत). पण श्रद्धावंतांना आपल्या मायेच्या पंखात सामावून घ्या. [89] आणि सांगा, 'मी तर केवळ उघड-उघड सावध करणारा आहे.' [90] अशाच प्रकारे आम्ही त्या लोकांवरही (ग्रंथ) अवतरित केला होता, (ज्यांनी नंतर) त्याची (अनेक) भागात विभागणी करून टाकली. [91] ज्यांनी (आता) या कुराणाचे (अर्थनिष्पत्तीच्या बाबतीत) तुकडे-तुकडे करून टाकले.

[92] तेव्हा तुझ्या पालनकर्त्याची शपथ, आम्ही (न्यायाच्या दिवशी) अवश्य त्या सर्वांना जाब विचारणार. [93] जे काही ते करीत होते, त्याविषयी (जाब विचारणार).

[94] तेव्हा (हे पैगंबर!) जी गोष्ट त्यांना स्पष्टपणे (सांगून टाकण्याचा) तुम्हाला आदेश देण्यात आला आहे, ती तुम्ही सांगून टाका आणि इतरांना अल्लाहचे समकक्ष ठरविणाऱ्या लोकांपासून दूर राहा. [95] निश्चितच, आम्ही तुमच्यातर्फे (या संदेशाची) खिल्ली उडविणाऱ्या लोकांचा (समाचार घेण्यास) पर्याप्त आहोत. [96] जे अल्लाहशिवाय इतर उपास्य असल्याचे ठासून सांगतात, पण त्यांना लवकरच (सत्य) कळून चुकेल. [97] आम्ही चांगल्याप्रकारे जाणून आहोत की, ते जे काही (ईश-निंदेच्या गोष्टी) बोलतात, त्याद्वारे तुमच्या मनाला इजा पोचते. [98] तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याचे स्तवन करीत त्याचे गुणगान करा आणि त्याच्यासमोर नतमस्तक होणाऱ्यांपैकी व्हा [99] आणि आपल्या पालनकर्त्याची उपासना (भक्ती) करीत राहा, येथपावेतो की, ती वेळ येऊन ठेपावी, जिचे येणे अगदी निश्चित आहे, (म्हणजेच मृत्यूची वेळ).

# सूरह–१६. अन–नहल

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 अल्लाहचा निर्णय, बस येण्यावरच आहे. तेव्हा तुम्ही त्यासाठी (फार) घाई करू नका. असीम आहे त्याची महिमा! आणि ज्यांना लोक अल्लाहच्या बरोबरीचे स्थान देतात, त्यांच्यापेक्षा तो कितीतरी श्रेष्ठ आहे. 2 तो आपल्या भक्तांपैकी ज्याच्याबाबतीत इच्छितो त्याच्याकडे आपल्या आदेशाने स्वर्गदूतांना (आपला) संदेश देऊन पाठवितो. (तमाम लोकांना) सावध करा की, माझ्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही (उपासनेयोग्य नाही). म्हणून माझीच जाण ठेवून (जीवन व्यतीत करा). 3 त्यानेच आकाश व पृथ्वी यांना योग्य उद्देशासहित निर्माण केले आहे. (आणि) ज्यांना ते अल्लाहच्या बरोबरीचे स्थान देतात, त्यांच्यापेक्षा तो कितीतरी श्रेष्ठ आहे.

4 त्यानेच मानवाला (केवळ) एका वीर्याच्या थेंबापासून निर्माण केले. पण हाच (तुच्छ थेंबापासून निर्मित मानव) एकदम धडधडीत भांडखोर बनला. 5 त्यानेच पशुधनाचीही निर्मिती केली, तुम्ही त्यांच्यापासून (उबदार) वस्त्रे आणि इतर (अनेक) लाभही प्राप्त करता. त्यांच्यापैकी काहींचे (तुम्ही अन्न म्हणून) भक्षणदेखील करता. 6 तसेच (त्या दृश्यात) तुमच्यासाठी नयनरम्यता देखील आहे. जेव्हा तुम्ही सायंकाळी त्यांना (चारून) घरी घेऊन येता व सकाळी चरण्यासाठी सोडून देता. 7 ते तुमची ओझी (विविध) ठिकाणी वाहून नेतात, जिथे तुम्हाला (स्वत:) वाहून न्यायचे असेल तर तुम्ही फार कष्ट सोसल्याशिवाय वाहून नेऊ शकणार नाही. नि:संदेह तुमचा पालनकर्ता फार कनवाळू व दयाळू आहे. 8 त्यानेच घोडे, खेचरे आणि गाढवे निर्माण केली आहेत. यासाठी की, तुम्ही त्यांच्यापासून स्वारीचे काम घ्यावे, तसेच ती तुमच्या शोभेची साधने व्हावीत. तो अशांचीही निर्मिती करतो, ज्यांच्याबद्दल तुम्हाला (सध्या) ज्ञान

नाही.

9 (तो तुमचा निर्माता असल्याकारणाने) केवळ तोच तुम्हाला त्याच्याकडे पोचणारा सरळ मार्ग दाखवू शकतो. (एका सरळ मार्गाला सोडून), अनेक मार्ग असेही आहेत, जे सरळ मार्गापासून दूर जातात. जर अल्लाहने इच्छिले असते तर तुम्हा सर्वांनाच सन्मार्गी लावले असते. 10 तोच आहे ज्याने आकाशातून (ढगांद्वारे) पाण्याचा वर्षाव केला, त्यातूनच तुम्हाला पिण्याचे पाणी मिळते आणि त्यापासूनच झाडाझुडपांची वाढ होते, ज्यात तुम्ही (आपली गुरेढोरे) चारता. 11 तो त्यापासूनच तुमच्यासाठी धान्य, जैतून, खजूर, द्राक्षे व सर्व प्रकारची फळे निर्माण करतो. निश्चितच यामध्ये संदेश असलेली खूण आहे, त्यांच्यासाठी जे खरोखर चिंतन करतात.

12 त्यानेच रात्र व दिवस आणि सूर्य व चंद्र यांना तुमच्या सेवेत कार्यरत केलेले आहे. तसेच तारेदेखील त्याच्या आज्ञेच्या अधीन आहेत. निश्चितच यात संदेश असलेल्या खुणा आहेत, त्या लोकांसाठी जे आपल्या बुद्धीचा वापर करणारे आहेत. 13 त्यानेच या पृथ्वीवर तुमच्यासाठी ज्या विविध प्रकारच्या वस्तू निर्माण केल्या. निश्चितच त्यात त्या लोकांसाठी संदेश असलेली खूण आहे, जे बोध घेऊ इच्छितात.

14 तोच आहे, ज्याने समुद्राला तुमच्या सेवेत लावले, म्हणजे तुम्हाला त्यातून ताज्या मांसाचे भक्षण करता यावे, तसेच त्यातून जडजवाहीर, जे तुम्ही लोक परिधान करीत असता, तेही काढता यावे. (समुद्रावर) तुम्हाला (हेही) पाहायला मिळते की, नौका कशाप्रकारे समुद्राला फाडून पुढे जात आहेत. (ही सर्व व्यवस्था तुमच्या अधीन आहे) म्हणजे तुम्ही त्याच्या कृपेचा शोध घ्यावा आणि (तुम्ही त्याचे) आभार मानावे.

15 त्यानेच पर्वतांना पृथ्वीवर भक्कमरित्या स्थापित केले. म्हणजे ती तुम्हाला घेऊन डोलायला लागू नये. (त्यानेच) नद्या व मार्ग बनविले आहेत, म्हणजे

तुम्हाला योग्य मार्ग सापडावा (म्हणजे तुम्ही आपल्या ध्येयापर्यंत पोहोचावे). [16] तसेच (त्याने इतर अनेक) दिशादर्शक साधनेही (निर्माण केलेली आहेत), याद्वारे आणि नक्षत्रांद्वारेही लोक (प्रवासात) मार्ग निश्चित करतात.

[17] तर मग जो निर्माण करतो, तो त्याच्या समान होऊ शकतो का, जो काहीच निर्माण करीत नाही? मग तुम्ही (यावर) चिंतन करणार नाही का? [18] जर तुम्ही अल्लाहच्या कृपाप्रसादांची गणना करण्याचा प्रयत्न कराल तर तुम्ही त्यांची गणना कधीही करू शकणार नाही. अल्लाह, खरोखर फार क्षमाशील व दयाळू आहे. [19] अल्लाह (ते सर्व) पूर्णपणे जाणून आहे, जे काही तुम्ही लपवता आणि जे काही उघड करता.

[20] (पण) ज्यांचा लोक अल्लाहशिवाय धावा करतात ते काहीच निर्माण करू शकत नाहीत. कारण ते स्वत:च निर्माण केले गेलेले आहेत. [21] ते मृत आहेत, जिवंत नव्हे, तसेच त्यांना हे देखील माहीत नाही की, त्यांचे पुनरुत्थान केव्हा केले जाणार आहे. [22] तुमचा उपास्य, केवळ अल्लाह आहे, पण जे लोक मृत्यूनंतरच्या (शाश्वत) जीवनावर विश्वास ठेवत नाहीत. त्यांची मने सत्याविषयी तिटकाऱ्याने (भरलेली) आहेत. तसेच ते (फार) अहंकारी आहेत. [23] नि:संदेह, अल्लाहला ते सर्व माहीत आहे, जे काही ते लपवीत असतात व जे काही ते प्रकट करीत असतात. खचितच अहंकारी लोक त्याला प्रिय नाहीत.

[24] जेव्हा त्यांना विचारले जाते, 'ते काय आहे जे तुमच्या पालनकर्त्याने अवतीर्ण केले आहे?' तेव्हा ते उत्तरतात, 'आधी होऊन गेलेल्या लोकांच्या कथा आहेत.' [25] (यांच्या अहंकाराचा परिणाम असा होईल) की, पुनरुत्थानाच्या (म्हणजेच क़यामतीच्या) दिवशी स्वत:चा भार तर पूर्णपणे त्यांना उचलावाच लागेल आणि सोबत त्या लोकांचाही काही भार उचलावा लागेल, ज्यांना त्यांनी स्वत:ला ज्ञान नसतानाही मार्गभ्रष्ट केले. (चांगल्याप्रकारे) जाणून घ्या, किती

वाईट ओझे आहे ते, जे त्यांच्यावर लादले जाईल.

26 त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांनी देखील कट-कारस्थाने रचली होती, पण अल्लाहने त्यांनी (रचलेल्या खोट्या गोष्टींच्या) इमारतीची, मूळ पायापासूनच खबर घेतली. त्यामुळे वरून त्याचे (म्हणजे त्यांच्या मनसुब्यांच्या इमारतीचे) छप्पर त्यांच्यावर कोसळले. शिक्षेची आपत्ती त्यांच्यावर त्या दिशेने आली, ज्याची त्यांनी कधी कल्पनादेखील केली नव्हती. 27 मग क़यामतीच्या दिवशी अल्लाह त्यांना अपमानित करेल आणि म्हणेल, ज्यांना तुम्ही माझ्या बरोबरीचे स्थान दिले होते ते माझे सहभागी आता कोठे आहेत, ज्यांच्यासाठी तुम्ही स्वत:ला (माझ्या मार्गदर्शनापासून) वेगळे पाडून घेतलात? ज्यांना ज्ञान प्रदान करण्यात आले होते, ते म्हणतील की, आज सत्य नाकारणाऱ्या लोकांना अपमानित केले जाईल व त्यांना (फार मोठी) पीडा पोचेल.

28 ज्या लोकांचे प्राण स्वर्गदूत अशा स्थितीत काढून घेतील की, ते स्वत:च्या जिवावरच अत्याचार करीत होते. त्यावेळी ते त्यांच्यासमोर संपूर्ण शरणागती पत्करून म्हणतील, आम्ही तर कोणतेही वाईट कृत्य करीत नव्हतो. नाही कसे? तुम्ही जे काही करीत होता, ते अल्लाहला चांगले माहीत आहे. 29 (आपल्या दुष्कृत्यांच्या मोबदल्यात) आता दाखल व्हा नरकात, कायम तेथेच राहण्यासाठी. खरोखर किती वाईट ठिकाण आहे, अहंकारी लोकांचे!

30 जेव्हा अल्लाहची जाण ठेवून असलेल्या लोकांना विचारले जाते की, तुमच्या पालनकर्त्याने जे पाठविले आहे, ते काय आहे? तेव्हा त्यांचे उत्तर असते, 'सर्वश्रेष्ठ गोष्ट.' जे लोक चांगली कृत्ये करतात, या जगात देखील त्यांचं भलं होईल. पण मृत्यूनंतरच्या शाश्वत जीवनातील (त्यांचे) स्थान कितीतरी पटीने चांगले असेल. खरोखर किती उत्कृष्ट ठिकाण आहे, अल्लाहची जाण असलेल्या लोकांसाठी. 31 चिरंतन आनंदाच्या बागांत ते प्रवेश करतील, त्यातून पाण्याचे (मन प्रसन्न करणारे) प्रवाह वाहत असतील. त्यांना तिथे ते सर्व

काही मिळेल, ज्याची ते इच्छा व्यक्त करतील. अशाप्रकारे अल्लाह त्याची जाण ठेवून (जीवन व्यतीत करणाऱ्या) लोकांना मोबदला देत असतो. 32 अशा लोकांचे प्राण स्वर्गदूत तेव्हा काढतात, जेव्हा ते मनाने पवित्र अवस्थेत असतात, (तेव्हा) स्वर्गदूत (त्यांना) म्हणतात, 'तुम्हाला सलाम, (म्हणजे तुम्हाला शांती लाभो). दाखल व्हा स्वर्गात, तुम्ही (आपल्या जीवनात) जी सत्कर्मे केली त्यांच्या मोबदल्यात.'

33 (सत्य नाकारणारे हे लोक) या गोष्टीची प्रतीक्षा करीत आहेत का की, त्यांच्याकडे स्वर्गदूत यावेत किंवा तुमच्या पालनकर्त्याचा निर्णय उघड व्हावा. यांच्यापूर्वीच्या लोकांनीदेखील असेच केले होते. अल्लाहने त्यांच्यावर अन्याय केलेला नाही, तर त्यांनीच स्वत:वर अन्याय केला. 34 म्हणून त्यांना त्यांच्या दुष्कृत्यांची शिक्षा मिळाली. ज्या गोष्टिची ते खिल्ली उडवीत असत त्याच गोष्टीने त्यांना वेढले.

35 ज्या लोकांनी इतरांना अल्लाहचे सहभागी ठरविले, (आता) ते म्हणतात, 'अल्लाहने तसे इच्छिले असते तर आम्ही त्याच्याशिवाय अन्य कोणाचीही उपासना केलीच नसती, ना आम्ही, ना आमच्या वाडवडिलांनी. तसेच आम्ही त्याच्या आदेशाशिवाय कोणतीही गोष्ट निषिद्धही ठरविली नसती.' त्यांच्या पूर्वीचे (अपराधी) लोक देखील असेच बोलले होते. पण पैगंबरांवर (त्यांना सोपवलेला) संदेश स्पष्टरित्या पोचविण्याशिवाय अन्य कोणतीही जबाबदारी नाही.

36 आम्ही प्रत्येक जनसमूहामध्ये (या संदेशासह) एका पैगंबराला उभे केले, 'केवळ अल्लाहची उपासना करा आणि सैतानापासून दूर राहा.' तर (आधी होऊन गेलेल्या पिढ्यांत) काही असे निघाले, ज्यांना अल्लाहचे मार्गदर्शन लाभले आणि दुसरे काही असेही होते, जे नष्ट होण्यास पात्र ठरले. तर धरतीवर प्रवास करून पाहा की, ज्यांनी पैगंबरांना खोटे ठरविले, त्यांचा शेवट कसा झाला! 37 (पैगंबर!) तुम्ही (सत्य नाकारण्यावर आग्रही असलेल्या लोकांच्या

बाबतीत) फार इच्छुक असाल की, त्यांना मार्गदर्शन लाभावे तर (लक्षात ठेवा की), अल्लाह अशांना मार्गदर्शन करीतच नसतो, ज्यांच्याबद्दल त्याने असे ठरविलेले आहे की, ते मार्गभ्रष्ट होणार. तेव्हा अशांना कोणीही साहाय्यकर्ता लाभणार नाही.

38 यांचे तर असे आहे की, ते अल्लाहच्या नावाने शपथा घेऊन सांगतात, दृढतापूर्वक शपथा, की, 'जो मरून जातो त्याला अल्लाह पुन्हा (कधी) उठवून उभा करणार नाही!' पण असे नाही (मेलेला प्रत्येक जण उठवून उभा केला जाणार), हे एक असे वचन आहे ज्याची पूर्तता करणे, त्याने स्वत:वर बंधनकारक केलेले आहे. पण अनेक लोक (ही गोष्ट विश्वासपूर्वक) जाणत नाहीत. 39 हे यासाठी होणार की, तो त्यांच्यासमोर त्या सर्व गोष्टींचे (सत्य) उलगडून टाकणार आहे, ज्या गोष्टींविषयी ते वेगवेगळे दृष्टिकोन बाळगून आहेत. तसेच सत्य नाकारण्यावर आग्रही असलेल्या लोकांनाही, हे कळून चुकेल की, ते खोटे बोलत होते. 40 जेव्हाही आम्ही एखादी गोष्ट अस्तित्वात आणू इच्छितो, तेव्हा तिच्या बाबतीत एवढेच म्हणतो, 'अस्तित्वात ये', आणि ती अस्तित्वात येते.

41 ज्या (श्रद्धावंतांनी) आपल्यावर अत्याचार झाल्यानंतर अल्लाहच्या कार्यासाठी आपल्या घरादाराचा त्याग केला. आम्ही त्यांना या जगातही अवश्य चांगले स्थान देऊ आणि मृत्यूनंतरच्या जीवनात तर त्यांच्यासाठी खचितच फार मोठा मोबदला आहे. (सत्य नाकारणाऱ्यांनीही) हे जाणले असते तर! 42 ते (प्रतिकूल परिस्थितीतही) संयम ठेवणारे आहेत. तसेच ते आपल्या पालनकर्त्यावर (दृढ) विश्वास ठेवणारे आहेत.

43 (पैगंबर!) तुमच्यापूर्वी देखील आम्ही (मर्त्य असलेल्या) माणसांमधूनच (आमचे) पैगंबर (नियुक्त करून लोकांकडे) पाठविले. ज्यांच्याकडे आम्ही (आमचा) संदेश प्रकट करीत होतो. तुम्हाला (अद्याप) याबाबतीत जाणीव झालेली नसेल तर (आधीच्या) ग्रंथांचे अनुसरण करणाऱ्या ज्ञानी लोकांना विचारून पाहा. 44 आम्ही

त्यांना पाठविले होते सत्याच्या स्पष्ट प्रमाणासहित आणि विवेकपूर्ण ग्रंथासहित. अशाच प्रमाणे तुमच्याकडेही आम्ही ही स्मरणिका याचसाठी पाठविली की, तुम्ही लोकांना ती गोष्ट स्पष्ट करून सांगावी, जी त्यांच्याकडे पाठविण्यात आली आहे. म्हणजे त्यांनी त्यावर चिंतन करावे.

45 जे लोक वाईट कारस्थाने करण्यात गुंतलेले आहेत, ते या गोष्टीपासून स्वत:ला अगदी सुरक्षित समजतात का की, अल्लाह त्यांना जमिनीत गाडून टाकू शकत नाही, किंवा अशी शिक्षाही त्यांच्यावर येणार नाही, ज्याची त्यांनी कधी कल्पना केलेली नाही. 46 किंवा तो त्यांना अचानकपणे फैलावरही घेणार नाही, जेव्हा ते आपल्या रोजच्या कामांमध्ये गुंतलेले असतील (त्यांनी अल्लाहविषयी स्वत:हूनच असा समज करून घेतलेला आहे). (पण) ते त्याच्या योजनेला कदापि विफल करू शकणार नाहीत. 47 किंवा (असेही होऊ शकते की), ते अल्लाहच्या शिक्षेचे भय बाळगून असतानाच, तो त्यांना हळू-हळू नाश पावण्याच्या पद्धतीने जखडून टाकू शकतो. खरोखर तुमचा पालनकर्ता फारच कनवाळू व दयाळू आहे.

48 (सत्य नाकारणाऱ्या लोकांनी) या गोष्टीचे कधी निरीक्षण केले नाही का की, अल्लाहने जे काही निर्माण केलेले आहे, त्यांच्या छाया उजवीकडे किंवा डावीकडे, वाकून (कशाप्रकारे) अल्लाहसमोर पूर्ण नम्र भावाने नतमस्तक होत आहेत. 49 कारण आकाशातील प्रत्येक वस्तू किंवा पृथ्वीवरील सर्व प्राणिमात्र अल्लाहसमोरच नतमस्तक होत असतात, तसेच स्वर्गदूत देखील (त्याच्याचसमोर) नतमस्तक आहेत आणि ते (कधीही) अहंकारपूर्वक वर्तन करीत नाहीत. 50 ते आपल्यावर (नजर ठेवून) असलेल्या, आपल्या पालनकर्त्याचे (नेहमी) भय बाळगून असतात. केवळ तेच करतात ज्याची त्यांना आज्ञा दिली जाते. 51(लोकांनो!) अल्लाहने फर्माविले आहे, 'दोन (किंवा त्याहून अधिक) उपास्यांची उपासना करू नका, तोच एकमेव ईश्वर आहे (उपासनेयोग्य आहे). म्हणून (लोकांनो!)

केवळ माझेच (आणि माझेच) भय बाळगा.' 52 जे काही आकाशात आहे व जे काही पृथ्वीवर आहे, तोच आहे त्यांचा मालक. (सर्वांनी) नेहमी त्याचेच आज्ञापालन करणे आवश्यक आहे. तर मग तुम्ही अल्लाहला सोडून इतरांचे भय बाळगता की काय?

53 जी कोणती चांगली गोष्ट तुम्हाला लाभते, ती अल्लाहकडूनच आहे. जेव्हा तुम्हाला एखादे दु:ख पोहोचते, तेव्हा तुम्ही मदतीसाठी त्याचाच धावा करू लागता. 54 मग जेव्हा तो तुमचे दु:ख दूर करतो, तेव्हा तुमच्यापैकी काही जण इतरांना आपल्या पालनकर्त्याचे समकक्ष ठरवू लागतात. 55 अशासाठी की, आम्ही त्यांना जे काही दिलेले आहे, त्याबद्दल कृतघ्नता व्यक्त करावी. तर या (अल्पकालीन) जीवनात काही काळ मौजमजा करून घ्या. पण लवकरच (सत्य) तुम्हाला कळून येईल. 56 आम्ही त्यांना जे काही दिलेले आहे, त्याचा एक भाग ते आपल्या (त्या खोट्या उपास्यांकरिता) वेगळा काढून ठेवतात, ज्यांचे त्यांना कसलेही ज्ञान नाही. अल्लाहची शपथ! ज्या काही खोट्या गोष्टी तुम्ही रचित आहात, त्याविषयी तुम्हाला अवश्य जाब विचारण्यात येईल.

57 ते (स्वर्गदूतांना) अल्लाहच्या मुली ठरवितात, असीम आहे त्याचे पावित्र्य! पण याउलट स्वत:साठी ते निवडतात, ज्याची इच्छा ते मनामध्ये बाळगून असतात, (म्हणजे मुले). 58 त्यांच्यापैकी एखाद्याला जेव्हा मुलीच्या (जन्माची) वार्ता दिली जाते, तेव्हा दु:खामुळे त्याचा चेहरा काळा पडतो आणि मनातल्या मनात त्याचे प्राण गुदमरल्यासारखे होते. 59 (मुलीच्या जन्माची) वाईट वार्ता मिळाल्यानंतर तो स्वत:ला लज्जेपोटी लोकांपासून लपवीत असतो. (तो या विचारात असतो की,) हा अपमान सहन करीत राहायचे की, तिला मातीत गाडून टाकायचे. किती वाईट निर्णय आहे तो, जो ते करीत असतात! 60 जे लोक मृत्यूनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवत नाहीत, त्यांचे उदाहरण अतिशय वाईट आहे. तर अल्लाहचे प्रत्येक गुण सर्वोत्कृष्ट आहे. तोच प्रभुत्वशाली आहे,

अस्सल बुद्धिवान आहे.

61 आणि जर अल्लाहला लोकांना त्यांच्या वाईट कृत्यांबद्दल (ताबडतोब) त्यांच्या मुसक्या आवळायच्या असत्या तर (त्याने) पृथ्वीतलावर एकालाही सोडले नसते. पण तो लोकांना एका निर्धारित कालावधीपर्यंत उसंत देत असतो. मग जेव्हा या कालावधीचा शेवट येऊन ठेपतो, तेव्हा ते त्याच्या एक क्षणभर ना मागे राहू शकत, ना पुढे जाऊ शकत.

62 ते अल्लाहशी त्या गोष्टींचा संबंध जोडतात, ज्या गोष्टी त्यांना स्वत:साठीही प्रिय नाहीत. ते आपल्या तोंडून खोट्या गोष्टी बोलत असतात की, सर्व चांगल्या गोष्टी त्यांच्याचसाठी आहेत. यात मुळीच शंका नाही की, (नरकाची) आग त्यांची वाट पाहत आहे. आणि त्यांना अवश्य त्यात पोचविले जाईल.

63 (पैगंबर!) अल्लाहची शपथ, आम्ही तुमच्यापूर्वी (विविध) जनसमूहांकडे पैगंबर पाठविले होते. पण (सत्य नाकारण्यावर आग्रही असलेल्या लोकांनी, आमच्या संदेशांकडे नेहमीच दुर्लक्ष केले कारण) सैतानाने त्यांची (वाईट)कृत्ये त्यांना चांगली कृत्ये वाटतील असे सुशोभित करून दाखविली आणि आजही तोच त्यांचा मित्र आहे. त्यांना दु:खदायक शिक्षा होणे अटळ आहे. 64 आम्ही हा ग्रंथ तुमच्याकडे केवळ यासाठी पाठविला आहे की, तुम्ही, ते ज्या (श्रद्धाविषयक) गोष्टींच्या बाबतीत मतभेद बाळगून आहेत, त्या गोष्टी त्यांना स्पष्ट करून सांगाव्यात. श्रद्धावंत लोकांसाठी (तो ग्रंथ म्हणजे) मार्गदर्शन व कृपा आहे.

65 अल्लाहच आकाशातून (ढगांद्वारे) पाणी वर्षितो आणि जमीन मृतप्राय झाल्यानंतर त्या (पाण्या)द्वारे तिला जीवन प्रदान करतो. खरोखर, यात संदेश आहे त्यांच्यासाठी जे लक्षपूर्वक ऐकण्यासाठी (इच्छुक) आहेत.

66 तसेच गुराढोरांमध्येही निश्चितपणे तुमच्यासाठी बोध आहे. त्यांच्या पोटांत असलेल्या शेण व रक्त यांच्यामधून बाहेर काढून तुम्हाला पिण्यासाठी

शुद्ध दूध उपलब्ध करवितो. पिणाऱ्यांसाठी स्वादिष्ट असे दूध. 67 तसेच (आम्ही तुम्हाला पौष्टिक आहार प्रदान करीत आहोत) खजूर आणि द्राक्षांच्या रूपाने देखील. तुम्ही यांपासून कैफ आणणारे पेय तसेच आरोग्यदायी अन्न प्राप्त करता. खरोखर यामध्येही संदेश असलेली (खूण) आहे, त्यांच्यासाठी — जे आपल्या बुद्धीचा वापर करतात.

68 तर (पाहा कशाप्रकारे) तुमच्या पालनकर्त्याने मधमाशीला अंत:प्रेरणा दिली की, डोंगरात, झाडांमध्ये आणि (लोक) उभारतात त्या मांडवात तू आपली घरे बनव. 69 मग सर्व प्रकारच्या फळांचे (व फुलांचे) रस शोषित राहा. आणि तुझ्या पालनकर्त्याने तुझ्यासाठी निश्चित केलेल्या मार्गांवर संचार करीत राहा. तिच्या पोटातून विविधरंगी पेय बाहेर पडते (म्हणजेच मध). जे लोकांसाठी आरोग्यदायी आहे (म्हणजे त्यात तसे गुणधर्म आहेत). खरोखर यामध्येही एक संदेश असलेली खूण आहे, चिंतन करणाऱ्या लोकांसाठी.

70 (लोकांनो!) अल्लाहनेच तुम्हाला निर्माण केले, मग तोच तुम्हाला मरण देतो. तसेच तुमच्यामध्ये काही असेही आहेत, जे वार्धक्याच्या (फार शेवटच्या म्हणजेच) लाचारीच्या अवस्थेपर्यंत नेले जातात. (त्यांची अवस्था अशी होते की), एकेकाळी जे त्यांना चांगल्याप्रकारे समजायचे, ते (आता) काहीही समजत नाही. खरोखर अल्लाह प्रत्येक गोष्टीचा जाणकार आहे आणि सामर्थ्यशाली आहे.

71 अल्लाहने उपजीविकेच्या बाबतीत, काहींना काहींवर आधिक्य प्रदान केले आहे. मग ज्यांना आधिक्य प्रदान करण्यात आलेले आहे, ते असे तर करीत नाहीत की, आपल्या साधनसामग्रीतून (काही) वाटा आपल्या सेवकांना देऊन टाकण्यास तयार आहेत, यासाठी की, ते सर्व (उपजीविकेच्या) बाबतीत समान होऊन जावेत. मग ते अल्लाहच्या उपकारांना नाकारीत आहेत का?
72 अल्लाहने तुमच्यामधूनच तुमच्यासाठी पत्नी बनविल्या आहेत आणि तुमच्या

पत्नींपासून पुत्र व (पुढे) नातू निर्माण केले. तसेच उपजीविकेच्या उत्तम वस्तू तुम्हाला उपलब्ध करून दिल्या. (हे सर्व अल्लाहने केलेले असताना) हे लोक असत्य व व्यर्थ गोष्टींवर विश्वास ठेवून आहेत? आणि अल्लाहच्या कृपेला नाकारत आहेत? 73 ते अल्लाहला सोडून अशा गोष्टींची उपासना करीत आहेत, जे ना आकाशातून, ना जमिनीतून (आपल्या उपासकांना) कोणतीही उपजीविका प्रदान करण्याचे सामर्थ्य बाळगतात. तसेच त्यांच्याकडे असे सामर्थ्य असणे कदापि शक्य नाही. 74 म्हणून तुम्ही अल्लाहची तुलना कोणाशीही करू नका. नि:संशय, अल्लाह (सर्व काही) जाणतो, पण तुम्ही जाणत नाही.

75 अल्लाह तुमच्यासमोर एक तुलनात्मक उदाहरण प्रस्तुत करीत आहे की, एक गुलाम आहे, ज्याच्यावर दुसऱ्याचे स्वामित्व आहे, पण त्या गुलामाला कोणत्याही प्रकारचे अधिकार प्राप्त नाही. तर (दुसरीकडे) एक (स्वतंत्र असलेला) माणूस आहे, ज्याला आम्ही आमच्याकडून (देणगीच्या स्वरूपात) विपुल प्रमाणात उपजीविकेची साधने दिलेली आहेत. तो त्यातून गुप्तरित्या व जाहीररित्या (आमच्या कार्यासाठी) खर्च करीत असतो. तर हे (दोघे) समान होऊ शकतात का? स्तुती केवळ अल्लाहसाठीच आहे. पण अनेक लोकांना हे समजत नाही.

76 अशाचप्रकारे अल्लाह (तुमच्यासमोर) आणखी एक तुलनात्मक उदाहरण प्रस्तुत करीत आहे. दोन माणसे आहेत, त्यांपैकी एक मुका आहे. जो काहीच करू शकत नाही. तर तो आपल्या मालकाला एका प्रकारे भार बनलेला आहे. (मालकाने) त्याला कोठेही पाठवले, तरी तो कोणतेही काम नीट करून येत नाही. तर तो व असा माणूस जो, जे न्याय्य आहे तेच करण्याचा आदेश देतो आणि तो स्वत: सन्मार्गावर मार्गस्थ आहे, (हे दोघे) समान होऊ शकतात का?

77 आकाश आणि पृथ्वीच्या अदृश्य गोष्टींचे ज्ञान केवळ अल्लाहलाच आहे. न्यायाच्या दिवसाचे (म्हणजेच क़यामतीचे) आगमन अशाप्रकारे (अचानक) होईल की, जणू डोळ्यांच्या पापणींचे लवणे, किंबहुना त्याहूनही लवकर. नि:संदेह,

अल्लाहला प्रत्येक गोष्टीवर पूर्ण नियंत्रण प्राप्त आहे. 78 अल्लाहनेच तुम्हाला तुमच्या मातांच्या उदरांतून बाहेर काढले, तेव्हा तुम्हाला कोणत्याही गोष्टीचे ज्ञान नव्हते. त्यानेच तुम्हाला कान, डोळे आणि मन (म्हणजे बुद्धी) या गोष्टी प्रदान केल्या, यासाठी की, तुम्ही त्याच्याप्रति (म्हणजे निर्मात्याप्रति) आभार व्यक्त करीत राहावे.

79 (सत्य नाकारणाऱ्या लोकांनी) आकाशात या गोष्टीचे कधी निरीक्षण केले नाही का? की, (अल्लाहने) पक्ष्यांना कशाप्रकारे (आकाशाच्या) वातावरणात उडण्याचे सामर्थ्य प्रदान केलेले आहे. त्यांना अल्लाहशिवाय दुसरे कोणीही रोखून धरलेले नाही. खरोखर, यात त्या लोकांसाठी संदेश असलेल्या खुणा आहेत, जे विश्वास ठेवणारे (श्रद्धावंत) आहेत. 80 आणि अल्लाहनेच तुम्हाला अशी घरे (बांधण्याची योग्यता) दिली आहे, जी (घरे) तुमच्यासाठी विश्रांतिस्थान ठरतात. (त्यानेच) तुम्हाला जनावरांच्या कातड्यांपासून घरे बनविण्याचे (कौशल्य) प्रदान केले आहे. ती वापरासाठी (दोन्ही परिस्थितीत) सोयीस्कर आहेत, प्रवासात सोबत नेण्यासाठी हलकी किंवा मुक्काम करीत असताना उपयोगी. तोच तुम्हाला पुरवठा करतो, त्यांची लोकर, लव आणि केस, यांपासून (निरनिराळ्या तऱ्हेच्या) लाभदायक वस्तू व सामान बनविले जाते. ज्या एका कालावधीपर्यंत कामी येतात.

81 तसेच अल्लाहने निर्माण केलेल्या बऱ्याचशा वस्तूंपैकी काहींना (त्याने) तुम्हाला संरक्षण पुरवण्याचे साधन बनविले आहे. जसे त्याने पर्वतांना तुमच्यासाठी आश्रयस्थान बनविले. तसेच त्याने तुम्हाला वस्त्रे (बनविण्याची योग्यता) प्रदान केली, जी (वस्त्रे) तुमचे गरमीपासून (तसेच थंडीपासून) रक्षण करतात आणि अशीही वस्त्रे आहेत (म्हणजे चिलखती व अंगरखे) जे लढायांमध्ये तुमचे रक्षण करतात. अशाप्रकारे तो तुमच्यावर पुरेपूर प्रमाणात आपली कृपा करतो. म्हणजे तुम्ही त्याचे पूर्णपणे आज्ञाधारक बनावे.

82 यानंतरही जर ते पाठ फिरवतील तर (पैगंबर! तुम्ही लक्षात घ्या की, तुम्हाला सोपवण्यात आलेला) संदेश त्यांच्याप्रत पोचविणे एवढेच तुमचे कर्तव्य आहे. 83 या (पाठ फिरवणाऱ्या लोकांना) अल्लाहच्या उपकारांची पूर्ण जाणीव आहे. तरीसुद्धा ते नकार देतात. त्यांच्यापैकी अनेक लोक आहेतच कृतघ्न.

84 पण ज्या दिवशी आम्ही प्रत्येक जनसमूहातून एक साक्ष देणारा उभा करू. तेव्हा सत्य नाकारण्यावर आग्रही राहिलेल्या लोकांना, ना सबबी पुढे ठेवण्याची परवानगी दिली जाईल, ना त्यांना सुधारणा करण्याची संधी दिली जाईल. 85 मग जेव्हा अत्याचारी कृत्ये करण्यावर आग्रही राहिलेले लोक ती शिक्षा (प्रत्यक्षात) पाहतील, तेव्हा ती शिक्षा ना सौम्य करण्यात येईल, ना त्यांना कोणत्याही प्रकारे अवकाश दिला जाईल.

86 तसेच (न्यायाच्या दिवशी) जेव्हा अनेकेश्वरवादी लोक त्यांना (समोर) पाहतील, ज्यांना त्यांनी अल्लाहच्या बरोबरीचे स्थान दिले होते. तेव्हा ते उद्गारतील, 'हे आमच्या पालनकर्त्या! हेच आहेत ते, ज्यांना आम्ही तुझे सहभागी ठरविले होते, आम्ही तुला सोडून यांचा धावा करीत होतो. पण ते (सहभागी उपास्य) त्यांच्या शब्दांना त्यांच्यावरच उलटवतील (आणि असे सणसणीत उत्तर देतील की), 'तुम्हीच खोटारडे आहात, यात मुळीच शंका नाही.' 87 त्या दिवशी ते, (जे अशाप्रकारे पापकृत्य करीत राहिले होते), अल्लाहसमोर नतमस्तक होतील आणि जे जे, ते खोटे रचित राहिले होते, ते सर्व त्यांच्यापासून नाहीसे होऊन जाईल. 88 ज्यांनी सत्य नाकारण्यावर आग्रहपूर्वक भूमिका घेतली होती आणि लोकांना अल्लाहच्या मार्गापासून दूर करण्यासाठी प्रयत्नरत राहिले, आम्ही त्यांच्या शिक्षेमध्ये आणखी शिक्षेची भर घालू, त्या उपद्रवापोटी जे ते जगात पसरवीत राहिले.

89 आम्ही त्या दिवशी प्रत्येक जनसमूहातील एक साक्षी त्यांच्याविरुद्ध त्यांच्यामधूनच उभा करू आणि (पैगंबर!) आम्ही तुम्हालाही त्या लोकांबद्दल

साक्ष देण्यासाठी पुढे आणू (ज्यांच्यापर्यंत तुमचा संदेश पोचलेला असेल). आम्ही तुमच्याकडे हा ग्रंथ प्रकट केला आहे. यासाठी की, तुम्ही प्रत्येक गोष्ट स्पष्ट करून सांगून टाकावी. तो मार्गदर्शन आणि कृपा व शुभवार्ता आहे, अल्लाहचे आज्ञापालन करणाऱ्यांसाठी.

90 निश्चितच अल्लाह न्याय करण्याचे, भले कृत्य करण्याचे आणि जवळच्या नातेवाइकांना त्यांचा उचित हक्क देण्याचे (तुम्हाला) आदेश देतो आहे. तसेच अल्लाह ती सर्व कृत्ये करण्यास मनाई करतो आहे, जी निर्लज्जपणाची आहेत. तसेच तीही सर्व कृत्ये जी अंतर्मनाला पटणारी नाहीत, तसेच विद्रोही वर्तन करण्यास देखील (तो मनाई करतो). तो तुम्हाला (पुन्हा-पुन्हा) यासाठी ताकीद देत आहे की, तुम्ही (हे सर्व) लक्षात ठेवावे.

91 ज्याअर्थी तुम्ही अल्लाहला वचन दिलेले आहे, तेव्हा ते पूर्ण करा. तसेच तुम्ही अल्लाहला साक्षी ठेवून घेतलेल्या तुमच्या दृढ शपथा मोडू नका. तुम्ही जे काही करता ते सर्व अल्लाह जाणतो.

92 (शपथा मोडण्याच्या) बाबतीत तुम्ही त्या (वेड्या) स्त्रीसारखे होऊ नका, जिने आपले मोठ्या मेहनतीने कातलेले सूत, मजबूत पीळ दिल्यानंतरही (आपल्याच हाताने) तुकडे तुकडे करून टाकले. तसेच तुम्हीही आपल्या शपथांना आपसात एक दुसऱ्याशी विश्वासघात करण्याचे साधन बनविता, केवळ या भीतीपोटी की, एक समूह दुसऱ्यापेक्षा अधिक शक्तिशाली बनेल. या सर्व (स्थित्यंतरा)द्वारे अल्लाह तुम्हा लोकांस कसून पाहत आहे. मग पुनरुत्थानाच्या दिवशी अल्लाह ज्या गोष्टींत तुम्ही मतभेद करीत आलात, त्याची हकिगत तुमच्यासमोर स्पष्ट करून टाकेल.

93 अल्लाहने इच्छिले असते तर त्याने तुम्हा सर्वांना एकच जनसमूह बनवून टाकले असते. पण तो, जो (पथभ्रष्ट) होऊ इच्छितो त्यास पथभ्रष्ट होऊ देतो आणि त्याला सन्मार्गाकडे मार्गदर्शन करतो (जो सन्मार्गाकडे येऊ इच्छितो).

आणि तुम्ही जी-जी कृत्ये केली त्यासंबंधाने तुम्हाला अवश्य जाब विचारण्यात येईल.

94 तुम्ही आपल्या शपथांना आपसात एकदुसऱ्याची फसवणूक करण्याचे माध्यम बनवू नका. त्याद्वारे असे होता कामा नये की, (एखाद्याने) दृढतापूर्वक सन्मार्गाचा अंगीकार केल्यानंतरदेखील (त्याचे) पाय डगमगत आहेत. परिणामत: तुम्हाला यासाठी शिक्षा चाखावी लागेल की, तुम्ही (त्या व्यक्तीस) अल्लाहच्या मार्गापासून दूर करण्यास कारणीभूत ठरलात आणि (मृत्यूनंतरच्या जीवनातही) तुम्हाला कठोर शिक्षा भोगावी लागेल. 95 क्षुल्लक लाभप्राप्तीसाठी, अल्लाहशी केलेल्या वायद्याचा सौदा करू नका.जे काही अल्लाहपाशी आहे ते खरोखर, अधिक चांगले आहे. तुम्हाला हे समजले असते तर! (फार बरे झाले असते).

96 जे काही तुमच्याजवळ आहे, ते सर्व संपुष्टात येणे अटळ आहे. पण जे काही अल्लाहकडे आहे, ते कधीच संपुष्टात येणार नाही. तर जे सहनशीलतापूर्वक वर्तन करतील, आम्ही त्यांच्या चांगल्या कार्यांचा मोबदला त्यांना अवश्य देऊ.
97 जो कोणी चांगले कार्य करेल, मग तो पुरुष असो वा स्त्री, तो जर श्रद्धावंत आहे; तर आम्ही त्याला अवश्य (या जगातही) चांगले जीवन प्रदान करू. मग त्यांना (मृत्यूनंतरच्या चिरस्थायी जीवनातही) उत्तमोत्तम मोबदला प्रदान करू — त्या (चांगल्या) कार्यांपोटी, जे ते करीत राहिले.

98 जेव्हाही तुम्ही कुराणाचे पठण कराल, तेव्हा त्या धिक्कारलेल्या सैतानापासून (स्वत:चा) बचाव करण्यासाठी अल्लाहचे संरक्षण मागा. 99 तो त्यांच्यावर आपला अधिकार गाजवू शकत नाही, जे सच्चे श्रद्धावंत आहेत आणि आपल्या पालनकर्त्यावर (दृढ) विश्वास ठेवतात. 100 त्याचा अधिकार, तो त्या लोकांवर गाजवतो, जे त्याचे अनुसरण करण्यास इच्छुक असतात, आणि ते, जे (इतरांना) अल्लाहचे समकक्ष ठरवितात.

101 आणि जेव्हा आम्ही एका संदेशवचनाच्या जागी दुसरे संदेशवचन

प्रकट करतो. अल्लाहला पूर्ण जाणीव आहे की, तो काय प्रकट करीत आहे. तेव्हा ते (सत्य नाकारणारे लोक) म्हणतात, 'तुम्ही तर केवळ खोट्या गोष्टी रचणारे आहात (म्हणजे आमच्यासमोर अल्लाहचा संदेश म्हणून जे प्रस्तुत करता, त्या केवळ खोट्या रचलेल्या गोष्टी आहेत).' पण (वस्तुस्थिती अशी आहे की), त्यांच्यापैकी बहुतेकांना (मुळात) ज्ञानच नाही. 102 (पैगंबर! तुम्ही त्यांना) सांगा, (सत्य हे आहे की), पवित्र आत्म्याने (म्हणजे जिब्रील या स्वर्गदूताने) तुमच्या पालनकर्त्याकडून हा (ग्रंथ) या सत्य उद्देशासहित आणलेला आहे की, त्याद्वारे श्रद्धावंतांना त्यांच्या (श्रद्धेच्याबाबतीत) अधिक दृढता लाभावी. तसेच हा (ग्रंथ) मार्गदर्शन व शुभवार्ता आहे आज्ञापालन करणाऱ्यांसाठी.

103 अर्थातच आम्हाला पूर्ण जाणीव आहे की, ते म्हणतात, 'या (पैगंबरास) हे (सर्व) एक व्यक्ती शिकवतो.' पण ज्या व्यक्तीकडे (शिकवण्याचा आरोप करून) ते खुणावत आहेत, त्याची भाषा तर अरबी नाही. पण हा कुराण तर स्पष्ट अरबी भाषेत आहे. 104 निश्चितच जे लोक अल्लाहच्या संदेशावर विश्वास ठेवणारे नाहीत, अशांना अल्लाह सन्मार्गाकडे मार्गदर्शन करणार नाही. (मृत्यूनंतरच्या जीवनात) त्यांच्यासाठी कठोर शिक्षा आहे. 105 (खरेतर), खोट्या गोष्टी तर ते लोक रचित आहेत, जे अल्लाहच्या संदेशावर विश्वास ठेवणारे नाहीत. (तर अल्लाहच्या नजरेत), हेच लोक खोटारडे आहेत.

106 जो माणूस एकदा अल्लाहवर श्रद्धा धारण केल्यानंतर (पुन्हा) अश्रद्धेकडे वळतो, (अशा माणसासाठी कठोर शिक्षा आहे), फक्त या अपवादाशिवाय की त्याला श्रद्धेचा त्याग करण्यास विवश करण्यात आलेले असेल, पण तो मनोमनी दृढ श्रद्धा बाळगून असेल (तर त्यास शिक्षा होणार नाही). याउलट ज्या माणसाच्या मनात अश्रद्धा भरलेली असेल, तर अशा लोकांवर अल्लाहचा प्रकोप आहे आणि त्यांना फार मोठी शिक्षा केली जाईल. 107 (त्यांच्यावर अल्लाहचा प्रकोप) यासाठी होईल, कारण त्यांनी मृत्यूनंतरच्या (चिरस्थायी) जीवनाच्या तुलनेत याच (क्षणभंगुर)

जीवनाला प्राधान्य दिले. अल्लाह सत्य नाकारणाऱ्या लोकांना सन्मार्गाकडे मार्गदर्शन करीत नाही. 108 हेच ते लोक आहेत ज्यांची मने, कान व डोळे अल्लाहने सील करून टाकले आहेत. तर हे अगदी बेसावध अवस्थेत आहेत. 109 हेच लोक मृत्यूनंतरच्या जीवनात अटळपणे तोट्यात राहतील!

110 मग ज्या लोकांचा (केवळ) यासाठी छळ केला गेला की, त्यांनी (सत्यधर्माचा अंगीकार केला). तेव्हा त्यांनी आपल्या घरादाराचा त्याग केला आणि (अल्लाहच्या कार्यासाठी) प्रयत्नांची पराकाष्ठा केली (म्हणजेच जिहाद केला) आणि (सत्य श्रद्धेवर) अढळपणे कायम राहिले. तर अशा लोकांच्या (भूतकाळातील चुका) अल्लाह अवश्य (माफ करून टाकेल), तो फार माफ करणारा व दयाळू आहे. 111 (त्या दिवसाची जाणीव ठेवा,) ज्या दिवशी प्रत्येक माणूस केवळ स्वत:च्याच बचावासाठी विनवणी करीत हजर होईल. प्रत्येकास त्याने केलेल्या कर्मांचा पुरेपूर मोबदला दिला जाईल आणि कोणावरही अन्याय केला जाणार नाही.

112 आणि अल्लाह तुमच्यासमोर एका वस्तीचे उदाहरण प्रस्तुत करीत आहे. जी एकेकाळी सुरक्षित व समृद्ध अवस्थेत होती. तेथील (रहिवाशांना) चहूबाजूंनी विपुल प्रमाणात जीवनसामग्री प्राप्त होत होती. मग (पुढे) असे झाले (ते) अल्लाहच्या उपकारांप्रति कृतघ्न बनले. तेव्हा अल्लाहने (त्यांच्या दुष्)कृत्यांपोटी उपासमार आणि भय यांची चव चाखायला लावली. 113 आणि त्यांच्याकडे एक पैगंबर त्यांच्यामधूनच आला, तेव्हा त्यांनी त्याला खोटे ठरविले, परिणामी (अल्लाहच्या) शिक्षेने त्यांना वेढले. कारण ते होतेच अत्याचारी लोक.

114 तर (श्रद्धावंतांनो!) ज्या वैध आणि शुद्ध वस्तू अल्लाहने तुमच्यासाठी उपलब्ध केलेल्या आहेत, त्यातून खा. आणि अल्लाहच्या उपकारांप्रति त्याचे नेहमी आभार व्यक्त करा, जर तुम्ही खरोखर त्याची भक्ती करणारे असाल.....
115 त्याने तर तुमच्यासाठी केवळ स्वत:हून मेलेले (प्राणी) आणि रक्त आणि

डुकराचे मांस, तसेच ज्यावर अल्लाहशिवाय इतरांचे नाव घेण्यात आले असेल (हे सर्व) निषिद्ध ठरविलेले आहे. पण जो कोणी भयंकर भुकेने व्याकूळ झालेला असेल, पण तो निषिद्ध गोष्टीचे सेवन ना इच्छेपोटी करणारा असेल, ना त्याच्या अत्यावश्यक गरजेपेक्षा जास्त करणारा असेल. (तर विवश झालेल्या अवस्थेतच त्याने असे आम्ही  केल्यास) अल्लाह निश्चितच क्षमाशील व दयाळू आहे.

116 स्वत:हून रचलेल्या गोष्टींच्या आधारे, असे जाहीर करू नका की, ‘हे वैध आहे आणि ते अवैध आहे’ असे केल्यास ते थेट अल्लाहविषयीच खोट्या गोष्टी रचून सांगितल्या सारखे होईल. जे लोक खोट्या गोष्टींचा संबंध अल्लाहशी जोडतात, ते कधीही यशस्वी होऊ शकत नाहीत. 117 त्यांनी (या जगात) काही काळ मौजमजा करून घ्यावी, पण त्यांना (मृत्यूनंतरच्या जीवनात अनंतकालीन) शिक्षा भोगावी लागणार आहे.

118 ज्यू लोकांसाठी आम्ही त्या गोष्टी निषिद्ध ठरवल्या होत्या, ज्यांचे वर्णन आम्ही आधीच तुमच्यासमोर केलेले आहे. आम्ही त्यांच्यावर अन्याय केला नाही, पण त्यांनीच स्वत:वर अन्याय केला होता.

119 तुमचा पालनकर्ता निश्चितच अत्यंत क्षमाशील आणि अत्यंत दयाळू आहे, त्या लोकांप्रति ज्यांनी, अजाणतेपणे वाईट कृत्य केले आणि नंतर लगेच पश्चात्तापदग्ध झाले आणि स्वत:ची सुधारणा करून घेतली (तर अशांना तुमचा पालनकर्ता निश्चितपणे माफ करून टाकेल).

120 खरोखर, इब्राहीम असा व्यक्ती होता, सर्व सद्गुण त्याच्यामधे एकवटलेले होते (जे विविध सद्गुण) एका सद्गुणी जमातीत असू शकतात, अल्लाहचा (सच्चा) आज्ञाधारक, सदैव त्यालाच समर्पित असलेला असा होता इब्राहीम (आमचा भक्त), तसेच तो त्या लोकांपैकी मुळीच नव्हता जे इतरांना अल्लाहच्या बरोबरीचे स्थान देतात. 121 तो (सदैव) त्याच्या उपकारांबद्दल आभार व्यक्त करणारा होता. अल्लाहने त्याची निवड केली होती, आणि त्याला सरळ मार्गाकडे

मार्गदर्शन केले होते. 122 आम्ही या जगातही त्याच्यावर कृपा केली होती, आणि मृत्यूनंतरच्या जगातही तो सदाचारी लोकांपैकी असेल. 123 (हे पैगंबर मुहम्मद!) (आता) आम्ही तुमच्याकडे हा संदेश पाठविला आहे की: 'इब्राहीमच्या मार्गाचे अनुसरण करा, जो सर्व खोट्या गोष्टींपासून स्वत:ला वेगळे करून (अल्लाहला) पूर्णपणे समर्पित झालेला होता. तसेच तो त्या लोकांपैकी कदापि नव्हता, जे इतरांना अल्लाहचे समकक्ष ठरवितात.'

124 (हे जाणून घ्या की,) 'सबत'च्या नियमाचे (पालन) करणे, त्याच लोकांसाठी बंधनकारक करण्यात आले होते, ज्यांनी त्याच्याविषयी मतभेदांचा मार्ग अंगीकारला होता. नि:संदेह तुमचा पालनकर्ता पुनरुत्थानाच्या दिवशी ते ज्याबाबतीत मतभेद करीत होते त्याबाबतीत (सत्याचा उलगडा करणारा) फैसला सुनावून टाकेल.

125 (पैगंबर! समस्त मानवजातीला) आपल्या पालनकर्त्याच्या मार्गाकडे येण्याचे आवाहन करा, समजूतदारपणे आणि चांगल्या उपदेशाद्वारे. व त्यांच्याशी उत्तमप्रकारे विचारविनिमय करा. निश्चितच अल्लाहला चांगल्याप्रकारे माहीत आहे. कोण त्याच्या मार्गापासून ढळला आहे. तसेच तो त्यांनाही चांगल्याप्रकारे जाणून आहे जे सन्मार्गावर (अढळपणे) मार्गस्थ आहेत.

126 जर तुम्हाला सूड घ्यायचा असेल तर तेवढ्याच प्रमाणात घ्या, ज्या प्रमाणात तुम्हाला त्रास देण्यात आलेला आहे. पण जर (अशाप्रसंगी) तुम्ही संयमाची भूमिका घ्याल तर संयमाची भूमिका अंगीकारणे हे (अल्लाहच्या दृष्टीने) जास्त चांगले आहे (कारण जे प्रतिकूल परिस्थितीत स्थिरचित्त राहतात, अल्लाह त्यांचा साहाय्यकर्ता असतो). 127 (पैगंबर!) स्थिरचित्त राहून सहन करीत राहा (आणि हे लक्षात असू द्या), ही सहनशीलतेची शक्ती तुम्हाला अल्लाहकडूनच प्राप्त होत आहे. तुम्ही त्यांच्याविषयी दु:खी होऊ नका. तसेच त्यांच्या कट–कारस्थानांमुळे मन खचू देऊ नका. 128 निश्चितच अल्लाह त्यांच्याबरोबर

आहे, जे त्याची जाण ठेवून (जीवन व्यतित करीत आहेत), तसेच जे, चांगले कृत्य करणारे आहेत.

# सूरह–17. बनी इस्राईल

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 असीम महिमावान आहे तो, ज्याने आपल्या सेवकाला एका रात्री (मक्कास्थित) पवित्र मशीदीपासून, दूरवरच्या त्या मशीदीपर्यंत (म्हणजे येरूशलेमस्थित मशीदीपर्यंत) प्रवास घडवून आणला. जेथील परिसर आमच्या कृपेने समृद्ध झालेले आहे. (हा प्रवास यासाठी घडवून आणला) की, आम्ही आमच्या खुणांचे त्याला दर्शन घडवावे. खरोखर तो सर्व काही ऐकणारा व सर्व काही पाहणारा आहे.

2 आम्ही (अशाचप्रकारे) पैगंबर मूसा यास (ही) ग्रंथ प्रदान केला होता आणि त्यास इस्राईलच्या मुलांकरिता मार्गदर्शनाचे साधन बनविले होते. (त्यात त्यांना अशी आज्ञा केली होती की), 'माझ्याशिवाय अन्य कोणालाही आपला प्रतिपालक बनवू नका.'
3 तुम्ही त्या लोकांचे वंशज आहात, ज्यांना आम्ही (पैगंबर) नूह सोबत नौकेत स्वार केले होते. तो खरोखर आमचे आभार मानणारा एक भक्त होता.

4 आणि आम्ही इस्राईलच्या मुलांना, ग्रंथाद्वारे हे आधीच कळविले होते की, तुम्ही जमिनीवर दोन वेळा उपद्रव माजवाल आणि मोठ्या विद्रोहाचे प्रदर्शन कराल.
5 मग ज्या दोन घटनेच्या बाबतीत आधीच इशारा दिलेला होता, त्यांपैकी जेव्हा पहिल्या घटनेची वेळ आली, तेव्हा आम्ही आमच्या भक्तांपैकी अशा काही भक्तांना तुमच्याविरुद्ध पाठवले, जे युद्धाच्या बाबतीत फार शक्तिशाली असे होते, जे तुमच्या घरांत (घुसले व) त्यांचे वाटोळे केले. अशाप्रकारे आधीपासून वर्तवलेले भाकीत पूर्णत्वास पोहोचले.
6 मग एक काळ लोटल्यानंतर

आम्ही पुन्हा एकदा त्यांच्या विरोधात तुम्हाला वर्चस्व प्रदान केले. तसेच धनसंपत्ती व संततीद्वारे आम्ही तुमची मदत केली आणि संख्येच्या बाबतीतही तुम्हाला आधिक्य प्रदान केले.

7 (तेव्हा आम्ही म्हणालो), 'जर तुम्ही चांगली कृत्ये कराल, स्वत:च्याच भल्यासाठी कराल. याचप्रमाणे जर तुम्ही वाईट कृत्ये कराल, तर त्याचा परिणामही तुम्हा स्वत:लाच भोगावा लागणार आहे.' मग जेव्हा इशारा दिलेल्या दुसऱ्या घटनेची वेळ आली, तेव्हा (आम्ही तुमच्या विरोधात असे नवीन शत्रू उभे केले आणि त्यांना परवानगी दिली की,) त्यांनी तुमचे चेहरे विद्रूप करून टाकावेत आणि (बैतुलमकदिस) पवित्र मशीदीत प्रवेश करावा, जसा त्यांच्या (आधीच्या लोकांनी) केला होता. मग जे-जे विध्वंस करणे शक्य आहे, ते सर्व विध्वंस करून टाकावे.
8 आम्ही म्हणालो, '(हे सर्व झाल्यानंतरही) तुमच्या पालनकर्त्यासाठी हे अजिबात अशक्यप्राय नाही की, तो तुमच्यावर दया करणार नाही. पण जर तुम्ही पुन्हा (अपराधांकडे) वळाल तर आम्ही पुन्हा तेच करू (म्हणजे शिक्षा करू). तर (ही सर्वात मोठी गोष्टही लक्षात ठेवा की,) आम्ही सत्य नाकारणाऱ्या लोकांसाठी नरकालाच कारागृह बनवून टाकले आहे.'

9 खरोखर, हे कुराण तो मार्ग दाखवितो, जो अगदी सरळ आहे. तो शुभवार्ता देतो आहे, श्रद्धेचा अंगीकार केलेल्या लोकांना, जे चांगली कार्ये करतात की, त्यांच्यासाठी फार मोठे बक्षीस आहे.
10 तसेच मृत्यूनंतरच्या जीवनाला नाकारणाऱ्या लोकांना सावधानतेचा इशाराही देतो आहे की, त्यांच्यासाठी दु:खदायक शिक्षा तयार आहे.

11 माणसाचे तर असे आहे की, तो फार उत्सुकतेसह वाईट गोष्टींसाठी प्रार्थना करीत असतो, (पण व्हायला तर असे पाहिजे होते की), त्याने त्याच उत्सुकतेसह चांगल्या गोष्टींसाठी प्रार्थना केली असती. खरोखर, माणूस (आपल्या निर्णयांच्या बाबतीत) फारच उतावीळ आहे.
12 आणि आम्ही रात्र व दिवस

यांना दोन संकेतचिन्हांप्रमाणे स्थापित केले आहे. मग आम्ही रात्रीच्या चिन्हास पुसून टाकले आणि (त्याच्या जागी) दिवसाच्या चिन्हास प्रकाशमान केले, हे यासाठी की, तुम्हाला आपल्या पालनकर्त्याची कृपा शोधण्याचा मार्ग लाभावा, तसेच तुम्हाला वर्षगणना आणि कालगणना यांचा हिशेब ठेवता यावा. आम्ही प्रत्येक गोष्टीला तुमच्यासमोर स्पष्ट करून प्रस्तुत केले आहे.

13 आम्ही प्रत्येक मनुष्याचे प्रारब्ध त्याच्या गळ्यात बांधून टाकले आहे. मग पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही त्याच्या (कर्मांचे) रेकॉर्ड काढून, त्याच्यासमोर प्रस्तुत करू. जे त्यास स्पष्टपणे उघडलेले दिसून येईल. 14 (तेव्हा त्याला सांगितले जाईल) 'वाच ही आहे तुझी कर्मवही आज स्वत:चा हिशेब करण्यास तू स्वत:च पर्याप्त आहेस.' 15 जो कोणी सन्मार्गाचा अंगीकार करेल तर स्वत:च्याच भल्यासाठी करेल, अगदी असेच जो कोणी वाईट मार्ग पत्करेल तर स्वत:च्याच बरबादीच्या किमतीवर पत्करेल. कोणीही ओझे वाहणारा दुसऱ्याच्या (पापाचे) ओझे वाहणार नाही. आम्ही (कोणत्याही जनसमूहाला त्यांच्या वाईट कृत्यांपोटी) तोपर्यंत शिक्षा करीत नाही, जोपर्यंत आम्ही त्यांच्याकडे सावध करणारा पैगंबर पाठवीत नाही.

16 मग जेव्हा आम्ही एखाद्या वस्तीचा विनाश करण्याचा निर्णय करतो, तेव्हा तिच्यातील समृद्ध लोकांना शेवटचा इशारा देतो, आणि जर त्यांनी अपराधी कृत्ये करणे (तसेच सुरू ठेवले तर शिक्षेचा) निर्णय त्यांच्यासाठी न्यायोचित ठरतो. मग तेव्हा आम्ही त्या वस्तीचा पूर्णपणे सर्वनाश करून टाकतो. 17 पैगंबर नूहच्या काळानंतरही आम्ही कितीतरी जनसमूहांचा नाश केला. कारण आपल्या भक्तांच्या अपराधांची जाणीव असलेला आणि त्यावर नजर ठेवून असलेला तुझ्या पालनकर्त्यासारखा दुसरा कोणीही असू शकत नाही.

18 जो कोणी याच जगातील क्षणभंगुर सुखांचा इच्छुक असतो, त्याला आम्ही त्यातून जे देऊ इच्छितो, ते देऊन टाकतो. पण शेवटी आम्ही त्याच्यासाठी

नरकाचे (दु:खदायी) स्थान निश्चित केलेले आहे. ज्यात तो प्रवेश करेल, अपमानित व धिक्कारलेल्या अवस्थेत. 19 पण जो कोणी मृत्युपश्चात जीवनातील (यश प्राप्तीचा) अभिलाषी असेल आणि त्यासाठी जसे प्रयत्न करायला पाहिजेत, तसे प्रयत्न त्याने केलेले असतील, तसेच हे सर्व प्रयत्न श्रद्धा बाळगून केलेले असतील, तरच अशा लोकांचे प्रयत्न यशस्वी ठरतील.

20 (पैगंबर!) आम्ही त्यांच्यापैकी सर्वांना, म्हणजे यांनाही आणि त्यांनाही (म्हणजे जे याच जगाची अभिलाषा बाळगून आहेत आणि जे अनंतकालीन जगाची अभिलाषा बाळगून आहेत) तुझ्या पालनकर्त्याच्या कृपेने जीवनसामग्री देत आहोत. तुझ्या पालनकर्त्याचे दान कोणालाही नाकारले जात नाही. 21 पाहा, आम्ही (या जीवनात) काहींना काहींवर श्रेष्ठत्व प्रदान केलेले आहे. (पण हे लक्षात ठेवा की,) मृत्यूनंतरचे जीवन, दर्जा आणि उत्कृष्टतेच्या बाबतीत अधिक चांगले आहे.

22 अल्लाहच्या बरोबरीने दुसरे एखादे उपास्य बनवू नका अन्यथा तुम्ही अपमानित व असहाय अवस्थेत सोडून दिलेले बनून जाल. 23 तुझ्या पालनकर्त्याने अशी आज्ञा केलेली आहे की, अन्य कोणाची नव्हे तर केवळ त्याचीच उपासना कर आणि आपल्या आईवडलांशी चांगुलपणाने वाग. त्यांच्यापैकी एखादा किंवा दोघेही, तू सांभाळ करीत असताना, वृद्धावस्थेत पोहोचले तर त्यांना उद्देशून, तिटकारा व्यक्त करणारा एक शब्द देखील, तोंडातून काढू नकोस, तसेच त्यांची कानउघाडणी करण्याचा कदापि (विचार) करू नकोस, तर त्यांच्याशी (नेहमी) आदरपूर्वक संभाषण कर. 24 आणि त्यांच्यावर नम्रभावाने आपल्या करुणेचे पंख पसरवून टाक आणि (त्यांच्यासाठी अल्लाहकडे) अशी प्रार्थना करीत राहा, ‘हे माझ्या पालनकर्त्या! या दोघांवर तुझी कृपा कर, जसे त्यांनी माझ्या लहानपणी करुणाभावाने माझे पालनपोषण केले आहे.’ 25 तुमचा पालनकर्ता चांगले ओळखून आहे की, तुमच्या अंत:करणात काय आहे. जर

तुम्ही सद्वर्तनी असाल तर तो पश्चात्ताप करीत त्याच्याकडे परत येणाऱ्यांना निश्चितपणे क्षमा करणारा आहे.

26 नातेवाईक, दीनदुबळे आणि वाटसरू (मुशाफीर) यांना त्यांचा हक्क द्या. तसेच उधळपट्टी करून (आपले धन) बरबाद करू नका. 27 निश्चितच उधळपट्टी करणारे सैतानाचे भाऊ आहेत आणि सैतान तर आपल्या पालनकर्त्याशी फार कृतघ्न आहे. 28 जर (गरजू नातेवाईक, गरीब व वाटसरू इत्यादींना) तुम्हाला टाळावयाचे असेल, कारण तुम्ही स्वत: आपल्या पालनकर्त्याकडून कृपा प्राप्त करण्याची आशा बाळगून असाल (म्हणजे तुम्ही त्यांना काही देण्याच्या स्थितीत नसाल तर) कमीत कमी त्यांच्याशी नम्र भावाने बोला.

29 असे होता कामा नये की, कंजुषीने आपला हात इतकाही आखडता घेऊ नका की, जणू तो मानेशी घट्ट बांधलेला आहे किंवा (असेही होऊ नये की,) तो संपूर्णपणे इतका पसरवून टाका की, (तुमच्यावर अवलंबून असलेल्या लोकांनी) तुम्हाला दोष द्यावा किंवा तुम्ही अगदी कंगाल होऊन जावे. 30 निश्चितच, तुझा पालनकर्ता ज्याच्या बाबतीत इच्छितो त्यास विपुल प्रमाणात उपजीविका प्रदान करतो आणि ज्याच्या बाबतीत इच्छितो त्यास तुटपुंज्या प्रमाणात प्रदान करतो. नि:संदेह त्याला आपल्या भक्तांच्या (गरजांची) पूर्ण जाणीव आहे, तो त्यांच्यावर (पूर्णपणे) नजर ठेवून आहे.

31 आपल्या अपत्यांची, गरिबीच्या भीतीपोटी हत्या करू नका. कारण आम्हीच त्यांनाही आणि तुम्हालाही उपजीविका प्रदान करीत असतो. त्यांची हत्या करणे, खरोखर फार मोठा गुन्हा आहे. 32 व्यभिचाराच्या जवळपास फिरकू नका (म्हणजे मनात तशा विचाराला कदापि येऊ देऊ नका). कारण ती फारच निर्लज्जपणेची गोष्ट आहे आणि अत्यंत वाईट मार्ग आहे.

33 तसेच ज्या जिवाला (मारून टाकणे) अल्लाहने निषिद्ध ठरविलेले आहे, अशा जिवाची हत्या करू नका, पण फक्त न्याय्य कारणासाठी असेल तर (तसे

करता येईल). मग जो कोणी अत्याचाराने मारला जाईल तर आम्ही त्याच्या वारसास (उचित बदला घेण्याचा) अधिकार दिलेला आहे. पण बदला घेणाऱ्याने बदला घेताना निर्धारित मर्यादांचे उल्लंघन मात्र करू नये. त्याबाबतीत त्याला निश्चितच (कायद्याचे) साहाय्य मिळेल.

34 तुम्ही अनाथाच्या संपत्तीला स्पर्शही करू नका, पण फक्त योग्य उद्देशासहित तसे करता येईल, जोपर्यंत तो प्रगल्भतेच्या अवस्थेला पोचत नाही. आपल्या वचनांचे पालन करा. कारण (न्यायाच्या दिवशी) तुम्ही दिलेल्या प्रत्येक वचनाविषयी तुम्हाला जाब विचारले जाईल. 35 जेव्हा तुम्ही मापून द्याल, माप पूर्ण भरून देत जा. तसेच वजन करून देतानाही प्रमाणित तराजूनेच वजन करून द्या. ही व्यवहाराची उत्तम रीत आहे आणि शेवटी (असा व्यवहार करण्यातच) तुमचे (स्वत:चे) भले आहे.

36 तसेच ज्या गोष्टीचे तुम्हाला (खात्रीलायक) ज्ञान नाही, (केवळ अटकळीच्या आधारे) त्या गोष्टीचे अनुसरण करू नका. कारण कान, डोळे आणि मन या संबंधाने (न्यायाच्या दिवशी) प्रत्येकास जाब विचारण्यात येईल.
37 तसेच जमिनीवर ऐट मिरवीत चालू नकोस, कारण (हे मानवा) तू जमिनीला फाडून टाकू शकत नाहीस, ना तू (ऐटीने चालून) पर्वतांच्या उंचीसमान होऊ शकतोस. 38 या सर्व वाईट गोष्टींचा तुझ्या पालनकर्त्याला तिटकारा आहे.

39 तुमच्या पालनकर्त्याने तुमच्याकडे ज्या विवेकी गोष्टी प्रकट केल्या आहेत त्यांपैकी हे होत. तर अल्लाहच्या बरोबरीने दुसरा एखादा उपास्य बनवू नका, अन्यथा तुम्हाला नरकात फेकून दिले जाईल, (अशा अवस्थेत त्यात तुम्ही प्रवेश कराल की,) (स्वत:च स्वत:ची) निंदा करीत आणि (अल्लाहकडून) धिक्कारलेल्या अवस्थेत.

40 तर मग काय तुमच्या पालनकर्त्याने तुम्हाला पुत्र देण्यासाठी निवडले आणि स्वत:साठी स्वर्गदूतांपैकी मुली बनवून घेतल्या? खरोखर, तुम्ही भयानक

(असत्य) गोष्ट आपल्या तोंडून उच्चारत आहात. 41 निश्चितच आम्ही या
कुराणात (आमचे संदेश) विविध प्रकारे समजावून सांगितले आहे, म्हणजे
(सत्य नाकारणाऱ्या लोकांनी त्याकडे लक्ष देऊन) उपदेश ग्रहण करावे. (पण
याद्वारे नेमके याच्या उलट घडते आहे की,) त्यांचा दुराग्रह आणखी वाढत
आहे. 42 (पैगंबर!) त्यांना सांगा, अल्लाहबरोबर आणखी काही उपास्य असते,
जसे काही लोक तसा दावा करतात, तेव्हा त्यांनी महासिंहासनाच्या मालकाकडे
(ईशसिंहासनावर आपला हक्क सांगण्यासाठी) मार्ग शोधला असता, (त्यासाठी
अवश्य प्रयत्न केले असते). 43 असीम महिमावान आहे तो आणि तोच आहे
सर्वोच्च, जे हे लोक सांगत आहेत, त्याच्याशी (त्याचा काहीच संबंध नाही).
44 सात आकाश व जमीन आणि जे काही त्यांमध्ये आहे, ते सर्व त्याच्याच
महानतेचे गुणगान करीत आहेत. अशी एकही वस्तू नाही, जी त्याच्या प्रशंसेसह
त्याचे पावित्र्यगान करीत नाही. पण (हे मानवा) तुला त्यांच्या गुणगानाचे
आकलन होत नाही. निःसंदेह, तो फार सहिष्णू व अत्यंत क्षमाशील आहे.

45 जेव्हा तुम्ही कुराणाचे पठण करता, तेव्हा आम्ही तुमच्या आणि जे
मृत्यूनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवीत नाहीत त्या लोकांच्या दरम्यान, एक
अदृश्य पडदा टाकून देतो. 46 आम्ही त्यांच्या मनावर आवरण टाकून देतो,
यासाठी की, त्यांनी ते समजू नये. तसेच त्यांच्या कानांत बधिरपणाही निर्माण
करतो. (पैगंबर!) तुम्ही जेव्हा कुराणाचे पठण करताना आपल्या एकच आणि
एकमेव अशा पालनकर्त्याचा उल्लेख करता, तेव्हा ते तिटकाऱ्याने पाठ फिरवितात.

47 आम्ही ते पूर्णपणे जाणून आहोत की, जेव्हा ते तुमचे कथन ऐकण्यासाठी
तुमच्याकडे कान लावतात, तेव्हा त्यांना काय ऐकायचे असते. तसेच जेव्हा
खासगीत ते एकदुसऱ्याशी संभाषण करतात, तेव्हा हे अत्याचारी लोक म्हणतात,
'तुम्ही जर (पैगंबर मुहम्मद) चे अनुसरण केले तर तुम्ही जादुग्रस्त माणसाचे
अनुसरण केले.' 48 (पैगंबर!) पाहा, ते तुमच्याविषयी कशाकशा उपमा रचित

आहेत. ते (पूर्णपणे) वाट चुकलेले लोक आहेत, आता यांना (सत्याचा) मार्ग सापडणे शक्य नाही.

49 ते म्हणतात, 'जेव्हा आम्ही हाडे व चुरा-चुरा होऊन जाऊ, तर त्या अवस्थेतून आम्हाला पुन्हा नव्याने निर्माण करून उभे केले जाईल?' 50 (त्यांना) सांगा, '(अर्थातच!) तुम्ही दगड किंवा लोखंड व्हा (तेव्हादेखील तुम्हाला अवश्य जिवंत करून उभे केले जाईल). 51 किंवा एखादा असा पदार्थ होऊन जा, ज्याविषयी तुम्हाला वाटते की, जिचे जिवंत होणे अशक्यप्राय आहे.' मग ते तुम्हाला विचारतील, 'तो कोण आहे, जो आम्हाला पुन्हा जिवंत करेल?' (त्यांना) सांगा, 'तोच ज्याने तुम्हाला पहिल्या वेळेस निर्माण केले.' मग ते तुमच्याकडे पाहून आपली डोकी हालवतील आणि विचारतील, 'पण हे केव्हा होणार आहे?' तुम्ही (त्यांना) सांगा, 'शक्य आहे की, ती घटका जवळ येऊन ठेपलेली असू शकते.' 52 ज्या दिवशी अल्लाह तुम्हाला बोलावील, तेव्हा तुम्ही त्याची स्तुती करीत (त्याच्या बोलावण्याला) प्रतिसाद द्याल. तेव्हा तुम्हाला वाटायला लागेल की, (पृथ्वीवर) तुम्ही फारच अल्पकाळ मुक्काम केला होता.

53 (पैगंबर!) माझ्या भक्तांना सांगा की, त्यांनी नेहमी तेच बोलावे, जे उचित आहे. सैतान लोकांदरम्यान विसंवाद निर्माण करण्यासाठी नेहमी तयार असतो. कारण सैतान मानवासाठी शत्रूशिवाय दुसरा कोणीच नाही.

54 तुमचा पालनकर्ता तुम्हाला चांगले ओळखून आहे (की, तुम्ही काय आहात आणि कशासाठी पात्र आहात). तो इच्छील तर तुमच्यावर कृपा करील किंवा जर तो इच्छील तर तुम्हाला शिक्षा करील. (पैगंबर!) आम्ही तुम्हाला (लोकांकडे) त्यांचा रखवालदार बनवून पाठविलेले नाही. 55 जे आकाशात आहेत आणि जे पृथ्वीवर आहेत, तुमचा पालनकर्ता ते सर्व चांगल्याप्रकारे जाणून आहे. आम्ही काही पैगंबरांना, इतरांच्या तुलनेत काही गोष्टी अधिक दिलेल्या आहेत. जसे आम्ही (पैगंबर) दाऊदला 'ज़बूर' (नावाचे) ग्रंथ प्रदान

केले होते.

56 (त्यांना) सांगा, 'तुम्ही ज्यांना अल्लाहशिवाय उपास्य समजून बसले आहात, त्यांना (एखाद्या प्रसंगी) बोलावून पाहा, (तेव्हा तुम्हाला आढळून येईल की,) त्यांच्याकडे तुमचे दु:ख दूर करण्याचे कोणत्याही प्रकारे सामर्थ्य नाही किंवा त्यात ते कोणत्याही प्रकारे बदलदेखील करू शकत नाहीत.' 57 ज्यांचा हे लोक (अल्लाहला सोडून) धावा करीत असतात, ते (पीर, फकीर)स्वत: आपल्या पालनकर्त्याच्या निकट जाण्याचा मार्ग शोधत असतात. ते त्याच्या अधिकाधिक समीप पोहोचण्यासाठी आपसात चढाओढ करीत असतात, ते त्याच्या कृपेची अपेक्षा बाळगून असतात तसेच ते त्याच्या शिक्षेचे भयदेखील बाळगून असतात. खरोखर, तुमच्या पालनकर्त्याची शिक्षा, भय बाळगावे अशीच आहे.

58 (हे लक्षात ठेवा) अशी कोणतीही वस्ती असणार नाही, जी आम्ही पुनरुत्थानाच्या दिवसापूर्वी नष्ट केलेली नसेल किंवा कठोर शिक्षा केलेली नसेल (अर्थातच अपराधी लोकांची वस्ती) हे सर्व आमच्या आदेशनाम्यात आधीच लिहून ठेवलेले आहे.

59 चमत्कारिक खुणा पाठविण्याच्या बाबतीत आमच्यासाठी कोणतीही गोष्ट अडथळा ठरू शकत नाही, पण वस्तुस्थिती अशी आहे की, आधीच्या लोकांनी (चमत्कारिक खुणा समोर पाहून देखील) नकारच दिला होता. समूद (नावाच्या जमातीकडे) आम्ही एक स्पष्ट निशाणीच्या स्वरूपात उंटीण पाठविली होती, (उद्देश असा होता की, ती त्यांच्या बुद्धीवर प्रकाश टाकण्याचे माध्यम ठरावे) पण त्यांनी तिच्यावर अत्याचार केले. आम्ही अशा खुणा केवळ सावधानतेचा इशारा देण्यासाठीच पाठवीत असतो.

60 (पैगंबर! ती वेळ आठवा,) जेव्हा आम्ही तुम्हाला म्हटले होते की, आम्ही (आमच्या ज्ञानाने व शक्तीने) समस्त मानवजातीला वेढून ठेवलेले आहे,

आम्ही जो साक्षात्कार तुम्हाला घडविला, तो लोकांची कसोटी पाहण्यासाठीच होता, अगदी तसेच त्या (नरकाच्या) झाडाच्या बाबतीतही आहे, ज्याचा कुराणात शापित वृक्ष म्हणून उल्लेख केलेला आहे. (अशाप्रकारे) आम्ही त्यांना सावधानतेचा इशारा देत असतो, पण याद्वारे त्यांच्या उद्दामपणेत वाढच होत आहे. 61 (ती वेळ आठवा) जेव्हा आम्ही स्वर्गदूतांना म्हटले होते, 'आदमपुढे नतमस्तक व्हा,' तेव्हा ते सर्व नतमस्तक झाले, पण इब्लीस झाला नाही. तो म्हणाला, 'ज्याला तू मातीतून निर्माण केलेले आहेस, मी अशासमोर नतमस्तक होऊ का?' 62 (आदमकडे तिरस्कारबुद्धीने पाहून अल्लाहशी) तो म्हणाला, 'बघ, हाच ना तो, ज्याला तू माझ्यावर प्राधान्य दिले आहेस? जर तू मला पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत उसंत दिल्यास मी, फार थोडे लोक सोडून, याच्या संपूर्ण वंशजांना माझ्या मार्गी चालायला लावीन.'

63 (त्यावर) अल्लाहने म्हटले, 'जा, (त्या मार्गाने जो, तू निवडला आहेस), त्यांच्यापैकी जो कोणी तुझ्या मार्गाचे अनुसरण करेल तर नरक तुम्हा सर्वांसाठी पर्याप्त असाच मोबदला आहे. 64 त्यांच्यापैकी ज्यांनाही तू आपल्या मोहक स्वराने बहकावू शकशील, त्यांना बहकावून टाक. मग त्यांच्यावर आपले घोडदळ व पायदळ यांच्या साहाय्याने चढाई कर. तसेच त्यांच्या धनसंपत्तीत व संततीत त्यांचा भागीदार (म्हणजेच पापांचा वाटेकरी) हो, मग त्यांच्याशी (फसवणूक करणारे) वायदे कर. पण सैतान जे वायदे करतो, ते फसवणुकी शिवाय दुसरे काहीच नाही. 65 निःसंशय! जे माझे (सच्चे) भक्त आहेत, त्यांच्यावर तुझे काहीही चालणार नाही. (पैगंबर!) तुमचा पालनकर्ता, त्यांचा सांभाळकर्ता म्हणून पर्याप्त आहे.'

66 तुमचा पालनकर्ता तर तो आहे, जो तुमच्यासाठी समुद्रामध्ये नौका चालवितो, म्हणजे तुम्हाला त्याच्या कृपेचा शोध घेणे शक्य व्हावे, खरोखर, तो तुमच्याप्रति फार दयाळू आहे.

67 आणि समुद्रात जेव्हा तुमच्यावर एखादे संकट येते, तेव्हा तुम्हाला त्या उपास्यांचा अगदी विसर पडतो, ज्यांचा तुम्ही अल्लाहला सोडून धावा करीत असत. पण जेव्हा तो (समुद्राचा मालक) तुम्हाला समुद्रकिनाऱ्यावर सुरक्षित पोहोचितो, तेव्हा तुम्ही परत त्याच्याकडे पाठ फिरविता (तेव्हा तुम्हाला आपल्या खऱ्याखुऱ्या संकटमोचक अल्लाहचाच विसर पडतो). खरोखर, माणूस आहेच फार कृतघ्न!

68 (आता भूभागावर आपण पूर्णपणे सुरक्षित आहोत, आता आपल्याला अल्लाहची गरजच काय? या विचाराने) तुम्ही निर्धास्त आहात की काय? की, तो तुम्हाला जमिनीत गाडून टाकू शकत नाही? किंवा तो तुमच्यावर भयंकर वाळूचा वर्षाव करणारे वादळ आणू शकत नाही? (जेव्हा तो तुमच्याबाबतीत असा निर्णय करेल), तेव्हा तुम्हाला त्याच्यापासून वाचवणारा कोणीही असणार नाही. 69 किंवा असे विचार करून तुम्ही निर्धास्त झालेले आहात का की, तो तुम्हाला दुसऱ्यांदा समुद्रात नेऊ शकत नाही, तसेच पुन्हा भयंकर वादळाचे संकट तुमच्यावर कधी पाठवू शकत नाही. मग तुमच्या कृतघ्नतेपोटी तुम्हाला बुडवून टाकू शकत नाही. (जेव्हा आम्ही तुमच्याबाबतीत असा निर्णय करू), तेव्हा आमच्यापासून वाचवू शकेल असा कोणीही साहाय्यकर्ता तुम्हाला मिळणार नाही.

70 आम्ही आदमच्या मुलांना (म्हणजे मानवास) सन्मान दिला आणि जमिनीवर व समुद्रावर (प्रवास करण्याचे) कौशल्य प्रदान केले. तसेच त्यांना उपजीविकेसाठी चांगल्या व शुद्ध वस्तू उपलब्ध करवून दिल्या. तसेच आम्ही निर्माण केलेल्या अनेकांवर त्यांना विशेष श्रेष्ठत्व प्रदान केले.

71 तो दिवस निश्चितपणे येणार आहे, ज्या दिवशी आम्ही प्रत्येक जनसमूहास त्याच्या पुढाऱ्यासमवेत (आमच्यासमोर हजर होण्यासाठी) बोलावू. तेव्हा ज्यांची कर्मवही त्यांच्या उजव्या हातात देण्यात येईल, ते (आनंदाने व उत्साहाने)

आपली कर्मवही वाचायला लागतील. कोणावरही तिळमात्रदेखील अन्याय केला जाणार नाही.

72 जो कोणी या जगात (मनाने) आंधळा राहिला, तो मृत्यूनंतरच्या जगात देखील आंधळाच राहील व (मुक्ती) मार्गापासून फारच दूर भरकटून निघून गेलेला असेल.

73 (पैगंबर!) हे (भरकटलेले) लोक या प्रयत्नात होते की, तुम्हाला एखाद्या मोहात टाकून (जे सत्य) आम्ही तुमच्याकडे प्रकट केले आहे, त्यापासून दूर भलत्याच मार्गाकडे वळवावे. यांचा उद्देश असा होता की, तुम्ही आमच्या नावाने दुसरेच काहीतरी रचावे, तेव्हा त्यांनी तुम्हाला आपला जिवलग मित्र अवश्य बनविले असते. 74 पण आम्ही जर (श्रद्धेच्या बाबतीत) तुम्हाला दृढता प्रदान केली नसती, तर तुम्ही काही प्रमाणात अवश्य त्यांच्याकडे कल दाखविला असता. 75 (आणि) जर तसे घडले असते, तर या जीवनातही दुप्पट शिक्षा आणि मृत्यूनंतरच्या जीवनातही दुप्पट शिक्षा आम्ही तुम्हाला चाखायला लावली असती. तेव्हा आमच्याविरुद्ध मदत करण्यासाठी तुम्हाला कोणीच सापडला नसता.

76 (जेव्हा त्यांनी पाहिले की, तुम्ही आपल्या मार्गापासून ढळण्यासाठी अजिबात तयार नाही तेव्हा) ते तुम्हाला तुमच्या (जन्म) भूमीतूनच बाहेर घालवून देण्याच्या उद्देशाने तुमचे पाय अस्थिर करण्यासाठी प्रयत्नरत झाले. पण जर तसे झाले असते तर तुमच्यानंतर तेही फार दीर्घकाळ तिथे राहिले नसते. 77 जसे की, त्या सर्व पैगंबरांच्या बाबतीत आमचा असाच नियम राहिला आहे. ज्यांना आम्ही तुमच्या आधी पाठविले होते. तुम्हाला आमच्या नियमात कोणताही बदल आढळून येणार नाही.

78 नमाज़ाच्या बाबतीत नियमितता बाळगा, सूर्य ढळल्यापासून तर रात्रीचा काळोख होईपर्यंत (निर्धारित वेळेवर) नमाज़ पढा, तसेच पहाटेच्या वेळी

(नमाज़ामध्ये कुराणाचे) पठण करण्याविषयी (काळजी घ्या), कारण पहाटेच्या वेळी जेव्हा कुराणाचे पठण केले जाते, तेव्हा साक्षी राहण्यासाठी स्वर्गदूत (विशेष) हजेरी लावतात.

79 आणि रात्रीच्या वेळी उठा आणि रात्रीच्या शेवटच्या भागात 'तहज्जूद' ही अतिरिक्त नमाज़ पढा (जरी ही नमाज़ दिवसातील इतर पाच नमाज़ाप्रमाणे बंधनकारक नसली तरी) तुमच्याकडून कर्तव्यापेक्षा अधिक काही केल्यासारखे असेल. नवल नव्हे की, तुमचा पालनकर्ता (मृत्यूनंतरच्या जीवनात) तुम्हाला असे स्थान प्रदान करेल, जे फार प्रशंसनीय असेल.

80 तर (अशा शब्दांत) प्रार्थना करा, 'हे माझ्या पालनकर्त्या! मला (ज्या ठिकाणी) दाखल कर, सत्यासह दाखल कर आणि (जिथूनही) मला बाहेर काढ, सत्यासह बाहेर काढ. तसेच आपल्या कृपेने मला टिकवून ठेवणारी शक्ती प्रदान कर.' 81 (पैगंबर!) सांगून टाका, 'आता सत्य (प्रकाशमान) झालेले आहे आणि असत्य नाहीसे झालेले आहे. कारण असत्य नष्ट होण्यासाठीच असते.'

82 आम्ही कुराणात (जे काही) टप्प्याटप्प्याने प्रकट करीत आहोत, त्यात (आत्मिक) आरोग्य व कृपा आहे श्रद्धावंत लोकांसाठी, पण जिथपर्यंत दुराचाऱ्यांचा संबंध आहे, तर याद्वारे त्यांच्या नुकसानात भरच पडते.

83 (माणसाचे असे आहे) जेव्हा आम्ही त्याच्यावर अनुग्रह करतो, तेव्हा तो पाठ फिरवून अहंकाराने निघून जातो (म्हणजे त्याच्या मनात अनुग्रह करणाऱ्याचा विचार देखील येत नाही). पण जेव्हा त्यास एखादी पीडा पोहोचते, तेव्हा तो सर्व प्रकारची आशा सोडून बसतो. 84 (पैगंबर! त्यांना) सांगा, 'प्रत्येकजण आपआपल्या पद्धतीने कार्य करीत असतो. तेव्हा तुमच्या पालनकर्त्याला चांगले ठाऊक आहे की, कोणी सन्मार्गाची निवड केलेली आहे.'

85 ते तुम्हाला आत्म्याविषयी प्रश्न करतात, (त्यांना) सांगा, ‘आत्मा माझ्या पालनकर्त्याच्या आज्ञेने (अस्तित्वात) आहे, (पण हे मानवा! तू त्याचे स्वरूप समजू शकत नाहीस कारण) तुला अत्यल्प ज्ञान प्रदान केलेले आहे (तिचे आकलन तुझ्या आवाक्याबाहेरची गोष्ट आहे).’

86 जर आम्ही इच्छिले तर ते सर्व तुमच्याकडून हिरावून घेऊ शकतो, जे आम्ही तुमच्याकडे प्रकट केलेले आहे. (आणि) तसे झाल्यास तुम्हाला आमच्यासमोर तुमची शिफारस करण्यासाठी कोणीही आढळणार नाही. 87 पण
ही केवळ तुमच्या पालनकर्त्याची दया आहे (की, तो असे करीत नाही). नि:संदेह, तुमच्यावर त्याची अपार कृपा आहे. 88 सांगा, ‘समस्त मानवजात
आणि (अदृश्य असलेले) सर्व जिन्न या सर्वांनी मिळून या कुराणासारखा ग्रंथ निर्माण करण्याचे प्रयत्न केले, तरी ते कदापि असा ग्रंथ निर्माण करू शकत नाहीत, मग ते या कार्यासाठी एकमेकांची सर्व शक्तीनिशी मदत का करेनात.’

89 आम्ही या कुराणात लोकांसाठी, सर्व प्रकारची उदाहरणे विविध प्रकारे प्रस्तुत केलेली आहेत. तरीसुद्धा बहुसंख्य लोकांनी सत्य नाकारण्याचीच भूमिका आग्रहपूर्वक स्वीकारलेली आहे. 90 ते म्हणतात, ‘(हे मुहम्मद!) आम्ही तोपर्यंत
तुमच्यावर विश्वास ठेवणार नाही (म्हणजे तुम्ही अल्लाहचे पैगंबर आहात असे मानणार नाही), जोपर्यंत तुम्ही आमच्यासाठी जमिनीतून पाण्याचा उसळणारा झरा काढून प्रवाहित करीत नाही. 91 किंवा तुमच्याकडे खजूर व द्राक्षे यांचे
एखादे बाग तरी असावे आणि मग तुम्ही त्या बागेच्या मध्यभागातून अनेक प्रवाह प्रवाहित करून दाखवा. 92 किंवा जशी धमकी तुम्ही आम्हाला सुनावीत
आहात, त्यानुसार आकाशाचे तुकडे करून आमच्यावर कोसळून (दाखवा). किंवा अल्लाह व स्वर्गदूत यांना आणून आमच्या समोरासमोर उभे करा. 93 किंवा
तुमच्याकडे सोन्यापासून बनलेले एखादे घर असावे किंवा तुम्ही आकाशात चढून जा, पण आम्ही तुमचे आकाश चढून जाण्यावरही तोपर्यंत विश्वास

ठेवणार नाही, जोपर्यंत तिथून आमच्यासाठी खाली तुम्ही (असे) एखादे ग्रंथ आणीत नाही, ज्याला आम्ही (स्वत:) वाचू शकू.' (पैगंबर! त्यांना) सांगा, 'असीम कीर्तिवान आहे माझा पालनकर्ता! मी तर केवळ एक (तुमच्यासारखाच) मनुष्य आहे (आणि) मला (फक्त) पैगंबर म्हणून पाठविण्यात आलेले आहे.'

94 मग जेव्हा त्यांच्याकडे (पैगंबराद्वारे अल्लाहचे) मार्गदर्शन येऊन पोहोचल्यावरही, त्यावर विश्वास ठेवण्यास त्यांना या शिवाय अन्य कोणतीही गोष्ट बाधक बनली नाही की, ते म्हणू लागले, 'काय! अल्लाहने एका मनुष्यास आपला पैगंबर बनवून पाठविले आहे?' 95 (त्यांना) सांगा, 'जर पृथ्वीवर स्वर्गदूत वसलेले असते आणि त्यावर ते संचार करीत असते तर तेव्हा मात्र आम्ही आकाशातून त्यांच्याकडे स्वर्गदूतालाच आमचा पैगंबर बनवून पाठविले असते.' 96 (त्यांना) सांगा, 'अल्लाह तुमच्या आणि माझ्या दरम्यान साक्ष म्हणून पर्याप्त आहे. नि:संदेह, त्याला आपल्या भक्तांची पूर्ण जाणीव आहे, तसेच (ते काय करीत आहेत व त्यांच्या मनात काय आहे) यावर (तो) पूर्णपणे नजर ठेवून आहे.'

97 ज्यांना अल्लाह मार्गदर्शन करतो, त्यांनाच सन्मार्ग प्राप्त होतो. अगदी असेच ज्यांना तो भटकण्यासाठी सोडून देतो, तेव्हा तुम्हाला त्यांचा अल्लाहशिवाय दुसरा साहाय्यकर्ता असल्याचे आढळणार नाही. आम्ही पुनरुत्थानाच्या दिवशी त्यांना तोंडघशी फरफटत आणू. मग आम्ही त्यांना अशा अवस्थेत एकत्रित करू की, (ते) आंधळे, मुके, बहिरे असतील. (त्या सर्वांचे अंतिम) ठिकाण नरक हेच होय. जेव्हा-जेव्हा नरकाची आग मंद होईल, तेव्हा आम्ही तिला त्यांच्यासाठी पुन्हा (पुन्हा) भडकावून देऊ. 98 ही (नरकाची आग) आहे त्यांचा मोबदला, या कारणास्तव की, ते आमच्या संदेश असलेल्या खुणा नाकारीत राहिले आणि असा प्रश्न करीत असत, 'जेव्हा आम्ही हाडे व चुरा-चुरा होऊन जाऊ, तेव्हा आम्हाला खरंच नव्याने निर्माण करून उठविले

जाईल?'

99 या लोकांना हे दिसत नाही का की, ज्या अल्लाहने आकाश आणि पृथ्वीची निर्मिती केली, तो यासाठीही (पूर्णपणे) समर्थ आहे की, तो जसेच्या तसे त्यांना नव्याने निर्माण करू शकतो, त्याने त्यांच्या पुनरुत्थानासाठी एक अवधी निश्चित केलेली आहे, यात मुळीच शंका नाही. पण दुराचारी लोक सत्य नाकारण्यावर आग्रही राहण्याचीच भूमिका अंगीकारतात.

100 (पैगंबर! त्यांना) सांगा, जर माझ्या पालनकर्त्याच्या कृपेचे खजिने तुमच्या ताब्यात असते, तर तुम्ही खर्च होऊन (संपून जातील) या भीतीने आपले हात निश्चितपणे आखडते घेतले असते. कारण माणूस मनाने आहेच कंजूष (याउलट अल्लाह असीम कृपा करणारा आहे).

101 आम्ही (पैगंबर) मूसाला नऊ स्पष्ट निशाण्या प्रदान केल्या होत्या. तुम्ही इस्राईलच्या मुलांकडे चौकशी करू शकता (की तेव्हा नेमके काय घडले होते). जेव्हा तो त्यांच्याकडे आला (आणि त्याने सोबत आणलेला अल्लाहचा संदेश ऐकविला) तेव्हा फिरऔन त्याला म्हणाला, 'हे मूसा! मला तर वाटते की, तुझ्यावर अवश्य जादूटोणा करण्यात आलेला आहे.' 102 मूसाने उत्तर दिले, 'तू चांगल्याप्रकारे जाणतोस की, या निशाण्या आकाश आणि पृथ्वीच्या पालनकर्त्याशिवाय अन्य कोणाद्वारे पाठविलेल्या नाहीत, ज्यात डोळे उघडणारे प्रमाण आहेत. हे फिरऔन! (जेव्हा तू त्यांना नाकारण्याचेच ठरविलेले आहेस) तर मला वाटते, तू नाश पावणाऱ्या लोकांपैकी आहेस! (म्हणजे तुझे नष्ट होणे अटळ वाटते.)' 103 मग फिरऔनने निश्चय केला की, (इस्राईलच्या मुलांचे) पृथ्वीवरून समूळ उच्चाटनच करून टाकायचे, (ज्यात पैगंबर मूसाही आहेत). पण शेवटी आम्ही त्यालाच आणि त्याच्याबरोबर असलेल्या सर्वांना बुडवून टाकले. 104 त्यानंतर आम्ही इस्राईलच्या मुलांना म्हणालो, 'आता पृथ्वीवर सुरक्षितपणे राहा. (पण लक्षात असू द्या की), जेव्हा अंतिम दिवसाच्या वचनपूर्तीची

वेळ येऊन ठेपेल, तेव्हा आम्ही तुम्हा सर्वांना एकत्र करून आणू.’

105 आम्ही हे कुराण सत्यासह (म्हणजे सत्य उद्देशासह) पाठविले आहे आणि ते सत्यासह (मानवाकडे) आले आहे. आम्ही तुम्हाला तर केवळ शुभवार्ता ऐकविणारा आणि सावधानतेची सूचना देणारा बनवून पाठविले आहे.
106 आम्ही या कुराणाला थोडे-थोडे करून (टप्प्याटप्प्याने) प्रकट केले आहे, म्हणजे तुम्ही ते लोकांना थांबून-थांबून वाचून दाखवावे, म्हणूनच तर आम्ही ते टप्प्याटप्प्याने प्रदान केले आहे.

107 (पैगंबर! त्यांना) सांगा, ‘तुम्ही यावर श्रद्धा ठेवा किंवा ठेवू नका, ते लोक ज्यांना आधी ज्ञान प्रदान करण्यात आले होते, जेव्हा त्यांच्यासमोर हे ऐकविले जाते, तेव्हा ते (लगेच) आपले चेहरे जमिनीवर टेकवून (अल्लाहसमोर) नतमस्तक होतात (म्हणजे त्या संदेशाचाच प्रभाव त्यांच्यावर अशाप्रकारे होतो).
108 ते म्हणतात, ‘असीम कीर्तिवान आहे, आमचा पालनकर्ता! नि:संदेह, आमच्या पालनकर्त्याच्या वचनाची पूर्ती होणे अगदी अटळ आहे. 109 तर ते रडत-रडत आपले चेहरे (जमिनीवर) टेकवून (अल्लाहसमोर नतमस्तक होतात). मग (या कुराणातील संदेशाचा त्यांच्या मनावर असा परिणाम होतो की), याद्वारे त्यांच्या विनम्रतेत आणखी वाढ होत जाते.’

110 (त्यांना) सांगा, ‘(तुम्ही अल्लाहचा धावा करताना) ‘अल्लाह’ या नावाने धावा करा (जसे ‘हे अल्लाह!’) किंवा ‘रहमान’ म्हणून धावा करा (म्हणजे ‘हे दयावान’!) त्याची सर्वच नावे फार सुंदर आहेत. तेव्हा तुम्ही आपली प्रार्थना (म्हणजे नमाज़) ना फार मोठ्याने ओरडून करा, ना अगदीच मंद आवाजात करा, तर त्यांच्या मधल्या मार्गाचा अवलंब करा. 111 तर म्हणा, ‘सर्व प्रकारची स्तुती केवळ अल्लाहसाठीच आहे. ज्याने स्वत:करिता ना अपत्य बनविले, ना (त्याच्या असीम) राज्यात कोणी त्याचा भागीदार आहे. तो कोणत्याही प्रकारे अशक्त नसल्यामुळे त्याचा कोणीही साहाय्यकर्ता नाही.

म्हणून तुम्ही विविध प्रकारे (विविध प्रसंगी) त्याच्याच स्तुतीचे गुणगान करीत राहा.’

# सूरह–१८. अल–कहफ़

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 सर्व प्रकारची स्तुती अल्लाहसाठीच आहे, ज्याने आपल्या भक्तावर हा ग्रंथ
प्रकट केला आहे. जो सर्व प्रकारे संदिग्धतेने मुक्त आहे. 2 अगदी सरळ–सरळ
दिशानिर्देश असलेला (ग्रंथ), यासाठी की, याद्वारे अल्लाहकडून कठोर शिक्षेविषयी
सावधानतेचा इशारा दिला जावा. तसेच चांगली कृत्ये करणाऱ्या श्रद्धावंतांना
शुभवार्ता दिली जावी की, त्यांच्यासाठी उत्कृष्ट बक्षीस आहे. 3 (म्हणजे स्वर्ग),
त्यात ते सदैव वास्तव्य करतील. 4 तसेच त्या लोकांना सचेत होण्याचा इशारा
द्या, जे आग्रहपूर्वक सांगतात की, अल्लाहने स्वत:साठी पुत्र बनवला आहे. 5
त्यांना या गोष्टीचे अजिबात ज्ञान नाही, ना त्यांच्या वाडवडिलांना होते. ही फार
भयानक गोष्ट आहे, जी त्यांच्या तोंडून निघत आहे. (तसेच) त्यांच्या तोंडून
(ही जी गोष्ट) निघत आहे, ती असत्याशिवाय अन्य काही नाही.

6 (पैगंबर!) ते या संदेशावर श्रद्धा धारण करण्यास तयार नाहीत, या
दु:खाने कदाचित तुम्ही स्वत:लाच संपवून घ्याल.

7 आम्ही पृथ्वीला आकर्षक वस्तूंनी सजविले आहे, (याचा हेतू असा की,
याद्वारे) मानवजातीची आम्हाला परीक्षा घेता यावी आणि हे पाहता यावे की,
लोकांमध्ये कोण सर्वोत्तम आचरण करणारा आहे. 8 आणि (एक दिवस)
पृथ्वीवर जे काही आहे ते सर्व संपवून तिला सपाट भूप्रदेश बनवून टाकू.

9 (जेव्हा या जगातील जीवन केवळ परीक्षेसाठी आहे हे उघड असतानाही)
तुम्हाला असे वाटते का की, गुहेत वास्तव्य करणारे (कहफवाले) आणि ते
शिलालेख, आमच्या निशाण्यांपैकी अद्भुत निशाण्या होत्या?

[10] जेव्हा त्या तरुणांनी गुहेत आश्रय घेतला व त्यांनी (अल्लाहकडे) प्रार्थना केली, 'हे आमच्या पालनकर्त्या! आमच्यावर तुझी विशेष कृपा कर आणि आमच्या कार्यात आम्हाला योग्य ते मार्गदर्शन दे. [11] तेव्हा आम्ही त्यांना गुहेत कित्येक वर्षांकरिता गाढ झोप देऊन (बाह्य जगताशी त्यांचा संपर्क तोडून टाकला). [12] मग आम्ही (दीर्घ कालावधी नंतर) त्यांना जागे केले, (आम्ही हे सर्व) यासाठी केले की, आम्हाला हे पाहता यावे की, दोन गटांपैकी कोणता गट आपल्या गुहेतील निद्रावस्थेत केलेल्या वास्तव्याच्या कालावधीचे अधिक योग्यप्रकारे आकलन करू शकतो.

[13] (आणि आता) आम्ही तुम्हाला त्यांची सत्य कथा कथन करतो: ते काही तरुण लोक होते, ज्यांनी आपल्या पालनकर्त्यावर श्रद्धा धारण केली होती. मग त्यांना जे मार्गदर्शन लाभले होते, त्यात आणखी भर पडण्यासाठी आम्ही त्यांच्या ग्रहणशक्तीत आणखी वाढ केली. [14] तसेच आम्ही त्यांच्या हृदयांना मजबुती दिली (म्हणजेच मानसिक दृढता प्रदान केली). जेव्हा ते उठले व म्हणाले, 'आमचा पालनकर्ता तोच आहे, जो आकाश व पृथ्वीचा पालनकर्ता आहे. आम्ही त्याच्याव्यतिरिक्त अन्य कोणाचा धावा कदापि करणार नाही. जर आम्ही तसे केले तर निश्चितच आम्ही अगदी अनुचित कृत्य केल्याप्रमाणे होईल. [15] आमचे लोक तर त्याला सोडून इतरांच्या उपासनेत गुंतलेले आहेत मग, ते त्यांच्यासंबंधाने (म्हणजेच त्या उपास्यांसंबंधाने, आपल्या श्रद्धेच्या समर्थनार्थ) स्पष्ट प्रमाण का प्रस्तुत करीत नाहीत? मग त्यापेक्षा अधिक पापी कोण असू शकतो, जो अल्लाहविषयी खोट्या गोष्टी रचून सांगतो?

[16] (ते एकमेकांशी म्हणू लागले) 'आता जेव्हा तुम्ही त्या लोकांपासून व तसेच त्यांच्या त्या उपास्यांपासून, ज्यांची ते अल्लाहला सोडून उपासना करतात, स्वत:ला वेगळे करून घेतले आहे. तर मग चला आपण (अमुक) गुहेत जाऊन तिथे आश्रय घेऊ. तुमचा पालनकर्ता तुमच्यावर आपल्या विशेष कृपेचे द्वार

उघडेल आणि परिस्थितीनुरूप योग्य ती तरतूद तुमच्यासाठी (अवश्य) करेल.'

17 तुम्ही (वर्षानुवर्षे) सूर्य उगवताना पाहत आले आहात (पण गुहेच्या बाबतीत असे होते) जेव्हा तो उगवतो, तेव्हा गुहेला सोडून उजव्या बाजूला चढतो आणि जेव्हा मावळतो, तेव्हा त्यांना चुकवून डाव्या बाजूला निघून जातो (म्हणजे उगवताना व मावळताना सूर्यप्रकाश तिथे पोचत नव्हता). ते त्या गुहेच्या आत एका विस्तृत जागेत होते. ही घटना म्हणजे अल्लाहच्या संदेश असलेल्या खुणांपैकी एक खूण आहे. अल्लाह ज्याला सन्मार्ग दाखवेल, त्यालाच सन्मार्ग प्राप्त होणार आहे. तसेच ज्याला अल्लाह मार्गभ्रष्ट होण्यासाठी सोडून देईल, त्याचा कोणीही (दुसरा) मार्गदर्शक किंवा साहाय्यकर्ता असल्याचे तुम्हाला आढळणार नाही.

18 तुम्ही (यांना ते गुहेत असताना) पाहिले असते तर (तुम्हाला) असे वाटले असते की, ते जागे आहेत. पण वस्तुतः ते झोपलेले होते. आम्ही (झोपलेल्या अवस्थेतच) पुन्हा पुन्हा त्यांच्या डाव्या व उजव्या कुशी वळवीत राहिलो. त्यांचा कुत्रा गुहेच्या प्रवेशद्वारावर आपले पाय पसरवून बसलेला होता. जर तुम्ही (गुहेत) डोकावून त्यांच्याकडे पाहिले असते तर निश्चितपणे भयग्रस्त होऊन तिथून पळ काढला असता आणि त्या दृश्याने तुमच्या मनात दहशत निर्माण करून सोडली असती.

19 अशाप्रकारे (एक दीर्घ कालावधी लोटल्यानंतर) आम्ही त्यांना जागे केले आणि ते एकमेकाला विचारू लागले. त्यांच्यापैकी एकाने विचारले, 'तुम्ही किती काळ (अशा अवस्थेत) इथे मुक्काम केला असणार'? ते म्हणाले, 'आम्ही इथे एक दिवस किंवा एक दिवसापेक्षा कमीच मुक्काम केलेला असणार.' पण (त्यांच्यापैकी) दुसरे म्हणाले, 'तुमचा पालनकर्ताच अचूकपणे जाणतो की, तुम्ही इथे नेमका किती काळ थांबलेले असू शकते. तर आता आपल्यापैकी एखाद्याला ही चांदीची नाणी देऊन शहरात पाठवू या, त्याने तिथे जाऊन पाहावे

की, अगदी स्वच्छ-शुद्ध असे भोजन कुठे मिळेल? मग त्याने त्यातून काही खाण्याचे पदार्थ (आपल्यासाठी) इथे घेऊन यावे. त्याने हे काम पूर्ण दक्ष राहून करायला हवे, कारण कोणालाही तुमच्याविषयी काहीही कळता कामा नये. 20 कारण, जर त्यांना तुमच्याविषयी कळाले (की, तुम्ही इथे आश्रय घेतलेले आहात) तर ते तुम्हाला दगडांनी ठेचून मारून टाकतील किंवा तुम्हाला आपल्या धर्मात (बळजबरीपूर्वक) परत नेतील. जर असे झाले तर तुमचे (जीवन) कदापि सार्थक ठरणार नाही.'

21 अशाप्रकारे आम्ही (लोकांचे) त्यांच्या बाबतीत घडलेल्या घटनेकडे लक्ष वेधिले, कारण त्यांना ही जाणीव व्हावी की, अल्लाहचे (पुनरुत्थानाविषयीचे) वचन सत्य आहे. तसेच हे की, ती घटका (म्हणजेच न्यायाचा दिवस) येण्यासंबंधात शंका घेण्यासारखे काहीच नाही. लोक (कहफवाल्या तरुणांच्या बाबतीत) आपसात वादविवाद करीत असत, ते म्हणायचे, 'त्यांच्या त्या स्थानावर त्यांच्या स्मरणार्थ एक इमारत उभी करा,' त्यांचे काय झाले असेल, हे त्यांच्या पालनकर्त्यालाच चांगले ठाऊक आहे.' शेवटी ज्यांचे म्हणणे प्रबल ठरले, ते म्हणाले, 'आम्ही त्यांच्या गुहेवर त्यांच्या स्मरणार्थ एक प्रार्थनागृह उभारू.'

22 (आगामी काळात कहफवाल्यासंबंधाने) काही लोक म्हणतील, 'ते तिघे जण होते व चौथा त्यांचा कुत्रा होता.' इतर काही जण म्हणतील, 'ते पाच जण होते व सहावा त्यांचा कुत्रा होता.' हे लोक असेच निराधार तर्क-वितर्क लढवीत आहेत. तसेच आणखी काही जण म्हणतील, 'ते सात जण होते आणि आठवा त्यांचा कुत्रा होता.' (त्यांना) सांगा, 'माझा पालनकर्ताच चांगल्याप्रकारे जाणतो की, त्यांची निश्चित संख्या किती होती?' त्यांच्या विषयी काही (माहिती) फारच थोड्या लोकांना आहे, म्हणून तुम्ही त्यांच्याविषयी विवादास्पद मुद्यात हात घालू नका, ना त्यांच्यापैकी कोणाकडे त्यांच्याविषयी (म्हणजे कहफवाल्यांविषयी) काही विचारपूस करा.

23 (पण ही गोष्ट लक्षात घ्या) की, असे कदापि म्हणू नका, 'मी हे निश्चितपणे उद्या करून टाकेन.' 24 (आपल्या म्हणण्यात या शब्दांचा समावेश करून असे म्हणा की), 'जर अल्लाहने इच्छिले तरच (मी हे करू शकेन). पण जेव्हा (असे म्हणायचे) तुम्ही विसरून जाल (आणि जशी तुला या गोष्टीची जाणीव होईल) तेव्हा आपल्या पालनकर्त्याचे स्मरण करा आणि म्हणा, 'मला विश्वास आहे की, माझा पालनकर्ता मला सन्मार्गाकडे जाणारा याहूनही अधिक निकटचा मार्ग दाखवील.'

25 (काही जण) म्हणतात की, ते गुहेत तीनशे वर्षे राहिले आणि काहींनी त्या (संख्येत) आणखी नऊ वर्षे अधिक जोडलेली आहेत. 26 (त्यांना) सांगा, 'अल्लाह त्यांच्या मुदतीला तंतोतंतपणे जाणतो.' आकाश आणि पृथ्वी यांच्यातील सर्व गुपितांचे केवळ त्यालाच ज्ञान आहे. किती चांगल्याप्रकारे पाहतो तो आणि किती चांगल्याप्रकारे ऐकतो तो! (म्हणजेच त्याची ऐकण्याची व पाहण्याची किती असीम क्षमता आहे). त्याच्याशिवाय मानवाचा दुसरा कोणीच सांभाळकर्ता नाही! अल्लाह आपल्या सत्तेत कोणालाही भागीदार बनवीत नाही.

27 (पैगंबर!) तुमच्या पालनकर्त्याच्या ग्रंथापैकी जो काही भाग तुमच्याकडे प्रकट करण्यात आलेला आहे, तो (लोकांना) ऐकवा. त्याच्या संदेश- वचनात बदल करू शकेल असा कोणीही नाही. तसेच त्याच्याशिवाय अन्य कोणाचेही आश्रय तुम्हाला मिळू शकत नाही. 28 तुम्ही अशा लोकांची संगत ठेवा, जे आपल्या पालनकर्त्याची प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी, सकाळ-संध्याकाळ त्याचा धावा करीत असतात आणि या जगाच्या जीवनातील ऐश्वर्याच्या गोष्टींद्वारे मोहित होऊन तुमच्या नजरा त्यांच्यापासून विचलित होता कामा नये. तसेच तुम्ही अशा माणसाचे म्हणणे ऐकू नका, ज्याच्या हृदयास आम्ही आमचे स्मरण करण्यापासून गाफील करून टाकलेले आहे. आता तो आपल्या (तुच्छ) मनोकामनाचे अंधानुकरण करीत असतो. सन्मार्ग त्यागण्याच्या बाबतीत त्याने

सर्व मर्यादा ओलांडलेल्या आहेत.
29 (पैगंबर! त्यांना) सांगा, 'हे 'सत्य' (म्हणजे हे कुराण) तुमच्या पालनकर्त्याकडून आलेले आहे, मग ज्याला वाटेल त्याने त्यावर विश्वास ठेवावा आणि ज्याला वाटेल त्याने मानण्यास नकार द्यावा (म्हणजे प्रत्येकाला या गोष्टीचे पूर्ण स्वातंत्र्य आहे).'

आम्ही अत्याचारी लोकांसाठी अशी आग तयार करून ठेवलेली आहे, जिच्या ज्वाला त्यांना सर्व बाजूंनी (स्वत:मध्ये) सामावून घेतील. आणि जर त्यांनी (तहान भागवण्यासाठी) पाण्याची याचना केली तर त्यांना असे गरम पाणी दिले जाईल, जे वितळलेल्या शिशासारखे असेल, जे त्यांचे चेहरे भाजून काढील. (खरोखर!) किती भयंकर पेय असेल ते! आणि किती वाईट राहण्याचे ठिकाण!

30 (पण) जे लोक श्रद्धा धारण करतील आणि सत्कर्मे करतील (मृत्यूनंतरच्या जीवनात त्यांचे कल्याण आणि कल्याणच आहे) कारण जो कोणी सत्कर्मे
करतो, त्याचा मोबदला आम्ही निश्चितच वाया जाऊ देत नाही. 31 त्यांच्यासाठी
चिरस्थायी आनंद प्रदान करणाऱ्या बागा आहेत, ज्यातून पाण्याचे (मन प्रसन्न करणारे) प्रवाह वाहत असतील. तिथे त्यांना सोन्याच्या बांगड्या (किंवा कडे) घालून सजविले जाईल. ते तलम रेशमाचे हिरवे कपडे परिधान करतील, (उंच) आसनावर टेक लावून (फार आरामदायी) अवस्थेत बसलेले असतील, किती उत्कृष्ट मोबदला आहे हा! किती उत्तम विश्रांतिस्थान!

32 या लोकांना त्या दोन माणसांची बोधकथा ऐकवा! त्यांच्यापैकी एकाला आम्ही दोन द्राक्षांच्या बागा दिलेल्या होत्या. तसेच त्यांच्या सभोवताली खजुराची झाडे कुंपणाप्रमाणे होती आणि दोन (बागांच्या) मध्यभागात धान्याचे शेत होते.
33 दोन्ही बागांत चांगले पीक आलेले होते. (सुपीकतेच्या बाबतीत) कोणतीही

उणीव राहिलेली नव्हती. कारण दोन्ही बागांच्या (अगदी) मधून आम्ही एका नदीला प्रवाहित केलेले होते. 34 अशाप्रकारे (शेतीपासून) त्याला भरपूर उत्पादन प्राप्त होत होते. (एके दिवशी) तो आपल्या सोबत्याशी वाग्युद्ध करीत असताना म्हणाला, 'संपत्तीच्या बाबतीत मी तुझ्यापेक्षा श्रीमंत आहे आणि संख्येच्या बाबतीतही मीच वरचढ आहे (म्हणजे माझ्याच अनुयायांची संख्या अधिक आहे). 35 (असे बोलत-बोलत म्हणजेच अल्लाहप्रति कृतघ्नतेची भावना बाळगून) स्वत:वरच अत्याचार करीत त्याने आपल्या बागेत प्रवेश केला. तेव्हा तो म्हणाला, 'मला नाही वाटत की, हे कधी नाश पावेल.' 36 आणि या जगाचा कधी शेवट होईल, असेही मला नाही वाटत. पण (समजा) तसे झालेच आणि मला आपल्या पालनकर्त्याकडे परत जावेच लागले तर मला याहीपेक्षा अधिक चांगले स्थान अवश्य मिळेल.

37 त्यांचे संभाषण सुरू असताना, त्याचा मित्र त्याला म्हणाला, 'तू त्यालाच मानण्यास नकार देत आहेस का, ज्याने तुला मातीपासून व नंतर वीर्याच्या एका थेंबापासून निर्माण केलेले आहे? अशाप्रकारे तुला पूर्ण मनुष्य बनविले. 38 पण जिथपर्यंत माझ्या मानण्याचा प्रश्न आहे, तोच अल्लाह आहे, माझा पालनकर्ता! आणि मी कोणालाही त्याच्या बरोबरीचा ठरवू शकत नाही. 39 आणि (तो पुढे म्हणाला) जेव्हा तू बागेत प्रवेश केलास, तेव्हा तू असे का म्हणाला नाहीस, 'अल्लाह इच्छितो तेच घडते' अल्लाहकडे असलेल्या सामर्थ्याव्यतिरिक्त अन्य कोणतेही सामर्थ्य नाहीच! जर तू मला संपत्ती व संततीच्या बाबतीत तुझ्यापेक्षा कमी समजतोस— 40 तर नवल नव्हे की, माझा पालनकर्ता मला तुझ्या बागेपेक्षाही अधिक चांगले काही प्रदान करेल. (आणि असेही होऊ शकते की,) तुझ्या बागेवर आकाशातून एखादी आफत पाठवू शकतो, ज्याद्वारे तो बाग पडीत जमिनीचे रूप धारण करू शकतो. 41 किंवा (असेही होऊ शकते की), त्याचे पाणी आटून जाऊ शकते, (मग अल्लाहकडूनच असे करण्यात

आल्यानंतर) ते कोणत्याही प्रकारे पुन्हा प्राप्त होणार नाही.’

42 मग (असे घडले की,) फळांनी भरलेल्या अशा बागा नष्ट करून टाकण्यात आल्या. आणि (द्राक्षांच्या) बागा आपल्या मांडवावर खाली कोसळल्या. त्यांचा मालक (हे विनाशाचे दृश्य पाहून), त्याने त्यावर जो खर्च केलेला होता, त्याबद्दल शोक करत हात चोळू लागला. तेव्हा तो म्हणू लागला, ‘अरेरे! किती चांगले झाले असते, जर मी इतरांना माझ्या पालनकर्त्याचे सहभागी ठरविले नसते तर!’ 43 अल्लाहच्या विरुद्ध (जाऊन) कोणताही जथा, त्याची मदत करू शकला नाही, तसेच तो स्वत:ही स्वत:च्या बचावासाठी काहीही करू शकला नाही. 44 अशा परिस्थितीत संरक्षण (किंवा साहाय्य) प्रदान करण्याचा अधिकार केवळ आणि केवळ अल्लाहसाठीच आहे. तोच खराखुरा ईश्वर! तोच सर्वश्रेष्ठ मोबदला देणार, आणि तोच सर्वश्रेष्ठ परिणाम ठरविणार.

45 या जगाच्या जीवनाचे उदाहरण त्यांच्यासमोर विचारार्थ ठेवा. (ते असे आहे की), आम्ही आकाशातून (ढगांद्वारे) पाण्याचा वर्षाव करतो आणि त्या (पाण्या)द्वारे पृथ्वीवरील वनस्पतींची फार जोमाने वाढ होते. मग (काही कालावधीनंतर) त्यांच्या वाळलेल्या गवताच्या काड्या होतात, ज्यांना वारा उडवून नेत असतो. तर तो केवळ अल्लाह आहे ज्याला प्रत्येक गोष्टीवर पूर्ण नियंत्रण प्राप्त आहे. 46 धनसंपत्ती आणि संतती या गोष्टी या जगातील जीवनाचे अलंकार आहेत, पण तुझ्या पालनकर्त्याच्या नजरेत ती सत्कर्मे अधिक उत्तम आहेत, ज्यांचा मोबदला चिरकाल टिकणारा आहे. तसेच (ती सत्कर्मे) आशेचीही उत्तम माध्यम आहेत.

47 ज्या दिवशी आम्ही पर्वतांना चालायला लावू आणि तुम्ही पाहाल की, पृथ्वी अगदी रिकामी झालेली आहे (म्हणजे तिने आपल्यात जे जे आहे, अल्लाहच्या आज्ञेने बाहेर काढून टाकलेले असेल) आणि आम्ही (त्या दिवशी सर्व मेलेल्यांना जिवंत करून) एकत्र गोळा करू. तेव्हा आम्ही त्यांच्यापैकी

एकालाही मागे सोडणार नाही. 48 सर्वांना तुमच्या पालनकर्त्यासमक्ष रांगेने सादर करण्यात येईल.तो त्यांना म्हणेल, ‘तुम्ही आता त्याचप्रमाणे आमच्यासमोर आलेले आहात, ज्याप्रमाणे आम्ही तुम्हाला प्रथम निर्माण केले होते. पण तुम्ही असे समजून बसला होतात की, आम्ही तुमची (आमच्यासमोर हजेरीची) वेळ निश्चित करणार नाही.

49 पण जेव्हा (त्यांच्यासमक्ष) त्यांची कर्मवही सादर करण्यात येईल, तेव्हा तुम्ही अपराध्यांना पाहाल की, जे काही त्यात नोंदलेले आहे, त्यामुळे ते भयभीत अवस्थेत असतील आणि म्हणतील, ‘आमचे दुर्दैव! ही कशी (अजब) कर्मवही आहे! की, त्यात अशी कोणतीही लहान अथवा मोठी गोष्ट नाही, जिची त्यात नोंद केलेली नाही.’ जे जे कर्म त्यांनी केलेले असतील, ते सर्व त्यांच्यासमोर ते पाहतील. तेव्हा (प्रत्येकाला कळेल) की, तुमचा पालनकर्ता कोणावरही अन्याय करीत नाही.

50 (ती वेळ आठवा), जेव्हा आम्ही स्वर्गदूतांना म्हटले होते की, आदम समोर नतमस्तक व्हा, तेव्हा ते (लगेच) नतमस्तक झाले, पण इब्लीसने तसे केले नाही. तो जिन्नांपैकी होता, अशाप्रकारे त्याने आपल्या पालनकर्त्याची अवज्ञा केली. आता तुम्ही त्यास आणि त्याच्या संततीस, मला सोडून आपला साहाय्यकर्ता बनविणार का? जेव्हा तुमच्यासमोर हे उघड आहे की, ते तुमचे शत्रू आहेत. (तसे केल्यास) दुराचारी लोकांनी निवडलेला तो फार वाईट पर्याय ठरेल.

51 मी ना त्यांना आकाश व पृथ्वी निर्माण करते वेळेस साक्षी राहण्यासाठी बोलाविले होते, ना स्वत: त्यांच्या निर्मितीच्या वेळी. मी काही (असा दुर्बल नव्हतो) की, (लोकांना) बहकाविणाऱ्यांना, आपला साहाय्यकर्ता बनविण्याची मला गरज होती.

52 ज्या दिवशी अल्लाह त्यांना म्हणेल, ‘ज्यांना तुम्ही माझे सहभागी समजत

होता, त्यांना (आता) बोलवा.' तेव्हा ते त्यांना पुकारतील, पण ते त्यांना कोणताही प्रतिसाद देणार नाहीत. तेव्हा आम्ही त्यांच्या दरम्यान शत्रुत्वाची दरी निर्माण करून टाकू. 53 तेव्हा अपराधी लोक, नरकाची आग (आपल्या डोळ्यांनी) पाहतील आणि तेव्हा त्यांना हे समजलेले असेल की, आता आपण यात पडणार आहोत. त्यांना त्यापासून कोणत्याही प्रकारे सुटकेचा मार्ग सापडणार नाही.

54 अशाप्रकारे आम्ही या कुराणात लोकांच्या भल्यासाठी अनेक प्रकारची उदाहरणे, विविध प्रकारे स्पष्ट करून सांगितली आहेत. पण मनुष्य नेहमीच भांडखोर ठरला आहे. 55 लोकांना त्यांच्याकडे मार्गदर्शनाचे (साधन) येऊन पोहोचल्यानंतरही, श्रद्धा धारण करण्यास आणि आपल्या पालनकर्त्याकडे (भूतकाळातील चुकांविषयी) क्षमायाचना करण्यास (याशिवाय) कोणतीही गोष्ट बाधक ठरली नाही की, पूर्वीच्या लोकांच्या बाबतीत जे घडले, ते यांच्याबाबतीतही घडावे. किंवा शिक्षेची विपत्ती प्रत्यक्ष त्यांच्यासमोर यावी (म्हणजे सत्याचे प्रमाण स्पष्ट झाल्यानंतरही, ते मानण्यास तयार झाले नाहीत).

56 आम्ही पैगंबरांना फक्त शुभवार्ता देण्यासाठी आणि सावधानतेचा इशारा देण्यासाठी पाठवीत असतो. (पण) सत्य नाकारण्यावर आग्रही असलेले लोक खोट्या गोष्टींच्या आधारे (पैगंबरांच्या विरुद्ध) वाद घालीत असतात, या हेतूने की, सत्याला परिणामशून्य करून टाकावे. त्यांनी माझ्या संदेशांना आणि चेतावणीला आपल्या थट्टेचा विषय बनविला. 57 त्यापेक्षा अधिक दुष्ट दुसरा कोण असू शकतो, ज्याला त्याच्या पालनकर्त्याच्या संदेशाद्वारे उपदेश केला जातो, मग तो त्याकडे पाठ फिरवितो आणि त्याला त्याच्या हातांनी केलेल्या (दुष्)कृत्यांचा विसर पडतो. अशा लोकांच्या हृदयांवर आम्ही निश्चितपणे पडदे टाकून दिलेले आहेत. यासाठी की, त्यांना सत्याचे आकलन होऊच नये. तसेच त्यांच्या कानात एका प्रकारचे जडत्व निर्माण करून ठेवलेले आहे. अशांना जरी तुम्ही

सन्मार्गाकडे बोलवाल, तरी ते कधीही सन्मार्गाचा अंगीकार करणार नाहीत.

58 तुमचा पालनकर्ता खरोखर क्षमाशील व असीम दयावान आहे. जर त्याला त्यांच्या वाईट कृत्यांमुळे, त्यांना (लगेच) फैलावर घ्यायचे असते तर त्याने त्यांच्यावर शीघ्र शिक्षेची आपत्ती (त्याच वेळी, त्याच जागी) पाठवून दिली असती. पण नाही, त्यांच्यासाठी एक वेळ निर्धारित आहे, ज्यानंतर मात्र
(स्वत:च्या बचावासाठी) त्यांना कोणताही सुटकेचा मार्ग सापडणार नाही. 59
त्या सर्व वस्त्यांची हकिगत अशीच होती की, आम्ही त्यांना तेव्हाच नष्ट केले, जेव्हा त्यांनी पापकृत्य करीत-करीत मर्यादा गाठली. कारण त्यांच्या विनाशाची आम्ही वेळ निश्चित केलेली होती.

60 (ती वेळ आठवा) जेव्हा मूसा आपल्या सेवकास म्हणाला, (जेव्हा ते दोघे भटकत्या अवस्थेत होते) 'मी तोपर्यंत चालत राहीन, जोपर्यंत दोन समुद्रांच्या संगमस्थानी पोहोचत नाही, मग मला त्यासाठी कित्येक वर्षे का लागत नाहीत?'
61 पण शेवटी जेव्हा ते त्या ठिकाणी पोहोचले, जिथे दोन समुद्र येऊन आपसात मिळतात. तेव्हा त्यांना आपल्या माशाचा विसर पडला आणि तो मासा वेगाने
समुद्रात आपल्या मार्गावर मार्गस्थ होऊन त्यांच्या नजरेपासून नाहीसा झाला. 62
जेव्हा ते तिथून काही अंतर पुढे गेले, तेव्हा मूसा आपल्या सेवकाला म्हणाला, 'आमची न्याहारी आम्हाला दे, या प्रवासाने आम्हाला फार थकविले आहे.'

63 (त्यावर तो सेवक) उत्तरला, 'तुम्ही पाहिला नाहीत का, आपण जेव्हा खडकाजवळ आराम करीत होतो, तेव्हा मला माशाविषयी विसर पडला, सैतानानेच तुम्हाला त्याविषयी आठवण करून देण्याचा विसर पाडला. तो मासा अजब
प्रकारे निघून समुद्रात दाखल झाला.' 64 (त्यावर) मूसाने म्हटले, 'हेच ते (ठिकाण) आहे, ज्याचा आपण शोध घेत होतो. मग ते दोघे आपल्या पाऊलखुणांचा मागोवा घेत, ज्या मार्गाने आले होते, त्याच मार्गाने परत फिरले.
65 तेव्हा त्यांना आमच्या भक्तांपैकी एक भक्त भेटला. ज्यावर आम्ही

आमच्याकडून कृपा प्रदान केलेली होती. तसेच ज्याला आम्ही आमच्याकडून (खास) ज्ञान दिलेले होते.

66 मूसाने त्याला म्हटले, 'मी तुमच्याबरोबर येऊ शकतो का, या उद्देशासाठी की, जे तुम्हाला शिकवण्यात आलेले आहे, त्यातून तुम्ही मला शिकवावे? 67 (त्यावर) त्याने उत्तर दिले, 'तुम्ही माझ्याबरोबर असताना धीर धरून राहू शकणार नाही. 68 आणि त्या गोष्टीबद्दल तुम्ही धीर का बरे धरू शकाल, जी तुमच्या आकलनापलीकडची गोष्ट आहे. 69 मूसाने म्हटले, 'अल्लाहने इच्छिल्यास, मी धीर ठेवणारा असल्याचे तुम्हाला आढळून येईल. तसेच मी कोणत्याही बाबतीत तुमची अवज्ञा करणार नाही.' 70 (त्या सुज्ञ माणसाने) म्हटले, 'ठीक आहे, जर तुम्हाला माझ्याबरोबर यायचे असेल तर (एक गोष्ट नीट लक्षात घ्या की,) मला कोणत्याही गोष्टीविषयी प्रश्न करू नका, जोपर्यंत मीच स्वत: त्याविषयी तुम्हाला सांगत नाही.

71 अशाप्रकारे ते दोघे निघाले, पण जेव्हा ते (वाटेत) एका नौकेत बसले (आणि समुद्र किनाऱ्यावर पोहोचले व नौकेतून ते उतरताना) त्या माणसाने त्या नौकेत भोक पाडले. (त्यावर) मूसाने म्हटले, 'तुम्ही या नौकेत, या हेतूने भोक पाडला आहात का की, तिच्यात प्रवास करणारे बुडून जावेत?' ही तर फार भयंकर गोष्ट तुम्ही केला आहात (कारण ती नौका नियमितपणे लोकांना ने-आण करीत असे). 72 तो म्हणाला, 'मी तुम्हाला आधीच सांगितले नव्हते का की, तुम्ही माझ्यासोबत धीर धरून राहू शकणार नाही.' 73 मूसाने म्हटले, 'मी (चुकलो, कारण) मला विसर पडला, म्हणून तुम्ही त्याविषयी मला आता फैलावर घेऊ नका आणि माझ्याकडून जी चूक घडली त्याविषयी कठोर भूमिका घेऊ नका.' 74 मग ते पुढे निघाले, त्यांची (वाटेत) एका मुलाशी गाठ पडली, तेव्हा त्या माणसाने त्या मुलाला ठार करून टाकले, (त्यावर) मूसाने म्हटले, 'तुम्ही एका निष्पाप जिवाला ठार करून टाकले, त्याने तर कोणाचीही

हत्या केलेली नव्हती, (मग तुम्ही असे का बरे केलात?) तुम्ही हे फारच भयंकर कृत्य केले आहात!

75 (त्यावर) तो माणूस म्हणाला, 'मी तुम्हाला आधीच सांगून टाकले नव्हते का की, तुम्ही माझ्याबरोबर धीर धरून कदापि राहू शकणार नाही? 76 मूसाने उत्तर दिले, 'जर यापुढे मी तुम्हाला कशाबद्दलही प्रश्न केला तर तुम्ही मला आपल्याबरोबर ठेवू नका. कारण (तेव्हा) सबबी सांगण्याची माझी हद्द आलेली असेल. 77 त्यानंतर ते आणखी पुढे गेले, येथपर्यंत की, ते एका गावात जाऊन पोहोचले. त्यांनी तेथील लोकांकडे काही अन्नपाणी मागितले, पण त्यांनी कोणत्याही प्रकारे त्यांचा पाहुणचार करण्यास नकार दिला. (त्या गावात) त्यांनी एक भिंत पाहिली, जी कोसळण्याच्या मार्गावर होती. (मूसाच्या) सोबतीने ती (भिंत पुनर्बांधणी करून) सरळ करून टाकली. (त्यावर) मूसाने म्हटले, 'तुम्ही इच्छिले असते, तर या (कामापोटी) काही मेहनताना घेऊ शकले असते.' 78 (त्यावर) तो म्हणाला, 'आता मी आणि तुम्ही एकमेकांपासून दूर होण्याची ही वेळ आहे, मी तुम्हाला त्या गोष्टींची हकिगत सांगून टाकतो ज्याविषयी तुम्ही धीर धरू शकला नाहीत.'

79 त्या नौकेचे असे होते की, ती काही गरीब लोकांची नौका होती, जे समुद्रात (त्याद्वारे) रोजंदारीचे काम करीत असत. मला त्या नौकेत यासाठी बिघाड करून टाकावेसे वाटले, कारण (मला माहीत होते की,) त्यांच्या मागून एक राजा येत होता, जो प्रत्येक (चांगली) नौका बळजबरीने हिरावून घेत होता.

80 जिथपर्यंत त्या मुलाचा संबंध आहे, त्याची हकिगत अशी आहे की, त्याचे आईवडील (सच्चे) श्रद्धावंत होते. आम्हाला या गोष्टीची दाट शक्यता वाटत होती की, तो मोठा होऊन त्यांच्याशी उद्दामपणाचे आणि कृतघ्नतापूर्वक वर्तन करून, त्यांना त्रस्त करील. 81 म्हणून आम्हाला वाटले की, त्यांच्या पालनकर्त्याने त्याच्या ऐवजी त्यांना असे मूल प्रदान करावे, जे शुद्ध चारित्र्याच्या

बाबतीत त्याच्यापेक्षा अधिक चांगले असावे, तसेच (आईवडलांप्रति) करुणाभाव ठेवणारे असावे.

82 आणि त्या भिंतीची हकिगत अशी आहे की, ती गावातील दोन अनाथ मुलांच्या (घराची) भिंत होती. त्या भिंतीखाली त्यांचा एक खजिना पुरून ठेवलेला होता. त्यांचा बाप एक सदाचारी माणूस होता.म्हणून तुमच्या पालनकर्त्याची अशी इच्छा होती की, दोघे परिपक्वतेच्या वयात पोहोचल्यानंतरच त्यांचा खजिना त्यांच्या हाती लागावा. (त्यांच्यावर) तुमच्या पालनकर्त्याची ही कृपा होती, मी (जे काही केले ते) माझ्यावतीने केले नाही (तर अल्लाहच्या आज्ञेनुसार केले). ही आहे हकिगत त्या गोष्टींची, ज्यांच्याविषयी तुम्ही धीर धरू शकले नाही.

83 (पैगंबर!) ते तुम्हाला ज़ुलक़रनैनविषयी विचारतात, (त्यांना) सांगा, 'मी तुम्हाला त्याचा काही वृत्तांत ऐकवीन.' 84 त्याला आम्ही पृथ्वीवर (प्रचंड) सामर्थ्य प्रदान केले होते. तसेच त्याला आम्ही सर्व काही प्राप्त करण्यासाठी लागणारी साधने दिली होती.

85 मग (त्याने जे काही केले,) त्यासाठी योग्य साधनांची निवड केली. 86
(त्याने पश्चिमेकडील मोहिमेकडे आपला मोर्चा वळविला) व तो सूर्यास्ताच्या ठिकाणापर्यंत येऊन पोहोचला (म्हणजे भूभागाच्या शेवटच्या टोकावर), तेव्हा सूर्य गढूळ पाण्याच्या कुंडात बुडत असल्यासारखे त्याला दिसले. तिथे जवळच एक जनसमूह त्याला आढळला. आम्ही (त्याला) म्हणालो, 'हे ज़ुलक़रनैन! तुला हवे असेल तर त्यांना शिक्षा कर किंवा त्यांच्याशी चांगले वर्तन कर.' 87
तो म्हणाला, 'आम्ही त्याला निश्चितपणे शिक्षा करू, जो (इतरांशी) अन्यायाने वागतो, मग त्याला त्याच्या पालनकर्त्याकडे परतविले जाईल, तेव्हा तो (म्हणजे त्याचा पालनकर्ता) त्याला फार कठोर शिक्षा करेल. 88 तर जो कोणी श्रद्धावंत बनेल आणि सत्कर्मे करील तर (मृत्यूनंतरच्या जीवनात) त्याच्यासाठी उत्तम

मोबदला निश्चित आहे. आम्हीदेखील त्याच्याप्रति (अगदी)मवाळ भूमिका घेऊ.'

89 मग त्याने पुन्हा एकदा (आपला मोर्चा दुसऱ्या एका) मोहिमेकडे वळविला. 90 येथपर्यंत की, तो सूर्य निघण्याच्या ठिकाणापर्यंत येऊन पोहोचला, (म्हणजे पूर्वेकडील भूभागाच्या टोकावर), तेव्हा त्याने सूर्याला अशा एका जनसमूहावर उदय पावत असल्याचे पाहिले, ज्यांच्यासाठी आम्ही उन्हापासून बचावाची कोणतीही व्यवस्था केलेली नव्हती. 91 अशाप्रकारे (आम्ही त्याला या जनसमूहावरही वर्चस्व प्रदान केले) आणि त्याच्या प्रत्येक गोष्टीची आम्हाला पूर्ण जाणीव होती.

92 मग त्याने (आणखी एका मोहिमेचे) आयोजन केले. 93 येथपर्यंत की, तो दोन पर्वतांच्या दरम्यान येऊन पोहोचला, तिथे एक जनसमूह (राहत) असल्याचे त्याला आढळले. ते लोक (याच्या भाषेचा) एखादा शब्द मोठ्या कष्टानेच समजू शकत होते. 94 ते म्हणाले, 'हे ज़ुलक़रनैन! याजूज आणि माजूज आमच्या भूप्रदेशात फार उत्पात माजवितात. तर आम्ही तुला यासाठी काही महसूल (गोळा करून) द्यावे का की, तू यांच्या आणि आमच्या दरम्यान (आम्हाला) एखादा तट उभारून द्यावेस?'

95 ज़ुलक़रनैन ने उत्तर दिले, 'जे काही मला माझ्या पालनकर्त्याने प्रदान केलेले आहे (कोणत्याही मानधनापेक्षा) श्रेष्ठ आहे. तुम्ही माझी फक्त शारीरिक श्रमाद्वारे मदत करा. मी तुमच्या आणि त्यांच्या दरम्यान एक तट उभारून देईन. 96 तुम्ही लोखंडी ठोकळे आणून (मला) द्या.' मग जेव्हा त्याने पर्वतांच्या दोन्ही टोकांमधील पोकळी भरून काढली, तेव्हा तो म्हणाला, 'आता आग पेटविण्यासाठी तुम्ही आपले भाते फुंका,' जेव्हा लोखंडी ठोकळे आगीसारखे लाल झाले, तो म्हणाला, 'आणा, आता मी यावर वितळलेले तांबे ओतीन.' 97 अशाप्रकारे (अशी उंच व मजबूत) तटबंदी तयार झाली की, याजूज व माजूज त्यावर ना

चढू शकत होते, ना भगदाड पाडू शकत होते. 98 तो (राजा) म्हणाला, 'ही माझ्या पालनकर्त्याची कृपा होय. पण जेव्हा माझ्या पालनकर्त्याच्या वचनाच्या पूर्ततेची वेळ (जवळ) येऊन ठेपेल, तेव्हा तो (मी जी तटबंदी निर्माण केलेली आहे) उद्‌ध्वस्त करून सपाट मैदान करून टाकेल. माझ्या पालनकर्त्याचे वचन अगदी सत्य आहे.'

99 त्या दिवशी आम्ही (जेव्हा समस्त मानवजातीला बोलावू) त्यांना एकमेकांवर लाटांप्रमाणे आदळण्यासाठी सोडून देऊ.तेव्हा शिंग फुंकले जाईल. आम्ही सर्वांना एकत्र गोळा करू.

100 त्या दिवशी आम्ही सत्य नाकारत राहिलेल्या लोकांसमोर प्रत्यक्ष नरकास सादर करू. 101 माझ्या स्मरणिकेच्या बाबतीत, ज्यांच्या डोळ्यांवर (गफलतीचा) पडदा पडलेला होता, तसेच माझा सावधानतेचा इशारा ऐकण्याच्या बाबतीत, ते बहिरे बनलेले होते.

102 सत्य नाकारण्यावर आग्रही असलेले लोक असे समजून बसलेत का की, ते मला सोडून माझ्या सेवकांना आपले रक्षणकर्ते बनवू शकतात? आम्ही अशा श्रद्धाहीनांच्या स्वागतासाठी नरक तयार ठेवला आहे.

103 (पैगंबर!) त्यांना म्हणा, 'मी तुम्हाला त्या लोकांविषयी सांगू का, जे आपल्या कृत्यांमुळे सर्वांत जास्त तोट्यात राहणारे आहेत?' 104 ते लोक, ज्यांची मेहनत या जगातील जीवनातच वाया गेली, पण त्यांना तर वाटत राहिले की, ते चांगली कार्ये करीत आहेत. 105 हेच ते लोक आहेत, ज्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या संदेश असलेल्या खुणांकडे पूर्णपणे दुर्लक्ष केले. त्याच्याशी होणाऱ्या अटळ भेटीला मानण्यास नकार दिला. म्हणून त्यांनी केले सवरलेले सर्व वाया गेले. मग पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही त्यांना कोणत्याही प्रकारे महत्त्व देणार नाही. 106 नरक हाच त्यांचा मोबदला आहे — कारण त्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला आणि माझ्या संदेशांची व माझ्या संदेशवाहकांची

खिल्ली उडविली.

107 (पण याउलट) जे लोक इमान धारण करून सत्कर्मे करतात अशा लोकांचे स्वर्गाच्या बागांत स्वागत केले जाईल. 108 त्यात ते कायम वास्तव्य करतील (आणि स्वर्गाच्या बागांतून) इतरत्र कुठेही जाऊ इच्छिणार नाहीत.

109 (पैगंबर! लोकांना) सांगा, 'माझ्या पालनकर्त्याच्या शब्दांना लिहिण्यासाठी समुद्रांना शाई बनविले गेले, तरी माझ्या पालनकर्त्याचे शब्द संपण्यापूर्वीच (संपूर्ण) समुद्रांची शाई संपून जाईल (पण माझ्या पालनकर्त्याचे शब्द संपणार नाहीत) जरी आम्ही समुद्रावर समुद्र आणणे सुरू ठेवले तरी (समुद्र संपत जातील, पण असीम महान असलेल्या पालनकर्त्याच्या गुणांचे वर्णन कधी संपू शकत नाही).'

110 (पैगंबर! लोकांना) सांगा, 'मी अगदी तुमच्यासारखाच एक माणूस आहे. पण (माझ्यात व तुमच्यात फरक एवढाच आहे की,) माझ्याकडे हा (ईश्वरीय) संदेश येतो की, तुमचा ईश्वर एकच आणि 'एकच ईश्वर' आहे. तेव्हा जो कोणी आपल्या पालनकर्त्याशी (न्यायाच्या दिवशी) भेटीची आशा बाळगून आहे, त्याने सत्कर्मे करायला हवी. आणि आपल्या पालनकर्त्याच्या उपासनेत कोणालाही त्याचा समकक्ष ठरवू नये.'

# सूरह–१९. मरयम

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 क़ाफ़० हा० या० अइन० सॉद० 2 हा त्या कृपेचा वृत्तांत आहे, जी तुझ्या पालनकर्त्याने आपला भक्त ज़करिया याच्यावर केली. 3 जेव्हा त्याने आपल्या पालनकर्त्याला हृदयाच्या स्वरांनी हाक दिली.

4 म्हणाला, 'हे प्रभू! माझी हाडे कमकुवत झालेली आहेत. तसेच माझ्या डोक्याचे केस वार्धक्यामुळे पांढरे झालेले आहेत. पण हे प्रभू! असे कधीही झाले

नाही की, मी तुझ्याकडे कृपेसाठी प्रार्थना करून निराश झालो असेन. 5 आता, मला माझ्यानंतर माझ्या भाऊबंदांकडून ही भीती वाटते (की, ते माझ्या मिशनला पुढे चालू ठेवणार नाहीत). कारण माझी पत्नी तर वांझ आहे. म्हणून तू मला आपल्या विशेष कृपेने एक वारस प्रदान कर. 6 जो माझा वारस व्हावा आणि पैगंबर याकूबच्या वंशाचाही वारस व्हावा. हे प्रभू! त्यास आपला आवडता बनव.'

7 (त्यानंतर अल्लाहकडून प्रतिसाद आला) हे ज़करिया! आम्ही तुला एका (अशा) मुलाच्या (जन्माची) शुभवार्ता देत आहोत, ज्याचे नाव 'यहया' असेल. आम्ही याआधी हे नाव कोणालाही दिलेले नाही. 8 ज़करिया उद्‌गारला, हे प्रभू! मला मूल कसे होईल, जेव्हा माझी पत्नी तर वांझ आहे आणि मी देखील वार्धक्यामुळे पूर्णपणे अशक्त झालेलो आहे.

9 (स्वर्गदूताने) उत्तर दिले, 'असेच होईल, तुझा पालनकर्ता म्हणतो, 'ही माझ्यासाठी सोपी गोष्ट आहे, मी यापूर्वी तुलाही निर्माण केलेले आहे, जेव्हा तू काहीच नव्हतास.' 10 (त्यावर) ज़करियाने म्हटले, 'हे प्रभू!' (त्यासंबंधाने) माझ्यासाठी एखादी खूण निश्चित करून टाक,' (स्वर्गदूताने) उत्तर दिले, 'तुझ्यासाठी खूण अशी असेल की, तू सारख्या तीन रात्री व दिवस लोकांशी बोलू शकणार नाहीस, जरी तू स्वस्थ असशील. 11 मग ज़करिया (नेहमीप्रमाणे) उपासनेच्या कक्षेतून बाहेर आपल्या लोकांसमोर आला आणि हावभावांद्वारे त्यांना म्हणाला, 'तुम्ही सकाळ संध्याकाळ अल्लाहचे स्तुतिगान करीत राहा.'

12 (आणि जेव्हा यहयाचा जन्म झाला आणि तो मोठा झाला, तेव्हा) आम्ही त्याला म्हणालो, 'हे यहया! (आम्ही प्रदान केलेल्या) ग्रंथाला दृढतापूर्वक धरून ठेव (म्हणजे त्यातील वचनांवर दृढ श्रद्धा ठेव आणि दृढतापूर्वक पालन कर).' त्याला आम्ही लहानपणीच धर्माच्या बाबतीत विवेकी दृष्टिकोन प्रदान केलेला होता. 13 तसेच आमच्याकडून (मनाचा) कनवाळूपणा आणि शुद्धता हे गुण

त्याच्या अंगी निर्माण केले होते. तो नेहमी (अल्लाहची) जाण ठेवणारा होता. 14
तो आपल्या आईवडलांप्रति पूर्णपणे कर्तव्यनिष्ठ होता आणि अजिबात उद्धट व
विद्रोही (स्वभावाचा) नव्हता. 15 (अल्लाहकडून) त्याच्यावर शांती आहे, ज्या
दिवशी तो जन्मला आणि ज्या दिवशी तो मरण पावेल आणि त्या दिवशीही
त्याच्यावर शांतीच असेल जेव्हा त्याला मृत्यूनंतर पुन्हा जिवंत करून उठविले
जाईल.

16 (पैगंबर!) या ग्रंथाद्वारे मरियमची आठवण करा, ती कशाप्रकारे आपल्या
लोकांपासून अलग होऊन पूर्वेकडील एका ठिकाणी निघून गेली. 17 मग तिने
स्वत:ला (लोकांपासून दूर नेऊन) एकांतवासात वास्तव्य केले, तेव्हा आम्ही
तिच्याकडे आमचा स्वर्गदूत पाठविला, जो तिच्यासमोर पूर्णपणे मानवी रूपात
प्रकट झाला. 18 जेव्हा तिने त्याला पाहिले, ती उद्गारली 'मी कृपावंत अल्लाहचे
(तुझ्यापासून स्वत:चे रक्षण करण्यासाठी) शरण मागते, 'तू जर खरोखर,
अल्लाहची जाण ठेवणारा माणूस असशील (तर माझ्या जवळ येऊ नकोस)!' 19
तो स्वर्गदूत उत्तरला, 'मी केवळ तुझ्या पालनकर्त्याकडून पाठविलेला दूत आहे.
मी तुला एक असा पुत्ररूपी (उपहार) प्रदान करण्यासाठी आलेलो आहे, जो
शुद्ध (चारित्र्याचा) असेल.' 20 (त्यावर) ती म्हणाली, मला मूल कसा होऊ
शकतो, जेव्हा कोणत्याही माणसाने मला स्पर्श केलेला नाही. ना मी कधी
अशुद्ध चारित्र्याची स्त्री होते. 21 (तो स्वर्गदूत) म्हणाला, 'ते असेच होईल,
तुझा पालनकर्ता म्हणतो, ही माझ्यासाठी साधी गोष्ट आहे.' आम्ही त्याला
(म्हणजे तुझ्या पुत्राला) लोकांसाठी एक निशाणी बनवू आणि आमच्याकडून
एक कृपा. ही (अल्लाहकडून) आधीच नियत झालेली एक गोष्ट आहे.

22 मग अशाप्रकारे तिने त्याचा गर्भ धारण केला आणि त्यासह ती एका
दूरच्या ठिकाणी निघून गेली. 23 मग जेव्हा प्रसूतीच्या वेदना (सुरू झाल्या) व
ती चालत खजुरीच्या बुंध्यापर्यंत आली. ती म्हणाली, 'अरेरे! मी यापूर्वीच मरण

पावले असते आणि विस्मृतीच्या पडद्याआड गेलेली गोष्ट बनले असते तर किती बरे झाले असते!'

24 तेव्हा (स्वर्गदूताने) खालच्या बाजूने तिला हाक दिली (म्हणाला), 'दु:खी होऊ नकोस, तुझ्या पालनकर्त्याने तुझ्या पायथ्याशी एक झरा प्रवाहित केला आहे. 25 तू खजुरीच्या खोडास धरून आपल्याकडे हालव, त्यामुळे तुझ्यावर ताजी, पिकलेली खजूरी पडतील. 26 तर ते खा व पाणी पी व आपले डोळे थंड कर (म्हणजे मनाला शांती लाभू दे). जर तुला एखादा मनुष्य दृष्टीस पडला तर त्याला (इशाऱ्याने) सांगून टाक की, मी कृपावंत (अल्लाहसाठी स्तब्धतेच्या) उपवासाचे व्रत घेतलेले आहे, म्हणून मी आज कोणाशीही बोलणार नाही.

27 मग ती त्या मुलाला घेऊन आपल्या लोकांकडे आली, तेव्हा (तिच्यासह त्या मुलाला पाहून) ते म्हणाले, 'हे मरियम! निश्चितपणे, तू काहीतरी भयंकर कृत्य केले आहेस.' 28 'हे हारूनच्या भगिनी, ना तुझा बाप वाईट माणूस होता, ना तुझी आई वाईट चारित्र्याची स्त्री होती.'

29 मरियमने त्या (मुलाकडे) बोट दाखविले, तेव्हा ते म्हणाले, 'आम्ही त्याच्याशी कसे बोलणार, जे अजून पाळण्यातले बाळ आहे?' 30 (पण) ते बाळ बोलू लागले, मी अल्लाहचा भक्त आहे, त्याने मला ग्रंथ प्रदान केले आणि मला पैगंबर बनवले आहे. 31 मी जिथेकुठे असेन, त्याने मला आर्शीवादित केले आहे. जोपर्यंत मी जिवंत असेन त्याने मला नमाज़ पढण्याची व दानकार्य करण्याची ताकीद दिलेली आहे. 32 त्याने मला माझ्या आईच्याप्रति कर्तव्यनिष्ठ बनविले आहे, मला उद्धट व दुष्ट बनविलेले नाही. 33 (अल्लाहकडून) माझ्यावर शांती होती, ज्या दिवशी मी जन्मलो आणि (शांती असेल माझ्यावर) ज्या दिवशी मी मरेन आणि ज्या दिवशी पुन्हा जिवंत करून मला उठविण्यात येईल त्या दिवशी देखील माझ्यावर शांती असणार.

[34] असा होता मरियमपुत्र येशू, हे आहे त्याच्या विषयीचे संपूर्ण सत्य, ज्याविषयी लोक आपसात तीव्र मतभेद ठेवून आहेत. [35] हे अल्लाहच्या प्रतिष्ठेला शोभणारे नाही की, त्याने आपल्यासाठी पुत्र बनवावे. असीम आहे त्याची महिमा! जेव्हा तो एखादी गोष्ट करण्याचा निर्णय घेतो, तेव्हा तो त्या गोष्टीस आदेश देतो, 'हो'! मग ती 'होते'!

[36] (येशूने नेहमी असेच म्हटले होते की,) अल्लाह माझा पालनकर्ता आहे आणि तुमचाही पालनकर्ता आहे. म्हणून केवळ त्याचीच उपासना करा. हाच सरळ मार्ग आहे. [37] पण नंतर (बायबलचे अनुसरण करणाऱ्या) विविध समूहांत (येशू संबंधाने) आपसात मतभेद निर्माण झाले. ज्या लोकांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला. त्यांच्यासाठी त्या भयंकर दिवसाचे आगमन, किती भयानक गोष्ट असेल! [38] ज्या दिवशी ते आमच्यासमोर हजर होतील, तेव्हा ते फार गंभीरतापूर्वक ऐकतील आणि फार गंभीरतापूर्वक पाहतील. पण आज हे अत्याचारी लोक (आंधळे व बहिरे बनून) उघड मार्गभ्रष्टतेत हरवलेले आहेत.

[39] (पैगंबर!) त्यांना त्या पश्चात्तापाच्या दिवसाच्या (आगमनाविषयी) सावधानतेचा इशारा द्या, जेव्हा प्रत्येक गोष्ट निकाली लावली जाईल. पण सध्या ते गफलतीच्या अवस्थेत आहेत आणि ते श्रद्धा धारण करीत नाहीत. [40] नि:संदेह, अखेर आम्हीच पृथ्वी आणि त्यावर निवास करणाऱ्यांचे वारस होऊ आणि सर्वांना आमच्याकडेच परत आणले जाईल.

[41] या ग्रंथाच्या माध्यमातून पैगंबर इब्राहीमची आठवण (डोक्यात) ताजी करा. यात मुळीच शंका नाही की, तो सत्यवादी माणूस होता व पैगंबर होता. [42] (एकदा) त्याने आपल्या पित्यास म्हटले, 'हे माझ्या पित्या! तू अशा गोष्टींची उपासना का करतोस, ज्या ना काही ऐकतात, ना काही पाहतात आणि ना कोणत्याही प्रकारे तुझ्या कामी येऊ शकतात. [43] हे माझ्या पित्या! मला (अल्लाहकडून) असे ज्ञान प्राप्त झाले आहे, जसे ज्ञान तुझ्याकडे नाही. म्हणून तू

माझे अनुसरण कर. मी तुला सरळ मार्ग दाखवेन. 44 हे माझ्या पित्या! सैतानाची उपासना करू नकोस, कारण सैतान कृपावंत (अल्लाहची) अवज्ञा करणारा आहे, यात मुळीच शंका नाही. 45 हे माझ्या पित्या! मला असे भय वाटते की, कृपावंत (अल्लाहची) शिक्षा तुला आपल्या ताब्यात घेईल. मग तुला (कायमस्वरूपी) सैतानाचा सोबती बनून राहावे लागेल.'

46 (त्याच्या पित्याने) उत्तर दिले, 'हे इब्राहीम! तू माझ्या उपास्यांचा धिक्कार करीत आहेस का? तू यापासून परावृत्त झाला नाहीस तर मी निश्चितपणे तुझ्यावर दगडांचा वर्षाव करून तुला ठार करेन. तू माझ्यापासून कायमचा चालता हो.' 47 इब्राहीमने उत्तर दिले, 'तुला शांती लाभो! मी माझ्या पालनकर्त्याकडे तुझ्याकरिता क्षमायाचना करीन, खरोखर तो माझ्यावर फार मेहेरबान आहे. 48 मी तुम्हा लोकांना सोडून दूर जात आहे आणि त्यांनाही सोडून, ज्यांचा तुम्ही अल्लाहशिवाय धावा करता. मी केवळ आपल्या पालनकर्त्याचाच धावा करीन आणि (मला पूर्ण) आशा आहे की, त्याचा धावा करून (त्याला हाक देऊन) माझ्या हाती निराशा कधी येणार नाही.'

49 मग जेव्हा तो त्या लोकांपासून व ते अल्लाहला सोडून ज्यांची उपासना करीत असत, त्यांच्यापासूनही वेगळा झाला. (पुढे) आम्ही त्याला (पुत्र) इसहाक़ व (प्रपौत्र) याक़ूब प्रदान केले आणि त्यांच्यापैकी प्रत्येकाला आम्ही पैगंबर बनविले. 50 तसेच आम्ही आमची (विविधरूपी) कृपा त्यांना प्रदान केली आणि खऱ्या अर्थाने त्यांना थोरवी प्रदान केली.

51 तर या ग्रंथाच्या माध्यमातून पैगंबर मूसाची आठवण (डोक्यात) ताजी करा. निश्चितच तो (आमच्याकडून) निवडला गेलेला होता. तो पैगंबर व प्रेषित होता. 52 (आठवा कशाप्रकारे) आम्ही त्याला सिनाई पर्वताच्या उजव्या बाजूने हाक दिली. आम्ही खास संदेश देण्यासाठी त्याला जवळ बोलावून घेतले. 53 तसेच (कशाप्रकारे) आपल्या कृपेने त्याचा भाऊ हारून यास त्याच्या मदतीसाठी पैगंबर बनवून त्याला

प्रदान केले.

54 या ग्रंथाच्या माध्यमातून इस्माईलची आठवण (डोक्यात) ताजी करा. तो नेहमी आपल्या शब्दाचा पक्का होता, तसेच पैगंबर व प्रेषित होता. 55 तो आपल्या लोकांना नमाज़ व ज़कात (दानकार्य करणे) यांचा आदेश देत असे. तो आपल्या पालनकर्त्याच्या नजरेत प्रिय (भक्त) ठरलेला होता. 56 तसेच या ग्रंथाच्या माध्यमातून पैगंबर इदरीसची आठवण (डोक्यात) ताजी करा. निःसंशय तो एक सत्यवादी मनुष्य होता व प्रेषित होता. 57 आम्ही त्याला उच्च दर्जा प्रदान केला होता.

58 हे पैगंबरांपैकी काही लोक आहेत, अल्लाहने ज्यांना आपली कृपा प्रदान केली होती. ते आदमचे वंशज होत आणि त्यांचे (वंशज), ज्यांना आम्ही नूहच्या बरोबर नौकेत स्वार केले होते. तसेच इब्राहीम व इस्राईलचे वंशज. व (हे सर्व) अशा लोकांपैकी आहेत ज्यांना आम्ही मार्गदर्शन प्रदान केले व ज्यांची निवड केली होती. (त्यांचे असे होते) की, जेव्हा त्यांना कृपावंत (अल्लाहचे) संदेश ऐकविले जात असत, तेव्हा त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागत आणि (अश्रुचिंब डोळ्यांसहित) ते (त्याच्यासमोर) नतमस्तक होत.

59 मग यांच्या मागून असे (वाईट) लोक त्यांचे उत्तराधिकारी बनले, ज्यांनी नमाज़ाकडे (पूर्णपणे) दुर्लक्ष केले. आणि आपल्या वाईट इच्छापूर्तीच्या मागे लागले. तर लवकरच ते निश्चितपणे विनाशाला तोंड देतील. 60 यात अपवाद ते लोक असतील, जे पश्चात्ताप करतात आणि श्रद्धा धारण करतात आणि सत्कर्मे करतात. तर असेच लोक स्वर्गात प्रवेश करतील. आणि त्यांच्यावर तिळमात्रदेखील अन्याय केला जाणार नाही.

61 त्यांच्यासाठी सदैव राहण्याच्या आनंददायी बागा आहेत. ज्याबद्दल कृपावंत (अल्लाहने) आपल्या भक्तांना त्या बागा अदृश्य ठेवून वचन दिलेले आहे, यात मुळीच शंका नाही की, त्याचे वचन पूर्ण होणार. 62 तिथे त्यांना स्वर्गात कोणतीही

निरर्थक गोष्ट त्यांच्या कानावर पडणार नाही. पण फक्त शांतीचे अभिवादन (म्हणजे सलाम–सलाम असे त्यांना ऐकायला मिळेल). तिथे त्यांना सकाळ–संध्याकाळ निर्वाहाची सामग्री मिळत राहील. 63 असा आहे तो स्वर्ग, ज्याचे वारस आम्ही आमच्या भक्तांपैकी त्यांना बनवू, जे आमची जाण ठेवून (जीवन व्यतीत करणारे आहेत).

64 (स्वर्गदूत म्हणतात), 'आम्ही तुमच्या पालनकर्त्याच्या आदेशाशिवाय (पृथ्वीवर) येत नसतो. जे काही आमच्यापुढे आहे आणि जे काही आमच्या मागे आहे आणि जे काही यांच्यामध्ये आहे, त्याचेच आहे. तुमचा पालनकर्ता कधीही (काहीही) विसरत नसतो..' 65 'तो पालनकर्ता आहे आकाश आणि पृथ्वीचा व त्यांच्यामध्ये जे काही आहे त्यांचादेखिल, तर तुम्ही केवळ त्याचीच उपासना करा आणि अढळपणे त्याचीच उपासना करीत राहा. त्याच्यासारखा गुणसंपन्न दुसरा कोणी असल्याचे तुम्हाला माहीत आहे का?'

66 (असे असतानाही) मनुष्य हा प्रश्न करीत असतो, 'काय! मी एकदा मरण पावल्यानंतर, पुन्हा जिवंत करून मला उठविले जाईल?' 67 मनुष्याला ही (साधी गोष्ट) आठवत नाही का, आम्ही त्याला याआधीही निर्माण केले, जेव्हा तो काहीच नव्हता?

68 तुझ्या पालनकर्त्याची शपथ, (न्यायाच्या दिवशी) आम्ही त्यांना निश्चितपणे एकत्र करू आणि सैतानांना देखील. मग त्यांना आम्ही अशा अवस्थेत नरकाजवळ आणू की, ते गुडघे घासीत येतील.

69 मग आम्ही (अपराध्यांच्या) प्रत्येक गटातून अशांना अवश्य वेगळे काढू, जे कृपावंत (अल्लाहच्या) विरुद्ध फारच निश्चयपूर्वक बंडखोरीचे प्रदर्शन करीत असत. 70 कारण आम्ही अशांना चांगल्याप्रकारे ओळखतो, जे नरकामध्ये प्रवेशास अधिक पात्र आहेत. 71 तुमच्यात असा कोणीही नसेल, ज्याला नरकाच्या आगी जवळून जावे लागणार नाही. तुझा पालनकर्त्याचा असा हा

आदेश आहे, ज्याची अंमलबजावणी होणारच. 72 तेव्हा आम्ही त्या लोकांना (नरकापासून) वाचवू, ज्यांनी आमची जाण ठेवून (जीवन व्यतीत केलेले असणार). मग अत्याचारी लोकांना गुडघे घासीत (त्यात दाखल होण्यासाठी) सोडून देऊ.

73 आणि जेव्हा आमचे संदेश सुस्पष्टरित्या त्यांना ऐकविले जाते, तेव्हा सत्य नाकारण्यावर आग्रही असलेले लोक, श्रद्धावंतांना म्हणतात, ‘आमच्या दोन गटांपैकी प्रतिष्ठेच्या दृष्टीने कोणता गट अधिक श्रेष्ठ आहे, आणि कोणाचा समूह अधिक प्रभावी आहे.’ 74 (पण) आम्ही त्यांच्यापूर्वी कित्येक जनसमूहांना नष्ट करून टाकले आहे. जे भौतिक संसाधनाच्या बाबतीत आणि थाटामाटाच्या बाबतीत यांच्याहून फार पुढे होते.

75 (पैगंबर लोकांना) सांगा, ‘जो मनुष्य चुकीच्या मार्गावर आहे, त्याला कृपावंत (अल्लाह) उसंत देत असतो, येथपर्यंत की, असे लोक ती गोष्ट (आपल्या डोळ्यांनी प्रत्यक्ष) पाहून घेतील, ज्याविषयी त्यांना वचन दिले जात आहे. (या जगातच) शिक्षा किंवा त्या अंतिम घटकेचे (आगमन). तेव्हा त्यांना कळून चुकेल की, प्रतिष्ठेच्या दृष्टीने वाईट अवस्था कोणाची आहे. आणि साधनसामग्रीच्या बाबतीत कोणाचा समूह कमजोर आहे.’

76 जे सन्मार्गाचा अंगीकार करतात, अल्लाह त्यांना त्यात अधिक प्रगल्भता प्रदान करतो. अशी सत्कर्मे ज्यांचे फळ चिरकाल टिकणारे आहे आणि जी उत्तम मोबदल्यास पात्र आहेत, तुझ्या पालनकर्त्याच्या नजरेत श्रेष्ठ आहेत.

77 त्या माणसाबद्दल तुम्ही कधी विचार केला आहे का, जो आमच्या संदेशाद्वारे प्रकट होणारे सत्य, नाकारण्यावर आग्रही आहे. तो म्हणतो, ‘मला निश्चितपणे संपत्ती व संतती प्राप्त होणार.’ 78 त्याने अदृश्य (असलेल्या भविष्यात) डोकावून पाहिले आहे की, त्याने अल्लाहकडून वचन घेतले आहे? 79 कदापि नाही! तो जे काही बोलत आहे, त्याची आम्ही नोंद करून ठेवू आणि त्याच्या

शिक्षेत आणखी वाढ करू. 80 तसेच ज्या गोष्टीबद्दल तो दावा करीत आहे, आम्हीच त्याचे वारस होऊ. मग तो आमच्यापाशी अगदी एकटा येईल.

81 त्यांनी अल्लाहला सोडून (इतर) उपास्य बनवले आहेत, या उद्देशाने की, ते त्यांच्यासाठी पाठीराखे बनतील. 82 पण असे कदापि शक्य नाही! (उलट न्यायाच्या दिवशी) जी त्यांची उपासना केली गेली, त्यालाच ते झिडकारतील आणि (ज्यांनी त्यांची उपासना केली होती) त्यांचेच विरोधक बनतील.

83 तुम्हाला या गोष्टीची जाणीव नाही का की, आम्ही (सर्व प्रकारच्या) सैतानी शक्तींना सत्य नाकारणाऱ्या लोकांवर सोडून दिलेले आहे. ते त्यांना (पाप कृत्यांसाठी) भरपूर प्रवृत्त करीत असतात. 84 म्हणून तुम्ही त्यांच्यावर (अल्लाहकडून) लवकर (शिक्षा यावी) यासाठी घाई करू नका. आम्ही त्यांचे दिवस मोजत आहोत (म्हणजे त्यांच्या पापाची घागर भरत आहे). 85 तो दिवस निश्चितपणे येणार आहे, जेव्हा आम्ही अल्लाहची जाण ठेवून असलेल्यांना सन्माननीय अतिथीप्रमाणे कृपावंत (अल्लाह) समोर एकत्रित करू. 86 तसेच अपराध्यांना नरकाकडे तहानलेल्या जनावरांच्या कळपाप्रमाणे हाकलत नेऊ. 87 (त्या दिवशी) कोणालाच मध्यस्थी करण्याचा अधिकार असणार नाही, पण फक्त त्यांना, ज्यांना कृपावंत (अल्लाहकडून) परवानगी प्राप्त झालेली असेल.

88 काही लोक म्हणतात, 'कृपावंत (अल्लाहने) स्वत:साठी पुत्र बनविला आहे.' 89 (असे शब्द तोंडातून काढून, बोलणाऱ्यांनो!) खरोखर, तुम्ही किती महाभयानक गोष्ट बोलला आहात! 90 (हे एवढे भयानक शब्द आहेत की, त्याच्या प्रतिक्रियेत) आकाश फाटू शकतात, पृथ्वीचे तुकडे-तुकडे होऊ शकतात आणि पर्वत चकनाचूर होऊ शकतात. 91 या कारणास्तव की, लोक कृपावंत (अल्लाहशी) अपत्याचा संबंध जोडतात. 92 कृपावंत (अल्लाहची ही) शान नव्हे की, त्याने (एखाद्यास) पुत्र बनवावा.

93 आकाशात आणि पृथ्वीवर असा कोणीही नाही, जो पालनकर्त्यासमोर दास म्हणून हजर होणार नाही (म्हणजे त्याने जे-जे निर्माण केलेले आहेत ते सर्व त्याचे दास आहेत) 94 नि:संदेह, त्याने सर्वांची दखल घेतलेली आहे व प्रत्येकाची गणना करून ठेवलेली आहे. 95 त्यांच्यापैकी प्रत्येक जण पुनरुत्थानाच्या दिवशी त्याच्यासमोर एकटा हजर होईल. 96 ज्या लोकांनी श्रद्धा धारण केली आणि सत्कर्मे केली त्यांच्या मनात कृपावंत अल्लाह (एकमेकांप्रति) प्रेम निर्माण करील.

97 (पैगंबर!) आम्ही या कुराणास तुमच्या भाषेत समजण्यासाठी सोपे करून टाकले आहे. या उद्देशाने की, तुम्ही सदाचारी लोकांना शुभवार्ता ऐकवा आणि दुराग्रही लोकांना सावधानतेचा इशारा द्या. 98 कारण आम्ही यांच्यापूर्वी कित्येक जनसमूह नष्ट करून टाकलेले आहेत. तर मग (आता) तुम्हाला त्यांच्यापैकी कोणी जिवंत आढळतो का, किंवा त्यांची कुजबुज तरी तुम्हाला (आता) ऐकू येते का?

# सूरह-२०. ता० हा०

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 ता० हा० 2 आम्ही हे कुराण तुमच्याकडे तुम्ही कष्ट भोगावे यासाठी प्रकट केलेले नाही. 3 तर हे अशा माणसासाठी उपदेश आहे, जो (अल्लाहचे) भय बाळगतो. 4 हे (कुराण) त्याच्याकडून प्रकट करण्यात आले आहे, ज्याने पृथ्वी आणि उंच आकाशाची निर्मिती केली आहे. 5 तोच आहे कृपावंत (अल्लाह), (समस्त विश्वाच्या) सिंहासनावर विराजमान. 6 जे काही आकाशात आहे आणि जे काही पृथ्वीवर आहे व जे काही यांच्यामध्ये आहे व जे काही जमिनीच्या खाली आहे त्या सर्वांचा (अस्सल) मालक तोच आहे.

[7] तुम्ही आपले म्हणणे मोठ्याने बोला (किंवा अगदी हळू आवाजात) तो सर्व ऐकतो, कारण तो तर तुमच्या रहस्यांना व त्याहीपेक्षा अधिक छुप्या गोष्टींना जाणतो. [8] (असा आहे) अल्लाह, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच उपासनेयोग्य नाही. सर्वोत्कृष्ट नावे त्याचीच आहेत.

[9] पैगंबर मूसाची गोष्ट तुमच्यापर्यंत पोचली आहे का? [10] (एका प्रवासादरम्यान) जेव्हा आग त्याच्या दृष्टीस पडली, तेव्हा त्याने आपल्या कुटुंबीयांना म्हटले, 'तुम्ही इथे थांबा, मला एक आग दिसली आहे, कदाचित मी तुमच्यासाठी तिथून काही विस्तव घेऊन येईन किंवा त्या आगीच्या ठिकाणी मला काही मार्गदर्शन मिळू शकेल.'

[11] जेव्हा तो त्या (आगीच्या) जवळ पोहोचला, तेव्हा एक आवाज ऐकू आला, 'हे मूसा!' [12] 'मीच आहे तुझा पालनकर्ता! आपली पादत्राणे पायातून काढून टाक, कारण तू 'तुवा' च्या पवित्र खोऱ्यात (उभा) आहेस.' [13] 'मी तुला (माझा संदेशवाहक म्हणून) निवडले आहे, तर जे (तुझ्याकडे) प्रकट केले जात आहे, ते लक्षपूर्वक ऐक. [14] 'मीच अल्लाह आहे, माझ्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही. म्हणून माझीच उपासना कर आणि माझे स्मरण करण्यासाठी नित्य नमाज़ पढ (प्रार्थना कर).' [15] क़यामतीची ती घटका येणार, यात मुळीच शंका नाही. मी तिची वेळ (लोकांपासून) गुप्त ठेवण्याचे ठरविले आहे. ते यासाठी की, प्रत्येकास त्याच्या कर्मांचा (उचित) मोबदला मिळावा. [16] तर जो तिच्या आगमनावर विश्वास ठेवत नाही आणि केवळ आपल्या मनोकामनांच्या मागे धावतो, असा व्यक्ती तुला (मृत्युपश्चात जीवनाविषयी) गाफील करता कामा नये. अन्यथा तू नाश पावशील.

[17] हे मूसा! तुझ्या उजव्या हातात काय आहे? [18] त्याने उत्तर दिले, 'ही

माझी काठी आहे, मी तिचा आधार घेतो, आणि तिच्या साहाय्याने माझ्या शेळ्यांसाठी झाडांचा पाला झोडपतो. (ही काठी) माझ्यासाठी इतर अनेक प्रकारे उपयोगी आहे.' 19 अल्लाहने म्हटले: हे मूसा! ती (काठी) खाली फेकून दे. 20 मग त्याने ती खाली फेकली आणि पाहतो तर काय, ती वेगाने धावणाऱ्या सापात परिवर्तित झाली. 21 तेव्हा अल्लाहने म्हटले, त्यास पकड आणि भिऊ नकोस. आम्ही तिला पुन्हा तिच्या पूर्वस्थितीवर आणू.

22 आता आपला हात आपल्या काखेत दाब. (जेव्हा तू तो बाहेर काढशील) तेव्हा तो पांढराशुभ्र चमकत असेल, कोणत्याही डागाशिवाय, ही दुसरी निशाणी आहे. 23 (सध्या या दोन निशाण्या यासाठी आहेत की, पुढे) आम्ही तुला आमच्या (सामर्थ्याच्या) मोठमोठ्या निशाण्यांपैकी काही निशाण्या दाखवू. 24 तू (इजिप्तचा राजा) फिरऔनकडे जा, खरोखर त्याने सर्वप्रकारे मर्यादांचे उल्लंघन केलेले आहे.

25 मूसाने म्हटले: हे माझ्या पालनकर्त्या! (तुझ्याकडून प्रकाशप्राप्तीसाठी) माझ्या अंत:करणाची (दारे) उघड 26 आणि माझे कार्य माझ्यासाठी सोपे कर 27 आणि माझ्या जिभेचा दोष दूर कर. 28 म्हणजे माझे बोलणे लोकांना पूर्णपणे समजावे. 29 तसेच माझ्या परिवारातून माझ्यासाठी एक साहाय्यक नियुक्त कर. 30 हारूनला, जो माझा भाऊ आहे 31 (आणि) त्याच्याद्वारे माझे हात बळकट कर. 32 तसेच त्याला माझ्या कार्यात सहभागी कर. 33 म्हणजे आम्हाला तुझे भरपूर स्तुतिगान करता यावे. 34 आणि तुझे खूप-खूप स्मरण करावे. 35 तू आम्हाला निश्चितपणे पाहत आहेस! 36 अल्लाहने म्हटले, 'हे मूसा! तुमची विनंती मान्य करण्यात आली आहे.'

37 आम्ही यापूर्वी देखील तुझ्यावर उपकार केलेला आहे. 38 जेव्हा आम्ही तुझ्या आईकडे आमचा संदेश पाठविला होता ज्यात असे म्हटलेले होते की, 39

त्याला (म्हणजेच मूसाला) एका पेटीत ठेव आणि ती पेटी नदीमध्ये सोडून दे. मग नदी त्या पेटीस (एके ठिकाणी) किनाऱ्याकडे घेऊन जाईल. आणि तिथे एक असा माणूस ती पेटी उचलून घेईल, जो माझा शत्रू आहे आणि त्या (बाळाचाही). तेव्हा मी माझ्याकडून तुझ्यावर प्रेमाचे असे पांघरूण घातले (की, जो कोणी तुला पाहील तर प्रेम करू लागेल). हे यासाठी केले की, तुझे संगोपन माझ्या नजरेसमोर व्हावे.

40 (ती वेळ आठव, हे मूसा!) जेव्हा तुझी बहीण (त्या पेटीच्या) पाठोपाठ गेली (आणि जेव्हा ती पेटी राजमहालात आणण्यात आली, ती फिरऔनच्या लोकांना) म्हणाली, 'मी तुम्हाला त्या बाईचा पत्ता देऊ का, जी या मुलाची चांगल्याप्रकारे काळजी घेऊ शकेल?' अशाप्रकारे आम्ही तुला तुझ्या आईकडे परतविले, हे यासाठी की, (तुला पाहून) तिला नेत्रसुख लाभावे आणि (तू दुरावलास म्हणून) ती दुःखी राहायला नको. (पुढे मोठा झाल्यानंतर) हे मूसा! तू एका व्यक्तीला मारून टाकलेस, मग आम्ही तुला या दुःखातूनही मुक्त केले. (अशाप्रकारे) आम्ही विविधप्रकारे तुझी परीक्षा पाहिली. मग तू अनेक वर्षे मदियनच्या लोकांत राहिलास. आणि आता तू (परिपक्वतेच्या) योग्य अवस्थेपर्यंत पोहोचलास, हे मूसा!

41 मी तुला माझ्या कामासाठी निवडले आहे. 42 तू आणि तुझा भाऊ माझे संदेश घेऊन जा, तुम्ही दोघे माझ्या स्मरणापासून कधीही गाफील राहू नका. 43 तुम्ही दोघेही फिरऔनकडे जा, कारण तो सर्वप्रकारे मर्यादांचे उल्लंघन करून, विद्रोही बनला आहे. 44 पण तुम्ही त्याच्याशी नम्रतापूर्वक संभाषण करा, कदाचित तो उपदेश ग्रहण करेल किंवा (माझ्या कोपास) भिऊन जाईल.

45 ते दोघे म्हणाले, 'हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला अशी भिती वाटते

की, तो आमच्याविरुद्ध एखादे अत्याचारी कृत्य करेल किंवा आपल्या विद्रोही भूमिकेवरच (कायम) राहील.' 46 अल्लाहने म्हटले, 'तुम्ही भिऊ नका, मी तुम्हा दोघांबरोबर आहे, सर्व काही ऐकत आहे, सर्व काही पाहत आहे.' 47 तर तुम्ही दोघे त्याच्याकडे जा आणि सांगा, 'आम्हा दोघांना तुझ्या पालनकर्त्याने पाठविले आहे. तर तू बनी इस्राईल या जमातीस आमच्यासोबत जाऊ दे. आणि (तू) त्यांचा आणखी अधिक छळ करू नकोस, आम्ही तुझ्या पालनकर्त्याकडून एक संदेश असलेली निशाणी घेऊन आलो आहोत. (खरोखर) शांती केवळ त्यालाच लाभणार आहे जो (अल्लाहकडून आलेल्या) मार्गदर्शनाचे अनुसरण करतो. 48 आमच्याकडे असा संदेश प्रकट करण्यात आला आहे की, (मृत्यूनंतरच्या जीवनात) त्या व्यक्तीवर शिक्षेची आपत्ती कोसळेल, जो (अल्लाहकडून आलेल्या सत्याला) खोटे ठरवितो आणि त्याकडे पाठ फिरवितो.'

49 (जेव्हा इजिप्तचा राजा, फिरऔन यास अल्लाहचा संदेश सुनावण्यात आला तेव्हा,) तो म्हणाला, 'तुम्हा दोघांचा पालनकर्ता कोण आहे, हे मूसा!' 50 मूसा ने उत्तर दिले, 'आमचा पालनकर्ता तो आहे, ज्याने (अस्तित्वात असलेल्या) प्रत्येक वस्तूस त्याचा आकार दिला, मग प्रत्येकाला मार्गदर्शन केले.' 51 (त्यावर) फिरऔन म्हणाला, 'मग यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांचे काय होणार?' 52 मूसाने उत्तर दिले, 'त्याचे ज्ञान केवळ माझ्या पालनकर्त्याला आहे, त्याच्या हुकूमनाम्यात (सर्व गोष्टी) नमूद करून ठेवलेल्या आहेत.माझा पालनकर्ता ना कधी चूक करतो,ना कधी त्याला विसर पडतो (असा आहे माझा पालनकर्ता!).'

53 तोच आहे (अल्लाह!) ज्याने पृथ्वीला तुमच्यासाठी बिछाना बनवले (म्हणजे असे स्थान बनविले जिथे मानवी समाज विकास पावू शकतो) आणि त्यावर तुम्हाला (संचार करण्यासाठी) मार्ग बनविणे शक्य केले. तसेच (तोच) आकाशातून

(ढगांद्वारे) पाणी वर्षितो. आणि त्याद्वारे आम्ही विविध प्रकारचे वनस्पती निर्माण करतो. 54 तर त्यातून तुम्ही खा आणि आपल्या गुराढोरांना चारा. खरोखर, यामध्ये बुद्धी बाळगणाऱ्या लोकांसाठी संदेश असलेल्या खुणा आहेत. 55 (लोकांनो!) याच मातीद्वारे आम्ही तुम्हाला निर्माण केले आणि तिच्यातच आम्ही तुम्हाला परतवू आणि तिच्यातूनच आम्ही तुम्हाला पुन्हा एकदा बाहेर काढू.

56 आम्ही फिरऔनला आमच्या सर्व संदेश प्रकट करणाऱ्या खुणा दाखविल्या, पण त्याने त्यांना खोटे ठरविले आणि त्यावर विश्वास ठेवण्यास नकार दिला. 57 तो म्हणाला, 'हे मूसा! तू आमच्याकडे यासाठी आला आहेस का की, आपल्या जादूच्या (प्रभावाने) आम्हाला आमच्या देशाबाहेर घालवून द्यावे? 58 तर आम्हीही तुझ्या जादूचा सामना करण्यासाठी असाच जादू घेऊन येऊ. तर तू तुझ्या आणि आमच्यामध्ये एक वेळ (व ठिकाण) निश्चित करून टाक, आम्ही त्याच्या उलट काही करणार नाही आणि तूही करू नये. आणि हा सामना एका खुल्या मैदानात असेल.'

59 मूसाने (त्यावर) उत्तर दिले, 'सामन्याचा दिवस उत्सवाचा दिवस असेल आणि तिथे दिवस चढल्यावर लोकांना एकत्रित करण्यात यावे.' 60 तेव्हा (आपल्या सल्लागारांसमवेत) फिरऔन तिथून निघून गेला आणि आपल्या रणनीतीची आखणी केली, मग तो सामन्यासाठी परत आला. 61 मूसाने (फिरऔन व जमलेल्या सर्व लोकांना उद्देशून) म्हटले, 'बरबाद व्हाल तुम्ही! अल्लाहविषयी खोट्या गोष्टी रचू नका, अन्यथा तो एखादी आपत्ती (पाठवून)तुम्हाला गारद करून टाकेल. कारण जो (अल्लाहविषयी) खोट्या गोष्टी रचेल, त्याचा विनाश अटळ आहे.'

62 मग (तिथे जमा झालेले जादूगार) आपसात आपण काय करायचे म्हणून वादविवाद व कुजबुज करू लागले. 63 मग ते (एकमेकांना) म्हणाले, 'निश्चितपणे हे

दोघे जादूगार आहेत आणि आपल्या जादूच्या प्रभावाने तुम्हाला तुमच्या देशाबाहेर घालवून देऊ इच्छितात. तसेच तुमच्या सर्वश्रेष्ठ परंपरांचा नायनाट करू इच्छितात. 64 म्हणून तुम्ही (हे इजिप्तच्या जादूगारांनो!) आपल्या सर्व डावपेचांची आखणी करा. मग योजनाबद्ध रीतीने समोर या. आज जो कोणी वर्चस्व प्राप्त करेल, तोच सफल ठरेल.'

65 (जादूगार) म्हणाले, 'हे मूसा! (जे तुला फेकायचे आहे), तू प्रथम फेकशील की, आम्ही प्रथम फेकावे?' 66 मूसाने उत्तर दिले, 'तुम्हीच प्रथम फेका', तेव्हा पाहतो तर काय, त्यांच्या दोऱ्या आणि काठ्या त्यांच्या जादूच्या प्रभावाने त्याला वेगाने धावत असल्याच्या दिसू लागल्या. 67 तेव्हा मूसाला आपल्या मनात भीती जाणवली. 68 पण आम्ही म्हणालो, 'भिऊ नकोस, कारण तूच वरचढ ठरणार आहेस.' 69 (आता) जे तुझ्या उजव्या हातात आहे ते खाली टाकून दे, ते यांनी जे काही (थोतांड) रचले आहे, सर्व गिळंकृत करून टाकील. यांनी जे काही केले आहे ती केवळ जादूगाराची चलाखी आहे. जादूगार कधीही यशस्वी होऊ शकत नाही. मग तो कोणत्याही मार्गाने येवो. 70 (अल्लाहने सांगितल्याप्रमाणे घडले) तेव्हा जादूगार (लगेच) (अल्लाहसमोर) नतमस्तक झाले. ते म्हणाले, 'आम्ही हारून आणि मूसा यांच्या पालनकर्त्यावर श्रद्धा धारण करीत आहोत.'

71 (हे पाहून) फिरऔन म्हणाला, 'मी परवानगी देण्यापूर्वीच तुम्ही त्याच्यावर श्रद्धा धारण केली आहे? नक्कीच तो (म्हणजे मूसा) तुमचा गुरू असणार, ज्याने तुम्हाला जादू शिकविली असणार, पण मी आता तुमचे हात व पाय विरुद्ध बाजूंनी कापून टाकेन आणि मी तुम्हाला खजुरीच्या खोडावर बांधून फाशी देईन. (मी असे यासाठी करेन) की, तुम्हाला कळून चुकेल, आमच्यापैकी कोणाची शिक्षा अधिक कठोर आहे आणि जास्त काळ राहणारी आहे.'

72 त्यांनी (राजाला) उत्तर दिले, 'आम्ही आता तुला सत्याच्या त्या स्पष्ट

प्रमाणांवर प्राधान्य देणार नाही, जे आमच्याकडे आलेले आहेत. तसेच त्या निर्मात्यावर ज्याने आम्हाला निर्माण केले आहे. तेव्हा तुला जे करायचे आहे, ते करून घे. तुझा हुकूम केवळ याच जगातील जीवनात चालू शकतो.
73 आम्ही तर आता आमच्या पालनकर्त्यावर श्रद्धा धारण करणारे बनलो आहोत. (आम्हाला त्याच्याकडून आता) हीच अपेक्षा आहे की, त्याने आमच्याकडून (आत्तापर्यंत घडलेल्या) पापांना माफ करून टाकावे, तसेच त्या जादूटोण्याच्या कृत्यांनाही, जे करण्यासाठी तू आम्हाला भाग पाडलेस (अल्लाहने माफ करून टाकावे). अल्लाह सर्वश्रेष्ठ आहे आणि सदैव (सर्वश्रेष्ठ) असणार आहे.'

74 निश्चितच जो कोणी अपराधी बनून आपल्या पालनकर्त्यासमोर हजर होईल तर त्याच्यासाठी नरक आहे. ज्यात तो मरणारही नाही आणि जिवंतही राहणार नाही (म्हणजे गुदमरवून सोडणाऱ्या अवस्थेत तो कायमस्वरूपी राहील).
75 जो कोणी आपल्या पालनकर्त्याकडे श्रद्धावंत बनून हजर होईल, ज्याने सत्कर्मेही केलेली असतील तर (मृत्यूनंतरच्या जीवनात) अशांसाठी उच्च दर्जाचे स्थान आहेत.
76 त्यांच्यासाठी सदैव राहण्याच्या बागा आहेत. ज्यातून पाण्याचे (मन प्रसन्न करणारे) पाट वाहत असतील. ते त्यात कायम वास्तव्य करतील. हा आहे मोबदला त्यांच्यासाठी जे (आत्मिकदृष्ट्या) स्वत:ला स्वच्छ व शुद्ध बनवतील.

77 (एक वेळ आली) तेव्हा आम्ही मूसाकडे असा संदेश पाठवला की, रात्रीच्या वेळी माझ्या भक्तांना घेऊन निघ. त्यांच्यासाठी (आमच्या कृपेने) समुद्रात कोरडा मार्ग बनव. तू ना (शत्रूद्वारे) पाठलाग होण्याचे भय बाळग, ना (समुद्रात बुडण्याची) भिती बाळग.
78 मग फिरऔनने आपल्या सैन्यासह त्यांचा पाठलाग केला. तेव्हा ते समुद्राच्या पाण्यात सर्व बाजूंनी वेढले गेले, जसे होणे अटळ होते.
79 कारण फिरऔनने आपल्या लोकांना मार्गभ्रष्ट केले, त्याने त्यांना सन्मार्ग दाखविला नाही.

80 हे इस्राईलच्या मुलांनो! (अशाप्रकारे) आम्ही तुम्हाला तुमच्या शत्रूपासून

मुक्ती दिली आणि आम्ही सिनाई पर्वताच्या उजव्या बाजूस तुम्हाला एक वचन दिले (म्हणजे तुमची तिथे हजेरीची वेळ निश्चित केली, जिथे तौरात हा ग्रंथ प्रदान केला गेला). तसेच तुमच्यासाठी मन्न व सलवा अवतीर्ण केले (तुमच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था म्हणून). 81 'आम्ही उपलब्ध केलेल्या स्वच्छ व शुद्ध वस्तू खा, पण मर्यादांचे उल्लंघन करू नका, अन्यथा तुम्ही माझ्या प्रकोपाला स्वत:वर ओढवून घ्याल.' (आम्ही म्हणालो), 'ज्याच्यावर माझा प्रकोप कोसळला तो पूर्णपणे गारद झाला. 82 पण मी अशा लोकांच्या बाबतीत फार क्षमाशील आहे, जे (भूतकाळातील चुकांविषयी) पश्चात्ताप करतात आणि श्रद्धा धारण करून सत्कर्मे करतात आणि अढळपणे सन्मार्गावर कायम राहतात.'

83 (जेव्हा मूसा पर्वताकडे पोहोचला तेव्हा अल्लाहने विचारले), 'हे मूसा, आपल्या लोकांना मागे सोडून इतक्या घाईने इथे येण्यास तुला कोणत्या गोष्टीने प्रेरित केले?' 84 मूसाने उत्तर दिले, 'ते माझ्या मागे येतच आहेत, आणि हे प्रभू, मी तुझ्याकडे यासाठी घाईघाईने आलो की, तू माझ्यावर प्रसन्न व्हावे.' 85 पण अल्लाहने म्हटले, 'तुझ्या अनुपस्थितीत आम्ही तुझ्या लोकांची परीक्षा घेतली, तेव्हा सामरी (या व्यक्तीने) त्यांना मार्गभ्रष्ट करून टाकले.'

86 मग मूसा संतापाने आणि दु:खी मनाने आपल्या लोकांकडे परतला. तो म्हणाला, 'माझ्या बांधवांनो! तुमच्या पालनकर्त्याने तुमच्याशी चांगला वायदा केला नव्हता का? माझ्या अनुपस्थितीचा तुमच्यावर दीर्घ काळ लोटला की काय? किंवा तुमच्या पालनकर्त्याचा प्रकोप तुमच्यावर प्रकट व्हावा, असे तुम्हाला वाटत होते की काय? का म्हणून, तुम्ही मला दिलेल्या आपल्या वचनाचा भंग केलात?'

87 त्यांनी उत्तर दिले, 'आम्ही तुला दिलेले वचन स्वेच्छेने मोडलेले नाही. तर (घडले ते असे की, इजिप्तहून येताना फिरऔनच्या) लोकांचे दागदागिन्यांचे ओझे आमच्यावर लादण्यात आलेले होते. आता सामरीच्या सांगण्यावरून आम्ही

ते (अग्नीत) टाकले. अशाचप्रकारे सामरीनेही (आपल्याकडील काही दागिने) टाकले.' 88 त्याने त्यांच्यासाठी (वितळलेल्या सोन्यापासून) एक अशी वासराची अशाप्रकारे प्रतिमा तयार केली (की, जर त्यातून वारा गेल्यास गाईच्या) हंबरण्यासारखा आवाज यावा. मग ते (एकमेकांना) म्हणू लागले, 'हा आहे तुमचा उपास्य आणि मूसाचा उपास्यदेखील, पण तो याला विसरून बसला.' 89 त्यांना हे दिसत नव्हते का की, तो त्यांना कोणत्याही प्रकारे प्रतिसाद देऊ शकत नव्हता, तसेच कोणत्याही प्रकारे नफा किंवा नुकसान पोहोचविण्याचे त्याला सामर्थ्य प्राप्त नव्हते?

90 हारूनने (मूसाच्या अनुपस्थितीत) त्यांना आधीच म्हटले होते, माझ्या बांधवांनो! या वासराद्वारे केवळ तुमची परीक्षा घेतली जात आहे. तुमचा पालनकर्ता तर कृपावंत (अल्लाह) आहे. तर माझे अनुसरण करा आणि माझ्या आज्ञेचे पालन करा. 91 पण त्यांनी उत्तर दिले, 'मूसा आमच्याकडे परत येईपर्यंत आम्ही याचीच उपासना करीत राहू.'

92 (मूसा परत आल्यानंतर) हारूनला म्हणाला, 'हे हारून, जेव्हा तू पाहत होतास की, ते बहकले आहेत, तेव्हा तू गप्प का राहिलास?' 93 (कोणत्या गोष्टीने तुला) माझे अनुसरण करण्यापासून परावृत्त केले. तू माझी अवज्ञा (जाणूनबुजून) केली आहेस की काय? 94 हारूनने उत्तर दिले, 'हे माझ्या आईच्या पुत्रा, माझी दाढी व माझ्या डोक्याचे केस धरून (माझी झडती घेऊ नकोस). या विचाराने मला सतावले की, तू (परत येऊन मला), म्हणशील की, तू बनी इस्राईलमध्ये फूट पाडली आहेस आणि माझ्या शब्दांचा आदर ठेवला नाहीस.'

95 (मग मूसा सामरीकडे वळला, जो लोकांना बहकविणारा अट्टल गुन्हेगार होता) म्हणाला, 'हे सामरी, तुझं काय चाललंय?' 96 त्याने उत्तर दिले, 'मला ती गोष्ट जाणवली जी इतरांना जाणवली नाही. तर मी स्वर्गदूताला (जाताना

पाहिले) आणि त्याच्या पाऊलखुणांपासून एक मूठ माती घेतली आणि ती या (वासरात) टाकून दिली. माझ्या अंत:करणाने मला असेच करण्यास प्रेरित केले.' 97 मूसाने म्हटले, 'येथून चालता हो आणि लक्षात ठेव, आता (या) जीवनात तुला ही (शिक्षा) आहे की, तू आयुष्यभर (लोकांना असे म्हणत फिरशील) की, 'मला कोणी स्पर्श करू नका.' तसेच (मृत्यूनंतरच्या जीवनात) तुझ्याबाबतीत अशा (शिक्षेचे) एक वचन आहे, ज्यातून तुझी कदापि सुटका नाही, तू (आता) तुझ्या या उपास्याकडे बघ, ज्याची तू फार निष्ठेने उपासना करायचा, आम्ही त्याला जाळून टाकणार आणि त्याची (राख) समुद्रात विखुरून टाकणार. 98 लोकांनो! तुमचा उपास्य केवळ अल्लाह आहे, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच उपासनेयोग्य नाही. त्याच्या ज्ञानाने सर्वांना वेढून ठेवलेले आहे.'

99 (पैगंबर!) अशाप्रकारे आम्ही तुम्हाला भूतकालीन घटनांचा वृत्तांत ऐकवितो आहोत. तसेच आम्ही तुम्हाला आमच्याकडून (या कुराणाच्या) रूपाने एक स्मरणिका प्रदान केली आहे. 100 जो कोणी याकडे पाठ फिरवील, तो न्यायाच्या दिवशी निश्चितपणे फार मोठे ओझे उचलील. 101 असे लोक त्याच स्थितीत सदैव राहतील आणि न्यायाच्या दिवशी हे ओझे त्यांच्यासाठी भयंकर दु:खदायी ठरेल. 102 ज्या दिवशी शिंग फुंकले जाईल, त्या दिवशी अपराध्यांना आम्ही अशा अवस्थेत गोळा करू की, त्यांचे डोळे दहशतीमुळे निळे पडलेले असतील. 103 (मृत्यूनंतरच्या चिरस्थायी जीवनाचे सत्य जेव्हा समोर येईल तेव्हा) ते एकमेकांशी हळू आवाजात म्हणत असतील की, तुम्ही फार तर दहा दिवस (पृथ्वीवर) जीवन व्यतीत केले असाल. 104 (पण) ते काय म्हणणार आहेत हे, आम्ही चांगल्याप्रकारे जाणतो. त्यांच्यात जो सर्वात जास्त जपून अंदाज लावणारा असेल तो म्हणेल की, नाही, तुम्ही जगात केवळ एक दिवस घालविले असणार.

105 (पैगंबर!) लोक तुम्हाला विचारतात की, (पुनरुत्थानाच्या दिवशी) या पर्वतांचे काय होणार? त्यांना सांगा, (जेव्हा या जगाचा अंत होईल) माझा

पालनकर्ता, त्यांना धुळीप्रमाणे विखुरून टाकेल [106] पृथ्वीला सपाट मैदान बनवून टाकेल. [107] त्यात तुम्हाला ना खाचखळगा दिसेल ना उंचवटा. [108] त्या दिवशी सर्वजण इकडे–तिकडे अजिबात न जाता पुकारणाऱ्याच्या मागे सरळ जातील. तेव्हा सर्व आवाज कृपावंत (अल्लाह) समोर अगदी स्तब्ध झालेले असतील. पावलांच्या मंद आवाजाशिवाय दुसरे काही ऐकू येणार नाही.

[109] त्या दिवशी शिफारस कोणाच्याही कामी येणार नाही. पण फक्त (ती व्यक्ती बोलू शकेल) जिला कृपावंत अल्लाहने बोलण्याची परवानगी दिली असेल व ज्याचे बोलणे तो पसंत करेल (अशालाच परवानगी असेल, कारण अल्लाहला चांगले माहीत आहे की, परवानगी दिल्यानंतर कोण काय बोलणार). [110] तो प्रत्येकाच्या मागच्या–पुढच्या (खुल्या व छुप्या) सर्व गोष्टींना चांगले जाणतो. पण ते (लोक) आपल्या ज्ञानाने त्याच्या ज्ञानाला कदापि वेढा घालू शकत नाहीत. [111] (त्या दिवशी) सर्व चेहरे निरंतर–जिवंत व आत्मनिर्भर असलेल्या सर्वशक्तिमान अल्लाहसमोर नमलेली असतील. तेव्हा अशी व्यक्ती नाश पावेल, जी पापकृत्यांचे ओझे आपल्यासोबत घेऊन येईल. [112] ज्याने सत्कर्मे केलेली असतील, तसेच तो श्रद्धावंतही असेल तर त्यास कोणत्याही प्रकारे अन्याय किंवा हानी पोचण्याचे भय असणार नाही.

[113] अशाप्रकारे आम्ही अरबी भाषेत हे कुराण अवतीर्ण केले आहे. यात सर्व प्रकारे सावधानतेचा इशारा दिलेला आहे. हे या हेतूने की, लोकांनी आमची जाण ठेवावी, किंवा याद्वारे त्यांच्या मनात नव्याने विचार जागृत व्हावे. [114] तर सर्वश्रेष्ठ आहे अल्लाह, खराखुरा जगत्पालक (जगदीश)! (पैगंबर!) तुम्ही कुराणाचे प्रकटीकरण पूर्ण होण्यापूर्वीच ते घेण्याच्या बाबतीत घाई करू नका. तुम्ही (अल्लाहकडे या शब्दांत) प्रार्थना करा, ‘हे माझ्या पालनकर्त्या, माझ्या ज्ञानात वृद्धी कर!’

[115] आम्ही आदमशी यापूर्वी प्रतिज्ञा घेतली होती, पण तो विसरला आणि

आम्हाला त्याच्यात मनाचा ठामपणा आढळला नाही. 116 जेव्हा आम्ही स्वर्गदूतांना म्हणालो, 'आदमसमोर नतमस्तक व्हा, ते सर्व नतमस्तक झाले, पण फक्त इब्लीस शिवाय. त्याने तसे करण्यास नकार दिला.' 117 तेव्हा आम्ही म्हणालो, 'हे आदम, यात मुळीच शंका नाही की, सैतान (इबलीस) तुझा आणि तुझ्या पत्नीचा शत्रू आहे. तर असे होता कामा नये की, तो तुम्हा दोघांना स्वर्गातून घालवून देण्यास कारणीभूत ठरतोय. (तसे झाल्यास) तुम्हाला वंचित जीवन जगावे लागेल.'

118 इथे (स्वर्गात) तुमच्यासाठी अशी व्यवस्था आहे की, तुम्ही ना उपाशी राहाल, ना नग्न अवस्थेत राहाल. 119 तसेच (इथे) ना तहान लागेल, ना उन्हाचा त्रास होईल. 120 पण सैतानाने त्यास बहकाविले. तो (त्याला) म्हणाला, 'हे आदम, मी तुला अमरत्वाचे झाड दाखवू का, तसेच असे राज्य जे कधी विनाश पावणार नाही?' 121 मग त्या दोघांनी त्या वृक्षाचे फळ खाल्ले, तेव्हा त्यांना, त्यांच्या नग्न अवस्थेची जाणीव झाली. तेव्हा ते दोघे स्वर्गातील (झाडांची पाने घेऊन) आपल्या लज्जास्थानांना झाकू लागले. अशाप्रकारे आदमने आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेचे पालन केले नाही, परिणामतः तो (सन्मार्गापासून) भरकटला. 122 नंतर त्याच्या पालनकर्त्याने त्याच्यावर (पुन्हा) आपली कृपा केली, त्याच्या पश्चात्तापाचा स्वीकार केला आणि त्याला (पुढील) मार्गदर्शन प्रदान केले.

123 अल्लाहने म्हटले, 'आता तुम्ही दोघे (म्हणजे मानव आणि सैतान) येथून (स्वर्गातून) खाली उतरा. तुम्ही एकमेकांचे शत्रू असाल.' मग जेव्हा माझ्याकडून तुमच्याकडे मार्गदर्शन येईल, तेव्हा जो कोणी माझे मार्गदर्शन अनुसरेल, तो ना (सन्मार्गापासून) भरकटेल, ना (माझ्या कृपेपासून) वंचित होईल. 124 मग जो कोणी माझ्या उपदेशांकडे पाठ फिरवील, त्याचे दुःखाने भरलेले जीवन असेल आणि न्यायाच्या दिवशी आम्ही त्याला आंधळा असलेल्या

अवस्थेत उठवू. 125 तो म्हणेल, हे माझ्या पालनकर्त्या! तू मला आंधळा (बनवून) का उठवलेस? (जगात) तर मला दृष्टी लाभलेली होती. 126 अल्लाह म्हणेल, 'अगदी तसेच (आम्ही तुझ्याबाबतीत केले आहे), जेव्हा तुझ्यासमोर आमच्या संदेश असलेल्या खुणा आल्या होत्या तेव्हा तू त्यांच्याकडे दुर्लक्ष केले. म्हणून आज तशाच प्रकारे तुझी उपेक्षा करण्यात येईल.' 127 अशा प्रकारे आम्ही मर्यादांचे उल्लंघन करणाऱ्याला मोबदला देत असतो, जो आपल्या पालनकर्त्याच्या संदेशावर विश्वास ठेवत नाही. मृत्युपश्चात जीवनातील शिक्षा तर फार कठोर आहे व चिरस्थायी आहे.

128 लोकांना यापासून बोध प्राप्त होत नाही का की, त्यांच्यापूर्वी आम्ही कित्येक पिढ्यांना नष्ट करून टाकले आहे. त्यांच्या वस्त्यांतून हे स्वत: चालत-फिरत असतात. खरोखर यात बुद्धी लाभलेल्या लोकांसाठी बोध असलेल्या खुणा आहेत. 129 जर तुझ्या पालनकर्त्याद्वारे एक गोष्ट (म्हणजे न्यायाच्या दिवसाची वेळ) आधीपासून ठरलेली नसती, तसेच एका मुदतीपर्यंत (अपराध्यांनाही) उसंत देण्याचे ठरलेले नसते तर (अपराधी लोकांना) तात्काळ शिक्षा दिली गेली असती. 130 म्हणून (पैगंबर!) हे (सत्य नाकारणारे लोक) जे काही म्हणत आहेत, ते संयमपूर्वक सहन करा आणि आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीसह त्याच्या महतीचे वर्णन करा, सूर्य उगवण्यापूर्वी आणि तो मावळण्यापूर्वी आणि रात्रीच्या वेळीही त्याचे स्तुतिगान करा. तसेच दिवसाच्या प्रारंभी आणि समाप्तीच्या वेळीही, म्हणजे तुम्हाला (आत्मिक) आनंद लाभेल. 131 आणि या जगातील (ऐश्वर्याच्या) साधनसंपत्तीकडे (अभिलाषापूर्वक) कदापि नजरा वळवू नका, जी आम्ही त्यांच्यापैकी काहींना केवळ त्यांची परीक्षा घेण्यासाठी, देऊन ठेवली आहे. आणि (मृत्युपश्चात जगात) तुझ्या पालनकर्त्याकडून दिली जाणारी जीवनसामग्री श्रेष्ठ आणि चिरस्थायी आहे. 132 आपल्या लोकांना नमाज़ पढण्याची आज्ञा करा आणि (स्वत:देखील) नित्य नमाज़ पढा. (तसेच लक्षात ठेवा)

आम्ही (आमच्यासाठी) तुमच्याकडे कोणत्याही उपजीविकेची मागणी करीत नाही. कारण उपजीविका तर आम्हीच तुम्हाला प्रदान करतो आणि सर्वश्रेष्ठ परिणाम, अल्लाहची जाण ठेवून जगणाऱ्यांसाठीच आहे.

133 आणि ते लोक म्हणतात (जे सत्याच्या बाबतीत, अगदी आंधळे बनलेले आहेत हा पैगंबर) आपल्या पालनकर्त्याकडून आमच्यासाठी एखादी चमत्कारिक निशाणी का घेऊन येत नाही? त्यांना यापूर्वीच्या ग्रंथाद्वारे पुरेसे पुरावे पोचले नाहीत का?

134 आम्ही जर यांना यापूर्वीच एखाद्या आपत्तीद्वारे नष्ट करून टाकले असते, तेव्हा ते (न्यायाच्या दिवशी) असे म्हणाले असते, हे आमच्या पालनकर्त्या! तू आमच्याकडे पैगंबराला का पाठविले नाहीस, म्हणजे आम्ही अशाप्रकारे अपमानित व बेअब्रू होण्यापूर्वीच तुझ्या संदेशांचे अनुसरण केले असते. 135
सांगा की, प्रत्येकजण प्रतीक्षा करीत आहे, तर तुम्ही देखील प्रतीक्षा करा. (न्यायाच्या दिवशी) तुम्हाला कळून जाईल की, ते कोण-कोण आहेत ज्यांनी सन्मार्गाचे अनुसरण केले आहे आणि कोणाला मार्गदर्शन प्राप्त झाले आहे.

# सूरह-२१. अल-अंबिया

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 लोकांच्या हिशेबाची घटका जवळ येऊन ठेपलेली आहे, तरीसुद्धा त्यांनी तिच्या (आगमनाविषयी) फारच बेफिकिरीची भूमिका घेतलेली आहे. 2 त्यांच्याकडे जेव्हाही त्यांच्या पालनकर्त्याकडून स्मरण करून देणारा नवीन उपदेश येतो, (तेव्हा त्यांचा त्यास प्रतिसाद असा असतो की), त्याची खिल्ली उडवीत ते, तो (उपदेश) ऐकतात. 3 त्यांची मने गाफील आहेत. दुराचारी लोक आपसात कुजबुज करताना म्हणतात, '(मुहम्मद) तर तुमच्यासारखाच एक माणूस आहे, मग तुम्ही हे उघड्या डोळ्यांनी पाहत असताना याच्या जादूला बळी पडणार की

काय?' [4] (पैगंबरने) त्यांना म्हटले, 'माझा पालनकर्ता प्रत्येक गोष्टीस जाणतो, मग ती आकाशात असो वा जमिनीवर. तोच आहे सर्व काही ऐकणारा, सर्व काही जाणणारा.'

[5] काहीजण म्हणतात, '(जे काही मुहम्मद सादर करीत आहे) ते अन्य काही नसून संदिग्ध स्वप्ने आहेत.' तर इतर काहीजण म्हणतात, 'त्याने ते स्वत:च रचले असणार.' तर आणखीन काही म्हणतात, '(खरेतर) तो एक कवी आहे.'

'त्याने आमच्याकडे तसा चमत्कार आणून सादर करायला हवा, जसे चमत्कार देऊन आधीचे पैगंबर पाठविले गेले होते.' [6] यांच्यापूर्वीच्या ज्या वस्त्यांना आम्ही नष्ट केले, त्यांनी तर (निशाण्या पाहूनही) आपल्या पैगंबरांवर विश्वास ठेवला नव्हता, तर आता हे श्रद्धावंत बनण्यास (जास्त इच्छुक) आहेत का?

[7] (पैगंबर!) तुमच्यापूर्वीही ज्या कोणाला आम्ही पैगंबर बनवून पाठविले, तर तीही (तुमच्यासारखीच) माणसे होती. ज्यांच्याकडे आम्ही (आमचे) संदेश प्रकट केले होते. तुम्हाला या गोष्टीचे ज्ञान नसेल तर आधीच्या ग्रंथांना अनुसरणाऱ्या लोकांपैकी कोणालाही विचारा. [8] आम्ही पैगंबरांना असे शरीर दिले नव्हते की, त्यांना अन्नाची गरज नव्हती. तसेच ते काही नेहमी जिवंत राहणारे नव्हते. [9] शेवटी, आम्ही त्यांच्याशी (म्हणजे पैगंबरांशी) केलेला वायदा पूर्ण केला. तेव्हा आम्ही त्यांना आणि त्यांच्यासोबत ज्यांना इच्छिले त्यांना वाचवले. मग आम्ही मर्यादांचे उल्लंघन करणाऱ्यांना नष्ट करून टाकले.

[10] (लोकांनो!) आम्ही तुमच्याकडे आता असा ग्रंथ पाठविलेला आहे, ज्यात अशा गोष्टी आहेत, ज्या तुम्ही (नेहमी) लक्षात ठेवणे आवश्यक आहे. मग काय? तुम्ही बुद्धीचा उपयोग करणार नाही? [11] अत्याचारी लोकांच्या कित्येक वस्त्या (होत्या), ज्यांना आम्ही नष्ट करून टाकले आहे. मग त्यांच्या

जागी दुसऱ्या लोकांना उभे केले. 12 (प्रत्येक वेळेस असे घडले) की, जेव्हा
त्यांनी आमची शिक्षा त्यांच्याकडे येताना पाहिले, ते त्यापासून पळायला लागले.
13 तेव्हा त्यांना सांगितले गेले, 'पळून जाण्याचा प्रयत्न करू नका, तर परत
या, त्या तुमच्या सुख–चैनीच्या साधनसामग्रीकडे (ज्यांनी तुम्हाला पूर्णपणे
आत्मिक दृष्ट्या नासवून सोडले आहे) आणि आपल्या घरांकडे परत या —
(ज्यांत तुम्ही ऐश्वर्याचे जीवन जगत होता), म्हणजे (तुम्ही जे काही केले आहे)
त्याविषयी तुम्हाला जाब विचारला जाईल.' 14 ते म्हणू लागले, 'बरबाद झालो
आम्ही! खरोखर, आम्हीच अत्याचारी होतो.' 15 तर ते तोपर्यंत असाच विलाप
करीत राहिले, जोपर्यंत आम्ही त्यांना असे करून टाकले की, ते कापून
टाकलेल्या शेतीप्रमाणे आहेत. तर काही जळून भस्मसात झाल्यानंतर उरलेल्या
राखेप्रमाणे.

16 (हे जाणून घ्या की), आम्ही आकाश आणि पृथ्वी आणि त्यांच्यादरम्यान
जे काही आहे ते सर्व, खेळ म्हणून निर्माण केलेले नाही. (तर ही गंभीर
उद्देशासहित केलेली निर्मिती आहे).

17 जर आम्हाला खेळ करण्यासाठी काही बनवायचे असते तर आम्ही ते,
आमच्याकडे जे काही आहे त्यातूनच काही बनवून टाकले असते, जर आम्हाला
तसे करायचे असते तर. 18 तसे मुळीच नाही, आम्ही असत्यावर सत्याला
फेकून मारू, तेव्हा सत्य असत्याला चिरडून टाकेल मग असत्य नाश पावेल.
(लोकांनो!) तुमच्यासाठी ही विनाशाची गोष्ट आहे की, तुम्ही (आमच्या विषयी
खोट्या गोष्टी) रचण्याचे प्रयत्न करता.

19 आकाशात आणि पृथ्वीवर जे कोणी आहेत, सर्व त्याचेच आहेत. तसेच
जे त्याच्याजवळ आहेत (म्हणजे स्वर्गदूत) ते त्याची उपासना करण्याच्या
बाबतीत ना कधी अहंकाराचे प्रदर्शन करतात, ना कधी कंटाळा करतात. 20 ते
(निरंतर) न थकता रात्रंदिवस त्याच्या महतीचे गान करीत असतात.

21 काही लोकांनी माती (दगड, धातू इ.) पासून जे उपास्य बनविले आहेत ते मेलेल्यांना जिवंत करू शकतात का? 22 आकाश आणि पृथ्वीवर (म्हणजे समस्त विश्वात) अल्लाहशिवाय अन्य उपास्य असते, तर (विश्वात सर्वत्र अराजकता पसरली असती आणि) आकाश आणि पृथ्वी दोन्ही (केव्हाच) नाश पावले असते. 'अल्लाह', 'सर्वोच्च सिंहासनाचा स्वामी', तो त्या गोष्टींपासून फार श्रेष्ठतम आहे, ज्या गोष्टींचा संबंध हे लोक त्याच्याशी जोडतात. 23 तो जे काही करतो, त्याविषयी त्याला कोणीही काही विचारू शकत नाही. पण लोक जे करतील त्याविषयी त्यांना जाब विचारण्यात येईल.

24 त्यांनी (अल्लाहला) सोडून दुसरे उपास्य बनविले आहेत का? त्यांना सांगा, 'ज्या गोष्टीचा तुम्ही दावा करीत आहात, त्यासाठी पुरावा सादर करा.' ही शिकवण आहे त्यांच्यासाठी जे माझ्यासोबत आहेत आणि हीच शिकवण माझ्या पूर्वीच्या लोकांसाठीही होती. पण त्यांच्यापैकी बहुतेकांना सत्याची जाणीवच नाही. कारण (सत्य गंभीरतापूर्वक जाणण्याची त्यांची इच्छाही नाही) ते त्याकडे पाठ फिरवीत आहेत. 25 आम्ही तुमच्यापूर्वी पाठवलेल्या सर्व पैगंबरांना याच संदेशासह पाठविले होते की, माझ्याशिवाय दुसरा कोणीच उपासनेयोग्य नाही, म्हणून केवळ माझीच उपासना करा.

26 तरीदेखील काहीजण म्हणतात, 'कृपावंत (अल्लाहने) स्वत:साठी पुत्र बनविला आहे! असीम महिमावान आहे तो! (ज्यांना हे लोक अल्लाहचे अपत्य मानतात) ते तर त्याचे सन्माननीय सेवक आहेत. 27 तो बोलण्याआधी, ते (स्वत:हून) बोलत नाही आणि ते अगदी तेच करतात ज्याची तो त्यांना आज्ञा करतो. 28 अल्लाह जाणतो जे त्यांच्यासमोर उघड आहे आणि ते, जे त्यांच्यापासून लपलेले आहे. तसेच ते त्याच्या परवानगीशिवाय कोणासाठीही मध्यस्थी करीत नाहीत. ते त्याच्याप्रति (म्हणजेच अल्लाहप्रति) सदैव आदरयुक्त भय बाळगून असतात. 29 त्यांच्यापैकी जो कोणी असे म्हणेल की, त्याच्याशिवाय मी एक

'उपास्य' आहे, तर त्यास आम्ही नरकाची शिक्षा देऊ. (कारण) आम्ही अत्याचाऱ्यांना असाच मोबदला देत असतो.

30 सत्य नाकारणाऱ्या लोकांना या गोष्टीची जाणीव नाही का की, पृथ्वी आणि आकाश आधी एकमेकाला घट्ट चिकटलेल्या गोळ्याप्रमाणे होते. मग आम्ही त्यांना एकमेकांपासून अलग केले.

आम्ही प्रत्येक सजीवाला पाण्यापासून निर्माण केले. (या सर्व अर्थपूर्ण खुणा आपल्या डोळ्यांनी पाहून देखील) ते श्रद्धा धारण करणार नाहीत का?

31 (त्यांना याची जाणीव नाही की,) आम्ही पृथ्वीवर मजबूत पर्वतांना स्थापित केले आहे, ते यासाठी की, ती, त्यांना घेऊन अस्थिर अवस्थेत राहू नये. तसेच तिच्यावर प्रशस्त मार्ग बनविले, यासाठी की, लोकांना त्यांचा मार्ग सापडावा (म्हणजे लोकांना तिच्यावर संचार करणे शक्य बनविले). 32 आणि आम्ही आकाशाला सुरक्षित छत्राप्रमाणे स्थापित केले. तरीदेखील ते त्याने निर्माण केलेल्या खुणांकडे दुर्लक्ष करीत आहेत. 33 तोच आहे अल्लाह ज्याने रात्र व दिवस आणि सूर्य व चंद्र निर्माण केले. प्रत्येक आपापल्या कक्षेत प्रदक्षिणा घालीत आहेत.

34 (पैगंबर! तुम्हाला नाकारणाऱ्या लोकांना आठवण करून द्या) आम्ही तुमच्यापूर्वी देखील कोणत्याही मनुष्याला चिरकालीन जीवन प्रदान केलेले नाही. मग जर तुम्ही मरणार आहात, तर हे सदैव जिवंत राहणार आहेत की काय? 35 प्रत्येक जिवाला मृत्यूची चव चाखायचीच आहे. आम्ही तुम्हा (सर्वांची) चांगल्या व वाईट (परिस्थितीद्वारे) परीक्षा घेत असतो, (तुमची) पारख करण्यासाठी. मग (शेवटी), तुम्हा सर्वांना आमच्याकडेच परत यायचे आहे.

36 पण जेव्हा सत्य नाकारणारे लोक तुम्हाला पाहतात, तेव्हा ते तुम्हाला केवळ आपल्या उपहासाचे लक्ष्य बनवितात. (ते एकमेकांना) म्हणतात, 'अच्छा! हाच का तो जो आपल्या उपास्यांविषयी (तिरस्कारपूर्वक) बोलतो?' खरे तर

हेच लोक स्वतः कृपावंत (अल्लाहचे) नामस्मरण करण्यास (तिरस्कारपूर्वक) नकार देतात.

37 (मनुष्य असा उतावीळ प्राणी आहे जणू काही) तो उतावीळपणाच्या धातूचाच बनलेला आहे, मी तुम्हाला लवकरच माझ्या संदेश असलेल्या खुणा दाखविणार आहे. पण त्याबाबतीत तुम्ही मला घाई करण्यासाठी सांगू नका. 38 लोक विचारतात, 'तुमचे म्हणणे खरे असेल, तर (आम्हाला सांगा की), या वचनाची पूर्तता केव्हा होईल?' 39 सत्य नाकारण्यावर आग्रही असलेल्या या लोकांना जर त्या वेळेची कल्पना असती, जेव्हा ते नरकाच्या आगीपासून स्वतःचा बचाव ना समोरून करू शकतील, ना मागून (म्हणजे आग त्यांना चहूबाजूंनी वेढून घेईल). तसेच त्यांना तिथे कोणत्याही प्रकारे साहाय्य प्राप्त होणार नाही. 40 निश्चितपणे ती (वेळ) त्यांच्यावर अचानकपणे येईल आणि त्यांची मती गुंग करून सोडील. मग ना ते तिला परतवून लावू शकतील, ना त्यांना कोणत्याही प्रकारे उसंत दिली जाईल. 41 तुमच्या आधीही पैगंबरांना उपहासाचे लक्ष्य बनविण्यात आले. तर त्यांच्यापैकी ज्या लोकांनी खिल्ली उडविली, त्यांना त्या गोष्टीने (म्हणजेच ईश्वरीय शिक्षेने) वेढले, जिची ते खिल्ली उडवीत होते.

42 त्यांना विचारा, 'असा कोण आहे, जो रात्री आणि दिवसा तुम्हाला कृपावंत (अल्लाहपासून) वाचवू शकतो?' (अर्थातच कोणीच नाही). तरीदेखील हे आपल्या पालनकर्त्याच्या स्मरणाकडे पाठ फिरवीत आहेत. 43 ते (खरोखर असा विचार बाळगून) आहेत की काय? की, त्यांच्याकडे इतर उपास्ये आहेत, जे त्यांचे आमच्यापासून रक्षण करू शकतात. (पण वस्तुस्थिती ही आहे की, ती तथाकथित उपास्ये) स्वतःलाच मदत करू शकत नाहीत, ना आमच्याविरुद्ध त्यांची कोणी मदत करू शकतो.

44 (वस्तुस्थिती ही आहे की,) आम्हीच त्यांना व त्यांच्या वाडवडिलांना

या जगात (जीवनावश्यक) चांगल्या गोष्टी प्रदान केल्या. त्यांचा उपभोग ते दीर्घ काळापर्यंत करीत राहिले. पण त्यांना हे दिसत नाही का की, कशाप्रकारे आम्ही जमीनीच्या सीमा चहूबाजूंनी आकुंचित करीत आहोत? तरीही तेच विजयी होण्याची (आशा बाळगून) आहेत का?

45 (लोकांना) सांगा, 'मी केवळ (अल्लाहच्या) संदेशाच्या आधारे तुम्हाला सावधानतेचा इशारा देत आहे.' पण (मनाने) बहिरे झालेल्या लोकांना हा सावधानतेचा इशारा ऐकू येत नाही. जेव्हा तो त्यांना दिला जातो. 46 जर तुमच्या पालनकर्त्याच्या शिक्षेचा हलकासा जरी स्पर्श यांना झाला, तरी ते निश्चितपणे ओरडतील, 'अरे बापरे! आम्ही नष्ट झालो! आम्ही नक्कीच दुराचारी होतो!'

47 आम्ही पुनरुत्थानाच्या दिवशी 'न्यायाचा तराजू' स्थापित करू. ज्यामुळे कोणत्याही जिवावर जरादेखील अन्याय होणार नाही. एखादे (चांगले वा वाईट) कृत्य मोहरीच्या दाण्याइतकेही जरी लहान असेल तरी आम्ही ते समोर आणून हजर करू. आमच्याप्रमाणे हिशेब कोणीही घेऊ शकत नाही.

48 (पैगंबर) मूसा व हारून यांना, आम्ही सत्य व असत्य यातील फरक स्पष्ट करणारी 'कसोटी' प्रदान केली, (म्हणजेच तौरात हा ग्रंथ प्रदान केला), अल्लाहची जाण असणाऱ्या लोकांसाठी, सन्मार्ग दाखवणारा प्रकाश व स्मरणिका म्हणून. 49 जे त्यांचा पालनकर्ता त्यांच्यासाठी अदृश्य असतानादेखील त्याचे भय बाळगून असतात, तसेच ते न्यायाच्या दिवसाचेही भय बाळगून आहेत. 50 (हे कुराण म्हणजे) कृपायुक्त स्मरणिका आहे, जी आम्ही तुमच्याकडे प्रकट केली आहे. मग ही (स्मरणिका) तुम्ही नाकारणार आहात का?

51 यापूर्वी आम्ही इब्राहीमला त्याचे मार्गदर्शन प्रदान केले होते (म्हणजे त्या कसोटीचे ज्ञान दिले होते) आणि आम्ही त्याला चांगले ओळखून होतो. 52 जेव्हा तो आपल्या पित्यास व आपल्या लोकांना म्हणाला, 'या प्रतिमा काय

आहेत, ज्यांच्याबाबतीत तुम्ही इतके निष्ठावंत बनलेले आहात.’ 53 (त्याच्या) लोकांनी उत्तर दिले, ‘आम्ही आमच्या वाडवडिलांना त्यांची पूजा करताना पाहत आलो आहोत.’ 54 इब्राहीमने म्हटले, ‘निःसंदेह, तुम्ही आणि तुमचे वाडवडील धडधडीत चुकीचा मार्ग अंगीकारलेले आहात.’

55 ते म्हणाले, ‘तू आमच्याकडे खरोखर ‘सत्य’ घेऊन आला आहेस की, तू आमच्याशी केवळ थट्टा करीत आहेस?’ 56 इब्राहीमने उत्तर दिले, ‘तुमचा खराखुरा पालनकर्ता तो आहे, जो आकाश आणि पृथ्वी यांचा पालनकर्ता आहे, ज्याने त्यांना निर्माण केले आहे, मी त्या गोष्टीस साक्षी आहे.’ 57 मग (इब्राहीम मनोमनी म्हणाला), ‘अल्लाहची शपथ, मी निश्चितपणे तुमच्या (या खोट्यानाट्या) उपास्यांविरुद्ध एक योजना आखेन, जेव्हा तुम्ही (येथून) पाठ फिरवून निघून जाल.’ 58 (ते तिथून गेल्यानंतर) त्याने त्या सर्वांचे तुकडे-तुकडे करून टाकले. पण जो त्यांच्यात सर्वात मोठा (उपास्य होता, त्याच्या मूर्तीला) त्याने तसेच कायम ठेवले, ते यासाठी की, ते (घडलेल्या घटनेबद्दल विचारपूस करण्यासाठी) त्याच्याकडे येऊ शकतील.

59 (जेव्हा त्यांनी जे घडले होते ते पाहिल्यानंतर) म्हणू लागले, ‘आमच्या उपास्यांची ही अवस्था कोणी केली असणार? अर्थातच, तो फार मोठा अत्याचारी असला पाहिजे.’ 60 (त्यांच्यापैकी) काहीजण म्हणाले, ‘आम्ही एका तरुणाला या उपास्यांविषयी बोलताना ऐकले आहे, ज्याचे नाव इब्राहीम आहे.’ 61 (इतर काहीजण) म्हणाले, ‘तर मग त्याला सर्व लोकांसमोर घेऊन या, म्हणजे सर्वांना पाहता येईल (त्याचे काय म्हणणे आहे).’ 62 (मग जेव्हा तो आला,) त्यांनी विचारले, ‘इब्राहीम, तूच का तो, ज्याने आमच्या उपास्यांची ही अवस्था केली आहे?’ 63 त्याने उत्तर दिले, ‘नाही, यांच्यापैकी जो मोठा (उपास्य) आहे, यानेच हे केलेले असणार, ते बोलू शकत असतील तर त्यांनाच विचारून घ्या.’

64 (हे ऐकून) ते एकमेकाकडे पाहून म्हणू लागले, ‘खरेतर तुम्हीच

चुकीच्या मार्गावर आहात'
65 मग आपली माने खाली वाकवून म्हणाले, 'हे इब्राहीम, तुला तर चांगल्याप्रकारे माहीत आहे की, हे बोलू शकत नाहीत.' 66 इब्राहीमने म्हटले, 'मग तुम्ही अल्लाहला सोडून अशांची उपासना करता का, जे ना तुम्हाला कोणत्याही प्रकारे लाभ पोचवू शकतात, ना हानी? 67 धिक्कार असो तुमचा आणि त्यांचा, ज्यांची तुम्ही अल्लाहला सोडून उपासना करता, तुम्ही (लोक) बुद्धीचा वापर करत नाही का?'

68 ते म्हणाले, 'जर तुम्हाला काही करावयाचे असेल, तर या (मनुष्यास) जाळून टाका आणि आपल्या उपास्यांची मदत करा.' 69 (तेव्हा) आम्ही म्हणालो, 'हे अग्नी, तू इब्राहीमसाठी थंड हो आणि त्याच्यासाठी सुरक्षा कवच बन.'

70 त्यांनी तर त्याला इजा पोचविण्यासाठी त्याच्याविरुद्ध (दुष्ट योजना) आखली होती, पण आम्ही त्यांच्या (योजनेला) निष्फळ करून टाकले.

71 आम्ही त्याला आणि (त्याचा पुतण्या) लूत यास तिथून वाचवून अशा भूभागाकडे (आणले) ज्याला आम्ही (येणाऱ्या सर्व काळांसाठी) आमच्या (विशेष) कृपेने लोकांसाठी समृद्ध करून टाकलेले आहे.

72 आम्ही त्याला (पुत्राच्या रूपाने) इसहाक़ आणि पुढे नातवाच्या रूपाने याकूब प्रदान केले. तसेच आम्ही त्या सर्वांना सदाचारी बनवले. 73 आम्ही त्यांना (लोकांचे) पुढारी बनविले, जे आमच्या आदेशानुरूप लोकांना मार्गदर्शन करीत असत. आम्ही त्यांना (आमच्या) संदेशाद्वारे सत्कृत्ये करण्याची, नित्य नमाज़ पढण्याची आणि दानकार्य करण्याची आज्ञा केली होती. ते (खऱ्या अर्थाने) केवळ आमचीच उपासना करणारे होते.

74 आम्ही लूतलाही विवेकशक्ती व ज्ञान प्रदान केल होते. तसेच त्याला अशा लोकांच्या वस्तीपासून मुक्तता दिली, जी फारच घृणास्पद कृत्ये करीत

होती. (शेवटी आम्ही त्यांना नष्ट करून टाकले कारण) ते खरोखरच फार वाईट व दुष्ट लोक होते. 75 मग आम्ही त्याला (म्हणजेच पैगंबर लूतला) आमच्या कृपाछत्राखाली घेतले, खरोखर, तो फार सदाचारी लोकांपैकी एक होता.

76 (ती वेळ आठवा की, इब्राहीम व लूतच्या आधी पैगंबर) नूहने आम्हाला हाक दिली. तेव्हा आम्ही त्याच्या (हाकेला) प्रतिसाद दिला आणि त्याला व त्याच्या कुटुंबीयांना (कशाप्रकारे) फार मोठ्या संकटातून वाचविले. 77 तसेच (कशाप्रकारे) आम्ही त्याची त्या लोकांच्या विरुद्ध मदत केली, ज्यांनी आमच्या संदेशांना खोटे ठरविले. खरोखर, ते फार दुष्ट लोक होते. मग (शेवटी) आम्ही त्या सर्वांना बुडवून टाकले.

78 दाऊद व सुलेमान (या पैगंबरांचीही आठवण करा) जेव्हा ते दोघे त्या शेतासंबंधाने निवाडा करू लागले होते, ज्या शेतात काही लोकांची मेंढरे रात्रीच्या समयी सुटून जाऊन पडली होती. ते (कशाप्रकारे निवाडा करीत आहेत हे) आम्ही पाहत होतो. 79 आम्ही सुलेमानला त्या घटनेविषयी योग्य समज दिली होती, तसेच आम्ही त्या दोघांनाही निर्णयशक्ती व ज्ञान दिलेले होते. दाऊदचे तर (अल्लाहप्रति स्तुतिगान एवढे जबरदस्त होते की,) आम्ही पर्वतांना व पक्ष्यांनाही त्याच्याबरोबर स्तुतिगान करायला लावले. कारण आम्ही (सर्व काही) करण्यास समर्थ आहोत. 80 तसेच आम्ही त्याला चिलखत बनवण्याची कला शिकवली, ते यासाठी की, त्याद्वारे लढायांमध्ये तुम्हाला सुरक्षा लाभावी. तर मग तुम्ही (या अनुग्रहाविषयी अल्लाहचे) आभार व्यक्त करणारे बनाल का?

81 आम्ही तुफानी वारा सुलेमानच्या अधीन केलेला होता. तो त्याच्या आज्ञेने त्या भूभागाकडे वाहत असे, जो आमच्या (विशेष) कृपेने समृद्ध झालेला आहे. कारण आम्हालाच सर्व गोष्टींचे ज्ञान आहे. 82 तसेच जिन्नांपैकी काहींना आम्ही त्याच्या अधीन केले होते. जे त्याच्यासाठी समुद्रात बुड्या मारीत असत व याशिवाय इतर बरीच कामे ते करीत असत. आणि आम्ही त्यांच्यावर नजर ठेवून

होतो.
83 तसेच (पैगंबर) अय्यूबचीही (आठवण करा) जेव्हा त्याने आपल्या
पालनकर्त्याला हाक दिली (म्हणाला), 'मी (फार मोठ्या) आजाराने ग्रस्त
झालेलो आहे. आणि तू कृपा करणाऱ्यांमध्ये सर्वाधिक कृपा करणारा आहेस.'
84 तेव्हा आम्ही त्याच्या प्रार्थनेला प्रतिसाद दिला आणि त्याचा जो त्रास होता,
तो दूर केला. तसेच आम्ही त्याच्यासाठी त्याच्या कुटुंबाला पुन्हा पूर्वपदावर
आणले. त्याचबरोबर त्यात तितकीच आणखी वाढ केली, आमच्याकडून कृपा
म्हणून. तसेच आमची उपासना करणाऱ्यांसाठी बोध म्हणून.
85 इस्माईल, इदरीस व ज़ुलकिफ्ल (या पैगंबरांनाचीही) आठवण करा, हे
सर्व सहनशीलता बाळगणारे (माझे भक्त) होते.
86 आम्ही त्यांना आपल्या कृपाछत्रात घेतले होते, खरोखर, ते सत्कृत्ये
करणाऱ्यांपैकी होते.
87 आणि देवमाशाने ज्याला गिळून घेतले होते त्या (पैगंबर यूनुसची
आठवण करा), जेव्हा तो आपल्या लोकांशी क्रोधीत होऊन त्यांच्यापासून
निघून गेला. त्याला वाटले होते की, (याविषयी) त्याची आमच्याकडून पकड
केली जाणार नाही. मग (त्याला आपल्या चुकीची जाणीव झाली) त्याने त्या
अंधकारातून आम्हाला हाक दिली. '(हे अल्लाह!) तुझ्याशिवाय कोणीच पूजनीय
नाही, असीम आहे तुझी महिमा, खरोखर मीच अत्याचारी कृत्य केले आहे!'
88 तेव्हा आम्ही त्याची प्रार्थना ऐकली आणि त्याची दुःखातून मुक्तता केली.
अशाचप्रकारे आम्ही सच्च्या श्रद्धावंतांना वाचवीत असतो.
89 तसेच (पैगंबर) ज़करियाचीही आठवण करा, जेव्हा त्याने आपल्या
पालनकर्त्याला हाक दिली, 'हे माझ्या पालनकर्त्या! तू मला अपत्यहीन ठेवू
नकोस, पण (जरी तू मला अपत्यहीन ठेवलेस तरी मला हे चांगले माहीत आहे
की), तूच एकमेव खराखुरा वारस असशील, (जेव्हा सर्व काही संपून जाईल).'

90 तेव्हा आम्ही त्याच्या प्रार्थनेला स्वीकृती दिली आणि त्याला यहया (हे पुत्र)
प्रदान केले. त्यासाठी त्याच्या पत्नीला (मूल) जन्म देण्यायोग्य बनविले. हे
(आमचे भक्त) सत्कर्मे करण्याच्या बाबतीत चढाओढ करीत असत आणि
आम्हाला आशा व भय बाळगून पुकारीत असत. ते आमच्याप्रति नेहमी नम्रभाव
बाळगून असत.
91 आणि तिचीही (म्हणजे मरियमची आठवण करा) जिने आपल्या चारित्र्याचे
रक्षण केले होते. म्हणून आम्ही तिच्यात आपला आत्मा फुंकला आणि समस्त
लोकांसाठी तिला आणि तिच्या पुत्राला (आमच्या कृपेची) निशाणी बनविली.
92 (माझ्यावर श्रद्धा ठेवणाऱ्यांनो!) तुमचा हा समूह एकच समूह आहे
आणि मी आहे तुम्हा सर्वांचा पालनकर्ता, तर केवळ माझीच उपासना करा.
93 पण लोकांनी (धर्माच्या बाबतीत आपसात मतभेद करून) त्या (एकसंघीय
समूहाचे) तुकडे-तुकडे करून टाकले. पण (शेवटी) सर्वांना आमच्याकडेच
परत यायचे आहे (याचा त्यांना विसर पडला). 94 तर जो कोणी सत्कर्मे करील
व तो श्रद्धावंतही असेल तर त्याच्या प्रयत्नांची उपेक्षा केली जाणार नाही. आम्ही
त्यांची नोंद करून घेत असतो.
95 आणि ज्या वस्त्यांना आम्ही नष्ट करून टाकले आहे, ते (असे लोक
होते) ज्यांचे परत येणे कदापि शक्य नव्हते. 96 येथपर्यंत की, जेव्हा याजूज व
माजूज यांना मोकळे सोडण्यात येईल आणि ते प्रत्येक उंचावरून (पृथ्वीवर)
पसरून जातील. 97 (न्यायाच्या दिवसाचा) सच्चा वायदा तेव्हा अगदी जवळ
येऊन ठेपलेला असेल. (आणि मग जेव्हा न्यायाचा दिवस उजळेल,) तेव्हा
सत्य नाकारण्यावर आग्रही राहिलेल्या लोकांचे डोळे भयाने विस्फारलेल्या
अवस्थेतच राहतील. (ते उद्गारतील) अरे बापरे! आम्ही बरबाद झालो! आम्ही
या दिवसापासून पूर्णपणे गफलतीत होतो. खरंच! आम्ही अत्याचारी होतो.
98 (तेव्हा त्यांना सांगितले जाईल) तुम्ही आणि ते ज्यांची तुम्ही अल्लाहशिवाय

उपासना करीत असत, सर्व (आज) नरकाचे इंधन बनणार आहात आणि तिथे जाणे आता तुमचे अटळ नशीब आहे. 99 हे जर खरोखर उपास्य असते, तर त्यात (म्हणजे नरकात) त्यांना जावे लागले नसते. ते सर्व त्यात कायम वास्तव्य करतील. 100 तिथे आक्रोश करीत राहणे त्यांचे नशीब असेल. (या आक्रोशाव्यतिरिक्त) ते तिथे (दुसरे) काहीही ऐकू शकणार नाहीत. 101 पण ज्यांना आमच्याकडून आधीच चांगल्या मोबदल्याचे वचन देण्यात आले होते, अशांना नरकापासून (पूर्णपणे) दूर ठेवण्यात येईल. 102 (ते त्यापासून इतके सुरक्षित असतील की,) त्यांना याची जरादेखील चाहूल लागणार नाही. ते त्यांना हव्या असलेल्या सुखामध्ये सदैव राहतील. 103 (न्यायाच्या दिवसाच्या) भयावहतेने ते दुःखी होणार नाहीत. स्वर्गदूत त्यांचा स्वागत करतील, म्हणतील, हा आहे तुमच्या (खऱ्या यशाचा) दिवस, ज्याचे वचन तुम्हाला दिले गेले होते.

104 त्या दिवशी आम्ही आकाशांना गुंडाळून टाकू, ज्याप्रमाणे लेखपट गुंडाळले जाते. ज्याप्रमाणे आम्ही निर्मितीचा प्रारंभ केला होता, त्याचप्रमाणे आम्ही त्याची पुनरावृत्ती करू. आमच्यावर बंधनकारक असे हे एक वचन आहे आणि त्या वचनाची पूर्तता आम्ही करणारच. 105 (पैगंबर दाऊदला प्रदान केलेल्या) 'ज़बूर' या ग्रंथातही (मानवाला आवश्यक) ती ताकीद देऊन आम्ही हे लिहून ठेवलेले आहे की, (शेवटी, स्वर्ग) भूमीचे वारस माझे सदाचारी भक्तच होणार. 106 यात त्यांच्यासाठी फार महत्त्वाचा संदेश आहे, जे खऱ्या अर्थाने अल्लाहची उपासना करणारे आहेत, (सच्चे भक्त आहेत).

107 (पैगंबर!) आम्ही तुम्हाला समस्त मानवजातीसाठी कृपेच्या रूपाने पाठवले आहे (म्हणजे पैगंबराद्वारे मानवजातीसाठी आमच्या कृपेचे व मार्गदर्शनाचे दार उघडले आहे).108 त्यांना सांगा, 'माझ्याकडे असा संदेश प्रकट करण्यात आला आहे की, तुमचा उपास्य केवळ अल्लाह आहे, मग तुम्ही त्याचे आज्ञाधारक बनणार ना!' 109 पण जर त्यांनी (या संदेशाकडे) पाठ दाखवली तर (त्यांना)

सांगून टाका, 'मी तुम्हा सर्वांना स्पष्टरित्या सावधानतेचा इशारा देऊन टाकलेला आहे आणि मला माहीत नाही की, ती गोष्ट (म्हणजे ते अरिष्ट) जिचे तुम्हाला वचन दिले जात आहे, जवळ आहे की, दूर. 110 नि:संदेह, तुम्ही जे उघडपणे बोलता, तो त्या गोष्टीस अगदी तसेच जाणतो, जसे तुम्ही जे लपवता (त्या गोष्टीस जाणतो). 111 पण (जिथपर्यंत माझा संबंध आहे) मी जाणत नाही की, (अल्लाहच्या निर्णयात हा उशीर) तुमच्या परीक्षेसाठी आहे की, काही काळ आणखी सु:ख उपभोगण्याची संधी आहे.' 112 पैगंबराने (लोकांचा दुराग्रह पाहून शेवटी) प्रार्थना केली, 'हे माझ्या पालनकर्त्या! सत्य कसोटीनुसार फैसला करून टाक, आणि आमचा पालनकर्ता (खरोखर) कृपावंत आहे, आणि (ईश-निंदेच्या) ज्या गोष्टी तुम्ही लोक बोलता त्याविषयी त्याच्याकडेच आम्ही साहाय्याची याचना करतो.'

# सूरह-२२. अल-हज

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 मानवा! आपल्या पालनकर्त्याची जाण ठेवून (जीवन व्यतीत कर). कारण क़यामतीचा भूकंप फारच भयंकर घटना आहे. 2 त्या दिवशी तुम्ही पाहाल, बाळाला दूध पाजणारी प्रत्येक माता, आपल्या दूधपित्या बाळाला पूर्णपणे विसरून जाईल. प्रत्येक गर्भवती स्त्रीचे गर्भपात होऊन जाईल. तेव्हा सर्व लोक (एवढे भयग्रस्त असतील की), तुम्हाला नशेच्या अवस्थेत असल्याप्रमाणे दिसतील. पण वस्तुत: ते नशेच्या अवस्थेत नसतील. कारण अल्लाहची शिक्षा आहेच अशी भयानक.

3 लोकांमध्ये काही असेही आहेत, जे कुठल्याही (वास्तविक) ज्ञानाच्या आधाराशिवाय अल्लाहविषयी वादविवाद करतात. आणि ते प्रत्येक विद्रोही सैतानाचे अनुसरण करीत असतात. 4 ज्याच्याविषयी हे (अल्लाहकडून) विधिलिखित आहे की, जो कोणी त्याच्याशी (म्हणजे सैतानाशी) मैत्री करेल तर तो त्यास

सन्मार्गापासून दूर नेऊन नरकाच्या मार्गावर आणून सोडेल.

5 लोकांनो! पुनरुत्थानाच्या (सत्याविषयी) जर तुम्हाला शंका वाटत असेल तर लक्षात ठेवा आम्ही तुमच्यापैकी प्रत्येकाला, सुरुवातीला मातीपासून (म्हणजे मातीतील घटकांपासून) निर्माण केले. मग वीर्याच्या एका बिंदूपासून, नंतर गोठलेल्या रक्तापासून, मग गर्भातील मांसाच्या गोळ्यापासून, जो काही अंशी आकारयुक्त व काही अंशी आकार नसलेल्या अवस्थेत असतो. (अशा विविध अवस्थेतून नेऊन तुमची निर्मिती) यासाठी केली की, तुम्हाला (आमच्या सामर्थ्याची) जाणीव व्हावी. तर आम्ही ज्यास (जन्म देऊ इच्छितो) त्यास एका निर्धारित अवधीपर्यंत (मातेच्या) गर्भाशयात राहू देतो. मग तुम्हाला बाळाच्या रूपात बाहेर आणतो. (व जगण्याची संधी प्रदान करतो) यासाठी की, (तुमच्यापैकी काहींना) परिपक्वतेच्या वयापर्यंत पोहोचता यावे. मग तुमच्यापैकी काही (याआधीच) मृत्यू पावतात आणि काही वार्धक्याची शेवटची पातळी गाठतात, तेव्हा त्याची अवस्था अशी होते, एकेकाळी जी गोष्ट ते चांगल्याप्रकारे जाणायचे, पण या वार्धक्याच्या अवस्थेत त्यांना काही उमजत नाही. तसेच तुम्ही पाहता जमीन कोरडी आणि निर्जीव असते, पण जेव्हा तिच्यावर आम्ही पाण्याचा वर्षाव करतो, ती (अचानकपणे) सचेत होऊन फुलू लागते मग (ती) सर्व प्रकारचे नयनरम्य वनस्पती (नर व मादी अशा) जोडीच्या स्वरूपात उगविते. (हे मानवा! हे सर्व प्रात्यक्षिकाच्या स्वरूपात उघड असतानाही, तुला पुनरुत्थानाविषयी शंका वाटते?) 6 हे सर्व यासाठी (घडते) कारण अल्लाह अंतिम सत्य आहे. तोच मृतांना जिवंत करीत असतो. त्याला प्रत्येक गोष्टीवर (पूर्ण) नियंत्रण प्राप्त आहे. 7 (हे मानवा, लक्षात ठेव) कयामत येणार, यात मुळीच शंका नाही, तेव्हा अल्लाह त्यांनाही अवश्य उठवून उभे करेल, जे कबरींमध्ये आहेत (म्हणजे सर्व मेलेल्यांना).

8 लोकांमध्ये काही असेही आहेत, जे कोणत्याही ज्ञानाच्या किंवा

मार्गदर्शनाच्या किंवा दिव्य ग्रंथाच्या आधाराविना अल्लाहविषयी वादविवाद करतात. 9 अहंकाराचे प्रदर्शन करीत ते (सत्याकडे) पाठ फिरवितात, या उद्देशाने की, इतरांनाही अल्लाहच्या मार्गापासून दूर नेता यावे. अशा (माणसा)साठी या जगात अवहेलना आहे आणि अंतिम फैसल्याच्या दिवशी आम्ही त्यास आगीच्या शिक्षेची चव चाखवू. 10 (तेव्हा त्यांना सांगितलं जाईल,) ‘हा आहे मोबदला तुमच्या हातांनी केलेल्या दुष्कृत्यांचा! कारण अल्लाह आपल्या भक्तांवर कधीही अन्याय करीत नाही.’

11 लोकांमध्ये कोणी असाही आहे, जो (श्रद्धेच्या बाबतीत) अगदी कडेवर राहून अल्लाहची उपासना करीत असतो (म्हणजे दृढ श्रद्धा न ठेवता). त्याचे असे आहे, जर काही फायदा झाला तर तो अल्लाहशी संतुष्ट असतो, पण जर त्याची अग्निपरीक्षा घेण्यात आली की, तो पूर्णपणे पाठ फिरवितो. अशी व्यक्ती या जगातही आणि मृत्यूनंतरच्या जगातही अपयशी ठरणारी आहे. खरोखर हे अतुलनीय असे नुकसान आहे.

12 (अशा प्रकारे) तो अल्लाहला सोडून, अशा वस्तूचा धावा करतो जी ना त्याला नुकसान पोचवू शकते, ना फायदा. ही खरोखर पराकोटीची पथभ्रष्टता आहे. 13 (आणि कधी तर) तो अशा (माणसाचाच) धावा करतो, ज्याच्याकडून फायद्यापेक्षा नुकसान पोचण्याचीच जास्त शक्यता असते. किती वाईट असा साहाय्यकर्ता व किती वाईट असा सोबती! 14 निश्चितच, ज्यांनी श्रद्धा धारण केलेली असेल आणि सत्कर्मे केलेली असतील, अशांना अल्लाह अशा बागांत दाखल करेल, ज्यातून पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह वाहत असतील. अल्लाह ते करतो, जे तो इच्छितो.

15 जो कोणी असा विचार करीत असेल की, अल्लाह त्याला (म्हणजे त्याच्या पैगंबराला) या जगात आणि मृत्यूनंतरच्या जगात साहाय्य करणार नाही. तर त्याने आकाशापर्यंत एक दोर ताणावे आणि मग त्यास कापून टाकावे व

पाहावे की, त्याची ही युक्ती त्याचा क्रोध दूर करणारी ठरू शकते का? 16
अशाप्रकारे आम्ही हे कुराण स्पष्ट प्रमाणावर आधारित संदेशांच्या रूपाने पाठविले आहे. आणि अल्लाह इच्छितो त्यास मार्गदर्शन करतो (म्हणजेच जो मार्गदर्शन प्राप्त करू इच्छितो त्यालाच तो मार्गदर्शन करतो.).

17 यात मुळीच शंका नाही की, न्यायाच्या दिवशी अल्लाह या सर्वांदरम्यान आपला फैसला सुनावेल, ज्यांनी (या अल्लाहच्या ग्रंथावर) श्रद्धा धारण केली, ते लोक (म्हणजेच मुसलमान) व ज्यू व साबी व ख्रिस्ती व मजूस आणि ते लोक ज्यांनी इतरांना अल्लाहच्या बरोबरीचे स्थान दिले (म्हणजेच अनेकेश्वरवादी). कारण अल्लाह खचितच प्रत्येक गोष्टीवर साक्षी आहे.

18 तुम्हाला या गोष्टीची जाणीव नाही का की, जे काही आकाशात आहे आणि जे काही पृथ्वीवर आहे, ते सर्व अल्लाहसमोर नतमस्तक असतात (म्हणजे अल्लाहच्या आज्ञेत अढळपणे बांधलेले असतात). तसेच सूर्य, चंद्र व तारे आणि पर्वत, वृक्ष, पशू आणि लोकांपैकी अनेक (हे सर्व त्याला नमन करीत असतात). पण (लोकांपैकी) बरेच असेही आहेत जे शिक्षेस पात्र ठरलेले आहेत. ज्याला अल्लाह अपमानित करतो, त्यास कोणीही सन्मान देऊ शकत नाही. निश्चितच अल्लाह करतो, जे तो इच्छितो.

19 हे दोन परस्पर विरोधी पक्ष आहेत (श्रद्धावंत आणि श्रद्धाहीन), जे आपल्या पालनकर्त्याविषयी झगडतात. तर ज्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला (मृत्यूनंतरच्या जीवनात) त्यांच्यासाठी आगीचे कपडे असतील आणि त्यांच्या डोक्यावर उकळते पाणी ओतले जाईल. 20 ज्यामुळे त्यांच्या पोटांत जे काही आहे व त्यांची कातडी गळून पडेल. 21 (त्यांना शिक्षा देण्यासाठी) तिथे लोखंडी हातोडे असतील. 22 जेव्हा जेव्हा ते त्या नरकाच्या (भयंकर) दु:खातून स्वत:ची सुटका करून घेण्याचा प्रयत्न करतील, तेव्हा तेव्हा त्यांना त्यातच पुन्हा लोटून देण्यात येईल. तेव्हा (त्यांना सांगितले जाईल) ‘चाखत राहा

जळण्याच्या शिक्षेची चव' (कायमस्वरूपी).

23 याउलट ज्यांनी श्रद्धा धारण केलेली असेल आणि सत्कर्मे केलेली असतील, तर अल्लाह त्यांना अशा बागांत प्रविष्ट करेल, ज्यातून पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह वाहत असतील. तेथे त्यांना सोन्याची कडी आणि मोत्यांचे दागिने घालण्यात येतील. तसेच तिथे ते रेशमी कपडे परिधान करतील. 24 कारण त्यांना शुद्ध वाणीचा मार्ग दाखवण्यात आला होता. तसेच त्यांना सर्व स्तुतीस पात्र असलेल्या अल्लाहचा मार्ग दाखविण्यात आला होता.

25 पण ज्या लोकांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला, ते लोकांना अल्लाहच्या मार्गापासून व पवित्र मशीदीत जाण्यापासून रोखतात. जिला आम्ही सर्व लोकांसाठी बनविले आहे. जिथे स्थानिक व बाहेरून येणारे सर्व समान आहेत. तर जो कोणी पापकृत्यांद्वारे त्याचे पावित्र्य भंग करण्याचे प्रयत्न करेल, त्यास आम्ही दुःखदायी शिक्षेची चव चाखवू.

26 जेव्हा आम्ही इब्राहीमला काबागृहासाठी जागा निश्चित करून दिली. (आम्ही त्याला म्हणालो), 'कोणालाही माझ्या समकक्ष ठरवू नकोस आणि माझ्या घराला (काबाची) प्रदक्षिणा घालणाऱ्यांसाठी स्वच्छ ठेव. तसेच (नमाज़ामध्ये माझ्यासमोर) उभे राहणाऱ्यांसाठी व जे नमन करतात व नतमस्तक होतात त्या लोकांसाठी.'

27 (पैगंबर!) लोकांसमोर 'हज' चा (ईश्वरीय) आदेश जाहीर करून टाका, ते तुमच्याकडे (म्हणजेच काबागृहाकडे) पायी चालून येतील, तसेच (वेगाने प्रवास करण्याचे साधन ठरणाऱ्या सर्व प्रकारच्या) दुबळ्या उंटांवर स्वार होऊन येतील, (पृथ्वीच्या) कानाकोपऱ्यातून. 28 (हा हजचा आदेश यासाठी आहे कारण) त्यांना (आध्यात्मिक) फायद्याचा अनुभव व्हावा, तसेच त्या ठरावीक दिवसांत, प्राण्यांचा बळी देताना (वगैरे) अल्लाहच्या नावाचे स्तुतिगान करावे, जे (प्राणी)त्यानेच त्यांना प्रदान केले आहे. तर त्यातून खा व पीडितांना

तसेच गरजवंतांनाही खाऊ घाला. 29 हजसाठी आलेल्या लोकांसाठी हे आवश्यक आहे की, त्यांनी (मनाने) स्वत:ला स्वच्छ व शुद्ध करून घ्यावे आणि आपले नवस (वगैरे) पूर्ण करावे आणि त्यांनी (पुन्हा एकदा) त्या (एकेश्वरवादाचे) प्राचीन (केंद्र असलेल्या) काबागृहाची परिक्रमा करावी.

30 ही आहे अल्लाहची आज्ञा. आता जो कोणी अल्लाहने निर्धारित केलेल्या पवित्र गोष्टींचा आदर करेल, तर तसे करणे त्याच्या पालनकर्त्याच्या नजरेत, त्याच्या स्वत:साठी चांगले आहे. सर्व प्रकारची गुरेढोरे (प्राणी) तुमच्यासाठी (बळी देण्यासाठी व सेवन करण्यासाठी) वैध ठरवण्यात आली आहेत, पण यास अपवाद फक्त ते प्राणी आहेत, ज्यांचे स्पष्ट वर्णन तुमच्यासमोर आधीच करण्यात आलेले आहे. तर तुम्ही त्यापासून दूर राहा (जे-जे अल्लाहने प्रतिबंधित ठरवलेले आहे, आणि सर्वात जास्त दूर राहा) मूर्तिपूजेच्या अशुद्ध व (अवास्तविक) कृत्यापासून, तसेच प्रत्येक खोट्या गोष्टीपासून स्वत:ला दूर ठेवा.

31 स्वत:ला (तुमचा निर्माता व पालनकर्ता असलेल्या) अल्लाहला (पूर्ण निष्ठेने) समर्पित करून टाका. (आणि प्रत्येक खोट्या गोष्टीपासून स्वत:ला दूर ठेवा), जे गुण खास (अल्लाहचेच) आहेत, त्यांचा संबंध त्याच्याशिवाय इतरांशी अजिबात जोडू नका. कारण जो कोणी इतरांना अल्लाहच्या बरोबरीचे स्थान देतो, त्याचे उदाहरण असे आहे की, तो आकाशातून खाली कोसळला आणि पक्षी त्यास उचलून नेतात किंवा वारा त्याला दूरच्या ठिकाणी नेऊन फेकतो.

32 हे (लक्षात ठेवणे आवश्यक) आहे की, जो कोणी अल्लाहने स्थापित केलेल्या संकेतचिन्हांचा आदर करेल, त्याद्वारे त्याच्या मनात (अल्लाहप्रति जो) भाव आहे तो व्यक्त होणार. 33 तुम्ही एका निर्धारित अवधीपर्यंत त्या प्राण्यांपासून लाभान्वित होऊ शकता. मग त्यांना प्राचीन असलेल्या काबागृहाजवळ नेऊन, त्यांचे बलिदान द्यायचे असेल.

34 आम्ही प्रत्येक (श्रद्धावंत) जनसमूहासाठी (आमच्या उपासनेचेच एक

कृत्य म्हणून प्राण्याचे) बळी देणे निर्धारित केलेले आहे. म्हणजे त्यांनी (त्या प्राण्यांपासून लाभान्वित होताना) अल्लाहचे स्तुतिगान करावे, कारण आम्हीच ते त्यांना प्रदान केलेले आहेत. तर (नेहमी हे लक्षात ठेवा) की, तुमचा ईश्वर केवळ एकच ईश्वर आहे. तर तुम्ही त्यालाच समर्पित व्हा. (पैगंबर!) विनम्रतापूर्वक वर्तन करणाऱ्यांना शुभवार्ता द्या. [35] जेव्हा अल्लाहचे नामस्मरण केले जाते, तेव्हा (त्यांची अवस्था अशी होते की, आदरयुक्त) भयाने त्यांची हृदये कंपित होतात. जी विपत्ती त्यांच्यावर येते, ती संयमपूर्वक ते सहन करतात, तसेच नियमितपणे नमाज़ पढतात आणि जे काही आम्ही त्यांना दिले आहे, त्यातून (अल्लाहच्या कार्यासाठी) खर्च करतात.

[36] बळी दिल्या जाणाऱ्या उंटांना आम्ही, तुमच्यासाठी अल्लाहच्या निशाण्यांपैकी ठरविले आहे. त्यांच्यात तुमच्यासाठी अनेक फायदे आहेत. तर बळी देण्यासाठी जेव्हा तुम्ही त्यांना रांगेत उभे कराल, अल्लाहचे स्तुतिगान करा. मग जेव्हा ते (बळी दिल्यानंतर मरून) खाली पडतील, तेव्हा त्यातून खा, तसेच न मागणाऱ्या गरजवंतांना आणि मागणाऱ्या गरजवंतांना खाऊ घाला. अशाप्रकारे आम्ही या प्राण्यांना तुमच्या अधीन करून टाकले आहे, यासाठी की, तुम्ही (अल्लाहप्रति) आभार व्यक्त करावे. [37] (पण हे लक्षात असू द्या) अल्लाहपर्यंत ना त्यांचा मांस पोहोचतो, ना त्यांचे रक्त, तर अल्लाहप्रति तुमच्या मनात जो भाव आहे, तो त्याला पोहोचतो. अशाप्रकारे अल्लाहने त्यांना यासाठी तुमच्या ताब्यात देऊन टाकले आहे की, तुम्ही त्याने तुम्हाला प्रदान केलेल्या मार्गदर्शनाबद्दल त्याचे स्तुतिगान करावे. पैगंबर! चांगली कृत्ये करणाऱ्यांना शुभवार्ता द्या.

[38] निश्चितच अल्लाह श्रद्धा धारण केलेल्या लोकांचे संरक्षण करेल. याउलट असा कोणीही अल्लाहला मुळीच प्रिय नाही, जो वचनभंग करणारा आणि कृतघ्न आहे. [39] लढण्याची परवानगी त्या लोकांना दिली जात आहे, ज्यांच्यावर (शत्रू पक्षाकडून) आक्रमण होत आहे. (ही परवानगी देण्याचे) कारण असे की, त्यांच्यावर

अत्याचार झालेला आहे. निश्चितच अल्लाह, त्यांची मदत करण्यास पूर्णपणे समर्थ
आहे. 40 त्यांना त्यांच्या घरांतून अन्यायकारकपणे बाहेर घालवण्यात आले, (या
अन्यायी वर्तणुकीचे) एकमेव कारण हेच आहे की, ते म्हणतात, ‘आमचा पालनकर्ता
अल्लाह आहे.’ जर अल्लाहने काही लोकांच्या आक्रमणाला इतरांद्वारे परतवून लावले
नसते, तर प्रार्थनाश्रम, चर्च, सिनेगॉग आणि मशीदी जिथे नेहमी अल्लाहचे नामस्मरण
होते, ती सर्व केव्हाच उध्वस्त झालेली असती. अल्लाह निश्चितच त्याची मदत
करेल, जो त्याच्या कार्यात (सहभागी होऊन) अल्लाहची मदत करेल. निःसंदेह,
अल्लाह सर्वशक्तिमान आहे, सामर्थ्यशाली आहे.

41 हे असे लोक आहेत, जर आम्ही त्यांना भूप्रदेशावर सत्ताधिकार दिला,
तर ते नियमितपणे नमाज़ पढतील आणि ज़कात देतील (म्हणजे दानकार्य
करतील) व (लोकांना) चांगले कार्य करण्याची ताकीद देतील, तसेच वाईट
कृत्य करण्यापासून त्यांना रोखतील. सर्व गोष्टींचे अंतिम फलित तर अल्लाहपाशीच
आहे.

42 (पैगंबर!) तुमच्या शत्रूंनी तुम्हाला खोटे ठरविले, तर (तुम्हाला हे
लक्षात असायला हवे की), त्यांच्या पूर्वी, नूहच्या लोकांनी व आद आणि समूद
(या जमातींनी आपापल्या काळातील पैगंबरांना) खोटेच ठरविले आहे. 43
तसेच केले, इब्राहीम आणि लूतच्या लोकांनीही. 44 तसेच मदियनचे निवासी
देखील. तसेच मूसालाही खोटे ठरविण्यात आले. तर (प्रत्येक वेळेस काही
काळ) मी सत्य नाकारणाऱ्या अपराध्यांना उसंत दिली. मग (शेवटी) त्यांना
फैलावर घेतले. तर तुम्ही विचार करू शकता, किती भयंकर होती माझी शिक्षा!

45 कित्येक वस्त्या आम्ही नष्ट करून टाकलेल्या आहेत, (खरोखर), त्या
पापकृत्यांत बुडालेल्या होत्या. आता त्या सर्व ओसाड अवस्थेत (दफन) आहेत,
त्यांची छते आत कोलमडून पडली. कितीतरी विहिरी ओस पडल्या आणि
कित्येक भव्य महाल उध्वस्त पडलेले आहेत. 46 या लोकांनी भूतलावर प्रवास

करून पाहिले नाही का की, (त्यापासून बोध घेऊन) त्यांची अवस्था अशी व्हायला हवी होती की, त्यांची मने समजू शकली असती आणि त्यांचे कान (बोधपर गोष्ट लक्ष देऊन) ऐकणारे बनले असते. कारण डोळे आंधळे नसतात, पण अंत:करणे आंधळी होऊन जातात, जी माणसांच्या आत असतात.

47 (पैगंबर!) हे लोक तुम्हाला शिक्षेची घाई करण्यास सांगत आहेत, पण अल्लाह आपल्या वचनाच्या विरुद्ध कदापि जाणार नाही. तुमच्या पालनकर्त्याकडे एक दिवस हा तुमच्या गणनेनुसार एक हजार वर्षाइतका आहे. 48 अशा कित्येक वस्त्या होत्या, ज्या पापकृत्यांत बुडालेल्या होत्या, तरीही मी त्यांना काही काळ उसंत दिली होती. पण (शेवटी) मी त्यांना फैलावर घेतले. शेवटी सर्वांना माझ्याकडेच परतून यायचे आहे.

49 (पैगंबर!) लोकांना सांगा, ‘मला केवळ तुम्हाला स्पष्टरित्या सावधानतेचा इशारा देण्यासाठी (अल्लाहकडून पाठविण्यात आलेले) आहे. 50 तर ज्यांनी श्रद्धा धारण केली व सत्कर्मे केली त्यांना (अल्लाहकडून) क्षमाप्राप्ती व सन्मानपूर्वक उपजीविका प्राप्त होणार आहे. 51 उलटपक्षी जे आमच्या संदेशांच्या विरुद्ध जाऊन, त्यांचा उद्देशच विफल करण्यासाठी प्रयत्नरत असतात. तेच नरकवासी आहेत.

52 (पैगंबर!) आम्ही तुमच्यापूर्वी जो कोणता पैगंबर अथवा प्रेषित पाठविला. (प्रत्येकाच्या बाबतीत असे घडले की), जेव्हाही तो (आमच्या पाठविलेल्या संदेशांपैकी) काहीही वाचायचा, तेव्हा सैतान त्यात फेरबदल करायचा (आपल्याकडून काही खोट्या गोष्टी त्यात घुसडायचा) पण अल्लाह त्याने घुसडविलेल्या गोष्टींना हटवीत असतो. मग अल्लाह आपल्या संदेशांना दृढपणे स्पष्ट करून पुन्हा प्रस्थापित करीत असतो. कारण अल्लाह सर्व काही जाणणारा व बुद्धिमान आहे. 53 पण तो सैतानाने घुसडविलेल्या गोष्टींच्या आधारे त्या लोकांची कसोटीही पाहतो, ज्यांच्या मनात विकृती आहे, किंवा ज्यांची मने

कठोर झालेली आहेत. खरोखर अत्याचारी लोक, पापकृत्य करण्याच्या बाबतीत फारच पुढे निघून गेलेले आहेत. 54 आणि (अल्लाह सैतानाने घुसडविलेल्या गोष्टींना) यासाठी (रद्दबातल ठरवीत असतो) की, ज्या लोकांना ज्ञान लाभलेले आहे, त्यांनी हे जाणून घ्यावे की, 'हे सत्य' तुमच्या पालनकर्त्याकडून आलेले आहे. आणि त्यांनी त्यावर दृढतापूर्वक विश्वास बाळगावा आणि त्यांची मने त्याच्यासमोर विनम्र भावाने समर्पित व्हावीत. अल्लाह श्रद्धावंतांना निश्चितपणे सन्मार्ग दाखवीत असतो.

55 उलटपक्षी सत्य नाकारण्यावर आग्रही असलेले लोक, नेहमी त्याबाबतीत शंका घेत राहतील (म्हणजे त्यांची शंका कधी दूर होणार नाही). येथपर्यंत की, त्यांच्यावर अचानक कयामत येऊन जाईल. किंवा एका फारच वाईट दिवसाची शिक्षा त्यांच्यापुढे येईल. 56 त्या दिवशी, संपूर्ण नियंत्रण (वा निर्णयाधिकार उघडपणे) अल्लाहकडेच असेल. तेव्हा तो त्यांच्या दरम्यान फैसला सुनावेल. तर ज्या लोकांनी श्रद्धा धारण केलेली असेल आणि (श्रद्धेनुसार) सत्कर्मे केलेली असतील, तेच लोक ऐश्वर्यसंपन्न अशा स्वर्गात असतील. 57 याउलट जे लोक सत्य नाकारण्यावर आग्रही राहिले आणि आमच्या संदेशांना खोटे ठरविले, अशांसाठी अपमानजनक शिक्षा असेल.

58 ज्या लोकांनी अल्लाहच्या कार्यासाठी आपल्या मातृभूमीचा त्याग केला, मग ते ठार केले गेले किंवा (अल्लाहच्या कार्यात त्यांना नैसर्गिक) मरण आले. अल्लाह त्यांना (अनंतकालीन जीवनात) निश्चितच चांगली उपजीविका प्रदान करेल. अल्लाह सर्वोत्तम उपजीविका प्रदान करू शकतो यात मुळीच शंका नाही.
59 तो त्यांना अशा स्थानी प्रविष्ट करेल, जे त्यांना खरोखर आवडेल. निश्चितच अल्लाह सर्व काही जाणणारा आहे व (फार) उदार आहे.

60 तर असे होणार. आणि (अन्याय वा अत्याचार पीडिताने) बदला घेताना त्याच प्रमाणात बदला घ्यावा, ज्या प्रमाणात त्याच्यावर अत्याचार करण्यात आला

होता. (पण जर बदला घेताना) समोरच्या पक्षावर अन्याय केला जात असेल तर अल्लाह अवश्य त्याला साहाय्य करेल. खरोखर अल्लाह पापक्षालन करणारा व क्षमाशील आहे.

61 हे यासाठी की, अल्लाह (सर्वशक्तिमान आहे जो) रात्रीला दिवसात प्रविष्ट करतो आणि दिवसाला रात्रीत प्रविष्ट करतो. अल्लाह सर्व काही ऐकणारा आणि सर्व काही पाहणारा आहे. 62 ते यासाठी की, अल्लाह सत्य आहे (सत्याचा स्रोत आहे) आणि ते निव्वळ असत्य आहे, ज्यांचा (लोक) अल्लाहला सोडून धावा करतात. निःसंदेह, अल्लाह सर्वोपरी आहे, महान आहे.

63 तुम्ही (चिंतनपूर्वक) पाहत नाही का की, कशाप्रकारे अल्लाह आकाशातून (ढगांद्वारे) पाणी वर्षितो. त्यानंतर धरती हिरवीगार होते. निःसंशय, अल्लाह (त्याच्या बुद्धिमत्तेच्या बाबतीत) अगाध (अथांग) आहे. प्रत्येक गोष्टीचा जाणकार आहे. 64 त्याचेच आहे जे काही आकाशात आहे आणि जे काही पृथ्वीवर आहे. केवळ अल्लाहच आत्मनिर्भर आहे आणि स्तुतीस पात्र आहे.

65 तुम्ही हे (चिंतनपूर्वक) पाहत नाहीत का की, कशाप्रकारे अल्लाहने पृथ्वीवर जे काही आहे त्यास, तुमच्या सेवेत लावून ठेवले आहे. त्या नौकादेखील, ज्या त्याच्या आदेशाने समुद्रात संचार करतात. आणि त्यानेच आकाशातील ग्रह व नक्षत्रांना पृथ्वीवर कोसळण्यापासून रोखून ठेवले आहे. पण फक्त त्याच्या आदेशानेच (ते कोसळू शकतात). खरोखर, अल्लाह लोकांवर दया करणारा व कृपाशील आहे. 66 तोच आहे ज्याने तुम्हाला जीवन प्रदान केले, मग तोच तुम्हाला मृत्यू देईल आणि तोच तुम्हाला पुन्हा जिवंत करेल. खरोखर! मानव फारच कृतघ्न आहे.

67 आम्ही प्रत्येक जनसमूहासाठी उपासनेची एक पद्धत निर्धारित केली होती, जिचे ते पालन करीत असत. तर (आत्ताच्या लोकांनी) या बाबतीत तुमच्याशी वाद घालता कामा नये. (पैगंबर!) तुम्ही लोकांना आपल्या

पालनकर्त्याकडे बोलवा. खरोखर, तुम्ही सन्मार्गावर आहात.
68 पण जर त्यांनी तुमच्याशी (विनाकारण) वादविवाद करण्याचा प्रयत्न केला तर त्यांना सांगून टाका, 'अल्लाहला चांगले माहीत आहे, तुम्ही जे काही करीत आहात.'
69 अल्लाह न्यायाच्या दिवशी तुमच्या दरम्यान फैसला सुनावेल, ज्याविषयी तुम्ही मतभेद करीत आहात.
70 तुम्हाला या गोष्टीचे ज्ञान नाही का की, आकाशात आणि पृथ्वीवर जे काही घडते, ते सर्व त्याला चांगले माहीत आहे. (आणि लक्षात ठेवा) सर्व काही त्याच्या ग्रंथात नोंद करून ठेवलेले आहे. खरोखर हे अल्लाहसाठी सहज शक्य आहे.

71 ते (जे नेहमी त्याच्यावर श्रद्धेचा दावा करतात) अल्लाहला सोडून (इतर तथाकथित शक्तिस्थळांची) उपासना करतात. ज्यांच्याविषयी अल्लाहने कोणतेही प्रमाण पाठविलेले नसतानाही आणि त्यांच्या (हकिगतीचे) कोणतेही ज्ञान नसतानाही (ते त्यांची उपासना करतात). अशा पापी लोकांचा (न्यायाच्या दिवशी) कोणीही साहाय्यकर्ता असणार नाही.
72 जेव्हा त्यांना आमचे स्पष्ट संदेश ऐकविले जातात, तेव्हा सत्य नाकारणाऱ्या लोकांच्या चेहऱ्यांवर अशाप्रकारे तिटकाऱ्याचे भाव पसरल्याचे तुम्हाला जाणवेल, जणू काही ते त्यांना आमचे संदेश ऐकवणाऱ्यांवर हल्लाच बोलून टाकतील. (त्यांना) सांगा, 'मी तुम्हाला त्यापेक्षाही वाईट असलेल्या गोष्टीविषयी सांगू का, (जी तुम्हाला आता वाईट वाटत आहे). ती आहे आग, (मृत्यूनंतरच्या जीवनात) जिचे वचन अल्लाहने सत्य नाकारण्यावर आग्रही असणाऱ्या लोकांना दिलेले आहे, किती भयानक स्थान आहे ते!'

73 लोकांनो! इथे एक उदाहरण प्रस्तुत केले जात आहे, तर ते अत्यंत लक्षपूर्वक ऐका. तुम्ही लोक अल्लाहला सोडून ज्यांचा धावा करता ते एक माशीदेखील निर्माण करू शकत नाहीत, जरी या उद्देशासाठी ते सर्व शक्तीनिशी एकत्र आले तरीदेखील (ते असे करू शकत नाहीत). आणि जर एखाद्या

माशीने त्यांच्यापासून काही हिसकावून घेतले तर ते तिच्यापासून परत मिळवू शकत नाहीत. खरोखर दोघेही किती असहाय आहेत! धावा करणारे आणि ते ज्यांचा धावा केला जात आहे. 74 (जे अशाप्रकारे चुकीच्या मार्गी लागलेले आहेत) त्या लोकांना अल्लाहची खरी जाण नाही जशी की, ती असायला हवी. खरोखर, अल्लाह सर्वशक्तिमान आहे, सर्वांवर नियत्रंण ठेवणारा सामर्थ्यवान आहे.

75 अल्लाह स्वर्गदूतांपैकी आपला संदेशवाहक निवडतो, तसेच माणसांमधून देखील तो (पैगंबर) निवडतो. (लक्षात ठेवा) अल्लाह सर्व काही ऐकणारा आणि सर्व काही पाहणारा आहे. 76 (उलटपक्षी त्यांचे ज्ञान, म्हणजे त्या दूतांचे ज्ञान, तर मर्यादित आहे). तो ते सर्व जाणतो, जे त्यांच्यासमोर उघड आहे आणि तेही जे त्यांच्यापासून अदृश्य आहे. मग सर्व गोष्टी शेवटी त्याच्याकडेच परतणार आहेत.

77 इमान धारण केलेल्या लोकांनो! नमन करा व नतमस्तक व्हा आणि आपल्या पालनकर्त्याचीच उपासना करा आणि चांगली कामे करा, यासाठी की, तुम्ही यशस्वी व्हावे. 78 अल्लाहच्या कार्यात प्रयत्नांची पराकाष्ठा करा जशी की, ती (पूर्ण निष्ठेने) करायला हवी. त्यानेच तुम्हाला (त्याचा संदेश समस्त मानवजातीपर्यंत पोचविण्यासाठी) निवडले आहे. आणि त्याने धर्माच्या बाबतीत तुमच्यावर (असहनीय) असे ओझे लादलेले नाही. (आणि) तुमचा पिता इब्राहीम याच्या धर्माचे (तुम्हाला अनुयायी बनवले). त्यानेच तुमचे नाव या कुराणात तसेच यापूर्वीच्या ग्रंथातही मुस्लिम असे ठेवले आहे (मुस्लिम म्हणजे तो, जो पूर्णपणे अल्लाहच्या इच्छेला समर्पित झालेला आहे). ते यासाठी की, पैगंबराने तुमच्यावर सत्याची साक्ष द्यावी आणि (पैगंबरानंतर) तुम्ही समस्त मानवजातीवर (पिढी दर पिढी) सत्याची साक्ष देत राहावी. तर (श्रद्धावंतांनो!) नित्य नमाज़ाचे पालन करा आणि ज़कात देत राहा (म्हणजेच दानकार्य करीत राहा). आणि अल्लाहशी (खऱ्या अर्थाने) दृढ संबंध स्थापित करा. तोच तुमचा खराखुरा

मालक आहे. किती चांगला मालक आणि किती चांगला साहाय्यकर्ता!

# सूरह-२३. अल-मोमिनून

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 निःसंदेह, श्रद्धावंत लोकच यशस्वी होणार. 2 जे आपल्या प्रार्थनेत (पूर्ण)
विनम्र भावाने (अल्लाहसमोर) नमन करतात. 3 जे सर्व निरर्थक गोष्टींपासून
स्वतःला दूर ठेवतात. 4 जे ज़कात देत असतात (म्हणजे नियमितपणे दानकार्य
करीत असतात). 5 तसेच जे आपले शील (व चारित्र्य) कलंकित होऊ नये
म्हणून दक्ष असतात. 6 पण फक्त आपल्या पत्नी आणि आपल्या त्या दासी
यांच्याशीच (संबंध ठेवतात) ज्यांना त्यांनी (विवाहबंधनाद्वारे) आपल्या ताब्यात
घेतलेले आहे. तर (असे संबंध अल्लाहच्या नजरेत) आक्षेपार्ह नाहीत. 7 पण जे
या पलीकडे (आणखी) इच्छितील तर तेच मर्यादांचे उल्लंघन करणारे (गुन्हेगार)
आहेत. 8 तसेच जे त्यांच्यावर टाकलेल्या विश्वासाच्या आणि आपल्या वचनांच्या
बाबतीत दक्ष असतात. 9 तसेच जे आपल्या नमाज़ाचे (नियमितपणे) पालन
करण्याच्या बाबतीत अतिशय शिस्तप्रिय असतात. 10 असेच लोक स्वर्गाचे
वारस ठरणार आहेत. 11 आणि हे स्वर्गाचे वारस त्यात कायम वास्तव्य
करतील.

12 आम्ही मानवाला मातीच्या सत्त्वापासून निर्माण केले. 13 मग आम्ही त्यास
वीर्याच्या एका बिंदूच्या रूपात, एका सुरक्षित स्थानी (म्हणजेच गर्भाशयात)
ठेवले. 14 मग आम्ही त्या वीर्याला गोठलेल्या रक्ताच्या रूपात विकसित केले. मग
पुढे आम्ही त्यास मांसाच्या गोळ्याच्या रूपात विकसित केले. पुढे आम्ही मांसाच्या
त्या गोळ्यात हाडे विकसित केली, मग आम्ही त्या हाडांवर मांसाचे आवरण
चढवले. मग (शेवटी) त्याला एक नवीन निर्मितीच्या रूपाने घडवून टाकले.
खरोखर, प्रशंसनीय आहे अल्लाह, सर्वोत्तम निर्मितीकार! 15 मग यानंतर (लोकांनो!)

तुम्ही निश्चितपणे मरणार आहात. [16] मग पुनरुत्थानाच्या दिवशी तुम्हाला पुन्हा उठवून उभे केले जाईल.

[17] आम्ही तुमच्यावर सात आकाश निर्माण केले. आम्ही आमच्या निर्मितीपासून कधीही गाफील असत नाही. [18] आम्ही आकाशातून एका उचित प्रमाणानुसार पाण्याचा वर्षाव केला आणि त्यास जमिनीत साठवून ठेवले. पण (लक्षात ठेवा) आम्ही हे (वरदान) परत घेण्यासही समर्थ आहोत. [19] आणि त्याद्वारे आम्ही तुमच्यासाठी खजुरीच्या व द्राक्षांच्या बागा उत्पादित केल्या. त्यात तुमच्यासाठी विपुल प्रमाणात फळे आहेत, ज्यातून तुम्ही खात असता. [20] तसेच आम्ही त्या वृक्षाला उगवले, जो सिनाई पर्वताच्या (परिसरात) आहे. तो आपल्यामध्ये तेल घेऊन वाढतो. आणि खाणाऱ्यांसाठी त्यात स्वाद आहे. [21] आणि पाहा, तुमच्यासाठी गुराढोरांमध्ये देखील बोध आहे. आम्ही त्यांच्या पोटात जे आहे त्यापासून तुम्हाला पिण्यासाठी (शुद्ध) दुधाचा पुरवठा करीत असतो. तसेच त्यांच्यात तुमच्यासाठी इतर अनेक लाभ आहेत. त्यांच्यापैकी काहींना तुम्ही खाता. [22] ज्याप्रमाणे तुम्ही नौकांवर स्वार होता, त्याचप्रमाणे यांच्यावरही स्वार होऊन (प्रवास वगैरे करता).

[23] आम्ही (पैगंबर) नूहला त्याच्या लोकांकडे पाठविले, तेव्हा तो म्हणाला, 'माझ्या बांधवांनो! (केवळ,) अल्लाहची उपासना करा, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच तुमचा उपास्य नाही, मग तुम्हाला त्याचे भय वाटत नाही?' [24] त्यांच्या लोकांतील पुढारी, ज्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला होता, म्हणाले, 'हा तर केवळ तुमच्यासारखाच एक मनुष्य आहे, त्याला तुमच्यावर वर्चस्व प्राप्त करायचे आहे. कारण (आमच्याकडे संदेश धाडायला) अल्लाहने इच्छिले असते तर स्वर्गदूतांना पाठवले असते. (शिवाय) अशाप्रकारची गोष्ट आम्ही आधी कधी आमच्या वाडवडिलांकडून ऐकलेली नाही.' [25] 'हा तर केवळ वेड लागलेला माणूस वाटतो, तर काही काळ प्रतीक्षा करा (कदाचित बरा होईल).'

26 (पैगंबर) नूहने (अल्लाहकडे) प्रार्थना केली, 'हे माझ्या पालनकर्त्या! त्यांनी तर मला खोटे ठरविले आहे आता तूच मला साहाय्य प्रदान कर.' 27 तेव्हा आम्ही त्याच्याकडे असा संदेश धाडला की, तू आमच्या निरीक्षणाखाली व आमच्या सूचनांनुसार एक नौका तयार कर (जी तुला आणि तुझ्या अनुयायांना वाचवेल). जेव्हा आमचा निर्णय अमलात येईल आणि पृथ्वीचे पाण्याचे स्रोत उफाळून येतील, तेव्हा प्राण्यांच्या जातींपैकी प्रत्येक प्रकारच्या (प्राण्याची) एक-एक जोडी (म्हणजे नर व मादी) तिच्यात ठेवून घे. आणि आपल्या कुटुंबीयांनाही त्यात स्वार कर, पण त्यात फक्त त्यांचा समावेश असणार नाही, ज्यांच्या शिक्षेविषयी आधीच निर्णय सुनावण्यात आलेला आहे. आणि ज्यांनी अत्याचार केलेला आहे, त्यांच्याविषयी मला काही सांगू नकोस. त्यांचे बुडणे अटळ आहे.

28 जेव्हा तू आणि तुझ्याबरोबर असलेले लोक नौकेत व्यवस्थित बसून जातील, तेव्हा म्हणा, 'सर्व स्तुती केवळ अल्लाहसाठीच आहे, ज्याने दुष्ट लोकांपासून आम्हाला वाचवले.' 29 आणि म्हण, 'हे माझ्या पालनकर्त्या! तुझ्या कृपेसहित मला भूमीवर उतरव (तुझी कृपा लाभलेल्या भूमीवर). तूच (मानवाला) सर्वोत्तम ठिकाणापर्यंत पोचवू शकतोस.' 30 या घटनेत (चिंतन करणाऱ्यांसाठी) संदेश असलेल्या खुणा आहेत. अशाप्रकारे आम्ही लोकांची परीक्षा घेत असतो.

31 मग आम्ही त्यांच्यानंतर नवीन पिढी उदयास आणली. 32 आणि त्यांच्याकडे त्यांच्यामधूनच एक पैगंबर पाठवला. (या संदेशासह की,) तुम्ही केवळ अल्लाहचीच उपासना करा, त्याच्याशिवाय तुमचा दुसरा कोणीही उपास्य नाही. तर तुम्हाला त्याचे भय वाटत नाही का? 33 पण (प्रत्येक वेळेस असेच झाले) की, त्याच्या (म्हणजे पैगंबराच्या) समाजातील प्रमुख लोकांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला आणि मृत्यूनंतरच्या जगात (अल्लाहशी) होणाऱ्या

भेटीला खोटे ठरविले. (याचे साधे) कारण असे होते की, आम्ही त्यांना ऐहिक
जीवनात सुखसमृद्धी प्रदान केली होती. ते म्हणू लागले, 'हा तर अगदी
तुमच्यासारखाच एक मनुष्य आहे, तेच खातो, जे तुम्ही खाता. तेच पितो, जे
तुम्ही पिता. 34 जर तुम्ही आपल्या सारख्याच एका माणसाचे म्हणणे मान्य
केले तर तुम्ही निश्चितपणे तोट्यात राहाल.'

35 हा माणूस तुम्हाला असे वचन देतो की काय? 'जेव्हा तुम्ही मृत्यू पावाल
आणि माती व हाडे बनून जाल, तेव्हा तुम्हाला पुन्हा जिवंत करून उभे केले
जाईल!' 36 अशक्य, अगदी अशक्य आहे! ज्याचे तुम्हाला वचन दिले जात
आहे. 37 जीवन तर केवळ हेच आमचे सध्याचे जीवन आहे, इथेच (फक्त
एकदा) आम्ही मरतो आणि जगतो. आम्ही मेल्यानंतर कधीही उठवले जाणार
नाही. 38 'हा तर केवळ असा मनुष्य आहे, ज्याने अल्लाहविषयी खोटे रचले आहे.
आणि आम्ही त्याचे म्हणणे कदापि मान्य करणार नाही.'

39 (असा प्रतिसाद लोकांकडून मिळाल्यानंतर) पैगंबर अल्लाहकडे प्रार्थना
करीत असत, 'हे माझ्या पालनकर्त्या, माझी मदत कर, या लोकांनी मला खोटे
ठरविले आहे.' 40 तेव्हा अल्लाह उत्तर देत असे, 'लवकरच हे लोक निश्चितपणे
पश्चात्तापदग्ध होतील.' 41 मग शेवटी आमच्या शिक्षेचा स्फोट त्यांना वेढून
घ्यायचा, न्यायोचितपणे आणि अटळपणे. मग आम्ही त्यांना कसपटासमान
करून टाकायचो. अत्याचारी लोकांचा धिक्कार असो!

42 त्यानंतर आम्ही नवीन पिढ्या उदयास आणल्या. 43 कोणताही जनसमूह
आपली निर्धारित वेळ ना पुढे ढकलू शकतो, ना मागे रोखू शकतो (त्याची
मुदत संपली म्हणजे संपली) 44 मग आम्ही एकापाठोपाठ एक आमचे पैगंबर
पाठवीत राहिलो. प्रत्येक वेळेस असे झाले की, जेव्हा एखाद्या जनसमूहाकडे
त्यांचा पैगंबर आला तर त्यांनी त्याला खोटेच ठरविले. तर आम्ही एकापाठोपाठ
एकाला नष्ट करून टाकले. अशाप्रकारे आम्ही त्यांना इतिहासजमा केले.

तिरस्कृत आहेत ते लोक, जे श्रद्धा धारण करीत नाहीत.

45 मग आम्ही मूसा आणि त्याचा भाऊ हारूनला आमच्या संदेशासहित व स्पष्ट प्रमाणासहित पाठविले. 46 फिरऔन आणि त्याच्या सरदारांकडे, पण त्यांनी उद्दामपणाचाच परिचय दिला. कारण ते होतेच फार गर्विष्ठ लोक. 47 त्यांनी म्हटले, 'आम्ही आमच्यासारख्याच दोन माणसांचे म्हणणे मान्य करायचे का? जेव्हा की, त्यांची जमात तर आमची गुलाम आहे.' 48 अशाप्रकारे त्यांनी त्या दोघांना खोटे ठरविले. परिणामी, ते नष्ट केले गेले. 49 आम्ही तर मूसाला ग्रंथ दिला होता, यासाठी की, त्यांना सन्मार्ग लाभावा.

50 आणि (ज्याप्रमाणे आम्ही मूसाला उत्कर्ष प्रदान केला होता, अगदी त्याचप्रमाणे) आम्ही मरियमपुत्र (येशू) व त्याच्या आईला आमच्या कृपेचे प्रतीक बनविले. आम्ही त्यांना एका उंच ठिकाणी शांततामय परिसरात आश्रय प्रदान केला. जिथे एक झरा प्रवाहित होता.

51 (मी आपल्या सर्व पैगंबरांना हाच आदेश दिला होता की), 'पैगंबरांनो! स्वच्छ व शुद्ध (आरोग्यदायी) वस्तूंपैकी खा आणि चांगली कामे करा. तसेच (हे लक्षात असू द्या की), जे काही तुम्ही करता त्याची मला पूर्ण जाणीव आहे.' 52 (लोकांनो!) तुमचा धर्म एकच धर्म आहे. आणि मीच तुमचा एकमेव पालनकर्ता आहे. म्हणून माझी जाण ठेवून (जीवन व्यतीत करा).

53 पण नंतर लोकांनी आपसात फाटाफूट करून वेग–वेगळ्या धर्मांची शकले निर्माण केलीत. आणि (आता) ज्या समूहाकडे जे आहे, त्यावर त्याला अभिमान आहे. 54 तर त्यांना त्यांच्या गोंधळाच्या अवस्थेत काही काळ सोडून द्या. 55 आम्ही त्यांना जी संपत्ती व संतती प्रदान केलेली आहे — त्यामुळे त्यांना असे वाटते की काय, 56 की, असे भौतिक फायदे प्राप्त करण्यासाठी, त्यांना मदत करण्यात आम्ही व्यस्त आहोत? नव्हे, तर वस्तुस्थिती ही आहे की, त्यांना (वास्तवाची) समज नाही.

57 निश्चितच, जे लोक आपल्या पालनकर्त्याविषयी आदरयुक्त भय बाळगतात. 58 तसेच जे आपल्या पालनकर्त्याच्या संदेशांवर (दृढ) विश्वास ठेवतात. 59 तसेच जे लोक कोणालाही आपल्या पालनकर्त्याचे सहभागी ठरवत नाहीत. 60 आणि जे इतरांना (म्हणजेच गरजवंतांना) देतात, जे त्यांना द्यायला हवे. तसेच या विचाराने त्यांची हृदये कंपित होतात की, त्यांना आपल्या पालनकर्त्याकडे परत जायचे आहे (आणि त्याला हिशेब द्यायचे आहे). 61 हेच लोक सत्कर्मे करण्याच्या बाबतीत एक–दुसऱ्यापेक्षा अधिक पुढाकार घेत असतात. आणि (सत्कर्मांच्या या स्पर्धेत) हेच यशस्वी ठरणार आहेत. 62 आम्ही कोणत्याही जिवावर त्याच्या क्षमतेपेक्षा अधिक ओझे लादत नसतो. आमच्याजवळ कर्मांची एक नोंदवही आहे, जी स्पष्टपणे सत्याचे दर्शन घडवते आणि लोकांवर अजिबात अन्याय होणार नाही.

63 पण त्यांची मने या (नोंदवहीच्या) बाबतीत पूर्णपणे गाफील आहेत, या शिवाय त्यांची अन्य काही (अधिक वाईट) कामे आहेत, जी ते करत राहतील. 64 पण जेव्हा त्यांच्या सुखभोगी लोकांना आम्ही आमच्या शिक्षेद्वारे फैलावर घेऊ. तर ते आमच्या मदतीसाठी गयावया करू लागतील. 65 (पण त्यांना सांगितले जाईल) आज गयावया करू नका. आता खचितच तुम्हाला आमच्याकडून कसलीही मदत केली जाणार नाही. 66 तुम्हाला वेळोवेळी जेव्हा माझे संदेश ऐकविले जायचे, (तेव्हा प्रत्येक वेळेस) तुम्ही उलट्या पावली मागे फिरत होता. 67 मोठ्या घमेंडीत (निघून जात), जसे एखाद्या (व्यर्थ) गोष्टी सांगणाऱ्याकडे दुर्लक्ष करून निघून जात आहात.

68 त्यांनी या अल्लाहच्या ग्रंथावर (सखोल) चिंतन केले नाही का? की, त्यांच्याकडे अशी एखादी गोष्ट आली आहे, जी त्यांच्या वाडवडिलांकडे आली नव्हती. 69 किंवा कदाचित ते आपल्या पैगंबराला ओळखू शकत नाहीत? असे असल्यामुळे ते त्याला नाकारीत आहेत. 70 किंवा त्यांचे असे म्हणणे आहे का

की, त्याला वेड लागलेले आहे? नव्हे, तर तो त्यांच्याकडे सत्य घेऊन आला आहे. पण त्यांच्यापैकी बहुतेकांना सत्य अजिबात नको आहे. 71 आणि जर सत्य त्यांच्या आवडी-निवडीच्या अधीन असते तर आकाश आणि पृथ्वी आणि जे काही त्यांच्यामध्ये आहे, सर्व नष्ट होऊन गेले असते. पण आम्ही असा (उपदेशपर) संदेश त्यांच्याकडे धाडला आहे, जो त्यांनी लक्षात ठेवायला हवा. तरीदेखील ते या उपदेशाकडे पाठ दाखवीत आहेत.

72 किंवा तुम्ही त्यांना (संदेश पोचविल्याबद्दल) काही मोबदला मागत आहात (असे त्यांना वाटते की), काय? पण (त्यांना कळायला पाहिजे) की, तुमच्या पालनकर्त्याचाच मोबदला सर्वोत्तम आहे. कारण तो सर्वोत्तम उपजीविका प्रदान करणारा आहे. 73 यात मुळीच शंका नाही की, तुम्ही त्यांना सरळ मार्गाकडे बोलावीत आहात.

74 जे लोक मृत्युपश्चात जीवनावर विश्वास ठेवत नाहीत, ते निश्चितपणे (सरळ) मार्गापासून दूर गेलेले आहेत. 75 जरी आम्ही त्यांच्यावर कृपा करून, त्यांचा जो त्रास आहे, तो दूर केला तरी ते आपला स्वैराचार सुरूच ठेवतील आणि आंधळ्याप्रमाणे भटकत राहतील. 76 तर आम्ही त्यांना शिक्षेत जखडून त्यांची परीक्षा घेतली, पण ना त्यांनी आपल्या पालनकर्त्यासमोर शरणागती पत्करली, ना त्यांच्यात नम्रता जागृत झाली. 77 येथपर्यंत की, जेव्हा आम्ही भयानक शिक्षेचे द्वार त्यांच्यावर खुले करू. तेव्हा मात्र त्यांना निराशेचा धक्काच बसेल.

78 (लोकांनो!) तोच आहे अल्लाह, ज्याने तुमच्यासाठी कान, डोळे, व मन निर्माण केले. तरीही तुम्ही फारच कमी आभार मानता. 79 आणि तोच आहे, ज्याने तुम्हाला पृथ्वीवर (चोहीकडे) पसरवून टाकले. मग (शेवटी) त्याच्याकडेच तुम्हाला एकत्रित करून आणले जाईल. 80 तोच आहे, जो जीवन आणि मृत्यू देतो. त्याच्याच नियंत्रणात आहे रात्र आणि दिवस (म्हणजे पृथ्वीची परिक्रमा

त्यानेच नियंत्रित केलेली आहे). तर मग तुम्ही बुद्धीचा वापर करीत नाही का?

81 पण (पैगंबरांना प्रतिसाद देताना) त्यांनीही तेच म्हटले, जे त्यांच्या पूर्वीच्या लोकांनी म्हटले होते. 82 त्यांनी म्हटले, 'जेव्हा आम्ही मरून जाऊ आणि माती व हाडे होऊन जाऊ, तेव्हा खरंच आम्हाला पुन्हा जिवंत करून उठविले जाईल? 83 अशा प्रकारचे वचन आम्हाला आणि यापूर्वी आमच्या वाडवडिलांनाही देण्यात आले होते. अशा गोष्टी अन्य काही नसून फार पूर्वीच्या लोकांच्या कथा आहेत.'

84 (पैगंबर! त्यांना) विचारा, 'पृथ्वी आणि जे काही त्यात आहे, ते कोणाचे आहे? तुम्हाला (या प्रश्नाचे) उत्तर माहीत असेल तर मला सांगाच.' 85 ते उत्तर देतील, 'अल्लाहचे', (त्यांना) सांगा, 'तर मग तुम्ही चिंतन का करीत नाही?' 86 (त्यांना) विचारा, 'कोण आहे मालक सात आकाशांचा? तसेच समस्त सृष्टीचे सत्ताकेंद्र कोणाच्या मालकीचे आहे.' 87 ते म्हणतील, 'सर्व काही अल्लाहचेच आहे' (त्यांना) सांगा, 'मग तुम्ही त्याची जाणीव ठेवून (जीवन व्यतीत करणार नाही) का?' 88 (लोकांना) सांगा, सर्व वस्तूंवर कोणाला सर्वाधिकार प्राप्त आहे? आणि तो कोण आहे, जो सर्वांना संरक्षण प्रदान करतो? त्याच्या विरुद्ध जाऊन कोणीही कोणाचेही रक्षण करू शकत नाही. तुम्हाला माहीत असेल तर मला सांगा. 89 ते उत्तर देतील, 'हे सर्व सामर्थ्य केवळ अल्लाहलाच प्राप्त आहे.' (त्यांना) सांगा, 'तर मग (ईश्वरनिष्ठ जीवन अंगीकारण्याच्या बाबतीत) तुमची फसगत कशी होते?'

90 नाही, तर आम्ही त्यांच्याकडे सत्याचा संदेश प्रकट केलेला आहे. पण ते निश्चितपणे खोटारडे आहेत. 91 अल्लाहने कोणालाही आपला पुत्र बनविला नाही. तसेच त्याच्याबरोबरीने दुसरा कोणीही उपास्य नाही. असे असते तर प्रत्येक उपास्य आपल्या निर्मितीला घेऊन वेगळा झाला असता. तेव्हा ते निश्चितपणे एक-दुसऱ्याला मात करण्यासाठी प्रयत्न केले असते. असीम आहे अल्लाहची

महानता! त्याचा त्या गोष्टींशी काहीच संबंध नाही, जे लोक त्याच्याविषयी बोलतात. 92 (त्याच्या निर्मितीपैकी कोणीही), जे जाणू शकत नाहीत ते, तो जाणतो आणि जे ते जाणू शकतात, तेही तो जाणतो. ज्यांना लोक अल्लाहचे समकक्ष ठरवतात, त्यांच्यापेक्षा तो असीम महान आहे.

93 (पैगंबर! अल्लाहकडे अशी) प्रार्थना करा, 'हे प्रभू! जर तू मला (माझ्या जीवनातच ती शिक्षा) दाखवणार असशील जिच्याबद्दल (अपराधी लोकांना) सावधानतेचा इशारा दिला गेला आहे. 94 तर हे प्रभू! माझा त्या अपराधी लोकांत समावेश करू नकोस.' 95 निश्चितपणे आम्ही यासाठी समर्थ आहोत की, (ती शिक्षा) तुम्हाला दाखवावी, जिच्याविषयी त्यांना सावधानतेचा इशारा देण्यात आलेला आहे.

96 वाईट गोष्टीला अधिक चांगल्या गोष्टीद्वारे परतवून लावा. ते जे काही बोलत आहेत, याची आम्हाला चांगल्याप्रकारे जाणीव आहे. 97 तुम्ही (अल्लाहकडे अशी) प्रार्थना करीत राहा, 'हे प्रभू! मला सैतानांच्या दुष्प्रेरणेपासून वाचण्यासाठी तुझे शरण हवे आहे.' 98 'तसेच हे प्रभू! त्यांनी माझ्या जवळपासदेखील फिरकू नये म्हणून, मी तुझे शरण इच्छितो.'

99 (जे मृत्युपश्चात जीवनावर विश्वास ठेवून नाहीत) जेव्हा मृत्यू त्यांच्यापैकी एखाद्यासमोर येऊन अगदी उभा असतो, तेव्हा तो म्हणू लागतो, 'हे माझ्या पालनकर्त्या! मला परत पाठव. 100 यासाठी की, मी आधी काही करू शकलो नाही,तर आता जगात राहून मला काही सत्कर्मे करता यावीत.' (उत्तर मिळेल), 'आता हे कदापि शक्य नाही!' ही एक निरर्थक गोष्ट आहे, जी तो उच्चारत आहे. आणि (जे जगाला निरोप देतात) त्यांच्या पुढे एक थांबवणूक आहे, त्या दिवसापर्यंत, जेव्हा त्यांना पुन्हा जिवंत करून उठविले जाईल. 101 मग जेव्हा (पुनरुत्थानाचे) शिंग फुंकले जाईल, त्या दिवशी त्यांच्यादरम्यान कोणतेही नातेसंबंध राहणार नाहीत, ना कोणी कोणाची विचारपूस करेल.

102 तेव्हा ज्यांच्या सत्कर्मांचे पारडे जड अस्तिल, तेच यशस्वी ठरतील. 103 आणि ज्यांचे पारडे हलके असतील त्यांनी स्वत:चा विनाश केलेला असणार. ते नरकात कायम वास्तव्य करतील. 104 त्यांच्या चेहऱ्यांना नरकाची आग भाजून काढील आणि त्यांचे चेहरे विद्रूप होऊन जातील (आणि त्याच अवस्थेत ते तेथे सदैव राहतील).

105 (तेव्हा अल्लाह म्हणेल) 'तुम्हाला माझे संदेश कळविण्यात आले नव्हते का? आणि तुम्ही त्यांना खोटे ठरविले नाही का?' 106 ते उत्तर देतील, 'हे आमच्या पालनकर्त्या! आमच्या दुष्ट विचारांचेच आमच्यावर वर्चस्व होते. आम्ही खरोखर बहकलेले होतो. 107 हे आमच्या पालनकर्त्या! या (यातनांतून) आम्हाला बाहेर काढ. पण जर आम्ही पुन्हा आधीसारखेच (वाईट) वर्तन केले तर आम्ही निश्चितपणे अत्याचारी ठरू.' 108 अल्लाह म्हणेल, 'धिक्कारलेल्यांनो! यातच पडून राहा व मला (आणखी काही) विनंती करू नका.'

109 माझ्या भक्तांमध्ये काही लोक असे होते, जे म्हणत असत, 'हे प्रभू! आम्ही श्रद्धा धारण केली आहे तर तू आम्हाला क्षमा कर, आणि आमच्यावर कृपा कर, खरोखर, तूच अस्सल कृपावंत आहेस.' 110 पण तेव्हा तुम्ही त्यांना उपहासाचे लक्ष्य बनविले होते. आणि तुमच्या याच उद्योगाने तुम्हाला माझ्या स्मरणाप्रति गाफील करून टाकले होते. आणि तुम्ही त्यांची खिल्ली उडवीत राहिलात. 111 पण आज मी त्यांना त्यांच्या सहिष्णुतेचा मोबदला प्रदान केला आहे. आणि तेच (आज) यशस्वी झालेले आहेत.

112 (आणि) तो (नाश पावलेल्या) त्या लोकांना विचारेल, 'तुम्ही पृथ्वीवर किती वर्षे मुक्काम केलात?' 113 ते (नरकवासी) म्हणतील, 'आम्ही एक दिवस, किंवा त्याहीपेक्षा थोडे कमीच राहिलो असणार. तर जे (दिवस व वर्षे) मोजू शकतात त्यांना विचारून पाहा.' 114 त्यानंतर अल्लाह म्हणेल, 'तुम्ही फारच अल्पकाळासाठी राहिले, कदाचित तुम्हाला हे तेव्हाच कळाले असते

तर!’

115 (लोकांनो!) तुम्ही असे गृहीत धरून आहात की काय, आम्ही तुम्हाला कोणत्याही हेतूविना निर्माण करून टाकले आहे, आणि तुम्हाला आमच्याकडे परत आणले जाणार नाही? 116 असीम महान आहे अल्लाह, समस्त सृष्टीचा अस्सल सत्ताधीश, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही (दुसरा कोणीच पूजनीय नाही). समस्त विश्वाच्या सत्ताकेंद्राचा तोच स्वामी आहे. 117 जो कोणी अल्लाहबरोबर अन्य कोण्या उपास्याचा धावा करतो, पण त्याच्याकडे (त्या उपास्याच्या) अस्तित्वाचा कोणताच पुरावा नाही, अशा व्यक्तीला तिच्या पालनकर्त्याकडे हिशेब द्यावा लागणार आहे. असे सत्य नाकारणारे लोक कधीही यशस्वी होणार नाहीत. 118 (श्रद्धावंतांनो! अल्लाहकडे अशी प्रार्थना करा.) ‘हे प्रभू! मला माफ कर आणि माझ्यावर कृपा कर. खरोखर, तूच अस्सल कृपावंत आहेस.’

# सूरह–२४. अन–नूर

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 (कुराणाचे) हे एक प्रकरण आहे जे आम्ही प्रकट केले आहे. यामध्ये (देण्यात आलेल्या आदेशांचे) पालन करणे अनिवार्य ठरविण्यात आले आहे. यामध्ये सुस्पष्ट संदेश आहेत, यासाठी की, तुम्ही बोध ग्रहण करावे. 2 व्यभिचारी स्त्री आणि व्यभिचारी पुरुष, यांच्यापैकी प्रत्येकाला शंभर फटके मारा. तुम्ही अल्लाह आणि न्यायाच्या दिवसावर विश्वास ठेवणारे असाल, तर अल्लाहच्या कायद्याची अंमलबजावणी करताना, त्या दोघांच्या बाबतीत तुम्हाला कीव वाटायला नको. ही शिक्षा दिली जात असताना श्रद्धावंतांचा एक समूह तिथे उपस्थित असायला हवा. 3 व्यभिचारी पुरुषाने, व्यभिचारी स्त्री किंवा अनेकेश्वरवादी स्त्री यांच्याशिवाय अन्य कोणाशीही विवाह करायला नको. तसेच व्यभिचारी स्त्रीशी,

व्यभिचारी किंवा अनेकेश्वरवादी पुरुष यांच्या व्यतिरिक्त कोणीही विवाहबद्ध होता कामा नये. असे विवाह श्रद्धावंतांसाठी पूर्णपणे निषिद्ध ठरवण्यात आले आहेत.

4 जे लोक चारित्र्यसंपन्न स्त्रियांवर (व्यभिचारी कृत्याचा) आरोप करतात आणि त्या आरोपाच्या (समर्थनात) चार साक्षीदार आणू शकत नाहीत, तर अशांना ऐंशी फटके मारा. तसेच त्यांची साक्ष कधीही मान्य करू नका. कारण हेच लोक खरे दुराचारी आहेत. 5 यात मात्र त्या लोकांचा अपवाद राहील, ज्यांनी त्यानंतर पश्चात्तापदग्ध होऊन (लगेच) स्वत:ची सुधारणा करून घेतली असेल. तर अशांना अल्लाह क्षमा करणारा आहे, कृपावंत आहे.

6 जे लोक आपल्या पत्नींवर (व्यभिचाराचा) आरोप करतील. त्यांच्याकडे त्यांच्या स्वत:शिवाय दुसरा कोणीच साक्षीदार म्हणून नसेल तर (अशा आरोप लावणाऱ्या) माणसासाठी साक्ष देण्याची पद्धत अशी असेल की, त्याने चार वेळा अल्लाहला (साक्षी ठेवून) शपथ घ्यावी की, त्याचा आरोप खरा आहे 7 आणि पाचव्या वेळेस असे म्हणावे की, जर तो खोटे बोलत असेल तर अल्लाहचा त्याच्यावर शाप होवो.

8 आणि स्त्री स्वत:वरील शिक्षा अशाप्रकारे टाळू शकते की, तिने चार वेळा अल्लाहला (साक्षी ठेवून) शपथ घ्यावी आणि म्हणावे की, हा माणूस खोटा आहे 9 आणि पाचव्या वेळेस, तिने म्हणावे, ‘जर हा माणूस सच्चा असेल तर,माझ्यावर अल्लाहचा प्रकोप होवो. ’ 10 अशाप्रकारे तुम्हा लोकांवर अल्लाहची मेहेरबानी व कृपा झाली नसती तर (तुम्ही फार पेचात सापडला असता). अल्लाह पश्चात्ताप करणाऱ्यांना क्षमा करणारा आहे, बुद्धिमान आहे.

11 ज्या लोकांनी (शुद्ध चारित्र्याच्या स्त्रीचे चारित्र्यहनन करण्याचे) हे जे षड्यंत्र रचले, ती तुमच्यामधीलच एक टोळी आहे. तुम्ही या घटनेला दुर्दैवी घटना समजू नका, किंबहुना ते तुमच्यासाठी चांगलेच आहे.

त्यांच्यापैकी प्रत्येक जण आपल्या कमाईच्या प्रमाणात पापाचा वाटेकरी ठरणार आहे आणि ज्याने त्यात मोठी भूमिका पार पाडली, त्याच्यासाठी सर्वांत मोठी शिक्षा आहे.

12 जेव्हा तुम्ही अशी (अफवा) ऐकली होती, तेव्हा श्रद्धावंत पुरुष व स्त्रियांनी, आपल्याच लोकांविषयी चांगला विचार का केला नाही आणि असे का म्हटले नाही की, 'ही उघड–उघड चिखलफेक आहे.' 13 या (आरोप करणाऱ्या) लोकांनी, (त्या आरोपाच्या समर्थनात) चार साक्षीदार का आणले नाही? जेव्हा ते साक्षीदारच आणू शकले नाहीत, तर अल्लाहच्या नजरेत तेच खोटारडे आहेत.

14 जर तुम्हा लोकांवर या जगात आणि मृत्यूनंतरच्या जगात अल्लाहची मेहेरबानी व कृपा नसती, तर ज्या (तोहमत) लावण्याच्या प्रकारात तुम्ही गुंतले होते, त्याबद्दल तुमच्यावर फार मोठे संकट ओढवले असते. 15 जेव्हा (ती अफवा) तुम्ही आपल्या तोंडाने पसरवीत होता आणि आपल्या तोंडून अशी गोष्ट बोलत होता, ज्याचे तुम्हाला अजिबात ज्ञान नव्हते. तुम्ही त्याला एक किरकोळ गोष्ट समजून पसरवीत होता, पण अल्लाहच्या नजरेत ती फार भयंकर गोष्ट होती. 16 आणि जेव्हा तुम्ही असली (नालायक) गोष्ट ऐकली होती, तेव्हा तुम्ही असे का नाही म्हणालात की, आम्हाला हे अजिबात शोभत नाही की, अशी गोष्ट आपल्या तोंडून बोलावी. अल्लाह! असीम महान आहेस तू! हा भयानक खोटा आरोप आहे! 17 अल्लाह तुम्हाला ताकीद देतो आहे की, येथून पुढे अशी चूक कदापि करू नका, जर तुम्ही सच्चे श्रद्धावंत असाल तर. 18 अल्लाह तुम्हाला त्याचे आदेश सुस्पष्ट रीतीने सांगत आहे. अल्लाह सर्व काही जाणणारा आहे, बुद्धिवान आहे.

19 निश्चितच जे लोक असे इच्छितात की, श्रद्धावंतांदरम्यान अश्लील गोष्टींची चर्चा व्हावी, त्यांच्यासाठी या जगात आणि यानंतरच्या जगात कठोर

शिक्षा आहे. कारण अल्लाह (पूर्ण सत्य) जाणतो आणि तुम्ही जाणत नाही. [20] जर तुमच्यावर अल्लाहची मेहेरबानी व कृपा नसती तर (तुम्हाला फार मोठ्या दुःखाला सामोरे जावे लागले असते). पण हे की, अल्लाह कनवाळू आणि कृपाळू आहे.

[21] श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! सैतानाच्या पावलावर पाऊल ठेवून चालू नका. जो कोणी सैतानाच्या पावलावर पाऊल ठेवून चालेल, तर तो त्यास केवळ अश्लील व वाईट गोष्टी करण्यासाठीच प्रवृत्त करतो.

जर तुमच्यावर अल्लाहची मेहेरबानी व त्याची कृपा नसती तर तुमच्यापैकी कोणीही कधीही (मनाने) पवित्र होऊ शकला नसता. पण अल्लाह इच्छितो त्यास शुद्ध करतो. अल्लाह सर्व काही ऐकणारा आहे सर्व काही जाणणारा आहे.

[22] तुमच्यापैकी ज्या लोकांना (ईश्वरीय) कृपा व विपुल साधनसंपत्ती लाभलेली आहे, त्यांनी असा संकल्प करायला नको की, ते आपल्या साधनसंपत्तीतून आपल्या नातेवाइकांना, गरजवंतांना व अल्लाहच्या कार्यासाठी आपले घरदार सोडणाऱ्यांना, काहीही मदत करणार नाहीत. त्यांनी त्यांना क्षमा करावी व त्यांच्या (चुकांकडे) दुर्लक्ष करावे. तुम्ही स्वतःबद्दल इच्छित नाही का की, अल्लाहने तुम्हाला क्षमा करावी? अल्लाह क्षमा करणारा, दया करणारा आहे.

[23] निःसंशय, जे लोक निष्कलंक, भोळ्या भाबड्या श्रद्धावंत स्त्रियांवर (व्यभिचाराचा) आरोप करतात, त्यांच्यावर या जगात आणि यानंतरच्या जगात धिक्कार आहे. तसेच फार मोठी शिक्षा त्यांची वाट पाहत आहे. [24] त्या दिवशी त्यांच्या स्वतःच्या जिभा, त्यांचे हात, आणि त्यांचे पाय त्यांच्याच विरुद्ध, ते जे काही करीत होते याविषयी साक्ष देतील. [25] त्या दिवशी (म्हणजेच न्यायाच्या दिवशी) अल्लाह, (त्यांच्या कार्यांचा) उचित आणि पुरेपूर मोबदला देईल. तेव्हा त्यांना कळून चुकेल की, अंतिम सत्य ‘अल्लाह’ आहे, जो (सर्व गोष्टींचे सत्य)

उघड करतो.

26 चारित्र्यहीन स्त्रिया, या चारित्र्यहीन पुरुषांकरिता आहेत, तसेच चारित्र्यहीन पुरुष, हे चारित्र्यहीन स्त्रियांकरिता आहेत, याचप्रमाणे सुशील पुरुष हे सुशील स्त्रियांकरिता आहेत आणि सुशील स्त्रिया या सुशील पुरुषांकरिता आहेत. (सुशील पुरुष व स्त्रिया) अगदी निर्दोष आहेत, त्या आरोपांपासून जे हे लोक करीत आहेत. आणि त्या (सुशील स्त्री व पुरुषांसाठी) क्षमा आहे आणि तसेच सन्मानाची उपजीविका आहे.

27 इमान धारण केलेल्या लोकांनो! तुम्ही स्वत:च्या घरांव्यतिरिक्त इतर कोणाच्याही घरांत, त्यांच्या मालकांची परवानगी घेतल्याशिवाय आणि त्यांतील लोकांना प्रणाम केल्याशिवाय प्रवेश करू नका. असे करण्यात तुमचे भले आहे. (आणि हा आदेश) यासाठी आहे की, तुम्ही सुजाणतेने वर्तन करावे. 28 पण घरात कोणी नसल्याचे तुम्हाला आढळल्यास, त्यात प्रवेश करू नका, जोपर्यंत तुम्हाला परवानगी मिळत नाही. पण जर तुम्हाला परत जाण्यासाठी सांगण्यात आले तर तुम्ही परत जा. असे करणे तुमच्यासाठी अधिक उचित आहे. तुम्ही जे काही करता त्याची अल्लाहला पूर्ण जाणीव आहे. 29 पण त्या घरात तुमचे (निःसंकोचपणे) प्रवेश करणे आक्षेपार्ह असणार नाही, ज्यात कोणीच राहत नाही. तुम्हाला तिथे काही काम असेल तर (तुम्ही तिथे जाऊ शकता). पण (हे नेहमी लक्षात ठेवा) अल्लाह ते सर्व जाणतो, जे तुम्ही उघडपणे करता आणि जे तुम्ही लपविता.

30 (पैगंबर!) श्रद्धावंत पुरुषांना सांगा की, त्यांनी आपल्या नजरा खाली ठेवाव्यात आणि आपल्या लज्जास्थानांचे रक्षण करावे. असे करणे त्यांच्यासाठी शुद्ध चारित्र्याचे द्योतक ठरेल. ते जे काही करतात त्याची अल्लाहला पूर्ण जाणीव असते, यात मुळीच शंका नाही.

31 तसेच श्रद्धा धारण केलेल्या स्त्रियांनाही सांगा, त्यांनीही आपल्या नजरा

खाली ठेवाव्यात आणि आपल्या लज्जास्थानांचे रक्षण करावे. आणि (समाजात वावरताना) इतरांसाठी (विशेष) आकर्षण ठरणाऱ्या गोष्टींचे प्रदर्शन करू नका, पण जे सर्वसाधारणपणे (व सभ्यपणे) प्रकट होते (ते आक्षेपार्ह नसेल). तसेच वक्ष:स्थानांवर आपले पदर टाकलेल्या अवस्थेत राहा आणि आपल्या शृंगाराचे प्रदर्शन करू नका, पण यात हे सर्व अपवाद आहेत — त्यांचे पती, किंवा त्यांचे वडील, किंवा त्यांच्या पतीचे वडील किंवा त्यांची मुले किंवा त्यांच्या पतीची मुले (म्हणजे आधीच्या पत्नीपासून असलेली) किंवा त्यांचे भाऊ किंवा त्यांच्या भावांची मुले किंवा त्यांच्या बहिणींची मुले किंवा त्यांच्या मोलकरीण किंवा त्यांचे दास किंवा असे नोकर चाकर पुरुष जे त्यांच्या अधीन असतील ज्यांना स्त्रियांप्रति काही आकर्षण वगैरे नसेल. तसेच अशी लहान मुले ज्यांना स्त्रियांच्या गुप्त गोष्टींची जाणीव नाही. आणि (चालताना) त्यांनी आपले पाय जोराने आपटू नयेत की, जेणेकरून त्यांच्या गुप्त असलेल्या आकर्षणाच्या गोष्टींकडे इतरांचे लक्ष वेधले जावे. हे श्रद्धावंतांनो! तुम्ही सर्वजण (नेहमी) अल्लाहकडे क्षमायाचना करीत राहा. हे तुम्ही यशस्वी होण्यासाठी आवश्यक आहे.

32 तर तुमच्यात जे (विवाहयोग्य) अविवाहित आहेत, त्यांचे विवाह करून टाका. तसेच तुमच्या दास आणि दासींपैकी जे विवाहयोग्य असतील, त्यांचेही विवाह उरकून टाका. जर ते गरीब असतील तर अल्लाह त्यांना आपल्या कृपेने समृद्ध करेल (म्हणजे गरिबीच्या भीतीने त्यांनी विवाह करण्याचे टाळू नये). कारण अल्लाह असीम कृपावंत आहे, सर्व काही जाणणारा आहे. 33 आणि (विवाहयोग्य असूनही) ज्यांना विवाह करण्याची संधी उपलब्ध नसेल तर त्यांनी अल्लाह आपल्या कृपेने त्यांना समृद्ध करेपर्यंत स्वत:चे पावित्र्य जपावे (म्हणजे आपल्या चारित्र्याला कलंक लागू देऊ नये). आणि तुमच्या दास-दासींपैकी जो कोणी (दास्यत्वातून मुक्त होण्यासाठी) लेखी करार करू इच्छितील, आणि जर ते सद्वर्तनी असल्याचे तुम्हाला वाटत असेल तर त्यांच्याशी लेखी करार करा.

अल्लाहने जी धनसंपत्ती तुम्हाला दिलेली आहे त्यातून त्यांनाही काही द्या. तसेच या जगातील काही क्षुल्लक लाभ प्राप्त करण्याच्या हेतूने आपल्या दासींना (बळजबरीने अविवाहित ठेवून) व्यभिचारी जीवन जगण्यास भाग पाडू नका, जेव्हा की, ते आपले पावित्र्य जपून (विवाह करण्यास इच्छुक) आहेत, पण जो कोणी त्यांना असे करण्यास भाग पाडेल, तर अशा भाग पाडण्यात आलेल्या (स्त्रियांना) अल्लाह माफ करणारा व दया करणारा आहे (म्हणजे अल्लाहकडे अशा स्त्रियांना शिक्षा होणार नाही). 34 आम्ही तुमच्याकडे 'सत्य' सुस्पष्ट करून सांगणारे संदेश पाठविले आहे, तसेच तुमच्या आधी होऊन गेलेल्या लोकांच्या जीवनातील बोधपर उदाहरणे, तसेच अल्लाहची जाण ठेवणाऱ्या लोकांसाठी उपदेश पाठविला आहे.

35 अल्लाह आकाश आणि पृथ्वी यांचा प्रकाश आहे (म्हणजे प्रकाशाचा तोच स्रोत आहे). त्याच्या प्रकाशाचे उदाहरण असे देता येईल, जसे एका कोनाड्यात एक दिवा आहे. आणि तो दिवा (कंदिलाप्रमाणे) एका काचेत आहे. आणि ती काच अशी आहे जणू चमकणारा एक तारा. तो दिवा, (जैतून)च्या एका आशीर्वादित वृक्षापासून निघालेल्या तेलाद्वारे प्रज्वलित केला जातो. तो वृक्ष ना पूर्वेकडील आहे, ना पश्चिमेकडील. त्याचे (प्रकाशमान) तेल (इतके स्वच्छ) आहे की, आगीचा स्पर्श न होताही, ते स्वत:हून प्रज्वलित होऊ शकते. (तेलही प्रकाशमान व आगही प्रकाशमान) म्हणजेच प्रकाशावर प्रकाश! अल्लाह आपल्या प्रकाशाकडे ज्याला इच्छितो मार्ग दाखवतो. अल्लाह लोकांनी (बोध घ्यावा म्हणून) अशी उदाहरणे प्रस्तुत करीत असतो. (केवळ) अल्लाहलाच प्रत्येक गोष्टीचे परिपूर्ण ज्ञान आहे.

36 (सन्मार्ग लाभलेले लोक) अशा प्रार्थनालयात त्याची उपासना करतात, ज्यांना निर्माण करण्याची परवानगी अल्लाहने दिलेली आहे, यासाठी की, तेथे सकाळ-संध्याकाळ त्याच्या असीम महतीचे गान केले जावे. 37 हे असे लोक

आहेत, ज्यांना व्यवसाय आणि देवाणघेवाणीचे व्यवहार या गोष्टी अल्लाहच्या स्मरणापासून गाफील करू शकत नाहीत. तसेच नित्य नमाज़ पढण्यापासून व दानकार्य (म्हणजे ज़कात देणे) या पासून देखील, (ते गाफील होत नाहीत). ते (नेहमी) त्या दिवसाचे भय बाळगून असतात, ज्या दिवशी हृदये आणि डोळे अगदी ढवळून निघतील(म्हणजे जो दिवस लोकांना हादरवून सोडेल). 38 (आणि ते केवळ ही आशा बाळगून असतात की), अल्लाह त्यांना त्यांच्या (सत्)कर्मांचा मोबदला देईल आणि आपल्या कृपेने त्यांना आणखी जास्तही देईल. अल्लाह ज्याच्या बाबतीत इच्छितो त्यास अमाप उपजीविका प्रदान करतो.

39 जे लोक सत्य नाकारण्यावर ठाम राहिले, त्यांची कर्मे वाळवंटातील मृगजळाप्रमाणे आहेत. तहानलेला माणूस त्याला पाणी समजतो. पण जेव्हा तो त्याच्या जवळ जातो, तिथे काहीच असत नाही. पण तिथे त्याला अल्लाह असल्याचे आढळते.तो त्याला त्याच्या (कर्मांचा) पुरेपूर मोबदला देऊन टाकतो. अल्लाह हिशेब करण्याच्या बाबतीत फार शीघ्र आहे. 40 किंवा (त्याची कर्मे) जणू अशी आहेत की, एका अगाध समुद्रावर (सर्वत्र) अंधार पसरलेला आहे. लाटेवर लाटा येत आहेत आणि वर आकाशात(काळे)ढग दाटलेले आहेत, ज्यामुळे अंधारात अधिकच भर पडलेली आहे. जर एखाद्याने आपला हात पसरविल्यास तेही त्याला दिसणार नाही (इतके अंधारमय वातावरण आहे). आणि ज्याला अल्लाह प्रकाश देत नाही, त्याला कोठूनही प्रकाश मिळू शकत नाही.

41 तुम्ही हे (चिंतनपूर्वक) पाहत नाही का? की, सर्व (प्राणिमात्र) जे आकाशात आहेत किंवा पृथ्वीवर आहेत. अल्लाहच्या असीम महानतेचे गान गात असतात. तसेच आपले पंख पसरवून उडणारे पक्षीदेखील. त्यांपैकी प्रत्येकाला आपापल्या प्रार्थनेची व स्तुतिगान करण्याची पद्धत माहीत आहे. अल्लाहला जे

काही ते करतात, त्याचे पूर्ण ज्ञान आहे. 42 कारण अल्लाहचीच सत्ता आहे, आकाशात आणि पृथ्वीवर. सर्वांना त्याच्याकडेच परत जायचे आहे.

43 तुम्ही हे (चिंतनपूर्वक) पाहिले नाही का? अल्लाह ढगांना हाकून नेत असतो. मग त्यांना एकत्र करतो, मग त्यांचे थरावर थर रचतो, मग तुम्हाला त्यातून पाऊस पडताना दिसतो. आकाशात (गोठलेल्या) ढगांचा पर्वतच एकत्रित करून त्यातून गारांचा वर्षाव करतो ज्या (भूभागावर) इच्छितो, तिथे त्यांचा वर्षाव करतो. आणि ज्या (भूभागावर) त्यांचा वर्षाव करायचा नाही तिथून (त्या ढगांना) हाकून नेतो. त्याच्या विजेची चमक इतकी प्रखर असते की, असे वाटते की, ती (लोकांची) दृष्टी हिरावून घेते की काय? 44 तो अल्लाह आहे, जो रात्र आणि दिवस यांना एकापाठोपाठ आणत असतो. खरोखर, यात बोध आहे, त्या लोकांसाठी जे बोध ग्रहण करण्यासाठी डोळ्यांचा वापर करतात.

45 अल्लाहने प्रत्येक सजीवाला पाण्यापासून निर्माण केले, त्यांच्यात काही असे आहेत, जे आपल्या पोटांवर सरपटत चालतात, तर काही दोन पायांवर चालणारे आहेत आणि काही चार पायांवर चालणारे आहेत. अल्लाह निर्माण करतो, जे तो इच्छितो. अल्लाह सर्व काही करू शकतो यात मुळीच शंका नाही. 46 आम्ही ‘सत्य’ स्पष्टरित्या दाखवणारे संदेश प्रकट केले आहेत. अल्लाह इच्छितो त्यास सरळ मार्गाकडे मार्गदर्शन करतो (म्हणजे जो त्याच्या नियमानुसार मार्गदर्शनास पात्र ठरतो, त्यालाच तो मार्गदर्शन प्रदान करतो).

47 असे म्हणणारे (अनेक लोक) आहेत, जे म्हणतात आम्ही अल्लाहवर व पैगंबरावर विश्वास ठेवणारे आहोत. तसेच आम्ही आज्ञापालन करणारेही आहोत. पण नंतर त्यांच्यापैकी एक गट पाठ फिरवतो. कारण हे विश्वास ठेवणारे नाहीतच. 48 पण जेव्हा त्यांना अल्लाह आणि त्याच्या पैगंबराकडे बोलाविले जाते, यासाठी की, (अल्लाहच्या ग्रंथाद्वारे त्यांच्यातील परस्पर विवादांचा) फैसला करता यावा. तर त्यांच्यातील एक गट त्याकडे पाठ फिरवतो.

49 पण (त्याच पाठ फिरवणाऱ्यांना) जेव्हा फैसला त्यांच्या बाजूने जाण्याची शक्यता दिसते, तेव्हा मात्र मोठे आज्ञाधारक होऊन त्याच्याकडे अवश्य येतात.
50 त्यांच्या मनात विकृती आहे की, ते शंका-कुशंकेला बळी पडलेले आहेत किंवा त्यांना अशी भिती वाटते का की, अल्लाह व त्याचा पैगंबर त्यांच्यावर अन्याय लादतील? नाही, वस्तुस्थिती ही आहे की, ते स्वत:च अत्याचारी लोक आहेत.

51 जेव्हाही श्रद्धावंतांना अल्लाह व त्याच्या पैगंबराकडे, त्यांच्यादरम्यान निर्णय करण्यासाठी बोलाविले जाते, तेव्हा त्यांचा प्रतिसाद केवळ असा असतो, 'आम्ही ऐकले आहे, आम्ही आदेशाचे पालन करण्यास (अगदी तयार आहोत).' असेच लोक यशस्वी होणार आहेत.
52 जे अल्लाह व त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करतील आणि अल्लाहची जाण ठेवून (जीवन व्यतीत करतील) आणि त्याच्याप्रति आपल्या कर्तव्यांची जाण ठेवतील, तर हेच लोक (शेवटी) फार मोठे यश संपादन करणारे आहेत.

53 ते फार दृढतापूर्वक अल्लाहच्या शपथा घेऊन सांगतात की, तुम्ही त्यांना (अल्लाहच्या मार्गात) निघण्यासाठी जर आदेश दिलात तर ते निश्चितपणे निघायला तयार आहेत; (पैगंबर! त्यांना) सांगा, 'शपथा घेऊ नका, नियमानुसार प्रत्यक्ष आज्ञापालन हवे. नि:संशय, तुम्ही जे काही करता ते सर्व अल्लाहला माहीत आहे.'
54 सांगा, 'अल्लाहचे आज्ञापालन करा, तसेच पैगंबराचे आज्ञापालन करा.' पण जर तुम्ही याकडे पाठ फिरवाल (तर लक्षात असू द्या) की, त्याच्यावर (म्हणजे पैगंबरावर) जी जबाबदारी सोपवण्यात आलेली आहे, फक्त त्यासाठीच तो उत्तरदायी असेल. तसेच तुमच्यावर जी जबाबदारी सोपवण्यात आलेली आहे, त्यासाठी तुम्ही उत्तरदायी असाल. जर तुम्ही त्याचे आज्ञापालन कराल तरच तुम्हाला सन्मार्ग लाभेल. पैगंबरावर फक्त संदेश स्पष्टपणे पोचविण्याचीच जबाबदारी आहे.

55 अल्लाहने तुमच्यापैकी त्या लोकांना वचन दिले आहे, जे श्रद्धा धारण

करून सत्कर्मे करतात. ते हे की, तो त्यांना भूतलावर सत्ताधिकार प्रदान करेल. जसे त्याने त्यांच्यापूर्वीच्या लोकांना प्रदान केले होते. तसेच तो त्यांच्यासाठी त्या धर्माला भक्कम आधार प्रदान करेल, जो त्याने त्यांच्यासाठी पसंत केला आहे आणि त्यांच्या भयपूर्ण अवस्थेला सुरक्षित अवस्थेत परिवर्तित करेल. (त्या शांततापूर्ण अवस्थेत) ते केवळ माझीच उपासना करतील आणि ते कोणालाही माझे सहभागी ठरविणार नाहीत. पण जे कोणी (हे सर्व समजल्यानंतरही) सत्य नाकारण्याचाच पर्याय निवडतील तर असेच लोक खरोखर विद्रोही आहेत.

56 (श्रद्धावंतांनो!) नित्य नमाज़ाचे पालन करा आणि ज़कात द्या (म्हणजेच दानकार्य करा). तसेच पैगंबराच्या आज्ञांचे पालन करा. हे यासाठी (आवश्यक आहे) की, तुम्हाला (अल्लाहची) कृपा लाभावी. 57 जे लोक सत्य नाकारण्यावर ठाम आहेत, त्यांच्याबाबतीत असा विचार मनामध्ये कदापि आणू नका की, ते पृथ्वीवर अल्लाहच्या योजनेला विफल करू शकतात. त्यांच्या वास्तव्याचे (अंतिम) ठिकाण नरकाची आग आहे. खरोखर, ते फार वाईट ठिकाण आहे.

58 श्रद्धावंतांनो! तुमचे दास व दासी आणि ती मुले जी अद्याप वयात आलेली नाहीत यांना (तुमच्या खासगीत तुमच्याकडे येण्यापूर्वी) दिवसाच्या तीन वेळेत परवानगी घेणे आवश्यक आहे. प्रात:काळाच्या नमाज़ापूर्वी आणि दुपारी (जेव्हा काही काळ आराम करण्यासाठी) तुम्ही कपडे काढून ठेवता. तसेच रात्रीच्या नमाज़ानंतर (जेव्हा तुम्ही झोपायला जाता). या तीन वेळा तुमच्या एकांतवासाच्या आहेत. इतर वेळेत तुम्ही किंवा ते (एकमेकांना भेटणे) आक्षेपार्ह असणार नाही. कारण (एकमेकांच्या कामांसाठी) तुम्ही आणि ते एकमेकांकडे वारंवार ये-जा करीत असता. अशाप्रकारे अल्लाह तुमच्यासाठी त्याचे संदेश स्पष्ट करून सांगत आहे. अल्लाह सर्व काही जाणणारा आहे, बुद्धिमान आहे! 59 जेव्हा तुमची मुले वयात येतील (म्हणजे सज्ञान होतील), तर त्यांनीही अशाच प्रकारे (प्रत्येक वेळेस) परवानगी घ्यावी, ज्याप्रमाणे त्यांचे वडीलधारे लोक

(घरात प्रवेश करण्यासाठी) परवानगी घेत असत. अशाप्रकारे अल्लाह तुमच्यासमोर त्याचे संदेश स्पष्ट करून सांगत आहे. अल्लाह सर्व काही जाणणारा आहे, बुद्धिवान आहे. 60 अशा वृद्ध स्त्रिया ज्यांची लग्न करण्याची इच्छा राहिलेली नाही. त्यांनी (बाह्यत:) घेतल्या जाणाऱ्या चादरी उतरवून ठेवल्या तर त्यांच्यासाठी ते आक्षेपार्ह असणार नाही, पण या अटीवर की, तसे करण्यात त्यांचा, आपल्या शृंगाराचे प्रदर्शन करण्याचा उद्देश मात्र नसावा. पण त्यांनीही असे करण्याचे टाळले तर ते त्यांच्यासाठी अधिक चांगले आहे. अल्लाह सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा आहे.

61 (सर्व श्रद्धावंत आपसात भाऊ आहेत, म्हणून) यात आक्षेपार्ह असे काही नाही की, आंधळ्याने, लंगड्याने, आजारी व्यक्तीने किंवा तुम्ही स्वत: आपल्या घरी जेवावे. किंवा आपल्या वडिलांच्या घरी किंवा आपल्या आईच्या घरी किंवा भावाच्या किंवा बहिणीच्या किंवा काकाच्या किंवा आत्याच्या किंवा मामाच्या किंवा मावशीच्या घरी किंवा ज्या घराच्या किल्ल्या तुम्हाला सोपवलेल्या आहेत तिथे किंवा मित्राच्या घरी. तसेच हेही आक्षेपार्ह नाही की, तुम्ही जेवण एकत्र करा किंवा वेगवेगळे. पण जेव्हा तुम्ही घरात प्रवेश कराल, तेव्हा तेथील लोकांना प्रणाम (सलाम) करा. (‘सलाम’) हे तुमच्या पालनकर्त्याकडून (शिकवलेले) शुभ व पवित्र असे प्रार्थनामय वचन आहे. अशाप्रकारे अल्लाह त्याचे संदेश तुमच्यासमोर स्पष्ट करतो. यासाठी की, तुम्ही बुद्धीचा वापर (करायला शिकावे).

62 सच्चे श्रद्धावंत केवळ ते आहेत, जे अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर दृढ विश्वास ठेवतात. जेव्हा ते एखाद्या सामूहिक कार्याच्या प्रसंगी पैगंबरासोबत असतात, तेव्हा त्यांनी पैगंबराची परवानगी घेतल्याशिवाय तिथून उठून जायला नको. जे लोक तुमची परवानगी घेतात तेच, खरोखर, अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर विश्वास ठेवणारे आहेत. (पैगंबर!) जेव्हा ते आपल्या काही खाजगी कामानिमित्त

तुमच्याकडे परवानगी मागत असतील तर ज्यांच्याबाबतीत तुम्ही उचित समजाल, त्यांना परवानगी द्या. तसेच त्यांच्यासाठी अल्लाहकडे क्षमायाचना करा. अल्लाह क्षमा करणारा व दया करणारा आहे.

63 तुम्ही लोक, पैगंबराच्या बोलावण्याला, जसे तुम्ही आपसात एकमेकाला बोलावता, तसे समजू नका. अल्लाह तुमच्यातील त्या लोकांना चांगले जाणतो, जे एकदुसऱ्याचा आडोसा घेत गुपचुपपणे (पैगंबरासोबत होत असलेल्या मीटिंगमधून विनापरवानगी) निसटतात. तर जे लोक त्याच्या आदेशाचे उल्लंघन करतात, त्यांना या गोष्टीचे भय बाळगायला हवे की, (याच जगात) एखाद्या अग्निदिव्याशी त्यांचा सामना होऊ शकतो. किंवा (मृत्यूनंतरच्या जगात) त्यांना कठोर शिक्षा भोगावी लागू शकते. 64 निश्चितपणे! जे काही आकाशात आणि पृथ्वीवर आहे, ते सर्व अल्लाहचेच आहे. अल्लाह, तुम्ही कोणत्या अवस्थेत आहात, हे चांगले जाणतो (म्हणजे तुमचे वर्तन, त्यामागील ध्येय तो चांगले जाणतो). मग त्या दिवशी जेव्हा ते त्याच्याकडे परत येतील, तेव्हा तो त्यांना, त्यांनी (जीवनात) जे-जे केलेले असेल, ते सर्व दाखवून देईल. कारण अल्लाहला प्रत्येक गोष्टीचे परिपूर्ण ज्ञान आहे.

# सूरह-२५. अल-फ़ुरक़ान

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 पावन आहे तो (अल्लाह), ज्याने आपल्या भक्तावर (या कुराणाच्या) रूपाने एक कसोटी अवतीर्ण केली की, त्याने समस्त जगवासीयांना (याद्वारे) सावध करावे. 2 तो (अल्लाह) ज्याची आकाशात आणि पृथ्वीवर (म्हणजे समस्त विश्वावर) सत्ता आहे. त्याने स्वत:साठी कोणालाही आपला पुत्र बनविलेला नाही व त्याच्या सत्तेत कोणीही त्याचा भागीदार नाही. त्यानेच प्रत्येक वस्तूची निर्मिती केली. त्याने (आपल्या) योजनेनुसार सर्वांसाठी एक योग्य प्रमाण निश्चित केलेले आहे. 3 लोकांनी त्याला (म्हणजेच त्यांचा निर्माता असलेल्या अल्लाहला)

सोडून असे उपास्य बनवले आहेत, जे काहीही निर्माण करू शकत नाहीत, कारण ते स्वत:च निर्माण केले गेलेले आहेत. ते स्वत:च्याच नफा–नुकसानाच्या बाबतीत कोणत्याही प्रकारे आपल्या अंगी सामर्थ्य बाळगून नाहीत. तसेच त्यांना ना कोणाच्या मृत्यूवर, ना जीवनावर, ना मृत्यूनंतर पुनरुत्थानावर कोणत्याही प्रकारे नियंत्रण प्राप्त आहे.

4 सत्य नाकारणारे (श्रद्धाहीन) लोक म्हणतात, 'हे (कुराण) याशिवाय अन्य काही नाही तर (पैगंबराने) स्वत:हून रचलेली गोष्ट आहे. तसेच इतरांनी त्याची या कार्यात मदत केलेली आहे.' (अल्लाहच्या ग्रंथाबद्दल असे वक्तव्य करणारे) हे लोक फारच अत्याचारी आणि खोटारडे आहेत. 5 ते म्हणतात, 'या प्राचीन लोकांच्या तथ्यहीन कथा आहेत, ज्या त्याने (इतरांकडून) लिहून घेतल्या आहेत. तर त्या, त्याला सकाळ–संध्याकाळ ऐकविल्या जात असतात.'

6 (पैगंबर!) त्यांना सांगा, 'हे कुराण त्याने प्रकट केले आहे, जो आकाश व पृथ्वी यांची सर्व रहस्ये जाणतो, खरोखर, तो फार क्षमा करणारा व कृपा करणारा आहे.'

7 (सत्य नाकारणारे लोक) म्हणतात, 'हा कसला पैगंबर आहे, जो (इतरांप्रमाणेच) भोजन करतो व बाजाराच्या ठिकाणीही चलता–फिरताना आढळतो. याच्याबरोबर स्वर्गदूताला का पाठविण्यात आले नाही, जो लोकांना सचेत करण्यासाठी याच्याबरोबर राहिला असता. 8 किंवा (असे तरी व्हायला हवे होते की, अल्लाहकडून) याच्याकडे एखादा खजिना उतरविला गेला असता, किंवा (कमीत कमी) याच्याकडे (समृद्ध) अशी एक बाग तरी असायला हवी होती, ज्यातून तो (कोणतेही कष्ट न करता) खाऊ शकला असता.' ते अत्याचारी लोक (एकमेकांना) म्हणाले, '(तुम्ही जर या पैगंबराचे अनुसरण कराल तर) तुम्ही एका जादूग्रस्त माणसाचे अनुसरण करणारे असाल.' 9 (पैगंबर!) पाहा, ते तुमच्याविषयी कसे–कसे उदाहरण (उपमा) प्रस्तुत करीत आहेत. निश्चितपणे

ते बहकलेले आहेत, आता पुन्हा यांना सन्मार्ग कधी लाभणार नाही.

10 पावन आहे तो (अल्लाह)! त्याने ठरविले तर तुम्हाला (याच जगात) याहूनही (कित्येक पटीने) चांगल्या गोष्टी प्रदान करू शकतो. अशा बागा ज्यांतून पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह वाहत असतील. तसेच भव्य असे अनेक महालही, तो तुम्हाला देऊ शकतो. 11 पण त्यांच्याबाबतीत (वस्तुस्थिती ही आहे की), त्यांनी पुनरुत्थानाच्या घटकेलाच खोटे ठरविले आहे. आम्ही त्या घटकेला खोटे ठरविणाऱ्यांसाठी धगधगती आग तयार करून ठेवलेली आहे. 12 जेव्हा ते दुरूनच आगीशी समोरासमोर होतील, तेव्हा त्यांना तिचा आवेश व तिच्या गर्जना ऐकू येतील. 13 जेव्हा त्यांना जखडलेल्या अवस्थेत त्यात एखाद्या अरुंद जागी फेकून टाकण्यात येईल, तेव्हा ते मृत्यूसाठी याचना करतील (म्हणजे त्यांना वाटेल की, त्यांच्यावर असा मृत्यू यावा, ज्याद्वारे त्यांचा कायमरित्या विनाश होऊन जावा). 14 (पण त्यांना सांगितले जाईल), 'आज एक मृत्यूला नाही, अनेक मृत्यूंना बोलवा.' 15 (पैगंबर! लोकांना) विचारा, 'हे चांगले आहे की, कायमस्वरूपी राहायचे स्वर्ग, ज्याचे वचन अल्लाहची जाण ठेवून जीवन व्यतीत करणाऱ्यांना देण्यात आले आहे. तो त्यांचा मोबदला आहे व त्यांचे कायमस्वरूपी वास्तव्याचे ठिकाण.' 16 तिथे त्यांना ते सर्व मिळेल जे त्यांना हवे असेल. ते तिथे कायम वास्तव्य करतील. हे तुझ्या पालनकर्त्याचे असे वचन आहे. ज्याची पूर्तता करणे त्याने स्वत:वर बंधनकारक ठरविलेले आहे.

17 ज्या दिवशी तो त्या लोकांना (म्हणजे अनेकेश्वरवादी लोकांना) व (त्या उपास्यांनाही) ज्यांची ते अल्लाहला सोडून उपासना करीत असत, एकत्रित करेल. तेव्हा अल्लाह (त्या खोट्या उपास्यांना) म्हणेल, 'तुम्ही माझ्या या सेवकांना मार्गभ्रष्ट केलात की, हे स्वत:च सन्मार्गापासून दूर गेले? 18 (त्यावर) ते उत्तर देतील, 'तुझी महानता असीम आहे! आमच्यासाठी तसा विचार करणेही

कदापि शक्य नव्हते की, आम्ही तुला सोडून इतरांना आमचे मालक म्हणून स्वीकारावे (व लोकांना ते सुचवावे). तू त्यांना व त्यांच्या वाडवडिलांना ऐहिक जीवनात समृद्धता प्रदान केली, परिणामी त्यांना तुझ्या उपदेशांचा विसर पडला. आणि (आज) ते विनाश ग्रस्त लोकांत सामील झाले.' 19 (त्यावर अल्लाह म्हणेल, ज्यांना तुम्ही उपास्य मानले होते) त्यांनी, तुम्ही जे काही म्हणत होता त्यास आता खोटे ठरविले आहे. आता (शिक्षेला) ना तुम्ही स्वत: टाळू शकता, ना तुम्हाला कोणत्याही प्रकारचे साहाय्य लाभेल. तुमच्यापैकी जो कोणी अत्याचारी कृत्य करेल, त्यास आम्ही कठोर शिक्षेची चव चाखायला लावू.

20 (पैगंबर!) तुमच्यापूर्वी (आम्ही) असा एकही पैगंबर पाठवला नाही, जो भोजन करीत नव्हता, किंवा (सर्वसाधारण माणसाप्रमाणे) बाजारात (वगैरे) चलत-फिरत नव्हता. आम्ही तुम्हा (लोकांना) एक-दुसऱ्याची परीक्षा घेण्याचे साधन बनवतो. (तर मग) तुम्ही (या परीक्षेला) धैर्याने सहन कराल का, (हे आम्हाला पाहायचे आहे). तुमचा पालनकर्ता सर्व काही पाहणारा आहे.

21 जे लोक आमच्या भेटीची अपेक्षा ठेवून नाहीत, ते म्हणतात; 'आमच्याकडे स्वर्गदूतांना का पाठविण्यात आले नाही. किंवा आम्ही आमच्या पालनकर्त्याला का पाहू शकत नाही?' त्यांना स्वत:चा फारच अभिमान आहे, त्यांनी मर्यादांचे उल्लंघन करण्याच्या बाबतीत कोणतीच कसर बाकी ठेवलेली नाही. 22 ज्या दिवशी ते स्वर्गदूतांना पाहतील, त्या दिवशी ती गोष्ट अपराध्यांसाठी काही खुषखबर असणार नाही. तेव्हा तर ते ओरडतील, बचाव! बचाव! 23 आम्ही त्यांच्या प्रत्येक कृत्याकडे वळू व त्यांच्या (तथाकथित चांगल्या) कृत्यांची (हकिगत स्पष्ट करून टाकू) मग आम्ही अशा कृत्यांना विखुरलेल्या धुळीच्या कणांप्रमाणे करून टाकू. 24 स्वर्गनिवासी लोकांना त्या दिवशी उत्कृष्ट असे निवासस्थान लाभलेले असेल, खरोखर फारच सुंदर विश्रामस्थान असेल ते!

25 ज्या दिवशी आकाश ढगांसह फाटून जाईल आणि स्वर्गदूतांना मोठ्या

संख्येने उतरवण्यात येईल. 26 त्या दिवशी (सर्वांसमोर) खरी सत्ता कृपावंत (अल्लाहचीच) असल्याचे (चित्र) स्पष्ट होईल, तर तो दिवस सत्य नाकारणाऱ्या लोकांसाठी फारच कठीण असेल. 27 त्या दिवशी दुराचारी मनुष्य आपले हात कुरतडेल व म्हणेल, 'अरेरे (माझे दुर्दैव!) मी पैगंबराने दाखवलेला मार्गच अनुसरला असता तर किती बरे झाले असते!' 28 बरबाद झालो मी! 'मी अमुक माणसाला मित्र बनवले नसते तर.......... (आज मी अभागी ठरलो नसतो). 29 त्यानेच मला बहकावून सदुपदेशांपासून दूर नेले, जेव्हा की, ते सदुपदेश मला प्राप्त झाले होते. कारण सैतान माणसाच्या बाबतीत अन्य काही नसून केवळ फसवणूक करणारा आहे.

30 (न्यायाच्या दिवशी) पैगंबर म्हणेल, हे माझ्या पालनकर्त्या! माझ्या लोकांनी या कुराणाशी आपला संबंध पूर्णपणे तोडून टाकला होता.

31 (पैगंबर!) अशाप्रकारे आम्ही अपराधी लोकांपैकी प्रत्येक पैगंबरासाठी शत्रू उभे केले. तुमचा पालनकर्ता (तुम्हाला) मार्गदर्शन करण्यासाठी व मदत करण्यासाठी पर्याप्त आहे.

32 सत्य नाकारणारे लोक विचारतात, 'याच्याकडे संपूर्ण कुराण एकाच वेळेत का प्रकट करण्यात आले नाही?' (आम्ही) तसे यासाठी केले की, त्याद्वारे तुमच्या हृदयांना बळकटी प्रदान करावी. म्हणून ते आम्ही क्रमा–क्रमाने तुमच्याकडे पाठविले. 33 (सत्य नाकारणारे) हे लोक प्रत्येक वेळेस काहीतरी विचित्र आक्षेप तुमच्यासमोर प्रस्तुत करतात. पण आम्ही त्याचे (पूर्ण) सत्य, सर्वोत्तम स्पष्टीकरणासह तुमच्यासमोर मांडतो. 34 जे लोक तोंड घासल्या जाणाऱ्या अवस्थेत नरकाकडे फरपटत नेले जातील. फारच वाईट ठिकाण, निवास करण्यासाठी त्यांना मिळणार आहे. तेच सरळ मार्गापासून फार दूर गेलेले आहेत.

35 आम्ही (तुमच्याप्रमाणेच) मूसालाही ग्रंथ प्रदान केला होता. तसेच

त्याचा साहाय्यक म्हणून आम्ही त्याचा भाऊ हारून याची नियुक्ती केली होती. (म्हणजे सहपैगंबर म्हणून). 36 मग आम्ही त्यांना म्हणालो, 'तुम्ही दोघे त्या लोकांकडे जा, ज्यांनी आमच्या संदेश असलेल्या खुणा खोट्या ठरविल्या आहेत.' मग शेवटी आम्ही (त्या अपराध्यांना) पूर्णपणे नष्ट करून टाकले. 37 अशाचप्रकारे (पैगंबर) नूहच्या लोकांनाही आम्ही बुडवून टाकले. कारण त्यांनीही त्यांच्याकडे आलेल्या पैगंबरांना खोटे ठरविले. मग आम्ही त्यांना समस्त मानवजातीसाठी एक (बोधपर) संकेत बनवले. आम्ही अत्याचारी कृत्य करणाऱ्यांसाठी कठोर शिक्षा तयार करून ठेवली आहे. 38 (आठवा आम्ही) आद व समूद आणि खंदकवाले व त्यांच्यादरम्यान होऊन गेलेल्या कित्येक जमातींना (कशाप्रकारे शिक्षा केली). 39 त्यांच्यापैकी प्रत्येकाला आम्ही सचेत करण्यासाठी इशारे दिले. (मग शेवटी) आम्ही त्यांच्यापैकी प्रत्येकाचा समूळ नाश केला. 40 (जे आता आमच्या संदेशांना नाकारत आहेत) ते त्या वस्तीजवळून निश्चितपणे गेलेले आहेत, जिच्यावर फार वाईट असा दगडांचा वर्षाव करण्यात आला होता. मग त्यांनी तो (परिणाम चिंतनपूर्वक) पाहिला नाही का? 'पण नाही, खरेतर हे लोक मृत्यूनंतर पुन्हा जिवंत करून उठविण्यावर विश्वासच ठेवत नाहीत.'

41 (पैगंबर!) जेव्हा-जेव्हा ते तुम्हाला पाहतात, तेव्हा ते तुम्हाला उपहासाचे लक्ष्य बनवितात, (म्हणतात), हाच का तो, ज्याला अल्लाहने पैगंबर बनवून पाठविले आहे? 42 जर आम्ही आमच्या उपास्यांच्या बाबतीत ठाम राहिलो नसतो तर याने आम्हाला आमच्या उपास्यांपासून दूर नेऊन मार्गभ्रष्ट केले असते. पण लवकरच जेव्हा ते ती शिक्षा पाहतील तेव्हा त्यांना कळून चुकेल की, सर्वात जास्त मार्गभ्रष्ट कोण आहे.

43 (पैगंबर!) तुम्ही त्या मनुष्याच्या स्थितीवर चिंतन केले आहात का, ज्याने आपल्या इच्छा-आकांक्षांनाच आपले उपास्य बनविले आहे. तर अशा

मनुष्याला सन्मार्गावर आणण्याची (किंवा त्याला सन्मार्गावर कायम ठेवण्याची) जबाबदारी तुम्ही घेऊ शकता? 44 तुम्हाला असे वाटते का की, त्यांच्यापैकी बहुतेक जण (तुमचे म्हणणे) लक्षपूर्वक ऐकतात व आपल्या बुद्धीचा वापर करतात? नाही, ते तर केवळ जनावरांसारखे आहेत, नव्हे ते त्यांच्यापेक्षाही अधिक भरकटलेले आहेत (म्हणजे जनावरांइतकीही यांच्यात योग्य मार्गाची जाण उरलेली नाही).

45 तुम्ही या गोष्टीचे कधी चिंतनपूर्वक निरीक्षण केले नाही का की, तुमचा पालनकर्ता कशाप्रकारे सावली पसरवितो. त्याने जर इच्छिले असते तर तो तिला स्थिर ठेवू शकला असता, पण आम्ही सूर्याला तिचे मार्गदर्शक बनवले.
46 (तिला पसरवून टाकल्यानंतर) मग आम्ही तिला हळूहळू आपल्याकडे ओढून घेतो.

47 तोच आहे ज्याने तुमच्यासाठी रात्रीला (एका) पांघरूणा(प्रमाणे) बनविले आणि झोपेला विश्रांतीचे (व फ्रेश होण्याचे) साधन बनविले. आणि दिवसाला जागे होऊन (आपले जीवन पुढे सुरू ठेवण्याचे) माध्यम बनविले.

48 तोच आहे, जो वाऱ्यांना आपल्या कृपेची शुभवार्ता म्हणून पुढे पाठवतो.
मग आम्ही आकाशातून शुद्ध (गोड) पाण्याचा वर्षाव करतो. 49 यासाठी की,
त्याद्वारे मृत अवस्थेत असलेल्या जमिनीस जीवन प्रदान करावे. तसेच आमच्या निर्मितीपैकी अनेक प्रकारच्या जनावरांना व माणसांना पिण्याचे पाणी उपलब्ध करण्यासाठी (आम्ही पाण्याचा वर्षाव करतो).

50 अशाप्रकारे आम्ही (आमच्या संदेशांना लोकांसमोर) विविध प्रकारे यासाठी स्पष्ट करून सांगितले आहे की, त्यांनी यावर चिंतन करावे, पण
बहुसंख्य लोक कृतघ्नतापूर्वक प्रतिसाद देत असतात. 51 (आताही) आम्ही
इच्छिले असते तर (आधीप्रमाणेच) प्रत्येक वस्तीमध्ये एक सावध करणारा
(पैगंबर) पाठविले असते. 52 तर तुम्ही सत्य नाकारणाऱ्या लोकांचे म्हणणे

कदापि मान्य करू नका. तर या (कुराणाच्या) साहाय्याने त्यांच्याशी जिहाद करा,मोठा जिहाद.

53 तोच आहे (अल्लाह) ज्याने पाण्याच्या दोन प्रकारच्या प्रवाहांना चालना दिली. एक गोड व तहान शमविणारा आहे तर दुसरा खारा व कडू आहे. त्याने त्या दोघांदरम्यान एक अडसर व एक प्रचंड असे विभाजक उभे केले आहे. 54 त्यानेच मानवाला पाण्यापासून निर्माण केले. मग त्याला रक्तसंबंधातून व विवाहसंबंधातून नातीगोती असलेला एक (सामाजिक प्राणी) बनवले. तुमचा पालनकर्ता (अफाट) सामर्थ्य बाळगणारा आहे.

55 (अल्लाह, लोकांचा निर्माता व पालनकर्ता असतानाही) ते अल्लाहला सोडून अशांची उपासना करतात, जे त्यांना (कोणत्याही प्रकारे) ना लाभ पोचवू शकतात, ना हानी. (पण) सत्य नाकारणारे लोक आपल्या पालनकर्त्याच्या विरुद्ध (दुष्टांचे) साहाय्यक बनलेले आहेत. 56 (पैगंबर!) आम्ही तुम्हाला केवळ शुभवार्ता देणारा आणि सावध करणारा बनवून पाठविले आहे. 57 (पैगंबर! त्यांना) सांगा, 'मी तुमच्याकडे यासंबंधाने (भौतिक स्वरूपाचा) कोणताही मोबदला मागत नाही. (मात्र ही अपेक्षा असते की,) ज्याला वाटेल त्याने आपल्या पालनकर्त्याच्या मार्गाचा अवलंब करावा.

58 (पैगंबर!) दृढ विश्वास ठेवा त्या अल्लाहवर, जो निरंतर जिवंत आहे आणि तो कधीच मरणारा नाही. आणि त्याच्या स्तुतीसह त्याच्या असीम महानतेचे वर्णन (नेहमी) करीत राहा. त्याला आपल्या सेवकांच्या पापकृत्यांची पूर्ण जाणीव आहे. 59 त्याने आकाशांना आणि पृथ्वीला आणि जे काही यांच्या दरम्यान आहे, त्या सर्वांना सहा दिवसात (म्हणजेच सहा कालावधीत) निर्माण केले. मग त्याने समस्त सृष्टीचे सत्ताकेंद्र आपल्या नियंत्रणात घेतले. (तो आहे), कृपावंत (अल्लाह)! त्याच्यासंबंधाने एखाद्या ज्ञानी माणसाला विचारा. 60 जेव्हा त्यांना सांगितले जाते की, केवळ कृपावंत अल्लाहसमोरच नतमस्तक

व्हा, तेव्हा (सत्य नाकारणारे लोक) विचारतात, 'हा कोण तो कृपावंत (अल्लाह)?, तू सांगशील त्याच्यासमोर आम्ही नतमस्तक व्हायचे का?' अशाप्रकारे त्यांच्यात तिरस्काराची भावना आणखी वाढीस लागते.

61 असीम पावन आहे तो, ज्याने आकाशात नक्षत्रांचे समूह चे समूह निर्माण केले आणि त्यात (सूर्याच्या रूपाने) एक देदीप्यमान दिवा व (थंड) प्रकाश देणारा चंद्र ठेवून दिला आहे.
62 तोच आहे, ज्याने रात्र व दिवस यांना एका पाठोपाठ एक येणारे बनविले. यात त्या व्यक्तीसाठी बोध आहे, जो (बोध) घेऊ इच्छितो आणि जो कृतज्ञ बनू इच्छितो.

63 कृपावंत अल्लाहचे खरे भक्त ते आहेत, जे भूतलावर नम्रपणे चालतात (म्हणजे त्यांच्या वर्तनात नेहमी नम्रता असते). आणि जेव्हा निर्बुद्ध लोक त्यांच्याशी बोलतात, तेव्हा ते म्हणतात, 'तुम्हाला शांती लाभो' (म्हणजे त्यांच्याशी व्यर्थ बडबड करण्यात आपला वेळ ते वाया घालवीत नाहीत).
64 ते आपल्या पालनकर्त्यासमोर नतमस्तक होऊन आणि त्याच्यासमोर उभे राहून (प्रार्थना) करण्यात आपली रात्र व्यतीत करतात.
65 ते त्याच्याकडे (नेहमी) ही विनवणी करीत असतात की, हे प्रभू! नरकाची शिक्षा आमच्यापासून दूर ठेव. कारण त्याची शिक्षा भयंकर यातनामयी शिक्षा आहे.
66 खरोखर ते फारच वाईट वास्तव्याचे ठिकाण आहे, फारच वाईट आश्रयाचे स्थान आहे.
67 जेव्हा ते खर्च करतात तेव्हा ना ते उधळपट्टी करतात, ना कंजूषपणाचे प्रदर्शन करतात. पण (ते) या दोघांच्यामध्ये संतुलन ठेवणाऱ्या मध्यम मार्गाचा अवलंब करतात.

68 ते (सच्चे श्रद्धावंत) अल्लाहव्यतिरिक्त अन्य कोणत्याही उपास्याचा धावा करीत नाहीत. ते अल्लाहने प्रतिबंधित ठरवलेल्या कोणत्याही जिवाची हत्या करीत नाहीत, पण फक्त न्याय्य कारणाने. ते व्यभिचारी कृत्य करीत नाही. जो कोणी असे (पापकृत्य) करेल, त्याला त्यासाठी शिक्षा भोगावीच लागेल.
69 पुनरुत्थानाच्या दिवशी त्याची शिक्षा दुप्पट केली जाईल आणि अपमानग्रस्त

अवस्थेत तो त्यात खितपत पडेल. 70 पण जो कोणी पश्चात्ताप व्यक्त करून श्रद्धा धारण करतील आणि सत्कर्मांच्या मार्गाचा अवलंब करतील, तर अशा लोकांच्या (पूर्वीच्या) चुकांना अल्लाह चांगल्या कृत्यांत परिवर्तित करून टाकेल. अल्लाह फार क्षमाशील आहे, दयाळू आहे. 71 जो कोणी पश्चात्ताप करतो आणि सत्कर्मे करायला लागतो, तर असा माणूस खऱ्या अर्थाने अल्लाहकडे परत येत असतो.

72 (लक्षात ठेवा, तेच लोक अल्लाहचे खरे भक्त आहेत,) जे खोट्या गोष्टींचे साक्षीदार बनत नाहीत, मग जेव्हा (अशा लोकांजवळून) त्यांचे कधी जाणे झाले, जे विवेकशून्य (व फालतू) गोष्टींत गुंतलेले आहेत, तिथून सभ्यपणे निघून जातात. 73 जेव्हा त्यांना त्यांच्या पालनकर्त्याच्या संदेशांद्वारे आधारे उपदेश केले जाते, तेव्हा ते बहिऱ्या व आंधळ्याप्रमाणे त्यास प्रतिसाद देत नाहीत. 74 ते (अल्लाहकडे अशाप्रकारे) प्रार्थना करीत असतात, 'हे प्रभू! आमच्या पत्नी व आमची संतती यांच्याद्वारे आम्हाला नेत्रसुख प्रदान कर आणि आम्हाला सदाचारी लोकांसाठी एक आदर्श बनव.'

75 हेच ते लोक आहेत, ज्यांना स्वर्गात, त्यांच्या सहनशीलतेच्या मोबदल्यात, भव्य महाल प्रदान केले जातील. तिथे त्यांचे स्वागत सुखशांतीच्या शुभेच्छेसह केले जाईल. 76 ते तिथे कायम वास्तव्य करतील. किती छान ठिकाण ते थांबण्याचे! किती सुंदर ठिकाण ते राहण्याचे! 77 (पैगंबर! लोकांना) सांगा, 'तुम्ही त्याचा धावा करणारे नसाल तर (लक्षात असू दया) माझ्या पालनकर्त्याला तुमच्या बाबतीत काही कर्तव्य नाही.' (सत्य नाकारणाऱ्या लोकांना सांगा,) 'तुम्ही (अल्लाहच्या संदेशांना) निश्चितपणे खोटे ठरविलेले आहे. तर आता त्याच्या शिक्षेत तुम्ही वेढले जाणार, हे अगदी अटळ आहे.'

# सूरह–२६. अश–शुअरा

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] ता० सीन० मीम० [2] हे सुस्पष्ट ग्रंथातील संदेश होत, सत्य स्पष्ट करणारे (संदेश) [3] (पैगंबर!) या संदेशावर ते श्रद्धा धारण करण्यास तयार नाहीत, या दु:खाने कदाचित तुम्ही स्वत:ला संपवून घेणार की काय (म्हणजे त्यांनी अल्लाहच्या मार्गदर्शनाचा स्वीकार करावा या प्रयत्नांत तुम्ही जिवाचे किती हाल करून घेत आहात!) [4] आम्ही ठरविले असते तर त्यांच्याकडे आकाशातून एखादी (चमत्कारिक) निशाणी अवतीर्ण करू शकलो असतो, मग त्यांच्या माना त्यासमोर नमल्या असत्या (पण तसे करणे आमच्या योजनेचा भाग नाही). [5] त्यांच्याकडे कृपावंत (अल्लाहकडून) जेव्हाही नवीन उपदेश येतो, तेव्हा (प्रत्येक वेळेस हे मनाने आंधळे झालेले लोक) त्याकडे पाठ फिरवल्याशिवाय राहत नाहीत. [6] अशाप्रकारे त्यांनी या संदेशाकडे निश्चितपणे दुर्लक्ष करून टाकले आहे. तर लवकरच त्यांना त्या गोष्टीचे सत्य कळून जाईल, ज्याची ते खिल्ली उडवीत असत.

[7] त्यांनी भूतलावर (चिंतनपूर्वक) निरीक्षण केले नाही का की, आम्ही त्यावर विविध प्रकारच्या किती चांगल्या वस्तू उगविल्या आहेत, ज्या जोड्यांच्या रूपाने आहेत. [8] निश्चितच यात (लोकांसाठी) संदेश असलेली खूण आहे. पण बहुसंख्य लोक असेच आहेत की, जे श्रद्धा धारण करीत नाहीत. [9] तुमचा पालनकर्ताच सर्वशक्तिमान आहे, कृपा करणारा आहे.

[10] (ती वेळ आठवा) जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने मूसाला बोलावून सांगितले की, तू त्या दुराचारी लोकांकडे जा. [11] फिरऔनच्या लोकांकडे, जे माझी जाण ठेवून (जीवन व्यतीत करीत नाहीत). [12] (त्यावर) मूसाने उत्तर दिले, 'हे प्रभू, मला अशी भीती वाटते की, ते मला खोटे ठरवतील.' [13] '(या जबाबदारीने)

माझ्या उरावर मला दडपण आल्यासारखे वाटते आणि मी जिभेने न अडखळता (स्पष्टपणे) बोलू शकत नाही. तर तू हा संदेश हारूनकडे पाठवून (त्याला या कार्यात माझा साहाय्यक बनव).' 14 'शिवाय, त्यांचा माझ्यावर एक (जुना) आरोप देखील आहे. मला अशी भीती वाटते की, ते मला मारून टाकतील.'

15 अल्लाहने म्हटले, 'असे कदापि होणार नाही, तर तुम्ही दोघे आमच्या संदेशांसह जा, आम्ही तुमच्याबरोबर आहोत आणि तुमचे म्हणणे ऐकत आहोत.' 16 तर तुम्ही दोघे फिरऔनकडे जा आणि त्याला सांगा की, आम्ही सर्व जगांच्या पालनकर्त्याचे पैगंबर आहोत. 17 (तुला हे सांगायचे आहे की,) तू इस्राईलच्या मुलांना आमच्याबरोबर जाऊ दे.'

18 (मूसाने संदेश ऐकविल्यानंतर) फिरऔन म्हणाला, 'आम्ही तुझे लहानपणी आमच्याकडे संगोपन केले नाही का? वयाची अनेक वर्षे तू आमच्याबरोबर घालविली आहेस. 19 मग तू तर ते (गंभीर अपराधी) कृत्य केले, (केले ते केले). निश्चितच तू निरुपकारी लोकांपैकी एक आहेस.'

20 मूसाने उत्तर दिले, '(होय,) त्यावेळेस ते कृत्य माझ्या हातून (अजाणतेपणे चुकून) घडले, तेव्हा मला मार्गदर्शन लाभलेले नव्हते. 21 मग मला तुम्हा लोकांची भीती वाटल्याने मी तुमच्यातून पळून गेलो. मग मला माझ्या पालनकर्त्याने विवेकशक्ती प्रदान केली आणि मला पैगंबरांपैकी बनवले. 22 ज्याबद्दल तू मला हिणवीत आहेस, तो हाच तुझा उपकार की, तू इस्राईलच्या मुलांना गुलाम बनवून ठेवले आहेस?'

23 मग (पुढे) फिरऔन म्हणाला, 'विश्वाचा पालनकर्ता म्हणजे ते काय असते?' 24 मूसाने उत्तर दिले, 'आकाश व पृथ्वी आणि त्यांच्यामध्ये जे काही आहे त्यांचा मालक; जर तू विश्वास ठेवणारा असशील तर असेल तर........' 25 फिरऔन आपल्या आसपासच्या लोकांना म्हणाला, 'ऐकलात का तुम्ही (हा काय म्हणतो ते)?' 26 मूसा ने (पुढे) म्हटले, 'तोच आहे तुमचा पालनकर्ता

आणि तुमच्या वाडवडिलांचाही पालनकर्ता.’ 27 (त्यावर) फिरऔन उद्‌गारला, ‘हा पैगंबर, ज्याला तुमच्याकडे पाठवण्यात आले आहे, वेडा मात्र आहे हे नक्की!’ 28 पण मूसाने आपले बोलणे सुरूच ठेवले, म्हणाला, ‘(ज्याच्याविषयी मी तुम्हाला सांगत आहे) तो पूर्व व पश्चिम आणि या दोहोंच्यामध्ये जे काही आहे, त्या सर्वांचा मालक आहे. (पण हे तुम्हाला तेव्हाच कळेल) जेव्हा तुम्ही आपल्या बुद्धीचा वापर कराल.’ 29 (यावर) फिरऔन म्हणाला, ‘जर तू मला सोडून अन्य कोणाला उपास्य म्हणून स्वीकारशील तर मी तुला तुरुंगात कैद करून टाकेन.’ 30 मूसाने म्हटले, ‘मी तुझ्यासमोर सत्याचे स्पष्ट प्रमाण सादर केल्यानंतरदेखील का?’ 31 (त्यावर) फिरऔनने म्हटले, ‘तर ते सादर कर जर तू खरा आहेस.’ 32 मग जेव्हा मूसाने आपली काठी खाली फेकली, तेव्हा पाहता तर काय, तिचे अचानकपणे एका सर्पात रूपांतर झाले. 33 त्याने आपला हात समोर पसरविला, तेव्हा पाहता तर काय, पाहणाऱ्यांना तो पांढरा शुभ्र (चमकत असलेला) दिसत होता. 34 (हे पाहून) फिरऔन आपल्या आसपास असलेल्या सरदारांना म्हणाला, ‘खरोखर हा मनुष्य फार कुशल जादूगार वाटतो. 35 तो इच्छितो की, आपल्या जादूच्या प्रभावाने तुम्हाला तुमच्या देशाबाहेर घालवून लावावे. तेव्हा त्याच्याबाबतीत तुम्ही काय सल्ला देणार?’

36 ते उत्तरले, ‘त्याला व त्याच्या भावाला काही काळ उसंत द्या आणि सर्व शहरांत दवंडी देणारे पाठवून द्या. 37 त्यांनी तुमच्याकडे सर्व निष्णात जादूगारांना घेऊन यावे.’ 38 अशाप्रकारे (विविध शहरांतील) जादूगार ठरलेल्या दिवशी, ठरलेल्या वेळेवर एकत्रित करण्यात आले. 39 लोकांनाही सांगण्यात आले, ‘तुम्ही सर्व उपस्थित राहणार ना? (जास्तीत जास्त लोकांनी उपस्थित राहणे यासाठी आवश्यक आहे, कारण आपल्याला जादूगारांबरोबर राहून त्यांचा उत्साह वाढवता येईल.) 40 जर ते विजय प्राप्त करणारे ठरले तर आपल्याला

त्यांच्या मार्गाचे अनुसरण करता येईल.’ 41 जेव्हा जादूगार आले, ते फिरऔनला (म्हणजे राजाला) म्हणाले, ‘आम्ही विजय प्राप्त केल्यास, आम्हाला काही बक्षीस (वगैरे) मिळणार का?’ 42 त्याने उत्तर दिले, ‘होय, तसे झाल्यास निश्चितच तुमचा समावेश माझ्या सान्निध्य लाभलेल्या खास लोकांत होईल.’

43 मूसा ने जादूगारांना सांगितले, ‘तुम्हाला जे काही फेकायचे आहे ,(मैदानात) फेका.’ 44 तेव्हा त्यांनी आपल्या दोऱ्या व काठ्या (मैदानात) फेकल्या व म्हणाले, ‘फिरऔनच्या प्रतिष्ठेची शपथ, आम्ही विजयी होणार.’ 45 पण जेव्हा मूसाने आपली काठी (मैदानात) फेकली, तेव्हा अचानकपणे ती काठी (सापात परिवर्तित झाली आणि त्या सापाने,) त्यांनी ज्या आधारे तो फसवेगिरीचा खेळ सादर केला होता, त्या सर्वांना गिळायला सुरुवात केली. 46 (हा चमत्कार पाहिल्याबरोबर सर्व) जादूगार अल्लाहसमोर नतमस्तक झाले. 47 ते उद्‌गारले, ‘आम्ही सर्व जगांच्या पालनकर्त्यावर श्रद्धा धारण केली आहे. 48 जो मूसा व हारूनचा पालनकर्ता आहे.’

49 (त्यावर) फिरऔन म्हणाला, ‘तुम्ही मी परवानगी देण्याआधीच, त्याचे म्हणणे मान्य केलात, निश्चितच तो तुमचा गुरू आहे, ज्याने तुम्हाला (ही सर्व) जादूविद्या शिकवली आहे. पण लवकरच तुम्हाला कळून येईल, (आता मी तुमचे काय करतो ते) मी तुमचे एका बाजूचे हात आणि दुसऱ्या बाजूचे पाय कापून टाकेन आणि त्यानंतर तुम्हा सर्वांना सुळावर चढवेन.’ 50 त्यांनी उत्तर दिले, ‘त्याचे आम्हाला काही दुःख नाही, (तू तसे केल्यास) आम्ही आमच्या पालनकर्त्याकडे परत जाऊ.’ 51 आम्हाला पूर्ण आशा आहे की, आमचा पालनकर्ता आमच्याकडून झालेल्या चुकांना माफ करून टाकेल, कारण आम्ही सर्वप्रथम श्रद्धा धारण करणाऱ्यांपैकी आहोत.’

52 आम्ही मूसाकडे आमचा हा संदेश प्रकट केला की, माझ्या भक्तांना घेऊन तिथून रात्री निघून जा, तुमचा पाठलाग निश्चितपणे केला जाईल. 53 मग

फिरऔनने (सैन्याची जमवाजमव करण्यासाठी) विविध शहरांना दवंडी देणारे पाठवले. 54 हे मूठभर लोक आहेत, (म्हणजे मूसाच्या जमातीचे लोक,) 55 पण त्यांनी आम्हाला प्रक्षुब्ध केले आहे. 56 आणि आम्ही एक संघटित व कोणत्याही धोक्याच्या विरुद्ध पूर्णपणे तयार असलेली जमात आहोत, (हे माहीत असतानाही त्यांनी आम्हाला डिवचले आहे). 57 अशाप्रकारे आम्ही (फिरऔनच्या लोकांना) ज्या बागांत व प्रवाहांशेजारी ते राहत होते, तिथून बाहेर काढले. 58 तसेच त्यांचे खजिने व भव्य महाल सोडायला त्यांना भाग पाडले. 59 (फिरऔनच्या लोकांच्या बाबतीत) असे घडले, मग नंतर (कालांतराने) आम्ही या सर्व वरदानांचे इस्राईलच्या मुलांना वारस बनवले.

60 मग फिरऔन व त्याच्या लोकांनी सूर्योदयाच्या वेळी त्यांचा पाठलाग केला. 61 मग जेव्हा दोन्ही गट एकमेकांना दिसू लागले, तेव्हा मूसाबरोबर असलेल्या लोकांनी म्हटले, ‘आता तर आम्ही वेढले गेलोय.’ 62 मूसाने उत्तर दिले, ‘तसे कदापि होणार नाही, माझा पालनकर्ता माझ्याबरोबर आहे, तो मला मार्गदर्शन करेल.’ 63 तेव्हा आम्ही मूसाकडे आमचा संदेश पाठविला की, ‘आपल्या काठीने तू समुद्रावर प्रहार कर.’ तेव्हा तो दुभंगला आणि त्याचा प्रत्येक भाग प्रचंड पर्वतासारखा झाला होता. 64 मग आम्ही पाठलाग करणाऱ्या दुसऱ्या पक्षालाही (म्हणजे फिरऔन व त्याच्या लोकांनाही) त्यांच्या निकट आणले. 65 मग आम्ही मूसा व त्याच्याबरोबर जे लोक होते, त्या सर्वांना वाचवले 66 आणि दुसऱ्या पक्षाला बुडवून टाकले (म्हणजेच फिरऔन व त्याच्या लोकांना). 67 निश्चितपणे, या (कथेत लोकांसाठी) एक संदेश आहे. पण त्यांच्यापैकी अनेक लोक श्रद्धा ठेवणारे नाहीत. 68 खरोखर, तुझा पालनकर्ता सर्वशक्तिमान आहे, कृपा करणारा आहे.

69 याचप्रमाणे लोकांना इब्राहीमचा वृत्तांत ऐकवा. 70 जेव्हा त्याने आपल्या वडिलांस व आपल्या लोकांना विचारले, ‘तुम्ही कशाची उपासना करता?’ 71

त्यांनी उत्तर दिले, ‘आम्ही मूर्तींची उपासना करतो, आणि यांच्याप्रति आमची जी निष्ठा आहे, त्यावर आम्ही (नेहमी) कायम राहू.’ 72 त्याने विचारले, ‘तुम्हाला असे वाटते का की, जेव्हा तुम्ही यांचा धावा करता, तेव्हा ते तुमचे म्हणणे ऐकू शकतात? 73 किंवा त्यांच्याकडे तुम्हाला लाभ किंवा हानी (पोचविण्याचे) सामर्थ्य आहे?’ 74 त्यांनी उत्तर दिले, ‘(ते काहीही असो,) पण आम्ही आमच्या वाडवडिलांना असेच करताना पाहिले आहे.’ 75 (त्यावर) इब्राहीमने म्हटले, ‘तुम्ही डोळे उघडून त्यांच्याविषयी कधी (चिंतनपूर्वक) निरीक्षण तरी केले आहात का, ज्यांची तुम्ही उपासना करीत आला आहात? 76 तुम्ही आणि तुमच्या वाडवडिलांनीही (तसे कधी केले का? जसे मी म्हणतो.) 77 (जिथपर्यंत माझा संबंध आहे, माझे असे ठामपणे म्हणणे आहे) सर्व जगांचा (निर्माता) व पालनकर्ता असलेल्या एका अल्लाहला सोडून, ही सर्व (खोटी उपास्ये) माझी शत्रू आहेत. 78 त्यानेच मला निर्माण केले व तोच मला मार्गदर्शन करीत असतो.

79 तोच माझ्या खाण्या-पिण्याची व्यवस्था करतो. 80 जेव्हा मी आजारी पडतो, तेव्हा तोच मला बरे करतो. 81 मग तोच मला मृत्यू देईल आणि (तोच) मला पुन्हा जिवंत करेल. 82 तोच आहे, ज्याच्याकडून मी आशा बाळगून असतो, न्यायाच्या दिवशी, तोच माझ्या चुका माफ करेल.’

83 ‘हे माझ्या पालनकर्त्या! मला विवेक प्रदान कर आणि माझा समावेश सदाचारी लोकांमध्ये कर. 84 तसेच नंतर येणाऱ्या पिढ्यांनी (माझ्या जीवनापासूनही) धडा घ्यावा असे माझ्याबाबतीत कर 85 आणि माझा समावेश ऐश्वर्यसंपन्न स्वर्गाच्या वारसदारांमध्ये कर 86 आणि माझ्या पित्यास क्षमा कर, खरोखर तो वाट चुकलेल्यांपैकी आहे 87 आणि मला त्या दिवशी अपमानित करू नकोस, ज्या दिवशी सर्व लोकांना उठवून उभे केले जाईल. 88 ज्या दिवशी ना संपत्ती काही कामी येईल, ना संतती. 89 पण तेव्हा तोच (यशस्वी ठरेल) जो

अल्लाहकडे शुद्ध मन घेऊन येईल.

90 (त्या दिवशी) स्वर्ग त्या लोकांच्या समोर आणण्यात येईल, ज्यांनी अल्लाहची जाण व भय बाळगून (आपले जीवन व्यतीत केलेले असेल). 91 तसेच नरकाची दारे त्या लोकांसाठी खुली केली जातील, ज्यांनी चुकीच्या मार्गावर (जीवन व्यतीत केले). 92 तेव्हा त्यांना विचारले जाईल, 'ते सर्व आता कुठे आहेत, ज्यांची तुम्ही उपासना करीत असत,' 93 अल्लाहला सोडून? ते (आज) तुम्हाला मदत करू शकतात का किंवा ते स्वत:ला तरी मदत करू शकतात का? 94 मग त्यांना तोंडघशी अवस्थेत नरकात फेकून देण्यात येईल. ते (खोटे) उपास्य व (त्यांचा धावा करणारे) बहकलेले लोक. 95 तसेच इब्लीसची (म्हणजे सैतानाची) सेना, सर्वांना एकत्र (त्यात फेकून देण्यात येईल). 96 ते सर्व तिथे एकदुसऱ्याला दोष देताना म्हणतील, 97 अल्लाहची शपथ! आम्ही धडधडीत चुकीच्या मार्गावर होतो. 98 जेव्हा आम्ही तुम्हाला समस्त सृष्टीच्या पालनकर्त्यासमान समजत होतो (म्हणजे त्या खोट्या उपास्यांना). 99 आम्हाला या अपराध्यांनीच मार्गभ्रष्ट करून सोडले. 100 आणि आता आमची शिफारस करणारा कोणीही नाही. 101 ना कोणी निष्ठावान मित्र. 102 जर आम्हाला फक्त एकदा पुन्हा आधीचे जीवन देण्यात आले तर आम्ही अवश्य श्रद्धावंत बनलो असतो. 103 (नरकवासियांचे जे चित्र प्रस्तुत करण्यात आले आहे) त्यात निश्चितपणे (लोकांसाठी) एक संदेश आहे, पण बहुसंख्य लोक त्यावर श्रद्धा ठेवणारे नाहीत. 104 तुझा पालनकर्ता सर्वशक्तिमान आहे, असीम दयावान आहे, यामध्ये मुळीच शंका नाही.

105 नूहच्या लोकांनीही पैगंबरांना खोटे ठरविले. 106 जेव्हा त्यांचा भाऊ नूहने त्यांना म्हटले, 'तुम्हा लोकांना अल्लाहचे भय वाटत नाही का? 107 मी तुमच्याकडे पाठवण्यात आलेला संदेशवाहक आहे आणि (मी) संदेशरूपी अमानत तुमच्याकडे घेऊन आलो आहे. 108 तेव्हा तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि

माझे अनुसरण करा. 109 मी त्यासाठी तुमच्याकडे कोणताही मोबदला मागत नाही. माझा मोबदला तर केवळ संपूर्ण विश्वाचा पालनकर्ता असलेल्या (अल्लाहकडे) मला मिळणार आहे. 110 तेव्हा तुम्ही लोक अल्लाहचे भय बाळगा आणि माझे अनुसरण करा.' 111 (त्यावर) ते म्हणाले, 'आम्ही तुझ्यावर विश्वास ठेवून (तुझे अनुसरण) कसे करू शकतो? कारण अगदी खालच्या वर्गातील लोक तुझे अनुसरण करीत आहेत.' 112 तेव्हा नूहने म्हटले, 'ते (काय आहेत) व ते काय करीत असत, याचे ज्ञान मला कसे असणार? 113 त्यांच्या कृत्यांचा हिशेब केवळ माझा पालनकर्ताच घेऊ शकतो, तुम्हाला हे समजायला हवे. 114 मी कोणत्याही श्रद्धावंताला झिडकारून (आपल्यापासून) दूर करणार नाही. 115 मी तर केवळ एक उघड-उघड सावध करणारा आहे.'

116 ते म्हणाले, 'हे नूह, तू हे सर्व बंद केले नाहीस तर निश्चितपणे तुझ्यावर दगडांचा वर्षाव केला जाईल.' 117 तेव्हा (नूहने अल्लाहकडे) प्रार्थना केली, 'हे प्रभू! माझ्या लोकांनी मला खोटे ठरविले आहे. 118 तर तू माझ्या व यांच्यामध्ये तुझा निर्णायक फैसला सुनावून टाक. तसेच मला व माझ्याबरोबर असलेल्या श्रद्धावंतांना (यांच्यापासून) मुक्ती दे.' 119 मग आम्ही त्याला व त्याच्याबरोबर एक (खचाखच) भरलेल्या नौकेत असलेल्या (सर्वांना) वाचवले. 120 मग त्यांना सोडून बाकी सर्वांना, आम्ही बुडवून टाकले. 121 या कथेत निश्चितपणे एक संदेश आहे, पण बहुसंख्य लोक (या संदेशापासून बोध ग्रहण करून) श्रद्धावंत बनणार नाहीत. 122 तुझा पालनकर्ता सर्वशक्तिमान आहे, असीम दयावान आहे, यात मुळीच शंका नाही.

123 आद या जमातीनेही पैगंबरांना खोटे ठरविले. 124 जेव्हा त्यांचा भाऊ हूदने त्यांना म्हटले, 'तुम्हाला अल्लाहचे भय वाटत नाही का? 125 मी तुमच्याकडे पाठवण्यात आलेला (अल्लाहचा) संदेशवाहक आहे आणि (मी) संदेशरूपी अमानत तुमच्याकडे घेऊन आलो आहे. 126 तेव्हा तुम्ही अल्लाहचे भय बाळगा

आणि माझे अनुसरण करा. 127 मी त्यासाठी तुमच्याकडे कोणताही मोबदला मागत नाही, माझ्या (कामाचा) मोबदला मला केवळ संपूर्ण विश्वाचा पालनकर्ता असलेल्या (अल्लाहकडे) मिळणार आहे. 128 तुम्ही प्रत्येक उंच ठिकाणी कोणत्याही उद्देशाविना (केवळ स्वत:चा मोठेपणा मिरवण्यासाठी) स्मारके बांधून काढता, त्याला काही अर्थ आहे का? 129 तसेच स्वत:साठी मोठमोठे भव्य महाल उभे करता, जणू काही तुम्ही त्यात कायमस्वरूपी राहणार आहात? 130 जेव्हा एखाद्यावर आपले हात टाकता, तेव्हा एखाद्या जुलमी माणसाप्रमाणे त्याच्याशी वर्तन करता. 131 तेव्हा तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझे आज्ञापालन करा. 132 तसेच त्या अल्लाहचे भय बाळगा, ज्याने तुम्हाला त्या सर्व (चांगल्या) गोष्टी पुरविलेल्या आहेत, ज्यांची तुम्हाला (चांगल्याप्रकारे) जाणीव आहे. 133 त्यानेच तुम्हाला प्रदान केले आहे, गुरेढोरे व मुले. 134 तसेच बागा व पाण्याचे प्रवाह (या सर्व त्याच्याच देणग्या आहेत). 135 मला तुमच्याबाबतीत एका भयंकर दिवसाच्या शिक्षेचे भय वाटते.'

136 त्यांनी उत्तर दिले, 'आमच्यासाठी समान आहे की, तू आम्हाला उपदेश कर किंवा करू नकोस (म्हणजे तुझ्या उपदेशांचा आमच्यावर काहीही परिणाम होणार नाही). 137 या अशा (शिक्षेच्या धमक्या देणे) प्राचीन काळापासून लोकांची सवय राहिलेली आहे. 138 आमच्यावर कोणतेही संकट वगैरे काही येणार नाही.' 139 अशाप्रकारे त्यांनी त्याला (म्हणजे आमच्या पैगंबराला) खोटे ठरविले. मग आम्ही त्यांना नष्ट करून टाकले. या कथेत एक (बोधपर) संदेश आहे, पण बहुतेक लोक (यापासून बोध घेऊन) श्रद्धा धारण करणार नाहीत. 140 तुमचा पालनकर्ता सर्वशक्तिमान आहे, असीम दयावान आहे यात मुळीच शंका नाही.

141 समूद (या जमातीनेही) पैगंबरांना खोटे ठरविले.

142 जेव्हा त्यांचा भाऊ सालेहने त्यांना म्हटले, 'तुम्हाला अल्लाहचे भय

वाटत नाही का? 143 मी तुमच्याकडे पाठविलेला (अल्लाहचा पैगंबर) आहे आणि संदेशरूपी अमानत तुमच्याकडे घेऊन आलो आहे. 144 तेव्हा तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझे आज्ञापालन करा. 145 मी त्यासाठी तुमच्याकडून कोणताही मोबदला मागत नाही. माझा मोबदला मला त्याच्याकडे (मिळणार आहे), जो संपूर्ण विश्वाचा पालनकर्ता आहे. 146 तुम्ही असे समजून आहात की काय, ज्या सुखसमृद्धीत तुम्ही आहात, त्यात तुम्हाला (कायमस्वरूपी) असेच राहू दिले जाईल? 147 त्या बागा व पाण्याचे प्रवाह (यांच्यादरम्यान) 148 तसेच धान्याने भरलेल्या शेतांत व त्या खजुरीच्या (बागांत), ज्याचे घड ओझ्याने तुटायला आले आहेत (या सर्व सुखसमृद्धीसह तुम्ही कायम राहणार, असे तुम्हाला वाटते की काय?) 149 तसेच तुम्ही पर्वतांना खणून (आपल्या कौशल्यावर) मोठा अभिमान मिरवीत घरे निर्माण करता. 150 तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझ्या आज्ञेचे पालन करा 151 आणि मर्यादांचे उल्लंघन करणाऱ्यांचे म्हणणे ऐकू नका. 152 जे भूतलावर केवळ उपद्रव माजवितात, आणि कोणतेही विधायक कार्य करीत नाहीत.'

153 ते म्हणाले, 'तू निश्चितच एक जादूग्रस्त मनुष्य आहेस. 154 तू तर केवळ आमच्याप्रमाणेच एक मनुष्य आहेस, जर तू तुझ्या (दाव्यात) खरा असशील तर आमच्यासमोर एखादी (चमत्कारिक) निशाणी सादर कर.' 155 त्याने उत्तर दिले, 'ही एक उंटीण (तुमच्यासाठी एक चमत्कार) आहे, एक दिवस हिची पाणी पिण्याची पाळी असेल. आणि एका निर्धारित दिवशी तुमची पाळी असेल. 156 म्हणून तुम्ही तिला दुष्ट हेतूने कोणत्याही प्रकारे इजा पोचविण्याचा प्रयत्न करू नका, अन्यथा तुमच्यावर एक भयंकर दिवस ओढवेल.' 157 पण त्यांनी तिच्या पायाच्या धोंडशिरा (क्रूररित्या) कापून टाकल्या. आणि नंतर पश्चात्तापदग्ध झाले (पण तो पश्चात्ताप व्यर्थ होता). 158 त्यानंतर (ईश्वरीय) शिक्षेने ते वेढले गेले. निश्चितच या कथेत एक संदेश आहे. पण त्यांच्यापैकी

बहुसंख्य (तो संदेश ग्रहण करून) श्रद्धा धारण करणार नाहीत. 159 तुमचा पालनकर्ता सर्वशक्तिमान आहे, असीम दयावान आहे, यात मुळीच शंका नाही.

160 (अगदी असेच घडले) लूतच्या लोकांच्या बाबतीत, त्यांनीही पैगंबरांना खोटे ठरविले. 161 जेव्हा त्यांचा भाऊ लूत त्यांना म्हणाला, 'तुम्हाला अल्लाहचे भय वाटत नाही का? 162 मी तुमच्याकडे पाठविण्यात आलेला (अल्लाहचा पैगंबर) आहे आणि संदेशरूपी अमानत तुमच्याकडे घेऊन आलो आहे. 163 तर अल्लाहचे भय बाळगा आणि माझ्या आज्ञेचे पालन करा. 164 मी त्यासाठी तुमच्याकडून कोणताही मोबदला मागत नाही. माझा मोबदला मला त्याच्याकडे मिळणार आहे, जो संपूर्ण विश्वाचा पालनकर्ता आहे. 165 जगातील सर्व लोकांमध्ये तुम्हीच असे आहात का, जे (वासनापूर्तीसाठी) पुरुषांकडे जाता? 166 आणि तुमच्या पालनकर्त्याने तुमच्यासाठी तुमच्या ज्या पत्नी वैध ठरविलेल्या आहेत, त्यांच्याकडे जाण्यापासून तुम्ही स्वत:ला दूर ठेवता. पण वस्तुस्थिती ही आहे की, तुम्ही मर्यादांचे उल्लंघन करण्याच्या बाबतीत कोणतीच कसर बाकी ठेवलेली नाही, असे लोक आहात तुम्ही!'

167 ते म्हणाले, 'हे लूत! जर तू हे सर्व (तुझे प्रवचन) बंद केले नाहीस तर तुला (या गावातून) निश्चितपणे बाहेर घालवून देण्यात येईल.' 168 त्याने म्हटले, 'हे पाहा, मला तर तुमच्या त्या कृत्यांची भयानक चीड येते, ज्यात तुम्ही लिप्त आहात.' 169 (मग त्याने अल्लाहकडे प्रार्थना केली,) हे प्रभू! तू मला व माझ्या कुटुंबीयांना त्यांच्या पापकृत्यांच्या (दुष्परिणामांपासून) वाचव. 170 मग आम्ही त्याला व त्याच्या सर्व कुटुंबीयांना वाचवले. 171 पण (लूत व त्याचे कुटुंबीय ते शहर सोडून निघून गेल्यानंतर) एक वृद्ध स्त्री मागे राहणाऱ्यांबरोबर राहून गेली. 172 मग आम्ही इतरांना नष्ट करून टाकले. 173 तेव्हा आम्ही त्यांच्यावर (विनाशकारी) पावसाचा वर्षाव केला, खरोखर किती वाईट होता तो पाऊस, जो त्या लोकांवर वर्षिला गेला, ज्यांना सावधानतेचा इशारा देण्यात

आला होता. 174 निश्चितच या कथेत (लोकांसाठी) एक संदेश आहे. पण
बहुसंख्य लोक (या संदेशापासून बोध ग्रहण करून) श्रद्धा धारण करणार नाहीत.
175 तुझा पालनकर्ता सर्वशक्तिमान आहे व असीम दयावान आहे, यात मुळीच
शंका नाही.

176 जंगलात राहणाऱ्या (‘अयका’ या जमातीनेही) पैगंबरांना खोटे ठरविले.
177 (त्यांच्याकडे आलेल्या पैगंबर) शुऐबने जेव्हा त्यांना म्हटले, ‘तुम्हाला
अल्लाहचे भय वाटत नाही का? 178 मी तुमच्याकडे पाठविण्यात आलेला
(अल्लाहचा पैगंबर) आहे आणि मी संदेशरूपी अमानत तुमच्याकडे घेऊन आलो
आहे. 179 तेव्हा तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझ्या आज्ञेचे पालन करा.
180 मी त्यासाठी तुमच्याकडून कोणताही मोबदला मागत नाही, माझा मोबदला
मला त्याच्याकडे मिळणार आहे, जो संपूर्ण विश्वाचा पालनकर्ता आहे. 181
(व्यवहारात नेहमी) माप पुरेपूर भरून द्या आणि (माप व वजनाच्या बाबतीत)
कोणाचेही नुकसान करू नका. 182 योग्य तराजूने वजन करा. 183 तसेच
लोकांना त्यांच्या वस्तू त्यांची फसवणूक करून देऊ नका आणि (असे करून)
भूतलावर अराजकता माजवू नका. 184 त्याची जाण व भय बाळगून असा,
ज्याने तुम्हाला व तुमच्या आधी होऊन गेलेल्यांना निर्माण केले आहे.’

185 ते म्हणाले, ‘तू अन्य काही नसून एक जादूपीडीत मनुष्य आहेस. 186
तू तर केवळ आमच्यासारखाच एक मनुष्य आहेस आणि आम्हाला तर वाटते
की, तू खोटे बोलण्याच्या बाबतीत फार कुशल आहेस. 187 जर तू सत्यवादी
मनुष्य असशील तर आमच्यावर आकाशाचा एखादा तुकडा कोसळेल, असे तू
काही कर.’ 188 (पैगंबर) शुऐब ने उत्तर दिले, ‘तुम्ही जे काही करीत आहात,
ते सर्व माझ्या पालनकर्त्याला चांगले ठाऊक आहे.’ 189 अशाप्रकारे त्यांनी
त्याला खोटे ठरविले, मग त्यांना ढगांनी झाकोळून टाकलेल्या दिवसाच्या
शिक्षेने वेढले. खरोखर ती भयावह दिवसाची शिक्षा होती. 190 निश्चितच, या

कथेत एक संदेश आहे. पण बहुसंख्य लोक (या संदेशापासून बोध ग्रहण करून) श्रद्धा धारण करणार नाहीत. 191 निश्चितच तुमचा पालनकर्ता सर्वशक्तिमान आहे व अत्यंत दयावान आहे.

192 यात मुळीच शंका नाही की, संपूर्ण सृष्टीचा मालक असलेल्या (अल्लाहनेच) हे कुराण प्रकट केले आहे. 193 यास विश्वासपात्र स्वर्गदूताने (अल्लाहकडून) आणले आहे. 194 (अल्लाहच्या आज्ञेने) तुझ्या हृदयावर (म्हणजेच स्मरणपटलावर) प्रस्थापित केले आहे. यासाठी की, तू (लोकांना) सावध करणाऱ्यांपैकी व्हावेस. 195 स्पष्ट अरबी भाषेत. 196 याचे वर्णन आधी आलेल्या ग्रंथांतही आहे. 197 त्यांच्यासाठी हे पर्याप्त प्रमाण नाही का की, बनी इस्राईल (म्हणजे ज्यू)च्या धर्मपंडितांना यासंबंधाने चांगल्याप्रकारे माहीत आहे.

198 जर आम्ही या ग्रंथाला एखाद्या बिगर अरबी माणसावर प्रकट केले असते 199 तर त्याने (या अरबी लोकांना) तो ग्रंथ वाचून दाखविला असता (तरीही) त्यांनी यावर श्रद्धा धारण केली नसती. 200 अशाप्रकारे आम्ही पापी लोकांच्या मनात श्रद्धा धारण न करण्याचे गुण ठासून भरलेले आहे. 201 हे लोक तोपर्यंत यावर विश्वास ठेवणार नाहीत, जोपर्यंत ते दुःखदायक शिक्षा पाहून घेणार नाहीत. 202 ती शिक्षा (ते संकट) त्यांच्यावर अचानकपणे येईल आणि त्यांना त्याची पुसटशी कल्पनादेखील नसेल. 203 तेव्हा ते म्हणतील, ‘आम्हाला काही उसंत मिळू शकेल का?’

204 या लोकांना आमची शिक्षा त्यांच्यावर लवकरात लवकर यावी, असे वाटत आहे की काय? 205 तुम्ही याबद्दल कधी विचार केला का? जर आम्ही काही वर्षांकरिता (जीवनात) त्यांना लाभान्वित होऊ दिले. 206 मग जेव्हा ती (शिक्षा) त्यांच्यावर चालून येईल, ज्यापासून त्यांना सावध केले जात होते. 207 तर त्यांनी काही काळ जी मौजमजा केली त्याचा काय उपयोग? 208 आम्ही कोणत्याही वस्तीला सावध करणारा (पैगंबर) पाठवण्यापूर्वी कधीही नष्ट

केलेले नाही. 209 (असे आम्ही यासाठी केले की, लोकांनी) उपदेश ग्रहण
करावा, कारण आम्ही जुलूम करत नसतो. 210 (हा ईश्वरीय ग्रंथ मानवाकडे)
सैतान घेऊन आलेले नाहीत. 211 कारण ते यासाठी पात्र नाहीत, ना ते असे
करू शकतात. 212 (हा ग्रंथ) ऐकण्यापासून देखील त्यांना दूर ठेवण्यात आलेले
आहे.

213 तर (लोकांनो) तुम्ही अल्लाहबरोबर दुसऱ्या कोणत्याही उपास्याचा
धावा करू नका, अन्यथा तुमचा समावेश शिक्षेस पात्र ठरलेल्या लोकांत होईल.
214 (प्रथम) तुम्ही आपल्या निकटवर्तीयांना सचेत करा. 215 तसेच त्या
लोकांप्रति नेहमी नम्र भाव बाळगा, जे श्रद्धावंत बनून तुमचे अनुसरण करतील.
216 पण जर ते तुमच्या आज्ञेचे पालन करीत नसतील तर त्यांना सांगून टाका,
'तुम्ही जे काही करीत आहात त्याच्या जबाबदारीतून मी स्वत:ला मुक्त करीत
आहे,' 217 आणि तुम्ही त्या (अल्लाहवर) दृढ विश्वास ठेवा, जो सर्वशक्तिमान
व दयावान आहे. 218 तो तुम्हाला पाहत असतो जेव्हा तुम्ही (प्रार्थनेत
त्याच्यासमोर) उभे राहता. 219 तसेच नमाज़ी लोकांसोबत तुम्ही जेव्हा वावरत
असता (तेव्हाही तो तुम्हाला पाहत असतो). 220 तो सर्व काही ऐकणारा व सर्व
काही जाणणारा आहे, यात मुळीच शंका नाही.

221 मी तुम्हाला सांगू का की, सैतान कोणावर अवतीर्ण होतात? 222 ते
प्रत्येक खोटे बोलणाऱ्या पापी माणसांवर अवतीर्ण होत असतात. 223 जे प्रत्येक
खोट्या गोष्टीकडे कान लावतात, त्यांच्यापैकी बहुतेक खोटे बोलणारे असतात.
224 जिथपर्यंत कवींचा संबंध आहे, त्यांचे अनुसरण तर केवळ वाट चुकलेले
लोक करीत असतात. 225 तुम्हाला याची कधी जाणीव झाली नाही का (की,हे
कवी काल्पनिक विश्वाच्या) दऱ्याखोऱ्यांत कशाप्रकारे भटकत असतात? 226
ते स्वत: ज्या गोष्टीवर आचरण करीत नाहीत, अशी गोष्ट बोलून दाखवतात.
227 पण ज्या लोकांनी श्रद्धा धारण केली व ते सत्कर्मे करीत असतात आणि

अल्लाहचे नेहमी जिवंत भाव बाळगून स्मरण करीत असतात आणि ते तेव्हाच स्वत:च्या बचावात पुढे येतात, जेव्हा त्यांच्यावर अन्याय केला जातो (म्हणजे ते दुसऱ्यावर आक्रमण करण्याचा विचारही करू शकत नाहीत). आणि अत्याचारी कृत्य करणाऱ्या लोकांना लवकरच कळून येईल की, त्यांना कोणत्या ठिकाणी परत जायचे आहे.

# सूरह–२७. अन–नम्ल

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] ता० सीन० हे कुराणातील संदेश आहेत, जो एक स्पष्ट संदेश ग्रंथ आहे, (सत्य स्पष्टपणे प्रकट करणारा). [2] हे (संदेश) मार्गदर्शन व शुभवार्ता आहेत श्रद्धावंतांसाठी. [3] जे नित्य नमाज़ाचे पालन करतात आणि दानकार्य करीत असतात, तसेच मृत्युपश्चात जीवनावर दृढ विश्वास बाळगून असतात. [4] जे लोक मृत्युपश्चात जीवनावर विश्वास ठेवत नाहीत, त्यांची (वाईट) कृत्ये आम्ही त्यांच्यासाठी सुशोभित बनविली आहेत. तर ते (आंधळ्याप्रमाणे) भटकत आहेत.

[5] हेच ते लोक आहेत ज्यांच्यासाठी फार मोठी शिक्षा आहे, आणि ते मृत्युपश्चात (अनंतकालीन) जीवनात अशा भयानक नुकसानाला सामोरे जातील (ज्यापासून बाहेर पडणे कदापि शक्य नाही). [6] (श्रद्धावंतांनो!) हे कुराण तुम्हाला अशा एका साक्षात अस्तित्वाकडून प्राप्त झाले आहे, जो बुद्धिमान आहे, सर्व काही जाणणारा आहे.

[7] (ती वेळ आठवा, जेव्हा मूसा व त्याचे कुटुंबीय प्रवास करीत होते,) तेव्हा मूसाने आपल्या कुटुंबीयांना म्हटले, 'मी एक आग पाहिली आहे, मी तेथून काही माहिती प्राप्त करतो, किंवा तुमच्यासाठी काही विस्तव घेऊन येतो, म्हणजे तुम्हाला शेकोटी लावता येईल.' [8] मग जेव्हा तो त्या ठिकाणाजवळ

पोहोचला की, एक आवाज आला की, पावन आहे ते, जे या आगीत आहे आणि जे तिच्या आसपास आहेत. असीम महिमावान आहे अल्लाह, जो संपूर्ण विश्वाचा पालनकर्ता आहे.

9 (त्यानंतर अल्लाहचे मूसाशी संभाषण झाले) ‘हे मूसा! मीच आहे अल्लाह, सर्वशक्तिमान व बुद्धिमान! 10 तू तुझी काठी खाली फेक,’ मग त्याने तिला सापासारखी हालचाल करताना पाहिले. मग तो (भ्याला) व पाठ फिरवून पळू लागला व मागे वळूनही पाहिले नाही. (त्यावर अल्लाहने म्हटले,) ‘हे मूसा, भिऊ नकोस, कारण माझ्यासमोर पैगंबरांना भिण्याचे काही कारण नाही.’ 11 पण ज्याच्याकडून चूक घडली, मग तो, ती वाईट कृत्ये सोडून सत्कर्मे करू लागतो. तर (अशांसाठी) मी फार क्षमाशील व दयाळू आहे. 12 तू तुझा हात आपल्या (शर्टमध्ये) छातीपाशी ठेव, मग (बाहेर काढ) कोणत्याही डागाशिवाय तो पांढरा शुभ्र दिसेल. ही एकूण नऊ निशाण्यांपैकी (एक निशाणी) आहे. यासह फिरऔन आणि त्याच्या लोकांकडे जा. खरोखर ते विद्रोही लोक आहेत. 13 पण जेव्हा त्यांच्याकडे, डोळे उघडणारे आमचे संदेश पोहोचले, तेव्हा ते म्हणाले, ‘ही तर निव्वळ जादू आहे.’ 14 त्यांच्या अंत:करणांना त्यांची सत्यता पटली असतानाही केवळ अन्यायाने व अहंकाराने त्यांना मानण्यास त्यांनी नकार दिला. तर पाहा, अत्याचारी लोकांचा शेवट कसा झाला!

15 आम्ही दाऊद व सुलेमान (या पैगंबरांना) ज्ञान प्रदान केले. ते दोघे म्हणाले, ‘सर्व स्तुतीचा अधिकारी केवळ अल्लाह आहे, ज्याने आपल्या अनेक श्रद्धावंत भक्तांवर आम्हाला श्रेष्ठत्व प्रदान केले आहे.’ 16 (या दिव्य दृष्टीच्या बाबतीत) सुलेमान हा दाऊदचा वारस झाला. तो म्हणाला, ‘लोकांनो! (अल्लाहने) आम्हाला पक्ष्यांची भाषा शिकवली आहे आणि आम्हाला सर्व प्रकारच्या चांगल्या गोष्टी प्रदान करण्यात आलेल्या आहेत. खरोखर, ही अल्लाहची फार मोठी कृपा आहे!’

17 आणि (एके दिवशी) सुलेमानसमोर त्याची सेना, ज्यात जिन्न, मनुष्य व पक्षी यांचा समावेश होता, एकत्र गोळा करण्यात आली. मग त्यांचे वेगवेगळे गट बनविण्यात आले. 18 (एकदा तो आपल्या सेनेबरोबर कूच करीत असताना) जेव्हा ते मुंग्यांच्या खोऱ्यात पोहोचले, तेव्हा एक मुंगी म्हणाली, ‘मुंग्यांनो! आपापल्या घरात जा, अन्यथा सुलेमान व त्याच्या सेनेद्वारे तुम्ही नकळत चिरडले जाल.’ 19 तिचे हे बोलणे ऐकून सुलेमान गालातल्या गालात हसला आणि म्हणाला, ‘हे प्रभू! मला प्रेरणा दे की, मी तुझ्या अनुग्रहाबद्दल (नेहमी) आभार मानत राहावे, जो तू माझ्यावर व माझ्या आईवडलांवर केला आहेस. तसेच तू प्रसन्न होशील अशीच सत्कृत्ये मी करत राहावी (त्याची मला शक्ती प्रदान कर.) तसेच तू आपल्या कृपेने माझा समावेश तुझ्या सदाचारी भक्तांमध्ये कर.’

20 (एके दिवशी) सुलेमानने आपल्या पक्ष्यांची पाहणी केली व म्हटले, ‘काय कारण आहे की, मला हुदहुद ( हा पक्षी) कुठे आढळत नाही, तो जाणूनबुजून कुठेतरी निघून गेला आहे की काय? 21 (असे असेल तर) मी त्याला निश्चितपणे कठोर शिक्षा करेन. किंवा मी त्यास (कापून) हलाल करून टाकेन. किंवा त्यास माझ्यासमोर आपल्या गैरहजेरीचे योग्य कारण द्यावे लागेल.’ 22 मग थोड्याच अवकाशानंतर तो पक्षी तिथे आला व म्हणाला, ‘माझ्या निदर्शनास अशी एक गोष्ट आलेली आहे, जिच्याविषयी तुम्हाला अद्याप माहिती नाही, मी तुमच्याकडे सबा (या नगराची) एक खात्रीपूर्वक खबर आणली आहे. 23 मला असे आढळले आहे की, एक स्त्री आहे, जी तेथील लोकांवर राज्य करते. तिच्याकडे सर्व काही आहे. तिचे फार मोठे सिंहासन आहे. 24 मी पाहिले की, ती व तिचे लोक अल्लाहला सोडून सूर्याची पूजा करतात आणि सैतानाने त्यांची ही कृत्ये त्यांना चांगली वाटावी असे, सुशोभीकरणाचे काम केले आहे आणि त्यांना (अल्लाहच्या) मार्गापासून दूर भलतीकडेच नेले आहे. (अशी

त्यांची अवस्था झाल्यामुळे आता) त्यांना सन्मार्ग लाभणे फार कठीण आहे. 25
त्यांनी अल्लाहची उपासना करायला नको का, जो आकाशातील आणि पृथ्वीवरील
गुप्त गोष्टी उघडकीस आणतो. आणि तो सर्व जाणतो जे तुम्ही लपविता आणि जे
तुम्ही प्रकट करता. 26 'अल्लाह' त्याच्याशिवाय दुसरा कोणीच उपासनेयोग्य
नाही. तोच मालक आहे समस्त विश्वाच्या सत्ताकेंद्राचा.'

27 सुलेमानने म्हटले, 'आम्ही लवकरच पाहू की, तू खरे बोलला आहेस
की, खोटे बोलणाऱ्यांपैकी आहेस. 28 तू माझे हे पत्र घेऊन जा आणि ते
त्यांच्याकडे टाकून दे. मग त्यांच्यापासून बाजूला हो आणि बघ त्यांची त्यावर
प्रतिक्रिया काय असते.' 29 (जेव्हा सबाच्या राणीने ते पत्र वाचले, तेव्हा ती
आपल्या सरदारांना) म्हणाली, 'सरदारांनो! माझ्याकडे एक सन्माननीय पत्र
पाठवण्यात आलेले आहे.' 30 ते सुलेमान कडून आलेले आहे, मजकूर असा
आहे, आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे. 31 (पुढे
लिहिलेले आहे की,) तुम्ही माझ्याविरुद्ध द्रोह करण्याचे प्रयत्न करू नका. तर
आज्ञाधारक बनून माझ्यासमोर हजर व्हा.' 32 (त्यांच्यासमोर पत्र वाचल्यानंतर)
राणी म्हणाली, 'सरदारांनो! (जी समस्या सध्या माझ्यासमोर उभी आहे)
त्याबाबतीत मला सल्ला द्या. मी तुमच्याशी सल्लामसलत केल्याशिवाय (महत्त्वाच्या
विषयावर) कधीही निर्णय घेत नसते.' 33 ते म्हणाले, 'आम्ही शक्तिशाली
आहोत आणि बलाढ्य लढवय्ये आहोत. आता निर्णय आपल्या हाती आहे. तर
कोणता आदेश द्यायचा, यावर आपणच विचार करावा' 34 ती म्हणाली,
'बलाढ्य राजे जेव्हा एखाद्या प्रदेशावर आक्रमण करतात, तेव्हा ते तिथे प्रचंड
नासधूस व (लुटालूट) करतात. आणि तेथील प्रतिष्ठित लोकांना फारच अपमानाची
वागणूक देतात. तर हे देखील तेच करतील. 35 बरे तर मी असे करते की,
त्यांच्याकडे एक नजराणा पाठविते आणि पाहते की, दूत काय उत्तर घेऊन येतो
ते.'

36 जेव्हा (राणीचा दूत) सुलेमानकडे पोहोचला, तेव्हा सुलेमानने त्याला म्हटले, 'तुम्ही माझी धनसंपत्तीद्वारे मदत करू इच्छिता की काय? पण अल्लाहने जे काही मला दिलेले आहे, ते त्यापेक्षा कितीतरी चांगले आहे, जे त्याने तुम्हाला दिले आहे. तुमचा नजराणा तुम्हाला लखलाभ असो. 37 त्यांच्याकडे परत जा, आम्ही त्यांच्यावर अशा फौजा घेऊन चढाई करू, ज्यांचा प्रतिकार ते कदापि करू शकणार नाहीत. मग आम्ही त्यांना तेथून अपमानित करून घालवून देऊ. परिणामी ते अगदी लाचार व मजबूर झालेले असतील.'

38 (जेव्हा सुलेमानला कळाले की, ती राणी येत आहे) तेव्हा तो म्हणाला, 'दरबारी लोकांनो! तुमच्यापैकी कोण तिचे सिंहासन, ते लोक शरणागती पत्करण्यासाठी माझ्याकडे पोहोचण्यापूर्वी, घेऊन येऊ शकतो?' 39 जिन्नांपैकी एक राक्षसी ताकद असलेला जिन्न म्हणाला, 'मी ते तुमच्यासमोर आणून ठेवेन, यापूर्वी की, तुम्ही आपल्या जागेवरून उठाल. मला याचे पूर्ण सामर्थ्य प्राप्त आहे व मी विश्वासपात्रही आहे.' 40 (दरबारी लोकांपैकी) ज्याला (अल्लाहच्या) ग्रंथाचे काही ज्ञान होते, तो म्हणाला, 'मी, तर तुम्ही डोळे लवण्याच्या आधीच आणून ते सादर करेन.' मग जेव्हा सुलेमानने ते (सिंहासन) खरोखर त्याच्यासमोर आणून ठेवलेले पाहिले, तेव्हा तो म्हणाला, 'ही माझ्या पालनकर्त्याची कृपा आहे आणि यासाठी आहे की, तो माझी ही कसोटी पाहू इच्छितो की, मी त्याच्याप्रति कृतज्ञता व्यक्त करणारा बनतो की, कृतघ्नतेचे प्रदर्शन करणारा. तर जो कोणी कृतज्ञता व्यक्त करणारा बनेल तर त्यात त्याचेच भले आहे. जो कोणी कृतघ्नतेचे प्रदर्शन करेल तर (त्याने हे लक्षात ठेवावे की), माझा पालनकर्ता आत्मनिर्भर आहे व फार उदार आहे.

41 मग सुलेमान पुढे म्हणाला, 'तिच्या सिंहासनाची तिला ओळख पटू नये असे करून टाका, म्हणजे हे पाहता येईल की, (सत्य जाणण्याच्या बाबतीत) ती गंभीर आहे किंवा ती त्या लोकांपैकीच आहे, जे (सत्य जाणण्याच्या बाबतीत)

गंभीर नसतात.' 42 जेव्हा ती सुलेमानकडे पोहोचली, तेव्हा तिला विचारण्यात आले, 'तुझे सिंहासन यासारखेच आहे का?' ती म्हणाली, 'हे तर असे दिसते की, जणू काही अगदी तेच आहे. (आणि सुलेमान आपल्या दरबारी लोकांना म्हणाला, 'तिची मदत केल्याशिवाय, तिला सत्य उमजले आहे'). (ती पुढे म्हणाली), आम्हाला याआधीच हे माहीत झाले होते, (की तुम्हाला हे सर्व सामर्थ्य अल्लाहकडून प्राप्त झालेले आहे) आणि आम्ही स्वत:ला अल्लाहसमोर समर्पित केले आहे.' 43 (अशाप्रकारे तिला जीवनाचे सत्य उमजले). त्या गोष्टींनी तिला (सत्या)पासून आत्तापर्यंत दूर ठेवले होते, ज्यांची ती अल्लाहला सोडून उपासना करीत होती, (आधी) ती सत्य नाकारणाऱ्या लोकांपैकी एक होती. 44 (थोड्या वेळानंतर) तिला राजमहालात प्रवेश करण्यासाठी सांगण्यात आले, जेव्हा तिने (महालात प्रवेश केला) व पाहिले तर तिला वाटले तिथे खोल पाण्याचे जलाशय आहे. म्हणून तिने आपल्या पोटऱ्या उघड्या केल्या, सुलेमानने म्हटले, 'हा असा महाल आहे की, काचेच्या लाद्यांपासून ज्याची फरसबंदी केलेली आहे.' ती म्हणाली, 'हे प्रभू! मी (तुला सोडून इतरांची उपासना करून) माझ्या जिवावर अत्याचार करीत राहिले, पण आता मी सुलेमानबरोबर संपूर्ण विश्वाचा पालनकर्ता असलेल्या अल्लाहला स्वत:ला समर्पित करते.'

45 (अशाचप्रकारे) आम्ही समूद (या जमाती) कडे त्यांचा भाऊ सालेह यास (पैगंबर नियुक्त करून, या संदेशासह) पाठविले की, केवळ अल्लाहची उपासना करा, पण त्यांच्यात दोन गट पडले व ते एक दुसऱ्याशी झगडू लागले. 46 सालेह म्हणाला, 'माझ्या बांधवांनो! तुम्ही भल्या गोष्टीपेक्षा वाईट गोष्टीकडे का धाव घेता, तुम्ही अल्लाहकडे क्षमायाचना का करीत नाहीत, कदाचित तुमच्यावर कृपा केली जाईल?' 47 त्यांनी उत्तर दिले, 'आम्ही तर तुला व तुझ्याबरोबर असलेल्यांना अपशकुनी मानतो.' (त्यावर) त्याने उत्तर दिले, 'नाही, (माणसाच्या) (चांगल्या) वाईट नशिबाचे नियंत्रण तर अल्लाहकडेच आहे. पण सत्य हे आहे की, तुम्ही असे

लोक आहात, ज्यांची कसोटी पाहिली जात आहे.'

48 शहरात असे नऊ जण होते, जे भूतलावर केवळ उपद्रव माजवीत असत, ते कोणतेही विधायक कार्य अजिबात करीत नसत. 49 ते म्हणाले, 'तुम्ही सर्वजण अल्लाहच्या नावाने शपथ घेऊन प्रतिज्ञा करा की, आपण सालेह आणि त्याच्याबरोबर असलेल्या लोकांना रात्रीच्या वेळेस अगदी गुपचुपरित्या हल्ला करून ठार करून टाकू. मग (जेव्हा चौकशी अंतर्गत) आम्हास विचारले जाईल तर आपण असे सांगून टाकू, ही घटना जेव्हा घडली, तेव्हा आम्ही तिथे हजरच नव्हतो. आम्ही अगदी सत्य तेच बोलत आहोत.' 50 अशाप्रकारे त्यांनी एक योजना आखली आणि आम्हीदेखील एक योजना आखली, पण त्यांना (आमच्या योजनेची) मुळात जाणीवच नव्हती. 51 तर पाहा, त्यांच्या योजनेचा शेवट कसा झाला तो, आम्ही त्यांना व त्यांच्या लोकांना समूळ नष्ट करून टाकले. 52 त्यांची घरे आता ओसाड पडलेली आहेत, त्यांच्या अत्याचारी कृत्यांपोटी (हे असे झाले). निश्चितच यात संदेश असलेला धडा आहे, त्या लोकांसाठी जे ज्ञानी आहेत. 53 आणि आम्ही त्या लोकांना वाचवले ज्यांनी श्रद्धा धारण केली होती आणि आमची जाण व भय बाळगून जीवन व्यतीत करीत राहिले.

54 अशाचप्रकारे (आम्ही वाचवले) लूतला, जेव्हा तो त्याच्या लोकांना म्हणाला, 'तुम्ही जाणूनबुजून कुकर्म करीत आहात? 55 वासनांध होऊन, तुम्ही आपल्या पत्नींना सोडून, पुरुषांकडे जाता? (असे पापकृत्य तुम्ही का बरे करता?) खरोखर तुम्ही फारच अज्ञानी लोक आहात.' 56 पण त्याच्या लोकांचे याशिवाय दुसरे उत्तर नव्हते, (ते आपसात म्हणाले) '(लूतला व) त्याच्या कुटुंबीयांना आपल्या वस्तीबाहेर घालवून द्या, हे लोक फार शुद्ध चारित्र्याचे बनू पाहतात.' 57 मग आम्ही त्याला व त्याच्या कुटुंबीयांना वाचवले, पण त्याच्या पत्नीला सोडून, तिच्याबाबतीत आमचा निर्णय हा होता की, ती मागे

राहणाऱ्यांसोबत मागेच राहील. 58 आम्ही त्यांच्यावर एक वर्षाव केला विनाशकारी वर्षाव, तर पाहा, किती वाईट होता तो वर्षाव त्यांच्यावर, ज्यांना सावध केले गेले होते (म्हणजे शिक्षा देण्यासाठी पाडलेला पाऊस). 59 (पैगंबर! लोकांना) सांगा, 'सर्व प्रकारच्या स्तुतीचा अधिकारी अल्लाह आहे, तसेच त्याने निवड केलेल्या त्याच्या भक्तांवर शांती आहे (म्हणजे अशा भक्तांना शांती व सुरक्षिततेची अल्लाहकडून ग्यारंटी आहे).' (त्यांना विचारा), 'अल्लाह श्रेष्ठ आहे की, ते ज्यांना (लोक) त्याच्या बरोबरीचे स्थान देतात?'

60 तो कोण आहे, ज्याने आकाश व पृथ्वी यांची निर्मिती केली आणि तुमच्यासाठी आकाशातून (ढगांद्वारे जीवनदायी) पाण्याचा वर्षाव केला. मग त्या पाण्याद्वारे नयनरम्य बागा फुलविल्या. तुमच्यात ते सामर्थ्य कदापि नव्हते की, तुम्ही या झाडांपैकी (एक झाडदेखील) उगवू शकले असते. (तर सांगा,) अल्लाहशिवाय दुसरा कोणी उपास्य असू शकतो का? (जो हे सर्व करू शकतो). वस्तुत: हे लोक (तर्कशुद्ध मार्गापासून) भरकटलेले लोक आहेत. 61 तो कोण आहे, ज्याने पृथ्वीवर जीवनदायी व्यवस्था स्थापित केली? (ज्यामुळे हे वास्तव्य करण्याजोगे ग्रह बनले) आणि कोणी त्यात नद्यांना प्रवाहित केले? तसेच कोणी (पृथ्वीवर) पर्वतांना उभे केले मग (गोड व खाऱ्या) दोन समुद्रांच्या दरम्यान अडसर निर्माण केले. अल्लाहशिवाय दुसरा कोणी उपास्य असू शकतो का? पण त्यांच्यापैकी बहुसंख्य लोक (ज्यांना असे वाटते) त्यांना माहीत नाही (की, ते काय म्हणत आहेत).

62 तो कोण आहे, जो असहायाच्या हाकेला प्रतिसाद देतो, जेव्हा तो त्याचा धावा करतो आणि त्याचे दु:ख दूर करतो. तसेच कोण तुम्हाला पृथ्वीवर तिचे वारस बनवतो. अल्लाहशिवाय दुसरा कोणी उपास्य आहे का? पण तुम्ही लोक अगदी क्वचितच बोध ग्रहण करता. 63 तो कोण आहे, जो जमिनीवर व समुद्राच्या अंध:कारात तुम्हाला मार्ग दाखवतो? तसेच कोण आपल्या पाऊसरूपी कृपावृष्टीपूर्वी

सुखद वार्ता देणारे वारे पाठवतो? अल्लाहशिवाय दुसरी कोणती दैवी शक्ती आहे का? अल्लाह कितीतरी महान आहे त्यापेक्षा ज्यांना ते त्याचे समकक्ष ठरवितात. 64 तो कोण आहे, जो सृष्टीस प्रथम निर्माण करतो, मग त्याची पुनरावृत्ती करतो? तसेच तो कोण आहे, जो तुम्हाला आकाश व जमीन यांतून उपजीविका प्रदान करतो? अल्लाहशिवाय अन्य दैवी शक्तीचे अस्तित्व आहे (असे तुम्हाला वाटते) का? (पैगंबर! त्यांना) सांगा, तुमच्या बोलण्यात तथ्य असेल तर तसे प्रमाण प्रस्तुत करा.

65 (त्यांना) सांगा, 'आकाशात व पृथ्वीवर (म्हणजेच समस्त सृष्टीत), अल्लाहला सोडून कोणीही असा नाही, ज्याला कोणत्याही गोष्टीचे अदृश्य सत्य माहीत आहे.' तसेच त्यांना हेही माहीत नाही की, त्यांना पुन्हा केव्हा उठविले जाणार आहे. 66 तर वस्तुस्थिती ही आहे की, मृत्यूनंतरच्या जीवनाविषयीचे ज्ञान त्यांच्याकडे राहिलेले नाही. ते नेहमी त्याच्या सत्याविषयी साशंक असतात. एवढेच नव्हे तर ते त्याबाबतीत अगदी आंधळे बनलेले आहेत. 67 सत्य नाकारणारे लोक (आश्चर्याने) म्हणतात, 'काय! जेव्हा आम्ही आमच्या वाडवडिलांप्रमाणे माती झालेले असू, तेव्हा आम्हाला पुन्हा जिवंत करून बाहेर काढले जाईल? 68 असे वचन आम्हाला देण्यात आले आणि आमच्याआधी आमच्या वाडवडिलांनाही देण्यात आले होते. हे सर्व अन्य काही नसून पूर्वजांच्या गोष्टी आहेत.' 69 (पैगंबर! त्यांना) सांगा, 'भूतलावर जरा फिरून पाहा, अपराधी लोकांचा शेवट कसा झाला तो.'

70 पैगंबर! त्यांच्याबाबतीत दु:खी होऊ नका, तसेच तुमच्याविरुद्ध ज्या खटपटी ते करीत आहेत, त्याबद्दल कष्टी होऊ नका. 71 ते (तुम्हाला) विचारतात, 'तुमच्या म्हणण्यात काही तथ्य असेल तर (सांगा) की, ते (पुनरुत्थानाचे) वचन केव्हा पूर्ण होणार?' 72 (त्यांना) सांगा, 'ज्या गोष्टीसाठी (अज्ञानापोटी) तुम्ही घाई करीत आहात, त्याचा काही भाग तुमच्या अगदी जवळ येऊन

ठेपलेला असू शकतो.’ 73 यात मुळीच शंका नाही की, तुमचा पालनकर्ता लोकांप्रति फारच कृपावंत आहे, पण त्यांच्यापैकी बहुसंख्य कृतज्ञ नाहीतच. 74 नक्कीच तुमचा पालनकर्ता लोकांच्या मनामध्ये काय दडलेले आहे, ते सर्व चांगल्याप्रकारे जाणतो, तसेच जे ते प्रकट करीत असतात तेही जाणतो. 75 कारण आकाशात व पृथ्वीवर अशी कोणतीही गोष्ट दडलेली नाही, जी (त्याच्या) स्पष्ट ग्रंथात नमूद केलेली नसेल.

76 निश्चितच हे कुराण इस्राईलच्या मुलांवर अनेक गोष्टींचे सत्य स्पष्ट करीत आहे, ज्यांच्याविषयी ते मतभेद बाळगतात. 77 यात मुळीच शंका नाही की, हे (अल्लाहकडून) मार्गदर्शन व कृपा आहे श्रद्धावंतांसाठी. 78 (श्रद्धावंतांनो!) निश्चितपणे तुमचा पालनकर्ता आपल्या (विवेकपूर्ण) आज्ञेद्वारे त्यांच्या दरम्यान निर्णय करेल, तो सर्वशक्तिमान आहे, सर्व काही जाणणारा आहे. 79 तर अल्लाहवर अढळपणे आपला विश्वास ठेवा; तुम्ही सुस्पष्ट अशा सत्याच्या मार्गावर आहात, यात मुळीच शंका नाही. 80 (पैगंबर!) तुम्ही मृतांना (आपला संदेश) ऐकवू शकत नाही. तसेच (मनाने) बहिरे झालेल्यांना देखील (आपला संदेश) तुम्हाला सुनावता येणार नाही, जेव्हा ते पाठ फिरवून निघून जात असतात. 81 तसेच तुम्ही (मनाने) आंधळे झालेल्या लोकांना देखील चुकीच्या मार्गापासून दूर करून सन्मार्ग दाखवू शकत नाही. तुम्ही तर त्यांनाच ऐकवू शकता (म्हणजे त्यांनाच ऐकवणे अर्थपूर्ण ठरणार आहे), जे (स्वेच्छेने) आमच्या संदेशांवर विश्वास ठेवतात आणि आमच्याप्रति स्वतःला समर्पित करून टाकतात.

82 जेव्हा ती घटका (म्हणजे न्यायाचा दिवस) त्यांच्यावर येऊन ठेपेल, तेव्हा आम्ही जमिनीतून एक दाब्बह बाहेर काढू जो त्यांच्याशी संभाषण करेल, (म्हणेल) लोकांची आमच्या संदेशांवर खऱ्या अर्थाने श्रद्धा नव्हतीच.

83 त्या दिवशी आम्ही प्रत्येक जनसमूहातून अशा लोकांचा एक वेगळा गट करू, जे आमच्या संदेशांना खोटे ठरवीत असत. मग (परत त्यांच्या अपराधांच्या

तीव्रतेनुसार) त्यांचे वेगवेगळे गट पाडले जातील. 84 मग जेव्हा ते (सुनावणीसाठी) हजर होतील, तेव्हा अल्लाह म्हणेल, 'तुम्हाला यासंबंधाने उचित ज्ञान नसतानाही, तुम्ही (केवळ हट्टापोटी) माझ्या संदेशांना खोटे ठरविलात ना? जर असे नाही तर तुम्ही दुसरे काय करीत होता?' 85 त्यांच्याविरुद्ध फैसला सुनावला जाईल, या कारणास्तव की, त्यांचे अत्याचारी कृत्य (सिद्ध) झालेले असेल. (सबबी बोलून दाखवण्यासाठी) ते एक शब्द देखील उच्चारू शकणार नाहीत (म्हणजे ते अगदी अवाक झालेले असतील). 86 ते (चिंतनपूर्वक) हे पाहत नाहीत का की, आम्ही रात्र बनविली, यासाठी की, त्यांना विश्रांती घेता यावी, तसेच त्यांना पाहता यावे, यासाठी दिवसाला प्रकाशमान बनविले. यामध्ये (अल्लाहच्या सामर्थ्याच्या) निशाण्या आहेत, विश्वास ठेवणाऱ्या लोकांसाठी.

87 ज्या दिवशी शिंग फुंकले जाईल, तेव्हा सर्व (प्राणिमात्र) जे आकाशात आहेत व जे पृथ्वीवर आहेत. त्याच्या भीतीने भांबावून जातील. पण यापासून ते लोक सुरक्षित असतील, ज्यांच्याबाबतीत अल्लाहची इच्छा असेल. तेव्हा ते सर्वजण विनम्र होऊन त्याच्यासमोर हजर होतील. 88 तुम्ही पर्वतांना पाहता आणि तुम्हाला (सध्या) वाटते की, ते भक्कमपणे अढळ अवस्थेत आहेत. पण (पुनरुत्थानाचे शिंग फुंकल्यानंतर) हे (पर्वत) ढग चालतात तसे चालू लागतील. हे सर्व अल्लाहच्या कार्यकुशलतेचे प्रतीक आहे, ज्याने प्रत्येक वस्तूस परिपूर्ण घडवले (म्हणजे प्रत्येक वस्तू त्याने अंतिम मॉडलवर घडविलेली आहे). निश्चितच तो ते सर्व जाणतो, जे तुम्ही करीत असता. 89 जो कोणी (त्याच्यासमोर अशा अवस्थेत) हजर होईल की, त्याने चांगली कृत्ये केलेली असतील तर त्याला अधिक चांगले फळ मिळेल. तसेच ते त्या दिवसाच्या दहशतीपासून सुरक्षित असतील. 90 तसेच जो कोणी अशा अवस्थेत येईल की, त्याने पापकर्म केलेले असतील तर अशा लोकांना तोंडघशी आगीत लोटून देण्यात येईल. (आणि त्यांना विचारले जाईल) तुम्हाला तुमच्या कृत्यांनुसार योग्य तोच मोबदला

मिळाला का?

[91] (पैगंबर! त्यांना सांगा) 'मला असा आदेश देण्यात आला आहे की, मी या शहराच्या पालनकर्त्याचीच उपासना करावी, ज्याने याला आदरणीय (स्थळ) ठरविले आहे. आणि सर्व काही त्याचेच आहे. तसेच मला असाही आदेश देण्यात आलेला आहे की, मी अल्लाहला (आपले जीवन) समर्पित करून टाकावे
[92] आणि त्याचबरोबर हा आदेश आहे की, (जगवासीयांना) कुराणाच्या संदेशाने अवगत करावे.' मग जो कोणी सन्मार्गाचा अंगीकार करेल, तर स्वत:च्या कल्याणासाठीच करेल आणि जो कोणी (हा संदेश पोचविल्यानंतरही) भ्रष्ट मार्गावरच मार्गस्थ राहील. तर तुम्ही सांगून टाका, 'मी केवळ सावध करणारा
आहे.' [93] आणि सांगा, 'सर्व स्तुती केवळ अल्लाहसाठीच आहे, तो तुम्हाला त्याच्या खुणा अवश्य दाखवेल, मग तुम्ही त्यांना ओळखून घ्याल.' तसेच तुमचा पालनकर्ता त्यापासून अनभिज्ञ नाही, जे काही तुम्ही करीत आहात.'

# सूरह-२८. अल-क़सस

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] ता० सीन० मीम० [2] ही स्पष्ट ग्रंथातील संदेशवचने होत. [3] श्रद्धावंत लोकांनी बोध ग्रहण करावे यासाठी, आम्ही तुम्हाला मूसा व फिरऔन यांच्या
कहाणीचा वस्तुस्थितीवर आधारित काही भाग कथन करीत आहोत. [4] (इजिप्तचा राजा) फिरऔन हा भूतलावर फारच मगरूरीचे वर्तन करीत होता, त्याने (आपल्या राज्यातील) लोकांना विविध गटांमध्ये (भेदभावपूर्वक) विभागून टाकले होते. त्यांपैकी एका गटास तर त्याने फारच असहाय करून सोडले होते. तो त्यांच्या मुलांची हत्या करीत असे आणि त्यांच्या मुलींना जिवंत ठेवीत असे. निश्चितच
तो पृथ्वीवर अनाचार माजविणाऱ्यांपैकी होता. [5] आम्ही असे ठरविले की, त्या लोकांवर आपली कृपा करावी, जे भूतलावर फारच छळले गेले होते. (आम्ही

इच्छिले की), त्यांना प्रमुख बनवावे व (आमच्या कृपा प्रसादांचे) त्यांना वारस ठरवावे. [6] त्यांना भूतलावर सत्ताधिकार द्यावे. फिरऔन व हामान व त्यांची सेना या सर्वांना त्यांच्याकडून (म्हणजे इस्राईलच्या मुलांद्वारे) ते दाखवून द्यावे, ज्याचे ते भय बाळगून होते.

[7] (मूसा जन्माला आल्यानंतर) आम्ही मूसाच्या आईला असा प्रेरणासंदेश दिला की, 'त्याला दूध पाजवीत राहा, पण जेव्हा त्याच्याबाबतीत चिंता होईल (की, तो राजाच्या मुलांना मारण्याच्या मोहिमेचा बळी ठरू शकतो) तेव्हा तू त्याला (एका पेटीत ठेवून) नदीत सोडून दे. आणि भिऊ नकोस व दु:खीही होऊ नकोस. आम्ही त्याला तुझ्याकडे (सुरक्षित) परत आणू आणि त्याला पैगंबरांपैकी एक पैगंबर बनवू.' [8] मग फिरऔनच्या कुटुंबातील लोकांनी (नकळत) त्याला यासाठी उचलून बाहेर काढले की, पुढे चालून तोच त्यांचा शत्रू व त्यांच्या दु:खास कारणीभूत व्हावा. यात मुळीच शंका नाही की, फिरऔन व हामान व त्यांचे सैन्य हे सर्व अपराधी लोक होते. [9] आणि फिरऔनची पत्नी म्हणाली, 'हे (सुंदर बाळ) माझ्यासाठी व तुमच्यासाठी नेत्रसुख ठरेल. यास ठार करू नका. कदाचित तो आपल्यासाठी लाभप्रद ठरेल. किंवा (पुढे) आपण यास पुत्र म्हणून दत्तकही घेऊ शकतो.' (पण) ते काय करीत आहेत, याची त्यांना जाणीव नव्हती.

[10] तिकडे मूसाच्या आईच्या मनातील बेचैनी खूपच वाढली. तिने (आमच्या वचनांवर) अढळ श्रद्धा ठेवावी म्हणून आम्ही तिच्या मनाला (विशेष) बळकटी प्रदान केली नसती तर तिने हे रहस्य निश्चितपणे (सर्वांसमोर) बोलून टाकले असते. [11] ती मूसाच्या बहिणीला म्हणाली, 'तू त्याच्या मागे-मागे जा.' आणि ती (मुलगी) दुरून (त्या पेटीवर) अनोळखी व्यक्तीप्रमाणे निरीक्षण ठेवून होती आणि या गोष्टीची त्या लोकांना मुळीच जाणीव झाली नाही. [12] आणि आम्ही आधीच मूसाच्या बाबतीत असे केले होते की, त्याने आयांचे दूध पिण्यास

नकारच द्यावा. तेव्हा ती मुलगी म्हणाली, ‘मी तुम्हाला अशा कुटुंबाविषयी सांगू का (जेथील दाई) या (बाळाचा) तुमच्यासाठी सांभाळ करेल आणि याची चांगल्याप्रकारे काळजी घेईल.’
13 अशाप्रकारे आम्ही त्याला त्याच्या आईकडे परतविले. यासाठी की, (आपल्या बाळाला पाहून) तिचे डोळे सुखावले जावे आणि तिने दु:खी–कष्टी होऊ नये. तसेच तिने जाणून घ्यावे की, अल्लाहचे वचन नेहमी सत्य ठरते. पण बहुसंख्य लोकांना या गोष्टीची जाण नाही.
14 मग जेव्हा मूसा पूर्णपणे प्रौढावस्थेत पोहोचला आणि (मनाने) पूर्णपणे परिपक्व बनला, तेव्हा आम्ही त्याला विवेक व ज्ञान प्रदान केले. आम्ही चांगली कर्मे करणाऱ्यांना अशाप्रकारे फळ देत असतो.

15 (एके दिवशी) त्याने शहरात अशा वेळेस प्रवेश केला की, तेथील बहुसंख्य लोक (आपापल्या निवासस्थानी आराम करीत होते, म्हणजे त्याच्यावर) कोणाचीही दृष्टी पडली नाही. तेव्हा त्याने दोन माणसे आपसात लढत असल्याचे पाहिले. एक त्याच्या स्वत:च्या जमातीचा होता आणि दुसरा त्याच्या शत्रू पक्षातील होता. तर जो (मूसाच्या) जमातीपैकी होता, त्याने त्याच्या शत्रू पक्षातील व्यक्तीच्या विरुद्ध मूसाकडे मदतीची मागणी केली. तेव्हा मूसाने त्या माणसाला एक ठोसा लगावला आणि त्यात त्याचा मृत्यू झाला. (या घटनेने मूसा अगदी पश्चात्तापाने स्तब्ध झाला) म्हणाला, ‘हे तर (माझ्या हातून) सैतानी कृत्य घडले. खरोखर सैतान माणसाचा शत्रूशिवाय अन्य कोणी नाही, (माणसाला) मार्गभ्रष्ट करणारा.’
16 त्याने (अल्लाहकडे) प्रार्थना केली, ‘हे प्रभू! मी स्वत:वर अन्याय करून बसलो, म्हणून तू मला क्षमा कर.’ तेव्हा अल्लाहने त्याला क्षमा केली. खरोखर तो फार क्षमाशील व दयाळू आहे.
17 त्याने म्हटले, ‘हे प्रभू! ज्याप्रमाणे तू (मला क्षमादान देऊन) फार मोठे उपकार माझ्यावर केले आहेस, तर मीही (तुला असे वचन देतो की, यापुढे) मी अपराधी लोकांचा साहाय्यकर्ता कधीही बनणार नाही.’

[18] दुसऱ्या दिवशी सकाळी उठून भीत–भीत व सावधगिरी बाळगत तो शहरातून जात होता. तेव्हा पाहतो तर काय? तोच माणूस ज्याने आदल्या दिवशी त्याची मदत मागितली होती, तोच आज पुन्हा (मूसाला) मदतीसाठी बोलावत आहे. मूसाने त्याला म्हटले, 'तू खरोखर वाट चुकलेला माणूस आहेस.' [19] जेव्हा मूसा त्याला पकडून (बाजूला करण्याच्या उद्देशाने) पुढे सरसावला, जो त्या दोघांचा शत्रू होता. तेव्हा तो मनुष्य म्हणाला, 'मूसा, तू मला ठार करू इच्छितोस की काय, ज्याप्रमाणे तू काल एका माणसाला ठार केलेस? तुझ्या (वर्तनावरून) असे वाटते की, तुला भूतलावर दादागिरी करत राहायचे आहे. आणि तुला भल्या माणसाप्रमाणे राहायचे नाही (म्हणजेच तुला काही समाजसुधारक वगैरे बनायचे नाही).' [20] (तेव्हा) शहराच्या दुसऱ्या टोकाहून एक मनुष्य तिथे धावत आला व म्हणाला, 'मूसा! राजवाड्यातील पदाधिकारी तुला मृत्युदंड देण्याविषयी सल्लामसलत करीत आहेत, तर तू येथून (लवकर) निघून जा, निश्चितपणे मी तुझ्या हितचिंतकांपैकी आहे.' [21] हे ऐकून तो तिथून निघाला, भीत–भीत व दक्षता बाळगत, त्याने (अल्लाहकडे) प्रार्थना केली, 'हे प्रभू! मला या अत्याचारी लोकांपासून वाचव.'

[22] जेव्हा तो मदियनच्या दिशेने मार्गस्थ झाला, तेव्हा तो (स्वत:शीच) म्हणाला, 'मला खात्री आहे, माझा पालनकर्ता मला (अवश्य) सन्मार्ग दाखवील.' [23] जेव्हा तो मदियनच्या पाणवठ्याजवळ पोहोचला तेव्हा तिथे त्याने लोकांचा एक समूह (आपल्या गुराढोरांना) पाणी पाजवत असल्याचे पाहिले. आणि त्यांच्यापासून दूर काही अंतरावर दोन स्त्रिया आपल्या कळपाला रोखून उभी असल्याचे त्याला आढळले. मूसाने त्यांना विचारले, 'तुमची काय अडचण आहे?' त्यांनी उत्तर दिले, 'ते गुराखी जोपर्यंत आपले कळप घेऊन तिथून निघून जात नाहीत तोपर्यंत, आम्ही (आमच्या कळपाला) पाणी पाजवू शकत नाही. आणि आमचा पिता फार वृद्ध आहे (म्हणजे आमचा पिता कळपाला पाणी

पाजवायला स्वत: येऊ शकत नाही).’ 24 (हे ऐकून) मूसा ने त्यांच्या कळपाला पाणी पाजविले. मग तो तेथून बाजूला झाला व एके ठिकाणी सावली खाली जाऊन (बसला). मग (अल्लाहकडे) प्रार्थना केली, ‘हे प्रभू! तू आपल्या कृपेने, जी कोणती भली गोष्ट मला प्रदान करशील, त्याचा मी खरोखर गरजू आहे.’

25 मग थोड्याच वेळानंतर त्या दोघांपैकी एक (मुलगी) लाजत-लाजत त्याच्याकडे आली व म्हणाली, ‘माझ्या वडिलाने तुम्हाला बोलाविले आहे, ते यासाठी की, तुम्ही आमच्यासाठी आमच्या कळपाला पाणी पाजवले त्याबद्दल तुम्हाला मोबदला द्यावा.’ मग जेव्हा तो त्याच्याकडे आला व त्याने त्याला आपली संपूर्ण जीवन कहाणी ऐकविली, तेव्हा तो म्हणाला, ‘भिऊ नकोस, आता त्या अत्याचारी लोकांपासून तू सुरक्षित आहेस.’ 26 त्याच्या दोन मुलींपैकी एक म्हणाली, ‘हे बाबा! या माणसाला आपल्याकडे कामासाठी (याचा काही मेहनताना ठरवून) ठेवून घ्या. कारण कामावर ठेवण्यासाठी सर्वोत्तम माणूस तो असतो, जो धडधाकट व विश्वासपात्र असतो (जसा हा वाटतो).’ 27 (काही वेळानंतर तो वृद्ध माणूस मूसाला) म्हणाला, ‘माझी अशी इच्छा होत आहे की, माझ्या या दोन मुलींपैकी एकीचा विवाह तुझ्याशी लावून द्यावा, ते या अटीवर की, तू आठ वर्षे माझ्याकडे नोकरी करावी. जर तू दहा वर्षे पूर्ण करशील तर ते तुझ्या इच्छेवर अवलंबून आहे. मी माझ्यातर्फे तुझ्यावर कोणतेही कष्ट लादू इच्छित नाही. अल्लाहने इच्छिले तर मी तुला एक भला माणूस असल्याचे आढळेल.’ 28 मूसाने म्हटले, ‘ठीक आहे, ही गोष्ट तुमच्या आणि माझ्या दरम्यान निश्चित समजा, या दोन मुदतींपैकी मी कोणतीही मुदत पूर्ण केली तरी माझ्यावर (नंतर) दोष ठेवला जाऊ नये. आणि आम्ही जे काही बोलत आहोत, त्यावर अल्लाह साक्षी आहे.’

29 मग जेव्हा मूसाने ती मुदत पूर्ण केली, तो आपल्या कुटुंबीयांना घेऊन निघाला. (प्रवासादरम्यान) त्याला तूर पर्वताच्या दिशेस आग दिसली. तो

आपल्या कुटुंबीयांना म्हणाला, 'तुम्ही इथे थांबा, मी एक आग पाहिली आहे, कदाचित तिथून मला काही माहिती प्राप्त होईल किंवा मी आगीचा एखादा जळता निखारा घेऊन येतो, म्हणजे तुम्हाला शेकोटी लावता येईल.'
30 मग जेव्हा तो तिथे पोहोचला, तेव्हा त्या पवित्र ठिकाणी, त्या खोऱ्याच्या उजव्या बाजूने झाडांमधून त्याला आवाज देण्यात आला, 'हे मूसा! मी अल्लाह आहे, संपूर्ण विश्वाचा (चा) मालक.'
31 तर तू 'तुझी काठी खाली फेक, (तेव्हा मूसा पाहतो तर काय!) ती काठी हालचाल करू लागली, जणू काही ती साप आहे. तर तो पाठ फिरवून पळाला व मागे वळूनही पाहिले नाही.' (तेव्हा अल्लाह पुढे म्हणाला), 'हे मूसा! पुढे ये आणि भिऊ नकोस. तू पूर्णपणे सुरक्षित आहेस.
32 आता आपला हात छातीजवळ (शर्टच्या) आत ने (व नंतर बाहेर काढ) तो पांढराशुभ्र होऊन बाहेर निघेल, कोणत्याही दोषाविना. तसेच आपली भिती घालवण्यासाठी, आपला बाहू आपल्या अंगाकडे खेचून घे. तर हे दोन (संदेशसूचक) प्रमाण) आहेत तुझ्या पालनकर्त्याकडून, फिरऔन व त्याच्या सरदारांसाठी. निश्चितच ते विद्रोही लोक आहेत.'

33 मूसाने म्हटले, 'हे प्रभू! माझ्या हातून त्यांच्या जमातीपैकी एक माणूस ठार झाला, म्हणून मला अशी भिती वाटते की, ते मला ठार करतील.
34 आणि माझा भाऊ हारून, जो बोलण्यात माझ्यापेक्षा अधिक वाक्पटू आहे. तर तू त्याला माझ्याबरोबर साहाय्यक बनवून पाठव की, त्याने माझे (सर्व प्रकारे) समर्थन करावे. कारण मला अशी भीती वाटते की, ते मला खोटे ठरवतील.'
35 अल्लाहने म्हटले, 'आम्ही तुझ्या भावाकरवी तुला बळकटी प्रदान करू आणि तुम्हा दोघांना असे सामर्थ्य देऊ की, ते (कोणत्याही प्रकारे) तुम्हाला इजा पोचवू शकणार नाहीत. तर (आता) आमच्या संदेश असलेल्या खुणांसह (तुम्ही दोघे) निघा. तुम्ही व जे तुमचे अनुसरण करतील तेच वर्चस्व प्राप्त करतील.'

36 मग जेव्हा मूसा त्यांच्याकडे आमच्या स्पष्ट संदेश असलेल्या निशाण्यांसह

पोहोचला. (तेव्हा फिरऔन व त्याचे सरदार) म्हणाले, ‘हे दुसरे काही नसून फसवणूक करणारी जादू आहे. असे काही आम्ही आमच्या वाडवडिलांकडून कधीही ऐकलेले नाही.’ 37 तेव्हा मूसा म्हणाला, ‘माझा पालनकर्ता चांगल्याप्रकारे जाणतो की, कोण त्याच्याकडून मार्गदर्शन घेऊन आलेला आहे, तसेच यानंतरच्या जगात कोणाला स्वर्गीय निवासस्थान मिळणार आहे (हेही तो जाणतो). यात मुळीच शंका नाही की, अत्याचारी लोक कधीही यशस्वी होणार नाहीत.’ 38 तेव्हा फिरऔन म्हणाला, ‘हे सरदारांनो! तुमच्यासाठी माझ्याशिवाय दुसरा कोणी उपास्य असल्याचे मी जाणत नाही. तर हे हामान! माती भाजून तयार झालेल्या विटांपासून माझ्यासाठी एक उंच अशी इमारत बांधून काढ, म्हणजे मला त्यावर चढून मूसाच्या पालनकर्त्याला डोकावून पाहता येईल. (कारण) मला हा एक खोटारडा माणूस वाटतो.’

39 अशाप्रकारे त्याने व त्याच्या सैन्याने भूतलावर कोणतेही न्याय्य कारण नसताना आपल्या मगरुरीचे प्रदर्शन केले. कारण त्यांनी स्वत:शी असा समज करून घेतला की, त्यांना आमच्याकडे कधीही परतून जावे लागणार नाही. 40 (शेवटी) आम्ही त्याला व त्याच्या सैन्यास पकडले आणि त्यांना समुद्रात फेकून दिले. तर पाहा, अत्याचारी लोकांचा शेवट कसा झाला तो! 41 आम्ही त्यांना (समाजात) अग्रणी स्थान प्रदान केले होते, पण त्यांनी (लोकांना नरकाच्या) आगीकडे बोलावण्याचेच काम केले. म्हणून न्यायाच्या दिवशी त्यांना कोणतेही साहाय्य मिळणार नाही. 42 या जगात एक शाप त्यांचा पाठलाग करीत राहील (अशी) आम्ही व्यवस्था केली. मग न्यायाच्या दिवशी तर ते सर्व प्रकारच्या चांगल्या गोष्टीपासून पूर्णपणे वंचित झालेल्या अवस्थेत असतील. 43 आधीच्या (अपराधी) पिढ्यांचा नायनाट केल्यानंतर आम्ही मूसाला ग्रंथ प्रदान केले. जे लोकांसाठी डोळे उघडण्याचे साधन होते आणि मार्गदर्शन व कृपा, हे यासाठी की, त्यांनी उपदेश ग्रहण करावे.

44 (पैगंबर!) तेव्हा तुम्ही काही (तूर) पर्वताच्या पश्चिम दिशेस उपस्थित नव्हता, जेव्हा आम्ही मूसाकडे आमचे आदेश सोपवले होते, ना तिथे तुम्ही प्रत्यक्षदर्शींपैकी होता. 45 पण आम्ही (त्यांच्या आणि तुमच्यामध्ये) कित्येक पिढ्या उभ्या केल्या होत्या. मग त्यांच्यावर एक दीर्घ कालखंड लोटला. तसेच तुम्ही मदियनच्या लोकांमध्येही त्यांना आमचे संदेश ऐकविण्यासाठी राहत नव्हता. पण आम्ही (लोकांकडे नेहमी आमचे) संदेशवाहक पाठवीत आलो आहोत. 46
जेव्हा आम्ही मूसाला हाक दिली, तेव्हाही तुम्ही काही तूर पर्वताजवळ नव्हता. पण आम्ही तुम्हालाही (लोकांकडे त्यांच्या) पालनकर्त्याच्या कृपेच्या रूपाने पाठवले आहे. यासाठी की, तुम्ही त्या लोकांना सावध करावे ज्यांच्याकडे तुमच्याआधी कोणीही सावध करणारा पाठविण्यात आला नव्हता, ते अशासाठी की, लोकांनी उपदेश ग्रहण करावे.

47 (पैगंबर पाठवण्यामागचे एक कारण हेही आहे की), जेव्हा त्यांच्या कुकृत्यांपोटी एखादे संकट त्यांच्यावर आल्यास, (न्यायाच्या दिवशी त्यांना) असे म्हणण्याची संधी प्राप्त होऊ नये, 'हे आमच्या पालनकर्त्या! तू आमच्याकडे एखाद्या पैगंबराला का पाठविले नाहीस, म्हणजे आम्हाला तुझ्या संदेशांचे पालन करता आले असते. आणि आम्ही श्रद्धावंत बनून (तुझ्याकडे आलो असतो).'
48 पण जेव्हा आमच्याकडून सत्याचा (संदेश) त्यांच्याकडे येऊन पोचला, तेव्हा ते म्हणाले, 'ज्याप्रमाणे मूसाला (चमत्कार) देण्यात आले होते, त्याप्रमाणे याला का देण्यात आले नाही?' पण लोकांनी त्या गोष्टीलाही स्वीकारण्यास यापूर्वी नकारच दिलेला नाही का, जी मूसाला प्रदान करण्यात आली होती? (त्यावर) ते म्हणाले '(मूसा व मुहम्मद) या दोघांचे जे काही आहे, एकमेकास साहाय्यक असे जादूचेच प्रकार आहेत.' तसेच ते पुढे म्हणाले, 'आम्ही दोघांनाही स्वीकार करण्यास नकार देतो.'

49 (पैगंबर) त्यांना सांगा, 'तुम्ही अल्लाहकडून असा एखादा ग्रंथ घेऊन

या, जो या दोघांपेक्षाही अधिक चांगला मार्गदर्शक असेल. तेव्हा मी त्याचे (अवश्य) अनुसरण करेन. तुम्ही तुमच्या विधानात खरे असाल तर (असे करूनच दाखवा).' 50 जर त्यांनी तुमच्या या म्हणण्याला काही प्रतिसाद दिला नाही तर हे जाणून घ्या की, ते (सत्याला सोडून) केवळ आपल्या दुष्ट मनोकामनाचे अनुसरण करीत आहेत. त्यापेक्षा अधिक वाट चुकलेला कोण असू शकतो, जो अल्लाहच्या मार्गदर्शनाला सोडून केवळ आपल्या मनोकामनांच्या मागे धावत आहे. यात मुळीच शंका नाही की, अल्लाह अत्याचारी लोकांना मार्गदर्शन करीत नाही. 51 आम्ही त्यांच्याकडे वेळोवेळी आपला संदेश पोचवीत राहिलो, या उद्देशाने की, त्यांनी उपदेश ग्रहण करावा.

52 यापूर्वी ज्या लोकांना आम्ही ग्रंथ दिला होता (त्यांच्यापैकी सुजाण व सत्यप्रिय लोक) या कुराणावर विश्वास ठेवणारे आहेत. 53 जेव्हा त्यांना हे (कुराण) ऐकविले जाते, तेव्हा ते म्हणतात, 'आम्ही यावर विश्वास ठेवतो, हे सत्य आहे आमच्या पालनकर्त्याकडून, यात मुळीच शंका नाही. हे आमच्याकडे येण्यापूर्वीपासूनच आम्ही (अल्लाहला) समर्पित झालेलो आहोत.' 54 हे असे लोक आहेत की, त्यांना त्यांच्या सहनशीलतेबद्दल दुप्पट मोबदला प्रदान केला जाईल. तसेच ते वाईट कृत्यांना चांगल्या कृत्यांद्वारे दूर करतात आणि आम्ही त्यांना जे काही दिलेले आहे, त्यातून खर्च करीत असतात. 55 आणि जेव्हा व्यर्थ गोष्टी ते ऐकतात, तेव्हा ते (त्यामध्ये अजिबात रस न घेता). त्यापासून दूर होतात आणि म्हणतात, 'आम्ही आमच्या कृत्यांसाठी (जबाबदार आहोत) आणि तुम्ही तुमच्या कृत्यांसाठी (जबाबदार आहात). तुम्हाला शांती लाभो (ही आमच्याकडून सदिच्छा). आम्ही असमंजस लोकांशी वाद घालू इच्छित नाही.'
56 (पैगंबर!) तुम्ही आपल्या मर्जीप्रमाणे वाटेल त्यास सन्मार्गावर आणू शकत नाही. तर अल्लाह ज्याच्याबाबतीत इच्छितो त्यास सन्मार्गी लावतो. तसेच तो चांगल्याप्रकारे जाणतो की, कोण मार्गदर्शनाचा स्वीकार करणारा आहे.

57 ते म्हणतात (म्हणजे मक्कावासी), ‘आम्ही जर तुझ्याबरोबर या मार्गदर्शनाचे अनुसरण करू लागलो तर आम्ही आमच्या भूमीतून उपटून फेकले जाऊ. आम्ही यांना शांततापूर्ण (मक्का) शहरात स्थापित केले नाही का, जिथे आमच्याकडून उपजीविका म्हणून सर्व प्रकारची फळे आणली जातात? पण या (सत्यापासून) बहुसंख्य लोक अनभिज्ञ आहेत.

58 आम्ही अशा कित्येक वस्त्या नष्ट करून टाकलेल्या आहेत, जेथील लोक आपल्या विपुल धनसंपत्तीमुळे फारच उन्मत्त बनले होते. तर त्यांच्या त्या सर्व वस्त्या त्यांच्यानंतर ओसाड पडलेल्या आहेत, पण क्वचितच (एखाद्या ठिकाणी) कोणी वसले आहे. मग आम्हीच त्यांचे वारस झालो (कारण सर्व संपून गेल्यानंतर आम्हीच सर्वांचे वारस असणार). 59 (लोकांनो!) तुमचा पालनकर्ता तोपर्यंत वस्त्यांना कधीही नष्ट करीत नसतो, जोपर्यंत (त्यांच्या वस्त्यांपैकी) एका मोठ्या वस्तीत पैगंबराला पाठवीत नाही, जो त्यांना आमचे संदेश ऐकवतो. आम्ही तेथील लोक अत्याचारी कृत्ये करणारे असल्याशिवाय वस्त्यांना नष्ट करीत नसतो.

60 जे काही तुम्हाला देण्यात आले आहे, ते तर या जीवनासाठी तात्पुरती तरतूद, व (क्षणभंगुर) शोभेचे साधन आहे आणि जे काही अल्लाहकडे आहे, ते अधिक चांगले व चिरकाल टिकणारे आहे. तर मग तुम्ही बुद्धीचा वापर करीत नाही का? 61 तो माणूस ज्याला आम्ही चांगल्या गोष्टीचे वचन दिले आहे आणि ती (गोष्ट) त्याला निश्चितपणे मिळणार आहे, असा माणूस त्या माणसासारखा होऊ शकतो का, ज्याला आम्ही केवळ याच जगातील जीवन काही काळ उपभोगण्याची संधी दिली आणि न्यायाच्या दिवशी ज्याला (अल्लाहसमोर) जाब देण्यासाठी हजर करण्यात येईल?

62 त्या दिवशी अल्लाह त्यांना बोलावून विचारील की, ते आता कुठे आहेत, ज्यांना तुम्ही माझ्या ईश्वरत्वात (मध्ये) भागीदार ठरवले होते? 63

(तेव्हा तेही हजर केले जातील आणि) त्यांच्याबाबतीत शिक्षेचा निर्णय झालेला असेल, ते म्हणतील, 'हे आमच्या पालनकर्त्या! हेच ते लोक आहेत, ज्यांना आम्ही चुकीच्या मार्गाकडे नेले. आम्ही त्यांना त्याचप्रमाणे (मुळीच सक्ती न करता) चुकीच्या मार्गाकडे नेले, ज्याप्रमाणे आम्ही स्वत: (स्वेच्छेने) चुकीच्या मार्गाचा अंगीकार केला होता. (हे प्रभू! आता) आम्ही त्यांच्याशी असलेले आमचे संबंध तुझ्यासमक्ष तोडून टाकत आहोत. ते ज्यांची उपासना करीत होते, ते आम्ही नव्हतोच.'

64 तेव्हा त्यांना सांगितले जाईल, 'आता त्यांना बोलवा, ज्यांना तुम्ही (अल्लाहच्या ईश्वरत्वात) सहभागी ठरवले होते.' ते त्यांना (मदतीसाठी) बोलावतील, पण (त्या खोट्या उपास्यांकडून) त्यांना मुळीच प्रतिसाद मिळणार नाही. ते स्वत:च्या डोळ्यांनी (आपली) शिक्षा समोर असल्याचे पाहतील. कदाचित त्यांनी मार्गदर्शनाचा स्वीकार केला असता तर (ही शिक्षा टाळता आली असती). 65 तसेच त्या दिवशी अल्लाह त्यांना बोलावून विचारील, 'तुम्ही आमच्या संदेशवाहकांना कसा प्रतिसाद दिला होता (जेव्हा ते तुमच्याकडे संदेश घेऊन आले होते).' 66 त्या दिवशी ते अक्षरश: मुके होतील (त्यांचे सर्व वादविवाद व सबबी तेव्हा हरवलेले असतील) तर ते एकमेकांशी काही विचारपूसदेखील करू शकणार नाहीत. 67 पण जो पश्चात्तापदग्ध होऊन श्रद्धा धारण करतो आणि चांगली कृत्ये करू लागतो. तर अशा माणसाचा समावेश संभवत: यशस्वी लोकांत होईल.

68 तुमचा पालनकर्ता निर्माण करतो, जे तो इच्छितो आणि त्याची निवड करतो ज्याला तो इच्छितो. निवडण्याचा अधिकार त्यांच्या अखत्यारीत नाही. अल्लाह, असीम आहे त्याची महिमा! लोक त्याच्याबरोबर ज्यांना सहभागी ठरवितात, अल्लाह त्यांच्यापेक्षा कितीतरी श्रेष्ठ आहे. 69 तुमच्या पालनकर्त्याला ते सर्व चांगले ठाऊक आहे जे काही ते आपल्या मनात लपवितात आणि जे

काही ते प्रकट करतात. 70 तोच आहे अल्लाह, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही. या जगात आणि यानंतरच्या जगातही सर्व स्तुतीचा अधिकारी तोच आहे. सर्व फैसल्यांचा अधिकार त्यालाच आहे. आणि तुम्हा सर्वांना परतून त्याच्याकडेच जायचे आहे.

71 त्यांना विचारा, ‘मला सांगा, जर अल्लाहने न्यायाच्या दिवसापर्यंत तुमच्यावर कायमस्वरूपी रात्र करून टाकली (म्हणजे दिवस–रात्रीचं चक्र थांबवून केवळ रात्र आणि रात्रच असे करून टाकले) तर अल्लाहशिवाय दुसरी कोणती पूजनीय शक्ती आहे का, जी (रात्रीच्या त्या अंधकाराला दूर करून) तुमच्यासाठी प्रकाश आणू शकेल? तर मग तुम्हाला (सत्याची) आवाज ऐकू येत नाही का?’ 72 (तसेच त्यांना हेही) विचारा, ‘मला सांगा जर अल्लाहने तुमच्यावर न्यायाच्या दिवसापर्यंत कायमस्वरूपी दिवस (म्हणजे सूर्य मावळणारच नाही) असे करून टाकले तर अल्लाहशिवाय दुसरी कोणती पूजनीय शक्ती आहे का जी (सूर्यास्त घडवून) तुमच्यासाठी रात्र आणू शकेल? जिच्यात तुम्ही विश्रांती घेऊ शकाल. तर मग तुम्ही सत्याचे (चिंतनपूर्वक) निरीक्षण करणार नाही का?’

73 त्यानेच आपल्या कृपेने तुमच्यासाठी रात्र व दिवस बनविले, म्हणजे तुम्ही (रात्री) विश्रांती घ्यावी व (दिवसा) त्याच्या कृपाप्रसादांचा शोध घ्यावा. (म्हणजे आपल्या उपजीविकेसाठी प्रयत्न करता यावेत). हे यासाठी की, तुम्ही त्याचे आभार व्यक्त करावे.

74 त्या दिवशी अल्लाह त्यांना बोलावून विचारेल, ‘कुठे आहेत ते ज्यांच्याबाबतीत तुम्हाला असे वाटत होते की, ते माझे भागीदार आहेत?’ 75 आम्ही प्रत्येक जनसमूहातून एक साक्षीदार उभा करू. मग आम्ही त्यांना म्हणू, ‘ज्या गोष्टीचा तुम्ही दावा करीत राहिले त्याचे प्रमाण सादर करा, तेव्हा त्यांना कळून चुकेल की, सर्व सत्य अल्लाहच्याच बाजूने आहे. तेव्हा त्या सर्व खोट्या गोष्टी त्यांच्यापासून, गायब झालेल्या असतील, ज्या ते रचीत असत.

76 क़ारून मूसाच्या लोकांपैकी होता, मग त्याने त्यांच्याविरुद्ध विद्रोही भूमिका बजावली. (त्याचे साधे कारण हे होते की,) आम्ही त्याला इतके खजिने दिले होते की, केवळ त्याच्या किल्ल्या कित्येक धडधाकट माणसे, मोठ्या कष्टाने उचलीत असत. जेव्हा त्याच्या लोकांनी त्याला म्हटले, '(आपल्या संपत्तीविषयी) फार ऐट मिरवू नकोस, कारण अल्लाहला ऐट मिरविणारे लोक प्रिय नाहीत. 77 जे काही अल्लाहने तुला दिलेले आहे, त्याद्वारे आपले मृत्यूनंतरचे जीवन चांगले व्हावे यासाठी काही कर. तसेच या जगात, (मृत्यूनंतरच्या जगातील आपला) हिस्सा घेण्याच्या बाबतीत विसर पडू देऊ नकोस. तसेच इतर (गरजू) लोकांवर उपकार कर जसे उपकार अल्लाहने तुझ्यावर केलेले आहेत आणि भूतलावर उपद्रव माजविण्याचा प्रयत्न करू नकोस. कारण अल्लाहला उपद्रव माजविणारे लोक कदापि प्रिय नाहीत.'

78 पण त्याने उत्तर दिले, 'ही संपत्ती मला माझ्या ज्ञानामुळे प्राप्त झालेली आहे.' त्याला हे माहीत नव्हते का की, अल्लाहने त्याच्यापूर्वी कित्येक जमातींना नष्ट करून टाकले आहे. ज्या त्याच्यापेक्षा अधिक सशक्त होत्या व धनसंपत्तीच्या बाबतीत अधिक वरचढ होत्या. तसेच अपराधी लोकांना त्यांच्या अपराधांविषयी स्पष्टीकरण विचारण्याची गरज नसते.

79 (एके दिवशी) क़ारून आपल्या लोकांसमोर आपल्या थाटामाटाचे प्रदर्शन करीत निघाला. जे लोक याच जीवनाची अभिलाषा आपल्या मनात बाळगून होते, म्हणाले, 'आम्हालाही ते सर्व मिळाले असते तर...., जे क़ारूनला मिळालेले आहे, खरोखर तो मोठा भाग्यशाली आहे.' 80 पण ज्या लोकांना (जीवनाच्या हकिगतीचे) ज्ञान लाभले होते, ते म्हणाले, 'तुमचा धिक्कार असो! अल्लाहकडून मिळणारा मोबदला (याहून) अधिक चांगला आहे, त्या लोकांसाठी जे श्रद्धा धारण करतात आणि सत्कर्मे करतात, पण हा मोबदला केवळ त्यांनाच मिळणार आहे, जे सहनशीलतेचे पालन करतात.'

81 मग आम्ही त्याला व त्याच्या (वैभवसंपन्न) घरास जमिनीत गाडून टाकले. मग तेव्हा अल्लाहच्या विरुद्ध जाऊन, त्याची मदत करणारा कोणताही समूह पुढे आला नाही, ना तो स्वत:ला वाचवू शकला. 82 कालपर्यंत जे लोक त्याच्यासारखे स्थान प्राप्त करण्याची आपल्या मनात लालसा बाळगून होते, म्हणू लागले, 'अरेरे! (आम्हाला वास्तवाची जाणीव नव्हती). खरोखर तो अल्लाह आहे, जो आपल्या सेवकांपैकी इच्छितो त्याला विपुल प्रमाणात उपजीविका प्रदान करतो आणि इच्छितो त्याला तुटपुंज्या प्रमाणात प्रदान करतो. जर आमच्यावर अल्लाहने कृपा केली नसती तर आम्हालाही जमिनीत गाडून टाकले असते.' खरोखर किती दुर्दैव! सत्य नाकारणारे कदापि यशस्वी होऊ शकत नाहीत.

83 मृत्यूनंतरच्या जगात आनंदमयी जीवन, आम्ही केवळ त्या लोकांना देऊ, जे भूतलावर ना स्वत:चा मोठेपणा मिरवू इच्छितात, ना उत्पात माजविण्यासाठी प्रयत्नरत असतात. चांगले शेवट अल्लाहची जाण व भय बाळगून (जीवन व्यतीत करणाऱ्या लोकांचे) आहे. 84 जो कोणी (अल्लाहसमोर) भले कृत्य घेऊन हजर होईल, त्याला त्यापेक्षाही चांगले पुण्यफळ मिळेल. तसेच जो कोणी वाईट कृत्यासह येईल, तर वाईट कृत्ये करणाऱ्यांना त्यांच्या कृत्यांनुसार वाईट फळ मिळेल.

85 निश्चितच ज्याने कुराणातील (आदेशांची अंमलबजावणी करणे), तुमचे कर्तव्य ठरविले आहे, तोच तुम्हाला एका यशस्वी शेवटापर्यंत पोचवील. (त्यांना) सांगा, 'माझ्या पालनकर्त्याला चांगले ठाऊक आहे की, कोणाला मार्गदर्शन लाभले आहे आणि कोण स्पष्टरित्या वाट चुकलेला आहे.' 86 तुम्ही कधीही अशी अपेक्षा बाळगून नव्हते की, तुमच्याकडे (अल्लाहचा) ग्रंथ प्रकट केला जाईल. पण ही तुमच्या पालनकर्त्याची कृपा होय, म्हणून तुम्ही कोणत्याही प्रकारे सत्य नाकारणाऱ्या लोकांना साहाय्य करू नका. 87 तसेच हे (नेहमी

लक्षात ठेवा की), अल्लाहचा संदेश एकदा तुमच्याकडे आल्यानंतर कोणीही तुम्हाला त्यापासून परावृत्त करता कामा नये. तुम्ही (लोकांना) आपल्या पालनकर्त्याकडे येण्याचे आवाहन करा आणि त्या लोकांपैकी कदापि होऊ नका, जे इतरांना अल्लाहच्या (ईश्वरत्वात) सहभागी ठरवितात. 88 तसेच अल्लाहशिवाय अन्य कोणत्याही उपास्याचा धावा करू नका, कारण त्याच्याशिवाय दुसरा कोणीच उपास्य नाही. त्याच्याव्यतिरिक्त प्रत्येक गोष्ट नाश पावणे अटळ आहे. सर्व निर्णयाधिकार त्याच्याचपाशी आहेत. आणि तुम्हा सर्वांना त्याच्याकडेच परत आणले जाणार आहे.

## सूरह-२९. अल-अन्‌कबूत

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 अलीफ० लाम० मीम० 2 लोकांना असे वाटते की काय? त्यांच्या केवळ (तोंडाने) इतके बोलण्यावर त्यांना सोडून दिले जाईल की, 'आम्ही श्रद्धा धारण केली आहे.' आणि त्यांना आजमावून पाहिले जाणार नाही? 3 आम्ही त्या लोकांनाही आजमावून पाहिले होते, जे यांच्यापूर्वी होऊन गेले. निश्चितच अल्लाह त्या लोकांना चिन्हांकित करून त्यांची निवड करेल, ज्यांनी स्वतःला सत्यवचनी सिद्ध केले असेल. तसेच तो असत्यावर (आधारित जीवन जगलेल्यांनाही) चिन्हांकित करून बाजूला काढेल.

4 जे लोक दुष्कृत्ये करतात, त्यांनी स्वतःची अशी धारणा बनविली आहे की काय? ते आमच्यापासून अवश्य स्वतःची सुटका करून घेऊ शकतील. किती वाईट अनुमान (ते आमच्याविषयी) लावत आहेत! 5 जो कोणी (न्यायाच्या दिवशी) अल्लाहशी होणाऱ्या भेटीकडे (भय व आशेसह) पाहत असतो. तर त्याने हे लक्षात ठेवावे की, (अल्लाहच्या भेटीची) नियत वेळ अवश्य येणार आहे. तो सर्व काही ऐकणारा आहे, सर्व काही जाणणारा आहे. 6 जो कोणी (अल्लाहच्या कार्यासाठी) प्रयत्नांची पराकाष्ठा करतो, खरे पाहता तो स्वतःच्याच

(कल्याणासाठी) प्रयत्न करीत आहे. कारण अल्लाहला कोणाचीच गरज नाही (तो आत्मनिर्भर आहे). [7] ज्या लोकांनी श्रद्धा धारण केली व सत्कर्मे केली तर अशा लोकांच्या (आधी) घडलेल्या चुका आम्ही त्यांच्यापासून दूर करू आणि त्यांना त्यांच्या (चांगल्या) कृत्यांचा अत्युत्तम मोबदला देऊ, जी ते करीत असत.

[8] आम्ही माणसाला आपल्या आईवडिलांशी प्रेमाने वागण्याची आज्ञा केलेली आहे. पण जर त्यांनी तुझ्याकडे अशा कोणाला माझा सहभागी (समकक्ष) ठरविण्यासाठी आग्रह धरला, ज्याचे तुला काहीही ज्ञान नाही, तर तू त्यांचे म्हणणे अजिबात मान्य करू नकोस. तुम्हा सर्वांना माझ्याकडेच परतून यायचे आहे. तेव्हा मी, तुम्ही जे जे (जीवनात) करीत राहिलात, ते सर्व तुमच्यासमोर उघड करेन. [9] पण ज्या लोकांनी श्रद्धा धारण केली आणि सत्कर्मे केली तर अशांचा आम्ही आमच्या सदाचारी भक्तांच्या समूहात समावेश करू.

[10] लोकांमध्ये काही असेही आहेत, जे दाव्याने सांगतात, ‘आम्ही अल्लाहवर विश्वास ठेवतो.’ पण जेव्हा अल्लाहच्या मार्गात ते छळले जातात, तेव्हा ते लोकांच्या छळास अल्लाहच्या शिक्षेप्रमाणे समजू लागतात. पण जर तुमच्या पालनकर्त्याकडून (सच्च्या श्रद्धावंतांसाठी) साहाय्य आले तर ते निश्चितपणे असे म्हणतील, ‘आम्ही नेहमी तुमच्याबरोबर आहोत?’ अल्लाहला ते चांगल्याप्रकारे माहीत नाही की काय, जे लोकांच्या मनात आहे? [11] अल्लाह त्या लोकांना अवश्य चिन्हांकित करेल, जे सच्चे श्रद्धावंत आहेत, तसेच तो त्या लोकांनाही अवश्य चिन्हांकित करून समोर आणेल जे दांभिक आहेत.

[12] सत्य नाकारणारे लोक श्रद्धावंतांना म्हणतात, ‘तुम्ही आमच्या मार्गाचे अनुसरण करा, तुमच्या पापांचे ओझे आम्ही उचलून घेऊ.’ (पण सत्य हे आहे की), ते त्यांच्या पापांपैकी किंचितदेखील ओझे उचलणार नाहीत. ते निश्चितपणे खोटारडे आहेत. [13] ते आपल्या पापाचे ओझे तर उचलतीलच, पण त्याचबरोबर

आणखी काही पापाचे ओझेही उचलतील (म्हणजे त्यांच्यामुळे जे लोक पापकृत्य करण्यास प्रवृत्त झाले त्यासंबंधीचे ओझे). हे लोक ज्या खोट्या गोष्टी रचत आहेत, त्यासंबंधाने पुनरुत्थानाच्या दिवशी त्यांना अवश्य जाब विचारण्यात येईल.

14 आम्ही नूहला (पैगंबर बनवून) त्याच्या लोकांकडे पाठविले, तर तो एक हजार वर्षाला पन्नास वर्ष कमी (म्हणजे नऊशे पन्नास वर्षे) इतकी मुदत त्यांच्यादरम्यान राहिला. मग (शेवटी) जलप्रलयाने त्यांना वेढले, (खरोखर) ते अत्याचारी लोक होते. 15 पण आम्ही नूहला व त्याच्याबरोबर जे नौकेत होते त्यांना वाचवले आणि या घटनेला आम्ही जगवासीयांसाठी (संदेशसूचक) निशाणी बनवले.

16 तसेच इब्राहीमला (देखील आम्ही पैगंबर बनवून आपल्या लोकांकडे पाठविले,) तेव्हा तो आपल्या लोकांना म्हणाला, 'अल्लाहची उपासना करा आणि त्याची जाण व भय बाळगून (जीवन व्यतीत करा). जर तुम्ही हे समजून घ्याल तर यात तुमचेच भले आहे. 17 (पण) तुम्ही अल्लाहला सोडून मूर्तींची उपासना करता आणि खोट्या गोष्टी रचित असता. अल्लाहला सोडून तुम्ही ज्यांची उपासना करता, त्यांना तुम्हाला उपजीविका प्रदान करण्याचे कसलेही सामर्थ्य प्राप्त नाही. तुम्ही केवळ अल्लाहकडे उपजीविका प्राप्त करण्यासाठी याचना करा आणि केवळ त्याचीच उपासना करा. तसेच त्याच्याप्रति कृतज्ञता बाळगा. तुम्हाला त्याच्याकडेच परतविले जाईल. 18 जर तुम्ही (मला) खोटे ठरवीत असाल तर (यात फार आश्चर्यकारक असे काही नाही कारण) तुमच्या पूर्वीदेखील अनेक जनसमूहांनी (अल्लाहच्या पैगंबरांना) खोटे ठरविलेले आहे. पण पैगंबरावर स्पष्टरित्या संदेश पोहोचविण्यापलिकडे अन्य कोणतीही जबाबदारी नाही.'

19 लोकांनी या गोष्टीचे (चिंतनपूर्वक) निरीक्षण केले नाही का? की,

अल्लाह कशाप्रकारे पहिल्या वेळेस सृष्टी निर्माण करतो. मग त्याची पुनरावृत्ती करीत असतो. खरोखर, हे अल्लाहसाठी अगदी सहज शक्य आहे. 20 त्यांना सांगा, 'भूतलावर संचार करा व (चिंतनपूर्वक) निरीक्षण करा की, कशाप्रकारे अल्लाहने सृष्टीची पहिल्या वेळेस निर्मिती केली. मग अगदी अशाचप्रकारे अल्लाह (मृत्यूनंतर) तुम्हाला दुसऱ्या वेळेस उठवून उभे करील. खरोखर, अल्लाह सर्व काही करण्यास समर्थ आहे. 21 तो इच्छितो त्यास शिक्षा करतो आणि इच्छितो त्यावर कृपा करतो. त्याच्याकडेच तुम्हाला परतवून आणले जाईल. 22 तुम्ही ना पृथ्वीवर, ना आकाशात त्याच्या योजनेला विफल करू शकता. तसेच तुमचा अल्लाहशिवाय दुसरा ना कोणी पुरस्कर्ता आहे, ना साहाय्यकर्ता. 23 जे लोक अल्लाहच्या संदेशाद्वारे प्रकट झालेल्या सत्याला व त्याच्याशी अटळ असलेल्या भेटीला नाकारण्यावर आग्रही राहिले व त्यांना माझ्या कृपेची आशा नाही. तर अशाच लोकांसाठी कठोर शिक्षा अटळ आहे.'

24 इब्राहीमने दिलेल्या (एकेश्वरवादाच्या संदेशाच्या) प्रतिसादात त्याचे लोक म्हणाले, 'त्याला ठार करा किंवा त्याला जाळून टाका.' पण अल्लाहने त्याला आगीत जळण्यापासून वाचवीले. खरोखर, यात श्रद्धावंत लोकांसाठी संदेश असलेल्या खुणा आहेत. 25 इब्राहीमने त्यांना म्हटले, 'अल्लाहला सोडून तुम्ही मूर्तींची उपासना करण्याचा जो मार्ग निवडला आहे, ते या जीवनात तुमच्या दरम्यान आपसात मित्रत्वाला प्रोत्साहित करण्याचे माध्यम जरूर बनलेले आहे. पण न्यायाच्या दिवशी तुम्ही एकदुसऱ्यासोबत कोणतेही संबंध असल्याचे नाकाराल आणि एकदुसऱ्याचा धिक्कार कराल. नरकाची आग हेच तुमचे निवासस्थान असेल. तुम्हाला कोणीही साहाय्यकर्ता लाभणार नाही.' 26 लूत हा त्याच्यावर विश्वास ठेवणारा एकमेव पुरुष होता. त्याने (इब्राहीमला) म्हटले, 'मी अल्लाहकडे स्थलांतर करण्यासाठी तयार आहे (म्हणजे अनेकेश्वरवादाच्या वातावरणाचा व भूमीचा त्याग करून एकेश्वरवादाकडे स्थलांतर करण्यास तयार

आहे). खरोखर तो सर्वशक्तिमान आहे, बुद्धिवान आहे.' 27 आम्ही (इब्राहीमला पुत्र व प्रपौत्रच्या रूपाने) इसहाक़ व याकूब दिले आणि त्याच्या वंशजांना प्रेषितत्व व ग्रंथ प्रदान केले. आणि आम्ही त्याला या जगात(ही) पुण्यफळ प्रदान केले आणि यानंतरच्या जगात तो सदाचारी लोकांपैकी असेल.

28 लूतलाही (आम्ही पैगंबर बनवून त्याच्या लोकांकडे पाठवले) जेव्हा तो आपल्या लोकांना म्हणाला, 'तुम्ही असे घृणास्पद (अश्लील) कृत्य करीत आहात, जसे कृत्य तुमच्या पूर्वी मानवी इतिहासात कोणीही केलेले नाही. 29 (कामवासनेने प्रेरित होऊन तृप्तीसाठी) तुम्ही पुरुषांकडे जाता, (प्रवाशांची) वाटमारी करता? तसेच आपल्या बैठकांतही (उघडरित्या) घृणास्पद कृत्ये करता?' पण त्याच्या लोकांचे उत्तर याशिवाय अन्य काही नव्हते, 'जर तुझ्या म्हणण्यात काही तथ्य असेल तर आमच्यावर अल्लाहची शिक्षा आणून दाखव.' 30 तेव्हा लूतने (अल्लाहकडे) प्रार्थना केली, '(हे प्रभू!) या दुष्ट लोकांच्या विरुद्ध मला साहाय्य प्रदान कर.'

31 मग जेव्हा आमचे स्वर्गदूत इब्राहीमकडे (इसहाक़च्या जन्माची) शुभवार्ता घेऊन आले, त्यांनी इब्राहीमला (हे देखील) सांगितले की, आम्ही (पुढे) अमुक वस्तीतील लोकांना नष्ट करायला जात आहोत, कारण तेथील लोक पराकोटीचे अत्याचारी बनलेले आहेत. 32 (त्यावर) इब्राहीमने म्हटले, 'त्या वस्तीत तर लूतदेखील आहे.' ते म्हणाले, 'आम्हाला चांगले ठाऊक आहे की, तिथे कोण-कोण आहेत. आम्ही त्याला व त्याच्या कुटुंबीयांना अवश्य वाचवू, पण त्याच्या पत्नीला सोडून, ती मागे राहणाऱ्यांबरोबर थांबून राहील.' 33 आणि आमचे स्वर्गदूत जेव्हा (पैगंबर) लूतकडे आले, तेव्हा तो अत्यंत अस्वस्थ झाला आणि त्यांचे (संरक्षण करण्याच्या बाबतीत) आपण हतबल असल्याचे विचार त्याला सतावू लागले. पण त्या स्वर्गदूतांनी म्हटले, 'तू भिऊ नकोस, आणि दुःखीही होऊ नकोस! आम्ही तुला व तुझ्या कुटुंबीयांना अवश्य वाचवू. पण तुझी पत्नी मागे राहणाऱ्यांसोबत (मागेच) राहील. 34 आम्ही या वस्तीतील

लोकांवर त्यांच्या कुकर्मांपोटी आकाशातून एक भयंकर शिक्षा कोसळविणार आहोत.’ 35 (अशाप्रकारे शिक्षेची कारवाई अमलात आली) मग आम्ही (त्या वस्तीला नष्ट केल्यानंतरही) काही स्पष्ट खुणा बाकी ठेवल्या, यासाठी की, बुद्धी बाळगणाऱ्या लोकांनी त्यापासून बोध ग्रहण करावे.

36 अशाचप्रकारे मदियनच्या लोकांकडे त्यांचा भाऊ शुऐब यास (पैगंबर बनवून पाठविले). तेव्हा तो आपल्या लोकांना म्हणाला, ‘हे माझ्या बांधवांनो! केवळ अल्लाहची उपासना करा आणि अंतिम दिवसाविषयी (भय व) आशा बाळगून (जीवन व्यतीत करा). तसेच जमिनीवर उपद्रव माजविणारे बनू नका.’ 37 पण त्यांनी त्याला खोटे ठरविले, परिणामी, एका भयंकर भूकंपात ते सापडले, मग ते आपल्या घरात (मृतावस्थेत) पालथे पडून राहिले.

38 आद व समूद (या जमातींच्या बाबतीतही) अगदी असेच घडले (त्यांनाही आम्ही नष्ट करून टाकले). त्यांच्या ओसाड वस्त्यांवरून तुम्हाला ते स्पष्ट दिसून येते. कारण सैतानाने त्यांची (वाईट) कृत्ये त्यांना भली वाटावीत, असे सुशोभीकरण केले होते. अशाप्रकारे त्यांना सन्मार्गापासून रोखून ठेवले होते. जरी ते फार हुशार लोक होते (तरीही सैतानाच्या बहकाविण्याला बळी पडले).

39 तसेच आम्ही क़ारून, फिरऔन व हामान यांनाही नष्ट करून टाकले. (पैगंबर) मूसा त्यांच्याकडे सत्याचे सर्व स्पष्ट प्रमाण घेऊन आला होता. पण त्यांनी भूतलावर फार मगरुरीचे प्रदर्शन केले. पण शेवटी ते आमच्यापासून स्वतःची सुटका करून घेऊ शकले नाहीत. 40 मग आम्ही त्यांच्यापैकी प्रत्येकाला त्याच्या दुष्कृत्याबद्दल पकडले. मग त्यांच्यापैकी काही (जमातींवर) आम्ही वाळूचे भयंकर वादळ पाठविले, तर काही (जमातींना) भयंकर स्फोटाने वेढल, तर काहींना जमिनीत गाडून टाकले, तर काही असे होते ज्यांना आम्ही बुडवून टाकले. अल्लाहने त्यांच्यावर अन्याय केला नाही तर त्यांनीच स्वतःवर अन्याय केला.

41 ज्या लोकांनी अल्लाहला सोडून इतरांना आपला रक्षणकर्ता मानले, त्यांचे उदाहरण कोळ्यासारखे आहे. जो स्वत:साठी घर बनवतो, पण सर्वात तकलादू घर कोळ्याचेच घर असते. कदाचित त्यांना या (वास्तवाची) जाणीव झाली असती. 42 अल्लाहला सोडून ते ज्या कोणाचा धावा करतात, निश्चितच अल्लाहला ते सर्व माहीत आहे, कारण तोच सर्वशक्तिमान आहे, बुद्धिमान आहे. 43 ही उदाहरणे आहेत, जी आम्ही लोकांनी (त्यापासून बोध घ्यावा म्हणून) समोर ठेवतो. पण त्यांना तेच लोक समजू शकतात, जे ज्ञानी आहेत. 44 अल्लाहने आकाश व पृथ्वी यांची निर्मिती उद्देशासहित केलेली आहे. निश्चितच यात संदेश आहे, श्रद्धा बाळगणाऱ्या लोकांसाठी.

45 (पैगंबर!) जो ग्रंथ तुमच्याकडे प्रकट करण्यात आला आहे, त्याचे (इतरांसमोर) पठण करा आणि नित्य नमाज़ाचे पालन करा. कारण नमाज़ (माणसाला) निर्लज्जतेपासून आणि दुष्कृत्यांपासून दूर ठेवते. अल्लाहचे स्मरण हे सर्वश्रेष्ठ सत्कृत्य आहे. तुम्ही जे काही करता, ते सर्व अल्लाह जाणतो.

46 श्रद्धावंतांनो! तुम्ही आधीच्या ग्रंथधारकांशी वादविवाद करू नका, पण फक्त सभ्य रीतीने तुम्ही त्यांच्याशी (विचारविनिमय करू शकता). पण जर त्यांच्यापैकी जे लोक अन्यायी आहेत (त्यांना उत्तरास प्रत्युत्तर देण्यास हरकत नाही). त्यांना सांगा, 'आम्ही विश्वास ठेवतो त्यावर जे आमच्याकडे प्रकट करण्यात आले आहे, तसेच त्यावरही जे तुमच्याकडे प्रकट करण्यात आले आहे. आमचा ईश्वर व तुमचा ईश्वर एकच आहे. त्यालाच आम्ही समर्पित झालेलो आहोत.'

47 तर अशाप्रकारे आम्ही तुमच्याकडे हा ग्रंथ प्रकट केला आहे. आधीच्या ग्रंथधारकांपैकी काही यावर विश्वास ठेवणारे आहेत, तसेच (अरब लोकांपैकी) काही यावर दृढ विश्वास ठेवतात. आमच्या संदेशांना केवळ ते लोक नाकारतात जे सत्य नाकारण्यावर आग्रही आहेत (अर्थात जे कृतघ्न आहेत). 48 (पैगंबर!)

तुम्हाला यापूर्वी कोणताही ग्रंथ पठण करता येत नव्हते, ना तुम्ही आपल्या हाताने काही लिहू शकत होते. तसे असते तर असत्यवादी लोकांना शंका घेण्याची चांगली संधी हाती लागली असती. 49 पण कुराण असा (ईश्वरीय) ग्रंथ आहे, ज्यात स्पष्ट संदेश आहेत, अशा लोकांच्या हृदयात सामावलेले आहे ज्यांना ज्ञान लाभलेले आहे. आमच्या संदेशांना त्यांच्याशिवाय कोणीही नाकारत नाही, पण फक्त जे अत्याचारी आहेत.

50 ते म्हणतात, 'त्याच्या पालनकर्त्याकडून त्याच्यावर चमत्कारिक निशाण्या का प्रकट करण्यात आल्या नाहीत?' त्यांना सांगा, 'चमत्कारिक निशाण्या तर अल्लाहपाशी आहेत, मी तर केवळ उघडपणे सावध करणारा आहे.' 51 त्यांच्यासाठी हे पर्याप्त नाही का की, आम्ही तुमच्याकडे ग्रंथ प्रकट केला? जो त्यांना (तुमच्याद्वारे) ऐकविला जातो. खरोखर यात त्या लोकांकरिता कृपा व उपदेश आहेत, जे विश्वास ठेवणारे आहेत. 52 (पैगंबर! लोकांना) सांगा, 'अल्लाह तुमच्या व माझ्या दरम्यान साक्षीदार म्हणून पर्याप्त आहे. तो ते सर्व जाणतो, जे आकाशात व पृथ्वीवर आहे. जे लोक असत्यावर विश्वास ठेवतात आणि अल्लाहवर अविश्वास दर्शवितात, तेच निश्चितपणे तोट्यात सापडणारे आहेत.'

53 हे लोक त्यांच्यावर शिक्षा लवकरात लवकर आणण्यासाठी (पैगंबर!) तुम्हाला आव्हान देत आहेत. (अल्लाहकडून आधीपासून) त्याची एक वेळ निर्धारित नसती तर त्यांच्यावर शिक्षेची आपत्ती केव्हाच आली असती. पण ती शिक्षा त्यांच्यावर अवश्य येईल, पण अचानक अशा वेळेस येईल की, त्यांना त्याची मुळीच जाणीव असणार नाही. 54 (एकीकडे) ते तुमच्याकडे (ईश्वरीय शिक्षेला) लवकरात लवकर समोर आणण्याची मागणी करीत आहेत. तर (दुसरीकडे वस्तुस्थिती ही आहे की), सत्य नाकारणाऱ्या लोकांना नरकाने वेढून ठेवलेले आहे.

55 त्या दिवशी शिक्षा त्यांना त्यांच्यावरून तसेच त्यांच्या पायाखालून

(म्हणजेच चहूबाजूंनी) झाकून टाकील. तेव्हा त्यांना सांगितले जाईल, 'आता चाखा आपल्या कर्मांची फळे जी तुम्ही करीत असत.'

56 श्रद्धा धारण केलेल्या माझ्या भक्तांनो! माझी जमीन फार विशाल आहे, (तर तिच्यावर राहून) तुम्ही केवळ माझीच आणि माझीच उपासना करा.

57 प्रत्येक जीव मृत्यूची चव चाखणार आहे. मग शेवटी सर्वांना आमच्याकडेच
परत आणले जाईल. 58 मग ज्यांनी श्रद्धा धारण केली असेल व सत्कर्मे केलेली
असतील, अशा लोकांना आम्ही स्वर्गात भव्य स्थान प्रदान करू. ज्यातून पाण्याचे
नयनरम्य प्रवाह वाहत असतील. ते तेथे कायम वास्तव्य करतील. खरोखर! किती
उत्कृष्ट मोबदला आहे, सत्कर्मे करणाऱ्यांसाठी! 59 (ते असे आहेत,) जे (प्रतिकूल
परिस्थितीत) सहनशीलतापूर्वक आचरण करीत असतात आणि आपल्या
पालनकर्त्यावर अढळपणे विश्वास ठेवतात. 60 (पृथ्वीवर) कित्येक प्राणी असे
आहेत, जे आपली उपजीविका आपल्याबरोबर घेऊन फिरत नाहीत. अल्लाह
त्यांनाही उपजीविका प्रदान करतो आणि तुम्हालाही. तोच आहे सर्व काही ऐकणारा
व सर्व काही जाणणारा.

61 जर तुम्ही लोकांना विचाराल की, तो कोण आहे, ज्याने आकाश आणि
पृथ्वी यांची निर्मिती केली, तसेच सूर्य व चंद्राला कोणी (आपल्या कायद्याच्या)
अधीन कार्यरत केले? तेव्हा ते निश्चितपणे उत्तर देतील, 'हे सर्व अल्लाहने
केले.' मग ते (सन्मार्ग सोडून) भलतीकडे का जातात (म्हणजे जेव्हा त्यांना हे
माहीत आहे, तेव्हा ते अल्लाहला समर्पित जीवन का व्यतीत करीत नाहीत)? 62
अल्लाह आपल्या भक्तांपैकी ज्याच्याबाबतीत इच्छितो त्यास उपजीविका विपुल
प्रमाणात प्रदान करतो. तसेच ज्याच्याबाबतीत इच्छितो तुटपुंज्या प्रमाणात प्रदान
करतो. नि:संदेह, अल्लाहला प्रत्येक गोष्टीचे पूर्ण ज्ञान आहे. 63 जर तुम्ही त्यांना
विचाराल की, आकाशातून पाण्याचा कोण वर्षाव करतो आणि पृथ्वी मृत
झाल्यानंतर तिला पुनर्जीवित (कोण करतो)? तर ते अवश्य उत्तर देतील, 'हे

सर्व अल्लाह करतो.' त्यांना तुम्ही सांगा, '(म्हणूनच तर) सर्व स्तुतीचा अधिकारी केवळ अल्लाह आहे.' पण बहुसंख्य लोक आपल्या बुद्धीचा वापर करीत नाहीत.

64 या जगातील जीवन याशिवाय अन्य काही नसून, केवळ खेळ व करमणूक आहे. तसेच यानंतरच्या जगातील जीवन हेच खरे जीवन आहे. जर लोकांना हे कळाले असते तर.........! 65 (लोकांचे असे आहे) जेव्हा ते नौकेत बसून (जलप्रवास करतात आणि त्यादरम्यान अचानकपणे संकटात सापडले तर) तेव्हा पूर्ण निष्ठेने, त्याच्यावर दृढ श्रद्धा व्यक्त करीत अल्लाहचा धावा करतात. पण जेव्हा तो त्यांना वाचवून भूतलावर सुरक्षित घेऊन येतो, तेव्हा ते पुन्हा इतरांना त्याचे समकक्ष ठरविण्याचे (पाप) करू लागतात. 66 म्हणजे अशाप्रकारे त्यांच्यावर आम्ही केलेल्या मेहेरबानीला ते कृतघ्नतेने प्रतिसाद देतात. तसेच (विचारशून्यरित्या) या चार दिवसाच्या (जीवनाचा) उपभोग घेणे सुरू ठेवतात. पण त्यांना लवकरच कळून चुकेल.

67 (मक्कावासी लोकांनी) या गोष्टीचे कधी (चिंतनपूर्वक) निरीक्षण केले नाही का, आम्ही (मक्केत) एक शांततापूर्ण व सुरक्षित असे (जागतिक) प्रार्थनास्थान (हरम) बनविले आहे? (त्यांच्यासाठी जे आमच्यावर विश्वास ठेवतात). त्यांच्या चहूबाजूंनी सर्व ठिकाणाहून माणसे खेचून नेले जात आहेत. (हे सर्व उघड असतानाही) ते असत्यावरच श्रद्धा ठेवणे सुरू ठेवून, अल्लाहच्या कृपेला कृतघ्नतेने प्रतिसाद देत राहतील का? 68 त्यापेक्षा दुष्ट माणूस आणखी कोण असू शकतो, जो स्वतःहून रचलेल्या खोट्या गोष्टींचा संबंध अल्लाहशी जोडतो किंवा सत्याला खोटे ठरवितो, जेव्हा की, ते त्याच्यापाशी येऊन पोचलेले असते. (अशा) श्रद्धाहीनांसाठी नरक हेच (योग्य) स्थान नव्हे का? 69 पण जे लोक आमच्याखातर जिवापाड मेहनत करतील, आम्ही त्यांना अधिकाअधिक मार्गदर्शन प्रदान करू. यात मुळीच शंका नाही की, अल्लाह सदाचारी लोकांबरोबर असतो.

# सूरह–३०. अर–रूम

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 अलीफ० लाम० मीम० 2 रोमन साम्राज्याचा पराभव झाला. 3 जवळच्याच
प्रदेशात, पण ते त्यांच्या पराभवानंतर (नजीकच्या भविष्यात) पुन्हा विजयी
होतील. 4 म्हणजे (येणाऱ्या) काही वर्षांत — सर्व प्रकारचे निर्णयाधिकार
अल्लाहपाशीच आहेत. याच्या पूर्वीही आणि यानंतरही (सर्व निर्णयाधिकार त्यालाच
आहेत). त्या दिवशी (जेव्हा रोमन विजयी होतील) श्रद्धावंत आनंदित होतील.
5 अल्लाहच्या साहाय्याने. कारण तो इच्छितो त्यास साहाय्य प्रदान करतो. तो
सर्वशक्तिमान आहे, (असीम) दयावान आहे. 6 हे अल्लाहचे वचन आहे आणि
अल्लाह आपले वचन कधीही मोडत नाही. पण बहुसंख्य लोकांना या गोष्टीची जाण
नाही. 7 ते या जगातील जीवनाचे केवळ बाह्य (अर्थात वरवर दिसणारे) रूप
जाणतात आणि मृत्युपश्चात असलेल्या (अनंतकालीन) जीवनापासून (वाईटरित्या)
गाफील आहेत.

8 ते स्वत:विषयी कधी (गंभीरतापूर्वक) विचार करीत नाहीत का? (म्हणजे
मानव किती अर्थपूर्ण निर्मिती आहे, हे यांना अद्याप उमजलेले नाही का?)
अल्लाहने आकाश व पृथ्वी यांना आणि यांच्यामध्ये (अर्थात संपूर्ण सृष्टीत) जे
काही आहे, ते सर्व अर्थपूर्ण उद्देशासहित व एका ठरावीक मुदतीकरिता निर्माण
केले आहे. लोकांत बहुसंख्य असेच आहेत जे आपल्या पालनकर्त्याशी होणाऱ्या
भेटीला नाकारतात. 9 त्यांनी भूतलावर प्रवास केला नाही का? (प्रवास केले
असते तर) त्यांना पाहता आले असते की, त्या (सत्य नाकारणाऱ्या लोकांचा)
शेवट कसा झाला, जे यांच्यापूर्वी होऊन गेले? ते यांच्या तुलनेत अधिक
शक्तिशाली होते. त्यांनी जमिनीवर शेती केली आणि यांच्याहून अधिक तिला
आबादीआबाद केले होते. त्यांच्याकडे त्यांचे पैगंबर सत्याचे सर्व सुस्पष्ट प्रमाण
घेऊन आले होते (पण जेव्हा त्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला, तेव्हा

अल्लाहने त्यांना नष्ट करून टाकले). अल्लाहने त्यांच्यावर अजिबात अन्याय केलेला नाही, पण त्यांनीच स्वत:वर अन्याय केला. [10] तेव्हा ज्या लोकांनी वाईट कृत्ये केली, त्यांचा शेवटही वाईट झाला. कारण त्यांनी अल्लाहच्या संदेशांना खोटे ठरविले आणि त्यांना उपहासाचे लक्ष्य बनविले.

[11] अल्लाह निर्मितीचा आरंभ करतो आणि तोच त्याची पुनरावृत्तीही करतो. नंतर तुम्हाला त्याच्याकडेच परतविले जाणार आहे. [12] मग ज्या दिवशी क़यामतीची ती वेळ येऊन ठेपेल, तेव्हा अपराधी लोक, अगदी निराश व (हताश) होऊन जातील. [13] ते ज्यांना (अल्लाहचे) समकक्ष ठरवीत असत, त्यांच्यापैकी कोणीही तेव्हा त्यांची मध्यस्थी करू शकणार नाही. उलट तेच त्यांना नाकारू लागतील ज्यांना ते आधी अल्लाहचे सहभागी ठरवीत होते. [14] ज्या दिवशी क़यामतीचा दिवस उजाडेल, त्या दिवशी ते सर्व एकमेकांपासून वेगळे झालेले असतील. [15] पण ज्या लोकांनी श्रद्धा धारण केली होती आणि (आपल्या जीवनात) सत्कर्मे केलेली होती, ते आनंदमयी बागात प्रफुल्लित असतील. [16] पण ज्या लोकांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला होता आणि आमच्या संदेशांना तसेच मृत्युपश्चात जीवनात (आमच्याशी होणाऱ्या) भेटीला खोटे ठरविले होते. अशा लोकांना शिक्षेसाठी आणण्यात येईल. [17] तर (श्रद्धावंतांनो!) तुम्ही सकाळी आणि संध्याकाळी अल्लाहच्या असीम महानतेचे गुणगान करीत राहा. [18] तोच स्तुतीस पात्र आहे आकाशात आणि पृथ्वीवर आणि सूर्याच्या ढळत्या प्रहरी व दुपारच्या वेळेसही त्याचेच स्तुतिगान करा,

[19] तोच मृतातून सजीवास बाहेर काढतो आणि सजीवातून मृतास बाहेर काढतो. तोच जमीन मृतप्राय झाल्यानंतर तिला जीवन प्रदान करतो. अशाच प्रकारे तुम्हाला (मृत्यूनंतर) पुन्हा जिवंत करण्यात येईल. [20] त्याच्या चमत्कारांपैकी हे आहे की, त्याने तुम्हाला मातीपासून (म्हणजेच मातीतील रासायनिक घटकांपासून) निर्माण केले आहे. मग तुम्ही परिपूर्ण मनुष्य बनून पृथ्वीवर चोहीकडे पसरून

जाता (व तुमच्यासंख्येत अनेक पटीने वाढ आणि वाढ होत असते). 21 त्याच्या निशाण्यांपैकी हे आहे की, त्याने तुमच्यासाठी तुमच्याच जातीच्या सहचारिण्या निर्माण केल्या. ते यासाठी की, त्यांच्याद्वारे तुम्हाला मन:शांती लाभावी. तसेच त्याने तुमच्या स्वभावात एकमेकांप्रति प्रेम आणि करुणेची भावना ठेवून दिली. खरोखर यात अनेक संदेशसूचक खुणा आहेत, त्या लोकांसाठी, जे चिंतन करीत असतात.

22 त्याच्या (संदेशसूचक) खुणांपैकी (बऱ्याच गोष्टी आहेत जसे) आकाश व पृथ्वी यांची निर्मिती, तुमच्या (विविध) भाषा आणि तुमच्या रंगाच्या बाबतीत विभिन्नता. खरोखर, यात संदेश आहेत त्या लोकांसाठी जे ज्ञानी आहेत. 23 तसेच त्याच्या खुणांपैकीच आहे तुमचे रात्री व दिवसा झोपणे. आणि (झोपेनंतर फ्रेश होऊन) तुम्ही (आपल्या उपजीविकेसाठी) त्याच्या कृपेच्या शोधात प्रयत्नरत होता. (या सर्व कार्यांत) खरोखर, अनेक संदेश आहेत, त्या लोकांसाठी जे आपल्या कानांचा (तसेच इतर ज्ञानेंद्रियाचा) उपयोग बोध ग्रहण करण्यासाठी करतात. 24 त्याच्या (संदेशसूचक) खुणांपैकी हेही आहे की, तो तुम्हाला वीज चमकताना दाखवतो, (ज्याद्वारे तुमच्यात) भीती व आशा या दोन्ही गोष्टी जागृत होतात. तोच आकाशातून पाण्याचा वर्षाव करतो आणि त्याद्वारे जमिनीला, तिच्या मृतावस्थेतून जिवंत करतो. खरोखर यात संदेश आहेत, त्या लोकांसाठी जे आपल्या बुद्धीचा वापर करतात.

25 त्याच्या निशाण्यांपैकी (एक निशाणी ही देखील आहे) की, आकाश आणि पृथ्वी हे त्याच्या आज्ञेने (दृढतापूर्वक) स्थिर आहेत, (व पूर्ण संतुलनासह कार्य करीत आहेत). मग जेव्हा तोच तुम्हाला त्याच्या (न्यायालयात) हजर होण्यासाठी केवळ एक हाक देईल तर लगेच तुम्ही (सर्वचे सर्व) जमिनीतून बाहेर पडाल. 26 आकाशात आणि पृथ्वीवर जे कोणी आहेत, सर्व त्याचेच आहेत आणि सर्व त्याचेच आज्ञाधारक आहेत. 27 तो निर्मितीस प्रारंभ करतो

आणि तोच त्याची पुनरावृत्ती करतो, त्याच्यासाठी हे अगदी सहज शक्य आहे. आकाशात व पृथ्वीवर (म्हणजेच समस्त सृष्टीत) सर्वश्रेष्ठ स्थान त्याचेच आहे (सर्वश्रेष्ठ गुणसंपन्न तोच आहे). तोच आहे सर्वशक्तिमान, तोच आहे अस्सल बुद्धिवान!

28 तो तुमच्यासाठी (तुम्ही आपल्या जीवनात ज्या गोष्टीवर स्वत: कृती करीत आहात) त्याचेच एक उदाहरण तुमच्यासमोर ठेवतो. तुमच्या दासांपैकी तुम्ही कोणाला तुमच्या त्या धनसंपत्तीमध्ये समान भागीदार बनवता का, जी आम्ही तुम्हाला प्रदान केलेली आहे, म्हणजे त्यात तुम्ही व ते हक्काच्या बाबतीत समान होऊन जावेत? तसेच (दुसरी गोष्ट म्हणजे) ज्याप्रकारे तुम्ही आपल्या स्वकीयांची काळजी घेता, तशी काळजी त्यांच्याबाबतीत घेता का? अशाप्रकारे आम्ही आमचे संदेश स्पष्ट करून प्रस्तुत करतो, त्या लोकांसाठी जे आपल्या बुद्धीचा वापर करतात. 29 पण नाही, स्वत:वरच अन्याय करणारे हे लोक, कोणत्याही ज्ञानाशिवाय आपल्या मनोकामनांच्या मागे धावत आहेत, तर अशा लोकांना कोण सन्मार्ग दाखवू शकतो ज्यांना अल्लाहनेच मार्गभ्रष्ट केले आहे? अशा लोकांचा कोणीही साहाय्यकर्ता असणार नाही.

30 तेव्हा (श्रद्धावंतांनो!) (सर्व खोट्या गोष्टींपासून स्वत:ला अलग करून) तुम्ही पूर्ण निष्ठेने आपले ध्यान (सत्य धर्माकडेच) केंद्रित ठेवा. तो स्वाभाविक धर्म ज्यावर अल्लाहने मानवाला निर्माण केले आहे. त्याने केलेल्या रचनेत कोणताही बदल शक्य नाही. हाच खरा धर्म होय. पण बहुसंख्य लोकांना या (वास्तवाची) जाणीव होत नाही. 31 त्याच्याचकडे एकाग्रचित्त राहा आणि त्याची जाण ठेवा आणि नित्य प्रार्थना करा. त्या लोकांपैकी अजिबात होऊ नका, जे अल्लाहच्या ईश्वरत्वात, इतरांना सहभागी ठरवितात. 32 तसेच त्या लोकांपैकीही होऊ नका, ज्यांनी आपल्या (स्वाभाविक) धर्मात अनेक मार्ग काढून, ते विविध पंथांमध्ये विभागले गेले. प्रत्येक गट आपल्याकडे जे आहे,

त्याच्याबाबतीत (अविचारपूर्वक खोटे) अभिमान बाळगतो.

33 लोकांना जेव्हा कोणतेही दुःख पोहोचते, तेव्हा ते आपल्या पालनकर्त्याचा पूर्ण निष्ठेने त्याच्याकडेच एकाग्रचित्त होऊन (मदतीसाठी) धावा करू लागतात. मग जेव्हा तो त्यांना आपल्या कृपेची गोडी चाखवितो (व त्यांच्यावर अनुग्रह करतो), तेव्हा त्यांच्यापैकी काही लोक इतरांना आपल्या पालनकर्त्याचे सहभागी ठरवू लागतात. 34 तसेच आम्ही त्यांना जे काही दिले आहे, त्याबद्दल आमच्याप्रति कृतघ्नतेचे प्रदर्शन करतात. (अशा लोकांनो!) चार दिवस मौजमजा करून घ्या, पण लवकरच तुम्हाला कळून चुकेल (आपल्या कर्मांची हकिगत). 35 (या लोकांकडे) आम्ही एखादे असे प्रमाण पाठविलेले आहे की काय, जे अल्लाहबरोबर इतरांना त्याचे सहभागी ठरविण्याच्या, त्यांच्या कृत्याचे समर्थन करते?

36 आम्ही जेव्हा लोकांना आमच्या अनुग्रहाची गोडी चाखू देतो, तेव्हा ते त्यापासून खूश होतात. पण जेव्हा त्यांना आपल्या हातांनी केलेल्या कृत्यांपोटी काही त्रास पोहोचल्यास ते अचानक निराश होतात. 37 त्यांनी या गोष्टीचे अवलोकन केले नाही का की, अल्लाह इच्छितो त्यास विपुल प्रमाणात उपजीविका प्रदान करतो आणि इच्छितो त्यास कमी प्रमाणात उपजीविका प्रदान करतो. खरोखर, यात संदेश आहेत, त्या लोकांसाठी जे श्रद्धा बाळगणारे आहेत. 38 तर (श्रद्धावंतांनो!) नातेवाइकांस त्यांचा उचित हक्क द्या, तसेच गरीब-गरजू आणि वाटसरू यांनाही. अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी प्रयत्नरत असलेल्यांसाठी, हे अधिक हिताचे आहे. असेच लोक निश्चितपणे यशस्वी होणार आहेत. 39 तुम्ही लोक जे काही व्याज देता यासाठी की, त्याद्वारे लोकांच्या संपत्तीत वाढ होईल. पण अल्लाहच्या नजरेत त्यात काहीच वाढ होत नाही. पण जे लोक अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्याच्या हेतूने ज़कात देतात (म्हणजे दानधर्म करतात) तर हेच ते लोक आहेत, ज्यांना अल्लाहपाशी आपल्या संपत्तीत कित्येक पटीने

वाढ (झाल्याचे आढळेल).

40 तो अल्लाह आहे, ज्याने तुम्हाला निर्माण केले. मग तुमच्या उपजीविकेची व्यवस्था केली. मग तोच तुम्हाला मृत्यू देतो. मग तोच तुम्हाला पुन्हा जिवंत करेल. ज्यांना तुम्ही अल्लाहचे समकक्ष ठरविले आहे त्यांच्यात कोणी असा आहे का, जो यापैकी एखादी गोष्ट करू शकेल? असीम आहे त्याची महिमा आणि ते ज्यांना त्याचे सहभागी ठरवितात त्यांच्यापेक्षा तो कितीतरी श्रेष्ठ आहे!

41 भूतलावर व समुद्रात सर्वत्र अनाचार पसरलेला आहे, लोकांनी आपल्या हातांनी केलेल्या कमाईमुळे. (परिणामी) अल्लाह त्यांना त्यांच्या काही कृत्यांचा फळ चाखायला लावील, यासाठी की, त्यांनी (सन्मार्गाकडे) परत यावे. 42 (पैगंबर! त्यांना) सांगा, भूतलावर संचार करा आणि चिंतनपूर्वक निरीक्षण करा की, त्या (अपराध्यांचा) शेवट कसा झाला, जे यांच्यापूर्वी होऊन गेले. त्यांच्यापैकी बहुसंख्य अनेकेश्वरवादी होते (अर्थात ज्यांनी इतरांना अल्लाहचे समकक्ष ठरविले होते).

43 (पैगंबर!) तुम्ही आपले ध्यान एकाग्रचित्त करून (पूर्ण निष्ठेने) (अल्लाहच्या नजरेत) जो नेहमी खरा धर्म आहे, त्याकडे ठेवा. अल्लाहकडून तो दिवस येण्यापूर्वी, जो टाळला जाऊ शकत नाही. त्या दिवशी लोक एकमेकांपासून वेगळे होऊन जातील. 44 ज्यांनी सत्य नाकारले, तर त्यांच्या नाकारण्याचे परिणाम त्यांनाच भोगावे लागतील आणि ज्यांनी चांगली कृत्ये केलीत तर त्यांनी स्वत:च्याच भल्याची तयारी केली आहे. 45 तर अल्लाह श्रद्धा धारण करून सत्कर्मे करणाऱ्यांना आपल्या कृपेने चांगला मोबदला देईल. सत्य स्वीकारण्यास नकार देणारे लोक अल्लाहला अजिबात प्रिय नाहीत.

46 त्याच्या (सामर्थ्याच्या) निशाण्यांपैकी हेही आहे की, तो शुभवार्ता देणारे वारे पाठवतो. ते यासाठी की, तुमच्यावर आपला अनुग्रह करावा. (समुद्रात) नौका त्याच्या आज्ञेने चालतात, यासाठी की, तुम्हाला (आपल्या उपजीविकेच्या

रूपाने) त्याची कृपा प्राप्त करता यावी (हे सर्व यासाठी तो करतो की,) तुम्ही त्याच्याप्रति आभार व्यक्त करावे. 47 (पैगंबर!) आम्ही तुमच्यापूर्वीही अनेक पैगंबरांना त्यांच्या-त्यांच्या लोकांकडे पाठवले. त्यांच्यापैकी प्रत्येक जण (आपल्या लोकांकडे) सत्याचे सर्व स्पष्ट प्रमाण घेऊन आला. मग (पैगंबरांच्या मिशनची मुदत संपल्यानंतर) जे अपराधी होते, त्यांच्यावर आम्ही सूड उगवला. तसेच श्रद्धावंतांची मदत करणे, हे आमचे अटळ कर्तव्य होते.

48 तो अल्लाह आहे, जो वारे पाठवतो. मग ते वारे ढगांना उंच नेतात. मग तो आपल्या इच्छेप्रमाणे आकाशात त्यांना पसरवून टाकतो. तसेच तो त्यांची थरावर थर अशी मांडणी करतो. तेव्हा त्यांच्यामधून तुम्ही पाऊस पडताना पाहता. मग तो आपल्या भक्तांपैकी ज्यांच्यावर इच्छितो, त्यांच्यावर त्याचा वर्षाव करतो. तेव्हा पाहा, ते आनंदाने किती प्रफुल्लित होतात! 49 (पण) त्यांच्यावर (पावसाचा) वर्षाव केला जाण्यापूर्वी, ते (अगदी) निराश झालेले होते. 50 (हे मानवा) तर बघ, अल्लाहच्या कृपेच्या खुणा, जमीन मृत झाल्यानंतर तो कशाप्रकारे तिला जीवन प्रदान करतो. (हे सर्व करीत असलेला अल्लाह) अवश्य मृतांना पुन्हा जिवंत करणार आहे. त्याला काहीही करण्याचे सामर्थ्य प्राप्त आहे. 51 पण जर आम्ही असा वारा पाठविला (जो ओलावा शोषून घेईल व) त्यांची पिके पिवळी पडत असल्याचे त्यांना आढळेल, तर ते तेव्हा आमच्या अनुग्रहांना नाकारू लागतील. 52 (पैगंबर!) तुम्ही (हे संदेश) मृतांना ऐकवू शकत नाही, ना (मनाने) बहिरे झालेल्या लोकांना तुमची हाक ऐकू जाणार, जेव्हा की, ते पाठ दाखवून निघून जात असतील. 53 ना तुम्ही मनाने आंधळे झालेल्या लोकांना चुकीच्या मार्गावरून सन्मार्गावर आणू शकता. तुम्ही केवळ त्यांना (आपले म्हणणे) ऐकवू शकता, जे आमच्या संदेशांवर विश्वास ठेवणारे आहेत आणि आमचे आज्ञापालन करीत (जीवन जगणारे) आहेत.

54 तो अल्लाह आहे, ज्याने तुम्हाला अशक्तपणाच्या अवस्थेत निर्माण केले.

त्यानंतर तुम्हाला शक्ती प्रदान केली. मग (शक्तीच्या अवस्थेचा) काही काळ लोटल्यानंतर तुम्हाला वार्धक्य दिले. तो इच्छितो ते निर्माण करतो. तो सर्व काही जाणणारा आहे, सर्वशक्तिमान आहे. 55 मग ज्या दिवशी शेवटची घटका येऊन ठेपेल, तेव्हा अपराधी लोक शपथ घेऊन सांगतील की, ते (मृत्यूपूर्वीच्या जगात) फारच अल्पकाळ राहिले (जसे एखाद्या तासापेक्षा जास्त नाही). अशाप्रकारे ते नेहमी बहकलेलेच राहिले. 56 पण ज्या लोकांना ज्ञान आणि श्रद्धा या गोष्टी लाभलेल्या होत्या, ते (त्यांना) म्हणतील, 'अल्लाहच्या नोंद रजिस्टरनुसार तुम्ही पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत राहिलेले आहात. हा आहे पुनरुत्थानाचा दिवस. पण तुम्ही हे जाणून न घेण्यावर ठाम राहिले.' 57 तेव्हा त्या दिवशी अत्याचारी लोकांना सबबी प्रस्तुत करण्यामुळे काही लाभ मिळणार नाही. किंवा ना त्यांना स्वत:मधे सुधारणा करण्यास सांगितले जाईल.

58 आम्ही या कुराणात लोकांना समजावून सांगण्यासाठी विविध प्रकारची उदाहरणे प्रस्तुत केलेली आहेत. पण जर तुम्ही अशा कोणत्याही संदेशासह त्या लोकांकडे जाल तर जे सत्य नाकारण्यावर आग्रही आहेत, ते अवश्य तुम्हाला हेच म्हणतील की, तुम्ही केवळ खोटे दावे करीत आहात. 59 अशाप्रकारे अल्लाह त्या लोकांच्या मनाची दारे सीलबंद करून टाकतो, जे (सत्य) जाणू इच्छित नाहीत. 60 तर तुम्ही सहनशीलता बाळगा. नि:संदेह, अल्लाहचे वचन सच्चे आहे. असे अजिबात व्हायला नको की, जे लोक विश्वास ठेवणारे (श्रद्धावंत) नाहीत, ते तुमच्या सहनशीलतेला तडे जाण्यास कारणीभूत ठरावे.

# सूरह–३१. लुक़मान

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 अलीफ० लाम० मीम० 2 हे विवेकपूर्ण ग्रंथाचे संदेश आहेत. 3 (त्यात) मार्गदर्शन व कृपा आहे, सदाचारी लोकांसाठी. 4 जे नित्य नमाज़ाचे पालन करतात व (ज़कातरूपी) दानकार्य करतात आणि मृत्युपश्चात जीवनावर दृढ

विश्वास ठेवतात. 5 हेच लोक आहेत, ज्यांना आपल्या पालनकर्त्याचे मार्गदर्शन लाभले आहे (व ते सन्मार्गावर मार्गस्थ आहेत) आणि हेच लोक यशस्वी होणार आहेत.

6 पण लोकांमध्ये कोणी असाही आहे, जो आपल्याकडे ज्ञानाचा कोणताही आधार नसतानाही, (अल्लाहच्या मार्गदर्शनापेक्षा) वायफळ गोष्टींना प्राधान्य देतो, केवळ यासाठी की, लोकांना अल्लाहच्या मार्गापासून बहकावून दूर न्यावे आणि (त्याच्या संदेशांना) उपहासाचे लक्ष्य बनवावे (हा त्याचा उद्देश असतो). अशा लोकांसाठी भयंकर अपमानकारक शिक्षा आहे. 7 जेव्हा (अशा माणसाला) आमचे संदेश ऐकविले जातात. तो मोठ्या घमेंडीने अशी काही पाठ फिरवतो की, जणू काही त्याने ते ऐकलेच नाहीत, जणू काही त्याच्या कानात बधीरता आहे. तर अशा माणसाला भयंकर दु:खदायक शिक्षेची वार्ता ऐकवून टाका. 8 नि:संदेह ज्या लोकांनी श्रद्धा धारण करून सत्कर्मे केली, त्यांच्यासाठी ऐश्वर्यसंपन्न बागा आहेत. 9 त्यांत ते कायम वास्तव्य करतील, हे अल्लाहचे पक्के वचन आहे. तो सर्वशक्तिमान आहे, अस्सल बुद्धिवान आहे.

10 अल्लाहने आकाशांची निर्मिती केली. कोणत्याही आधारस्तंभांविना, जे की, तुम्ही पाहू शकता. त्यानेच पृथ्वीवर पर्वतांना स्थापित केले — यासाठी की, ती तुम्हाला घेऊन डोलायला लागू नये. त्यानेच पृथ्वीवर सर्व प्रकारचे प्राणी पसरवून ठेवले आहे. आणि आकाशातून पाण्याचा वर्षाव केला व त्याद्वारे विविध प्रकारच्या उत्तम वस्तू निर्माण केल्या.

11 ही (सर्व) अल्लाहची निर्मिती आहे. तर मला दाखवा की, त्याच्याव्यतिरिक्त दुसऱ्यांनी काय निर्माण केले आहे. पण (वस्तुस्थिती ही आहे की), अत्याचारी लोक स्पष्टरित्या सन्मार्गापासून दूर निघून गेलेले आहेत.

12 आम्ही लुक़्मान यास विवेक प्रदान केले होते. व त्यास असे सांगितले होते की, अल्लाहप्रति नेहमी कृतज्ञ राहा. जो कोणी (अल्लाहप्रति) कृतज्ञ राहील

तर त्यात त्याचेच भले आहे. तसेच जो कोणी कृतघ्नतेचे प्रदर्शन करील तर अल्लाह स्वयंपूर्ण आहे (त्याला भक्तांच्या आभाराची गरज नाही), तोच आहे सदा स्तुतीस पात्र! 13 लुक़मान (जो एक विवेकशील माणूस होता एकदा) आपल्या मुलास उपदेश करताना म्हणाला, 'हे माझ्या मुला! कोणालाही (कधीही) अल्लाहचे समकक्ष ठरवू नकोस. कारण कोणालाही अल्लाहच्या ईश्वरत्वामध्ये सहभागी ठरविणे, फार मोठे अत्याचारी कृत्य आहे.'

14 (अल्लाह म्हणतो) 'आम्ही मानवाला त्याच्या आईवडलांच्या बाबतीत (भली वागणूक करण्याची) ताकीद दिली.' त्याच्या आईने त्याला दु:खावर दु:ख सहन करून त्याला आपल्या पोटात ठेवले. मग दोन वर्षांपर्यंत तो पूर्णपणे तिच्यावर अवलंबून राहिला (म्हणजे दोन वर्षांपर्यंत ती त्याला अंगावर दूध पाजवीत राहिली). (आम्ही म्हणालो की), तू माझ्या आणि आपल्या आईवडिलांप्रति आभार व्यक्त कर. (आणि लक्षात ठेव, सर्वांना) माझ्याकडेच परतून यायचे आहे. 15 '(आपल्या आईवडिलांचे नेहमी आदर करीत राहा,) पण जर त्यांनी अशा एखाद्याला माझे समकक्ष ठरविण्यासाठी तुझ्याकडे आग्रह धरला, ज्याचे तुला कोणतेही ज्ञान नाही तर तेव्हा तू त्यांचे म्हणणे (अजिबात) मान्य करू नकोस. (याबाबतीत त्यांच्याशी मतभेद असले तरी) या जगात त्यांच्याशी पूर्णपणे सहृदयतेने वाग. पण अनुकरण मात्र त्या व्यक्तीचे कर, ज्याने स्वत:ला, मला समर्पित करण्याचा मार्ग अंगीकारला आहे. मग शेवटी तुम्हा सर्वांना माझ्याकडेच परत यायचे आहे. तेव्हा मी तुम्हाला तुम्ही काय-काय करीत होता, ते दाखवून देईन.

16 (लुक़मान पुढे म्हणाला), 'बेटा! एखादे कर्म मोहरीच्या दाण्याइतकेही जरी असले आणि ते कोठे खडकात, किंवा आकाशात किंवा जमिनीत कुठेही (कोणाच्याही दृष्टीस न पडण्याच्या अवस्थेत असेल किंवा कोणाच्याही स्मरणात राहिलेले नसेल) तरीही अल्लाह (हिशेब करताना) तेही समोर आणेल. खरोखर,

अल्लाह अतिशय तीक्ष्ण नजर ठेवणारा आणि नित्य जागरूक आहे. 17 माझ्या प्रिय मुला! नित्य नमाज़ाचे पालन कर, तसेच चांगले कृत्य करण्यास (लोकांना) प्रवृत्त कर आणि वाईट कृत्य करण्यापासून त्यांना प्रतिबंध कर. तसेच (या जीवनात) जो काही त्रास तुला पोहोचेल, ते सहन करीत राहा. खरोखर, ही धैर्याची कामे आहेत. 18 तसेच लोकांकडे घमेंडीने तोंड वाकडे करू नकोस आणि भूतलावर ऐट मिरवीत चालू नकोस. कारण (नेहमी लक्षात ठेव) अल्लाहला ऐटबाज व गर्विष्ठ लोक (अजिबात) प्रिय नाहीत. 19 तसेच आपल्या वर्तणुकीत शालीनता कायम ठेव आणि (कोणाशीही बोलताना) मृदू आवाजात बोल, (लक्षात असू दे की,) सर्वात वाईट (कर्णकटू)आवाज गाढवाचा आवाज आहे.'

20 तुम्ही लोकांनी या गोष्टीचे कधी (चिंतनपूर्वक) अवलोकन केलेले नाही का? जे काही आकाशात आहे आणि जे काही पृथ्वीवर आहे, त्यांना अल्लाहने तुमच्या सेवेत कार्यरत केलेले आहे? तसेच त्याने दृश्य आणि अदृश्य, आपले सर्व प्रकारचे कृपाप्रसाद (ज्यांची–ज्यांची तुम्हाला गरज होती), परिपूर्णरित्या तुम्हाला प्रदान केलेले आहेत. लोकांमध्ये काही असेही आहेत, जे कोणत्याही प्रकारे ज्ञान, मार्गदर्शन आणि दिव्य ग्रंथ (इ.) गोष्टींच्या आधाराविना अल्लाहसंबंधाने वादविवाद करीत असतात. 21 जेव्हा त्यांना सांगितले जाते की, 'तुम्ही त्या गोष्टीचे अनुसरण करा, जी अल्लाहने प्रकट केली आहे.' तर ते म्हणतात, 'नाही, आम्ही तर केवळ त्याच गोष्टीचे अनुसरण करू, ज्या गोष्टीचे अनुसरण आमचे वाडवडील करीत राहिले.' 'अच्छा! सैतान त्यांना आगीच्या शिक्षेकडे बोलावीत असेल तरीदेखील (ते त्याच गोष्टीचे अनुसरण करणार) आहेत का?' 22 पण जो कोणी स्वत:ला पूर्णपणे अल्लाहला समर्पित करून टाकेल आणि तो सत्कर्मे देखील करीत असेल, तर अशा माणसाने मजबूत दोर आपल्या हाती धरलेला आहे. सर्व गोष्टींचा अंतिम परिणाम अल्लाहपाशीच आहे. 23 मग कोणी जर सत्य नाकारण्यावर ठाम असेल तर त्याच्या नाकारण्यामुळे तुम्ही दु:खी होऊ नका.

आमच्याकडेच त्यांना परतून यायचे आहे. तेव्हा आम्ही त्यांना दाखवून देऊ की, ते काय करीत होते. खरोखर, अल्लाहला लोकांच्या मनात काय-काय आहे ते चांगले ठाऊक आहे. 24 आम्ही त्यांना काही काळ ऐहिक जीवनाचे लाभ उपभोगण्याची संधी देऊ. पण शेवटी त्यांना कठोर शिक्षेकडे खेचून आणू.

२५ जर तुम्ही त्यांना विचाराल, 'आकाश व पृथ्वी यांना कोणी निर्माण केले? तर ते अवश्य उत्तर देतील, 'अल्लाहने'. त्यांना सांगा, '(तुम्हाला हे माहीत असायला हवे की, त्याचसाठी) सर्व स्तुतीचा अधिकारी केवळ अल्लाह आहे.' पण बहुसंख्य लोकांना या गोष्टीची जाण नाही. २६ जे काही आकाशात आहे आणि जे काही पृथ्वीवर आहे. सर्व अल्लाहचेच आहे. (आणि) अल्लाह स्वयंपूर्ण आहे, सर्व प्रकारच्या स्तुतीस तोच पात्र आहे, यात मुळीच शंका नाही. २७ (निःसंशय त्याची महिमा अशी आहे की), जर पृथ्वीवरील सर्व वृक्ष लेखण्या झाल्या आणि समुद्र शाई झाले आणि त्यात आणखी तसेच सात समुद्र (शाई बनून) सामील झाले, तेव्हा देखील अल्लाहची (महानता व्यक्त करणारे) शब्द संपणार नाहीत. कारण अल्लाह आहेच असा (महान व) सर्वशक्तिमान व अस्सल बुद्धिवान.

28 (त्याच्यासाठी) तुम्हा सर्वांना निर्माण करणे आणि (मृत्यूनंतर) पुन्हा जिवंत करणे असे आहे, जसे एका व्यक्तीला निर्माण करणे व पुन्हा जिवंत करणे. खरोखर, अल्लाह सर्व काही ऐकणारा, सर्व काही पाहणारा आहे. 29 तुम्ही या गोष्टीचे चिंतनपूर्वक कधी अवलोकन केले नाही का की, अल्लाह दिवसाला लहान करून रात्र काही अंशी मोठी करतो आणि (कधी) रात्र लहान करून दिवसाला मोठा करतो. त्यानेच सूर्य व चंद्र यांना (आपल्या नियमानुसार) कामाला लावून ठेवले आहे. त्यांच्यापैकी प्रत्येक निर्धारित अवधीनुसार आपले मार्गक्रमण करीत असतो. तुम्ही जे काही करीत असता, ते अल्लाहला चांगले माहीत आहे. 30 (या सर्व खुणा, या गोष्टीचे प्रमाण आहेत की,) अल्लाह अंतिम

सत्य आहे (म्हणजे सर्व प्रकारची शक्ती, गुण, ऊर्जा.......इत्यादी गोष्टींचा स्रोत अल्लाह आहे). त्याला सोडून लोक ज्यांचा धावा करतात ते असत्याशिवाय अन्य काही नाही. नि:संदेह केवळ अल्लाह सर्वोच्च आहे, असीम महान आहे.

31 तुम्ही लोकांनी या गोष्टीचे (चिंतनपूर्वक) कधी निरीक्षण केले नाही का की, नौका समुद्रात अल्लाहच्या कृपेने संचार करीत असतात? हे सर्व यासाठी आहे की, तो तुम्हाला त्याच्या (सामर्थ्याच्या) खुणा दाखवू इच्छितो. खरोखर यात संदेश आहेत, संयम बाळगणाऱ्या व आभार व्यक्त करणाऱ्या प्रत्येकासाठी.
32 (बहुसंख्य लोकांच्या बाबतीत असे घडते की), जेव्हा ते लाटांनी अशाप्रकारे वेढले जातात, जणू (मृत्यूने) त्यांना वेढले आहे. तेव्हा ते अल्लाहप्रति पूर्ण समर्पित भाव बाळगून त्याचा धावा करू लागतात. पण जेव्हा तो त्यांना सुरक्षितरित्या भूप्रदेशावर आणतो, तेव्हा त्यांच्यापैकी फारच थोडेसे लोक रास्त मार्गाचे अनुसरण करणे कायम ठेवतात. आमच्या संदेशांना अन्य कोणी नाही तर केवळ वचनभंग करणारी आणि कृतघ्न असलेली व्यक्ति नाकारते.

33 लोकांनो! आपल्या पालनकर्त्याची जाण ठेवा आणि त्या दिवसाचीही जाण बाळगून असा, ज्या दिवशी कोणी बाप आपल्या मुलाच्या कोणत्याही प्रकारे कामी येणार नाही, ना कोणता मुलगा आपल्या बापाच्या कामी येईल. अल्लाहचे वचन पक्के आहे, यात मुळीच शंका नाही. तेव्हा या जगातील (क्षणभंगुर सुखाच्या) फसवणुकीस तुम्ही बळी पडता कामा नये. तसेच तो (तुमची फसवणूक करण्यासाठी पेटून उठलेला सैतान), तुम्हाला फसविण्याच्या बाबतीत यशस्वी होता कामा नये.

34 नि:संदेह, न्यायाचा दिवस केव्हा येईल याचे ज्ञान केवळ अल्लाहलाच आहे. तोच पावसाचा वर्षाव करतो, केवळ तोच जाणतो की, गर्भात काय आहे (म्हणजे गर्भात वाढत असलेल्या जीवासंबंधाने सर्व काही केवळ त्यालाच माहीत आहे). कोणत्याही जिवाला तो उद्या काय करेल (आणि त्याचे काय

परिणाम त्याच्यासमोर येतील) माहीत नसते. तसेच हे देखील कोणालाही माहीत नाही की, तो कोणत्या ठिकाणी मृत्यू पावेल. खरोखर, हे सर्व जाणणारा केवळ अल्लाह आहे, तो नित्य जागरूक आहे.

# सूरह-३२. अस्-सजदा

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 अलीफ० लाम० मीम० 2 हा ग्रंथ समस्त विश्वाचा (निर्माता, मालक व)
पालक असलेल्या अल्लाहकडून प्रकट करण्यात आलेला आहे, यात शंकेला
मुळीच जागा नाही. 3 तरीदेखील (सत्य नाकारण्यावर आग्रही असलेले) लोक
म्हणतात की, हे (पैगंबर मुहम्मदांनी) स्वत: रचले आहे! नाही, तसे कदापि
नाही! हे सत्य आहे तुमच्या पालनकर्त्याकडून, यासाठी की, (पैगंबर!) तुम्ही
त्या लोकांना सावध करून टाका, ज्यांच्याकडे तुमच्यापूर्वी सावध करणारा
कोणीही आला नाही. म्हणजे कदाचित ते सन्मार्गाचा अंगीकार करतील.

4 तो अल्लाह आहे, ज्याने निर्माण केले आकाशांना आणि पृथ्वीला आणि जे
काही यांच्यादरम्यान आहे त्या सर्वांना — सहा दिवसात. मग तो समस्त
विश्वाच्या सत्ताकेंद्रावर विराजमान झाला (म्हणजे निर्माण करून चालविण्याचे
सर्व नियंत्रण आपल्याकडे घेतले). त्याच्याशिवाय दुसरा कोणीही ना तुमचा
साहाय्यकर्ता आहे, ना शिफारसकर्ता. तेव्हा तुम्ही (या सर्व अर्थपूर्ण गोष्टींवर)
चिंतन करीत नाही का? 5 तोच आकाशापासून — पृथ्वीपर्यंत प्रत्येक गोष्टीची
व्यवस्था पाहतो. मग शेवटी सर्व गोष्टींचा अहवाल (निवाड्यासाठी) त्याच्याकडेच
अशा एका दिवशी पुन्हा परत जाणार, जो दिवस तुमच्या गणतीनुसार एक हजार
वर्षे इतका आहे. 6 तोच आहे दृश्य आणि अदृश्य गोष्टींना जाणणारा (म्हणजे
ज्या गोष्टी तुमच्यासाठी दृश्य आहेत आणि ज्या अदृश्य आहेत त्याही तो
जाणतो). तोच आहे सर्वशक्तिमान व असीम दयावान. 7 त्याने जे काही निर्माण

केले ते परिपूर्ण मॉडेलवर वर निर्माण केले. त्याने मानवाच्या निर्मितीची सुरुवात मातीपासून केली. [8] मग मानवाचा वंश त्याने (वीर्यरूपी) तुच्छ द्रवाच्या सत्त्वाद्वारे पुढे सुरू ठेवला. [9] मग त्याने त्याची घडवणूक केली आणि आपल्या आत्म्याची फुंकर मारली. (अशाप्रकारे हे मानवा!) त्याने तुला कान, डोळे आणि बुद्धी या गोष्टी प्रदान केल्या (म्हणजे हे गुण असलेला परिपूर्ण माणूस बनून तू तयार झालास). पण तुम्ही लोक फारच अल्प कृतज्ञता व्यक्त करता.

[10] (असे अनेक लोक आहेत) जे म्हणतात, ‘आम्ही जेव्हा (मृत्यूनंतर) जमिनीत हरवून जाऊ (मातीत मिळून जाऊ) तेव्हा आम्हाला नवीन जीवन प्रदान (कसे बरे) केले जाईल?’ नव्हे! (असे म्हणणारे लोक) आपल्या पालनकर्त्याच्या भेटीला नाकारत आहेत. [11] (त्यांना) सांगा, ‘(एक दिवस) तुमच्यावर नियुक्त केलेला मृत्युदूत तुमचे प्राण काढून घेतो. मग तुम्हा (सर्वांना) आपल्या पालनकर्त्याकडे परत आणले जाते.’ [12] जर (न्यायाच्या दिवसाचे ते दृश्य) तुम्ही पाहू शकले असते, त्या दिवशी अपराधी लोकांच्या माना आपल्या पालनकर्त्यासमोर शरमेने खाली वाकलेल्या असतील. (ते म्हणतील,) ‘हे आमच्या पालनकर्त्या! आता आम्ही सर्व (सत्य आपल्या डोळ्यांनी) पाहून घेतले आणि आम्ही ऐकले. आम्हाला पुन्हा एकदा (आधीसारखे जीवन) देऊन परत पाठव, म्हणजे आम्ही सत्कृत्ये करू, आता आम्हाला सर्व व्यवस्थित समजले आहे.’ [13] आम्ही जर इच्छिले असते तर प्रत्येक माणसावर आमचे मार्गदर्शन ग्रहण करणे, बंधनकारक केले असते (पण आमची तशी योजना नव्हती) कारण (अपराध्यांसंबंधाने) मला माझा हा शब्द पाळायचा होता की, ‘मी नरकास (वाईट) जिन्न व माणसांनी भरून टाकेन.’ [14] अल्लाह (अपराधी लोकांना) सांगेल, ‘तर आता चाखा ही शिक्षा, यासाठी की, तुम्ही, या दिवसाला सामोरे जायचे आहे, ही गोष्ट विसरून बसले होते. आम्ही सुद्धा (आज) तुम्हाला विसरून गेलो आहोत. तर आता आपल्या (दुष्)कृत्यांची शिक्षा नेहमीसाठी

चाखत राहा.'

15 आमच्या संदेशांवर खऱ्या अर्थाने श्रद्धा ठेवणारे केवळ ते लोक आहेत, जेव्हा त्यांना त्यांच्याआधारे काही उपदेश केला जातो तर ते लगेच (त्यांना ग्रहण करतात) आणि नतमस्तक होऊन आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीसह त्याचे गुणगान करू लागतात. तसेच ते कधीही अहंकार करीत नाहीत. 16 (रात्रीच्या समयी) त्यांच्या कुशी त्यांच्या अंथरुणापासून दूर असतात. ते (शिक्षेच्या) भीतीने व (कृपाप्राप्तीच्या) आशेने आपल्या पालनकर्त्याचा धावा करीत असतात. तसेच जे काही आम्ही त्यांना दिलेले आहे त्यातून (आमच्या कार्यासाठी) ते खर्च करीत असतात. 17 तर (आज) कोणीही ही कल्पना करू शकत नाही की, (अल्लाहने) त्यांच्या सत्कर्मांच्या बदल्यात त्यांच्यासाठी नेत्रसुख देणाऱ्या कोणकोणत्या (सुंदर) गोष्टी लपवून ठेवलेल्या आहेत.

18 तर मग जो श्रद्धावंत आहे, त्याची तुलना त्या माणसाबरोबर कशी केली जाऊ शकते, जो अवज्ञा करणारा आहे. नाही, दोघे कधीही सारखे होऊ शकत नाहीत. 19 ज्या लोकांनी श्रद्धा धारण केली आणि सत्कर्मे केली, त्यांच्यासाठी स्वर्गात सुंदर निवासस्थाने आहेत; हे त्यांचे (अल्लाहकडून) स्वागत असेल, त्या कार्यांच्या मोबदल्यात, जी ते करीत राहिले. 20 (या उलट) जे लोक आज्ञाभंग करीत राहिले तर अशा लोकांचे वास्तव्याचे ठिकाण नरक आहे. ते पुन्हा–पुन्हा त्यातून बाहेर पडण्यासाठी प्रयत्न करतील, तेव्हा त्यांना पुन्हा त्यातच लोटून देण्यात येईल आणि त्यांना सांगितले जाईल, त्या आगीची चव चाखत राहा, जिला खोटे ठरविण्यावर तुम्ही फार आग्रही राहिलात. 21 आम्ही निश्चितपणे त्यांना मोठ्या शिक्षेपूर्वी लहान शिक्षेची चव यासाठी चाखवू की, कदाचित ते पश्चात्तापासह आमच्याकडे वळतील. 22 त्यापेक्षा दुष्ट आणखी कोण असू शकतो, ज्याला जेव्हा त्याच्या पालनकर्त्याच्या संदेशांद्वारे उपदेश केला जातो, तेव्हा तो त्यांच्याकडे पाठ फिरवतो. आम्ही अशा अपराध्यांना अवश्य शिक्षा

करू.

[23] आम्ही मूसालाही ग्रंथ प्रदान केले होते, म्हणून (हे पैगंबर!) तुम्हाला हा (जो ग्रंथ) दिला जात आहे, त्यासंबंधाने तुम्ही कसलीही शंका बाळगण्याचे कारण नाही. आम्ही (मूसाला दिलेल्या ग्रंथाला) बनी इस्राईल या जमातीसाठी मार्गदर्शनाचे माध्यम बनविले होते.

[24] आम्ही त्यांच्यामध्ये काही लोकनायक उभे केले, जे आमच्या आदेशानुरूप लोकांचे मार्गदर्शन करीत असत. तसेच ते संयमपूर्वक (लोकांना मार्गदर्शन करण्याचे) कार्य करत असत आणि ते आमच्या संदेशांवर दृढ विश्वास ठेवून असत.

[25] निश्चितच, तुमचा पालनकर्ता न्यायाच्या दिवशी त्यांच्यामध्ये, ज्या गोष्टींवर ते आपसात मतभेद करीत असत, त्यासंबंधाने आपला फैसला सुनावेल.
[26] (सत्य नाकारणाऱ्या लोकांसाठी) ही गोष्ट मार्गदर्शनकारक ठरली नाही का की, त्यांच्यापूर्वी आम्ही कित्येक जनसमूहांना नष्ट करून टाकले? त्या नष्ट झालेल्या ओसाड वस्त्यांमधून या लोकांचे (म्हणजे मक्कावासीयांचे) हिंडणे-फिरणे सुरू आहे. खरोखर, यामध्ये संदेश सुनावणाऱ्या खुणा आहेत, मग काय हे लोक ऐकत नाहीत?

[27] त्यांनी या गोष्टीचे कधी (चिंतनपूर्वक) निरीक्षण केले नाही का की, आम्ही पावसाच्या (ढगांना) ओसाड भूप्रदेशाकडे हाकून नेतो? मग (पाऊस वर्षाव करून) आम्ही शेती उपजितो, ज्यातून यांची गुरेढोरे आणि हे स्वत: खातात. तर हे (बोध घेण्याच्या उद्देशाने, या गोष्टींचे) निरीक्षण करीत नाहीत?
[28] ते म्हणतात, 'तुझ्या म्हणण्यात काही तथ्य असेल तर (आम्हाला सांग), तो अंतिम निर्णय केव्हा होईल.' [29] (त्यांना) सांगा, 'अंतिम निर्णयाच्या दिवशी, जे लोक (जीवनभर) सत्य नाकारण्यावर आग्रही राहिले, पण त्यांनी त्या दिवशी श्रद्धा धारण केली तर त्यांची ती श्रद्धा त्यांच्यासाठी काही लाभप्रद ठरणार नाही,

ना त्यांना कोणत्याही प्रकारे उसंत देण्यात येईल.’ 30 म्हणून तुम्ही त्यांच्यापासून दूर राहा आणि (सत्याचा उलगडा होण्याची) प्रतीक्षा करा ते देखील प्रतीक्षा करीत आहेत.

# सूरह-३३. अल-अहज़ाब

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 पैगंबर! अल्लाहची जाण ठेवा आणि सत्य नाकारणाऱ्या लोकांच्या व दांभिक लोकांच्या म्हणण्यानुसार वागू नका. खरोखर, अल्लाह सर्व काही जाणणारा आणि अस्सल बुद्धिवान आहे. 2 तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याकडे जे काही प्रकट केले जात आहे त्याचे अनुसरण करा. नि:संदेह, अल्लाहला तुम्ही जे काही करीत आहात त्याची पूर्ण जाणीव आहे. 3 तर अल्लाहवर दृढ विश्वास ठेवा. कारण, अल्लाह तुमचा सांभाळकर्ता म्हणून पर्याप्त आहे.

4 अल्लाहने कोणत्याही मनुष्याच्या छातीमध्ये दोन हृदये निर्माण केलेली नाहीत. तसेच तुम्ही तुमच्या पत्नींना ‘माता’ संबोधल्याने त्या माता (किंवा मातेसमान) होऊन जातील, असा कुठलाही नियम त्याने बनविलेला नाही. तसेच तुमच्या मानलेल्या पुत्रांना तुमचे खरे पुत्र ठरविलेले नाही. या सर्व केवळ तुमच्या तोंडच्या गोष्टी आहेत आणि अल्लाह सत्य बोलतो आणि तोच तुम्हाला सरळ मार्ग दाखवू शकतो.

5 (जिथपर्यंत तुमच्या दत्तक पुत्रांचा संबंध आहे) त्यांना त्यांच्या स्वत:च्या वडिलांच्या नावासह बोलावीत जा. अल्लाहच्या दृष्टीने हीच पद्धत जास्त न्यायोचित आहे. पण जर तुम्हाला त्यांचे पिता कोण आहेत, हे माहीत नसेल तर ते तुमचे धर्मबंधू आणि मित्र आहेत. पण जर याबाबतीत तुमच्याकडून नकळत चूक झाल्यास, ते आक्षेपार्ह असणार नाही. (पण ती चूक निश्चितपणे आक्षेपार्ह आहे) जी तुम्ही जाणूनबुजून करता. अल्लाह माफ करणारा, दया करणारा आहे.

[6] (अल्लाहच्या) पैगंबराचा हक्क श्रद्धावंतांवर त्यांच्या आपल्या जिवापेक्षाही अधिक आहे. आणि पैगंबराच्या पत्नी या त्यांच्या माता होत (म्हणजे मातेसमान होत). अल्लाहच्या ग्रंथानुसार (हक्कांच्या बाबतीत) रक्ताचे नातलग इतर सर्वसामान्य श्रद्धावंत आणि (अल्लाहच्या कार्यासाठी) स्वदेश त्याग करून आलेले श्रद्धावंत यांच्यापेक्षा अधिक हक्क राखतात. पण जर तुम्ही आपल्या मित्रांशी चांगले, सहृदय आचरण करू इच्छित असाल (तर त्यात काही गैर नाही). (अल्लाहच्या) ग्रंथात हे नमूद करण्यात आलेले आहे.

[7] आम्ही पैगंबरांकडून (संदेश पोहोचविण्याविषयी) पक्के वचन घेतले. तुमच्याकडून, तसेच नूह, इब्राहीम, मूसा आणि मरियमपुत्र येशू मसीह (ईसा) या सर्व पैगंबरांकडून. आम्ही त्यांच्यापैकी प्रत्येकाकडून दृढ प्रतिज्ञा घेतली. [8] ती यासाठी की, अल्लाहला न्यायाच्या दिवशी त्या सत्यवचनी लोकांना (म्हणजेच पैगंबरांना) विचारता यावे की, (पृथ्वीवर) सत्याचा (संदेश पोहोचविण्याच्या) त्यांच्या (कार्याला कशाप्रकारे प्रतिसाद मिळाला). पण सत्य नाकारणाऱ्या लोकांसाठी त्याने यातनामयी शिक्षा तयार ठेवली आहे.

[9] इमान धारण केलेल्या लोकांनो! अल्लाहने तुमच्यावर (नेहमी) केलेल्या कृपेचे स्मरण करा. जेव्हा (शत्रूचे) सैन्य तुमच्यावर चालून आले होते. तेव्हा आम्ही त्यांच्याविरुद्ध (भयंकर) वादळी वारा पाठविला आणि असे (स्वर्गदूतांचे) सैन्य पाठविले, जे तुम्हाला दिसत नव्हते. तुम्ही जे काही करत असता, ते सर्व अल्लाह पाहत असतो. [10] जेव्हा (शत्रूचे सैन्य) तुमच्यावर चालून आले होते, तुमच्या वरच्या बाजूने आणि खालच्या बाजूने, तेव्हा तुमचे डोळे (भीतीने) फिरले होते (म्हणजे अगदी अवाक झाले होते) आणि तुमचे काळीज घशाशी आले होते. तेव्हा तुम्ही अल्लाहविषयी नाना तऱ्हेच्या कल्पना करू लागला होता. [11] तेव्हा श्रद्धावंतांची कठीण स्वरूपाची परीक्षा पाहण्यात आली आणि जबरदस्तरित्या त्यांना हादरवून सोडण्यात आले.

[12] (ती वेळ आठवा जेव्हा) दांभिक लोक आणि ते लोक ज्यांच्या मनात विकृती होती, म्हणू लागले, 'अल्लाह आणि त्याच्या पैगंबराने आमच्याशी जो वायदा केला होता ती निव्वळ फसवणूक होती.' [13] जेव्हा त्यांच्यापैकी काही जण म्हणाले, 'हे यसरिबच्या लोकांनो! (म्हणजे मदिनावासीयांनो!) तुम्हा लोकांचा (शत्रूसमोर) टिकाव लागू शकत नाही, म्हणून तुम्ही मागे फिरा.' तर दुसरे काही असेही होते, जे पैगंबराकडे (घरी परत जाण्याची) परवानगी मागू लागले. म्हणू लागले, 'आमची घरे असुरक्षित आहेत.' पण ती वस्तुतः असुरक्षित नव्हती. ते केवळ पळून जाण्याच्या बेतात होते. [14] (यांची हकिगत तर अशी आहे की,) जर त्यांच्या शहराच्या सर्व बाजूंनी आक्रमण करून (शत्रू) शहरात शिरला असता, आणि त्यांना (शत्रूद्वारे स्वधर्म त्याग करून) विश्वासघात करण्यासाठी सांगण्यात आले असते तर त्यांनी जराही संकोच न करता, लगेच तसे केले असते. [15] त्यांनी (पैगंबराद्वारे) अल्लाहला असे वचन दिले होते की, ते (कोणत्याही परिस्थितीत धर्मादेशाकडे) पाठ फिरविणार नाहीत. (लक्षात ठेवा) अल्लाहला दिलेल्या वचनासंबंधाने (प्रत्येकाला) जरूर जाब द्यावा लागेल. [16] (पैगंबर!) त्यांना सांगा, 'तुम्ही (नैसर्गिक) मृत्यूच्या किंवा (युद्धात) ठार होण्याच्या भीतीने पळत असाल तर तुमचे हे पलायन तुमच्या काहीच कामी येणार नाही. तुम्हाला (मिळालीच तर) फार अल्पकाळासाठी या जीवनाचा आनंद उपभोगण्याची संधी मिळेल.' [17] त्यांना सांगा, 'असा कोण आहे जो तुम्हाला अल्लाहपासून वाचवू शकतो, जेव्हा अल्लाहने तुम्हाला इजा पोहोचविण्याचे ठरविलेले असेल तर? (अगदी असेच) जर अल्लाहने तुमच्यावर कृपा करण्याचे ठरविले तर त्याच्या कृपेस रोखू शकतो असा कोण आहे? कारण त्यांना अल्लाहला सोडून दुसरा कोणीही रक्षणकर्ता किंवा साहाय्यकर्ता आढळणार नाही.'

[18] अल्लाहला तुमच्यापैकी त्या लोकांची पूर्ण जाणीव आहे, जे (त्याच्या कार्यासाठी) लढण्यापासून इतरांना रोखतात आणि जे आपल्या भाऊबंदांना

म्हणतात, '(युद्धात लढण्या-मरण्यासाठी कुठे जात आहात?) आमच्याकडे या.' (ते स्वत:) युद्धात कधी भाग घेतले तर अगदी नावापुरतेच. [19] ते तुमच्याबाबतीत विनाकारण तिरस्काराची भावना बाळगतात (तसेच तुमचा साथ देण्याच्या बाबतीत कंजूषपणा दाखवतात.) मग जेव्हा एखादे संकटाचे प्रसंग समोर आले, तेव्हा तुम्ही पाहाल, ते तुमच्याकडे अशा नजरेने पाहत आहेत की, त्यांचे डोळे मृत्यूची मूर्च्छा आलेल्या माणसाप्रमाणे गरगरा फिरत आहेत. नंतर जेव्हा संकटाचा धोका टळतो, तेव्हा मात्र ते धनाचे लोभी बनून आपल्या धारदार जिभा चालवून तुमच्याशी (म्हणजे श्रद्धावंतांशी) वरकरणी गोड बोलू लागतात. यांनी खऱ्या अर्थाने कधीही श्रद्धा धारण केलेली नाही, म्हणून अल्लाहने त्यांची कृत्ये निष्फळ ठरविली आहेत. हे अल्लाहसाठी सहज शक्य आहे. [20] (शत्रूचे सैन्य आल्यापावली परतल्यानंतरही) यांना असे वाटते की, ते आणखीन परतलेच नाहीत. ते जर खरोखर पुन्हा परत आले तर (यांना तर आनंद होईल) आणि ते (दांभिक) अशीच इच्छा करतील की, दूर काही अंतरावर वाळवंटातील भटक्या अरबांसमवेत राहावे आणि तिथे बसून तुमच्याविषयी खबरी जाणत राहावे. हे (दांभिक) तुमच्याबरोबर असते तरी ते युद्धात अगदी नावालाच सहभागी झाले असते.

[21] खरोखर, तुमच्यापैकी प्रत्येकासाठी अल्लाहच्या पैगंबरामध्ये सद्‌गुणांचा आदर्श आहे, (आदर्श) त्याच्यासाठी जो अल्लाह आणि अंतिम दिवसाच्या बाबतीत आशा (व भय) बाळगून असतो आणि जो अल्लाहचे नेहमी स्मरण करीत असतो.

[22] जेव्हा खऱ्या श्रद्धावंतांनी, आक्रमणकारी सैन्याला (त्यांच्याकडे येताना) पाहिले, तेव्हा ते म्हणाले, 'अल्लाह आणि त्याच्या पैगंबराने ज्याविषयी आम्हास आधी सांगून ठेवले होते, हाच तो प्रसंग आहे, अल्लाह व त्याच्या पैगंबराने सत्य तेच बोलले होते.' या घटनेने त्यांच्या श्रद्धेत आणि आज्ञापालन करण्याच्या

त्यांच्या उत्साहात आणखी वाढच केली. 23 श्रद्धावंतांमध्ये असेही लोक आहेत ज्यांनी अल्लाहला दिलेल्या आपल्या वचनाशी प्रामाणिक (असल्याचे आपल्या कृतीने) सिद्ध करून दाखवले. त्यांच्यापैकी काहींनी आपली प्रतिज्ञा पूर्ण केलेली आहे (म्हणजे अल्लाहच्या कार्यासाठी त्यांनी प्राणार्पण केले). तर काही असे आहेत, जे अद्याप त्यासाठी प्रतीक्षा करीत आहेत. तसेच त्यांच्या (निश्चयात) त्यांनी कोणत्याही प्रकारे बदल केलेला नाही. 24 (अशाप्रकारे माणसाची कसोटी यासाठी पाहण्यात येते) की, अल्लाहला सत्यवचनी लोकांना त्यांच्या सत्याला अढळपणे साथ देण्याच्या कार्याबद्दल पुण्यफळ देता यावे. मग दांभिक लोकांना एकतर तो शिक्षा करेल किंवा त्याला (ते क्षमेयोग्य) वाटल्यास, तो त्यांना क्षमा करेल. खरोखर, अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे.

25 सत्य नाकारण्यावर आग्रही असलेल्या श्रद्धाहीनांना, अल्लाहने त्यांच्या असंतोषासह परत पाठविले. या मोहिमेचा त्यांना काहीच फायदा झाला नाही. युद्धात श्रद्धावंतांच्या बाजूने त्यांचे संरक्षण करण्यासाठी अल्लाह पर्याप्त ठरला. कारण अल्लाह सामर्थ्यवान व सर्वशक्तिमान आहे. 26 आधीच्या ग्रंथधारकांपैकी ज्यांनी हल्लेखोरांना साहाय्य केले, त्यांना अल्लाहने त्यांच्या गढ्यांतून खाली उतरवले आणि त्यांच्या मनात अशी काही धाक बसविली (व त्याचा परिणाम असा झाला की,) त्यांच्यापैकी काहींना तुम्ही ठार मारले आणि काहींना कैदी बनविण्यात तुम्ही यशस्वी झाले. 27 त्यानेच तुम्हाला त्यांची जमीन, त्यांची घरे, व त्यांची संपत्ती आणि त्यांची अशी जमीन ज्यावर तुम्ही अद्याप पाऊल देखील ठेवले नव्हते, त्या सर्वांचे वारस बनवले. अल्लाहला सर्व काही करण्याचे सामर्थ्य प्राप्त आहे.

28 पैगंबर! आपल्या पत्नींना सांगा, ‘जर तुम्ही हेच जीवन आणि त्याचे थाटमाट, या गोष्टींची अभिलाषा बाळगून असाल तर या, मी तुम्हाला काही देऊन, चांगल्याप्रकारे (माझ्या विवाहबंधनातून) मुक्त करतो.

29 पण जर तुम्हाला अल्लाह आणि त्याचा पैगंबर व मृत्यूनंतरच्या जीवनात (चांगले स्थान) हवे असेल तर जाणून घ्या की, अल्लाहने तुमच्यापैकी चांगले वर्तन अंगीकारणाऱ्यांसाठी फार मोठे बक्षीस तयार ठेवलेले आहे.' 30 हे पैगंबराच्या पत्नींनो! जर तुमच्यापैकी कोणी उघड-उघड अनुचित कृत्य करील तर त्या कृत्याची शिक्षा (तुम्हाला) दुप्पट दिली जाईल. हे अल्लाहसाठी अगदी सहज शक्य आहे.

31 अगदी असेच तुमच्यापैकी, जी कोणी अल्लाहच्या व त्याच्या पैगंबराच्या आज्ञेचे पालन करील व चांगली कृत्ये करील तर तिला आम्ही दुप्पट बक्षीस प्रदान करू. आम्ही तिच्यासाठी सन्मानाची उपजीविका तयार ठेवलेली आहे. 32 पैगंबराच्या पत्नींनो! तुम्ही इतर स्त्रियांप्रमाणे नाही (म्हणजे तुम्हाला फार जबाबदारीने वागावे लागेल). जर तुम्ही (खऱ्या अर्थाने) अल्लाहची जाण (व भय) बाळगून राहणारे असाल तर (कोणाशीही) बोलताना फार मृदू आवाजात बोलू नका, (कारण तुम्ही असे बोलाल) तर ज्याच्या मनात विकृती आहे, तो (विनाकारण) तुमच्याकडे आकृष्ट होईल. नेहमी (कणखरपणे) आणि सभ्य भाषेत बोला.

33 आणि आपल्या घरांमध्ये शांतपणे राहा आणि (इस्लामपूर्वी) अज्ञानकाळातील रूढीप्रमाणे स्वत:च्या साजशृंगाराचे प्रदर्शन करीत फिरू नका. तर (नमाज़रूपी) नित्य प्रार्थना करा व दानकार्य करा (म्हणजे ज़कात द्या) आणि अल्लाह व त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करा. (पैगंबराच्या) कुटुंबीयांनो! अल्लाह तर तुमच्याबाबतीत हे इच्छितो की, तुमची सर्व प्रकारची अशुद्धता तुमच्यापासून दूर करून टाकावी आणि तुम्हाला पूर्णपणे स्वच्छ-शुद्ध करून टाकावे.

34 तुमच्या घरांत अल्लाहच्या संदेशांचे आणि ज्ञानाचे जे धडे दिले जातात, त्यांना नेहमी लक्षात ठेवा. खरोखर, अल्लाहचे ज्ञान सर्वव्यापी आहे, तो सदैव जागरूक आहे.

35 निश्चितच अल्लाहच्या इच्छेला समर्पित होऊन जीवन व्यतीत करणारे पुरुष आणि अशाच प्रकारे जीवन व्यतीत करणाऱ्या स्त्रिया, श्रद्धावंत पुरुष व श्रद्धावंत स्त्रिया, आज्ञाधारक पुरुष व आज्ञाधारक स्त्रिया, सत्यनिष्ठ पुरुष व सत्यनिष्ठ स्त्रिया, सहनशील पुरुष व सहनशील स्त्रिया, विनम्र पुरुष व विनम्र स्त्रिया, दानकार्य करणारे पुरुष व दानकार्य करणाऱ्या स्त्रिया, उपवास ठेवणारे पुरुष व उपवास ठेवणाऱ्या स्त्रिया, स्वत:चे शील सुरक्षित ठेवणारे पुरुष व स्वत:चे शील सुरक्षित ठेवणाऱ्या स्त्रिया, अल्लाहची प्रत्येक प्रसंगी आठवण करणारे पुरुष व स्त्रिया — अल्लाह, या सर्वांना क्षमादान देऊन फार मोठे बक्षीस प्रदान करणार.

36 कोणत्याही इमानधारक पुरुष आणि इमानधारक स्त्रीसाठी हे अजिबात उचित नाही की, जेव्हा त्यांच्या एखाद्या गोष्टीविषयी, एकदा अल्लाह आणि त्याच्या पैगंबराने निर्णय केल्यानंतर (त्यांनी आपल्या इच्छेनुरूप मत मांडावे) आणि (त्यावर पुनर्विचार करण्यासाठी) त्यांनी काही जागा ठेवावी. कारण जो कोणी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराची अवज्ञा करेल, तो स्पष्टरित्या चुकीच्या मार्गी लागला.

37 (पैगंबर!) जेव्हा तुम्ही त्या माणसाला ज्यावर अल्लाहने कृपा केलेली होती आणि तुम्ही देखील त्याचे (पालनपोषण करून) त्याच्यावर उपकार केले होते, त्यास म्हणालात की, 'आपल्या पत्नीला सोडू नकोस (म्हणजे तलाक़ देऊ नकोस) आणि अल्लाहचे भय बाळग.' तेव्हा तुम्ही आपल्या मनात ती गोष्ट लपवून ठेवली होती, जी अल्लाह प्रकट करणार होता. लोकांना (काय वाटेल या गोष्टीचे) तुम्हाला भय वाटत होते, पण (पैगंबर!) अल्लाहच यासाठी पात्र आहे की, तुम्ही त्याचे भय बाळगावे. जेव्हा ज़ैदने आपल्या पत्नीला तलाक़ दिला, तेव्हा आम्ही तिचा विवाह तुमच्याशी केला. हे आम्ही यासाठी केले की, (भविष्यात) श्रद्धावंतांना त्यांच्या मानलेल्या पुत्रांनी आपल्या पत्नींना तलाक़

(घटस्फोट) दिल्यानंतर, त्या स्त्रियांशी विवाह करण्याच्या बाबतीत कोणतीही अडचण राहू नये. आणि अल्लाहच्या आदेशाचे पालन व्हायलाच हवे.

38 पैगंबरासाठी त्यात काही आक्षेपार्ह असणार नाही, जे (करण्यासाठी) अल्लाहने त्यास परवानगी दिलेली आहे. पूर्वीच्या पैगंबरांच्या बाबतीतही अल्लाहचा हाच परिपाठ राहिलेला आहे. (लक्षात असू द्या) अल्लाहचा आदेश हा अंतिम निर्णय असतो. 39 ते अल्लाहचा संदेश लोकांकडे पोहचवित असत आणि ते केवळ त्याचेच भय बाळगत असत, त्याच्याशिवाय अन्य कोणाचेही भय ते बाळगत नसत. अल्लाह हिशेब घेण्यास समर्थ आहे.

40 (श्रद्धावंतांनो! हे जाणून घ्या की), मुहम्मद तुम्हा पुरुषांपैकी कोणाचेही वडील नाहीत, तर ते अल्लाहचे संदेशवाहक आणि 'अंतिम संदेशवाहक' आहेत. प्रत्येक गोष्टीविषयी अल्लाहला पूर्ण ज्ञान आहे.

41 इमान धारण केलेल्या लोकांनो! 'अल्लाहचे नेहमी स्मरण करा' (म्हणजे प्रत्येक प्रसंगी अल्लाहची आठवण तुम्हाला यायला हवी). 42 सकाळ-संध्याकाळ (प्रत्येक प्रसंगी) त्याचे महिमागान करा. 43 तोच तुमच्यावर कृपा करीत असतो आणि त्याचे स्वर्गदूतही (तुमच्यावर त्याची कृपा व्हावी म्हणून, त्याच्याकडे याचना करीत असतात). ते यासाठी की, त्याने तुम्हाला सर्व प्रकारच्या अंधकारातून बाहेर काढून प्रकाशात आणावे. तो श्रद्धावंतांप्रति फार कनवाळू आहे. 44 ज्या दिवशी ते (म्हणजे त्याचे श्रद्धावंत भक्त) त्याला भेटतील, त्यांचे स्वागत 'तुम्हाला (सदैव) शांती लाभो' या शब्दांनी करण्यात येईल. त्याने त्यांच्यासाठी सन्मानाचे बक्षीस तयार ठेवलेले आहे.

45 पैगंबर! आम्ही तुम्हाला (लोकांवर सत्याची) साक्ष देणारा बनवून पाठविले आहे, तसेच (त्यांना) शुभवार्ता देणारा व सावधानतेचा इशारा देणारा आणि 46 (समस्त मानवजातीला) अल्लाहच्या आदेश (व मार्गदर्शनानुसार) त्याच्याकडे येण्याचे आवाहन करणारा म्हणून आणि लोकांना सन्मार्ग दाखवणारा

दीपक म्हणून पाठवले आहे. [47] (पैगंबर!) श्रद्धावंतांना शुभवार्ता देऊन टाका की, अल्लाहकडून त्यांच्यावर फार मोठी कृपा होणार आहे. [48] सत्य नाकारणाऱ्या लोकांचे व दांभिक लोकांचे म्हणणे तुम्ही (कदापि) मान्य करू नका. त्यांच्या मन दु:खवणाऱ्या गोष्टींकडे दुर्लक्ष करा. आणि अल्लाहवर दृढ विश्वास ठेवा. कार्यसाधक म्हणून अल्लाह पर्याप्त आहे.

[49] श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! जेव्हा तुम्ही श्रद्धावंत स्त्रियांशी विवाहबद्ध व्हाल, नंतर जर वैवाहिक जीवन सुरू करण्यापूर्वीच त्यांना घटस्फोट देत असाल (म्हणजे एखादा विवाह झाल्यानंतर लगेच घटस्फोटाचा प्रसंग निर्माण होत असेल तर) अशा परिस्थितीत त्या स्त्रियांनी इद्दतचा नियम पाळणे आवश्यक नाही, ना तिची गणना करणे आवश्यक आहे. त्यांच्यासाठी काही उपजीविकेची तरतूद करून चांगल्या रीतीने विवाहातून मुक्त करून टाका. (इद्दत= घटस्फोटाची प्रक्रिया तीन मासिक पाळ्यांदरम्यान पूर्ण होईल आणि त्यानंतरच विवाह संपुष्टात येईल).

[50] पैगंबर! तुमच्यासाठी त्या पत्नी आम्ही वैध ठरविल्या आहेत, ज्यांना तुम्ही महरची रक्कम देऊन टाकली आहे आणि युद्धात अल्लाहने तुम्हाला प्रदान केलेल्या दासी स्त्रियाही आणि (आम्ही तुमच्यासाठी विवाहयोग्य आहेत) तुमच्या चुलत्याच्या मुली व आत्याच्या मुली आणि तुमच्या मामाच्या मुली व मावशीच्या मुली ज्या तुमच्याबरोबर स्वदेशत्याग करून आलेल्या आहेत. तसेच कोणतीही श्रद्धावंत स्त्री, जी पैगंबराशी (महरविना) विवाह करण्यास स्वत:हून तयार असेल, पण पैगंबराचीही तिच्याशी विवाह करण्याची इच्छा असेल तर ती (या विवाहासाठी वैध आहे). हा विशेषाधिकार केवळ तुम्हाला लागू होतो इतर श्रद्धावंतांना नाही.

(जिथपर्यंत इतर श्रद्धावंतांचा संबंध आहे) आम्ही जाणून आहोत की, आम्ही त्यांच्या पत्नी आणि त्यांच्या दासी यांच्याविषयी काय अनिवार्य केलेले

आहे. (ही विशेष सवलत तुम्हाला यासाठी आहे की,) तुम्हाला (आपल्या मिशनचे काम करताना यासंबंधाने) कोणत्याही गोष्टीची अडचण येऊ नये. अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे.

51 त्यांच्यापैकी (पाळी–पाळीने) हवे तिला स्वत:पासून दूर ठेवा आणि हवे तिला आपल्यापाशी ठेवा. मग जिची पाळी तुम्ही लांबणीवर घातली होती, तिला आपल्यापाशी बोलावून घ्याल तर असे करणे तुमच्यासाठी आक्षेपार्ह नाही. तसे करणे तर जास्त योग्यच राहील आणि अशाप्रकारे (त्यांच्यापैकी प्रत्येकाचे) डोळे सुखावतील आणि त्या दु:खी होणार नाहीत. तुम्ही त्यांना जे काही द्याल, त्यावर त्यांनी समाधान मानावे. तुमच्या मनात जे काही आहे, ते सर्व अल्लाह जाणतो. (कारण) अल्लाह सर्व काही जाणणारा आहे व (सहानुभूती असलेला) दयासागर आहे. 52 याशिवाय तुम्हाला अधिक स्त्रियांशी विवाह करण्याची परवानगी नाही. ना तुमच्यासाठी हे उचित आहे की, तुम्ही त्यांच्याजागी दुसऱ्या पत्नी आणाव्यात, मग त्यांचे सौंदर्य तुम्हाला कितीका आवडेना, पण यास अपवाद तुमच्या दासी आहेत (ज्या आधीपासून तुमच्या दास्यत्वाखाली आहेत). अल्लाह प्रत्येक गोष्टीवर लक्ष ठेवून आहे.

53 श्रद्धावंतांनो! पैगंबराच्या घरामध्ये, (जेव्हा तुम्हाला तिथे) जेवणासाठी निमंत्रित करण्यात आले असेल, तर तोपर्यंत प्रवेश करू नका जोपर्यंत तुम्हाला परवानगी दिली जात नाही. अशा प्रसंगी (इतक्या लवकरही) तिथे जाऊ नका की, तिथे जाऊन तुम्हाला भोजन तयार होण्याची वाट पाहत बसून राहावे लागेल. पण जेव्हा तुम्हाला बोलाविले जाईल, (योग्य वेळेवर) जा. मग जेवण करून झाल्यावर तिथे गप्पागोष्टी करत बसून राहू नका, तिथून निघून जा. तुमचे असे वर्तन पैगंबरासाठी त्रासदायक ठरते. पैगंबर संकोचापोटी तुम्हाला काही बोलत नाहीत, पण अल्लाह मात्र सत्य सांगण्यास काही संकोच (वगैरे) करीत नाही. तुम्ही पैगंबरांच्या पत्नींकडे काही मागाल तर पडद्याच्या आडून मागा. ही

तुमच्या मनांची आणि त्यांच्या मनांची शुद्धता (कायम ठेवण्यासाठी) योग्य अशी पद्धत आहे. तुमच्यासाठी (पूर्णपणे) अनुचित आहे की, तुम्ही पैगंबराला (कोणत्याही प्रकारे) त्रास द्यावा, तसेच हे ही पूर्णपणे अवैध आहे की, पैगंबरानंतर त्यांच्या पत्नींशी विवाह करावा. कारण असे करणे अल्लाहच्या दृष्टीने महापाप आहे.
54 (हे लक्षात असू द्या की,) तुम्ही एखादी गोष्ट प्रकट करा किंवा लपवून ठेवा, अल्लाहला प्रत्येक गोष्टीची पूर्ण जाणीव आहे.

55 (पण पैगंबरांच्या पत्नी मुक्तपणे) आपल्या पित्यासमोर, आपल्या मुलांसमोर, आपले भाऊ व भावाची मुले किंवा बहिणींची मुले आणि आपल्या (सारख्या) स्त्रियांसमोर आणि त्यांचे (दास व) दासी यांच्यासमोर जाण्यात आक्षेपार्ह असे काही नाही. (हे पैगंबराच्या पत्नींनो!) तुम्ही (नेहमी) अल्लाहची जाण व भय बाळगा. अल्लाह प्रत्येक गोष्टीवर आपली नजर ठेवून आहे.

56 अल्लाह आपल्या पैगंबरावर कृपावर्षाव करीत असतो, तसेच त्याचे स्वर्गदूतही त्याच्यावर कृपावर्षाव व्हावा (यासाठी अल्लाहकडे नेहमी याचना करीत असतात). श्रद्धावंतांनो! तुम्हीदेखील त्याच्यावर (अल्लाहची) कृपा व्हावी यासाठी (अल्लाहकडे) प्रार्थना करीत राहा आणि पैगंबराला 'शांती लाभो' असे अभिवादन करीत राहा (म्हणजे स्वत: अल्लाह, स्वर्गदूत आणि श्रद्धावंत पैगंबराचे सदैव शुभचिंतक आहेत).
57 जे लोक (जाणूनबुजून) अल्लाह व त्याच्या पैगंबराला त्रास देतात, त्यांच्यावर या जगात व यानंतरच्या जगात अल्लाहचा शाप आहे. त्यांच्यासाठी अपमानास्पद शिक्षा तयार ठेवलेली आहे.

58 जे लोक श्रद्धावंत पुरुष व स्त्रियांना त्यांनी कोणतीही चूक केलेली नसतानाही त्रास देतात, अशा लोकांनी खोटा दोषारोप करण्याचे व घोर अपराधाचे ओझे स्वत:वर घेतले आहे.

59 पैगंबर! आपल्या पत्नींना व मुलींना आणि श्रद्धावंत स्त्रियांना सांगा, '(सार्वजनिक ठिकाणी वावरताना) त्यांनी बाह्य वस्त्राचा भाग आपल्या भोवती

स्वत:वर (म्हणजे डोक्यावर व छातीवर) टाकून घ्यावा. (अशा पेहरावाद्वारे शालीन स्त्रिया म्हणून) त्या ओळखल्या जातील आणि (सार्वजनिक ठिकाणी वावरताना) त्यांना काही त्रास होणार नाही. अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे. 60 दांभिक लोक आणि ते ज्यांच्या मनात विकृती आहे असे लोक आणि मदिनेतील अफवा पसरविणारे लोक, हे सर्व (पैगंबराच्या मदिना या शहरात अराजकता निर्माण करण्याचे कार्य करीत असत) त्यांनी ते सर्व (स्वत:हून) बंद केले नाही तर आम्ही (एक दिवस) तुम्हाला त्यांच्याविरुद्ध कारवाई करायला लावू. मग शहरात राहण्याविषयी त्यांची उलटी गणती सुरू होईल. 61 (त्यांची अवस्था अशी होईल की, सर्व बाजूने) त्यांच्यावर धिक्कार असेल, जिथे-कुठे सापडतील, पकडून ठार केले जातील. 62 त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या (अपराध्यांच्या बाबतीत) अल्लाहचा हाच नियम राहिलेला आहे. तुम्हाला अल्लाहच्या नियमाच्या बाबतीत कधीही काही फरक जाणवणार नाही.

63 लोक तुम्हाला क़यामती(च्या वेळेसंबंधाने) विचारतात, त्यांना सांगा, 'त्याचे ज्ञान केवळ अल्लाहलाच आहे. कोण जाणे, ती वेळ कदाचित जवळ येऊन ठेपलेली असेल?' 64 निश्चितच सत्य नाकारणाऱ्या लोकांचा अल्लाहने धिक्कार केलेला आहे, आणि त्यांच्यासाठी धगधगणारी आग तयार ठेवलेली आहे. 65 त्यामध्ये ते कायम वास्तव्य करतील. तिथे त्यांचा कोणी ना रक्षणकर्ता असेल, ना साहाय्यकर्ता. 66 त्या दिवशी जेव्हा त्यांचे चेहरे नरकाच्या आगीत उलटे-पालटे केले जातील तेव्हा ते म्हणतील, 'कदाचित आम्ही अल्लाहचे आज्ञापालन व पैगंबराचे आज्ञापालन करण्याचा मार्ग अंगीकारला असता (तर किती बरे झाले असते)!' 67 ते म्हणतील, 'हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही आमच्या पुढाऱ्यांचे व थोरामोठ्यांचे म्हणणे मान्य केले. तर त्यांनी आम्हाला सन्मार्गापासून दूर नेले. 68 हे आमच्या पालनकर्त्या! त्यांना दुप्पट शिक्षा दे, तसेच तुझ्याकडून त्यांच्यावर धिक्काराचा भयंकर वर्षाव होवो असे कर.'

[69] श्रद्धावंतांनो! तुम्ही त्या लोकांप्रमाणे होऊ नका, ज्यांनी (विनाकारण दोषारोप करून) मूसाचे मन दुःखवले. पण अल्लाहने त्याला त्यांच्या दोषारोपातून मुक्त केले. तो अल्लाहच्या नजरेत सन्मानास पात्र असा होता. [70] श्रद्धावंतांनो! अल्लाहचे भय बाळगा (म्हणजेच त्याची जाण ठेवा) आणि जे सत्य व न्यायोचित आहे, तेच बोला — [71] (तुम्ही असे कराल तर) अल्लाह तुमच्या आचरणात सुधारणा करेल आणि तुमच्या (भूतकालीन) चुका माफ करेल. ज्या माणसाने (पूर्ण निष्ठेने) अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करण्याचा मार्ग अवलंबिला, तर त्याने (खरोखर) फार मोठे यश प्राप्त केले.

[72] आम्ही (विचार व आचार स्वातंत्र्याचा) ठेवा आकाश, धरती आणि पर्वत यांना देऊ केला, पण त्यांनी ती जबाबदारी उचलण्यास नकार दिला, कारण ते त्या जबाबदारीचे भार उचलण्याच्या बाबतीत घाबरले. पण माणसाने (मुद्दाम व अविचारीपणे) ती उचलून घेतली. खरोखर त्याने स्वतःला सर्वात मूर्ख व सर्वात दुष्ट सिद्ध केले. [73] (आता ती जबाबदारी उचलली तर तिचा आवश्यक परिणाम तर होणारच होता, तो म्हणजे) अल्लाह दांभिक पुरुष व दांभिक स्त्रियांना, तसेच अनेकेश्वरवादी पुरुष व अनेकेश्वरवादी स्त्रियांना शिक्षा करेल अल्लाह श्रद्धावंत पुरुषांवर व श्रद्धावंत स्त्रियांवर आपली कृपादृष्टी टाकेल. अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे.

# सूरह–३४. सबा

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] सर्व स्तुती त्या अल्लाहसाठीच आहे. जे काही आकाशात आहे व जे काही पृथ्वीवर आहे, त्या सर्वांचा तोच मालक आहे. यानंतरच्या जगात देखील सर्व स्तुतीचा अधिकारी तोच असणार, तोच आहे अस्सल बुद्धिमान व प्रत्येक गोष्टीचा जाणकार. [2] जे काही जमिनीत जाते आणि जे काही तिच्यातून बाहेर येते

आणि जे काही आकाशातून खाली येते आणि जे काही आकाशाकडे वर जाते, ते सर्व तो जाणतो. तो दयाळू व अतिशय क्षमाशील आहे.

3 सत्य नाकारण्यावर ठाम असलेले लोक म्हणतात, 'आमच्यावर (पुनरुत्थानाची) ती वेळ कधीही येणार नाही.' त्यांना सांगा, 'का नाही? अदृश्याचा जाणकार असलेल्या माझ्या पालनकर्त्याची शपथ, ती वेळ तुमच्यावर अवश्य येणार आहे. आकाशात आणि पृथ्वीवर कणाइतकीही वस्तू त्याच्यापासून लपलेली नाही, ना त्याहून लहान, ना त्याहून मोठी (अशी वस्तू आहे, जी त्याच्या नजरेतून सुटू शकते). सर्व त्याच्या स्पष्ट ग्रंथात नमूद आहे. 4 (पुनरुत्थानाची घटका यासाठी येईल की,) तो त्या लोकांना मोबदला देईल, ज्यांनी श्रद्धा धारण करून चांगली कामे केली. हेच ते लोक आहेत, ज्यांना क्षमा आणि सन्मानाची आजीविका मिळेल. 5 ज्या लोकांनी आमच्या संदेशांचे उद्दिष्ट धुळीस मिळवण्यासाठी आपली शक्ती खर्च केली, अशांसाठी दुःखदायी शिक्षा अटळ आहे. 6 (पैगंबर!) ज्यांना ज्ञान देण्यात आलेले आहे, ते लोक समजून आहेत की, तुमच्याकडे तुमच्या पालनकर्त्याकडून जे प्रकट झालेले आहे, ते सत्य आहे. ते परमसमर्थ व सर्व प्रकारच्या स्तुतीस पात्र अशा अल्लाहचा मार्ग दाखवते.

7 ज्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला, ते आपल्या (समविचारी लोकांना) म्हणतात, 'आम्ही तुम्हाला असा एक मनुष्य दाखवावा का? जो तुम्हाला (एक विलक्षण गोष्ट) सांगेल की, तुम्ही (मृत्यूनंतर) जेव्हा असंख्य कण बनून (मातीत) सामावून जाल, तेव्हा तुम्हाला (आधीप्रमाणेच) पुन्हा निर्माण केले जाईल. 8 कोण जाणे? या माणसाने अल्लाहविषयी खोटी गोष्ट रचली आहे की, त्याला एका प्रकारे वेड लागलेला आहे?' नाही, तसे मुळीच नाही, तर (वस्तुस्थिती ही आहे की), जे लोक मृत्यूनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवत नाहीत, तेच (ईश्वरीय) शिक्षेच्या मार्गावर मार्गस्थ आहेत, योग्य मार्गापासून

फारच दूर निघून गेलेले आहेत. 9 त्यांनी या गोष्टीचे कधी निरीक्षण केले नाही का की, आकाश आणि पृथ्वीवर त्यांच्यापुढे व त्यांच्यामागे जे काही आहे (त्याद्वारे ते वेढले गेलेले आहेत). आम्ही इच्छिले तर त्यांना जमिनीत गाडून टाकू शकतो किंवा त्यांच्यावर आकाशातून आपत्ती कोसळवू शकतो. खरोखर यात आमच्या त्या भक्तासाठी (विचारप्रवर्तक) संदेश आहे. जो अल्लाहकडे परत फिरणारा आहे.

10 आम्ही (पैगंबर) दाऊदवर आमच्याकडून फार मोठी कृपा प्रदान केली होती. आम्ही (पर्वतांना व पक्ष्यांना) आज्ञा केली होती, 'हे पर्वतांनो व पक्ष्यांनो, तो जे आमचे स्तुतिगान करतो त्यात तुम्हीही सामील व्हा.' तसेच आम्ही लोखंडाचे उपयोग करणे त्याच्यासाठी अधिक सोयीस्कर केले. (व आम्ही म्हणालो,) 11 '(यापासून) तू पूर्ण लांबीची चिलखते बनव आणि योग्य त्या मापाच्या कड्या बनव आणि सत्कर्मे करीत राहा. जे काही (तुम्ही लोक) करीत असता, ते सर्व मी पाहत असतो.'

12 सुलेमानसाठी आम्ही वाऱ्याला त्याच्या अधीन केले होते. त्याचा सकाळचा प्रवाह एक महिना चालत होता आणि सायंकाळचा प्रवाह एक महिना चालत होता. आम्ही त्याच्यासाठी वितळलेल्या तांब्याचा झरा प्रवाहित केला होता. तसेच जिन्न पैकी काही त्याच्या पालनकर्त्याच्या आज्ञेने त्याच्यासाठी (विविध) कामे करीत असत. (आम्ही त्यांना असेही बजावले होते की,) त्यांच्यापैकी कोणी आमच्या आज्ञेचे उल्लंघन करेल तर आम्ही त्यास धगधगत्या आगीच्या शिक्षेची चव चाखायला लावू. 13 ते त्याच्यासाठी तयार करीत असत जे तो इच्छित होता, जसे महाल, चित्रे (म्हणजे चित्रांनी सुशोभित अशा भव्य इमारती), (पाणी साठवून ठेवण्यासाठी) जलाशयासारखे मोठमोठे हौद आणि आपापल्या जागांवर पक्की बसवण्यात आलेली स्वयंपाकाची मोठमोठी पात्रे. आम्ही म्हणालो, 'हे दाऊदच्या कुटुंबीयांनो! कृतज्ञतेचे भाव बाळगून काम करा, माझ्या भक्तांमध्ये

फारच थोडे लोक कृतज्ञ
14 जेव्हा आम्ही त्याच्या (म्हणजे सुलेमानच्या) मृत्यूचा निर्णय सुनावला,
तेव्हा तो मृत्यू पावला असल्याबद्दलची सूचना (जिन्नांना) एका किड्याव्यतिरिक्त
अन्य कोणी दिली नाही, जो त्याच्या काठीला कुरतडून खात राहिला. जेव्हा तो
खाली पडला, तेव्हा जिन्नांना स्पष्टरित्या या गोष्टीची जाणीव झाली की, जर
त्यांना अदृश्याचे ज्ञान असते तर त्यांना असे अपमानजनक श्रम करीत पडून
राहावे लागले नसते.
15 ‘सबा’ (या लोकांकरिता) त्यांच्या देशात (अल्लाहच्या कृपेचे) एक
प्रमाण होते. (ते म्हणजे) दोन (फारच विस्तृत अशा) बागा, एक उजव्या
बाजूला तर दुसरा डाव्या बाजूला. आम्ही त्यांना म्हणालो, ‘तुमच्या पालनकर्त्याने
दिलेल्या उपजीविकेतून खा आणि त्याच्याप्रति कृतज्ञ राहा. तुमच्यासाठी एक
चांगला (सुपीक) भूप्रदेश आहे आणि तुमचा पालनकर्ता क्षमाशील आहे.’ 16
पण त्यांनी (आमच्याकडे) पाठ फिरवली, तेव्हा आम्ही त्यांच्यावर बांध तोडून
भयंकर जलप्रलय पाठविला, (त्याद्वारे त्या सुपीक भूप्रदेशाला म्हणजे) त्यांच्या
त्या दोन बागांना, अशा दोन बागांत परिवर्तित करून टाकले, ज्यांतील फळे
कडू व बेचव होती. तसेच त्यांत (काटेरी) झुडपे व काही जंगली बोरी होत्या.
17 हा मोबदला त्यांना आम्ही त्यांच्या कृतघ्नतेपोटी दिला होता. असा मोबदला
आम्ही त्यांनाच देत असतो. जे कृतघ्न असतात.
18 आम्ही त्यांच्या आणि ज्यांना समृद्धी दिली होती, त्या वस्त्यांदरम्यान
इतर अशा वस्त्या वसवल्या, ज्या एकमेकांना जवळजवळ लागून होत्या
(म्हणजे एकमेकांच्या दृष्टिक्षेपात होत्या, जसे नदीच्या दोन काठावर — दोन
वस्त्या). त्या वस्त्यांदरम्यान ये-जा करणे आम्ही फार सोपे केले होते. (आणि
आम्ही म्हटले होते,) ‘त्यांच्यादरम्यान रात्री व दिवसा निश्चिंत होऊन
(शांततापूर्वक) संचार करा.’ 19 पण ते म्हणाले, ‘हे आमच्या पालनकर्त्या! तू

आमच्या प्रवासाचा पल्ला अधिक लांब कर (म्हणजे आम्हाला अधिक मौजमजा करीत प्रवास करता येईल). अशाप्रकारे त्यांनी (अल्लाहच्या उपकाराची कदर न करून) स्वत:वरच अन्याय केला, तेव्हा आम्हीही त्यांना (अशाप्रकारे नष्ट केले) की, त्यांना इतिहासाच्या कथा बनवून टाकले. तसेच त्यांना नष्ट करून भूतलावर विखुरून टाकले. खरोखर, या (घटनेत) धडे आहेत, प्रत्येक संयम बाळगणाऱ्या व कृतज्ञ माणसासाठी.

20 सैतानाने त्यांच्याविषयीचे त्याचे अनुमान बरोबर असल्याचे दाखवून दिले. काही सच्च्या श्रद्धावंतांव्यतिरिक्त इतर सर्वांनी त्याचे अनुसरण केले. 21 पण सैतान त्यांना (बळजबरीने भ्रष्ट मार्गाला लावू शकेल) असा त्याच्याकडे मुळीच अधिकार नव्हता. (कारण आम्ही केवळ त्याला लोकांना वाईट गोष्टीच्या मोहात टाकण्याची संधी दिली होती) ते यासाठी की, जे लोक मृत्यूनंतरच्या जीवनावर (खरोखर) विश्वास ठेवणारे आहेत, त्यांना चिन्हांकित करून त्या लोकांपासून वेगळे करता यावे, जे त्यासंबंधाने साशंक आहेत. कारण तुमचा पालनकर्ता सर्व गोष्टींवर लक्ष ठेवून आहे.

22 (त्यांना) सांगा, ‘अल्लाहला सोडून ज्यांना तुम्ही आपले उपास्य समजून आहात, त्यांचा धावा करा. (पण) ना आकाशात, ना पृथ्वीवर त्यांना अणुमात्र देखील अधिकार प्राप्त आहे. ना या दोघांना (चालवण्यात) त्यांचा काही वाटा आहे. ना त्यांच्यापैकी कोणी त्याचा (म्हणजे अल्लाहचा) साहाय्यकर्ता आहे. 23 त्याच्यासमोर कोणाचीही शिफारस (कोणाच्याही) कामी येत नाही, पण ज्याच्यासंबंधाने शिफारस करण्याची (अल्लाहने) परवानगी दिलेली असेल (अशा व्यक्तीचे म्हणणे अल्लाहच्या न्यायालयात ऐकले जाईल). मग जेव्हा (त्या दिवसाची) भीती त्यांच्या मनातून कमी होईल, तेव्हा ते त्यांना विचारतील ज्यांना (आपले म्हणणे मांडण्याची) परवानगी देण्यात आली होती, ‘तुमच्या पालनकर्त्याने काय म्हटले आहे.’ ते उत्तरतील, ‘जे सत्य व उचित आहे ते.’ तोच सर्वोच्च व महान आहे.’

24 त्यांना विचारा, 'तो कोण आहे, जो आकाश आणि पृथ्वी यांतून उपजीविका
पुरवतो.' त्यांना सांगा, 'तो अल्लाह आहे' आणि (हे लक्षात असू द्या) तुम्ही किंवा
आम्ही (दोघांपैकी एक पक्ष) एकतर सन्मार्गावर आहे किंवा स्पष्टरित्या वाट
चुकलेला आहे. 25 त्यांना सांगा, 'जे अपराध आम्ही केलेले असतील त्यासंबंधाने
तुम्हाला जाब विचारण्यात येणार नाही. आणि जे काही तुम्ही करीत आहात,
त्यासंबंधाने आम्हाला जाब विचारला जाणार नाही.' 26 त्यांना सांगा, 'आमचा
पालनकर्ता (न्यायाच्या दिवशी) आपणास सर्वांना एकत्र करील, आणि तो
आपल्यादरम्यान सत्याच्या आधारे फैसला करील. तोच सर्व सत्य उघड करणारा
न्यायाधीश आहे, सर्व काही जाणणारा आहे.' 27 त्यांना सांगा, 'तुम्ही स्वतःच
ज्यांना अल्लाहच्या बरोबरीचे समजून आहात, त्यांना (जरा एक नजर) मलाही तर
दाखवा पाहू. नाही, (कोणीच त्याच्या बरोबरीचा नाही). तोच अल्लाह आहे, जो
सर्वशक्तिमान आहे, बुद्धिवान आहे.'

28 (पैगंबर!) आम्ही तुम्हाला संपूर्ण मानवजातीसाठी शुभवार्ता देणारा आणि
सावधानतेचा इशारा देणारा बनवून पाठविले आहे. पण बहुसंख्य लोकांना याची
जाण नाही. 29 आणि ते विचारतात, 'तुमच्या म्हणण्यात काही तथ्य असेल तर
मग (आम्हाला सांगा), (पुनरुत्थानाच्या व न्यायाच्या) त्या वचनाची पूर्तता
केव्हा होणार आहे.' 30 त्यांना सांगा, 'ज्या दिवसाचे वचन तुम्हाला दिले जात
आहे, तो असा दिवस असेल की, ज्यापासून तुम्ही एक क्षणभर देखील मागे राहू
शकणार नाही, ना पुढे जाऊ शकाल.'

31 जे लोक सत्य नाकारण्यावर आग्रही आहेत, ते म्हणतात, 'आम्ही या
कुराणावर कदापि विश्वास ठेवणार नाही, ना यापूर्वी आलेल्या ग्रंथावर आम्ही
विश्वास ठेवणार.' (पैगंबर!) जर तुम्ही ते (दृश्य) पाहू शकाल (तर तुम्हाला
कळून येईल की, आज जे सत्य नाकारत आहेत, त्यांची काय अवस्था होणार)
जेव्हा हे दुराचारी लोक आपल्या पालनकर्त्यासमोर (न्यायाच्या दिवशी) उभे

केले जातील. ते दोषाचे खापर एकमेकांवर फोडत असतील. जे लोक दुर्बल समजले जात होते, ते त्या लोकांना म्हणतील जे स्वत:ला मोठे समजत असत, 'जर तुम्ही लोक नसता, तर आम्ही जरूर श्रद्धावंत बनलो असतो.'

32 जे स्वत:ला मोठे समजत होते, ते त्या दुर्बल समजल्या जाणाऱ्या लोकांना उत्तर देतील, 'आम्ही मार्गदर्शनाचा स्वीकार करण्यापासून तुम्हाला रोखत होतो की काय, जेव्हा ते (मार्गदर्शन) तुमच्याकडे आले होते? मुळीच नाही, तुम्हीच स्वत: दोषी होता!' 33 (त्यावर) दुर्बल समजले गेलेले लोक, त्या मोठे समजले गेलेल्या लोकांना उत्तर देतील, 'नाही, तसे नाही, रात्रंदिवस जी तुमची कारस्थाने सुरू असायची (त्यामुळेच आम्ही श्रद्धावंत बनण्यापासून वंचित राहिलो). तेव्हा तुम्हीच आम्हाला अल्लाहवर विश्वास न ठेवण्यासाठी आणि त्याचे समकक्ष ठरविण्यासाठी आदेश देत होतात.' आणि जेव्हा ते (त्यांची वाट पाहत असलेली) शिक्षा (उघड्या डोळ्यांनी) पाहतील तेव्हा (त्यांच्यात दाटून आलेला) पश्चात्ताप ते व्यक्त करू शकणार नाहीत. आम्ही त्या श्रद्धाहीनांच्या गळ्यात साखळदंड अडकवू. त्यांना तोच मोबदला मिळेल जे ते करीत होते.

34 जेव्हा-जेव्हा आम्ही कोणत्याही वस्तीमध्ये (आमच्या शिक्षेपासून) सावध करणारा (पैगंबर) पाठवला, तेव्हा (प्रत्येक वेळेस) तेथील समृद्ध लोकांनी (जे केवळ ऐहिक सुखांच्या मागे धावत होते पैगंबराला) असाच प्रतिसाद दिला, (म्हणाले) 'जे देऊन तुला पाठविण्यात आले आहे, ते आम्ही (कदापि) मान्य करणार नाही.' 35 आणि ते म्हणाले, 'आम्ही संपत्ती व संततीच्या बाबतीत समृद्ध आहोत, म्हणून आम्हाला शिक्षा वगैरे होण्याचा प्रश्नच नाही.' 36 (पैगंबर! तुम्ही असे म्हणणाऱ्यांना) सांगा, 'माझा पालनकर्ता इच्छितो त्यास उपजीविकेची साधने मोठ्या प्रमाणात देतो आणि इच्छितो त्यास कमी प्रमाणात देतो. पण बहुसंख्य लोक (यामागील अल्लाहच्या योजनेला) समजत नाहीत.' 37

कारण तुमचे धन आणि तुमची मुले, या त्या गोष्टी होऊ शकत नाहीत, ज्या तुम्हाला आमच्या जवळचे (आदरपूर्वक स्थान) मिळवून देऊ शकतील. पण जे लोक श्रद्धा धारण करतील व सत्कर्मे करतील, अशा लोकांना त्यांच्या (चांगल्या) कर्मांच्या बदल्यात दुप्पट मोठे बक्षीस प्राप्त होईल. तसेच ते (स्वर्गाच्या) भव्य महालात शांती व समाधानाने राहतील. 38 जे लोक आमच्या संदेशांच्या उद्दिष्टांना विफल करण्यासाठी आपली शक्ती पणाला लावत आहेत, ते शिक्षा (भोगण्यासाठी) तिच्यात प्रविष्ट केले जातील. 39 त्यांना सांगा, 'माझा पालनकर्ता आपल्या भक्तांपैकी इच्छितो त्यास उपजीविकेची भरपूर साधने देतो आणि इच्छितो त्यास कमी प्रमाणात देतो. आणि (अल्लाहच्या कार्यासाठी) तुम्ही जे काही खर्च करता, तो त्याची (नेहमी) भरपाई करीत असतो. तोच आहे सर्वोत्तम आजीविका प्रदान करणारा.'

40 मग ज्या दिवशी तो त्या सर्वांना (जे आज सत्य नाकारीत आहे) एकत्र करील, तेव्हा तो स्वर्गदूतांना विचारेल, 'हेच का ते लोक जे तुमची उपासना करीत होते.' 41 ते उत्तर देतील, '(हे प्रभू!) असीम महिमावान आहेस तू! या लोकांशी नव्हे तर आमचा संबंध केवळ तुझ्याशी आहे, (आमची नाही,) तर ते जिन्नांची उपासना करीत असत, त्यांच्यापैकी अनेकांची त्यांच्यावरच श्रद्धा होती.' 42 (तेव्हा अल्लाह म्हणेल), 'आज तुम्ही कोणीही एकमेकाला लाभ किंवा हानी पोहोचवू शकत नाही.' तेव्हा आम्ही त्या अपराध्यांना सांगू, 'आता चाखा त्या आगीची शिक्षा, जिला खोटे ठरविण्यावर तुम्ही आग्रही होता.'

43 जेव्हा आमचे संदेश सर्व बाजूने स्पष्ट करून त्यांना ऐकविले जातात, तेव्हा ते (सत्य नाकारणारे लोक आपसात) म्हणतात, 'हा (स्वतःला अल्लाहचा पैगंबर म्हणवणारा आमच्याप्रमाणेच) केवळ एक माणूस आहे, जो तुम्हाला त्या (उपास्यांपासून) दूर करू इच्छितो, ज्यांची उपासना तुमचे वाडवडील करीत असत.' तसेच ते म्हणतात, 'हे (कुराण) याशिवाय अन्य काही नसून, ते

(माणसाने) रचलेले असत्य आहे (एक थोतांड आहे).' मग (शेवटी) सत्य नाकारण्यावर आग्रही असलेल्या लोकांचे सत्याविषयी हेच म्हणणे होते, जेव्हा की, ते त्यांच्याकडे आले, 'हे अन्य काही नसून उघड–उघड एक जादू आहे.' 44 (पैगंबर! या मक्कावासीयांना यापूर्वी) आम्ही ग्रंथ दिले नव्हते, ज्याचे त्यांनी अध्ययन केले असावे. ना तुमच्यापूर्वी कोणी सावध करणारा (पैगंबर) त्यांच्याकडे आम्ही पाठवला होता. 45 आणि अशाचप्रकारे त्यांच्या आधी होऊन गेलेल्या लोकांनीही (आमच्याकडून पाठविल्याला सत्याला) खोटे ठरविले होते. आम्ही त्या लोकांना जे काही दिले होते, त्याचा दहावा भाग देखील या लोकांना अजून प्राप्त झालेला नाही. पण त्यांनी माझ्या पैगंबरांना खोटे ठरविले. तर कशी होती माझी शिक्षा (जी त्यांनी स्वत:वर ओढवून घेतली).

46 त्यांना सांगा, 'मी तुम्हाला फक्त एक गोष्ट करण्यासाठी उपदेश करीत आहे, ती म्हणजे, तुम्ही अल्लाहची (जाण ठेवून) त्याच्यासमोर उभे राहा. दोघे–दोघे (एकत्र) किंवा एकटे – एकटे, आणि सखोल विचार करा. अशाप्रकारे तुम्हाला कळून येईल की, तुमच्या साथीदारास (म्हणजे या पैगंबरास) काही वेड लागलेले नाही. तो (तुमच्यावर) एक मोठे शिक्षेचे संकट येण्यापूर्वी त्यापासून (तुम्ही स्वत:ला वाचवावे) म्हणून तो सावध करीत आहे.' 47 (पैगंबर!) त्यांना सांगा, 'मी तुमच्याकडे (संदेश पोचविण्याच्या कामाबद्दल) काही मोबदला मागितला (असे तुम्हाला वाटत असेल) तर तो मोबदला तुमच्याकडेच ठेवा, माझा मोबदला मला अल्लाह प्रदान करेल आणि तोच सर्व गोष्टींचा साक्षी आहे.'

48 त्यांना सांगा, 'माझा पालनकर्ता, सत्याने (असत्यावर) प्रहार करील, त्या सर्व गोष्टी तो चांगल्याप्रकारे जाणतो, ज्या कोणाच्याही आकलना पलीकडील आहेत (व अदृश्य) आहेत.' 49 त्यांना सांगा, 'आता सत्य प्रकट झाले आहे, आणि त्यालाच टिकाव मिळणार आहे, कारण असत्याकडे कोणत्याही चांगल्या गोष्टीची ना उत्पत्ती, ना त्याची पुनरावृत्ती करण्याची शक्ती आहे.' 50 त्यांना

सांगा, ‘मी जर वाट चुकलेलो असेन, तर त्याचे परिणाम (तुम्हाला नाही) तर मलाच भोगावे लागतील. आणि जर मी सन्मार्गावर आहे, तर ते केवळ माझा पालनकर्ता माझ्याकडे जे प्रकट करीत आहे, त्यामुळे आहे. खरोखर तो सर्व काही ऐकणारा आणि (त्याला हाक देणाऱ्यांच्या) अगदी जवळ आहे.’

51 कदाचित त्या दृश्याची तुम्ही कल्पना करू शकाल तर.......... (तुम्हाला उमजेल की, न्यायाच्या दिवशी सत्य नाकारणाऱ्या लोकांची अवस्था कशी होणार आहे). तेव्हा ते अगदी घाबरलेले असतील. ते कुठेही पळून जाऊ शकणार नाहीत आणि अगदी जवळूनच त्यांना पकडण्यात येईल. 52 तेव्हा ते ओरडतील, ‘आम्ही आता त्याच्यावर विश्वास ठेवणारे बनलो आहोत.’ पण श्रद्धेपासून इतके दूर निघून गेल्यानंतर, आता त्यांना ती धारण करण्याची संधी कुठे आहे? 53 यापूर्वी तर ते त्यास नाकारण्यावर आग्रही होते.’ तसेच दूरच्या ठिकाणी बसून निराधार अटकळीचे बाण चालवीत असत. 54 आणि आता यांच्या व हे ज्या इच्छा-आकांक्षा बाळगून आहेत त्यांच्यादरम्यान एक तसाच अडसर उभा केला जाईल, जसा त्यांच्यासारखा लोकांच्या बाबतीत पूर्वी उभा केला गेला होता. तेही (यांच्याप्रमाणेच) अस्वस्थ करणाऱ्या शंकेने ग्रस्त झालेले होते.

# सूरह-३५. फ़ातिर

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 सर्व प्रशंसा अल्लाहसाठीच आहे, जो आकाश आणि पृथ्वी यांचा उत्पत्तीकर्ता आहे. तोच स्वर्गदूतांना आपला संदेशवाहक बनवितो, ज्यांना दोन-दोन किंवा तीन-तीन किंवा चार-चार पंख आहेत. तो आपल्या निर्मितीस (अस्तित्व प्रदान करताना) तिच्यात त्याला हवी तशी वाढ करीत असतो. अल्लाह काहीही करू शकतो — यात मुळीच शंका नाही. 2 अल्लाहने आपल्या कृपेचे द्वार मानवावर

खुले केले तर (ती कृपा मानवापासून) रोखू शकेल असा कोणीही नाही. आणि त्याने बंद केले तर मग ते सुरू करेल असाही कोणी नाही. तोच आहे सर्वशक्तिमान व अस्सल बुद्धिवान.

[3] लोकांनो! अल्लाहने तुमच्यावर केलेल्या उपकारांचे स्मरण करा. अल्लाहव्यतिरिक्त दुसरा कोणी निर्माता आहे का, जो तुम्हाला आकाशातून व जमिनीतून उपजीविका प्रदान करतो? त्याच्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही, (निर्माता नाही). मग तुम्ही या सत्यापासून कुठे भरकटत चालला आहात? [4]
(पैगंबर!) या (विकृत मनाच्या) लोकांनी तुम्हाला खोटे ठरविले (तर यात आश्चर्यकारक असे काही नाही) तुमच्या पूर्वीही अनेक पैगंबरांना खोटे ठरविण्यात आले. शेवटी सर्व गोष्टी (निर्णयासाठी) अल्लाहकडेच परत आणल्या जाणार आहेत.

[5] लोकांनो! अल्लाहचे (पुनरुत्थानाविषयीचे) वचन अगदी खरे आहे. तर या ऐहिक जीवनाद्वारे तुमची फसवणूक होता कामा नये. आणि असेही व्हायला नको की, तो धोकेबाज सैतान तुमची फसवणूक करण्याच्या बाबतीत यशस्वी ठरेल. [6]
यात मुळीच शंका नाही की, सैतान तुमचा केवळ शत्रू (आणि शत्रूच) आहे. तर तुम्हीही त्याला आपला केवळ शत्रूच समजा. तो आपल्या अनुयायांना यासाठीच बोलावित असतो की, त्यांनी धगधगत्या आगीचे रहिवासी बनावे. [7] जे लोक सत्य
नाकारण्यावर आग्रही राहिले, त्यांच्यासाठी कठोर शिक्षा (अटळ) आहे. ज्याप्रमाणे ज्यांनी श्रद्धा धारण करून सत्कर्मे केली, त्यांच्यासाठी माफी व फार मोठे बक्षीस आहे.

[8] तो मनुष्य ज्याला, त्याच्या कुकृत्यांना चांगली कृत्ये असे भासवण्यात आले. आणि त्यालाही ती कृत्ये, चांगली वाटत असतील तर असा मनुष्य (सैतानाच्या अनुयायाव्यतिरिक्त दुसरा कोण असू शकतो?) निश्चितच अल्लाह इच्छितो, त्यास मार्गभ्रष्ट करतो आणि इच्छितो, त्यास सन्मार्गी लावतो. त्यांच्या

(विद्रोही प्रतिसादामुळे) दु:खी–कष्टी होऊन तुम्ही स्वत:चे हाल करून घेऊ नका. अल्लाहला चांगले ठाऊक आहे. जे काही ते करीत आहेत.

9 तो अल्लाह आहे, जो वारे पाठवतो, जे ढगांना उंच घेऊन जातात. मग आम्ही त्या (ढगांना) मृत भूप्रदेशाकडे घेऊन जातो. मग त्याच्याद्वारे मृतप्राय झालेल्या जमिनीला पुन्हा जिवंत करतो. अशाच प्रकारे (मानवाचेही) पुनरुत्थान होणार. 10 जो कोणी सन्मान प्राप्त करू इच्छितो तर त्याने हे लक्षात ठेवावे की, सर्व प्रकारच्या सन्मानाचा अधिकारी केवळ अल्लाह आहे. चांगल्या गोष्टी त्याच्याकडे पोहोचत असतात आणि चांगली कृत्ये त्याच्याकडे कौतुकास्पद ठरतात. आणि जे लोक वाईट कारस्थाने रचित आहेत, त्यांच्यासाठी कठोर शिक्षा अटळ आहे. आणि त्यांची कारस्थाने नाश पावतील हेही अटळ आहे.

11 आणि अल्लाहने तुमच्यापैकी (प्रत्येकाला) मातीपासून (म्हणजेच मातीतील रासायनिक घटकांपासून) निर्माण केले आहे. मग शुक्राच्या एका बिंदूपासून (मानवी वंश पुढे सुरू ठेवले). मग त्याने (स्त्री–पुरुषाच्या रूपाने) तुमच्या जोड्या बनविल्या. आणि त्याचे ज्ञान (व परवानगीशिवाय) कोणतीही स्त्री गर्भ धारण करीत नाही, ना ती (बाळ) जन्माला घालते. तसेच कोणालाही (योगायोगाने) ना दीर्घायुष्य लाभते, ना कोणाला कमी आयुष्य, तर जे घडते ते (अल्लाहच्या) हुकूमनाम्यात नमूद असल्याप्रमाणेच घडते. निःसंशय, अल्लाहसाठी ही अगदी सोपी गोष्ट आहे.

12 (त्याच्यासाठी समानता व विविधता निर्माण करणे ही साधी गोष्ट आहे). दोन समुद्र एकसारखे नाहीत. एक (असा आहे की, ज्याचे पाणी) स्वादिष्ट, गोड व पिण्यास रुचकर व तहान भागवणारे असे आहे. तर दुसरा खारट व कडू. तुम्ही दोन्ही समुद्रातून (मासे पकडून) ताजे मांस खात असता. तसेच त्यांतून अशा अलंकारिक वस्तूंना काढत असता जे तुम्ही धारण करता. तसेच (त्या दोन्ही समुद्रांत) नौका त्या लाटांना चिरून पुढे कशा जातात, हे दृश्य तुम्ही पाहत

असता. (हे सर्व) यासाठी आहे की, तुम्ही त्याच्या कृपेचा शोध घ्यावा आणि त्याद्वारे तुमच्यामध्ये त्याच्याप्रति कृतज्ञतेचा भाव नेहमी संचार करीत राहावा.
13 तो रात्रीला दिवसामध्ये प्रविष्ट करतो आणि दिवसाला रात्रीमध्ये प्रविष्ट करतो. त्यानेच सूर्य व चंद्राला (आपल्या नियमाप्रमाणे) कामाला लावले आहे. प्रत्येक (त्याने) निश्चित केलेल्या अवधीनुसार (आपापल्या कक्षेत) मार्गक्रमण करीत असतो. (लोकांनो!) हे (सर्व करणारा) अल्लाहच तुमचा पालनकर्ता होय. सर्वत्र सत्ता त्याचीच आहे. त्याला सोडून तुम्ही ज्यांचा धावा करता, ते खजुरीच्या गुठळीवरील (क्षुल्लक अशा) टरफलाचेही मालक नाहीत.
14 जर तुम्ही त्यांचा धावा कराल, ते तुमच्या हाकेला ऐकू शकत नाहीत. आणि जरी ते ऐकू शकले तरी ते तुम्हाला प्रतिसाद देऊ शकणार नाहीत. आणि न्यायाच्या दिवशी ते, तुम्ही त्यांना अल्लाहच्या बरोबरीचे स्थान देत होता, या तुमच्या कृत्यालाच ते नाकारतील. आणि सर्व गोष्टींची जाणीव असलेल्या (अल्लाहप्रमाणे) दुसरा कोणीही तुम्हाला (सत्याची) जाण करून देऊ शकत नाही.

15 लोकांनो! तुम्हीच (प्रत्येक क्षणी) अल्लाहचे गरजवंत आहात, तर तो स्वयंपूर्ण (व आत्मनिर्भर) आहे. (सदैव) स्तुतीस पात्र आहे.
16 त्याने जर इच्छिले तर तो तुम्हाला (पृथ्वीवरून) दूर सारून तुमच्याजागी नवीन मानवजात (नवीन निर्मिती) आणू शकतो.
17 असे करणे अल्लाहसाठी मुळीच अवघड नाही.
18 (न्यायाच्या दिवशी) कोणीही दुसऱ्या कोणाचे (पापाचे) ओझे आपल्यावर घेणार नाही. आणि शिरावर फार मोठे ओझे असलेल्या मनुष्याने त्याचे ओझे उचलण्यास मदत करण्यासाठी दुसऱ्याला जरी हाक दिली, तरी त्यापैकी जरादेखील (दुसऱ्याकरवी त्याच्यासाठी) उचलले जाणार नाही. मग तो त्याचा अगदी जवळचा नातलग का असत नाही. (पैगंबर!) तुम्ही केवळ त्या लोकांना (खऱ्या अर्थाने) सावध करू शकता. जे आपल्या पालनकर्त्याला (आपल्या डोळ्यांनी) न पाहूनही त्याच्याप्रति भीतीयुक्त आदर बाळगतात आणि नित्य

नमाज़ाचे पालन करतात. आणि जो कोणी स्वत:ला (मनाने) स्वच्छ व शुद्ध बनवितो, तर असे करण्यात त्याचेच भले आहे. शेवटी सर्वांना अल्लाहकडेच परत जायचे आहे.

19 आंधळा आणि दृष्टी लाभलेला हे दोघे समान नव्हेत. 20 तसेच अंधकार
व प्रकाशदेखील समान नाहीत. 21 आणि सावली व ऊन (हेही समान नव्हेत).
22 तसेच (मनाने) जिवंत आणि मेलेला समान नाहीत. (पैगंबर!) खरोखर,
अल्लाह इच्छितो त्यास ऐकवितो. पण जे कबरींमध्ये आहेत त्यांना तुम्ही (आपले
म्हणणे) ऐकवू शकत नाही. (आणि मनाने मेलेले कबरीतील मृतांप्रमाणेच
आहेत). 23 तुम्ही केवळ सावध करणारे आहात. 24 आम्ही तुम्हाला सत्यासहित
पाठविले आहे, शुभवार्ता देणारा सावध करणारा बनवून. आणि असा कोणताही
जनसमूह झाला नाही ज्याच्याकडे सावध करणारा आला नसेल. 25 जर हे लोक
तुम्हाला खोटे ठरवतील तर जे यांच्यापूर्वी होऊन गेले त्यांनीही (पैगंबरांना) खोटे
ठरविले होते. त्यांचे पैगंबर त्यांच्याकडे सत्याचे सर्व सुस्पष्ट प्रमाण व ईश्वरीय
शहाणपण असलेली पुस्तके आणि सन्मार्ग दाखवणारा प्रकाश असलेले ग्रंथ
घेऊन आले होते. 26 मग शेवटी ज्या लोकांनी सत्य न स्वीकारण्याचेच ठरविले
होते, अशांना मी पकडले, तर किती कठोर होती माझ्याकडून (त्यांना) देण्यात
आलेली शिक्षा!

27 (लोकांनो!) तुम्ही या गोष्टीचे कधी (चिंतनपूर्वक) निरीक्षण केले नाही का की, अल्लाहने आकाशातून पाण्याचा वर्षाव केला. त्यापासून आम्ही विविध रंगाची फळे निर्माण केली आणि पर्वतांमध्येही वेगवेगळ्या छटांचे पांढरे व लाल काळ्या गडद रंगाचे खडक असतात.

28 अशाच प्रकारे माणसे, प्राणी आणि गुरेढोरे यांचे रंगही नानातऱ्हेचे आहेत. त्याच्या सर्व भक्तांपैकी केवळ ते लोक (खऱ्या अर्थाने) अल्लाहप्रति भीतीयुक्त आदर बाळगतात, जे ज्ञानी आहेत. खरोखर अल्लाह सर्वशक्तिमान

(असूनही) फार क्षमाशील आहे.

29 ते लोक खऱ्या अर्थाने अल्लाहच्या ग्रंथाचे अनुसरण करणारे आहेत, जे नित्य नमाज़ाचे पालन करतात. आणि जे काही आम्ही त्यांना दिले आहे, त्यातून गुप्तरित्या व सार्वजनिकरित्या खर्च करीत असतात, ते (स्वत:साठी) अशा व्यवसायाचा पायंडा घालीत आहेत, ज्यात नुकसान होणे शक्य नाही. 30 तो त्यांना त्यांचा पुरेपूर मोबदला (तर) देईलच आणि आपल्या कृपेने त्यात आणखी वाढही करेल. खरोखर तो फार क्षमाशील आहे आणि गुणग्राहक आहे. 31 तर (या गोष्टीची जाणीव ठेवा की), आम्ही तुमच्याकडे जो ग्रंथ प्रकट केला आहे, ते सत्य आहे आणि आधीच्या ग्रंथापैकी जे सत्य अद्याप अस्तित्वात आहे, त्याची सत्यता प्रमाणित करणारा आहे. खरोखर, तुमचा पालनकर्ता आपल्या भक्तांची सदैव जाण ठेवणारा व प्रत्येक गोष्टीवर नजर ठेवणारा आहे.

32 नंतर आम्ही ग्रंथाचा वारसा आमच्या भक्तांपैकी त्यांना प्रदान केला, ज्यांची आम्ही निवड केली होती. त्यांच्यापैकी काही स्वत:वरच अन्याय करणारे आहेत आणि काही मध्यम मार्गावर चालणारे आहेत. तर त्यांच्यापैकी काही असेही आहेत जे अल्लाहच्या प्रेरणेमुळे चांगली कामे करण्याच्या बाबतीत सर्वांच्या पुढे आहेत. खरोखर ही त्यांच्यावर अल्लाहची फार मोठी कृपा होय. 33 ते अनंतकालीन आनंदाच्या बागांत वास्तव्य करण्यासाठी प्रवेश करतील. तिथे त्यांना सोन्याची कांकणे आणि मोत्याचे अलंकार घालून सजविले जाईल. तिथे त्यांची वस्त्रे रेशमी असतील. 34 ते म्हणतील, 'सर्व प्रशंसा अल्लाहसाठीच आहे, ज्याने सर्व प्रकारचे दु:ख आमच्यापासून दूर केले. खरोखर आमचा पालनकर्ता माफ करणारा आणि मोठा गुणग्राहक आहे. 35 ज्याने आपल्या कृपेने आम्हाला सदैव (आनंद असलेल्या ) निवासस्थानात वसविले आहे. इथे आम्हाला कोणतेही कष्ट होणार नाही, ना आम्हाला कधी थकवा जाणवेल.'

36 जे लोक सत्य नाकारण्यावर आग्रही राहिले, त्यांच्यासाठी नरकाची

आग तयार आहे. तिथे त्यांना मृत्युदंड दिला जाणार नाही की, मृत्यूद्वारे त्यांची सुटका होऊन जाईल, ना त्यांची शिक्षा त्यांच्यासाठी सौम्य केली जाईल. आम्ही कृतघ्न लोकांना अशा प्रकारे मोबदला देत असतो. 37 ते तिथून मोठ्याने ओरडतील (म्हणतील), 'हे आमच्या पालनकर्त्या! या (त्रासातून) आम्हाला बाहेर काढ. यापुढे आम्ही चांगली कृत्ये करू, पूर्वीपेक्षा अगदी वेगळे वर्तन करू.' त्यावर तो उत्तर देईल, 'आम्ही तुम्हाला पुरेसे आयुष्य दिले नव्हते का की, ज्यात ज्याला सचेत व्हायचे असते तर तो होऊ शकला असता (म्हणजेच उपदेश ग्रहण करू शकला असता)? आणि तसेच तुमच्याकडे सावध करणारा (पैगंबर किंवा ग्रंथ) देखील आला होता. आता चाखत राहा (आपली शिक्षा), अत्याचारी लोकांसाठी कोणीही साहाय्यकर्ता नाही.'

38 यात मुळीच शंका नाही की, अल्लाह आकाश आणि पृथ्वी यांच्या (सर्व) गुप्त गोष्टींना जाणणारा आहे. तसेच तो (लोकांच्या) मनात काय-काय आहे, तेही जाणणारा आहे. 39 त्यानेच तुम्हाला भूतलावर (आधीच्या लोकांचे) उत्तराधिकारी बनवले. (यापुढेही) जो कोणी (अल्लाहच्या एकत्वाला आणि अद्वितीयतेला) मानण्यास नकार देईल, तर त्याच्या नकाराचे परिणाम त्यालाच भोगावे लागतील. आणि श्रद्धाहीनांचा नकार त्यांच्याप्रति अल्लाहची नाराजी वाढविण्यासच कारणीभूत ठरतो. आणि अशाप्रकारे त्यांचे सत्य नाकारण्याचे वर्तन त्यांच्याच नुकसानात भर घालणारे ठरते.

40 त्यांना सांगा, 'तुम्ही त्या (कल्पित) शक्तीविषयी कधी विचार केला आहे का, ज्यांचा तुम्ही अल्लाहला सोडून धावा करीत असता? त्यांनी पृथ्वीवर काय निर्माण केले ते मला दाखवा पाहू. किंवा आकाशातील (व्यवस्था चालवण्यात) त्यांचा काही वाटा आहे? किंवा (असे काही असेल तर दाखवा) की, आम्ही त्यांना एखादा ग्रंथ दिला आणि ते त्याचा आधार बाळगून आहेत?

नाही, तसे नाही, (वस्तुस्थिती ही आहे की), हे अत्याचारी लोक एकमेकांशी

केवळ फसवणुकीचे वायदे करीत आहेत. 41 नि:संदेह, तो केवळ अल्लाह आहे, ज्याने आकाश आणि पृथ्वी यांना, त्यांनी (आपल्या कक्षेतून) ढळू नये म्हणून, त्यांना धरून ठेवलेले आहे. आणि जर ते आपल्या स्थानांपासून ढळले तर त्याच्याशिवाय दुसरा असा कोणीच नाही, जो त्यांना धरून ठेवू शकतो. खरोखर तो सहिष्णू व फार क्षमाशील आहे.

42 हे (सत्य नाकारणारे आधी नेहमी) अल्लाहच्या नावाने मोठमोठ्या गंभीर शपथा घेऊन सांगत असत की, जर त्यांच्याकडे कधी सावध करणारा (पैगंबर) आला तर ते इतर कोणत्याही जनसमूहापेक्षा अधिक चांगल्याप्रकारे मार्गदर्शनाचे पालन करणारे बनतील. पण सावध करणारा (पैगंबर) त्यांच्याकडे आला, तेव्हा (त्याच्याप्रति) केवळ त्यांच्या तिटकाऱ्यात भर पडली. 43 आणि ते भूतलावर मगरूरीचे वर्तन आणि (अल्लाहच्या संदेशांना खोटे ठरविण्यासाठी) कटकारस्थाने करू लागले. पण (अल्लाहच्या नियमानुसार), कटकारस्थाने (शेवटी) करणाऱ्याच्याच अंगलट येत असतात. तर हे लोक (अल्लाहकडून) तोच (विनाशाचा) नियम (यांच्या बाबतीतही) लागू केला जाण्याची वाट पाहत आहेत की काय, जो यांच्यापूर्वीच्या (अपराध्यांच्या) बाबतीत लागू झालेला आहे. तुम्हाला अल्लाहच्या नियमात कधीही बदल झाल्याचे आढळून येणार नाही. ना तुम्हाला कधी अल्लाहच्या आदेशाची (अंमलबजावणी) टाळली जात असल्याचे आढळून येईल. 44 यांनी भूतलावर प्रवास करून, यांच्यापूर्वीच्या (सत्य नाकारणाऱ्या) लोकांचा शेवट कसा झाला, याचे (कधी चिंतनपूर्वक) अवलोकन केले नाही का? ते तर यांच्याहून अधिक बलवान होते. (पण) आकाशात आणि पृथ्वीवर अशी कोणतीही शक्ती नाही, जी अल्लाहच्या (योजनेला) कधी विफल करू शकेल. खरोखर तो सर्व काही जाणणारा व सर्वशक्तिमान आहे.

४५ आणि लोकांना त्यांच्या वाईट कृत्यांबद्दल लगेच फैलावर घेण्याची

अल्लाहची (योजना) असती, तर त्याने पृथ्वीच्या पाठीवर एकालाही सोडले नसते. पण (त्याची योजना अशी आहे की,) तो त्यांना एका ठरावीक मुदतीपर्यंत उसंत देत असतो. मग जेव्हा त्यांची ठरावीक मुदत संपेल. तेव्हा त्या सर्वांना कळेल की, खरोखर अल्लाह आपल्या भक्तांवर स्वत: नजर ठेवून आहे.

# सूरह–३६. या० सीन०

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 या० सीन० 2 सर्वस्वी शहाणपणाच्या गोष्टींनी भरलेल्या अशा कुराणाची
शपथ. 3 (मुहम्मद!) तुम्ही पैगंबरांपैकी आहात, यात मुळीच शंका नाही. 4
सरळ मार्गावर मार्गस्थ. 5 हे (कुराण) सर्वशक्तिमान व असीम दयावान
(अल्लाह)कडून यासाठी प्रकट करण्यात आलेले आहे 6 की, तुम्ही त्या लोकांना
सावधानतेचा इशारा देऊन टाका, ज्यांच्या वाडवडिलांना सावध करण्यात आले
नव्हते. ते (जीवनाच्या वास्तवासंबंधाने) गाफील आहेत.

7 त्यांच्यापैकी अनेकांच्या बाबतीत (शिक्षेचे), आमचे वचन खरे ठरले
आहे, आणि ते श्रद्धा धारण करणार नाहीत. 8 आम्ही त्यांच्या मानेभोवती
त्यांच्या हनुवटीपर्यंत येतील, असे साखळदंड घालून (त्यांना) जखडले आहे.
त्यामुळे त्यांची डोकी वर खेचली गेली आहेत.

9 आणि आम्ही त्यांच्या पुढे एक अडसर आणि मागे एक अडसर निर्माण
केलेले आहे आणि वरून त्यांना झाकून टाकले आहे. तर आता त्यांना (सन्मार्ग)
दिसू शकत नाही. 10 आता (त्यांची अवस्था अशी आहे की), तुम्ही त्यांना
सावध करा किंवा करू नका, दोन्ही गोष्टी त्यांच्यासाठी सारख्याच आहेत. (म्हणजे
आता त्यांना सरळमार्गी लावण्याच्या तुमच्या प्रयत्नांचे काही परिणाम येणार
नाहीत). ते श्रद्धा धारण करणार नाहीत. 11 तुमचे सावध करणे त्या व्यक्तीच्या
बाबतीत (अर्थपूर्ण) आहे, जो उपदेश ग्रहण करून (त्याचे अनुसरण करतो) आणि

अल्लाहचे (त्याला) न पाहता भय बाळगतो. अशा लोकांना क्षमा आणि सन्मानपूर्वक मोबदल्याची शुभवार्ता द्या.

12 निश्चितच आम्ही मेलेल्यांना जिवंत करू आणि आम्ही त्यांच्या कर्मांचा रेकॉर्ड तयार करीत असतो, जी कर्मे ते पुढे पाठवतात आणि जी आपल्या मागे सोडतात. एका स्पष्ट ग्रंथात प्रत्येक गोष्टीची आम्ही नोंद केलेली आहे.

13 (पैगंबर!) या (लोकांसमोर) त्या वस्तीवाल्यांचे उदाहरण प्रस्तुत करा,
जिथे आमचे संदेशवाहक आले होते. 14 (तेथील लोकांकडे) आम्ही दोन
पैगंबरांना पाठवले होते. त्यांनी दोघांनाही खोटे ठरविले, म्हणून आम्ही तिसरा (पैगंबर) पाठवून (त्या दोघांना) मदत प्रदान केली. ते म्हणाले, 'आम्ही
खरोखर (अल्लाहकडून) तुमच्याकडे पाठविले गेलेले आहोत.' 15 (त्यावर
तेथील लोकांनी) उत्तर दिले, 'तुम्ही तर केवळ आमच्याच सारखी माणसे आहात आणि कृपावंत (अल्लाहने) काही (संदेश वगैरे) प्रकट केलेले नाही,
तुम्ही निव्वळ खोटे बोलत आहात.' 16 (त्यावर पैगंबरांनी) म्हटले, 'आमच्या
पालनकर्त्यास हे ठाऊक आहे की, आम्हाला तुमच्याकडे पाठविण्यात आलेले आहे.'

17 आणि आमच्यावर केवळ संदेश स्पष्टरित्या पोहोचविण्याची जबाबदारी आहे.

18 पण त्या लोकांनी उत्तर दिले, 'आम्ही तर तुम्हाला केवळ अपशकुनी समजतो, तुम्ही हे (सर्व प्रवचन) बंद केले नाही तर आम्ही तुम्हाला दगडांनी
ठेचून मारू. तसेच आमच्या हातून तुम्हाला चांगली शिक्षा मिळेल.' 19 (पैगंबरांनी)
उत्तर दिले, 'तुमचे दुर्दैव तुमच्यापाशीच आहे! तुम्हाला (सत्याचा संदेश ग्रहण करण्यासाठी) उपदेश केला जात असल्यामुळे (तुम्हाला हे अपशकून असल्याचे वाटत आहे का)? नव्हे! तुम्ही तर सर्व मर्यादांचे उल्लंघन करणारे लोक आहात.'

20 तेव्हा त्या शहराच्या दुसऱ्या टोकाहून एक माणूस धावत तेथे आला, तो (त्या लोकांना) म्हणाला, 'माझ्या बांधवांनो! तुम्ही पैगंबरांचे अनुसरण करा.

[21] त्यांचे अनुसरण करा, जे तुमच्याकडे कोणताही मोबदला मागत नाहीत, आणि जे सन्मार्ग लाभलेले आहेत.'

[22] 'मी त्याची उपासना का बरे करू नये, ज्याने मला निर्माण केले? आणि त्याच्याकडेच तुम्हा सर्वांना परतविले जाणार आहे. [23] त्याला सोडून मी इतरांना उपास्य का म्हणून मानायला हवे? जर कृपावंत (अल्लाहने) मला इजा पोहचविण्याचे ठरविले तर त्यांची शिफारस माझ्यासाठी लाभदायक ठरणार नाही. ना ते मला वाचवू शकतील. [24] मी जर तसे करीन तर मी स्पष्टपणे सन्मार्गापासून (फार) दूर गेलेलो असेन. [25] (माझ्या बांधवांनो!) मी तुम्हा सर्वांच्या पालनकर्त्यावरच श्रद्धा धारण केली आहे, तर तुम्ही माझे म्हणणे मान्य करा.'

[26] (त्याच्या म्हणण्याचा त्यांच्यावर काहीच परिणाम झाला नाही, व त्यांनी त्याला दगडांनी ठेचून मारून टाकले). तेव्हा आम्ही (त्या श्रद्धावंताला) म्हणालो, 'स्वर्गात प्रवेश कर,' तेव्हा तो उद्‌गारला, '(अरेरे!) माझ्या लोकांना हे कळाले असते तर..... [27] माझ्या पालनकर्त्याने (माझ्या चुका किती उदारतापूर्वक) माफ करून, मला सन्माननीय लोकांमध्ये स्थान प्रदान केले.'

[28] त्याच्यापश्चात आम्ही त्याच्या लोकांकडे आकाशातून (स्वर्गदूतांचे) सैन्य (वगैरे) काही पाठविले नाही (की, त्यांना श्रद्धा धारण करण्यास भाग पाडले असते). कारण (अशासाठी) आम्ही सैन्य पाठवीत नसतो. [29] (आमच्या शिक्षेचा) केवळ एक स्फोट झाला आणि ते लोक संपूर्णत: लुप्त होऊन गेले. [30] खेद वाटण्यासारखी अवस्था आहे लोकांची! जो कोणता पैगंबर त्यांच्याकडे आला, त्यांनी त्याला उपहासाचे लक्ष्य बनविले. [31] त्यांना या गोष्टीची जाणीव नाही का की, कशाप्रकारे आम्ही त्यांच्यापूर्वी कित्येक जनसमूहांना नष्ट केले आहे, आणि ते त्यांच्याकडे परतून कधीही येणार नाहीत. [32] आणि त्या सर्वांना एकत्र करून निश्चितपणे आमच्यासमोर आणले जाणार आहे.

33 आमच्या (सामर्थ्याच्या) निशाण्यांपैकी त्यांच्यासाठी एक निशाणी मृतप्राय जमीन होय. तिला आम्ही जिवंत करून, तिच्यातून अन्नधान्य काढतो. आणि लोक त्यातून खातात. 34 आम्ही तिच्यात खजुरीच्या व द्राक्षांच्या बागा निर्माण केल्या आणि तिच्यात (पाण्याचे) झरे प्रवाहित केले. 35 ते यासाठी की, लोकांनी त्यांची फळे खावीत. आणि (त्यांना या गोष्टीची जाणीव व्हावी) की, त्यांना त्यांच्या हातांनी तर बनविलेले नाही. मग ते (अल्लाहच्याप्रति) कृतज्ञतेचा भाव का बाळगून नाहीत? 36 पावन आहे तो, ज्याने प्रत्येक गोष्टीच्या जोड्या निर्माण केल्या, ज्या (वनस्पती) जमीन उपजिते त्यांत, आणि स्वत: यांच्याही जोड्या आहेत (म्हणजेच माणसाच्या) आणि त्यांच्याही (जोड्या) आहेत ज्यांना (लोक) जाणत नाहीत.

37 (जे-जे अस्तित्वात आहे) त्यांपैकी त्यांच्यासाठी एक खूण म्हणजे रात्र आहे. आम्ही तिच्यातून दिवसाला बाहेर काढतो. तेव्हा (लोक) अंधारात राहून जातात. 38 आणि सूर्य, तो ठरवून दिलेल्या कक्षेत भ्रमण करीत असतो. तो सर्वशक्तिमान व सर्वज्ञ अशा (अल्लाहचा) नियम आहे. 39 आणि आम्ही चंद्राच्या कला ठरवून दिलेल्या आहेत, तो हळूहळू क्षीण होत जातो, आणि शेवटी खजुरीच्या सुकलेल्या फांदीसारखा होऊन जातो. 40 (भ्रमण करताना) ना सूर्य चंद्राला मागे टाकून पुढे जाऊ शकतो, ना रात्र दिवसाच्या वेळेला कमी करू शकते. सर्व (आमच्या नियमानुसार) आपापल्या कक्षेत गतिमान आहेत.

41 आणि त्यांच्यासाठी आमच्या खुणांपैकी दुसरी खूण ही आहे की, आम्ही (मानवाच्या) वंशजांना भरलेल्या नौकेत स्वार करून (मानवी वंश पुढे सुरू ठेवले, तसेच नूहच्या नौकेत मानवासाठी उपयुक्त प्राणीही भरलेले होते) 42 आणि आम्ही त्यांच्यासाठी (नौकेप्रमाणेच) अनेक गोष्टी निर्माण केल्या आहेत, ज्यांच्यावर हे स्वार होऊन (प्रवास करतात). 43 आणि आम्ही इच्छिले तर आम्ही त्यांना बुडवून टाकू शकतो. मग तेव्हा त्यांना कोणीही साहाय्यकर्ता

लाभणार नाही, ना ते (कशाही प्रकारे) त्यातून वाचविले जाऊ शकतील. 44 ही आमची कृपा आहे की, त्यांना एका निर्धारित अवधीपर्यंत लाभ उठविण्याची संधी दिली जाते.

45 आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते, (आपत्ती) तुमच्या पुढून किंवा मागून येऊ शकते, त्याची जाणीव ठेवणारे बना, म्हणजे तुमच्यावर कृपा केली जाईल. 46 आणि त्यांच्या पालनकर्त्याच्या संदेशांपैकी कोणताही संदेश असा असत नाही जेव्हा तो त्यांच्याकडे येतो, ते त्याकडे पाठ दाखवत नाहीत. 47 आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते की, अल्लाहने जे काही तुम्हाला दिले आहे त्यातून (अल्लाहसाठी गरजू लोकांवर) खर्च करा. (त्यावर) सत्य नाकारणारे लोक श्रद्धावंतांना म्हणतात, 'आम्ही अशा लोकांना खाऊ घालण्याची गरज का आहे? अल्लाहने इच्छिले असते तर त्यानेच त्यांना खाऊ घातले असते. तुम्ही (शिफारस करणारे लोक) स्पष्टरित्या वाट चुकलेले आहात.'

48 आणि ते म्हणतात, '(क़यामतीचे) हे वचन केव्हा पूर्ण होणार, तुमच्या म्हणण्यात काही तथ्य असेल तर (याचे आम्हाला उत्तर द्या).' 49 वस्तुत: हे लोक त्या भयंकर स्फोटाची वाट पाहत बसलेले आहेत. आणि ते आपसात (क़यामतीविषयी) वादविवाद करत असतील आणि ती (अचानक) त्यांच्यावर चालून येईल. 50 आणि इतक्या (अचानकपणे त्यांचा अंत होईल) की, ते ना मृत्युपत्र तयार करू शकतील ना आपल्या कुटुंबीयांकडे परत येऊ शकतील. 51 आणि शिंग फुंकण्यात येईल तर ते कबरींमधून (उठून) आपल्या पालनकर्त्याकडे धाव घेतील. 52 ते म्हणतील, 'आमचे दुर्दैव, आम्ही बरबाद झालो! आम्हाला आमच्या कबरीतून कोणी उठवून उभे केले आहे?' (तेव्हा त्यांना सांगितले जाईल), 'कृपावंत (अल्लाहने) याच गोष्टीचे वचन दिले होते आणि पैगंबरांनी जे सांगितले होते, ते सत्य होते.' 53 (क़यामतीचे आगमन म्हणजे) केवळ एक अचानक होणारे स्फोट असेल आणि सर्व एकत्र करून आमच्यासमोर हजर

केले जातील.

54 (त्यांना सांगितले जाईल), 'आज कोणावरही मुळीच अन्याय केला जाणार नाही, तुम्हाला तेच मिळेल, जे तुम्ही करीत राहिले.' 55 त्या दिवशी स्वर्गात वास्तव्य करणारे लोक मौज करण्यात मग्न असतील. 56 ते आणि त्यांच्या सहचारिणी सुखद छायेखाली (आलिशान) बिछान्यावर लोड लावून बसलेले असतील. 57 त्यांच्यासाठी तिथे (नानातऱ्हेचे) मेवे उपलब्ध असतील. तसेच तिथे त्यांना ते सर्व काही मिळेल, जे ते मागतील. 58 कृपावंत पालनकर्त्याकडून त्यांना '(सदैव तुम्हाला सुख) शांती लाभो' असा आशीर्वाद मिळेल.

59 (आणि अल्लाह म्हणेल,) 'हे अपराधी लोकांनो! आज तुम्ही (सदाचारी लोकांपासून कायम) वेगळे व्हा! 60 हे आदमच्या मुलांनो! मी तुम्हाला सैतानाची उपासना करू नका, असे बजावून सांगितले नव्हते का? कारण तो तुमचा केवळ शत्रू (आणि शत्रूच होता). 61 आणि हेही (सांगितले होते की,) केवळ माझीच उपासना करा, हाच सरळ मार्ग आहे. 62 आणि त्याने तुमच्यापैकी बहुसंख्य लोकांना पथभ्रष्ट करून सोडले. तर तुम्ही आपल्या बुद्धीचा वापर का केला नाहीत? 63 हाच तो नरक आहे, ज्याच्याविषयी तुम्हाला पुन्हा-पुन्हा सावध करण्यात आले होते. 64 आता त्यात प्रवेश करा, हा मोबदला आहे सत्य नाकारण्याचा.' 65 आज आम्ही (अपराध्यांची) तोंडे सीलबंद करू, आणि त्यांचे हात आमच्याशी बोलतील. तसेच त्यांचे पाय त्यांनी (जीवनात) जे-जे केले त्याविषयी साक्ष देतील.

66 आम्ही जर इच्छिले असते तर आम्ही त्यांची नेत्रज्योत संपवून टाकू शकलो असतो. मग तेव्हा त्यांनी मार्ग शोधण्यासाठी कितीही धडपड केली असती तर त्यांना मार्ग कशाप्रकारे सापडला असता? (म्हणजे त्यांची 'चूक की बरोबर' समजण्याची शक्ती हिरावून घेतली असती तर...) 67 आणि आम्ही

असे इच्छिले असते की, (माणसाकडे चूक किंवा बरोबर पैकी निवड करण्याचे स्वातंत्र्य असायला नको) तर आम्ही त्यांना निश्चितपणे वेगळ्याच स्वभावावर बनविले असते. आणि त्यांना त्यांच्या जागी खिळवून टाकले असते. तेव्हा ते ना पुढे जाऊ शकले असते, ना मागे येऊ शकले असते. [68] आणि आम्ही एखाद्याला दीर्घायुष्य देत असतो, तर त्याच्या शक्तींचा हळूहळू ऱ्हास करीत जातो. ते आपल्या बुद्धीचा वापर करीत नाहीत का? [69] आम्ही (आमच्या या पैगंबरास काही) काव्य (शायरी) शिकवलेले नाही, ना ते या (संदेशग्रंथास) शोभण्यासारखे आहे. हे तर केवळ बोधग्रंथ आहे, (म्हणजेच) सत्य स्पष्टरित्या सांगणारे कुराण. [70] (हे यासाठी प्रकट केले गेले की, पैगंबराने) त्या प्रत्येक माणसास सावध करावे, जो (मनाने) जिवंत आहे. आणि सत्य नाकारणाऱ्या लोकांच्या विरुद्ध एक (ईश्वरीय साक्ष) ठरावे.

[71] त्यांनी या गोष्टीचे (विचारपूर्वक) अवलोकन केले नाही का की, आम्ही आमच्या हातांनी घडवलेल्या गोष्टींमध्ये (म्हणजे आमच्या सहेतुकपणे निर्माण केलेल्या गोष्टींमध्ये), त्यांच्यासाठी ती गुरेढोरेही निर्माण केलेली आहेत, ज्यांचे ते मालक आहेत. [72] आणि आम्ही त्यांना त्यांच्या अधीन केले आहे. तर ते त्यांच्यापैकी काहींना (प्रवासात) स्वारी म्हणून वापरतात तर काहींना अन्न म्हणून वापर करतात. [73] त्यांच्याद्वारे त्यांना अनेक लाभ मिळतात. (जसे) काहींद्वारे पिण्यास दूध मिळते. तर मग ते (या सर्व देणग्यांबद्दल अल्लाहचे) आभार मानणार नाहीत का? [74] पण (नाही), त्यांनी तर अल्लाहला सोडून इतरांना उपास्य बनविले आहे, या आशेने की, त्यांच्याकडून साहाय्य प्राप्त होईल. [75] (पण ते हे विसरून आहेत की), ते त्यांना (कदापि) साहाय्य करू शकणार नाहीत. तर (उलट अल्लाहसमोर जाब देण्यासाठी) त्यांना त्यांचे सैन्य बनवून (बंदिस्त अवस्थेत) उभे करण्यात येईल. [76] तर (पैगंबर!) त्यांच्या गोष्टींपासून तुम्ही दु:खी होऊ नका. ते काय दडवून ठेवतात आणि काय प्रकट

करतात, ते सर्व आम्ही जाणून आहोत.

[77] मानवाला या गोष्टीची जाणीव नाही का की, आम्ही त्याला वीर्याच्या केवळ एका बिंदूपासून निर्माण केलेले आहे? मग तो (आपल्या वास्तवाला विसरून) फारच भांडखोर बनलेला आहे.

[78] आणि तो आमच्याविषयी उपमा रचून (वादविवाद करू लागला) आणि त्याला स्वत:च्या निर्मितीचा विसर पडला. म्हणू लागला, 'हाडे कुजून (खाक) झाल्यानंतर त्यांना कोण जिवंत करू शकतो?'

[79] (असे प्रश्न विचारणाऱ्यांना) सांगा, 'ज्याने त्या हाडांना पहिल्यांदा निर्माण केले होते, तोच त्यांना पुन्हा जिवंत करेल. आणि त्या (निर्मात्याला) सर्व प्रकारच्या निर्मितीचे परिपूर्ण ज्ञान आहे.

[80] त्यानेच तुमच्यासाठी हिरव्या झाडांतून अग्नी निर्माण केला आणि (म्हणूनच) तुम्ही त्यापासून विस्तव पेटवू शकता.'

[81] ज्याने आकाश आणि पृथ्वी यांची (म्हणजेच विशाल सृष्टीची) निर्मिती केली, त्याच्याकडे त्यांना (म्हणजे मेलेल्यांना नव्याने) निर्माण करण्याचे सामर्थ्य नसेल का? (नि:संदेह) तो त्यासाठी समर्थ आहे. आणि तोच आहे, अस्सल निर्माता! अस्सल जाणकार!

[82] तो तर असा (सामर्थ्यशाली) आहे की, जेव्हा तो एखाद्या गोष्टीला अस्तित्वात आणू इच्छितो. तो फक्त एवढेच म्हणतो, 'अस्तित्वात ये,' आणि ती गोष्ट अस्तित्वात येते. [83] (खरोखर) असीम आहे त्याची महानता! ज्याला प्रत्येक गोष्टीवर पूर्ण नियंत्रण प्राप्त आहे. आणि (शेवटी) तुम्हा सर्वांना त्याच्याकडेच परत जायचे आहे.

# सूरह–३७. अस–साफ़्फ़ात

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] रांगेत (पूर्ण शिस्तीने) उभे राहणाऱ्या स्वर्गदूतांची शपथ.

[2] त्यांचीही (शपथ) जे (दुष्ट व विद्रोही) शक्तींना पिटाळून लावतात. [3] तसेच त्या (स्वर्गदूतांचीही) जे बोधग्रंथ (लोकांपर्यंत) पोहोचवितात. [4] (नि:संदेह) तुमचा ईश्वर एकच आहे. [5] जो आकाश व पृथ्वी यांचा आणि त्यांच्यामध्ये जे काही आहे, त्यांचा पालनकर्ता आहे. तसेच सूर्योदय होणाऱ्या ठिकाणांचाही तोच मालक आहे.

[6] आम्ही पृथ्वीच्या जवळच्या आकाशाला नक्षत्रांनी सजवले आहे. [7] आणि विद्रोही व सैतानी शक्तींपासून त्या (आकाशाला) सुरक्षित केले आहे. [8] (सुरक्षाकवच स्थापित असल्यामुळे) ते (स्वर्गदूतांच्या) सर्वोच्च बैठकीत काय चालले आहे, ते जाणण्यासाठी आपले कान त्याकडे लावू शकत नाहीत. कारण चहूबाजूंनी त्यांना मारून पिटाळून लावले जाते. [9] ही त्यांना पळवून लावण्यासाठी (तात्पुरती व्यवस्था आहे, पण न्यायाचे दिवस स्थापित झाल्यानंतर) तर त्यांच्यासाठी कायमस्वरूपी शिक्षा अटळ आहे. [10] पण जर एखादा कोणी तेथून एखादी गोष्ट जाणून घेण्यास, एखाद्या वेळेस यशस्वी झाला तर त्याच्या मागे धगधगत्या आगीचा गोळा त्याचा पाठलाग करण्यासाठी सोडला जातो.

[11] (सत्य नाकारणाऱ्या लोकांना) विचारा, त्यांना निर्माण करणे जास्त अवघड काम आहे की, (आत्ताच उल्लेख झालेल्या) निर्मितींना निर्माण करणे (मोठे काम आहे)? आम्ही (मानवाला) तर (याच साधारण) चिकणमातीपासून निर्माण केलेले आहे. [12] तुम्ही (त्यांच्या नाकारण्यावर) आश्चर्य करता. आणि ते तर तिरस्कारपूर्वक थट्टा करीत आहेत. [13] आणि जेव्हा त्यांना (सत्याचा अंगीकार करण्याबद्दल) उपदेश केला जातो, तेव्हा ते त्याकडे लक्ष देत नाहीत. [14] आणि जेव्हा ते एखादी (संदेशसूचक) निशाणी पाहतात, तेव्हा तिला उपहासाचे लक्ष्य बनवितात. [15] म्हणतात, ‘हे जादूशिवाय अन्य काही नाही. [16] काय! जेव्हा आम्ही मरण पावल्यानंतर माती व हाडे बनलेले असू, तेव्हा

आम्हाला पुन्हा जिवंत करण्यात येईल? [17] आणि काय, आमच्या पूर्वजांनादेखील?' [18] त्यांना सांगा, 'होय, अर्थातच! आणि तुम्हाला अपमानित (करणारी शिक्षादेखील केली जाईल).'

[19] कारण ज्या (पुनरुत्थानाची ते थट्टा करीत आहेत) ती केवळ एक भयंकर स्वरूपाची दटावणी असेल. आणि लगेच ते सर्व आपल्या डोळ्यांनी (पुनरुत्थानाची घटना) घटित झाल्याचे पाहू लागतील. [20] ते म्हणतील, 'नष्ट झालो आम्ही! हाच तो न्यायाचा दिवस आहे.' [21] (आणि त्यांना सांगितले जाईल) 'हा आहे तो न्यायाचा दिवस, ज्याला तुम्ही नाकारत राहिलात.' [22] (आणि अल्लाह स्वर्गदूतांना अशी आज्ञा करेल की,) अत्याचारी लोकांना आणि त्यांच्या साथीदारांना एकत्र करा आणि त्या उपास्यांनाही, ज्यांची ते उपासना करीत होते..... [23] अल्लाहला सोडून, आणि त्या सर्वांना धगधगत्या आगीकडे घेऊन जा. [24] आणि त्यांना तेथे थांबवा, कारण त्यांना जाब विचारायचा आहे. [25] तुम्हाला (आता) काय झाले आहे की, तुम्ही एकमेकांना साहाय्य करीत नाही? [26] पण (तेव्हा ते काहीच उत्तर देणार नाहीत) ते त्या दिवशी मान खाली घालून उभे असतील.

[27] (त्यांच्यापैकी काही) एकमेकांकडे वळून आपसात (दोषारोप करणारे) प्रश्न विचारतील. [28] एक पक्ष दुसऱ्या पक्षास म्हणेल, 'तुम्ही आमच्या उजव्या बाजूने येत होता (म्हणजे स्वत:ला हितचिंतक दाखवून आमची फसवणूक करीत होता). [29] दुसऱ्या पक्षाचे लोक उत्तर देतील, 'नाही, तुम्ही स्वत:च अश्रद्धेचा मार्ग अंगीकारला होता. [30] आणि आमचे तुमच्यावर (काही अटळ स्वरूपाचे) प्रभाव नव्हते. तर तुम्हीच स्वत: शिरजोरी वृत्तीचे लोक होता. [31] पण आता आम्हा सर्वांवर आमच्या पालनकर्त्याचे वचन पूर्ण झालेले आहे. आम्हाला आपल्या वाईट कृत्यांचे फळ अटळपणे चाखावे लागणार आहेत. [32] आम्ही तुम्हाला बहकाविले (कारण) आम्हीच वाट चुकलेलो होतो.' [33] त्या दिवशी ते

सर्व शिक्षेचे सहभागी बनतील.

34 आम्ही अपराधी लोकांशी असाच व्यवहार करीत असतो. 35 हे असे लोक होते की, जेव्हा त्यांना सांगितले जायचे, '(एका) अल्लाहशिवाय दुसरा कोणीच उपासनेयोग्य नाही.' तेव्हा ते मोठ्या मगरुरीने (या संदेशाकडे) पाठ फिरवीत असत. 36 आणि ते म्हणत असत, 'आम्ही केवळ एका वेड्या कवीच्या सांगण्यावरून आमच्या उपास्यांचा त्याग करायचा की काय?' 37 नाही, तसे नाही, तर (ज्याला तुम्ही 'वेडा कवी' म्हणून संबोधित आहात), तो सत्याचा संदेश घेऊन आला आहे. आणि तो आधीच्या पैगंबरांकरवी आलेले सत्य प्रमाणित करतो आहे. 38 (सत्य नाकारणाऱ्यांनो!) तुम्हाला खरोखर कठोर शिक्षा होईल. 39 तुम्ही जे काही केलात, त्याचाच तुम्हाला मोबदला मिळणार.

40 पण जे अल्लाहचे सच्चे सेवक आहेत..... 41 त्यांच्यासाठी (यानंतरच्या जगात) त्यांना ज्ञात अशीच उपजीविका मिळेल. 42 अर्थात, विविध प्रकारची फळे, आणि त्यांना तिथे सन्मानाचे जीवन लाभेल. 43 ऐषआरामाच्या बागांत... 44 ते शाही आसनांवर एकमेकांसमोर बसलेले असतील. 45 त्यांच्यादरम्यान वाहत्या झऱ्याचा, स्वच्छ मद्याचा प्याला चौफेर फिरविला जात असेल. 46 (जे मद्य) पांढरे शुभ्र व पिणाऱ्यांसाठी स्वादिष्ट असेल. 47 ते कोणत्याही प्रकारे ना हानिकारक असेल, ना त्याद्वारे ते आपली बुद्धी हरवून बसतील. 48 तसेच तिथे त्यांच्या सहचारिणी असतील, निरागस नजरा आणि सुंदर डोळे असलेल्या. 49 (त्या अशा असतील) जणू फार काळजीपूर्वक जपून ठेवलेली मोती.

50 मग ते (स्वर्गनिवासी) एकमेकांना उद्देशून विचारणा करतील. 51 त्यांच्यातील एक जण म्हणेल, माझा एक मित्र होता. 52 जो मला विचारत असे, 'तू देखील खरोखर यावर विश्वास ठेवतोस की काय... 53 की, आम्ही मृत्यूनंतर जेव्हा माती व हाडे झालेले असू, तेव्हा आपल्याला (न्यायाच्या

दिवशी) पुन्हा जिवंत करून आपल्या कर्मांचा मोबदला दिला जाईल?’ 54 तो म्हणेल, ‘त्याची काय अवस्था आहे, जरा (आपण) पाहू या का?’ 55 आणि तेव्हा तो डोकावून पाहील तर (त्याचा मित्र) त्याला नरकाच्या मध्यभागी असल्याचे आढळेल. 56 (ते पाहून,) तो उद्‌गारेल, ‘अल्लाहची शपथ, तू तर माझा जवळजवळ घातच केला होतास. 57 (माझ्यावर) माझ्या पालनकर्त्याची कृपा झाली नसती, तर मला देखील पकडून नरकात (फेकून देण्यात) आले असते.’ 58 मग तो (आपल्या स्वर्गनिवासी मित्रांना) म्हणेल, ‘आता आपल्याला खरोखर मरायचे नाही? 59 पहिल्या वेळेस जे मरण यायचे होते ते आले. (आता ना कधी मृत्यू येईल,) ना कधी त्रास सहन करावा लागेल.’ 60 खरोखर हेच सर्वात मोठे यश आहे. 61 धडपड करणाऱ्यांनी अशाच यशासाठी धडपड करायला पाहिजे.

62 हा पाहुणचार चांगला आहे की, तो (नरकातील काटेरी) ज़क़्क़ुमचे वृक्ष? 63 आम्ही त्यास अत्याचारी लोकांसाठी शिक्षा करण्याचे साधन बनविले आहे. 64 तो एक असा वृक्ष आहे, जो नरकाच्या तळापासून वर येतो. 65 त्याची फळे अशी (विद्रूप) आहेत की, जणू सैतानांची डोकी. 66 (नरकवासी) ती फळे खातील व त्यानेच आपले पोट भरतील. 67 शिवाय, त्यांना उकळत्या पाण्यापासून तयार मिश्रण (पिण्यासाठी) दिले जाईल. 68 मग त्यांना (हे खाऊन–पिऊन) झाल्यावर नरकात परत जावे लागेल. 69 त्यांना आपले वाडवडील वाट चुकलेले असल्याचे आढळून आले. 70 मग ते देखील त्यांच्याच पावलावर पाऊल ठेवून चालू लागले. 71 आणि यांच्या (फार) पूर्वीच्या लोकांपैकीही बहुसंख्य लोक सन्मार्गापासून फार दूर गेलेले होते. 72 आणि आम्ही त्यांच्यामध्ये देखील सावध करणारे (पैगंबर) पाठवले होते. 73 तर पाहा त्यांचा शेवट कसा झाला, ज्यांना सावध करण्यात आले होते. 74 पण फक्त अल्लाहचे सच्चे सेवक या (वाईट परिणामापासून) सुरक्षित राहिले.

[75] जेव्हा (पैगंबर) नूहने आम्हाला (मदतीसाठी) हाक मारली, तेव्हा आम्ही त्याच्या हाकेला किती चांगला प्रतिसाद दिला होता. [76] आम्ही त्याला आणि त्यांच्या कुटुंबीयांना फार मोठ्या आपत्तीतून वाचवले. [77] आम्ही केवळ त्याच्या वंशजांना (पृथ्वीवर पुनरुत्थानापर्यंत) एकमेव वारस ठरविले. [78] आणि आम्ही भविष्यात येणाऱ्या लोकांमध्ये त्याचे सुस्मरण कायम ठेवले. [79] सर्व लोकांमध्ये नूहला शांती लाभो! [80] आम्ही चांगली कामे करणाऱ्यांना अशाच प्रकारे मोबदला देत असतो. [81] खरोखर, तो आमच्या सच्च्या श्रद्धावंत भक्तांपैकी होता. [82] (आम्ही त्याला व त्याच्या अनुयायांना वाचविले) आणि इतरांना बुडवून टाकले.

[83] इब्राहीम देखील तसाच श्रद्धावंत होता. [84] तो आपल्या पालनकर्त्याकडे शुद्ध अंत:करणासह वळला. [85] जेव्हा तो आपल्या पित्याला व आपल्या लोकांना, म्हणाला, 'तुम्ही ही कशाची उपासना करीत आहात? [86] तुम्ही लोक अल्लाहला सोडून खोट्या (स्वयंरचित) उपास्यांसमोर (नतमस्तक) होत आहात? [87] सर्व जगांच्या पालनकर्त्याविषयी तुमचे काय विचार आहेत?'

[88] मग त्याने आकाशातील नक्षत्रांकडे एक नजर टाकली. [89] आणि (त्याच्या लोकांना त्यांच्यासोबत न जाण्याचे निमित्त सांगितले) म्हणाला, 'माझी तब्येत बरी नाही.' [90] तर ते त्यास सोडून निघून गेले. [91] तेव्हा तो त्यांच्या उपास्यांकडे गुपचुपरित्या वळला. आणि म्हणाला, 'काय! तुम्ही (तुमच्यासमोर ठेवलेले नैवेद्य) खात नाही? [92] तुम्हाला काय झाले, तुम्ही काही बोलत नाही?' [93] मग त्याने आपल्या उजव्या हाताने त्यांच्यावर प्रहार करायला सुरुवात केली. [94] (त्याच्या लोकांना ही बातमी कळाल्यानंतर) त्याचे लोक त्याच्याकडे धावत आले. [95] तेव्हा इब्राहीमने त्यांना म्हटले, 'तुम्ही स्वत:च ज्यांना घडवलेले आहे, त्यांची तुम्ही उपासना करता? [96] तर वस्तुस्थिती ही आहे की, तो केवळ अल्लाह आहे, ज्याने तुम्हाला आणि तुम्ही जे काही

(आपल्या हातांनी) घडविता त्यांनादेखील निर्माण केलेले आहे.' 97 (हे ऐकून) ते (आपसात) म्हणाले, 'याच्यासाठी एक भट्टीच्या तऱ्हेची एक इमारत बनवा, मग त्यास त्या आगीत फेकून द्या.' 98 त्यांनी त्याच्याविरुद्ध एक डाव रचला, पण आम्ही (तो विफल करून) त्यांनाच अपमानित केले. 99 (जेव्हा त्याच्या वडिलाने त्याला घरातून काढून टाकले तेव्हा) (इब्राहीम) म्हणाला, 'मी माझ्या पालनकर्त्याकडे जात आहे. तोच मला मार्ग दाखवील.' 100 त्याने (अल्लाहकडे) प्रार्थना केली, 'अल्लाह! मला एक सदाचरणी पुत्र प्रदान कर.' 101 तेव्हा आम्ही त्यास एका (सुस्वभावी व) संयमी पुत्राच्या आगमनाची शुभवार्ता दिली.

102 मग जेव्हा (त्याचा मुलगा) आपल्या (वडिलांबरोबर) काम करू शकेल इतका मोठा झाला, तेव्हा (एके दिवशी बाप) मुलाला म्हणाला, 'माझ्या प्रिय पुत्रा! मी असे एक स्वप्न पाहिले आहे की, मी तुझे बलिदान करीत आहे. तर तू विचार करून मला सांग, त्याविषयी तुझे काय मत आहे?' (त्यावर) तो म्हणाला, 'बाबा! तुम्हाला जो आदेश (अल्लाहकडून) दिला जात आहे, त्यावर कृती करा, अल्लाहने इच्छिल्यास, मी सहनशील असल्याचे तुम्हाला आढळेल.' 103 मग जेव्हा ते दोघेही अल्लाहच्या इच्छेला पूर्णपणे समर्पित झाले आणि इब्राहीमने (आपल्या मुलास) जमिनीवर पालथ्या अवस्थेत ठेवले. 104 तेव्हा आम्ही त्याला हाक दिली, 'हे इब्राहीम, 105 तू स्वप्न खरे करून दाखवले आहेस.' निश्चितच आम्ही सदाचारी लोकांना अशाचप्रकारे मोबदला देत असतो. 106 खरोखर, ती (घटना म्हणजे) केवळ एक मोठी परीक्षा होती. 107 आणि आम्ही एका मोठ्या बलिदानाच्या बदल्यात त्याची (म्हणजे इब्राहीमच्या मुलाची) सुटका केली.

108 तसेच आम्ही नंतरच्या लोकांमध्ये त्याचे सुस्मरण कायम ठेवले (म्हणजेच त्याचे अनुसरण कायम ठेवले) 109 इब्राहीमला (सदैव) शांती लाभो! 110 सदाचारी लोकांना आम्ही अशाप्रकारे मोबदला देत असतो. 111 खरोखर, तो

आमच्या सच्च्या श्रद्धावंत भक्तांपैकी होता. 112 आम्ही (इब्राहीमला एक दुसरा मुलगा) इसहाक़च्या आगमनाचीही शुभवार्ता दिली. जो देखील (पुढे) पैगंबर व सदाचारी (भक्त) होणार होता. 113 आणि आम्ही त्याच्यावर व इसहाक़वर कृपा केली. पण त्यांच्या वंशजांपैकी काही सदाचारी होते तर काही स्पष्टरित्या स्वत:वरच अत्याचार करणारे होते.

114 अशाचप्रकारे आम्ही मूसा व हारून (या पैगंबरांवर) अनुग्रह केला. 115 आम्ही त्यांची व त्यांच्या लोकांची (क्रूर दास्यत्वाच्या) फार मोठ्या त्रासातून सुटका केली. 116 मग जेव्हा आम्ही त्यांना साहाय्य केले तर तेच वरचढ ठरले. 117 आम्ही त्या दोघांना (चूक काय व बरोबर काय?) हे स्पष्ट दर्शविणारा ग्रंथ प्रदान केला होता. 118 आणि आम्ही त्यांना सरळ मार्ग दाखविला. 119 आणि नंतरच्या लोकांमध्ये त्यांचे (अनुसरण करणाऱ्यांना) कायम ठेवले. 120 'मूसा व हारून यांना शांती लाभो.' 121 आम्ही सदाचारी लोकांना अशाचप्रकारे चांगला मोबदला देत असतो. 122 खरोखर ते आमच्या श्रद्धावंत भक्तांपैकी होते.

123 तसेच इलियास हा देखील पैगंबरांपैकी होता. 124 जेव्हा त्याने आपल्या लोकांना म्हटले, 'तुम्ही अल्लाहचे भय बाळगत नाही का? 125 तुम्ही बअल (नामक उपास्याचा) धावा करता आणि सर्वश्रेष्ठ अशा निर्मात्यास सोडून देता. 126 म्हणजेच अल्लाहला, जो तुमचा पालनकर्ता आहे आणि तुमच्या वाडवडिलांचाही पालनकर्ता.' 127 पण त्यांनी त्यास खोटे ठरविले, परिणामी त्यांना जाब देण्याकरिता (अल्लाहसमोर) हजर केले जाईल. 128 पण जे अल्लाहचे सच्चे सेवक होते (ते सोडून). 129 आणि आम्ही नंतरच्या लोकांमध्ये त्यांचे सुस्मरण (अर्थात अनुसरण) कायम ठेवले. 130 इलियास व त्याच्या लोकांना शांती लाभो! 131 आम्ही सदाचारी लोकांना अशाच प्रकारे मोबदला देत असतो. 132 खरोखर तो आमच्या श्रद्धावंत भक्तांपैकी होता.

133 निःसंदेह लूत देखील पैगंबरांपैकी होता. 134 आम्ही त्याला व त्याच्या कुटुंबीयांना वाचवले. 135 पण त्याची म्हातारी (बायको) जी मागे राहणाऱ्या लोकांपैकी होती. 136 मग आम्ही (लूत तिथून निघून गेल्यानंतर) इतरांना नष्ट करून टाकले. 137 आणि (आजपर्यंतही) तुम्ही त्यांच्या त्या ओसाड वस्त्यांपासून जात असता सकाळी...... 138 आणि रात्री देखील. (बोध ग्रहण करण्यासाठी) तुम्ही बुद्धीचा वापर करीत नाही का?

139 तसेच यूनुस हा देखील पैगंबरांपैकी एक होता. 140 जेव्हा तो (आपल्या लोकांपासून) धावत जाऊन भरलेल्या नौकेवर पोहोचला. 141 मग नौकेवाल्यांनी चिठ्ठ्या टाकल्या (तेव्हा त्यात पुन्हा–पुन्हा त्याचेच नाव निघाले) तर त्यांनी त्याला (समुद्रात) फेकून दिले. 142 मग (एका) माशाने त्याला गिळून टाकले. तेव्हा तो स्वतःला दोष देऊ लागला (तेव्हा त्याला स्वतःच्या चुकीची जाणीव झाली). 143 जर तो (अल्लाहचे) स्तुतिगान करणाऱ्यांपैकी नसता.... 144 तर तो पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत माशाच्याच पोटात राहिला असता. 145 मग आम्ही त्याला (माशाच्या पोटातून काढून समुद्रकिनाऱ्यावर) खुल्या मैदानात टाकून दिले. तेव्हा तो अगदी कासावीस होऊन गेला होता. 146 मग आम्ही (तिथे) त्याच्यापाशी एक वेलीचे झाड उगवले. 147 आणि नंतर आम्ही त्याला (पुन्हा एकदा) एक लाख किंवा यापेक्षा काही जास्तच लोकांकडे (पैगंबर म्हणून) पाठविले. 148 तेव्हा त्या लोकांनी श्रद्धा धारण केली. म्हणून आम्ही त्यांना काही काळ (या जीवनाचे) लाभ उपभोगू दिले.

149 तर (पैगंबर!) तुम्ही त्यांना विचारा तुमच्या पालनकर्त्यासाठी मुली आहेत आणि त्यांच्यासाठी मुले आहेत. 150 आम्ही स्वर्गदूतांना स्त्रीजातीच्या रूपात निर्माण केले आहे काय? हे (अनेकेश्वरवादी) ही निर्माण प्रक्रिया पाहत होते की काय? 151 नाही, मुळीच नाही, हे लोक ज्या काही खोट्या गोष्टी बोलत असतात, त्यापैकीच ही एक गोष्ट आहे 152 की, अल्लाहची संतती आहे.

आणि ते निव्वळ खोटे बोलत आहेत. 153 अल्लाहने मुलांच्या तुलनेत मुलींना
प्राधान्य दिले? 154 तुम्हाला झाले आहे तरी काय? तुम्ही कसा निर्णय करीत
आहात? 155 तुम्ही विचार करीत नाही का? 156 किंवा तुमच्याकडे सुस्पष्ट
असे प्रमाण आहे? 157 तुमच्या म्हणण्यात काही सत्य असेल तर आपला ग्रंथ
सादर करा.

158 या लोकांनी अल्लाह आणि जिन्नचे नाते असल्याचा निराधार शोध
लावला आहे. पण या जिन्नांना स्वत: या गोष्टीची चांगली जाणीव आहे की,
(न्यायासाठी) त्यांना (अल्लाहसमोर) हजर केले जाईल. 159 अल्लाह त्या गोष्टींपासून
पूर्णपणे असंबंधित आहे. ज्यांचा हे (नालायक) लोक शोध लावत असतात.
160 पण ते, जे अल्लाहचे सच्चे भक्त आहेत (ते असे अजिबात नाहीत). 161
(अल्लाहशी खोट्या गोष्टींचा संबंध जोडणाऱ्यांनो!) ना तुम्ही, ना तुमचे ते
उपास्य...... 162 कोणालाही अल्लाहपासून तुम्ही बहकावून दूर नेऊ शकत
नाही...... 163 पण फक्त त्याला, ज्याचे नरकामध्ये जाणे अटळ आहे. 164
(आणि स्वर्गदूत जे सदैव अल्लाहचे स्तुतिगान करतात, ते म्हणतात) ‘आमच्यापैकी
प्रत्येकाचे (अल्लाहने) ठरवून दिलेले स्थान आहे. 165 आणि आम्ही दर्जानुसार
त्याच्यासमोर (शिस्तीने) पंक्तिबद्ध उभे राहतो. 166 आणि त्याच्या असीम
महानतेचे गुणगान करीत असतो.’

167 (सत्य नाकारणारे श्रद्धाहीन) नेहमी म्हणत असत, 168 ‘आमच्याकडे
आमच्या आधी होऊन गेलेल्या लोकांप्रमाणे एखादे दिव्य ग्रंथ असते तर....
169 आम्ही देखील अल्लाहचे खास भक्त बनू शकलो असतो.’ 170 पण (जेव्हा
त्यांच्यासमोर हे कुराण सादर केले गेले) त्यांनी त्यावर श्रद्धा ठेवण्यास नकार
दिला. तर लवकरच त्यांना कळून येईल (की, त्यांनी कोणत्या गोष्टीकडे पाठ
फिरवली होती). 171 आमचे पाठवलेले सेवक, म्हणजेच पैगंबर यांच्याविषयी
आमचा हा फैसला आधीच सादर झालेला आहे — 172 तो म्हणजे, त्यांना

खात्रीने मदत पोचेल. 173 (शेवटी) आमचेच सैन्य विजय प्राप्त करणार, हे निश्चित. 174 तर काही काळ तुम्ही (सत्य नाकारणाऱ्यांपासून स्वतःला) दूर ठेवा 175 आणि त्यांना पाहत राहा, कारण लवकरच ते देखील पाहून घेतील (जे आता ते पाहत नाहीत).

176 ते खरोखर शिक्षेसाठी घाई करीत आहेत का? 177 पण जेव्हा एकदा ती (शिक्षा) त्यांच्या अंगणात उतरेल, तेव्हा त्या लोकांची ती सकाळ फारच वाईट होईल, ज्यांना सावध केले गेले होते. 178 तर (तुम्ही) काही काळासाठी त्यांच्यापासून (स्वतःला) दूर ठेवा. 179 तुम्हीही पाहत राहा आणि ते देखील पाहून घेतील, (जे आज त्यांना दिसत नाही) 180 असीम आहे तुझ्या पालनकर्त्याची महिमा, सन्मान (व सामर्थ्य) यांचा मालक आहे तो, आणि त्या गोष्टींपासून तो फार अत्युच्च आहे, ज्या गोष्टींचा संबंध हे लोक त्याच्याशी जोडतात. 181 आणि पैगंबरांना (सदैव) शांती लाभो! 182 आणि सर्व प्रशंसा अल्लाहसाठीच आहे, जो सर्व जगांचा मालक आहे.

# सूरह-३८. सॉद

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 सॉद० उपदेशांनी ओतप्रोत अशा कुराणाची शपथ. 2 जे सत्य नाकारणारे आहेत ते खोटे अभिमान आणि वैर बाळगून आहेत. 3 त्यांच्यापूर्वी आम्ही कित्येक जनसमूहांना (याच दुष्कृत्यापोटी) नष्ट करून टाकले आहे. तेव्हा ते मदतीसाठी याचना करू लागले. पण तेव्हा बचावासाठी उशीर झालेला होता.

4 त्या लोकांना या गोष्टीचे आश्चर्य वाटले की, त्यांच्याकडे त्यांच्यामधूनच सावध करणारा (पैगंबर) आला, तेव्हा सत्य नाकारणारे लोक म्हणाले, 'हा एक जादूगार व खोटे बोलणारा (माणूस) आहे. 5 सर्व उपास्यांचा (नायनाट करून) एकच उपास्य असल्याचा दावा तो करतो का? खरोखर, ही तर फारच

विचित्र गोष्ट आहे.' 6 तेव्हा त्यांच्यातील बडी मंडळी असे म्हणत (उपदेशगृहातून) जाण्यासाठी उठली, 'चला निघा येथून आणि आपल्या उपास्यांवर दृढ श्रद्धा ठेवा. यामागे (या माणसाचे) काहीतरी स्वार्थ आहे. 7 आम्ही अशी गोष्ट पूर्वीच्या धर्मावलंबीकडून कधीही ऐकलेली नाही. ही (या माणसाने) रचलेली गोष्ट आहे. 8 आमच्यातील सर्व लोकांना सोडून केवळ त्याच्याकडेच ईश्वरवाणी प्रकट करण्यात आली आहे का?' नाही, तसे नाही, वस्तुस्थिती ही आहे की, असे म्हणणारे लोक माझ्या उपदेशाविषयी साशंक आहेत. (कारण) त्यांनी अद्याप माझ्या शिक्षेची चव चाखलेली नाही.

9 तुझ्या पालनकर्त्याचे कृपेचे भांडार त्यांच्याकडे आहे का, जो सर्व शक्तिमान आहे व फार मोठा दाता आहे. 10 किंवा जे आकाश व पृथ्वी आणि जे काही या दोहोंच्यामध्ये आहे, त्या सर्वांची अधिसत्ता त्यांच्याकडे आहे का, तसे असेल तर ते सर्व शक्य मार्गांचा अवलंब करून आकाशाकडे झेप का घेत नाहीत? 11 इतर समूहाप्रमाणेच या समूहाचे देखील या बाबतीत पराभव होणे अटळ आहे. 12 यांच्यापूर्वीही नूहच्या लोकांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला, तसेच आद या जमातीने आणि (प्रचंड) लष्कर बाळगणाऱ्या फिरऔनने देखील. 13 तसेच समूद (या जमातीने) आणि लूतच्या लोकांनी आणि ते वनात राहणारे (म्हणजे अयकावाले) या सर्वांनी (खोटे ठरविले) ते फार संघटित जनसमूह होते. 14 त्या सर्वांनी पैगंबरांना खोटे ठरविले. तेव्हा माझ्या (न्याय्य) शिक्षेने त्यांना वेढले. 15 हे (सत्य नाकारणारे लोक देखील) त्या भयंकर शिक्षेच्या स्फोटाची वाट पाहत असल्याचे (आपल्या कृतीने सिद्ध करीत आहेत) पण, त्यांना तेव्हा जराशीही उसंत दिली जाणार नाही. 16 ते (त्या शिक्षेची खिल्ली उडवत) म्हणतात, 'हे आमच्या पालनकर्त्या! आमच्या हिश्शाची जी काही शिक्षा आहे, ती आम्हाला हिशेबाच्या दिवसापूर्वी देऊन टाक.'

17 (पैगंबर!) ते जे काही बोलत आहेत, ते (धैर्याने) सहन करा. आणि आमचा

दास दाऊद याची आठवण करा, जो खूप सामर्थ्यवान होता आणि तो नेहमी आमच्याकडे ध्यान लावून होता. [18] आणि म्हणून आम्ही पर्वतांना त्याच्या स्तुतिगानात सामील व्हायला लावले. ते त्याच्याबरोबर सकाळ–संध्याकाळ स्तुतिगान करीत असत. [19] आणि पक्षीदेखील एकत्र होऊन त्यांच्यामध्ये सामील होत. सर्व अल्लाहकडे ध्यान केंद्रित करणारे होते. [20] आणि आम्ही त्याच्या सत्तेला बळकटी प्रदान केली. आणि त्याला विवेक प्रदान केले. आणि त्याला वादविवादांचा फैसला करण्याची हातोटी बहाल केली होती.

[21] ज्या प्रार्थनागृहात (दाऊद प्रार्थना करायचा) तिथे दोन जण, वादी व प्रतिवादी, आपला खटला घेऊन भिंतीवर चढून आत आले होते. या घटनेची वार्ता तुम्हाला पोहोचली आहे का? [22] जेव्हा ते दाऊदपाशी आले, तेव्हा त्यांना पाहून तो घाबरला. ते म्हणाले, 'तुम्ही घाबरू नका, आम्ही दोघे एक विवाद घेऊन (तुमच्याकडे) आलो आहोत. आमच्यातील एकाने दुसऱ्यावर अन्याय केलेला आहे, तर तुम्ही आमच्यादरम्यान न्यायोचित फैसला करा आणि (आमच्यावर) अन्याय करू नका, तसेच आम्हाला सरळ मार्ग दाखवा. (ही तुमच्याकडून अपेक्षा).'

[23] 'हा माझा भाऊ आहे, त्याच्याकडे नव्याण्णव मेंढ्या आहेत. आणि माझ्याकडे केवळ एकच मेंढी आहे, तरीदेखील हा म्हणतो, 'तीही मला देऊन टाक,' आणि त्याने बोलण्यात माझ्यावर सरशी घेतली आहे.' [24] दाऊदने म्हटले, 'त्याने आपल्या मेंढ्यात तुझी मेंढी सामिल करून घेण्यासाठी, तुझ्या मेंढीची मागणी करून, खरोखर तुझ्यावर अन्याय केलेला आहे. अनेक भागीदार लोक (साधारणपणे) एकमेकांवर अन्याय करीत असतात, पण फक्त यास अपवाद ते लोक आहेत, जे श्रद्धा धारण करून सत्कर्मे करीत असतात, पण असे लोक फारच कमी असतात.' तेव्हा (अचानकपणे) दाऊदला आठवले, आम्ही त्याची कसोटी पाहत होतो, तेव्हा तो लगेच आपल्या पालनकर्त्याकडे क्षमा याचना करू

लागला. आणि त्याच्यासमोर नतमस्तक होऊन, पश्चात्तापासह त्याच्याकडे वळला.

25 तेव्हा आम्ही त्यास क्षमा केली. निःसंशय, त्याच्यासाठी आमच्या सान्निध्यात सन्मानाचे आणि अतिशय चांगले स्थान आहे.

26 आणि आम्ही म्हणालो, 'हे दाऊद! आम्ही तुला या भूमीवर अखत्यार प्रदान केलेला आहे, म्हणून तू लोकांदरम्यान न्यायपूर्वक निवाडा कर आणि (न्यायभावनेच्या विरुद्ध जाऊन) आपल्या इच्छा-आकांक्षांचे अनुसरण करू नकोस. त्या इच्छा आकांक्षा तुला अल्लाहच्या मार्गापासून दूर भरकटत घेऊन जातील आणि जे अल्लाहच्या मार्गापासून ढळतात, त्यांना कठोर शिक्षा निश्चितपणे होणार आहे. या कारणास्तव की, ते हिशेब द्यावयाच्या दिवसाला विसरून बसलेले आहेत.' 27 आणि आम्ही पृथ्वी व आकाश व जे काही या दोहोंच्या मध्ये आहे ते सर्व, उद्देशाविना व्यर्थ निर्माण केलेले नाही. तसा सत्य नाकारणाऱ्या लोकांचा विचार आहे. तर ज्या लोकांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला त्यांच्यासाठी नरकरूपी सर्वनाश आहे. 28 (असे कधी शक्य आहे का की), आम्ही त्या लोकांना ज्यांनी श्रद्धा धारण करून सत्कर्मे केली त्यांच्या समान करून टाकू, जे भूतलावर उत्पात माजवितात? किंवा आम्ही सदाचारी लोकांना दुराचाऱ्यांसमान वागणूक देऊ? (असे कदापि शक्य नाही).

29 (पैगंबर!) हे (कुराण) कृपा व (मार्गदर्शनाने भरपूर) असा एक ग्रंथ आहे. जो आम्ही तुमच्याकडे यासाठी प्रकट केला आहे की, लोकांनी यातील संदेशांवर चिंतन करावे. आणि ज्यांना बुद्धी लाभलेली आहे, त्यांनी यापासून बोध घ्यावा. 30 आणि आम्ही दाऊदला (पुत्राच्या रूपाने) सुलेमान प्रदान केला (अल्लाहचा) फारच चांगला असा भक्त आणि सदैव (अल्लाहची) ओढ बाळगणारा होता तो. 31 (एका) संध्याकाळी (त्याच्या सैन्यातील) उत्तम पैदाशीचे व चपळ घोडे त्याच्यासमोर आणण्यात आले. 32 तेव्हा तो म्हणाला, 'मला चांगल्या गोष्टींचे नेहमीच फार आकर्षण वाटते कारण, त्या गोष्टी मला माझ्या

पालनकर्त्याची आठवण करून देण्यास कारणीभूत ठरतात.' (ते पाहणे) येथपर्यंत सुरू होते की, सूर्यास्त झाला. 33 (तेव्हा त्याने म्हटले), 'त्यांना माझ्याकडे परत घेऊन या, (जेव्हा त्यांना नंतर आणण्यात आले,) तेव्हा तो त्यांच्या पायावर व मानेवर (प्रेमाने) हात फिरवू लागला.

34 आणि आम्ही सुलेमानला (आणखी एकाप्रकारे) आजमावून पाहिले. त्याच्या सिंहासनावर एक (मृतप्राय) शरीर ठेवण्यात आले. मग तो (संपूर्ण समर्पणासह) आमच्याकडे वळला.

35 त्याने (अल्लाहकडे) प्रार्थना केली, 'हे प्रभू! मला क्षमा कर आणि मला असे अधिराज्य प्रदान कर, जसे माझ्यानंतर कोणालाही प्राप्त होऊ नये. खरोखर तू फार महान दाता आहेस.'

36 तेव्हा आम्ही वाऱ्यास त्याच्या (आदेशाच्या) अधीन केले, जो त्याच्या आदेशानुसार जेथे-कोठे त्यास जायचे आहे, त्या दिशेने हळुवारपणे वाहत असे.
37 तसेच आम्ही जिन्नांना त्याच्या अधीन केले होते, जे (मोठमोठे) बांधकाम करण्यात कुशल होते, आणि ते पाणबुडेही होते. 38 यांच्या व्यतिरिक्त इतर (जिन्न) जे साखळदंडांनी जखडून ठेवलेले होते (त्याच्या अधीन केले होते). 39 आम्ही म्हणालो, 'ही तुझ्यासाठी आमची देणगी आहे, तर तू आपल्या इच्छेनुसार (इतरांना त्यातून) दे किंवा (स्वतःकडे) ठेवून घे, ज्याचा (तुझ्याकडून) हिशेब (घेतला जाणार) नाही.' 40 (तो आमचा असा सेवक होता की,) त्याच्यासाठी आमच्यापाशी आमच्या निकटचे व चांगले स्थान असेल.

41 (अशाचप्रमाणे) आमचा एक सेवक अय्यूब होता, तर (पैगंबर!) त्याचीही आठवण करा. जेव्हा त्याने आपल्या पालनकर्त्याला हाक दिली, (म्हणाला,) (हे प्रभू!) 'सैतानाने मला फार कष्ट व यातना पोचविल्या आहेत.' 42 तेव्हा आम्ही म्हणालो, '(जमिनीवर) आपले पाय (जोराने) आपट,' (त्याने तसे केल्यानंतर एक झरा निघाला) 'हे थंड असे पाणी आहे स्नान करण्यासाठी व पिण्यासाठी.' 43

आणि आम्ही (त्याची वाईट अवस्था संपवून त्याच्यासहित) त्याच्या कुटुंबाला पूर्वपदावर आणले (म्हणजे पुन्हा समृद्ध केले). आणि त्याचबरोबर आमच्या कृपेने त्यात दुपटीने वाढ केली. या उद्देशाने की, बुद्धी लाभलेल्या लोकांसाठी (या घटनेतून) बोध ग्रहण करता यावे. 44 आम्ही त्याला म्हणालो, 'मूठभर सुक्या काड्या हातात घे आणि त्याने (आपल्या पत्नीस हळुवारपणे) मार, पण आपली शपथ मोडू नकोस.' खरोखर, तो आम्हाला फारच सहन करणारा भक्त असल्याचे आढळून आले (म्हणजे त्याने स्वत:ला तसे सिद्ध केले), उत्तम भक्त होता तो! सदैव अल्लाहची ओढ असलेला असा!

45 तसेच आमचे भक्त इब्राहीम, इसहाक़ व याकूब यांची आठवण करा. ते आंतरिक शक्ती आणि दूरदृष्टी लाभलेले लोक होते. 46 आम्ही त्यांची निवड यानंतरच्या (अनंतकालीन) जीवनाची हकिगत (लोकांसमोर) प्रस्तुत करण्याच्या उद्देशासाठी केली होती. 47 तसेच आमच्याकडे त्यांचे स्थान आमच्या निवडलेल्या व खरोखर चांगल्या भक्तांमध्ये असेल. 48 तसेच (आमचे भक्त) इस्माईल, अलयसाअ आणि ज़ुलकिफ़्ल यांचीही आठवण करा. हे सर्वजण खऱ्या अर्थाने सदाचाऱ्यांपैकी होते.

49 हे (कुराण) तर बोधग्रंथ आहे. खरोखर, अल्लाहची जाण ठेवून (जीवन जगणाऱ्यांसाठी, मृत्युनंतरच्या जीवनात) उत्तम ठिकाण आहे. 50 सदैव वास्तव्य करण्याच्या बागा, ज्यांची दारे त्यांच्यासाठी खुली असतील. 51 ते तिथे अगदी तक्के लावून (अगदी आरामात) बसलेले (किंवा पहुडलेले) असतील. ते तिथे आपल्याला हवी ती फळे आणि पेय मागवीत असतील. 52 आणि त्यांच्याबरोबर (तिथे) त्यांच्या पत्नी असतील, नम्रभाव बाळगणाऱ्या आणि त्यांच्या समवयस्क अशा. 53 या त्या गोष्टी आहेत, ज्या हिशेबाच्या दिवशी प्रदान करण्याचे तुम्हाला वचन दिले जात आहे. 54 ही आम्ही प्रदान केलेली अशी उपजीविका असेल जी कधीही संपुष्टात येणार नाही.

55 हे सर्व (अल्लाहची जाण व भय बाळगून जीवन व्यतीत करणाऱ्यांसाठी आहे!) आणि (राहिले शिरजोर) तर शिरजोर लोकांसाठी फार वाईट ठिकाण आहे. 56 (अर्थातच) 'नरक' ज्यात (जळण्यासाठी) ते दाखल होतील, (खरोखर), किती वाईट ठिकाण आहे ते वास्तव्याचे! 57 त्यांना तिथे जे काही मिळेल, ते हे आहे — तर त्यांनी यांची चव चाखावी, उकळते पाणी आणि अतिशय थंडगार दुर्गंधीयुक्त पू. 58 आणि अशाच प्रकारच्या इतर अनेक (यातना) आहेत. 59 (आणि ते एकमेकांना म्हणतील, तुम्ही पाहत आहात का?) हा लोकांचा समूह जो तुमच्यासोबत (पापांचा वाटेकरी होता), इथे (कोंबण्यासाठी) आणला जात आहे. कोणीही त्यांचे स्वागत करणारा नाही. त्यांनाही नरकाग्नीचा त्रास सोसावा लागणार. 60 (हे ऐकून) ते म्हणतील, '(तुमचे तोंड काळे होवो!) तुमचे स्वागत करणारा (आज) कोणीही नाही. तुमच्या मुळेच तर (आज) हे आमच्या वाट्याला आले आहे.' (खरोखर) किती वाईट आहे, ते ठिकाण (सदैव) राहण्यासाठी! 61 ते (अल्लाहकडे) प्रार्थना करू लागतील, 'हे आमच्या पालनकर्त्या! ज्याच्यामुळे हे परिणाम आमच्या वाट्याला आले आहे, त्याला तू नरकाची (आमच्यापेक्षा) दुप्पट शिक्षा दे!' 62 आणि ते (नरकवासी) म्हणतील, 'हे काय झाले! ज्या लोकांना आम्ही दुष्ट मानत होतो, (त्यांच्यापैकी कोणीही) इथे कुठे दिसत नाही. 63 (ते लोक) ज्यांना आम्ही उपहासाचे लक्ष्य बनविले होते, किंवा ते असतील इथे, पण आपल्याला दिसत नसावेत, असेही होऊ शकते?' 64 खरोखर, ही मात्र सत्य गोष्ट असेल की, नरकवासी आपसात अशाप्रकारे एकमेकांवर दोषारोप करतील.

65 (पैगंबर! लोकांना) सांगा, 'मी तर केवळ सावध करणारा आहे. आणि अल्लाहशिवाय दुसरा कोणीच उपास्य नाही, असा एकमेव की, अस्तित्वात असलेल्या प्रत्येक गोष्टीवर नियंत्रण ठेवून असलेला (आहे तो)! 66 तोच आहे पालनकर्ता पृथ्वी व आकाश आणि या दोहोंच्यामध्ये जे काही आहे त्या

सर्वांचा, तो सर्वशक्तिमान (असूनही) असीम क्षमाशील आहे.' 67 त्यांना सांगा, 'हा भयंकर महत्त्वाचा संदेश आहे. 68 (पण) त्याकडे तुम्ही दुर्लक्ष करीत आहात.' 69 (पैगंबर!) त्यांना सांगा, 'मला (स्वतःहून) त्या उच्च दर्जाच्या स्वर्गदूतांच्या सभेत (मानवाच्या निर्मितीविषयी) आपसात काय काय वादविवाद झाला, याचे मुळीच ज्ञान नाही. 70 (या गोष्टी मला केवळ अल्लाहच्या संदेशाद्वारे कळल्या आहेत). (आणि) अल्लाहचा संदेश माझ्याकडे केवळ यासाठी प्रकट केला जातो की, त्याद्वारे मी (लोकांना) स्पष्टरित्या सावध करावे.'

71 जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने स्वर्गदूतांना म्हटले, 'मी (लवकरच) मातीपासून मनुष्य निर्माण करणार आहे. 72 मग जेव्हा मी त्यास पूर्णपणे घडवून टाकेन व त्यात माझा आत्मा फुंकलेला असेन, तेव्हा तुम्ही (सर्व) त्याच्यासमोर नतमस्तक व्हा.' 73 तेव्हा सर्व स्वर्गदूत एकत्र नतमस्तक झाले. 74 पण इब्लीस (सैतान) नतमस्तक झाला नाही, त्याने मी (मनुष्यापेक्षा श्रेष्ठ असल्याचे, म्हणजेच) मगरूरीचे प्रदर्शन केले. परिणामी तो (सैतान) सत्य नाकारणाऱ्यांमध्ये सामील झाला. 75 अल्लाहने म्हटले, 'हे इब्लीस! ज्याला (म्हणजेच मानवाला) मी माझ्या हातांनी बनविले आहे, तर त्याच्यासमोर नतमस्तक न होण्यास तुझ्यासाठी कोणती गोष्ट कारणीभूत ठरली? तू हे मगरूरीचे प्रदर्शन करतोस की, तू त्यांच्यापैकी आहेस जे (केवळ) स्वतःला मोठे समजतात.'

76 (त्यावर) सैतान उत्तरला, 'मी मनुष्यापेक्षा श्रेष्ठ आहे, (कारण) तू मला आगीपासून निर्माण केलेस आणि त्याला मातीपासून.' 77 अल्लाहने म्हटले, 'तू तात्काळ येथून (स्वर्गीय परिसरातून) चालता हो, कारण यापुढे तुझ्यावर (आमची कृपा नसून) धिक्कार आहे. 78 आणि न्यायाच्या दिवसापर्यंत तू माझ्या शापाने ग्रस्त असशील.'

79 (त्यावर) सैतान म्हणाला, 'हे माझ्या पालनकर्त्या! मला त्या दिवसापर्यंत उसंत दे, ज्या दिवशी लोकांना पुन्हा जिवंत करण्यात येईल.' 80 (अल्लाहने)

उत्तर दिले, 'तुला उसंत देण्यात आली. 81 त्या निर्धारित दिवसापर्यंत (ज्याचे ज्ञान केवळ मला आहे).' 82 (त्यावर) तो म्हणाला, 'तुझ्या सामर्थ्याची शपथ, मी त्या सर्वांना (म्हणजे समस्त मानवजातीस) सन्मार्गापासून बहकावून दूर नेऊन सोडेन. 83 पण यात अपवाद तुझे सच्चे भक्त असतील (म्हणजे त्यांना मार्गभ्रष्ट करण्यात मी यशस्वी होणार नाही).' 84 अल्लाहने म्हटले, 'सत्य हे आहे, आणि मी बोलतो ते सत्यच असते. 85 की, मी नरकाला, तू आणि तुझे अनुसरण करणारे सर्व लोक, यांनी भरून टाकेन.'

86 (पैगंबर!) त्यांना सांगा, 'या (संदेशापोटी) मी तुमच्याकडे कोणताही मोबदला मागत नाही, ना मी (कोणत्याही प्रकारे) ढोंग करणाऱ्या लोकांपैकी आहे. 87 हे (कुराण) सर्व लोकांसाठी केवळ एक बोधग्रंथ आहे. 88 आणि तुम्हाला लवकरच याची सत्यता कळून चुकेल.'

# सूरह-३९. अज़-ज़ुमर

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 हा ग्रंथ अल्लाहकडून प्रकट करण्यात आलेला आहे, जो सर्वशक्तिमान व (असीम) बुद्धिवान आहे. 2 (पैगंबर!) हा ग्रंथ आम्ही तुमच्याकडे सत्य (उद्देशांसहित) प्रकट केला आहे, यात मुळीच शंका नाही. तर तुम्ही संपूर्ण समर्पणभावासह अल्लाहचीच उपासना करा. 3 लक्षात ठेवा! संपूर्ण समर्पणभावासह आज्ञापालन हा केवळ अल्लाहचाच हक्क आहे. आणि ज्या लोकांनी, त्याच्याशिवाय इतरांना कार्यसाधक बनवून ठेवले आहे, (ते) म्हणतात, 'आम्ही त्यांची उपासना केवळ यासाठी करतो की, त्यांच्या माध्यमातून आम्हाला अल्लाहचे सान्निध्य प्राप्त व्हावे.' निश्चितच अल्लाह (न्यायाच्या दिवशी) त्यांच्यादरम्यान त्याबाबतीत आपला निर्णय सुनावेल, ज्याबाबतीत ते मतभेद बाळगून आहेत. अल्लाह अशा माणसाला सन्मार्ग दाखवत नाही, जो अट्टल खोटारडा आहे व फार कृतघ्न आहे.

4 जर अल्लाहने इच्छिले असते की, त्याचाही पुत्र असावा, तर त्याने आपल्या निर्मितीपैकी हवे त्याची (पुत्र म्हणून) निवड केली असती. असीम आहे त्याची महिमा! तो आहे अल्लाह! एकमेव! जे-जे अस्तित्वात आहे, त्या सर्वांवर संपूर्ण नियंत्रण ठेवणारा! 5 त्याने आकाश आणि पृथ्वी यांची निर्मिती अर्थपूर्ण उद्देशासहित केलेली आहे. तोच रात्रीनंतर दिवस आणतो आणि दिवसानंतर रात्र आणि त्यानेच सूर्य आणि चंद्र यांना (आपल्या नियमाच्या) अधीन केले आहे. त्यांच्यापैकी प्रत्येक नेमून दिलेल्या वेळेप्रमाणे आपल्या कक्षेत परिभ्रमण करीत असतो. लक्षात ठेवा, तो सर्वशक्तिमान आहे व फार क्षमाशील आहे.

6 अल्लाहने तुम्हाला एका जिवापासून निर्माण केले आणि मग त्यामधूनच त्याने त्याचा जोडीदार निर्माण केला. त्याने तुमच्यासाठी आठ जातींच्या गुराढोरांच्या जोड्या (म्हणजे नर व मादी) प्रदान केल्या. तो तुम्हाला तुमच्या मातांच्या गर्भाशयात अंधकाराच्या तीन अवस्थांदरम्यान, एका नंतर दुसरी अशा पद्धतीने निर्माण करीत असतो. (हे सर्व करणारा) अल्लाह आहे तुमचा पालनकर्ता! सर्वत्र सत्ता त्याचीच आहे. त्याच्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही. तर मग तुम्ही कुठे भरकटत चालला आहात?

7 जर (अल्लाहप्रति) कृतघ्नता बाळगाल तर (लक्षात ठेवा) अल्लाह काही तुमचा गरजवंत नाही. (पण) आपल्या भक्तांमध्ये कृतघ्नतेची भावना असणे त्याला अजिबात आवडत नाही. पण जर तुम्ही त्याच्याप्रति कृतज्ञता बाळगाल, तर तुमच्याकडून असा प्रतिसाद त्याला प्रिय आहे. ओझे वाहणारा कोणीही दुसऱ्याचे ओझे वाहणार नाही. मग तुम्हाला तुमच्या पालनकर्त्याकडेच परतून जायचे आहे. तर तो तुम्हाला ते सर्व दाखवून देईल, जे-जे तुम्ही (आयुष्यात) करीत होता. खरोखर, लोकांच्या मनात जे काही आहे, ते सर्व तो चांगल्याप्रकारे जाणून आहे.

8 आणि जेव्हा मनुष्यास एखादे दु:ख पोहोचते, तेव्हा तो आपल्या

पालनकर्त्याकडे पूर्ण समर्पणभावासह (मदतीसाठी) याचना करू लागतो. पण जेव्हा तो आपल्याकडून त्याच्यावर आपल्या कृपेने अनुग्रह प्रदान करून (त्याचे कष्ट दूर करतो, तेव्हा त्याच्यात असे परिवर्तन होते की), तो त्यास विसरून जातो, ज्याचा तो (संकटकाळी) धावा करीत होता. आणि इतरांना अल्लाहचे समकक्ष ठरवू लागतो, ते यासाठी की, दुसऱ्यांनाही (अल्लाहच्या) मार्गापासून बहकावून सोडावे. जो (असे कुकृत्य करतो) त्यास सांगा, ‘सत्य नाकारण्यामुळे तुला प्राप्त होणाऱ्या लाभांचा काही काळ (जरूर) उपभोग करून घे, पण शेवटी तू नरकवासीयांत असशील.’ 9 जो माणूस रात्रीच्या समयी अल्लाहसमोर नतमस्तक होतो आणि विनम्र भावाने प्रार्थनेत उभा टाकत असतो, तसेच मृत्यूनंतरच्या जीवनाबद्दल सदैव दक्ष असतो. आणि आपल्या पालनकर्त्याच्या कृपेची अपेक्षा बाळगून असतो, तो (त्या माणसासारखा होऊ शकतो का, जो या गोष्टींपासून पूर्णपणे दूर आहे?) (त्यांना) विचारा, ‘ज्ञानी व अज्ञानी दोघे समान होऊ शकतात का?’ खरोखर, उपदेश ते लोक ग्रहण करतात, जे बुद्धीचा वापर करतात.

10 (पैगंबर!) त्यांना सांगा, (अल्लाह म्हणतो), ‘हे माझ्या श्रद्धावंत भक्तांनो! आपल्या पालनकर्त्याची जाण ठेवून (जीवन व्यतीत करा). जे लोक या जगात सत्कर्मे करतील, त्यांच्यासाठी चांगला मोबदला आहे. आणि (लक्षात असू द्या) अल्लाहची भूमी फार विशाल आहे. आणि जे सहनशीलता बाळगणारे आहेत, त्यांना अमाप मोबदला प्रदान केला जाईल.’

11 (पैगंबर! तुम्ही लोकांना) सांगा, ‘मला अशी आज्ञा देण्यात आलेली आहे की, मी केवळ अल्लाहचीच उपासना करावी, त्याच्याचप्रति पूर्ण समर्पणभाव बाळगून. 12 आणि मला अशी आज्ञा देण्यात आली आहे की, सर्वप्रथम मी स्वत: त्या लोकांपैकी व्हावे जे अल्लाहला पूर्णपणे समर्पित होतात.’ 13 त्यांना सांगा, ‘मी जर माझ्या पालनकर्त्याची अवज्ञा करेन तर मला त्या भयंकर

दिवसाच्या शिक्षेचे भय वाटते.' [14] त्यांना सांगा, 'मी पूर्ण समर्पणभावासह केवळ अल्लाहचीच उपासना करतो. [15] तर (सत्य नाकारणाऱ्यांनो!) अल्लाहला सोडून तुम्ही हवे त्याची उपासना करा, (तुम्हाला त्याचे परिणाम अवश्य भोगावे लागतील). त्यांना सांगा, खऱ्या अर्थाने नुकसानात पडणारे ते लोक आहेत, जे पुनरुत्थानाच्या दिवशी स्वत:च्या व आपल्या कुटुंबीयांच्या वाट्याला नुकसान आणण्यास कारणीभूत ठरतील. लक्षात असू द्या, हाच वास्तविक नुकसान आहे.'

[16] 'त्यांच्यावरून आणि खालून आगीचे आवरण असेल (म्हणजे त्यांच्या चहूबाजूंनी आगीने त्यांना वेढलेले असेल).' हीच ती शिक्षा आहे, ज्याची जाणीव अल्लाह आपल्या भक्तांना (पुन्हा पुन्हा) करून देतो आहे. 'हे माझ्या भक्तांनो! (नेहमी) माझी जाण बाळगून असा.'

[17] त्यांच्यासाठी शुभवार्ता आहे, जे सैतानी शक्तींच्या उपासनेपासून स्वत:ला (पूर्णपणे) दूर ठेवतात आणि पूर्ण समर्पणभावासह अल्लाहकडे वळतात. (पैगंबर!) माझ्या अशा भक्तांना शुभवार्ता ऐकवा. [18] त्यांना जे ऐकवले जाते, ते अतिशय लक्षपूर्वक ऐकतात, आणि त्याच्या उत्कृष्ट अर्थाचे अनुसरण करतात (म्हणजे ते गोष्टींचा चुकीचा अर्थ लावत नाहीत). हेच ते लोक आहेत, ज्यांना अल्लाहने सन्मार्गी लावलेले आहे. आणि हेच ते लोक आहेत जे आपल्या बुद्धीचा वापर करतात.

[19] तर उलटपक्षी जो माणूस (अल्लाहच्या) शिक्षेसाठी पात्र ठरलेला आहे. (हे पैगंबर!) अशा माणसास तुम्ही वाचवू शकता का, जो आधीच नरकाच्या आगीत पडलेला आहे (म्हणजे तो नरकाच्या आगीत पडणे, अगदी अटळ आहे). [20] पण जे लोक आपल्या पालनकर्त्याची जाण ठेवून असतात, त्यांच्यासाठी शाही महाल असतील, ज्यांच्यावर आणखी भव्य महाल आहेत. आणि त्यांच्याखालून पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह वाहत असतील. हे आहे अल्लाहचे

वचन, आणि अल्लाह आपले वचन कधीही मोडत नसतो.

21 (लोकांनो!) तुम्हाला याची जाणीव नाही का की, अल्लाह आकाशातून (ढगांद्वारे) पाण्याचा वर्षाव करतो. मग जमिनीत पाण्याचे झरे प्रवाहित करतो. तोच जमिनीवर नानाविध रंगाची वनस्पती उगवितो. नंतर जेव्हा ती सुकून जातात, तेव्हा त्या तुम्हाला पिवळ्या झालेल्या दिसतात. मग शेवटी तो त्यांचा अगदी भुसा करून टाकतो. खरोखर या (खुणांमध्ये) संदेश आहेत, बुद्धीचा वापर करणाऱ्या लोकांसाठी. 22 तो माणूस ज्याच्या अंत:करणाचे द्वार अल्लाहने इस्लामसाठी (इस्लाम=अल्लाहप्रति संपूर्ण समर्पण) खुले केलेले आहे, आणि त्याला अल्लाहकडून सन्मार्ग दाखवणारा प्रकाश प्राप्त झालेला आहे, (त्या माणसासारखा असू शकतो का, जो मनाने आंधळा व बहिरा बनलेला आहे व असत्याच्या अंधकारात चाचपडत आहे). तर खेद आहे त्या लोकांबद्दल, ज्यांची अंत:करणे अल्लाहचा उपदेश ग्रहण करण्याच्या बाबतीत (गाफील व) कठोर बनलेली आहेत. असेच लोक स्पष्टरित्या वाट चुकलेले आहेत.

23 अल्लाहने सर्वोत्तम संदेशग्रंथ प्रकट केलेला आहे, ज्यातील संदेशवचने एकमेकास (मिळतीजुळती व) पूरक आहेत आणि पुन्हा–पुन्हा आलेली आहेत. (हे ऐकून किंवा वाचून) त्या लोकांच्या अंगावर शहारे उभे राहतात, जे आपल्या पालनकर्त्याची जाण बाळगून आहेत. मग त्यांचे तन व मन मृदू होऊन, अल्लाहच्या स्मरणासाठी प्रवृत्त होतात. हे कुराण अल्लाहचे मार्गदर्शन आहे. याद्वारे तो इच्छितो त्यास मार्गदर्शन प्रदान करतो (अर्थातच सत्याचा शोधकाला) आणि ज्याला अल्लाह मार्गभ्रष्ट करतो, त्यास कोणीही मार्गदर्शन करू शकत नाही.

24 तो माणूस ज्याला पुनरुत्थानाच्या दिवशी कठोर शिक्षेपासून स्वत:चा बचाव करण्यासाठी आपल्या चेहऱ्यालाच ढाल बनवावे लागेल, (तर अशा माणसाची तुलना स्वर्गात आदर्श सुखाच्या अवस्थेत असलेल्या माणसाशी होऊ

शकते का?) आणि (त्या दिवशी) दुराचारी लोकांना सांगितले जाईल, '(आता) चाखा आपल्या कर्मांची फळे.' [25] त्यांच्या आधीच्या लोकांनीही (पैगंबरांद्वारे प्रकट झालेल्या सत्याला) खोटे ठरविले. तर शिक्षा त्यांच्यावर त्या दिशेने चालून आली, ज्याची त्यांना अजिबात कल्पना (वा अपेक्षा) नव्हती. [26] तेव्हा अल्लाहने त्यांना या जगातील जीवनातही नामुष्कीची चव चाखायला लावली. आणि यानंतरच्या अनंतकालीन जीवनात मिळणारी शिक्षा तर फारच मोठी आहे. कदाचित या लोकांना या गोष्टीची जाणीव झाली असती.....

[27] आम्ही या कुराणात अनेक प्रकारची उदाहरणे लोकांनी बोध घ्यावा म्हणून प्रस्तुत केलेली आहेत. [28] हे कुराण (स्पष्ट) अरबी भाषेत आहे कोणत्याही प्रकारची क्लिष्टता यात नाही. हे यासाठी (प्रकट करण्यात आलेले आहे) की, लोकांनी अल्लाहची जाण बाळगावी. [29] (इथे) अल्लाह तुमच्यासमोर एक (बोधपर) उदाहरण सादर करीत आहे, दोन माणसे (गुलाम) आहेत, एक असा आहे, ज्याचे अनेक मालक आहेत, ज्यांचे एकमेकांशी पटत नाही. आणि दुसरा असा आहे, ज्याचा एकच माणूस मालक आहे. या दोघांची अवस्था सारखी असू शकते का? (नाही–मुळीच नाही.) सर्व प्रशंसा केवळ अल्लाहसाठीच आहे पण बहुसंख्य लोकांना (या वास्तवाची) जाण नाही. [30] (पैगंबर!) तुम्हालाही मरायचे आहे आणि ते देखील मरणार आहेत, यात मुळीच शंका नाही. [31] मग तुम्ही लोक न्यायाच्या दिवशी आपल्या पालनकर्त्यासमोर आपापले वादविवाद (व मतभेद) प्रस्तुत कराल.

[32] त्या माणसापेक्षा अधिक दुष्ट दुसरा कोण असू शकतो, जो अल्लाहविषयी खोट्या गोष्टी रचतो आणि जेव्हा सत्य त्याच्याकडे येते, ते स्वीकारण्यास तो नकार देतो. तर अशा सत्य नाकारणाऱ्या श्रद्धाहीन लोकांचे (उचित) स्थान नरक नसेल का? [33] पण जो कोणी सत्य घेऊन आला आहे आणि ज्याने त्यास अंत:करणापासून सत्य म्हणून स्वीकारलेले आहे. हेच ते लोक आहेत, जे

(खऱ्या अर्थाने) अल्लाहची जाण ठेवून (जीवन व्यतीत करणारे) आहेत. 34
त्यांच्यासाठी त्यांच्या पालनकर्त्याकडे ते सर्व काही प्राप्त होईल, ज्याची ते
इच्छा करतील. हा आहे मोबदला सत्कर्मे करणाऱ्यांसाठी. 35 अल्लाह (अशा
लोकांच्या) कर्मवहीतून (त्यांच्या हातून घडलेल्या) चुका पुसून टाकेल. आणि
त्यांनी जी चांगली कर्मे केलेली असतील, त्यानुसार त्यांना (चांगला) मोबदला
प्रदान करेल.

36 अल्लाह आपल्या भक्तासाठी पुरेसा नाही का? तरीही (हे अनेकेश्वरवादी
लोक) तुम्हाला त्या (काल्पनिक दैवी शक्तींचे) भय दाखवतात (ज्यांची ते
स्वत: उपासना करतात). (लक्षात ठेवा,) अल्लाह ज्यास पथभ्रष्ट करतो, मग
त्यास कोणीही सरळ मार्ग दाखवू शकत नाही. 37 याउलट अल्लाह ज्यास सरळ
मार्ग दाखवेल, त्यास कोणीही बहकावून पथभ्रष्ट करू शकत नाही. अल्लाह
सर्वशक्तिमान आणि वाईटाचा बिमोड करण्यास समर्थ नाही का?

38 (बहुसंख्य लोकांना) जेव्हा तुम्ही विचाराल की, आकाश व पृथ्वी यांना
कोणी निर्माण केले, तर ते निश्चितपणे उत्तर देतील, '(अर्थातच) अल्लाहने.'
(पैगंबर!) त्यांना विचारा की, तुम्ही याविषयी कधी चिंतन केले आहे का की,
अल्लाहला सोडून ज्यांचा तुम्ही धावा करता, ते (तुमचे काल्पनिक दैवत,)
अल्लाहने मला एखादे कष्ट पोचवले तर त्यास दूर करू शकतात का? किंवा
अल्लाहने माझ्यावर एखादे अनुग्रह करण्याचे ठरविले तर ते त्याच्या त्या अनुग्रहास
रोखू शकतात का? (पैगंबर! त्यांना) सांगा, 'अल्लाह माझ्यासाठी पर्याप्त आहे,
विश्वास ठेवणारेच त्याच्यावर विश्वास ठेवतात.' 39 त्यांना सांगा, '(सत्य
नाकारणाऱ्या) माझ्या बांधवांनो! तुम्ही जी कर्मे करू शकता, ती तुम्ही करा,
आणि मी देखील कर्म करीत आहे. लवकरच तुम्हाला (तुमच्या कर्मांची
हकिगत) कळून येईल.' 40 की, कोणावर (या जगात) अपमानित करून
सोडणारी शिक्षेची आपत्ती येईल. आणि कोणाला (यानंतरच्या जगात) कधीही

न संपणारी शिक्षा मिळेल (हे आपण पाहू). [41] (पैगंबर!) आम्ही समस्त मानवजातीच्या मार्गदर्शनासाठी हा ग्रंथ सत्य संदेशासह तुमच्याकडे प्रकट केलेला आहे. तर जो कोणी मार्गदर्शनाचे अनुसरण करेल, तो स्वत:च्या भल्यासाठीच करेल. आणि जो कोणी भटकून सन्मार्गापासून दूर जाईल तर त्याच्या या भरकटण्याचे परिणाम त्यालाच भोगावे लागतील. तर तुम्ही त्यांचे काही रखवालदार नाही.

[42] अल्लाह लोकांच्या मृत्यूची वेळ आल्यावर त्यांचे आत्मे (शरीरातून कायमस्वरूपी) काढून घेतो, आणि ज्यांची वेळ अजून आली नाही त्यांचे आत्मे झोपेच्या अवस्थेत आपल्याकडे घेत असतो. आणि मग ज्यांना मृत्यू देण्याचे त्याने ठरविलेले असते त्यांच्या आत्म्यांना स्वत:कडेच ठेवून घेतो. आणि इतरांचे आत्मे एका निर्धारित अवधीपर्यंत परत पाठवितो. खरोखर, यामध्ये संदेश आहेत, त्या लोकांसाठी जे चिंतन करतात.

[43] या लोकांनी अल्लाहला सोडून इतरांना त्यांचे शिफारसकर्ते बनवून ठेवले आहे की काय? त्यांना सांगा, ‘जरी ते कशावरही नियंत्रण ठेवणारे नाहीत, ना ते समज बाळगणारे (ज्ञानी) आहेत (तरीदेखील?).’ [44] (पैगंबर!) त्यांना सांगा, ‘सर्व प्रकारच्या शिफारशीचा अधिकार केवळ अल्लाहच्या हाती आहे. आकाश आणि पृथ्वीवर (म्हणजेच समस्त सृष्टीत) त्याचीच सत्ता आहे. मग शेवटी तुम्हा सर्वांना त्याच्याकडेच परत आणले जाईल.’ [45] आणि जेव्हा केवळ अल्लाहचेच नाव चर्चिले जाते, तेव्हा यानंतरच्या जीवनावर विश्वास न ठेवणाऱ्या लोकांच्या मनांत तिटकारा निर्माण होतो. पण जेव्हा अल्लाहला सोडून, त्या (काल्पनिक शक्तींचे) नाव चर्चिले जाते, तेव्हा ते अत्यंत खूश होतात. [46] (पैगंबर! तुम्ही अशाप्रकारे अल्लाहकडे) प्रार्थना करा, ‘हे अल्लाह! आकाश व पृथ्वी यांच्या निर्मात्या, अदृश्य व दृश्य यांच्या ज्ञात्या, तूच (निश्चितपणे) आपल्या भक्तांच्या दरम्यान त्या बाबतीत निर्णय करणार आहेस, ज्याबाबतीत ते मतभेद बाळगून

आहेत.' [47] आणि जर अत्याचारी लोकांकडे, या पृथ्वीवर जे काही आहे, ते सर्व असेल आणि तेवढेच आणखीही असेल, आणि ते न्यायाच्या दिवशी (नरकाच्या) कठोर शिक्षेपासून स्वत:ला वाचविण्यासाठी (मुक्ति)दंड म्हणून देऊ करतील (तरीदेखील त्यांची त्या शिक्षेपासून कदापि सुटका होणार नाही). कारण अल्लाहकडून त्या दिवशी त्यांना अशा गोष्टी दाखविल्या जातील, ज्यांची कल्पना त्यांनी कधीही केलेली नसणार. [48] आणि त्यांच्यासमोर त्यांची (सर्व) वाईट कृत्ये उघड केली जातील. आणि त्या (शिक्षेने) ते वेढले गेलेले असतील, जिची ते खिल्ली उडवीत असत.

[49] आणि जेव्हा माणसाला एखादे कष्ट पोहोचते, तेव्हा तो आम्हाला मदतीसाठी विनवणी करू लागतो. पण जेव्हा आम्ही त्याच्यावर अनुग्रह करतो, तेव्हा तो असे म्हणू लागतो की, हे सर्व मला माझ्या योग्यतेमुळे प्राप्त झालेले आहे. नव्हे, (हा अनुग्रह तर माणसाची) कसोटी पाहण्यासाठी आहे, पण त्यांच्यापैकी अनेकांना (या वास्तवाची) जाणीव नाही. [50] त्यांच्यापूर्वीचे लोक देखील असेच म्हणत असत. तर जी (कर्मरूपी) कमाई त्यांनी केली, त्यांच्या काहीच कामी आली नाही. [51] तर जी दुष्कृत्ये त्यांनी केली होती त्याचे दुष्परिणाम त्यांच्यावर उलटले. आणि या लोकांपैकी जे अत्याचारी आहेत, त्यांच्यासमोर देखील त्यांच्या दुष्कृत्यांची वाईट फळे लवकरच येतील. ते आमच्या (या योजनेला) कधीही विफल करू शकत नाहीत. [52] त्यांना या गोष्टीची जाणीव नाही का की, अल्लाह इच्छितो त्यास विपुल प्रमाणात उपजीविका प्रदान करतो, आणि इच्छितो त्यास कमी प्रमाणात प्रदान करतो? खरोखर यात संदेश आहेत, श्रद्धावंत लोकांसाठी.

[53] (पैगंबर! लोकांना) सांगा की, (अल्लाह म्हणतो), 'ज्यांनी स्वत:च्या जिवावर अन्याय केलेला आहे अशा माझ्या भक्तांनो! आता अल्लाहची कृपा प्राप्त होणार नाही असे समजून निराश होऊ नका. खरोखर, अल्लाह तुमच्या सर्व चुका

माफ करून टाकेल. तो माफ करणारा व दया करणारा आहे. 54 (यापुढे) तुम्ही आपले संपूर्ण ध्यान आपल्या पालनकर्त्याकडे वळवा. आणि त्याच्या शिक्षेचे संकट तुमच्यावर येण्यापूर्वी त्याच्या आज्ञापालनाच्या मार्गाचा अवलंब करा. (एकदा त्याची शिक्षा येऊन ठेपल्यानंतर) तुम्हाला कोणीही साहाय्य करू शकणार नाही.'

55 आणि तुमच्याकडे तुमच्या पालनकर्त्याकडून जे काही पाठविण्यात आले आहे त्याच्या उत्कृष्ट अर्थाचे पालन करा (म्हणजे चुकीचा अर्थ लावण्याचे प्रयत्न करू नका). यापूर्वी की, तुमच्यावर अचानकपणे (ईश्वरीय) शिक्षेचे संकट चालून येईल. आणि तुम्हाला तशी कल्पनादेखील नसेल. 56 असे होऊ नये की, नंतर एखाद्याला या गोष्टीची जाणीव होईल आणि तो म्हणेल, 'खेद आहे माझ्यावर! मी अल्लाहप्रति आपल्या कर्तव्यांच्या बाबतीत कसूरवार ठरलो. (अरेरे! मी कसा गाफील होतो की), मी (सत्याची) खिल्ली उडविणाऱ्या लोकांत सामील होतो.' 57 किंवा कोणी (तेव्हा) असे म्हणू लागेल, 'जर अल्लाहने मला मार्ग दाखवला असता तर मी देखील त्याची जाण बाळगून (जीवन व्यतीत केलेल्या) लोकांपैकी असलो असतो.' 58 किंवा शिक्षा समोर पाहून, एखादा कोणी असे म्हणू लागेल, 'जर मला (आणखी फक्त) एकदा पुन्हा जगात जाण्याची संधी मिळाली तर मी (निश्चितपणे) सदाचारी लोकांपैकी असेन.' 59 (अल्लाह म्हणेल,) 'नाही, (अशी संधी पुन्हा नाही.) माझे संदेश तुझ्याकडे आले होते, पण तू त्यांना खोटे ठरविलेस आणि मगरुरीचे प्रदर्शन केलेस आणि अशाप्रकारे तू त्या लोकांपैकी झालास जे सत्य नाकारणारे होते.' 60 तुम्हाला न्यायाच्या दिवशी त्या लोकांचे चेहरे काळे पडलेले दिसतील. ज्यांनी अल्लाहविषयी खोट्या गोष्टी रचल्या होत्या. मगरुरीचे प्रदर्शन करणाऱ्या लोकांचे ठिकाण (स्वाभाविकरित्या) नरकामध्ये नसणार का? 61 पण अल्लाह त्या लोकांना (भव्य) यशासह (सर्व प्रकारच्या कष्टांपासून कायम) मुक्ती प्रदान करेल, जे

त्याची जाण बाळगून (जीवन व्यतीत करीत) राहिले. (त्यानंतर पुढे) त्यांना कोणत्याही प्रकारच्या त्रासाचे ना कधी स्पर्श होईल, ना ते कधी दुःखी होतील.

62 अल्लाह प्रत्येक गोष्टीचा निर्माता आहे. आणि तोच सर्वांचा सांभाळकर्ता (पालनकर्ता) आहे. 63 आकाश व पृथ्वी (च्या सर्व खजिन्यांच्या) किल्ल्या त्याच्याच हाती आहेत. (खरोखर) तेच लोक अयशस्वी ठरणार आहेत, जे अल्लाहच्या संदेशांना नाकारण्यावर आग्रही राहिले. 64 (पैगंबर!) त्यांना सांगा, 'हे अज्ञानी लोकांनो! तुम्ही मला अल्लाहला सोडून, इतर (उपास्यांची) उपासना करण्यासाठी सांगत आहात? 65 तुमच्याकडे आणि तुमच्या पूर्वीच्या लोकांकडे ईश्वरवाणी प्रकट करण्यात आलेली आहे. जर तुम्ही इतरांना अल्लाहच्या (ईश्वरत्वात) सहभागी ठरविण्याचे (पाप) कृत्य कराल तर तुमची सर्व कृत्ये वाया जातील आणि तुम्ही (अल्लाहच्या कृपेपासून कायम) वंचित झालेल्या (लोकांत) असाल. 66 तेव्हा (लोकांनो!) केवळ अल्लाहची उपासना करा. आणि (त्याच्याप्रति) नेहमी आभार व्यक्त करणारे बना.'

67 (बहुसंख्य) लोकांना त्याच्या महानतेची जाण नाही जशी की, ती असायला पाहिजे. (तो असा महान आहे की,) न्यायाच्या दिवशी संपूर्ण पृथ्वी त्याच्या मुठीत (लहानशी वस्तू) असल्याप्रमाणे असेल. आणि सर्व आकाश त्याच्या हातात एखाद्या गुंडाळलेल्या वस्तूप्रमाणे असेल. असीम कीर्तिवान आहे तो! आणि त्याचे समकक्ष ठरविण्याच्या लोकांच्या त्या (निराधार) कृत्याशी त्याचा काहीच संबंध नाही, तो श्रेष्ठतम आहे. 68 आणि (त्या दिवशी) जेव्हा शिंग फुंकले जाईल, तेव्हा आकाश आणि पृथ्वीवर जो कोणी आहे, (सर्व जीव) बेशुद्ध होऊन (खाली) कोसळेल, पण फक्त ज्यांच्याबाबतीत अल्लाह इच्छील (ते मात्र त्यातून वगळले जातील). मग जेव्हा दुसऱ्या वेळेस शिंग फुंकले जाईल तर ते सर्व उठून (अल्लाहच्या न्यायासनासमोर) उभे राहतील आणि आपल्या सभोवार पाहू लागतील. 69 (त्या दिवशी) पृथ्वी आपल्या पालनकर्त्याच्या

प्रकाशाने उजळून निघेल. आणि (प्रत्येकाची) कर्मवही उघडून (समोर) ठेवली जाईल. आणि पैगंबर आणि साक्षीदार (म्हणजे पैगंबरांनंतर पैगंबरांचे कार्य पुढे सुरू ठेवणारे लोक अल्लाहच्या न्यायालयात) हजर केले जातील. आणि लोकांदरम्यान न्यायपूर्वक निवाडा करण्यात येईल आणि त्यांच्यावर मुळीच अन्याय केला जाणार नाही. 70 कारण प्रत्येकास त्याच्या कर्मांचा पुरेपूर मोबदला दिला जाईल. आणि ते काय-काय करीत आहेत, हे त्याला चांगले ठाऊक आहे.

71 ज्या लोकांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला होता, त्यांना गटा-गटाने नरकाकडे हाकलून नेण्यात येईल. आणि जेव्हा ते नरकापाशी पोहोचतील, तेव्हा त्याचे दरवाजे उघडले जातील. आणि त्याचे रखवालदार त्यांना विचारतील, 'तुमच्याकडे तुमच्यामधूनच पैगंबर आले नव्हते? जे तुम्हाला तुमच्या पालनकर्त्याचे संदेश ऐकवीत असत? आणि जे तुम्हाला या (न्यायाच्या) दिवसाच्या आगमनाविषयी सावध करीत असत?' ते (नरकास पात्र ठरलेले लोक) उत्तर देतील, 'होय (अर्थातच)! ते आले होते (आणि त्यांनी पूर्णपणे आपले कर्तव्य पार पाडले).' पण, शिक्षेचा निर्णय सत्य नाकारणाऱ्या लोकांच्या बाबतीत खरा ठरणार होता (तो आज ठरलेला आहे). 72 (आणि) त्यांना सांगितले जाईल, 'नरकात कायमस्वरूपी राहण्यासाठी त्याच्या द्वारातून त्यात प्रवेश करा.' (खरोखर,) किती वाईट ठिकाण आहे, खोटा अभिमान मिरवीत राहिलेल्या लोकांचे!

73 पण ज्या लोकांनी आपल्या पालनकर्त्याची जाण बाळगून (जीवन व्यतीत केलेले) असेल तर अशा लोकांना गटा-गटाने स्वर्गाकडे नेण्यात येईल. आणि जेव्हा ते स्वर्गाच्या जवळ पोहोचतील, त्याची द्वारे उघडण्यात येतील. तेव्हा त्याचे रखवालदार त्यांना म्हणतील, 'तुम्हाला (सदैव) शांती लाभो, आता अगदी मजेत राहा. त्यात कायम राहण्यासाठी दाखल व्हा.' 74 आणि ते (स्वर्गनिवासी) लोक म्हणतील, 'सर्व स्तुती अल्लाहसाठीच आहे, ज्याने आम्हाला दिलेले वचन पूर्ण केलेले आहे. आणि त्याने आम्हाला या (स्वर्गीय) भूमीचे

वारस बनवले. आम्ही इथे स्वर्गात हवे तिथे राहू शकतो.' (खरोखर) किती उत्कृष्ट मोबदला आहे (अल्लाहच्या मार्गात) श्रम करणाऱ्यांचा! [75] आणि (पैगंबर!) तुम्ही (त्या दिवशी) स्वर्गदूतांना पाहाल की, ते (सर्वशक्तिमान अल्लाहच्या) सिंहासनाभोवती उभे आहेत आणि आपल्या पालनकर्त्याचे स्तुतिगान व पावित्र्यगान करण्यात व्यस्त आहेत. (त्या दिवशी सर्व) लोकांच्या दरम्यान न्यायपूर्वक फैसला सुनावून झाल्यानंतर (चहूकडून) हीच घोषणा होईल की, सर्व जगांचा पालनकर्ता असलेला अल्लाहच सर्व प्रकारच्या स्तुतीस पात्र आहे.

# सूरह-४०. अल-मोमीन

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] हा० मीम० [2] हा संदेशग्रंथ अल्लाहकडून प्रकट करण्यात आलेला आहे, जो सर्वशक्तिमान आहे, सर्वज्ञ आहे. [3] पापांची क्षमा करणारा व पश्चात्तापाचा स्वीकार करणारा आहे. (तसेच दुष्टांस) कठोर शिक्षा करणारा (ही), आणि असीम कृपा करण्यास समर्थ असा (तो आहे). त्याच्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही. सर्वांना त्याच्याकडेच परतायचे आहे.

[4] अल्लाहच्या संदेशांविषयी केवळ तेच लोक विवाद निर्माण करतात जे सत्य नाकारणारे (श्रद्धाहीन) आहेत. (पैगंबर!) त्यांच्या भूतलावरील सक्रियतेमुळे तुमची अशी फसगत व्हायला नको की, ते (भूतलावर) काहीही करू शकतात. [5] त्यांच्यापूर्वी नूहच्या लोकांनी (पैगंबराद्वारे प्रकट झालेल्या सत्यसंदेशाला) खोटे ठरविले, तसेच त्याच्या नंतरच्या लोकांपैकी प्रत्येक जनसमूहाने (खोटे ठरविले,) त्यांच्यापैकी प्रत्येक समूहाने त्यांच्याकडे पाठविण्यात आलेल्या पैगंबराविरुद्ध त्याला जेरीस आणण्याच्या उद्देशाने कट रचला. तसेच खोट्या गोष्टींच्या आधारे (पैगंबरांशी) या हेतूने वाद घातला की, सत्याला विफल करावे. तेव्हा (त्यांच्या या वर्तनामुळे) मी त्यांना पकडले, (खरोखर), किती

भयंकर होती, मी त्यांना केलेली शिक्षा! 6 अशाप्रकारे तुझ्या पालनकर्त्याचे शब्द सत्य नाकारणाऱ्या लोकांच्या बाबतीत खरे ठरले, ते नरकाच्या अग्नीचे वासी आहेत.

7 जे (स्वर्गदूत अल्लाहच्या) सिंहासनाचे ज्ञान बाळगून आहेत आणि ते त्याच्या फार निकट आहेत. ते आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीसह महिमागान करीत असतात. तसेच ते अल्लाहवर विश्वास ठेवतात आणि ते विश्वास ठेवणाऱ्या (श्रद्धावंतांसाठी) त्याच्याकडे क्षमायाचना करीत असतात. म्हणतात, 'हे प्रभू! तुझ्या कृपेने व ज्ञानाने जे-जे अस्तित्वात आहे, त्यांना वेढून घेतलेले आहे. (हे अल्लाह!) तू त्या लोकांना माफ करून टाक जे पश्चात्तापदग्ध होऊन तुझ्याकडे वळतात आणि तुझ्या मार्गाचा अवलंब करतात. तू त्यांना नरकाच्या शिक्षेपासून (अवश्य) वाचव.' 8 'हे प्रभू! तू त्यांना कायम वास्तव्याच्या बागांत प्रविष्ट कर, ज्याविषयी तू त्यांना वचन दिलेले आहेस. त्यांच्यासोबत त्यांचे आईवडील, त्यांच्या पत्नी आणि त्यांची मुले यांच्यापैकी जे सदाचारी असतील त्यांनाही तू त्यात प्रवेश दे. खरोखर, तू सर्वशक्तिमान आणि अस्सल बुद्धिवान आहेस. 9 तसेच सर्व प्रकारच्या वाईट गोष्टींपासून त्यांचे रक्षण कर. त्या दिवशी ज्यांना तू वाईट कृत्यांच्या दुष्परिणामापासून वाचवशील तर त्यांच्यावर तुझी (फार मोठी) कृपा होईल. हेच सर्वश्रेष्ठ यश आहे.'

10 पण (त्या दिवशी) सत्य नाकारणाऱ्यांना सांगितले जाईल, '(आज) तुम्हाला स्वत:बद्दल जो तिटकारा वाटतो, त्याहूनही अधिक तिटकारा (तुमच्याविषयी) अल्लाहला वाटत होता, जेव्हा तुम्हाला सत्य श्रद्धेचा अंगीकार करण्यासाठी बोलाविले जात होते आणि तुम्ही मात्र सत्य नाकारण्यावर ठाम होता.' 11 ते म्हणतील, 'हे आमच्या पालनकर्त्या! तू आम्हाला दोन वेळा मृत्यू दिलेस व दोन वेळा जीवन प्रदान केलेस. तर आता आम्ही आमच्या अपराधांची कबुली देत आहोत, तेव्हा यातून बाहेर निघण्याचा एखादा मार्ग आहे का?

12 (त्यांना सांगितले जाईल,) ‘आज तुमच्यावर हे यासाठी ओढवलेले आहे, कारण जेव्हा तुम्हाला केवळ अल्लाहच (तुमचा निर्माता, पालनकर्ता, उपास्य आणि सर्व काही) असल्याचे सांगितले जात होते, तेव्हा तुम्ही ते मानण्यास नकार दिलात. पण जेव्हा त्याचे समकक्ष ठरविले जात, ते (मात्र) तुम्ही मानत होता. आता निर्णय केवळ अल्लाहच्याच हाती आहे, जो सर्वोच्च आणि असीम महान आहे.

13 तोच आहे जो तुम्हाला (तुमच्या सभोवार पसरलेल्या निसर्गात) आपल्या (सामर्थ्याच्या) खुणा दाखवीत असतो आणि आकाशातून तुमच्यासाठी उपजीविका पाठवतो (म्हणजे त्याने आकाश व पृथ्वीवर जी व्यवस्था निर्माण केलेली आहे, त्याद्वारे मानवाला उपजीविका प्राप्त होते). आणि बोध तर तो माणूस ग्रहण करतो जो अल्लाहची ओढ बाळगून आहे. 14 म्हणून (श्रद्धावंतांनो! तुम्ही) अल्लाहचाच धावा करा, त्याच्याप्रति पूर्ण समर्पणभाव बाळगून. मग सत्य नाकारणाऱ्यांना (तुमच्या) या गोष्टीबद्दल किती का वाईट वाटत नाही! 15 तोच आहे सर्वोच्च आणि समस्त विश्वाच्या सत्ताकेंद्राचा मालक! तो आपल्या भक्तांपैकी इच्छितो, त्याच्याकडे (स्वर्गदूताद्वारे) आपला संदेश पाठवतो. या हेतूने की, लोकांना त्या दिवसाच्या आगमनाविषयी सावध केले जावे, ज्या दिवशी त्यांची त्याच्याशी भेट होणार आहे. 16 त्या दिवशी जेव्हा सर्वजण (आपल्या कबरीतून उठून अल्लाहसमोर) येतील, तेव्हा त्यांची कोणतीही गोष्ट अल्लाहपासून लपलेली राहणार नाही. त्या दिवशी (त्यांना विचारले जाईल की,) आज कोणाची सत्ता आहे? (उत्तराची घोषणा होईल की,) एकमेव, सर्वांवर नियंत्रण असलेल्या सर्वशक्तिमान अल्लाहची!

17 (सांगितले जाईल), ‘आज प्रत्येकास त्याच्या (कर्मरूपी) कमाईचा मोबदला मिळेल, आज कोणावरही अन्याय होणार नाही. खरोखर, अल्लाह फारच त्वरित हिशेब करणारा आहे.

18 (पैगंबर!) लोकांना, त्या जवळ येत असलेल्या भयंकर दिवसाची सूचना देऊन टाका, ज्या दिवशी त्यांची हृदये त्यांच्या गळ्याशी आलेली असतील, ती दुःखाने दाटून गेलेली असतील. अत्याचारी लोकांचा ना कोणी मित्र असेल, ना कोणी शिफारसकर्ता, ज्याचे म्हणणे मान्य केले जाईल. 19 कारण तो (सर्वांचे) डोळे (एखाद्या गोष्टीवर) चोरून नजर टाकत असतील तर तेही जाणतो. तसेच त्या गोष्टीही तो जाणतो, ज्या मनात दडवून ठेवलेल्या आहेत. 20 आणि अल्लाह सत्य (आणि न्याय्य) निर्णय करतो. पण लोक अल्लाहला सोडून ज्यांचा धावा करतात, ते कोणत्याही गोष्टीचा निर्णय करू शकत नाहीत. कारण केवळ अल्लाह सर्व काही ऐकणारा आणि सर्व काही पाहणारा आहे.

21 त्यांनी कधी भूतलावर संचार करून पाहिले नाही का? की, यांच्या पूर्वीच्या (सत्य नाकारणाऱ्या) लोकांचा शेवट कसा झाला? ते सामर्थ्याच्या दृष्टीने आणि जो प्रभाव त्यांनी भूतलावर आपल्या मागे सोडला त्या दृष्टीनेही यांच्यापेक्षा वरचढ होते. अल्लाहने त्यांच्या अपराधांपोटी त्यांना नष्ट करून टाकले. तेव्हा अल्लाहच्या शिक्षेपासून त्यांना वाचवेल असा कोणीही नव्हता. 22 त्यांची ही अवस्था यासाठी झाली की, त्यांचे पैगंबर त्यांच्याकडे सत्याचे स्पष्ट प्रमाण घेऊन आले, पण त्यांनी त्यांचा स्वीकार करण्यास नकार दिला. मग अल्लाहने त्यांना (शिक्षेत) पकडले. खरोखर तो सर्वशक्तिमान आहे आणि शिक्षा करण्याच्या बाबतीतही कठोर आहे.

23 आम्ही मूसाला आपल्या संदेशासहित व स्पष्ट प्रमाणासहित पाठविले. 24 फिरऔन व हामान व क़ारून यांच्याकडे, तेव्हा ते म्हणाले, 'हा एक जादूगार आहे, फसवा आहे.' 25 मग जेव्हा तो आमच्याकडून सत्य घेऊन त्यांच्याकडे पोहोचला. ते म्हणाले, 'जे कोणी त्याच्याबरोबर विश्वास ठेवणारे आहेत, त्यांच्या मुलांना ठार करा आणि त्यांच्या मुली जिवंत ठेवा.' पण सत्य नाकारणाऱ्या

लोकांच्या योजना (शेवटी) निष्फळ ठरल्या.

26 फिरऔन म्हणाला, 'मला मूसाला ठार करू द्या (मी त्याला ठार करेन) आणि त्याने आपल्या पालनकर्त्याला (आपल्या मदतीसाठी) बोलवावे. मला या गोष्टीची भीती वाटते की, तो तुमचा धर्म बदलून टाकेल किंवा देशात सर्वत्र उत्पात माजवेल.' 27 (त्यावर) मूसाने म्हटले, 'जे खोटा अभिमान मिरवतात, आणि हिशेबाच्या दिवसावर विश्वास ठेवून नाहीत, त्या प्रत्येकापासून (स्वतःचे रक्षण व्हावे म्हणून,) माझा पालनकर्ता आणि तुझा पालनकर्ता असलेल्या (अल्लाहचे) शरण मी प्राप्त केले आहे.'

28 फिरऔनच्या लोकांपैकी एक माणूस जो श्रद्धावंत होता, पण त्याने आपण श्रद्धावंत असल्याचे दडवून ठेवले होते, म्हणाला, 'तुम्ही एका माणसाला केवळ याबद्दल ठार कराल? की, तो म्हणतो माझा पालनकर्ता अल्लाह आहे. आणि त्याने तुमच्या पालनकर्त्याकडून स्पष्ट प्रमाण देखील आणलेले आहेत. आणि जर का तो खोटारडा असेल तर खोटे बोलण्याचे दुष्परिणाम त्यालाच भोगावे लागतील. पण जर का तो सत्य बोलत असेल तर ज्या (शिक्षेबद्दल) तो तुम्हाला सावध करीत आहेत, त्यापैकी काही ना काही शिक्षेचे संकट तुमच्यावर अवश्य येईल.' कारण जो कोणी खोटे बोलणारा आणि मर्यादांचे उल्लंघन करणारा आहे, अल्लाह त्याला (कधीही) सन्मार्ग दाखवीत नाही. 29 (तो पुढे म्हणाला), 'माझ्या बांधवांनो! आज तुमचे राज्य आहे, म्हणून तुमचे या भूभागावर वर्चस्व आहे. पण अल्लाहच्या शिक्षेचे संकट जेव्हा आमच्यावर येईल तेव्हा (त्यापासून वाचवण्यासाठी) आम्हाला कोण साहाय्य करेल?' (आपल्याच जनसमूहातील एका माणसाचे हे भाषण ऐकून) फिरऔन म्हणाला, 'मी जे योग्य समजतो तेच मी तुम्हाला निदर्शनास आणून देत आहे. आणि मी तुम्हाला केवळ सरळ मार्गच दाखवत आहे.'

30 तो माणूस म्हणाला, ज्याने श्रद्धा धारण केलेली होती, 'माझ्या बांधवांनो! मला या गोष्टीची भीती वाटते की, तुमच्यावर आधीच्या लोकांप्रमाणे शिक्षेचा

दिवस येतो की काय? [31] जसा दिवस नूहच्या लोकांवर आणि आद व समूद (या जमातींवर) आणि त्यांच्यानंतरच्या लोकांवरही आला होता. आणि अल्लाह आपल्या दासांवर कोणत्याही प्रकारे अन्याय करू इच्छित नाही.'

[32] 'माझ्या बांधवांनो! (अल्लाहच्या प्रतिनिधीशी तुमची ही वागणूक पाहून) मला तर अशी भीती वाटते की, तुमच्यावर असा दिवस येतो की काय? जेव्हा तुम्ही आक्रोश करीत एकमेकांना मदतीसाठी बोलवाल, [33] ज्या दिवशी तुम्ही पाठ फिरवून पळत सुटाल. पण तेव्हा अल्लाहपासून तुम्हाला वाचवू शकेल, असा कोणीही असणार नाही. आणि ज्याला अल्लाह भटकण्यासाठी सोडून देतो, त्यास कोणीही मार्गदर्शक लाभू शकत नाही.'

[34] आणि (ती वेळ आठवा) जेव्हा यूसुफ (लोकांकडे) सत्याचे सर्व स्पष्ट प्रमाण घेऊन आला. तर (त्याचे समकालीन लोक) त्याने त्यांच्याकडे आणलेल्या संदेशावर शंका घेत राहिले, (पण) जेव्हा तो मृत्यू पावला, तेव्हा म्हणाले, 'अल्लाह (यूसुफनंतर) कदापि पैगंबर पाठविणार नाही.' अशाप्रकारे अल्लाह त्या लोकांना मार्गभ्रष्ट ठरवीत असतो, जे मर्यादांचे उल्लंघन करणारे आणि त्याच्या (संदेशांविषयी निराधार) शंका घेणारे आहेत. [35] जे लोक आपल्याकडे कोणतेही ज्ञान (वा अधिकारपूर्ण पुरावा) नसतानाही अल्लाहच्या संदेशाविषयी वाद निर्माण करतात. हे कृत्य अल्लाह आणि श्रद्धावंतांच्या दृष्टीने अतिशय वाईट आहे. अशाप्रकारे अल्लाह प्रत्येक उद्दाम व विद्रोही माणसाचे मन सीलबंद करून टाकतो.

[36] आणि फिरऔन (आपल्या वजिरास) म्हणाला, 'हे हामान, माझ्यासाठी एक उंच इमारत बनव ज्याद्वारे मला (वरपर्यंत) जाता येईल...... [37] वर आकाशापर्यंत, म्हणजे मी मूसाच्या ईश्वराला पाहू शकेन. कारण मी तर त्यास खोटे बोलणारा समजतो.' अशाप्रकारे फिरऔनला त्याची दुष्कृत्ये त्याच्या नजरेत चांगली भासवण्यात आली. आणि त्याला सत्याच्या मार्गापासून रोखण्यात

आले. आणि फिरऔनच्या योजना पूर्णपणे निष्फळ ठरल्या.

38 पण ज्या माणसाने श्रद्धा धारण केली होती, म्हणाला, ‘माझ्या बांधवांनो! तुम्ही माझे अनुसरण करा, मी तुम्हाला सचोटीचा मार्ग दाखवेन. 39 माझ्या बांधवांनो! हे जगातील जीवन केवळ चार दिवसाचे आहे, पण मृत्यूनंतरचे जग हे अनंतकालीन वास्तव्याचे ठिकाण आहे. 40 जो कोणी वाईट कृत्य करेल तर त्यास तसाच मोबदला मिळेल. याउलट जो कोणी चांगले कृत्य करेल, मग तो पुरुष असो वा स्त्री, पण जर श्रद्धावंत असेल तर अशाच लोकांना स्वर्गीय बागांत प्रवेश मिळेल. तेथे त्यांना अमर्याद उपजीविका प्राप्त होईल. 41 माझ्या बांधवांनो! ही किती विचित्र गोष्ट आहे की, मी तुम्हाला मुक्तीकडे (म्हणजेच स्वर्गाकडे) बोलावितो आणि तुम्ही मला (नरकाच्या) आगीकडे बोलावित आहात. 42 तुम्ही मला यासाठी बोलावत आहात की, मी (एकमेव उपासनेयोग्य) अल्लाहला नाकारून अशाला त्याचा समकक्ष ठरवावे, ज्याच्याविषयी मला अजिबात ज्ञान नाही. पण मी मात्र तुम्हाला सामर्थ्यवान व सदैव क्षमाशील अशा (अल्लाहकडे) बोलावत आहे. 43 यात मुळीच शंका नाही की, ज्या गोष्टीकडे येण्याचे मला तुम्ही आवाहन करता, ती गोष्ट या जगात किंवा यानंतरच्या जगातही यासाठी पात्र नाही की, तिच्याकडे येण्याचे आवाहन केले जावे. खरोखर, आम्हा सर्वांना अल्लाहकडेच परत जायचे आहे. आणि मर्यादांचे उल्लंघन करणारे लोक नरकाच्या आगीचे निवासी बनणार आहेत. 44 आज मी जे तुम्हाला सांगत आहे, याची तुम्ही लवकरच आठवण कराल. आणि मी तर माझी बाब अल्लाहकडे सुपूर्द करीत आहे. यात मुळीच शंका नाही की, अल्लाह सर्व भक्तांवर लक्ष ठेवून आहे.’

45 अशाप्रकारे अल्लाहने त्याला त्यांच्या वाईट योजनेपासून वाचविले. मग (शेवटी) फिरऔनच्या साथीदारांना दुःखदायक शिक्षेने वेढून टाकले. 46 (नरकाची) आग, जिच्यासमोर त्यांना सकाळ–संध्याकाळ उभे केले जाईल.

आणि त्या दिवशी जेव्हा (पुनरुत्थानाची) घटका येईल. (अल्लाह आज्ञा देईल,) 'फिरऔनच्या साथीदारांना अत्यंत कठोर शिक्षेच्या खाईत फेकून द्या.'

47 आणि जेव्हा नरकामध्ये ते आपसात झगडतील. तेव्हा जे दुर्बल लोक होते, ते त्या लोकांना म्हणतील, जे मोठेपणा मिरवीत असत, 'आम्ही तुमचे अनुयायी होतो. तर आज तुम्ही या आगीच्या शिक्षेतून आमची काही शिक्षा कमी करू शकता का?' 48 पण जे मोठेपणा मिरविणारे होते, ते उत्तर देतील, 'आता आपण सर्वजण यामध्येच आहोत. आणि अल्लाहने आपल्या भक्तांसंबंधाने आधीच (अंतिम) निर्णय दिलेला आहे.' 49 (मग) नरकवासी नरकाच्या रखवालदारांकडे (वळतील), म्हणतील, 'तुम्ही आपल्या पालनकर्त्याकडे (आमच्यासाठी) अशी विनवणी करा की, त्याने (निदान) एका दिवसासाठी तरी आमची शिक्षा शिथिल करावी.' 50 (त्यावर) ते म्हणतील, 'तुमचे पैगंबर तुमच्याकडे सत्याचे स्पष्ट प्रमाण घेऊन आले नव्हते का? ते उत्तर देतील, 'होय (अर्थातच).' तेव्हा ते रखवालदार म्हणतील, 'तर मग तुम्हीच (स्वत:) विनंती करा.' पण सत्य नाकारत (आयुष्य व्यतीत केलेल्या श्रद्धाहीनांची) विनंती निष्फळच ठरणार.

51 निश्चितच आम्ही आमच्या पैगंबरांची आणि श्रद्धावंतांची मदत करीत असतो या जगातही आणि त्या दिवशीही (त्यांची आम्ही मदत करू,) ज्या दिवशी साक्षीदार उभे केले जातील. 52 ज्या दिवशी अपराध्यांना त्यांच्या कोणत्याही सबबी प्रस्तुत करणे कामी येणार नाही. त्यांच्यावर (अल्लाहचा) प्रकोप असेल आणि राहण्यासाठी सर्वात वाईट ठिकाण मिळेल. 53 (अशाचप्रकारे) आम्ही आधी मूसाला मार्गदर्शन प्रदान केले होते आणि इस्राईलच्या मुलांना त्याचे वारस बनवले होते. 54 (ज्यात) बुद्धी असलेल्या लोकांसाठी मार्गदर्शन व उपदेश होते. 55 म्हणून (पैगंबर!) तुम्ही सहनशीलता बाळगा, कारण अल्लाहचे वचन खरे ठरणार आहे. तर आपल्या चुकांबद्दल (अल्लाहकडे) क्षमायाचना करा

आणि सकाळ–संध्याकाळ (प्रत्येक प्रसंगी) आपल्या पालनकर्त्याच्या असीम महतीचे गान करीत राहा.

56 जे लोक त्यांच्याकडे कोणतेही प्रमाण नसताना अल्लाहच्या संदेशांविषयी वाद निर्माण करतात. त्यांच्या मनात स्वत:चा मोठेपणा मिरविण्याची (अनुचित) इच्छा आहे, जी कधीही तृप्त होणार नाही. म्हणून (पैगंबर!) तुम्ही अल्लाहला शरण जा. तो सर्व काही ऐकणारा आणि सर्वसाक्षी आहे, यात मुळीच शंका नाही. 57 निश्चितच आकाश आणि पृथ्वी ची निर्मिती करणे, मानवाला निर्माण करण्यापेक्षा कितीतरी मोठे काम आहे. पण बहुसंख्य लोकांना (या वास्तवाची) जाण नाही. 58 तसेच आंधळा व डोळस दोघे सारखे असू शकत नाहीत. ना सत्कर्मे करणारा श्रद्धावंत आणि दुष्कृत्य करणारा (दोघे समान होऊ शकत नाहीत). तुम्ही लोक (चिंतनायोग्य गोष्टींवर) फारच कमी चिंतन करता! 59 ती शेवटची घटका येणार, यात मुळीच शंका नाही, पण अनेक लोक विश्वास ठेवून नाहीत.

60 (लोकांनो!) तुमच्या पालनकर्त्याने म्हटले आहे, ‘माझी प्रार्थना करा, मी तुमच्या प्रार्थनेला प्रतिसाद देईन. पण जे लोक माझ्या उपासनेविषयी अहंकार बाळगतात. ते अपमानित होऊन नरकात प्रवेश करतील.’ 61 (लोकांनो!) अल्लाहनेच तुमच्यासाठी रात्र निर्माण केली, यासाठी की, तुम्हाला विश्रांती घेता यावी. तसेच दिवस प्रकाशमान बनविले (म्हणजे तुम्हाला दिवसा काम करता यावे). खरोखर, अल्लाह हा लोकांसाठी फारच कृपाशील आहे. पण बहुसंख्य लोकांना (त्याची जाण नाही, आणि) ते आभारही व्यक्त करीत नाहीत. 62 असा आहे तुमचा पालनकर्ता अल्लाह, प्रत्येक गोष्टीचा निर्माता, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही. तर मग तुम्ही कुठे भरकटत जात आहात? 63 अशाप्रकारे जे अल्लाहच्या खुणा नाकारतात, तेच लोक बहकाविले जातात.

64 तो अल्लाह आहे, ज्याने पृथ्वीला तुमच्यासाठी विश्रांतीचे ठिकाण बनवले

आणि आकाशाला (तुमच्यावर) छत्र बनविले. तसेच त्याने तुम्हाला आकार दिला, सुरेख आकार. आणि त्याने तुमच्यासाठी जीवनोपयोगी चांगल्या वस्तू उपलब्ध केल्या. (हे सर्व करणारा) असा आहे अल्लाह – तुमचा पालनकर्ता. समृद्धशाली आहे अल्लाह, सर्व जगांचा पालनकर्ता. 65 तोच निरंतर जिवंत आहे. त्याच्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही. म्हणून (लोकांनो!) तुम्ही फक्त त्याचीच प्रार्थना करा, त्याच्याचप्रति पूर्ण समर्पणभाव बाळगून. सर्व स्तुती अल्लाहसाठीच आहे, जो पालनकर्ता आहे समस्त विश्वाचा.66 (पैगंबर! लोकांना) सांगा, 'माझ्याकडे माझ्या पालनकर्त्याकडून सत्याचे सर्व स्पष्ट प्रमाण आलेले आहेत. (आणि त्याद्वारे) मला त्यांची उपासना करण्यास (पूर्णपणे) मनाई केली गेली आहे, ज्यांचा तुम्ही अल्लाहला सोडून धावा करता. तसेच मला ही आज्ञा दिली गेली आहे की, मी स्वत:ला पूर्णपणे समस्त विश्वाचा पालनकर्ता असलेल्या अल्लाहच्या हवाली करावे.' 67 तोच आहे ज्याने (प्रथम) तुम्हाला मातीपासून, नंतर वीर्यापासून, मग पुढे, रक्ताच्या गुठळीपासून निर्माण केले. मग तो तुम्हाला अर्भकाच्या रूपात बाहेर काढतो. मग तो तुम्हाला वाढीस लावतो येथपर्यंत की, तुम्ही पूर्ण परिपक्वतेला पोहोचता. मग (तोच) पुढे तुम्हाला वृद्धावस्थेकडे घेऊन जातो. पण तुमच्यापैकी कोणी (यापूर्वीच) मृत्यू पावतो. (अशाप्रकारे तुम्ही सर्वजण) आपापली नियत अवधी गाठता. (विविध अवस्थेतून हा जीवनाचा प्रवास आणि मृत्युरूपी शेवट हे सर्व) यासाठी आहे की, तुम्ही यावर चिंतन करावे. 68 तोच आहे जो जीवन देतो व मृत्यू देतो. जेव्हा तो एखादी गोष्ट करण्याचा संकल्प करतो, तेव्हा तो केवळ तिला असे म्हणतो, 'हो', आणि 'ती होऊन जाते.'69 तुम्ही त्या लोकांच्या स्थितीचे अवलोकन करीत नाही का, जे अल्लाहच्या संदेशाविषयी वाद निर्माण करतात, ते बहकावून सत्यापासून कसे दूर नेले जातात? 70 त्यांनी या (ईश्वरीय) ग्रंथाला खोटे ठरविले, तसेच (त्या संदेशांनाही) ज्यासह आम्ही आमच्या (आधीच्या) पैगंबरांना पाठविले

होते. त्यांना (न्यायाच्या दिवशी) कळून चुकेल की, (ते किती आंधळे लोक होते)? [71] तेव्हा त्यांच्या मानेभोवती लोखंडी कडे आणि साखळदंड घातलेले असतील. मग (त्याद्वारे पाणी पाजण्यासाठी) त्यांना फरपटत नेले जाईल. [72] उकळत्या पाण्यातून (ते पितील), मग परत त्यांना आगीत (जळत राहण्यासाठी) फेकून दिले जाईल. [73] तेव्हा त्यांना असे विचारले जाईल, 'ते आता कुठे आहेत ज्यांना तुम्ही अल्लाहच्या बरोबरीचे स्थान देत होता, म्हणजे अल्लाहचे भागीदार?' [74] तेव्हा ते उत्तर देतील, 'एकतर आता ते आमच्यापासून नाहीसे झालेले आहेत किंवा असेही होऊ शकते की, आम्ही ज्यांचा धावा करीत राहिलो ते मुळात अस्तित्वातच नव्हते.' अशाप्रकारे अल्लाह सत्य नाकारणाऱ्यांना भटकण्यासाठी सोडून देतो. [75] ही त्या गोष्टीची शिक्षा आहे की, तुम्ही भूतलावर उगाच खोट्या गोष्टींत आनंद मानीत होता आणि फार ऐट मिरवीत होता. [76] आता नरकाच्या दरवाजांतून त्यात कायम राहण्यासाठी प्रवेश करा. खरोखर, किती वाईट ठिकाण आहे, गर्विष्ठ लोकांसाठी! [77] म्हणून (पैगंबर! तुम्ही) सहनशीलता बाळगा, नि:संदेह अल्लाहचे वचन खरे आहे. ज्या (शिक्षेचे) आम्ही (सत्य नाकारणाऱ्या लोकांना) वचन दिलेले आहे. त्याचा काही भाग आम्ही (तुमच्या जीवनातच) तुम्हाला दाखविला किंवा (त्यापूर्वीच) तुम्हाला मृत्यू दिला तरी (ही गोष्ट लक्षात ठेवायला हवी) की, सर्वांना शेवटी आमच्याकडेच परत आणले जाईल. [78] (पैगंबर!) आम्ही तुमच्यापूर्वीही अनेक पैगंबरांना पाठविले. त्यांच्यापैकी काहींचा उल्लेख आम्ही तुमच्यासमोर केलेला आहे. आणि काही असेही आहेत, ज्यांचा उल्लेख आम्ही तुमच्यासमोर (म्हणजे या कुराणात) केलेला नाही. कोणत्याही पैगंबरासाठी हे (कदापि शक्य) नव्हते की, अल्लाहच्या परवानगी शिवाय एखादी चमत्कारिक खूण आणून (लोकांपुढे सादर करावी, म्हणजे स्वत:हून निशाणी आणणे त्यांच्या अखत्यारीत नव्हते). मग जेव्हा अल्लाहचा आदेश आला तेव्हा सत्यासह (व न्यायासह) त्या बाबींचा निर्णय

करण्यात आला. तर जे लोक असत्यावर उभे होते, तिथेच आणि त्याचक्षणी
बरबाद होऊन गेले (काय होत आहे, त्यांना काही कळालेच नाही). 79 तो
अल्लाह आहे, ज्याने तुमच्यासाठी पशुधन निर्माण केले. तुम्ही त्यांच्यापैकी
काहींचा उपयोग करता (प्रवासात वगैरे) स्वार होण्यासाठी आणि काहींचा
खाण्यासाठी. 80 तसेच तुमच्यासाठी त्यांच्यामध्ये आणखी बरेच फायदे आहेत,
त्यांच्यावर स्वार होऊन, तुम्ही आपल्याला जिथे जायचे आहे, तिथे पोहोचू
शकता. त्यांच्याद्वारे तुम्ही (जमीनीवर) वाहून नेले जाता,ज्याप्रमाणे नौकेद्वारे
(समुद्रात). 81 अशाप्रकारे तो तुम्हाला आपल्या (सामर्थ्याच्या व कृपेच्या
अगणित) खुणा दाखवीत असतो. तर तुम्ही अल्लाहच्या कोणकोणत्या खुणा
नाकाराल? 82 या लोकांनी भूतलावर संचार केला नाही का? (केला असता
तर) त्यांना पाहता आले असते की, आधीच्या (सत्य नाकारणाऱ्या) लोकांचा
शेवट कसा झाला? ते संख्येच्या व बळाच्या दृष्टीने आणि जो प्रभाव त्यांनी
आपल्या मागे सोडला, त्या दृष्टीनेही ते यांच्यापेक्षा वरचढ होते. पण त्यांनी जी–
जी कमाई केली, ती त्यांच्या अजिबात कामी आली नाही. 83 जेव्हा त्यांचे
पैगंबर त्यांच्याकडे सत्याचे सर्व स्पष्ट प्रमाण घेऊन आले तर त्यांच्याकडे
आधीपासून (वाड–वडिलांकडून) मिळालेले जे ज्ञान (व वैभव) होते त्यातच ते
रमलेले होते. (पण शेवटी) ज्या शिक्षेची ते खिल्ली उडवीत राहिले त्या शिक्षेने
त्यांना वेढून टाकले. 84 पण जेव्हा त्यांनी आमची शिक्षा (येताना) पाहिली,
तेव्हा ते म्हणू लागले, 'आम्ही अल्लाहवर श्रद्धा धारण करतो आहोत, जो एकमेव
ईश्वर आहे. आणि आम्ही ज्यांना त्याचे समकक्ष ठरवीत राहिलो, आम्ही त्यांना
नाकारत आहोत.' 85 पण आमची शिक्षा पाहून त्यांनी धारण केलेली श्रद्धा
त्यांच्या काहीही कामी येऊ शकली नाही. हाच अल्लाहचा नियम आहे. जो
आपल्या निर्मितीच्या बाबतीत त्याने नेहमी लागू केलेला आहे. आणि अशाप्रकारे
ज्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला होता, ते सर्व नाश पावणारे बनले.

# सूरह–४१. हा० मीम० अस–सजदा

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] हा० मीम० [2] हा (ग्रंथ) कृपावंत व फार दयाळू असलेल्या (अल्लाहकडून) प्रकट करण्यात आलेला आहे. [3] अरबी भाषेतील हे कुराण, असा ग्रंथ आहे, ज्याची संदेशवचने बुद्धी लाभलेल्या लोकांसाठी विस्ताराने स्पष्ट करून सांगितलेली आहेत. [4] (श्रद्धावंतांना) शुभवार्ता देणारा आणि (सत्य नाकारणाऱ्यांना) सावधानतेचा इशारा देणारा. (जेव्हा लोकांना हा संदेशग्रंथ ऐकविला जातो,) तेव्हा त्यांच्यापैकी बहुसंख्य यापासून पाठ फिरवीत असतात आणि ते यास ऐकतच नाहीत. [5] ते म्हणतात, ‘ज्याकडे तू आम्हाला बोलावीत आहेस, त्याबाबतीत आमच्या अंत:करणांवर पडदा पडलेला आहे (म्हणजे ती गोष्ट आमच्या मनांना मुळात पटतच नाही). तसेच आमच्या कानात जडपणा आहे (तुझे म्हणणे ऐकण्यासाठी). तसेच आमच्या व तुझ्यामध्ये एका प्रकारचा पडदा आहे तर तू आपले काम कर आणि आम्ही आमचे काम करू.’

[6] (पैगंबर!) त्यांना सांगा, ‘ मी तर तुमच्याप्रमाणेच एक माणूस आहे. पण माझ्याकडे हा (ईश्वरीय) संदेश आलेला आहे की, तुमचा ईश्वर केवळ एकच ईश्वर आहे, म्हणून (विचलित न होता) त्याच्याकडेच जाणाऱ्या मार्गाचा अवलंब करा आणि त्याच्याकडे क्षमायाचना करीत राहा.’ (आणि लक्षात ठेवा), अनेकेश्वरवादी लोक निश्चितपणे नाश पावणारे आहेत. [7] जे ज़कात देत नाहीत आणि जे मृत्यूनंतरच्या जीवनावर विश्वास ठेवणारे नाहीत. [8] (पण) जे लोक श्रद्धा धारण करून सत्कर्मे करतात, त्यांना असा मोबदला मिळेल जो कधीही संपुष्टात येणार नाही.

[9] (पैगंबर!) त्यांना विचारा, ‘तुम्ही त्या (सामर्थ्यशाली अल्लाहला) नाकारत आहात का, ज्याने पृथ्वीला दोन दिवसांत निर्माण केले. आणि तुम्ही त्याचे

सहभागी ठरविता?' तोच समस्त सृष्टीचा (मालक व) पालक आहे. 10 त्यानेच (पृथ्वी निर्माण केल्यानंतर) भूतलावर भक्कम असे पर्वत स्थापित केले. आणि तिच्यामध्ये सर्व प्रकारची संपन्नता ठेवून दिली. आणि त्यावरील निर्वाहसामग्रीची आखणी केली, चार दिवसांत (म्हणजे चार अवधीत) मग सर्व गोष्टींना उचित प्रमाण घालून दिले, (ही माहिती आहे,) त्यांच्यासाठी जे या संबंधाने विचारतात. 11 मग तो आकाशाकडे वळला, तेव्हा ते एका प्रकारच्या धुरासारखे होते, त्याने आकाश आणि पृथ्वी यांना म्हटले, 'तुम्ही दोघे या, (आमच्या नियमांचे पालन करण्यासाठी) स्वेच्छेने किंवा अनिच्छेने.' ते दोघे म्हणाले, 'आम्ही (तुझ्या नियमांचे पालन करण्यासाठी) स्वेच्छेने हजर आहोत.' 12 त्यानंतर दोन दिवसांत, त्याने सात आकाश निर्माण केलेत आणि प्रत्येक आकाशाकडे त्यांच्या कार्यासंबंधाने आपला आदेश प्रकट केला. आणि आम्ही पृथ्वीसाठी सर्वात जवळ असलेल्या आकाशाला (ताऱ्यांचे) दिवे लावून सुशोभित केले. आणि त्याच्या सुरक्षिततेची व्यवस्था केली. हे सर्व काही सर्वशक्तिमान आणि सर्वज्ञ अशा (अल्लाहच्या) योजनेप्रमाणे (कार्यान्वित) झाले.

13 पण जर ते (यावरही) पाठ फिरवतील तर (पैगंबर!) त्यांना सांगा, 'मी तुम्हाला तशाच अचानक चालून येणाऱ्या शिक्षेपासून सावध करतो, जशी शिक्षेची आपत्ती आद आणि समूद (या जमातींवर) आली होती.' 14 जेव्हा त्यांच्याकडे पैगंबर आले, त्यांच्या पुढून व त्यांच्या मागून (म्हणजे अनेक पैगंबर आले). (या संदेशासह की,) तुम्ही अल्लाहशिवाय कोणाचीही उपासना करू नका. (त्यावर) ते म्हणाले, 'जर आमच्या पालनकर्त्याला (आमच्याकडे) पाठवायचे असते तर त्याने अवश्य स्वर्गदूतांना पाठवले असते. म्हणून आम्ही तुमच्याकडे जे पाठवण्यात आलेले आहे, ते मान्य करण्यास तयार नाही.'

15 आद या जमातीने तर कोणत्याही न्याय्य आधाराशिवाय भूतलावर अहंकारपूर्वक वर्तन केले. ते म्हणाले, 'कुवतीच्या बाबतीत आमच्यापेक्षा अधिक

कुवत असलेला कोण आहे?' त्यांना या गोष्टीची कधी जाणीव झाली नाही का की, तो अल्लाह ज्याने त्यांना निर्माण केले, तो आहे त्यांच्यापेक्षा अधिक कुवत बाळगणारा. पण ते आमच्या संदेशांना नाकारतच राहिले. 16 म्हणून (शेवटी) आम्ही त्यांच्या दुर्भाग्याच्या दिवसांत त्यांच्यावर जोरदार वादळ सोडले. ते यासाठी की, या जगातील जीवनात(ही) त्यांना अपमानास्पद शिक्षेची चव चाखायला लावावी. आणि मृत्यूनंतरच्या जीवनातील शिक्षा तर याहूनही अधिक अपमानास्पद आहे. आणि त्यांना कोणाचेही साहाय्य लाभणार नाही. 17 तसेच समूद या जमातीलाही आम्ही सन्मार्ग दाखवला. पण त्यांनी सन्मार्गाऐवजी (जाणूनबुजून) आंधळ्या अवस्थेत राहणेच पसंत केले. तर शेवटी त्यांच्या दुष्कृत्यांपोटी ते अचानक चालून येणाऱ्या अपमानजनक शिक्षेने वेढले गेले. 18 पण त्या लोकांना आम्ही वाचविले, ज्यांनी श्रद्धा धारण केली होती व ते (आमची) जाण ठेवून (जीवन जगणारे होते).

19 आणि ज्या दिवशी अल्लाहच्या शत्रूंना (नरकाच्या) आगीसमोर एकत्र करण्यात येईल. तिथे त्यांचे वेगवेगळे गट पाडण्यात येतील. 20 आणि जेव्हा ते त्या आगीजवळ पोहोचतील, तेव्हा त्यांचे कान, त्यांचे डोळे आणि त्यांच्या त्वचा त्यांच्याच विरुद्ध, त्यांच्या वाईट कृत्यांसंबधांने साक्ष देऊ लागतील. 21 आणि ते आपल्या त्वचांना म्हणतील, 'तुम्ही आमच्याविरुद्ध साक्ष का (व कशी) दिली?' (त्यावर) त्या त्वचा उत्तर देतील, 'तो 'अल्लाह' जो सर्वांना बोलते करतो, त्यानेच आम्हालाही बोलते केलेले आहे. त्यानेच तुम्हाला पहिल्या वेळेस निर्माण केले होते आणि (आता) तुम्हाला त्याच्याकडे परत आणण्यात आलेले आहे.' 22 (दुष्कृत्य करताना) तुम्ही आपले कान, डोळे आणि त्वचा यांना साक्ष बनण्यापासून रोखू शकत नव्हता (तसेच) ते आपल्याच विरुद्ध साक्ष देतील (असेही तुम्हाला कधी वाटलेही नाही), याउलट तुम्हाला तर असेच वाटत होते की, तुम्ही जे काही करता त्यांपैकी बऱ्याच गोष्टी तर

अल्लाहलाही माहीत नाहीत. 23 आणि आपल्या पालनकर्त्याविषयी, जे विचार तुम्ही बाळगून होता. त्यांनीच हा नाश तुमच्यावर आणला आहे. आणि आता तुम्ही (कायमस्वरूपी) बरबाद झालेले आहात. 24 आता त्यांनी सहन केले काय (आणि न केले काय), (नरकाची) आग हेच त्यांचे वास्तव्याचे ठिकाण आहे. आणि जर त्यांनी स्वत:मध्ये सुधारणा करण्यासाठी संधी मागितली तर अशी संधी आता त्यांना मिळणार नाही.

25 आणि आम्ही त्या (अश्रद्ध) लोकांवर असे (दुष्ट) साथीदार नियुक्त केले होते की, ज्यांनी त्यांच्या मागच्या-पुढच्या (दुष्)कृत्यांना चांगली (कृत्ये) असल्याचे त्यांना भासविले. तर शेवटी त्यांच्यावर (शिक्षेचा) तोच नियम लागू झाला, जो यांच्यापूर्वीच्या मानव आणि जिन्नपैकी (अपराधी जमातींवर) लागू झाला होता. खरोखर, ते नाश पावणारे (लोक) होते.

26 सत्य नाकारणारे लोक (आपसात) म्हणतात, 'हे कुराण ऐकू नका, (आणि जेव्हा ऐकविले जाते) तेव्हा गोंधळ घाला, (असे करून) तुमचेच वर्चस्व कायम राहील.' 27 पण आम्ही सत्य नाकारण्यावर आग्रही असलेल्या लोकांना, निश्चितपणे कठोर शिक्षेची चव चाखायला लावणारच. आणि जी वाईटात वाईट कृत्ये त्यांनी केली, त्यानुसारच आम्ही त्यांना मोबदला देऊ. 28 अल्लाहच्या शत्रूंचा मोबदला (नरकाची) आग आहे. त्यांचे कायमस्वरूपी वास्तव्याचे ठिकाण — हा आहे मोबदला आमचे संदेश नाकारण्याचे (पाप) कृत्य केल्याबद्दल.

29 जे सत्य नाकारणाऱ्यांपैकी होते, ते म्हणतील, 'हे आमच्या पालनकर्त्या! जिन्न आणि माणसांपैकी त्या लोकांना आम्हाला दाखव, ज्यांनी आम्हाला बहकावून (विनाशाच्या) मार्गी लावले की, आम्ही त्यांना आमच्या पायाखाली तुडवू, म्हणजे ते (सर्वांसमोर) अपमानित होतील.' 30 (पण) जे लोक म्हणतात, 'आमचा पालनकर्ता अल्लाह आहे' आणि याच श्रद्धेवर (आयुष्यभर) अढळ

राहतात, अशा लोकांवर स्वर्गदूत अवतीर्ण होत असतात आणि त्यांना म्हणतात, 'तुम्ही भयभीत होऊ नका व दु:खीही होऊ नका, (तुमच्यासाठी) स्वर्गाची शुभवार्ता आहे, ज्याचे तुम्हाला वचन देण्यात आलेले आहे, तर तुम्ही खूश व्हा.' 31 आम्ही या जगातील जीवनात आणि यानंतरच्या जगातील जीवनातही तुमचे मित्र आहोत. तुमच्यासाठी तिथे ते सर्व काही आहे, ज्याची तुम्ही इच्छा कराल आणि तुम्हाला तिथे सर्व काही मिळेल, जे तुम्ही मागाल. 32 (त्या) फार क्षमाशील व कृपावंत असलेल्या अल्लाहकडून (तुमचा) पाहुणचार असेल.
33 तर त्याच्यापेक्षा कोणाची वाणी अधिक चांगली असू शकेल, जो लोकांना अल्लाहकडे बोलावतो आणि सत्कर्मे करतो व म्हणतो, 'मी त्या लोकांपैकी आहे, जे अल्लाहला समर्पित झालेले आहेत.' 34 चांगली आणि वाईट कृत्ये (परिणामाच्या दृष्टीने) समान होऊ शकत नाहीत. तुम्ही (वाईट गोष्टीचे) उत्तर अधिक चांगल्या (गोष्टीने द्या), तेव्हा तुम्हाला आढळेल की, जो आधी तुमचा शत्रू होता, तो तुमचा फारच जिवलग मित्र बनलेला आहे.

35 पण अशी सद्बुद्धी केवळ सहनशीलता बाळगणाऱ्यांनाच लाभते. हे गुण त्यालाच दिले जाते, जो खरोखर भाग्यवान आहे. 36 आणि सैतानाने तुमच्या मनात वाईट प्रेरणा घातली तर (ते ओळखून लगेच) अल्लाहला शरण जा, खरोखर तो सर्व काही ऐकणारा व सर्व काही जाणणारा आहे.

37 त्याच्या (सामर्थ्याच्या) खुणांपैकी आहेत रात्र व दिवस आणि सूर्य व चंद्र. तुम्ही सूर्य व चंद्र यांच्यापुढे नतमस्तक होऊ नका तर त्या अल्लाहसमोर नतमस्तक व्हा, ज्याने या सर्वांना निर्माण केले आहे. जर तुम्ही त्याचे सच्चे उपासक असाल तर..... 38 पण जर हा (संदेश झुगारून), ते अहंकाराचेच प्रदर्शन करतील तर (त्यांनी लक्षात ठेवावे, अल्लाह त्यांच्या उपासनेचा गरजवंत नाही) अल्लाहच्या सान्निध्यात असलेले (असंख्य स्वर्गदूत) रात्रंदिवस त्याचे स्तुतिगान करीत असतात आणि या गोष्टीचा त्यांना कधीही थकवा जाणवत

नाही.

39 त्याच्या (सामर्थ्याच्या) खुणांपैकी हे आहे की, तुम्ही जमीन कोरडी आणि ओसाड असल्याचे पाहता, मग आम्ही तिच्यावर पाण्याचा वर्षाव करतो, ती सचेत होते आणि (हिरवळीने) फुलू लागते. निश्चितच ज्याने तिला सचेत केले, तोच मृतांनाही जिवंत करेल. कारण तो सर्व काही करण्यास समर्थ आहे.
40 जे लोक आमच्या संदेशांच्या अर्थाचा विपर्यास करतात, ते आमच्यापासून लपलेले नाहीत. तेव्हा ज्याला नरकाच्या आगीत टाकण्यात येईल, तो माणूस चांगला की, जो पुनरुत्थानाच्या दिवशी निर्भय व शांती लाभलेल्या अवस्थेत येईल तो? तेव्हा तुम्हाला जे करायचे ते करा. तुम्ही जे काही करता, ते सर्व तो निश्चितपणे पाहत असतो.

41 जे लोक ह्या बोधग्रंथ असलेल्या (कुराणावर) अविश्वास दर्शवितात, जेव्हा तो त्यांच्याकडे येतो (तेच निश्चितपणे अपयश प्राप्त करणारे लोक आहेत). खरोखर, हा फार उदात्त असा ग्रंथ आहे.
42 याच्या जवळपास असत्य फिरकू शकत नाही, ना पुढून, ना मागून (म्हणजे यात असत्याची भेसळ होणे शक्यच नाही, ना उघडपणे, ना गुप्तरित्या). कारण हा ग्रंथ त्याच्याकडून प्रकट करण्यात आलेला आहे, जो अस्सल बुद्धिमान आहे, सदैव स्तुतीस पात्र आहे.
43 (पैगंबर!) तुम्हालाही त्याच गोष्टी सांगितल्या जात आहेत, ज्या तुमच्या पूर्वीच्या पैगंबरांना सांगितल्या गेल्या होत्या. खरोखर, तुमचा पालनकर्ता फार क्षमाशील आहे आणि कठोर शिक्षा करणारा देखील आहे.

44 जर आम्ही या कुराणास अरबीव्यतिरिक्त इतर भाषेत अवतरित केले असते. तर ते (मक्कावासी) असे म्हणाले असते की, यातील संदेश (आमच्या भाषेत आम्हाला समजेल) अशा रीतीने स्पष्ट करून का सांगितलेले नाहीत? अरबी पैगंबर आणि बिगर अरबी ग्रंथ (हा काय प्रकार)? (पैगंबर!) त्यांना सांगा, 'श्रद्धा धारण करणाऱ्यांसाठी हा ग्रंथ म्हणजे मार्गदर्शन आणि (आत्मिक

रोगांचा) इलाज आहे. आणि श्रद्धाहीनांसाठी कानांत बधीरता आणि डोळ्यांत आंधळेपणा असल्याप्रमाणे आहे. ते असे आहेत की, जणू काही दूरच्या ठिकाणाहून ओरडून त्यांना काही सांगितले जात आहे.

45 आणि आम्ही मूसालाही ग्रंथ प्रदान केला होता, पण त्यासंबंधाने नंतर मतभेद निर्माण झाले. जर तुमच्या पालनकर्त्याकडून (पुनरुत्थानाच्या दिवशी निर्णय करण्याचे आधीपासून) ठरलेले नसते तर त्यांच्यादरम्यान (त्याचक्षणी) निर्णय केला गेला असता. तसेच हे लोक या संबंधानेही गोंधळून सोडणाऱ्या शंकेत सापडलेले आहेत. 46 जो कोणी चांगली कृत्ये करेल तर स्वत:च्याच भल्यासाठी करेल, तसेच जो कोणी वाईट कृत्ये करेल तर त्याचे दुष्परिणाम त्यालाच भोगावे लागतील. अल्लाह आपल्या दासांवर कदापि अन्याय करीत नाही.

47 (न्यायाची) घटका (केव्हा येणार) याचे ज्ञान केवळ अल्लाहलाच आहे. कोणतेही फळ आपल्या गाभ्यातून बाहेर निघत नाही, तसेच कोणत्याही स्त्रीला गर्भ राहत नाही, ना तिची प्रसूती होते, पण हे त्याच्या ज्ञानाने (व संकल्पाने) होते. त्या दिवशी अल्लाह त्यांना विचारेल, आज ते कुठे आहेत, ज्यांना तुम्ही माझ्या (ईश्वरत्वात) सहभागी ठरवीत होता. ते उत्तर देतील, ‘(हे अल्लाह!) आम्ही तुझ्यासमोर हे कबूल करतो की, आमच्यापैकी कोणीही याची साक्ष देत नाही.’ 48 पूर्वी ज्यांचा ते धावा करीत होते, ते (सर्व खोटे उपास्य) तेव्हा नाहीसे झालेले असतील. आणि त्यांना अशी खात्री पटेल की, आता त्यांच्यासाठी सुटकेचा कोणताही मार्ग नाही.

49 माणसाला चांगल्या गोष्टी मागण्यासाठी कधीही कंटाळा येत नाही. पण जर त्याच्याबाबतीत काही वाईट गोष्ट घडल्यास अगदीच हताश व निराश होतो. 50 आणि जेव्हा आम्ही (मनुष्याला) त्याला पोचलेल्या दु:खानंतर आमच्या कृपेची गोडी चाखवितो, तेव्हा तो म्हणतो, ‘(हे जे मला मिळते) तो तर माझाच

हक्क आहे? आणि मला नाही वाटत की, ती घटका (म्हणजे न्यायाचा दिवस) कधी येईल. आणि जर मला माझ्या पालनकर्त्याकडे परत जावेच लागले तर तो मला निश्चितपणे चांगलाच मोबदला देईल.' पण आम्ही त्या श्रद्धाहीन लोकांना त्यांच्या सर्व (दुष्)कृत्यांचे त्यांना अवश्य दर्शन घडवू. आणि त्यांना कठोर शिक्षा भोगायला लावू.

51 जेव्हा आम्ही मनुष्यावर कृपा करतो तर तो आमच्याकडे पाठ फिरवितो, आणि (आमच्या स्मरणापासून) दूर जातो. पण जेव्हा त्याला दु:ख पोचते, तेव्हा तो आमच्याकडे लांबलचक विनवण्या करू लागतो. 52 त्यांना सांगा, 'या गोष्टीचा तुम्ही कधी विचार केला आहात का? की, हे कुराण नि:संदेह अल्लाहकडून आलेले आहे, तरी देखील तुम्ही हे सत्य नाकारता, तर त्यापेक्षा अधिक वाट चुकलेला दुसरा कोण असेल, जो (सत्याचा) विरोध करण्याच्या बाबतीत फार पुढे निघून गेलेला असेल?' 53 आम्ही लवकरच त्यांना आमच्या (संदेशसूचक) खुणा दाखवू, बाह्य जगातही आणि खुद्द त्यांच्यामध्येही, जोपर्यंत त्यांच्यावर हे उघड होत नाही की, हे कुराण (अल्लाहकडून आलेले) सत्य आहे.आणि ही गोष्ट पुरेशी नाही का की, तुझा पालनकर्ता प्रत्येक गोष्टीवर (स्वत:) साक्ष आहे? 54 पण हे लोक आपल्या पालनकर्त्याशी होणाऱ्या भेटीसंबंधाने साशंक आहेत. (लक्षात ठेवा) त्याने प्रत्येक गोष्टीला वेढून ठेवलेले आहे.

# सूरह-४२. अश-शूरा

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 हा० मीम० 2 अइन० सीन० क़ाफ़० 3 अशाप्रकारे अल्लाह जो सर्वशक्तिमान आणि बुद्धिमान आहे तुमच्याकडे (आपला) संदेश पाठवीत आहे (जसे) तुमच्या पूर्वीच्या (पैगंबराकडे) पाठविला होता. 4 जे काही आकाशात व पृथ्वीवर आहे सर्व त्याचेच आहे. तोच सर्वोच्च आहे, महिमावान आहे. 5 त्याच्या भयाने आकाश वरून फाटून कोसळले (तर यात आश्चर्यकारक असे काही नाही).

आणि स्वर्गदूत (सदैव) आपल्या पालनकर्त्याचे स्तुतिगान करीत असतात. पृथ्वीवर असलेल्या लोकांसाठी (अल्लाहकडे) क्षमायाचना करीत असतात. हे नीट समजून घ्या की, अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे. 6 आणि जे लोक त्याला सोडून इतरांना आपले रक्षणकर्ते मानतात, त्यांच्यावर अल्लाह लक्ष ठेवून आहे. त्यांच्या या आचरणास (पैगंबर!) तुम्हाला जबाबदार धरले जाणार नाही.

7 अशाप्रकारे आम्ही तुमच्याकडे अरबी भाषेत असलेले हे कुराण यासाठी प्रकट केले आहे की, तुम्ही सर्व वस्त्यांचे केंद्र बनलेल्या मक्का येथील लोकांना आणि त्याच्या आसपास (सर्वत्र) वसलेल्या लोकांना याद्वारे सावध करावे. तसेच त्यांना त्या दिवसाबद्दलही सचेत करा ज्या दिवशी (संपूर्ण मानवजात) एकत्र आणली जाईल. आणि ज्याच्या येण्याविषयी मुळीच शंका नाही. एक समूह स्वर्गात असेल आणि एक समूह (नरकाच्या) आगीत.

8 अल्लाहने इच्छिले असते तर (संपूर्ण मानवजातीस) एकच जमात (एकच मार्ग अनुसरणारे) बनवून टाकले असते. पण तो इच्छितो त्यास आपल्या कृपाछत्राखाली जागा देतो आणि अत्याचारी लोकांचा ना कोणी रक्षणकर्ता आहे, ना साहाय्यकर्ता. 9 त्यांना असे (वाटते की काय) की, त्याला सोडून इतरांनाही रक्षणकर्ता बनवता येते? पण (जे-जे अस्तित्वात आहे) त्या सर्वांचा एकमेव रक्षणकर्ता फक्त अल्लाह आहे. तोच मेलेल्यांना जिवंत करतो. काहीही करण्याचे सामर्थ्य केवळ त्याच्याकडेच आहे. 10 (श्रद्धावंतांनो!) ज्या कोणत्या बाबतीत तुमचे मतभेद असतील, त्यावर फैसला देण्याचा अखत्यार केवळ अल्लाहकडे आहे. (पैगंबर! त्यांना सांगा), 'असा आहे तो अल्लाह, माझा पालनकर्ता, त्याच्यावरच मी विश्वास ठेवतो. आणि मी त्याच्याचप्रति सदैव समर्पित आहे.'

11 तो आकाश आणि पृथ्वी यांचा निर्माता आहे. त्याने तुमच्यासाठी तुमच्याच जातीचे जोडीदार बनवले. तसेच (इतर) प्राण्यांच्याही जोड्या बनविल्या,

ज्याद्वारे तो तुमची कित्येक पटीने वाढ करीत असतो. (तो असा महान आहे की), त्याची तुलना कशाशीच होऊ शकत नाही. तो सर्व काही ऐकणारा आणि सर्व काही पाहणारा आहे. 12 आकाश आणि पृथ्वी यांचे संपूर्ण नियंत्रण त्याच्याच हाती आहे. तो इच्छितो त्यास उपजीविकेची साधने मोठ्या प्रमाणात आणि इच्छितो त्यास कमी प्रमाणात प्रदान करतो. त्याला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे, यात मुळीच शंका नाही. 13 अल्लाहने तुमच्यासाठीही तोच धर्म (म्हणजे अल्लाहला समर्पित होण्याचा धर्म,) आवश्यक ठरविलेला आहे, ज्याचा आदेश त्याने (तुमच्या फार पूर्वी पैगंबर) नूहला दिला होता. आणि तोच (धर्म) आम्ही आता तुमच्याकडेही प्रकट केलेला आहे. आणि त्याच धर्माला अवलंबिण्याचा आदेश आम्ही इब्राहीम, मूसा व ईसा (येशू) या सर्वांनाही दिला होता की, धर्मपालनाच्या बाबतीत अढळ राहा आणि त्यासंबंधाने मतभेद निर्माण करू नका. (पैगंबर!) अनेकेश्वरवाद्यांना ज्या (श्रद्धे)कडे तुम्ही बोलावीत आहात, ती त्यांना फार अप्रिय वाटते. अल्लाह इच्छितो त्यास आपल्याकडे जवळ करतो. आणि तो आपल्याकडे येण्याचा मार्ग त्याला दाखवतो, जो त्याच्याकडे वळतो.

14 आणि ज्या लोकांनी (मतभेदाला कारण बनवून) वेगवेगळ्या मार्गांचा अवलंब केला, तो त्यांच्याकडे (सत्याचे) ज्ञान पोचल्यानंतरच केला, आणि केवळ परस्पर हट्टापायी. आणि (त्याने) निर्धारित केलेल्या अवधीपर्यंत (सर्व निर्णय तहकूब केले गेलेले) नसते तर त्यांच्याविषयी ताबडतोब फैसला सुनावण्यात आला असता. आणि जे लोक त्यांच्यानंतर ग्रंथाचे वारस बनले, ते इतक्या वाईटरित्या संशयात पडलेले आहेत की, त्याने त्यांना अस्वस्थ करून सोडलेले आहे.

15 (पैगंबर!) तुम्ही (लोकांना) याच (सत्यधर्माकडे) येण्याचे आवाहन करीत राहा. आणि त्यावर स्वतः अढळ राहा, ज्याप्रमाणे तुम्हाला अढळ राहण्याचा आदेश देण्यात आलेला आहे. आणि त्यांच्या इच्छा-आकांक्षांचे

अनुसरण करू नका. आणि (त्यांना) सांगून टाका की, मी अल्लाहने प्रकट केलेल्या ग्रंथावर विश्वास ठेवणारा आहे. आणि मला तुमच्यादरम्यान न्यायपूर्वक निवाडा करण्याची आज्ञा देण्यात आलेली आहे. अल्लाह हा आमचा पालनकर्ता आहे आणि तुमचाही पालनकर्ता आहे. आम्ही जे करतो, त्यासाठी आम्हाला जाब द्यावा लागणार आणि तुम्ही जे काही करता, त्यासाठी तुम्हाला जाब द्यावा लागेल. आमच्या आणि तुमच्या दरम्यान कोणतेही भांडण नाही (म्हणजे आपण भांडण करण्याची गरजच नाही). अल्लाह आम्हा सर्वांना एकत्र करणार आहे. आणि त्याच्याकडेच परत जायचे आहे. 16 आणि जे अल्लाहविषयी वादविवाद करतात, जेव्हा की, (त्यांच्याकडून आधी) त्याचा स्वीकार केला गेलेला आहे. त्यांच्या वादविवादाला अल्लाहच्या नजरेत काहीच महत्त्व नाही. आणि त्यांच्यावर त्याचा कोप होईल आणि त्यांच्यासाठी कठोर शिक्षा आहे.

17 अल्लाहनेच सत्यासह ग्रंथ प्रकट केला आहे आणि न्यायाचा तराजू देखील. तुम्हाला काय माहीत, ती शेवटची घटका जवळ येऊन ठेपलेलीही असेल? 18 जे लोक त्यावर विश्वास ठेवत नाहीत, ते (तिची खिल्ली उडवत), ती लवकर यावी, अशी इच्छा ते व्यक्त करतात, पण जे विश्वास ठेवणारे आहेत, तिचे भय बाळगतात आणि ते जाणून आहेत की, तिचे आगमन अगदी सत्य आहे (अटळ आहे). लक्षात ठेवा! जे लोक त्या घटकेविषयी वादविवाद करतात, ते चुकीच्या मार्गाने फार दूर निघून गेलेले आहेत.

19 अल्लाह आपल्या दासांच्या बाबतीत फार कनवाळू आहे. तो ज्याला, जी काही उपजीविका देऊ इच्छितो, देतो. तो एकमेव असा आहे शक्तिशाली आहे, सामर्थ्यवान आहे. 20 जो कोणी मृत्यूनंतरच्या जीवनात (आपल्या कर्मरूपी बियांचे) पीक चांगले यावे या अभिलाषेसह (त्यासाठी प्रयत्न करीत असतो). आम्ही त्याच्या त्या पिकात वाढ करीत असतो. आणि जो कोणी याच (क्षणभंगुर) जगातील पिकाची अभिलाषा बाळगून असतो. तर आम्ही त्यास त्यामधून काही

देऊन टाकतो. पण मृत्यूनंतरच्या (अनंतकालीन) जीवनाच्या (कृपाप्रसादांत) त्याचा काहीही हिस्सा असणार नाही.

21 ज्यांना या लोकांनी अल्लाहचे सहभागी ठरविलेले आहे, (त्या उपास्यांनी) यांच्यासाठी असा धर्म नेमून दिला आहे की काय, ज्याची अल्लाहने कुठल्याही प्रकारची परवानगी दिलेली नाही.आणि अंतिम निर्णय (पुनरुत्थानाच्या दिवशी होईल) असे ठरलेले नसते तर त्यांच्याविषयी (केव्हाच) निर्णय सुनावण्यात आला असता. अत्याचारी लोकांना कठोर शिक्षा निश्चितपणे होणार. 22 (न्यायाच्या दिवशी) तुम्ही पाहाल की, अत्याचारी लोक (या विचाराने) भयभीत असतील की, ते कसली कमाई करून बसले! कारण त्याचे दुष्परिणाम भोगण्यापासून त्यांची सुटका अशक्य असेल. याउलट ज्या लोकांनी श्रद्धा धारण करून सत्कर्मे केलेली असतील, (त्यांना तुम्ही) स्वर्गाच्या बागांमध्ये असल्याचे (पाहाल). त्यांच्यासाठी त्यांच्या पालनकर्त्याकडे ते सर्व काही असेल, जे ते इच्छितील. हेच (अल्लाहचे) सर्वात मोठे वरदान आहे. 23 हीच ती गोष्ट आहे, ज्याची शुभवार्ता अल्लाह आपल्या त्या दासांना देतो आहे, ज्यांनी श्रद्धा धारण करून सत्कर्मे केली. (पैगंबर!) त्यांना सांगा, ‘मी या (संदेश पोचविण्याच्या कार्या)बद्दल तुमच्याकडे कोणताही (भौतिक स्वरूपाचा) मोबदला मागत नाही. पण फक्त आप्तसंबंधाचे प्रेम कायम ठेवा (ही अपेक्षा).’ आणि जो कोणी पुण्यकर्म करेल (त्याच्या गुणवत्तेनुसार) आम्ही त्याच्या पुण्यकर्माच्या मोबदल्यात अधिकाधिक वाढ करू. खरोखर, अल्लाह क्षमाशील आहे, गुणांची कदर करणारा आहे.

24 ते असे म्हणतात का की, या (पैगंबराने) अल्लाहविषयी खोटी गोष्ट रचली आहे. पण (पैगंबर!) (जर तसे असते आणि ) अल्लाहने इच्छिले असते तर त्याने तुमच्या हृदयाला (कायम) सीलबंद करून टाकले असते. उलटपक्षी अल्लाह असत्याचा नाश करीत असतो. आणि आपल्या वचनांद्वारे सत्य प्रस्थापित

करीत असतो. (लोकांच्या) मनात काय-काय आहे याची त्याला पूर्ण जाणीव आहे, यात मुळीच शंका नाही. 25 तोच आपल्या दासांकडून त्यांच्या क्षमायाचनेचा स्वीकार करतो आणि त्यांच्या चुका माफ करतो. आणि जे काही तुम्ही करता, ते सर्व तो जाणतो. 26 त्या लोकांच्या प्रार्थनेला तो प्रतिसाद देतो, जे श्रद्धा धारण करून सत्कर्मे करतात. आणि तो त्यांना आपल्या कृपेने अधिकाधिक मोबदला प्रदान करतो. आणि जे सत्य नाकारणारे आहेत, त्यांच्यासाठी कठोर शिक्षा आहे.

27 जर अल्लाहने आपल्या (सर्व) भक्तांसाठी विपुल प्रमाणात उपजीविका प्रदान केली असती तर ते भूतलावर उपद्रव माजविणारे बनले असते. पण तो (ती) आपल्या इच्छेनुसार योग्य प्रमाणात प्रदान करीत असतो. नि:संदेह त्याला आपल्या भक्तांच्या (गरजांची) पूर्ण जाण आहे, तसेच त्यांच्यावर तो नजर ठेवून आहे. 28 आणि तोच आहे जो लोकांनी आशा गमावल्यावर पावसाचा वर्षाव करतो, आणि त्याद्वारे आपल्या कृपेचे (द्वार) दूर-दूरपर्यंत खुले करतो. तोच (त्यांचा) एकमेव सांभाळकर्ता आहे, सर्व प्रकारच्या स्तुतीस तोच पात्र आहे.

29 त्याच्या (सामर्थ्याच्या) खुणांपैकी आहेत, आकाश व पृथ्वी यांची निर्मिती. तसेच ते सर्व सजीव प्राणी देखील, जे त्याने त्यांच्या आसपास (पृथ्वीवर) पसरवून टाकलेले आहेत. तसेच तो यासाठी पूर्णपणे समर्थ आहे की, तो इच्छील तेव्हा, त्यांना एकत्र करू शकतो.

30 आणि जी कोणती आपत्ती तुमच्यावर ओढवते, ती तुमच्या हातांनी केलेल्या कमाईचेच फळ असते. तो बऱ्याचशा चुकांना तर माफ करून टाकत असतो. 31 तुम्ही भूतलावर अल्लाहच्या नियंत्रणातून स्वत:ला मुक्त करून कुठेही जाऊ शकत नाही. आणि अल्लाहशिवाय तुमचा दुसरा कोणीही रक्षणकर्ता किंवा साहाय्यकर्ता नाही.

32 आणि त्याच्या (सामर्थ्याच्या) खुणांपैकी हे आहे की, नौका समुद्रात

संचार करीत असतात, जणू चलते–फिरते पर्वतच आहेत. 33 त्याने ठरविले तर तो वाऱ्याला थांबवू शकतो, मग त्या नौका समुद्राच्या पृष्ठभागावर अचल अवस्थेत उभ्याच राहून जातील. खरोखर यामध्ये संदेश आहेत, त्या लोकांसाठी जे सहनशीलता बाळगणारे आणि (अल्लाहच्या कृपेची जाण बाळगून) त्याच्याप्रति आभार व्यक्त करणारे आहेत.

34 किंवा तो (तुफानी वाऱ्यांद्वारे) त्यांना (व त्यांच्या नौकांना) त्यांच्या दुष्कृत्यांपोटी नष्ट करू शकतो आणि जे (क्षमेस पात्र आहेत) त्यांना तो क्षमा करत असतो. 35 म्हणजे त्यांना कळून यावे की, जे आमच्या संदेशांच्या बाबतीत विवाद निर्माण करतात, त्यांच्यासाठी सुटकेचा कोणताही मार्ग नाही.

36 (लोकांनो! हे लक्षात ठेवा की,) जे काही तुम्हाला देण्यात आलेले आहे, ते केवळ या जीवनासाठी तात्पुरत्या स्वरूपाची तरतूद आहे. पण जे अल्लाहपाशी आहे, ते अधिक चांगले आणि चिरकाल टिकणारे आहे. (हे त्या लोकांना दिले जाईल), जे श्रद्धा धारण करतात, आणि अढळपणे अल्लाहवर विश्वास ठेवतात.

37 जे मोठमोठ्या अपराधांपासून व असभ्य कृत्यांपासून स्वत:ला दूर ठेवतात. आणि जेव्हा त्यांना राग येतो, तेव्हा ते माफ करून टाकतात. 38 आणि जे आपल्या पालनकर्त्याच्या (आदेशांचे) पालन करतात आणि नित्य प्रार्थना करतात (म्हणजेच नमाज़) आणि ते आपली कामे परस्पर सल्लामसलतीने पार पाडतात. आणि आम्ही त्यांना जे काही दिलेले आहे, त्यातून (आमच्या कार्यासाठी) खर्च करतात. 39 आणि जेव्हा त्यांच्यावर अन्याय लादले जाते, तेव्हा मात्र ते स्वत:चा बचाव करतात. 40 पण (हे लक्षात ठेवायला हवे) वाईट कृत्याचा बदला घेताना तेवढीच इजा पोचवायला हवी. पण जो कोणी क्षमा करतो आणि सलोखा निर्माण करतो तर त्याचे प्रतिफळ त्याला अल्लाहपाशी मिळणार, हे निश्चित. नि:संदेह, अत्याचारी लोक त्याला अजिबात प्रिय नाहीत. 41 आणि जे

कोणी त्यांच्यावर अन्याय झाल्यामुळे बदला घेत असतील तर त्यांच्यासाठी असे करणे आक्षेपार्ह नाही. 42 आक्षेपार्ह तर त्यांचे कृत्य आहे, जे इतरांवर अन्याय करतात आणि भूतलावर कोणत्याही न्याय्य कारणाशिवाय अराजकता माजवितात. हेच ते लोक आहेत, ज्यांना कठोर शिक्षा होणार आहे. 43 पण जो कोणी सहनशीलता दाखवून माफ करून टाकेल, तर खरोखर असे करणे मोठे साहसी कृत्य आहे.

44 आणि ज्याला अल्लाह भटकण्यासाठी सोडून देतो, त्यानंतर त्याचा कोणीही सांभाळकर्ता असत नाही. आणि (न्यायाच्या दिवशी) तुम्ही पाहाल अपराध्यांची काय अवस्था होईल? जेव्हा ते समोर त्यांची शिक्षा उभी असल्याचे पाहतील, ते उद्‌गारतील, 'परत जाण्याचा एखादा मार्ग आहे का!' 45 तुम्ही पाहाल, त्यांना (नरकाच्या) आगीसमोर आणले जात आहे, (आणि) अपमानित झाल्यामुळे त्यांच्या माना खाली वाकलेल्या असतील, पण चोरट्या नजरेने ते सभोवताली पाहत असतील. तेव्हा श्रद्धावंत लोक (हे दृश्य पाहून) म्हणतील, 'ज्यांनी पुनरुत्थानाच्या दिवशी स्वत:ला आणि आपल्या लोकांना विनाशात पोचवले, तेच (खऱ्या अर्थाने) अयशस्वी लोक आहेत.' निश्चितच, दुराचारी लोक निरंतर शिक्षा भोगत राहतील. 46 अल्लाहच्या विरुद्ध जाऊन त्यांची मदत करू शकेल, असा कोणीही त्यांना मिळणार नाही. आणि अल्लाह ज्यांना भटकण्यासाठी सोडून देतो त्यानंतर त्यांना (योग्य) मार्ग कुठे मिळणार?

47 (लोकांनो!) तुम्ही आपल्या पालनकर्त्याकडून आलेल्या (संदेशरूपी) हाकेला प्रतिसाद द्या, (पण) तो दिवस येण्यापूर्वी, जो कोणीही (अल्लाहच्या इच्छेच्या विरुद्ध) त्यास टाळू शकत नाही. त्या दिवशी तुम्हाला कोणतेही आश्रयस्थान मिळणार नाही, ना तुम्हाला आपल्या अपराधांना नाकारण्याची (संधी) मिळेल. 48 पण (पैगंबर!) त्यांनी (या संदेशाकडे) जर पाठ फिरवली तर (तुम्ही लक्षात घ्या) की, आम्ही तुम्हाला त्यांचा काही रखवालदार बनवून

पाठविलेले नाही. तुमच्यावर केवळ (संदेश) पोचविण्याची जबाबदारी आहे. आणि (माणसाचे असे आहे की,) आम्ही जेव्हा त्याला आपल्या कृपेने समृद्ध करतो, तेव्हा तो त्यावर फार खूश होतो. पण जेव्हा त्यांच्यावर त्यांच्या हातांनी केलेल्या (दुष्)कृत्यांमुळे एखादे संकट ओढवते, (तेव्हा ते अत्यंत कृतघ्न बनतात), कारण मानव आहेच कृतघ्न.

49 आकाश आणि पृथ्वी यांच्यावर राज्य केवळ अल्लाहचे आहे. तो इच्छितो ते निर्माण करतो. तो इच्छितो त्यास मुली प्रदान करतो आणि इच्छितो त्यास मुले प्रदान करतो. 50 किंवा मुले आणि मुली दोन्ही प्रदान करतो. आणि इच्छितो त्यास अपत्यहीन अवस्थेत ठेवतो. खरोखर तो सर्वज्ञ आहे, सर्वशक्तिमान आहे.

51 कोणीही असा नाही की, अल्लाहने त्याच्याशी प्रत्यक्ष बोलावे, पण फक्त अंत:प्रेरणेद्वारे किंवा पडद्याआडून किंवा स्वर्गदूत पाठवून, जो त्याच्या आदेशाने त्याचा संदेश प्रकट करेल, जो संदेश तो ऐकवू इच्छील. तो सर्वोच्च आहे आणि बुद्धिमान आहे, यात मुळीच शंका नाही. 52 (पैगंबर!) आम्ही अशाचप्रकारे आमच्या आदेशाने तुमच्याकडे स्वर्गदूत पाठवून (संदेश) प्रकट केला आहे. (यापूर्वी) तुम्हाला माहीत नव्हते की, अल्लाहचा ग्रंथ काय आहे. ना हे जाणत होता की, श्रद्धा म्हणजे काय? पण आम्ही या (कुराणास) सन्मार्ग दाखवणारा प्रकाश बनविले आहे. त्याद्वारे आम्ही आपल्या भक्तांपैकी इच्छितो त्यास मार्गदर्शन प्रदान करतो. (पैगंबर!) तुम्ही लोकांना सन्मार्गाकडे मार्गदर्शन करीत आहात, यात मुळीच शंका नाही. 53 त्या अल्लाहच्या मार्गाकडे, जो मालक आहे, त्या सर्वांचा जे आकाशात आणि पृथ्वीवर आहे. लक्षात असू द्या, सर्व गोष्टी (निर्णयासाठी) अल्लाहकडेच सादर केल्या जातील.

# सूरह–४३. अज़–ज़ुखरुफ़

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 हा० मीम० 2 या सुबोध अशा ग्रंथाची शपथ. 3 आम्ही या (ग्रंथास)
अरबी भाषेत (प्रकट केले आहे), म्हणजे तुम्हा लोकांना (त्यातील संदेश)
ग्रहण करता यावे.
4 आणि या (कुराणाचा) मूळ स्रोत आमच्याकडे असलेल्या महाग्रंथात आहे.
खरोखर हे उदात्त व ज्ञानाने परिपूर्ण आहे.

5 (सत्य नाकारणाऱ्यांनो!) आम्ही या बोधग्रंथाला तुमच्यापासून केवळ
यासाठी परत घ्यावे का की, तुम्ही मर्यादांचे उल्लंघन करणारे लोक आहात? 6
आम्ही आधीच्या लोकांमध्ये कितीतरी पैगंबर पाठवले होते. 7 पण त्यांच्याकडे
असा एकही पैगंबर आलेला नाही, ज्याला त्यांनी उपहासाचे लक्ष्य केले नसेल.
8 मग आम्ही तर त्यांनाही नष्ट करून टाकले, जे यांच्यापेक्षाही अधिक शक्तिशाली
होते. हे होते आधीच्या लोकांचे उदाहरण.

9 (बहुसंख्य लोकांचे असे आहे,) जेव्हा तुम्ही त्यांना विचाराल की,
आकाश आणि पृथ्वी यांना कोणी निर्माण केले? तर ते अवश्य उत्तर देतील,
'त्यांना सर्वशक्तिमान व सर्वज्ञ अशा (अल्लाहने) निर्माण केले आहे.' 10 ज्याने
तुमच्यासाठी पृथ्वीला बिछाना बनवले आणि तिच्यावर (मानवी सभ्यतेसाठी)
मार्ग उपलब्ध करून दिले. या उद्देशाने की, तुम्हाला सरळ मार्ग लाभावे. 11
आणि तोच आहे, जो आकाशातून योग्य प्रमाणात पाण्याचा वर्षाव करतो. मग
आम्ही त्याद्वारे मृतप्राय जमिनीला सचेत करतो. अशाचप्रकारे तुम्हाला (मृत
अवस्थेतून) जिवंत केले जाईल. 12 आणि त्याने जे जे निर्माण केले ते सर्व
जोड्यांसह निर्माण केले. आणि पाण्यात स्वार होण्यासाठी नौका आणि भूतलावर
स्वार होण्यासाठी (विविध) प्राणी निर्माण केले. 13 आणि (त्यांना अशाप्रकारे

निर्माण केले) की, तुम्हाला त्यांच्या पाठीवर स्थिरपणे बसता यावे. आणि जेव्हा तुम्ही त्यांच्यावर स्वार व्हाल, तेव्हा आपल्या पालनकर्त्याच्या अनुग्रहाची आठवण करा. आणि म्हणा, 'असीम महिमावान आहे तो, ज्याने यावर आम्हाला नियंत्रण दिले आहे. आम्हाला यावर स्वत:हून कधीही नियंत्रण प्राप्त करता आले नसते.
14 खरोखर आम्हाला परतून आपल्या पालनकर्त्याकडेच जायचे आहे.'

15 तरीही लोकांनी त्याचे सेवक असलेल्यांना त्याचा अंश कल्पिले आहे.
खरोखर, मानव आहेच उघड कृतघ्न. 16 त्याने आपल्या स्वत:च्या निर्मितीपैकी
स्वत:साठी मुलींची निवड केली आणि तुमच्यासाठी मुलांची निवड केली असे
(तुम्हाला वाटते) की काय? 17 (त्यांचे असे आहे की,) जेव्हा त्यांना (मुलीच्या
जन्माचे) वृत्त कळविले जाते. ज्या (मुलींचा) ते अगदी सहजतेने कृपावंत
(अल्लाहशी) संबंध जोडतात, तेव्हा (ती बातमी ऐकून) त्यांचा चेहरा काळवंडतो
आणि त्यांचे (मन) दु:खाने (व रागाने) दाटून जाते. 18 जिला सुखसोयीत
वाढविले जाते आणि जिला स्पष्टपणे वादविवादही करता येत नाही (ती अल्लाहच्या
वाट्याची असे तुम्ही ठरवता?). 19 आणि स्वर्गदूत जे कृपावंत (अल्लाहचे)
सेवक आहेत त्यांना, त्यांनी स्त्रिया असल्याचे कल्पिले आहे. ते त्यांच्या निर्मितीच्या वेळेस उपस्थित होते की काय? त्यांचा हा (निराधार) दावा (नोंदवहीत) लिहून ठेवला जाईल. आणि (न्यायाच्या दिवशी) त्याविषयी त्यांना जाब विचारला जाईल.

20 आणि ते म्हणतात, 'कृपावंत अल्लाहने इच्छिले असते तर आम्ही त्यांची (म्हणजे इतर उपास्यांची) उपासना केली नसती.' (पण) त्यांना (अल्लाहच्या
योजनेचे) मुळीच ज्ञान नाही. ते केवळ तर्क-वितर्क लढवीत आहेत. 21 आम्ही
त्यांना यापूर्वी एखादा असा ग्रंथ दिलेला आहे का की, त्याला त्यांनी पूर्ण दृढतेसहित धरून ठेवलेले आहे? (आणि त्याआधारे वादविवाद करीत आहेत).

22 नाही, अजिबात नाही, तरी ते म्हणतात, 'आम्ही आमच्या वाडवडिलांना

एक मार्ग अनुसरत असल्याचे पाहिले आहे. आणि आम्ही त्यांचेच अनुसरण करीत आहोत.' 23 आणि तुमच्यापूर्वी जेव्हाही आम्ही ज्या वस्तीत सावध करणारा पैगंबर पाठविले तर तेथील समृद्ध लोकांनी (नेहमी) अशाप्रकारे प्रतिसाद दिला, म्हणाले, 'आम्ही आमच्या वाडवडिलांना एक मार्ग अनुसरताना पाहिले आहे. आणि आम्ही त्यांच्याच पावलांवर पाऊल ठेवून (पुढे) जात आहोत.' 24 (तेव्हा पैगंबर) म्हणायचा, 'जर मी तुम्हाला त्या मार्गापेक्षा अधिक चांगला मार्ग दाखविला तर..... ज्यावर तुम्ही तुमच्या वाडवडिलांना पाहिले आहात (तरीदेखील तुम्ही आपल्या वाडवडिलांच्याच मार्गावर जाणे सुरू ठेवणार का?)' ते उत्तरले, 'तुला जे देऊन पाठविण्यात आले आहे, ते आम्ही (कदापि) मान्य करणार नाही.' 25 शेवटी आम्ही (त्यांच्या विद्रोहापोटी) त्यांना शिक्षा केली. तेव्हा पाहा, (पैगंबरांना) खोटे ठरविणाऱ्यांचा अंत कसा झाला.

26 आणि जेव्हा इब्राहीमने आपल्या पित्याला व आपल्या लोकांना म्हटले, 'तुम्ही ज्यांची उपासना करता, त्यांच्याशी माझा काहीच संबंध नाही, 27 पण (मी केवळ त्याची उपासना करतो) ज्याने मला निर्माण केले आहे. आणि तोच मला निश्चितपणे मार्गदर्शन करेल.' 28 आणि इब्राहीमने हाच संदेश आपल्या मागे आपल्या वंशजासाठी सोडला. यासाठी की, त्यांनीही (नेहमी अल्लाहप्रतिच) समर्पणभाव बाळगावा. 29 (अरब लोक जे त्यांचेच वंशज आहेत) मी यांना आणि यांच्या पूर्वजांना या जीवनाची सामग्री प्रदान केली होती. तर ते त्यांचा उपभोग करीत राहिले, येथपावेतो की, त्यांच्याकडे सत्याचा संदेश आला आणि एक पैगंबर जो (सत्य संदेशाला) स्पष्ट करून सांगणारा. 30 पण जेव्हा त्यांच्याकडे सत्याचा संदेश पोचला, तेव्हा ते म्हणाले, 'ही तर एक जादू आहे आणि आम्ही तिचा स्वीकार (कदापि) करणार नाही.'

31 आणि ते म्हणाले, 'हे कुराण दोन शहरांपैकी (म्हणजे मक्का व तायफ़च्या) एखाद्या प्रतिष्ठित व्यक्तीकडे का प्रकट करण्यात आले नाही? 32 (पैगंबर!) हे

लोक तुझ्या पालनकर्त्याच्या कृपेचे वाटप करणार आहेत की काय? (नाही, तर ते करणारे आम्हीच आहोत,) या जगातील जीवनात त्यांच्यादरम्यान उपजीविकेचे वाटप (आम्हीच) करीत असतो. आणि आम्ही दर्ज्याच्याबाबतीत काहींना काहींवर श्रेष्ठत्व दिलेले आहे. ते यासाठी की, त्यांनी एकदुसऱ्यांसाठी उपयोगी ठरावे. आणि तुझ्या पालनकर्त्याची कृपा (म्हणजे पैगंबरी) त्यापेक्षा अधिक श्रेष्ठ आहे, जी (ऐहिक जीवनाची धनदौलत) ते गोळा करीत आहेत. 33 आणि जर सर्व माणसे (दुष्ट श्रद्धाहीन) बनून जातील अशी शक्यता नसती तर जे लोक कृपावंत (अल्लाहला) नाकारणारे आहेत, त्यांना (या क्षणभंगुर जगात) अशी घरे देऊन टाकली असती, ज्यांची कौले (छत) चांदीची आणि वर जाण्यासाठी जिनेदेखील चांदीचे असते. 34 तसेच (चांदीचे) दरवाजे, आणि ती आसने देखील चांदीची बनवून टाकली असती ज्यांवर ते पहुडतात. 35 तसेच (भरपूर प्रमाणात) सोन्याचे सजावटीचे सामानदेखील देऊ शकलो असतो. पण या सर्व गोष्टी या जगातील (फार अल्पकाळ अशा) जीवनाची सामग्री आहे. आणि मृत्यूनंतरच्या जगात अल्लाहकडे (सर्व वैभव) केवळ त्या लोकांसाठी आरक्षित आहेत, ज्यांनी अल्लाहची जाण बाळगून जीवन व्यतीत केलेले असेल.

36 पण जो कोणी कृपावंत (अल्लाहच्या) स्मरणाकडे पाठ फिरवतो, आम्ही अशा (माणसा)साठी सैतानाला नियुक्त करतो, जो त्याचा साथीदार बनतो. 37 जे लोकांना सन्मार्गापासून दूर (आणि दूर) घेऊन जात असतात, पण त्यांना (ते अशा धोक्यात ठेवतात की), त्यांना वाटते, आपण सन्मार्गावर आहोत. 38 पण शेवटी, जेव्हा असा माणूस आमच्याकडे येईल, तेव्हा तो आपल्या (दुष्ट साथीदारास) म्हणेल, 'अरेरे! माझ्या आणि तुझ्या दरम्यान पूर्व आणि पश्चिम इतके अंतर असते तर (किती बरे झाले असते). (तू) किती दुष्ट साथीदार होतास!' 39 त्या दिवशी (अशा माणसाला) सांगितले जाईल, आज तुला या गोष्टीची जाणीव झाल्याने, तुझा काहीही फायदा होणार नाही, कारण तुम्ही (दोघे

एकत्र) दुष्कृत्यांत सामील राहिलेले आहात. आज तुम्ही दोघे शिक्षेचेही वाटेकरी आहात.

40 (पैगंबर!) तुम्ही बहिऱ्यांना ऐकवू शकता का, आणि आंधळ्यांना मार्ग दाखवू शकता का? तसेच त्यास, जो (जाणूनबुजून) चुकीच्या मार्गाला लागलेला आहे? 41 आणि जर आम्ही तुम्हाला या जगातून घेऊन गेलो तरी आम्ही (दुष्टांना) अवश्य शिक्षा करणार. 42 किंवा असेही होऊ शकते की, आम्ही ज्याचे वचन त्यांना दिलेले आहे, तुम्हाला (या जगातच) दाखवून देऊ, कारण आम्हाला त्यांच्यावर सर्वप्रकारे नियंत्रण प्राप्त आहे, यात मुळीच शंका नाही. 43 तुम्ही मात्र ते सर्व दृढतापूर्वक धरून ठेवा, जे आम्ही तुमच्याकडे प्रकट केलेले आहे. खरोखर, तुम्ही सन्मार्गावर आहात. 44 आणि हे (कुराण) तुमच्यासाठी आणि तुमच्या लोकांसाठी बोधग्रंथ आहे. आणि लवकरच तुम्हाला (याविषयी) विचारणा केली जाईल. 45 आणि तुम्ही आमच्या त्या पैगंबरांनाही विचारून घ्या, ज्यांना आम्ही तुमच्यापूर्वी पाठवले होते की, कृपावंत (अल्लाह) शिवाय इतर उपास्यांची उपासना करण्यासाठी आम्ही त्यांची नियुक्ती केली होती की काय? 46 आणि आम्ही मूसाला आमच्या (संदेशसूचक) खुणांसह फिरऔन व त्याच्या सरदारांकडे पाठविले. तर त्याने त्यांना म्हटले, 'निःसंदेह मी सर्व जगांचा पालक असलेल्या अल्लाहचा संदेशवाहक आहे.' 47 पण जेव्हा तो आमच्या (गंभीर) संदेशासह पोहोचला, तेव्हा ते त्याच्यावर हसू लागले. 48 आणि आम्ही त्यांना (आमच्या सामर्थ्याच्या) ज्या-ज्या निशाण्या दाखविल्या, त्या एकापेक्षा एक (थक्क करून सोडणाऱ्या) अशा होत्या. आणि आम्ही त्यांना (या जगात तात्पुरत्या स्वरूपाची) शिक्षाही केली, यासाठी की, त्यांनी आमच्याकडे वळावे. 49 आणि ते (पैगंबराला) म्हणाले, 'हे जादूगारा! आमच्यासाठी आपल्या पालनकर्त्याकडे त्याने तुला दिलेल्या वचनाच्या आधारे प्रार्थना कर, (ही शिक्षा टळली तर) आम्ही अवश्य सन्मार्गाचा अवलंब करू.' 50 मग जेव्हा आम्ही त्यांच्यावरून त्या शिक्षेचे

संकट दूर केले, तेव्हा त्यांनी आपला शब्द मोडला.
51 आणि फिरऔनने आपल्या लोकांना बोलावून सांगितले, माझ्या बांधवांनो!
इजिप्तची सत्ता माझी नाही का? आणि या (माझ्या राज्यातून) वाहणाऱ्या नद्या
माझ्या नाहीत का? मीच (तुमचा पालनकर्ता) असल्याचे तुम्ही पाहत नाही
का? 52 मग या तुच्छ माणसापेक्षा मी श्रेष्ठ नाही का? ज्याला स्पष्टपणे बोलता
देखील येत नाही. 53 (हा मूसा श्रेष्ठ असेल तर) त्याला सोन्याची कडे
(अल्लाहकडून) का प्रदान करण्यात आली नाहीत, किंवा स्वर्गदूतांची एक फौज
त्याच्याबरोबर का आली नाही? 54 अशाप्रकारे त्याने आपल्या लोकांना मूर्ख
बनविले आणि त्याच्या लोकांनी त्याचे म्हणणे मान्य केले. हे (सर्व) बंडखोर
वृत्तीचे लोक होते. 55 पण जेव्हा त्यांनी आम्हाला आव्हान देणे सुरूच ठेवले,
तेव्हा आम्ही त्यांच्यावर सूड उगवला. आणि त्या सर्वांना बुडवून टाकले. 56
अशाप्रकारे त्यांना भूतकाळाची एक गोष्ट बनवून टाकले. आणि त्यांच्यानंतर
येणाऱ्यांसाठी बोध ग्रहण करण्याचे साधन.
57 आणि जेव्हा मरियमपुत्र येशूचे एक उदाहरण प्रस्तुत केले गेले, तेव्हा
तुमचे लोक यावर ओरड करू लागले. 58 म्हणाले, 'आमचे उपास्य चांगले
आहेत की, तो चांगला आहे?' (पैगंबर!) ही तुलना केवळ तुमच्याशी वाद
निर्माण करण्यासाठी ते करीत आहेत. कारण ते आहेतच भांडखोर लोक! 59
येशू (एक सामान्य माणसाप्रमाणेच एक माणूस होता आणि) आमच्या दासाशिवाय
अन्य कोणीच नव्हता. आम्ही (त्यास पैगंबर बनवून) त्याच्यावर कृपा केली.
आणि त्याला बनी इस्राईल (म्हणजेच ज्यू) यांच्यासाठी आदर्श बनविले होते.
60 (स्वर्गदूतांची उपासना करणाऱ्यांनो!) जर आम्ही इच्छिले असते तर
तुमच्याजागी तुमचे उत्तराधिकारी म्हणून स्वर्गदूतांना पृथ्वीवर वसविले असते.
61 आणि तो निश्चितपणे अंतिम घटकेची एक खूण आहे. तर तुम्ही (त्या
घटकेविषयी) शंका घेऊ नका आणि माझेच अनुसरण करा, हाच सरळ मार्ग

आहे. [62] आणि सैतान तुम्हाला सरळ मार्गापासून रोखण्यात यशस्वी होता कामा नये. खरोखर, तो तुमचा अस्सल शत्रू आहे.

[63] आणि जेव्हा ईसा (येशू आपल्या लोकांकडे) सत्याच्या सर्व प्रमाणासह आला, तो म्हणाला, 'मी तुमच्याकडे त्या गोष्टींचे सत्य स्पष्ट करण्यासाठी ज्ञान घेऊन आलो आहे, ज्याबाबतीत तुम्ही मतभेद करीत आहात. म्हणून अल्लाहचे भय बाळगून माझ्या आज्ञेचे पालन करा. [64] अल्लाह माझाही पालनकर्ता आहे आणि तुमचाही पालनकर्ता आहे. म्हणून तुम्ही त्याचीच उपासना करा, हाच सरळ मार्ग आहे.' [65] पण (येशूनंतर) विविध गटांत आपसात मतभेद निर्माण झाले. तर जे अत्याचारी आहेत, ते बरबाद होणार आहेत, भयंकर दिवसाच्या शिक्षेद्वारे.

[66] ते (अपराधी) लोक, आता फक्त ती घटका, (अशाप्रकारे) येण्याची वाट पाहत आहेत की, ती त्यांच्यावर अचानक यावी आणि तेव्हा त्यांना तिची कल्पनाही नसावी. [67] त्या दिवशी सर्व मित्र, जे (एकेकाळी) मित्र होते, ते एकमेकांचे शत्रू बनतील. यात अपवाद केवळ ते लोक असतील, जे (अल्लाहची) जाण ठेवून होते. [68] (अल्लाह श्रद्धावंतांना म्हणेल,) 'माझ्या भक्तांनो! आज तुम्हाला भयभीत होण्याची गरज नाही, ना (यापुढे) तुम्हाला कधी दु:खांचा सामना होणार.' [69] (ते माझे भक्त) ज्यांनी श्रद्धा धारण करून माझे आज्ञापालन अवलंबिले..... [70] 'स्वर्गात प्रवेश करा तुम्ही आणि तुमच्या पत्नी, तुम्हाला (सदैव) आनंदित ठेवले जाईल.' [71] (तिथे) सोन्याची ताटे आणि प्याले, त्यांना जे हवे असेल त्यासह, फिरविले जातील. (तिथे) त्यांना ते सर्व मिळेल, ज्याने त्यांचे डोळे सुखावतील. (श्रद्धावंतांनो!) या (सुखवनात) तुम्ही कायम वास्तव्य कराल. [72] आणि हे आहे ते नंदनवन, ज्याचे तुम्हाला तुम्ही केलेल्या (चांगल्या) कर्मांमुळे वारस बनविण्यात आले आहे. [73] आणि तिथे (विविध प्रकारची) फळे विपुल प्रमाणात असतील ज्यातून तुम्ही खाल.

74 (पण) अपराधी लोक सदैव नरकाची शिक्षा भोगत असतील. 75 त्यांची ती शिक्षा सौम्य केली जाणार नाही, आणि तिथे ते निराश (व हताश) पडून राहतील. 76 आम्ही त्यांच्यावर अन्याय केला नाही तर ते स्वत:च अन्याय करणारे होते. 77 आणि ते ओरडतील, 'हे (नरकाच्या) रखवालदारा, तुझ्या पालनकर्त्याने आम्हाला (एकदाचे) संपवून टाकावे!' तो नरकाचा रखवालदार उत्तर देईल, 'नाही, तुम्हाला अशाच प्रकारे शिक्षा भोगत राहावी लागेल!' 78 '(हे अपराध्यांनो!) आम्ही निश्चितपणे तुमच्याकडे सत्याचा संदेश घेऊन आलो होतो, पण तुमच्यापैकी बहुसंख्य लोकांना सत्याचा तिटकारा वाटायचा.' 79 त्यांनीही (सत्याला सोडून दुसरा) मार्ग अवलंबिला आहे तर आम्ही देखील एक गोष्ट ठरवून घेऊ. 80 त्यांना असे वाटते का की, आम्ही त्यांच्या गुप्त गोष्टी किंवा खासगीतील सल्लामसलत ऐकत नाही आहोत? अर्थातच! (ऐकत आहोत) आणि आमचे स्वर्गदूत (देखील) त्यांच्यामध्येच राहून (त्यांच्या प्रत्येक कृत्याची) नोंद करीत असतात.

81 (पैगंबर!) त्यांना सांगा, 'कृपावंत (अल्लाहचा खरोखर) कोणी पुत्र असता तर सर्वप्रथम मीच त्याचा उपासक बनलो असतो.' 82 पण आकाश व पृथ्वी यांचा पालक तसेच समस्त सृष्टीच्या सत्तासिंहासनाचा मालक असलेल्या (अल्लाहचा) त्या गोष्टींशी काहीच संबंध नाही, ज्या गोष्टी लोक त्याच्याशी जोडतात. 83 (पैगंबर!) या लोकांना व्यर्थ बडबड आणि (शब्दांचा) खेळ तोपर्यंत खेळत राहू द्या, जेव्हा त्यांना त्या दिवसास सामोरे जावे लागेल, ज्याचे त्यांना वचन देण्यात आलेले आहे.

84 तोच आकाशातही उपासनेयोग्य आहे आणि तोच पृथ्वीवरही उपासनेयोग्य आहे. आणि तोच अस्सल बुद्धिमान आहे, सर्वज्ञ आहे. 85 मोठा समृद्धशाली आहे तो (अल्लाह), ज्याचे राज्य आकाशात आणि पृथ्वीवर पसरलेले आहे, आणि जे-जे या दोहोंच्यामध्ये आहे, त्यावरही (त्याचेच राज्य आहे). आणि शेवटची घटका केव्हा येईल, याचे ज्ञान त्यालाच आहे. आणि त्याच्याकडेच

तुम्हाला परतविले जाणार आहे.

86 अल्लाहला सोडून इतरांचा जे लोक धावा करतात, ते शिफारस करण्याचा कोणताही अधिकार बाळगत नाहीत. पण जे सत्याची साक्ष देणारे असतील व त्यांना त्याचे ज्ञान असेल. 87 आणि जर तुम्ही त्यांना विचाराल, 'त्यांना कोणी निर्माण केले?' तर ते हेच उत्तर देतील, 'अल्लाहने'. तर मग (हे समजूनही) ते कुठे भरकटत जात आहेत? 88 (पण अल्लाहला या गोष्टीची पूर्ण जाणीव आहे की,) पैगंबराने (निराश होऊन असे वारंवार त्याला) म्हटले आहे, 'प्रभू! हे असे लोक आहेत की, ते श्रद्धा धारण करणार नाहीत.' 89 तर (पैगंबर!) तुम्ही त्यांच्याकडे दुर्लक्ष करा आणि त्यांना म्हणा, 'तुम्हाला शांती लाभो.' लवकरच त्यांना (सत्य) कळून येईल.

# सूरह-४४. अद-दुख़ान

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 हा० मीम० 2 सत्य स्पष्ट करणाऱ्या ग्रंथाची शपथ. 3 निश्चितच आम्ही यास एका शुभ रात्री प्रकट केले आहे. आम्ही (मानवाकडे) नेहमी सावधान करणाऱ्या (सूचना) पाठविल्या आहेत. 4 त्या रात्रीत (साऱ्या व्यवस्थांचे) विवेकपूर्ण प्रयोजन केले जाते. 5 आमच्याच आदेशानुसार, निःसंदेह आम्ही (मार्गदर्शनपर) संदेश पाठवीत आलेलो आहोत. 6 हे (संदेश म्हणजे) तुझ्या पालनकर्त्याची कृपा होय. तोच सर्व काही ऐकणारा, सर्व काही जाणणारा आहे. 7 तोच आहे आकाश व पृथ्वी आणि जे-जे या दोहोंच्यामध्ये आहे त्या सर्वांचा पालक (मालक व निर्माता). कदाचित तुम्हाला या सत्याची खऱ्या अर्थाने जाण झाली असती...... 8 त्याच्याशिवाय दुसरा कोणीच ईश्वर नाही, तोच जीवन आणि मृत्यू देणारा आहे. तुमचाही पालनकर्ता आणि तुमच्या वाडवडिलांचाही पालनकर्ता (तोच आहे).

[9] पण ते शंका–कुशंकेचा खेळ खेळण्यात व्यस्त आहेत. [10] (पैगंबर!) बस, (अशा लोकांच्या बाबतीत) केवळ प्रतीक्षा करा त्या दिवसाची जेव्हा आकाश सर्वांना दिसेल अशा धुराने व्यापून जाईल. [11] तो लोकांना वेढून टाकेल, ही एक दु:खदायी शिक्षा असेल. [12] तेव्हा लोक म्हणू लागतील, 'हे प्रभू! या त्रासातून आम्हाला मुक्त कर, आता आम्ही श्रद्धा धारण करतो आहोत' [13] (पण आता या शिक्षेद्वारे) ते काय उपदेश ग्रहण करणार? त्यांच्याकडे पैगंबर (व ईश्वरीय ग्रंथ) आधीच आले होते, सर्व संदेश स्पष्ट करून सांगणारे. [14] तेव्हा मात्र त्यांनी त्याकडे पाठ फिरवली, आणि म्हणाले, 'हा तर इतरांद्वारे शिकविला गेलेला वेडा आहे.' [15] आम्ही शिक्षेचे संकट काही काळासाठी जरी दूर केले तरी तुम्ही पुन्हा आपल्या आधीच्याच (भ्रष्ट)मार्गाकडे वळाल. [16] ज्या दिवशी आम्ही सर्व अपराध्यांना जबरदस्त रीतीने जखडून टाकू, त्या दिवशी आम्ही पुरेपूर बदला घेऊच. [17] त्यांच्याआधी आम्ही (अशाचप्रकारे) फिरऔनच्या लोकांना आजमावून पाहिले. त्यांच्याकडे एक सन्माननीय पैगंबर आला.

[18] म्हणाला, 'अल्लाहच्या भक्तांना माझ्या स्वाधीन करा, मी तुझ्याकडे पाठविण्यात आलेला सच्चा पैगंबर आहे. [19] आणि अल्लाहच्या (संदेशाकडे दुर्लक्ष करून) स्वत:ची बढाई मिरवू नकोस. मी तुझ्यासमोर (त्याच्याकडून पाठविलेले) सुस्पष्ट प्रमाण सादर करतो आहे. [20] मी माझा व तुझा पालनकर्ता असलेल्या अल्लाहची, तू मला दगडांनी ठेचून मारू नये यासाठी, शरण प्राप्त केलेले आहे. [21] आणि जर तू, मी आणलेल्या (संदेशावर) विश्वास ठेवणार नसशील तर निदान स्वत:ला माझ्यापासून दूर ठेव.'

[22] मग मूसाने आपल्या पालनकर्त्याला हाक दिली, म्हणाला, '(हे प्रभू!) हे लोक (खरोखर) अपराधी आहेत.' [23] (अल्लाहने म्हटले,) 'तू माझ्या भक्तांना रात्रीच्या समयी घेऊन निघून जा, कारण तुझा पाठलाग निश्चितपणे केला जाईल.' [24] आणि तुम्ही लोक समुद्र शांत असताना, तो पार करून पुढे

निघून जा. त्यांचे सैन्य निश्चितपणे बुडवून टाकले जातील.’ 25 त्या लोकांना कित्येक बागा आणि (बागांतील) जलप्रवाह आपल्या मागे सोडून जावे लागले. 26 तसेच धान्यांची शेते व सुंदर–सुंदर घरे (देखील सोडावे लागले). 27 आणि ती सर्व सुखदायी साधने, ज्यांच्यादरम्यान राहून ते मौज करीत असत. 28 असा झाला त्यांचा अंत आणि जे–जे त्यांनी आपल्या मागे सोडले, त्यांचे दुसऱ्या लोकांना आम्ही वारस बनवले. 29 (जे नष्ट झाले) त्यांच्यासाठी ना आकाशाने, ना पृथ्वीने अश्रू ढाळले, ना त्यांना उसंत दिली गेली.

30 आणि आम्ही इस्राईलच्या मुलांना अपमानजनक यातनेपासून वाचविले. 31 म्हणजेच फिरऔनपासून, खरोखर, तो जुलमी (राजा) होता, ज्याने सर्व मर्यादांचे उल्लंघन केलेले होते. 32 आणि आम्ही सहेतुकपणे (इस्राईलच्या मुलांना तेव्हाच्या) इतर सर्व लोकांवर श्रेष्ठत्व प्रदान केले होते. 33 आणि त्यांना आम्ही अशा निशाण्या दिल्या होत्या, ज्यांत त्यांची उघड कसोटी होती.

34 आता हे सत्य नाकारणारे (मक्कावासी) म्हणतात, 35 ‘आमच्या पहिल्या मृत्यूनंतर पुढे काहीच असणार नाही, आणि आम्हाला पुन्हा जिवंत केले जाण्याचा प्रश्नच नाही.’ 36 (म्हणतात,) ‘(हे पैगंबर!) जर तुझे म्हणणे खरे असेल तर आमच्या वाडवडिलांना परत घेऊन ये.’ 37 हे चांगले आहेत की, ‘तुब्बा’ नावाचा जनसमूह, किंवा ते, जे त्यांच्याआधी होते? आम्ही त्या (सर्वांना) नष्ट करून टाकले, कारण तेही (यांच्यासारखेच) अपराधी लोक होते.

38 (असे यासाठी झाले,) कारण आम्ही आकाश व पृथ्वी आणि त्या दोहोंच्यामध्ये जे–जे आहे, ते सर्व काही खेळ करून पाहण्यासाठी निर्माण केलेले नाही. 39 या सर्वांना आम्ही सहेतुकपणे निर्माण केलेले आहे. पण बहुसंख्य लोकांना या (वास्तवाची) जाण नाही. 40 निश्चितपणे, निर्णयाचा दिवस, हा सर्वांसाठी (अल्लाहसमोर हजर होण्याची) ठरलेली एक वेळ आहे. 41 त्या दिवशी कोणताही मित्र आपल्या मित्राच्या कामी येणार नाही. ना कोणाची मदत

केली जाईल. 42 पण फक्त त्यांचा अपवाद असेल ज्यावर अल्लाह दया दाखवेल. खरोखर, तो सर्वशक्तिमान (असूनही फार) दयाळू आहे.

43 निश्चितपणे ज़क़्क़ुमच्या वृक्षाची काटेरी फळे — 44 अपराधी लोकांचे अन्न असेल. 45 वितळलेल्या तांब्याप्रमाणे ते पोटात उकळत राहील. 46 ज्याप्रमाणे गरम पाणी उकळत असते. 47 (आज्ञा होईल,) '(नरकाच्या रखवालदारांनो!) त्यास पकडा आणि त्याला फरपटत नरकाच्या मध्यभागी घेऊन जा. 48 मग त्याला शिक्षा देण्यासाठी, त्याच्या डोक्यावर उकळते पाणी ओता. 49 चव चाख या शिक्षेची, तू स्वत:ला फार सामर्थ्यशाली आणि प्रतिष्ठित समजत होतास. 50 ही तीच (नरकाची शिक्षा) आहे, ज्याविषयी तुम्ही शंका घेत असत.'

51 (याउलट) अल्लाहची जाण ठेवून जीवन जगलेले लोक सुरक्षित स्थानी असतील. 52 बागांत व सुंदर प्रवाहांच्या सान्निध्यात 53 ते सुंदर रेशमी व जरीदार वस्त्रे परिधान करून एकमेकांसमोर बसलेले असतील. 54 आणि (मग पुढे) असे होईल की, आम्ही त्यांचा मोठे व सुंदर डोळे असलेल्या स्त्रियांशी विवाह लावून देऊ. 55 संपूर्ण शांततामय व सुरक्षित वातावरणात ते तिथे विविध प्रकारची फळे मागवतील. 56 पहिल्या वेळेस आलेल्या मृत्यूनंतर ते तिथे पुन्हा मृत्यूची चव कधीही चाखणार नाहीत. आणि अल्लाहने त्यांना (कायमस्वरूपी) नरकाच्या शिक्षेपासूनही वाचविलेले असेल. 57 (पैगंबर!) हे सर्व तुझ्या पालनकर्त्याच्या कृपेने होईल. हेच सर्वोत्तम यश होय!

58 अशाप्रकारे आम्ही या कुराणास तुमच्या भाषेत (समजण्यास) सोपे बनवून टाकले आहे, ते यासाठी की, लोकांनी यापासून बोध घ्यावा. 59 तर तुम्ही प्रतीक्षा करा, ते देखील प्रतीक्षा करीत आहेत.

# सूरह–४५. अल–जासिया

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] हा० मीम० [2] हा ग्रंथ सर्वशक्तिमान आणि बुद्धिमान अशा अल्लाहकडून प्रकट करण्यात आलेला आहे. [3] श्रद्धावंतांसाठी आकाशात आणि पृथ्वीवर (संदेशसूचक) खुणा आहेत, यात मुळीच शंका नाही. [4] आणि तुमच्या स्वतःच्या निर्मितीमध्ये आणि त्या सर्व प्राण्यांमध्ये, जे त्याने पृथ्वीवर पसरविलेले आहेत (त्याच्या सामर्थ्याच्या) खुणा आहेत, त्या लोकांसाठी जे दृढ विश्वास ठेवणारे आहेत. [5] तसेच रात्र व दिवस यांच्या एकामागून एक येण्यामध्ये आणि अल्लाहने आकाशातून केलेल्या उपजिविकेच्या व्यवस्थेमध्ये आणि पावसाद्वारे मृतप्राय झालेल्या जमिनीला जिवंत करण्यामध्ये आणि वाऱ्यांच्या दिशा बदलण्यामध्ये (म्हणजेच निसर्ग पातळीवर होत असलेल्या प्रत्येक घटनेमध्ये संदेश असलेल्या) खुणा आहेत, त्या लोकांसाठी, जे बुद्धीचा वापर करतात. [6] हे अल्लाहचे (म्हणजे आमचे) संदेश आहेत, जे आम्ही तुम्हाला सत्य प्रस्तुत करण्याच्या उद्देशाने ऐकवीत आहोत. जर ते अल्लाह आणि त्याच्या संदेशांनाच नाकारत असतील तर ते यापुढे कशावर विश्वास ठेवणारे बनतील?

[7] विनाश पावणार तो प्रत्येक माणूस, जो खोटे बोलण्याचे पाप करीत राहतो! [8] जो अल्लाहच्या संदेशांना ऐकतो, जेव्हा ते त्याच्यासमोर पठण केले जातात, मग अशाप्रकारे आपल्या उद्दामपणाच्या वर्तनावर ठाम राहतो, जणू त्याने त्या संदेशांना कधी ऐकलेलेच नाही. (पैगंबर!) तुम्ही, अशा माणसाला यातनामयी शिक्षेची वार्ता ऐकवून टाका. [9] जेव्हाही तो आमच्या संदेशांच्या संपर्कात येतो, तो (न चुकता) त्यांना आपल्या उपहासाचे लक्ष्य बनवितो. अशा लोकांसाठी अपमानजनक शिक्षा आहे. [10] त्यांच्यासाठी पुढे नरक आहे. आणि त्यांनी जी काही कमाई केली, ती त्यांच्या काहीच कामी येणार नाही. ना ते

त्यांच्या कामी येतील, ज्यांना त्यांनी अल्लाहला सोडून (आपले) रक्षणकर्ते कल्पिले. त्यांना भयानक शिक्षा भोगावी लागणार. [11] हे (कुराण) मार्गदर्शक (ग्रंथ) आहे, पण ज्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या संदेशांना नकार दिला त्यांच्यासाठी कठोर शिक्षा अटळ आहे.

[12] तो अल्लाह आहे, ज्याने समुद्राला तुमच्या अधीन केले यासाठी की, त्याच्या आज्ञेने नौकांना त्यावर संचार करता यावा, आणि तुम्हा लोकांना त्याच्या कृपेचा शोध घेता यावा. आणि तुम्ही त्याच्याप्रति आभार व्यक्त करावा.
[13] तसेच त्याने आकाशात आणि पृथ्वीवर जे काही आहे, ते तुमच्या अधीन करून टाकले आहे. हे सर्व त्याच्याकडून (वरदान) आहे. खरोखर या सर्वांत, संदेश असलेल्या खुणा आहेत त्या लोकांसाठी, जे चिंतन करणारे आहेत.

[14] (पैगंबर!) श्रद्धावंतांना असे सांगा की, त्यांनी त्या लोकांकडे दुर्लक्ष करावे, जे अल्लाहच्या दिवसांच्या आगमनावर विश्वास ठेवत नाहीत. तोच लोकांना त्यांच्या कर्मांचा बदला देईल. [15] जो कोणी चांगले कृत्य करेल, तर त्याचा फायदा त्याला स्वत:लाच मिळणार. अगदी असेच जो कोणी वाईट कृत्य करेल, तर त्याचे दुष्परिणाम त्यालाच भोगावे लागतील. मग शेवटी तुम्हाला आपल्या पालनकर्त्याकडे परत जावे लागणार.

[16] आम्ही (यापूर्वी) इस्राईलच्या मुलांना ग्रंथ, विवेक आणि प्रेषितत्व दिले होते. आणि त्यांना स्वच्छ व शुद्ध अशी उपजीविकेची साधने दिली होती. आणि आम्ही त्यांना (तेव्हाच्या) सर्व लोकांवर श्रेष्ठत्व प्रदान केले होते. [17] आणि आम्ही त्यांना धर्माच्याबाबतीत स्पष्ट असे प्रमाण दिले होते. त्यांच्याकडे ज्ञान आल्यानंतरही, केवळ परस्पर हट्टापोटी त्यांनी त्यात मतभेद निर्माण केला. न्यायाच्या दिवशी तुमचा पालनकर्ता निश्चितपणे त्या बाबतीत (सत्यानुरूप) आपला फैसला सुनावेल, ज्या बाबतीत ते मतभेद करीत होते. [18] मग (पैगंबर!) आम्ही तुम्हाला धर्माच्या स्पष्ट मार्गावर मार्गस्थ केले. तर तुम्ही त्याचेच अनुसरण

करीत राहा आणि ज्यांना (सत्याचे) ज्ञान नाही, त्यांच्या मनोकामनाचे (कोणत्याही प्रकारे) अनुसरण करू नका. 19 ते अल्लाहच्या इच्छेविरुद्ध जाऊन तुमच्या कामी कदापि येऊ शकत नाहीत. अत्याचारी लोक एकमेकांचे मित्र आहेत. पण त्याची जाण ठेवून असलेल्या लोकांचा मित्र अल्लाह आहे. 20 या (ग्रंथात) मानवजातीसाठी मार्गदर्शन आणि दूरदृष्टीचे धडे आहेत आणि त्या लोकांसाठी कृपा आहे, जे दृढतापूर्वक विश्वास ठेवणारे आहेत.

21 वाईट कृत्य करणारे लोक असा विचार करतात का की, श्रद्धा धारण करून ज्यांनी चांगली कृत्ये केलीत अशांनाही (परिणामाच्या दृष्टीने) आम्ही त्यांच्यासमानच करून टाकू की, त्यांचे जगणे आणि मरणे एकसारखे होऊन जाईल? फारच वाईट निर्णय आहे तो, जे ते करीत आहेत. 22 आणि अल्लाहने आकाश व पृथ्वी यांची रचना (लोकांची परीक्षा घेण्याच्या) उद्देशाने केलेली आहे. आणि (शेवटी) प्रत्येकास त्याच्या कर्मांचा योग्य तोच मोबदला दिला जाईल. आणि कोणावरही अन्याय होणार नाही.

23 (पैगंबर!) तुम्ही त्या माणसाच्या स्थितीचे कधी अवलोकन केले आहे का, ज्याने आपल्या इच्छा–आकांक्षांना आपले उपास्य बनविले आहे. (परिणामी) अल्लाहने त्याच्याकडे ज्ञान असतानाही त्याला मार्गभ्रष्ट होण्यासाठी सोडून दिले. आणि त्याचे कान आणि मन (सत्य संदेशाच्या प्रवेशासाठी) सीलबंद करून टाकले. आणि त्याच्या डोळ्यांना (अल्लाहच्या खुणा आता दिसू नयेत) म्हणून झाकून टाकलेले आहे. तर अशा माणसाला कोण मार्गदर्शन करू शकतो. जेव्हा अल्लाहनेच त्याच्यासाठी सन्मार्गाची द्वारे (सर्व प्रकारे) बंद केलेली आहेत. तुम्ही यावर चिंतन करणार नाही का?

24 ते म्हणतात, 'या जीवनाव्यतिरिक्त अन्य जीवन वगैरे काही नाही. आम्ही (येथे) मरतो आणि (येथेच) जगतो. आम्हाला काळाशिवाय अन्य कोणी मारत नाही (हा केवळ काळाचा खेळ आहे).' (नाही!) त्यांना यासंबंधाने काहीच माहीत नाही.

ते केवळ तर्क लढवीत आहेत. 25 आणि जेव्हा त्यांना आमचे पूर्णपणे स्पष्ट असलेले संदेश ऐकविले जातात. तेव्हा त्यांचा युक्तिवाद केवळ हा असतो की, 'तुम्ही सत्य बोलत असाल तर आमच्या वाडवडिलांना जिवंत करून परत आणा.' 26 (पैगंबर!) त्यांना सांगा, 'अल्लाह तुम्हाला जीवन व मृत्यू देतो. तोच तुम्हाला पुनरुत्थानाच्या दिवशी, ज्याच्या (आगमनाविषयी) काहीच शंका नाही, (पुन्हा जिवंत करून, हिशेब घेण्यासाठी) एकत्रित करेल. पण बहुसंख्य लोकांना याची जाण नाही.

27 आणि अल्लाहचीच सत्ता आहे आकाशात आणि पृथ्वीवर, आणि पुनरुत्थानाच्या दिवशीही त्याचीच सत्ता असणार. आणि त्या दिवशी असत्याचे अनुयायी (फार वाईट) अपयशाचे वाटेकरी बनतील. 28 आणि त्या दिवशी तुम्ही असे दृश्य पाहाल की, (मानवजातीतील) प्रत्येक जनसमूह (पूर्ण नम्रतेने) गुडघे टेकून बसलेला असेल. प्रत्येक जनसमूहास आपल्या कर्मवहीकडे बोलावले जाईल. (आणि सांगितले जाईल की,) 'आज तुम्हाला तुमच्या कर्मांचा मोबदला दिला जाणार आहे. 29 ही आहे आमची नोंदवही जी तुमच्याविषयी खरीखुरी साक्ष देत आहे. तुम्ही जे काही करीत होता, ते सर्व आम्ही नोंद करायला लावत होतो.'

30 ज्या लोकांनी श्रद्धा धारण करून चांगली कृत्ये केली, तर अशांना त्यांचा पालनकर्ता आपल्या कृपाछत्राखाली सामावून घेईल. हेच वास्तविक यश आहे. 31 पण ज्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला, (त्यांना विचारले जाईल), 'तुम्हाला माझे संदेश ऐकविले जात नव्हते का? पण तुम्ही लोकांनी गर्वाचे प्रदर्शन केले आणि तुम्ही अपराधी लोक होता.' 32 जेव्हा तुम्हाला असे सांगितले जात होते की, अल्लाहचे वचन खरे आहे, यात शंकाच नाही. तसेच तो शेवटचा दिवस येणार, यातही मुळीच शंका नाही. तेव्हा तुम्ही म्हणत होता की, 'तो शेवटचा दिवस म्हणजे काय, आम्हाला माहीत नाही, आम्हाला वाटते, ती केवळ एक अटकळ आहे. आणि आम्हाला त्याची मुळीच खात्री पटलेली

नाही.’

33 आणि (त्या दिवशी) त्यांच्या दुष्कृत्यांचे दुष्परिणाम त्यांच्यासमोर येतील. आणि त्याच शिक्षेने ते वेढले जातील, ज्याची ते खिल्ली उडवीत होते. 34 आणि त्यांना सांगितले जाईल, ‘आज आम्ही तुम्हाला विसरून जाऊ ज्याप्रमाणे तुम्ही या दिवसाला तुम्हाला सामोरे जावे लागेल, हे विसरून बसले होता. आणि तुमचे वास्तव्याचे ठिकाण (नरकाची) आग आहे. आणि तुमचा कोणीही साहाय्यकर्ता असणार नाही. 35 हे यामुळे की, तुम्ही अल्लाहच्या संदेशांना उपहासाचे लक्ष्य बनविले होते आणि या जगातील जीवनाने तुमची फसवणूक केली.’ आज ना त्यांना आगीतून बाहेर काढले जाईल, ना त्यांना स्वत:ची सुधारणा करण्याची संधी दिली जाईल.

36 आणि सर्व स्तुती अल्लाहसाठीच आहे, जो मालक आहे आकाशाचा आणि मालक आहे पृथ्वीचा आणि मालक आहे संपूर्ण सृष्टीचा. 37 सर्व महानता त्याचीच आहे आकाशात आणि पृथ्वीवर. तो सर्वशक्तिमान आहे, अस्सल बुद्धिमान आहे!

# सूरह–४६. अल–अहक़ाफ़

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 हा० मीम० 2 हा ग्रंथ सर्वशक्तिमान व बुद्धिमान अशा अल्लाहकडून प्रकट करण्यात आलेला आहे. 3 आम्ही आकाश व पृथ्वी यांना आणि या दोहोंच्यामध्ये जे–जे आहे, ते सर्व अर्थपूर्ण उद्देशांसहित आणि एका निश्चित कालावधीसाठी निर्माण केलेले आहे. आणि जे लोक या सत्याला नाकारतात, जेव्हा त्यांना याद्वारे सचेत केले जाते, तेव्हा ते याकडे पाठ फिरवतात.

4 त्यांना विचारा, ‘तुम्ही त्यांच्याविषयी खरोखर कधी चिंतन केले आहे का, ज्यांचा तुम्ही अल्लाहला सोडून धावा करीत असता?’ मला दाखवा, पाहू

की, त्यांनी पृथ्वीवर काही निर्माण केलेले आहे किंवा आकाशाच्या (निर्मितीत)
त्यांची काही भागीदारी आहे? (असे असेल तर आपल्या समर्थनात) यापूर्वी
प्रकट झालेला एखादा ग्रंथ किंवा आधीपासून चालत आलेले व बुद्धीला पटणारे
एखादे प्रमाण माझ्या समोर प्रस्तुत करा. जर तुमच्या दाव्यात काही तथ्य असेल
तर........ 5 त्यापेक्षा अधिक वाट चुकलेला कोण असू शकतो, जो अल्लाहला
सोडून अशांचा धावा करतो, जे पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत त्याच्या हाकेला
उत्तर देऊ शकत नाहीत. कारण त्यांना त्यांचा धावा करणाऱ्यांची जाणीवदेखील
होत नाही. 6 आणि (न्यायाच्या दिवशी संपूर्ण) मानवजात एकत्रित आणली
जाईल, तेव्हा ते (कल्पित उपास्य उलट) त्या (उपासकांचेच) शत्रू बनतील.
आणि त्यांची उपासना पूर्णपणे झिडकारून लावतील.

7 आणि जेव्हा त्यांना आमचे स्पष्ट संदेश ऐकविले जातात. तेव्हा सत्याचा
संदेश (स्पष्टरित्या) त्यांच्याकडे पोहोचल्यानंतर देखील, सत्य नाकारणारे लोक
सत्याविषयी म्हणतात, 'हा स्पष्टपणे मंत्रमुग्ध करणाऱ्या वक्तृत्वाचा प्रकार आहे.'
8 त्यांना असे म्हणायचे आहे की काय, पैगंबराने हे (कुराण) आपल्या मनाने
रचले आहे? (पैगंबर!) त्यांना सांगा, 'मी जर यास माझ्या मनाने रचले असेल
तर अल्लाहपासून मला तुम्ही अजिबात वाचवू शकणार नाही. (आणि) ज्या व्यर्थ
गोष्टी (अविचारपूर्वक) तुम्ही बोलत आहात, त्या तो चांगले जाणतो. तो माझ्या
आणि तुमच्या दरम्यान साक्ष म्हणून पुरेसा आहे. तो फार क्षमाशील आणि दयाळू
आहे.'

9 (पैगंबर!) त्यांना सांगा, 'मी काही पहिला (व इतरांपेक्षा वेगळा) पैगंबर
नाही. आणि (इतर सर्व पैगंबरांप्रमाणे) मी जाणत नाही की, माझ्या बाबतीत
काय होणार आहे आणि तुमच्या बाबतीत काय होणार आहे. मी केवळ त्याचे
अनुसरण करतो, जे माझ्याकडे प्रकट केले जाते. आणि माझे काम फक्त
तुम्हाला सावध करणे आहे.' 10 (पैगंबर!) त्यांना विचारा, 'हे कुराण, खरोखर

अल्लाहकडून आलेला असतानाही तुम्ही त्यास नाकारत आहात, तर (याचे काय परिणाम होतील) याबद्दल तुम्ही कधी विचार केलात का?' आणि बनी इस्राईल (म्हणजे आधीच्या ग्रंथधारकांपैकी) एका (गटाने) याचसारख्या ग्रंथाच्या (आगमनाची) ग्वाही देऊन त्यावर श्रद्धा धारण केलेली आहे. पण तुम्ही मात्र अहंकाराचे प्रदर्शन करता. नि:संदेह, अल्लाह दुराचारी लोकांना सन्मार्ग दाखवीत नसतो.

11 आणि जे लोक सत्य नाकारण्यावर आग्रही आहेत, ते श्रद्धा धारण केलेल्या लोकांसंबंधाने म्हणतात, 'जर या कुराणात काही चांगले असते तर त्याचा स्वीकार करण्याच्या बाबतीत, हे आमच्यावर आघाडी मारूच शकले नसते.' आता जेव्हा त्यांनी या (कुराणाच्या) मार्गदर्शनापासून वंचित राहण्याचा मार्ग निवडला, तर ते म्हणतील, 'हे अन्य काही नसून पूर्वापार चालत आलेले असत्य आहे.'

12 आणि यापूर्वी मूसाचा ग्रंथ (लोकांसाठी) मार्गदर्शन व कृपेच्या रूपात (आम्ही) पाठविला होता. आणि हा अरबी भाषेतील ग्रंथ पूर्वीच्या (ग्रंथातील) सत्यता प्रमाणित करतो आहे. याचा उद्देश वाईट कृत्ये करणाऱ्यांना (वाईट परिणामांपासून) सावध करणे आणि चांगली कृत्ये करणाऱ्यांना (चांगल्या परिणामाची) शुभवार्ता देणे हा आहे. 13 जे लोक म्हणतात की, 'आमचा पालनकर्ता अल्लाह आहे.' मग ते त्या (श्रद्धेवर) अढळपणे कायम राहतात, तर अशा लोकांना कोणत्याही प्रकारे भय किंवा दु:खाचा अजिबात स्पर्श होणार नाही, हे निश्चित! 14 हेच लोक स्वर्गनिवासी असतील, जे तिथे कायम वास्तव्य करतील. त्यांनी केलेल्या कृत्यांचे हे बक्षीस असेल.

15 आणि आम्ही (सर्वोत्तम कृत्यांपैकी) आपल्या आईवडिलांशी विनयपूर्वक वागणे हे माणसावर एक आवश्यक कृत्य ठरविले आहे. त्याची आई त्यास मोठ्या कष्टासह आपल्या पोटात ठेवते. आणि मोठ्या कष्टाने त्यास जन्म देते.

(पोटात ठेवणे व) दूध पाजवणे ही प्रक्रिया पूर्ण होण्यास (कमीत कमी) तीस महिने लागतात (या काळात बाळ पूर्णपणे केवळ आईवर विसंबून असतो). आणि पुढे जेव्हा वयाचे चाळीस वर्ष पूर्ण करून पूर्णपणे परिपक्व बनतो, (तेव्हा सदाचारी माणूस अल्लाहकडे) अशी प्रार्थना करू लागतो, 'हे प्रभू! मला अशी शक्ती प्रदान कर की, तू माझ्यावर व माझ्या आईवडिलांवर केलेल्या अनुग्रहाची जाण बाळगून, मी तुझ्याप्रति (खऱ्या अर्थाने) आभार व्यक्त करणारा बनावे! आणि मी अशी सत्कृत्ये करावीत की, ज्याद्वारे तू खूश व्हावेस. तसेच (हे प्रभू!) माझ्या संततीत सत्कृत्य करणारेच जन्माला यावेत. मी पूर्णपणे तुझ्याकडे वळलो आहे. आणि मी तुला समर्पित झालेल्यांपैकी आहे.' 16 हे असे लोक आहेत ज्यांच्या चांगल्या कृत्यांचा आम्ही स्वीकार करू, आणि त्यांच्या वाईट कृत्यांकडे आम्ही दुर्लक्ष करू. ते स्वर्गनिवासीयांपैकी आहेत. हे त्यांना दिलेले सच्चे (व पक्के) वचन आहे.

17 आणि (कोणी असाही आहे), जो आपल्या आईवडिलांविषयी असे बोलतो, 'तुमचा धिक्कार असो! तुम्ही मला असे भय दाखवता की, (मृत्युपश्चात) मला पुन्हा जिवंत करून कबरीतून बाहेर काढले जाईल. (कशाला अशा धमक्या देता?) वस्तुस्थिती ही आहे की, माझ्यापूर्वी कित्येक पिढ्या दफन झाल्या (पण त्यांच्यापैकी कोणीही जिवंत झाला नाही?)' ते अल्लाहकडे मदतीची याचना करतात आणि (मुलाला) म्हणतात, 'अरे अभाग्या! श्रद्धा धारण कर, निश्चितच अल्लाहचे वचन खरे आहे.' तो त्यांना उलट उत्तर देतो, 'हे अन्य काही नसून आधीच्या लोकांच्या कथा आहेत.' 18 हे असे लोक आहेत, ज्यांच्याबाबतीत अल्लाहचा नियम खरा ठरला, ज्याप्रमाणे यांच्यापूर्वीच्या जिन्न व माणसांपैकी (अपराधी) समूहांच्या बाबतीत खरा ठरला होता. निश्चितपणे हे सर्व नाश पावणारे आहेत.

19 (यानंतरच्या जीवनात) सर्वांना त्यांच्या कृत्यांनुसार दर्जानिहाय स्थान

मिळेल. आम्ही सर्वांना त्यांच्या कृत्यांचा पुरेपूर मोबदला प्रदान करू. आणि कोणावरही अन्याय केला जाणार नाही. [20] आणि ज्या दिवशी सत्य नाकारणाऱ्या लोकांना (नरकाच्या) आगीसमोर आणण्यात येईल (तेव्हा त्यांना सांगितले जाईल), 'तुम्ही ऐहिक जीवनातच चांगल्या गोष्टींपैकी (आधीच) आपला हिस्सा घेऊन (मृत्यूनंतरच्या जीवनाचा जरासाही विचार न करता) भरपूर उपभोग केला आहे. आज तुम्हाला अपमानजनक शिक्षा दिली जाईल, कारण तुम्ही भूतलावर, तुम्हाला कोणतेच हक्क नसतानाही, अहंकाराचे प्रदर्शन करीत होता, आणि तुम्ही विद्रोही बनून राहिलात.'

[21] आणि लोकांना आदचा भाऊ (हूद)ची आठवण करून द्या, त्याने अहक़ाफ (या भूप्रदेशात राहणाऱ्या) आपल्या लोकांना (अल्लाहच्या शिक्षेपासून) सावध केले होते. सावध करणारे (पैगंबर) त्याच्या आधीही आले होते आणि त्याच्या नंतरदेखील आले. (सर्वांचा एकच संदेश होता की), '(लोकांनो!) केवळ अल्लाहचीच उपासना करा. मला तुमच्या बाबतीत त्या भयंकर दिवसाच्या शिक्षेचे भय वाटते.' [22] पण ते म्हणाले, 'तू आमच्याकडे यासाठी आला आहेस की, आम्हाला आमच्या उपास्यांपासून दूर करावे? तुझ्या म्हणण्यात काही सत्य असेल तर घेऊन ये आमच्यावर (ती शिक्षा), ज्याची तू आम्हाला धमकी देत आहेस.' [23] (त्यावर) तो म्हणाला, '(ती शिक्षा केव्हा येईल?) याचे ज्ञान केवळ अल्लाहला आहे. मी तर केवळ तुम्हाला तो संदेश ऐकवीत आहे, जो देऊन मला पाठविण्यात आलेले आहे. पण मी पाहतो की, तुम्ही अज्ञानात (बुडालेले) लोक आहात.'

[24] मग जेव्हा त्यांनी (त्या शिक्षेस) ढगांच्या रूपात त्यांच्या दऱ्याखोऱ्यांकडे येत असल्याचे पाहिले. तेव्हा ते म्हणाले, 'हे आमच्यासाठी पाऊस घेऊन येत आहेत.' (पण हूदने म्हटले की,) नाही, ही तीच गोष्ट आहे, जी यावी म्हणून तुम्ही घाई करीत होता (म्हणजेच अल्लाहचा प्रकोप). वादळी वारा — ज्यात

दु:खदायी शिक्षा आहे. [25] ते वादळ आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेने सर्व काही उध्वस्त करून टाकेल. मग त्याचा परिणाम असा झाला की, (उध्वस्त झालेल्या) त्यांच्या घरांशिवाय तिथे आणखी काही दिसत नव्हते. अपराध्यांना अशाप्रकारे आम्ही शिक्षा देत असतो.

[26] आणि आम्ही त्या लोकांना ज्या गोष्टींत प्रभुत्व प्रदान केले होते, त्या गोष्टींत तुम्हाला प्रभुत्व प्रदान केलेले नाही. आम्ही त्यांना कान, डोळे आणि हृदये (सर्व काही) दिले होते, पण त्यांचे कान त्यांच्या कामी आले नाहीत, ना त्यांचे डोळे, ना त्यांची हृदये. कारण ते अल्लाहच्या संदेशांना नाकारत राहिले. तर त्यांना त्याच गोष्टीने वेढले, जिला ते उपहासाचे लक्ष्य बनवीत असत. [27] आणि आम्ही तुमच्या आसपासच्या परिसरातही एकेकाळी (समृद्ध) अशा वसत्यांना नष्ट करून टाकले. आम्ही त्यांनी सन्मार्गाकडे वळावे म्हणून, त्यांना विविध खुणा, पुन्हा–पुन्हा दाखविल्या होत्या. [28] तर मग त्यांनी अल्लाहशिवाय इतरांना त्याचे सान्निध्य प्राप्त करण्यासाठी आपले उपास्य बनविले होते, त्यांनी त्यांना मदत का केली नाही. नाही, (वस्तुस्थिती ही आहे की,) त्यांनी यांचा त्याग केला, कारण या सर्व त्यांच्या खोट्या गोष्टी होत्या, ज्या त्यांनी स्वत:हून रचल्या होत्या.

[29] (एकदा) आम्ही जिन्नांच्या एका समूहाला (जे कुराण ऐकू इच्छित होते,) तुमच्याकडे आणले होते. जेव्हा ते (कुराण) ऐकू लागले, तेव्हा ते एकमेकांना म्हणाले, 'पूर्णपणे शांत होऊन ते लक्षपूर्वक ऐका.' आणि जेव्हा कुराणाचे पठण संपले, तेव्हा ते (सावध करणारे बनून) आपल्या लोकांकडे परत गेले. [30] ते (आपल्या लोकांना) म्हणाले, 'आमच्या बांधवांनो! आम्ही एक असा ग्रंथ ऐकला, जो मूसानंतर प्रकट करण्यात आलेला आहे. त्या सत्यास प्रमाणित करणारा आहे, जे (मूसाच्या ग्रंथापैकी) अद्याप शिल्लक आहे. तो ग्रंथ सत्याकडे आणि सन्मार्गाकडे मार्गदर्शन करणारा आहे. [31] आमच्या

बांधवांनो! अल्लाहकडे येण्याचे आवाहन करणाऱ्यास प्रतिसाद द्या. आणि त्याच्यावर श्रद्धा धारण करा. अल्लाह तुमच्या चुका माफ करून टाकेल. आणि दुःखदायी शिक्षेपासून तुम्हाला वाचवेल. 32 आणि जो कोणी अल्लाहकडे येण्याचे आवाहन करणाऱ्या पैगंबरास प्रतिसाद देणार नाही. तो भूतलावर कुठेही पळून जाऊन अल्लाहच्या नियंत्रणातून स्वतःची कधीही सुटका करून घेऊ शकत नाही. आणि अल्लाहशिवाय दुसरा कोणीही त्याला साहाय्यकर्ता म्हणून लाभणार नाही. असेच लोक स्पष्टरित्या वाट चुकलेले लोक आहेत.'

33 (मृत्युपश्चात जीवनाला नाकारणाऱ्या लोकांनी) या गोष्टीचे कधी (चिंतनपूर्वक) अवलोकन केले नाही का की, तो अल्लाह ज्याने आकाश आणि पृथ्वी यांची निर्मिती केली आहे, तसेच तो त्यांच्या निर्माण कार्यामुळे मुळीच थकला नाही, त्यालाच या गोष्टीचेही सामर्थ्य प्राप्त आहे की, तो मेलेल्यांना जिवंत करू शकतो. होय! त्याला प्रत्येक गोष्टीवर पूर्ण नियंत्रण प्राप्त आहे. 34 आणि ज्या दिवशी हे, सत्य नाकारण्यावर आग्रही राहिलेले लोक, नरकाच्या आगीसमोर आणले जातील, (तेव्हा त्यांना विचारले जाईल) की, 'हे सत्य नाही का?' ते उत्तर देतील, 'होय आमच्या पालनकर्त्याची शपथ (हे सत्यच आहे).' तेव्हा अल्लाह म्हणेल, 'तर आता चाखा शिक्षेची चव, सत्य नाकारण्याच्या मोबदल्यात.'

35 (पैगंबर!) ज्याप्रमाणे आधीच्या दृढनिश्चयी पैगंबरांनी सहनशीलतेचे प्रदर्शन केले होते, त्याचप्रमाणे तुम्हीही सहनशीलता बाळगा आणि त्यांच्या बाबतीत घाई करू नका. ज्या दिवशी ते त्या (शिक्षेस) पाहतील, जिचे त्यांना भय दाखवण्यात येत आहे, तेव्हा त्यांना असे वाटायला लागेल की, ते (पृथ्वीवर) केवळ दिवसातील एखादा तासापेक्षा जास्त मुक्काम केले नाहीत. (तुमची जबाबदारी) केवळ संदेश पोचविणे आहे. (त्या दिवशी) अवज्ञाकारी लोकांशिवाय दुसरा कोणीही नाश पावणार नाही.

# सूरह–४७. मुहम्मद

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 अल्लाह त्या लोकांची कृत्ये निष्फळ करून टाकेल ज्यांनी सत्य स्वीकारण्यास
नकार दिला. आणि (इतरांनाही) अल्लाहच्या मार्गाकडे जाण्यापासून अडवणूक
केली. 2 याउलट जे लोक सत्य श्रद्धेचा अंगीकार करून सत्कृत्ये करतात
आणि जे पैगंबर मुहम्मद यांच्याकडे प्रकट करण्यात आले आहे, त्यावर दृढ
विश्वास ठेवतात. कारण तेच सत्य आहे, त्यांच्या पालनकर्त्याकडून प्रकट
करण्यात आलेले. अल्लाह अशा लोकांच्या (हातून घडलेली) दुष्कृत्ये त्यांच्यापासून
दूर करून टाकेल आणि त्यांच्या स्थितीत सुधारणा करेल. 3 हा (फरक) या
कारणामुळे आहे की, ज्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला त्यांनी (अर्थातच)
असत्याचे अनुसरण केले. आणि ज्यांनी श्रद्धा धारण केली, त्यांनी (अर्थातच)
सत्याचे अनुसरण केले, जे त्यांच्याकडे त्यांच्या पालनकर्त्याकडून आलेले
आहे. अशाप्रकारे अल्लाह लोकांना (सत्याची जाण व्हावी यासाठी) त्यांच्यासमोर
विविध उदाहरणे प्रस्तुत करीत असतो.

4 आणि सत्य नाकारणाऱ्या लोकांशी युद्धात तुमचा सामना झाला, तर
त्यांच्या माना उडवा, आणि त्यांचे पूर्णपणे पराभव झाल्यानंतर त्यांना युद्धकैदी
बनवून आपल्या ताब्यात घ्या. मग (त्यांचा जोर मोडून काढल्यानंतर) तुम्ही
त्यांना एकतर अनुग्रह दाखवून सोडून देऊ शकता किंवा युद्धदंड वसूल करून
सोडू शकता, (पण) युद्ध पूर्णपणे समाप्त झाल्यानंतरच असे तुम्हाला करायचे
असेल. अल्लाहने इच्छिले असते तर त्याने (स्वत:च) त्यांना शिक्षा केली
असती. पण तुमच्यापैकी काहींची काहींद्वारे परीक्षा पाहावी, हा त्याचा उद्देश
होता. आणि जे लोक अल्लाहच्या कार्यासाठी लढताना मारले जातात, अल्लाह
अशा लोकांची कृत्ये कदापि वाया जाऊ देत नाही. 5 तो त्यांना मार्गदर्शन

करेल, आणि त्यांच्या स्थितीत सुधारणा करेल. [6] आणि त्यांना त्या स्वर्गात प्रवेश देईल. ज्याची ओळख त्यांना आधीच करवून दिली आहे.

[7] इमान धारण केलेल्या लोकांनो! तुम्ही अल्लाहची मदत कराल (म्हणजे त्याच्या कार्यात प्रयत्नांची पराकाष्ठा कराल) तर तो देखील तुम्हाला मदत करेल. आणि त्याच्या मार्गावर अढळपणे कायम राहण्यासाठी तुमच्या पावलांना दृढता प्रदान करेल. [8] पण जे लोक सत्य नाकारण्यावर ठाम राहिले, ते अटळरित्या नष्ट होणारे आहेत. आणि अल्लाह त्यांच्या कृत्यांना निष्फळ करून टाकेल. [9] याचे कारण हे आहे की, त्यांना ती गोष्टी नापसंत आहे, जी अल्लाहने प्रकट केलेली आहे. परिणामी, अल्लाहने त्यांची कृत्ये निष्फळ करून टाकली. [10] या लोकांनी भूतलावर संचार करून कधी (चिंतनपूर्वक) अवलोकन केले नाही का की, त्यांच्यापूर्वीच्या (दुराग्रही अपराध्यांचा) शेवट कसा झाला? अल्लाहने त्यांना समूळ नष्ट केले. अशीच अवस्था (शेवटी सर्वच) सत्य नाकारणाऱ्यांची होणार आहे. [11] असे यासाठी होणार, कारण अल्लाह श्रद्धावंतांचा वाली आहे. पण श्रद्धाहीनांचा कोणीही वाली नाही.

[12] नि:संदेह, अल्लाह श्रद्धा धारण करून सत्कर्मे केलेल्या लोकांना अशा बागांत प्रवेश देईल, ज्यांमधून पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह वाहत असतील. तर याउलट सत्याचा अस्वीकार करण्यावर ठाम राहिलेले लोक, याच जगात सुख भोगत आहेत, ज्याप्रमाणे जनावरे खातात त्याप्रमाणे (ते) खात आहेत. पण त्यांचे अंतिम निवासस्थान नरकाच्या आगीत आहे. [13] (पैगंबर!) तुम्हाला बाहेर घालवून देणाऱ्या या वस्तीपेक्षा कितीतरी पटीने अधिक बलशाली लोकांच्या कित्येक वस्त्या होत्या, ज्यांना आम्ही नष्ट करून टाकले आहे. आणि त्यांना कोणीही साहाय्यकर्ता लाभला नाही.

[14] जो आपल्या पालनकर्त्याकडून आलेल्या स्पष्ट प्रमाणावर अढळपणे कायम आहे; तो त्याच्यासारखा होऊ शकतो का, जो वाईट कृत्यांना चांगली

समजून करीत असतो. तसेच त्या लोकांसारखा (होऊ शकतो का), जे आपल्या वाईट इच्छा–आकांक्षांच्या मागे धावत आहेत. 15 (अल्लाहची) जाण बाळगून (जीवन जगणाऱ्यांना) ज्या स्वर्गाचे वचन देण्यात आलेले आहे, त्याचे संक्षिप्त वर्णन असे आहे की, तेथे पाण्याचे असे प्रवाह वाहत असतील, ज्याची शुद्धता सदैव कायम राहील. आणि अशा दुधाच्या नद्या असतील, ज्याचे स्वाद कधीही बदलणार नाही. तसेच मद्याच्या नद्या असतील, जे (मद्य) पिणाऱ्यांसाठी फारच रुचकर असेल. आणि शुद्ध मधाच्या नद्या असतील. आणि तिथे स्वर्गनिवासीयांसाठी सर्व प्रकारची फळे असतील आणि त्यांना त्यांच्या पालनकर्त्याकडून क्षमा प्राप्त होईल. सर्व प्रकारे सुखांचा उपभोग करणारे, हे स्वर्गनिवासी त्या लोकांसारखे होऊ शकतात का, जे सदैव नरकाच्या आगीत वास्तव्य करतील, ज्यांना तिथे पिण्यासाठी उकळते पाणी दिले जाईल, जे त्यांची आतडी फाडून टाकेल?

16 (पैगंबर! लोकांमध्ये) काही असेही आहेत, जे तुमचे म्हणणे लक्ष देऊन ऐकण्याचे (सोंग करतात). आणि जेव्हा तुमच्यापासून उठून निघून जातात, तेव्हा ते त्या लोकांना विचारतात, ज्यांना (धर्माचे) ज्ञान देण्यात आलेले आहे की, (पैगंबर) आता काय म्हणत होते? हे असे लोक आहेत, ज्यांच्या मनांची द्वारे अल्लाहने सीलबंद करून टाकलेली आहेत. आणि ते आपल्या इच्छांचे अनुसरण करणारे आहेत. 17 पण जे लोक (गंभीरतापूर्वक) सन्मार्गाचा अंगीकार करतात तर अल्लाह त्यांना अधिकाधिक मार्गदर्शन करतो. आणि अल्लाहची जाण बाळगण्याच्या त्यांच्या गुणात आणखी वाढ करतो.

18 हे लोक (ज्यांची हृदये सील करून टाकण्यात आलेली आहे,) आता (फक्त) अंतिम घटका यांच्यावर अचानकपणे येण्याची वाट पाहत आहेत. तिच्या खुणा तर प्रकट झालेल्याच आहेत. पण जेव्हा ती प्रत्यक्ष येऊन जाईल, तेव्हा उपदेश ग्रहण करण्याची यांना संधी कुठे मिळणार? 19 तर हे नीट जाणून

घ्या की, अल्लाहशिवाय दुसरा कोणीही उपास्य नाही. आणि आपल्या चुकांबद्दल (अल्लाहकडे) क्षमायाचना करा. तसेच श्रद्धावंत पुरुष व स्त्रियांसाठी क्षमायाचना करा. आणि तुम्ही कुठे हिंडता-फिरता आणि कुठे मुक्काम करता, ते सर्व अल्लाहला मा हीत आहे.

[20] श्रद्धावंत लोक विचारतात, '(युद्धाची परवानगी देणारे) एखादे अध्याय का प्रकट केले जात नाही?' पण जेव्हा युद्धाचा स्पष्ट आदेश असलेला एखादा अध्याय प्रकट केला जातो, तेव्हा तुम्ही पाहू शकता की, ज्यांच्या हृदयांत विकृती आहे, (पैगंबर!) तुमच्याकडे ते अशाप्रकारे पाहू लागतात, जणू आता मृत्यूने (चहूबाजूंनी) त्यांना वेढले आहे. धिक्कार असो अशा (ढोंगी) माणसांचा!
[21] (पैगंबराचे) आज्ञापालन करणे आणि योग्य तेच बोलणे (हेच त्यांच्यासाठी आवश्यक होते). आणि (प्रकट झालेल्या संदेशाद्वारे) एखाद्या गोष्टीचा निर्णय झाल्यानंतर, ते अल्लाहप्रति निष्ठावंत राहिले असते तर त्यातच त्यांचे भले होते.
[22] (त्यांना विचारा) तुमच्याविषयी यापेक्षा वेगळी काय अपेक्षा केली जाऊ शकते की, तुम्हाला अधिकार प्राप्त झाले तर तुम्ही (अल्लाहच्या आदेशाकडे पाठ दाखवून) भूतलावर उपद्रव माजवाल आणि आप्तसंबंधांची (पर्वा न करता) त्यांना तोडून टाकाल? [23] हेच ते लोक आहेत ज्यांना अल्लाहने धिक्कारले आहे. आणि त्यांना (सत्य संदेश ग्रहण करण्याच्या बाबतीत कानाने) बहिरे आणि डोळ्याने आंधळे करून टाकले आहे.

[24] लोक, या कुराणाच्या (संदेशांवर) चिंतन करीत नाहीत का? किंवा त्यांच्या मनांना कुलपे आहेत? [25] जे लोक मार्गदर्शन त्यांच्याकडे सुस्पष्टपणे पोचल्यानंतर देखील (त्याकडे) पाठ दाखवतात, (ते असे केवळ यासाठी करतात, कारण) सैतानाने त्यांच्या कल्पनांना अधिक सुंदर असल्याचे भासवून त्यांना खोट्या आशा दाखवल्या आणि अल्लाहने त्यांना उसंत दिली. [26] याचे कारण अल्लाहने प्रकट केलेल्या संदेशांचा ज्या लोकांना तिटकारा वाटतो, त्यांना

हे म्हणतात, 'काही बाबतीत आम्ही तुमचे म्हणणे मान्य करू.' पण अल्लाहला त्यांच्या सर्व गुप्त गोष्टींची जाणीव आहे. 27 मग जेव्हा मृत्युदूत यांच्या चेहऱ्यांवर आणि पाठींवर ठोसे लगावून प्राण काढतील, तेव्हा यांची काय अवस्था होईल. 28 याचे कारण हे आहे की, त्यांनी त्या मार्गाचे अनुसरण केले, जो अल्लाहला क्रोधीत करणारा होता. आणि त्याला प्रिय असलेल्या मार्गाचा मात्र त्यांनी तिरस्कार केला. परिणामी अल्लाहने त्यांची कृत्ये निष्फळ करून टाकली.

29 ज्या लोकांच्या मनात विकृती आहे, त्यांना असे वाटते की काय? अल्लाह त्यांच्या द्वेषाला कधीच उजेडात आणणार नाही? 30 आणि आम्ही इच्छिले असते, तर आत्ताच त्यांचे पितळ तुमच्यासमोर उघडे केले असते. आणि त्यांच्या फक्त लक्षणावरूनच तुम्ही त्यांना ओळखले असते. (तरीही) त्यांच्या (केवळ) बोलण्यावरून तुम्ही त्यांना अवश्य ओळखू शकाल. (हे मानवा!) अल्लाह तुझ्या प्रत्येक कृत्याला जाणून आहे.

31 (श्रद्धावंतांनो!) आम्ही तुम्हा सर्वांची अवश्य कसोटी पाहणार, जोपर्यंत आम्ही त्या लोकांना चिन्हांकित करत नाही, जे (अल्लाहच्या कार्यासाठी) जिहाद (म्हणजे प्रयत्नांची पराकाष्ठा) करणारे आहेत आणि (सन्मार्गावर) अढळ राहणारे आहेत. (अशाप्रकारे) आम्ही तुमची उक्ती (आणि कृती यांचे सत्य) अजमावून पाहू. 32 निश्चितच जे लोक सत्याचा अस्वीकार करतात आणि (इतरांनाही) अल्लाहच्या मार्गापासून परावृत्त करतात. (अल्लाहचे) मार्गदर्शन त्यांच्याकडे स्पष्टरित्या पोचल्यानंतरही पैगंबराचा विरोध करतात. असे (लोक) कोणत्याही प्रकारे अल्लाहचे नुकसान करू शकत नाहीत. आणि तो त्यांच्या कृत्यांना परिणामशून्य बनवून टाकेल.

33 श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! अल्लाहच्या आज्ञेचे पालन करा, व पैगंबराच्या आज्ञेचे पालन करा. आणि आपल्या कृत्यांना वाया जाऊ देऊ नका. 34 नि:संदेह, जे लोक सत्याचा अस्वीकार करतात आणि इतरांनाही अल्लाहच्या

मार्गापासून रोखतात. आणि सत्य नाकारणारे राहूनच मृत्यू पावतात. अल्लाह अशा लोकांना कधीही माफ करणार नाही. [35] (न्याय्य कार्यासाठी लढताना, श्रद्धावंतांनो!) आपले मन अजिबात खचू देऊ नका. आणि शांतीचा करार करण्यासाठी आवाहन करू नका. (लक्षात ठेवा), तुम्हीच वरचढ ठराल, (कारण) अल्लाह तुमच्या बरोबर आहे. आणि तो तुमच्या (चांगल्या) कृत्यांना कदापि वाया जाऊ देणार नाही.

[36] या जगातील जीवन खेळ व तमाशाशिवाय, अन्य काहीच नाही. पण जर तुम्ही (अल्लाहवर) विश्वास ठेवणारे आणि त्याची जाण ठेवून (जीवन व्यतीत करणारे) असाल तर तो तुम्हाला तुमच्या (श्रमाचा) पुरेपूर मोबदला देईल. आणि तो तुम्हाला तुमची (सर्व) धनसंपत्ती (त्याच्या कार्यासाठी) त्याग करून टाका, असे म्हणणार नाही. [37] जर त्याने तुमची सर्व धनसंपत्तीची मागणी केली आणि त्यासाठी तुमच्याकडे आग्रह धरला तर तुम्ही अवश्य कृपणता दाखवाल. परिणामी तुमच्या मनातील द्वेष प्रकाशात येऊन जाईल. [38] (श्रद्धावंतांनो! लक्ष देऊन ऐका,) तुम्हाला अल्लाहच्या कार्यात आपले धन खर्च करण्याचे आवाहन केले जाते. पण तुमच्यामध्ये कोणी असा आहे, जो कृपण आहे. पण जो कोणी (अल्लाहच्या कार्यात) कृपणतापूर्वक व्यवहार करतो तर तो (खरे पाहता) स्वत:शीच कृपणतापूर्वक व्यवहार करतो. वस्तुस्थिती ही आहे की, केवळ अल्लाह आत्मनिर्भर (व स्वयंपूर्ण) आहे आणि तुम्ही सर्व त्याचे गरजवंत आहात. जर तुम्ही (त्याच्याकडे) पाठ फिरवाल तर तो तुमच्याजागी अन्य लोकांना घेऊन येईल, जे तुमच्यासारखे असणार नाहीत.

## सूरह-४८. अल-फ़त्ह

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] (पैगंबर!) आम्ही तुम्हाला स्पष्ट विजय प्रदान केलेला आहे (म्हणजे

शांततापूर्ण विजयाची दारे खुली केली आहेत). [2] (या शांतताकराराद्वारे लाभलेल्या शांततामय वातावरणाचा भरपूर उपयोग करून अल्लाहचा संदेश लोकांपर्यंत पोहोचविण्यासाठी स्वत:ला वाहून टाका) परिणामी अल्लाह तुमच्या आधीच्या वा पुढच्या सर्व चुका माफ करून टाकेल. आणि तो तुमच्यावर आपला पुरेपूर अनुग्रह करेल. आणि तुम्हाला सरळ मार्ग दाखवेल. [3] आणि तो तुम्हाला जबरदस्त साहाय्य प्रदान करेल.

[4] त्यानेच श्रद्धावंतांना आपल्याकडून मन:शांती प्रदान केली. यासाठी की, त्यांच्या आधीपासून असलेल्या श्रद्धेत आणखी दृढता लाभावी. आकाश व पृथ्वीवर (तैनात) असलेल्या सैन्यांचा मालक अल्लाह आहे. आणि अल्लाह सर्व काही जाणणारा व अस्सल बुद्धिमान आहे. [5] कारण अल्लाह श्रद्धावंत पुरुष व श्रद्धावंत स्त्रियांना अशा स्वर्गांत दाखल करू इच्छितो, ज्यातून पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह वाहत असतील. ते तिथे कायम वास्तव्य करतील. आणि तो त्यांची वाईट कृत्ये त्यांच्यापासून दूर करून टाकेल. अल्लाहच्या दृष्टीने हेच सर्वोत्तम यश होय. [6] दांभिक पुरुष व स्त्रिया तसेच अनेकेश्वरवादी पुरुष व स्त्रिया यांना शिक्षा करण्याची (त्याची योजना आहे,) जे अल्लाहविषयी वाईट विचार बाळगून असतात. याचे दुष्परिणाम त्यांना चहूबाजूंनी वेढेल. आणि त्यांच्यावर त्याचा कोप झालेला आहे. आणि त्याने त्यांना धिक्कारलेले आहे. आणि त्यांच्यासाठी त्याने नरक तयार ठेवलेला आहे. खरोखर, ते फार वाईट ठिकाण आहे. [7] आकाश व पृथ्वीवर असलेल्या (स्वर्गदूतांच्या) सेनेचा मालक अल्लाह आहे. आणि अल्लाह खरोखर सर्वशक्तिमान आहे व अस्सल बुद्धिवान आहे.

[8] (पैगंबर!) आम्ही तुम्हाला (सत्याची) साक्ष देणारा, आणि शुभवार्ता ऐकविणारा आणि (आमच्या शिक्षेपासून) सावध करणारा बनवून (यासाठी) पाठवले आहे [9] की, (लोकांनी!) अल्लाहवर व पैगंबरावर विश्वास ठेवणारे बनावे आणि (पैगंबराची) मदत करावी व त्याचा आदर करावा. तसेच सकाळ–

संध्याकाळ (प्रत्येक प्रसंगी) अल्लाहचे स्तुतिगान करावे. [10] (पैगंबर!) जे लोक आपली निष्ठा प्रकट करण्यासाठी तुमच्या हातावर हात ठेवून प्रतिज्ञा करीत आहेत, वस्तुत: ते अल्लाहशी प्रतिज्ञा करीत आहेत. (जणू) अल्लाहचाच हात त्यांच्या हातावर आहे. म्हणून जो कोणी (प्रतिज्ञा केल्यानंतर) तिचा भंग करेल तर त्याचे दुष्परिणाम त्याला स्वत:लाच भोगावे लागतील. आणि जो कोणी अल्लाहशी केलेली प्रतिज्ञेची पूर्तता करेल तर अल्लाह त्यास फार मोठे बक्षीस प्रदान करेल.

[11] ग्रामीण भागातील जे अरब लोक मागे राहिले, ते आता तुमच्यासमोर (खोटेनाटे निमित्त सादर करून) म्हणतील, 'आमची धनसंपत्ती व आमचे कुटुंब यांची (काळजी घेण्यातच) आम्ही व्यस्त राहिलो. (हे पैगंबर!) तुम्ही आम्हाला क्षमादान मिळावे म्हणून (अल्लाहकडे) याचना करा.' (अशाप्रकारे) हे लोक आपल्या तोंडाने त्या गोष्टी बोलत आहेत, वस्तुत: ज्या त्यांच्या मनात नाहीत. (पैगंबर!) त्यांना सांगा, 'अल्लाहने जर तुम्हाला हानी किंवा लाभ पोचविण्याचे ठरविले असेल, तर तो कोण आहे जो अल्लाहच्या विरुद्ध तुमच्यासाठी काही करू शकेल?' (अर्थातच कोणीच नाही). (लक्षात ठेवा) तुम्ही जे काही करीत आहात, त्या प्रत्येक गोष्टीची अल्लाहला पूर्ण जाणीव आहे. [12] 'नाही, (तसे नाही,) तुम्हाला तर असे वाटत होते की, पैगंबर व श्रद्धावंत आता आपल्या कुटुंबीयांकडे कदापि परत येणार नाहीत. आणि या विचाराने तुम्हाला मनोमनी प्रसन्न केले होते. तसेच (पैगंबर व श्रद्धावंतांविषयी) तुम्ही (तऱ्हेतऱ्हेच्या) वाईट कल्पना करीत होता. अशाप्रकारे तुम्ही नाश पावणारे लोक बनलात?' [13] सत्य नाकारणाऱ्या लोकांसाठी, जे अल्लाहवर व त्याच्या पैगंबरावर विश्वास ठेवत नाहीत, आम्ही धगधगणारी आग तयार ठेवली आहे. [14] आकाश आणि पृथ्वी यांवर अल्लाहचेच राज्य आहे. तो इच्छितो त्यास क्षमा करतो आणि इच्छितो त्यास शिक्षा करतो. अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे.

15 (श्रद्धावंतांनो!) जेव्हा तुम्ही अशा युद्धासाठी निघाल ज्यात (विजय व त्यानंतर) पराभूत पक्षाकडून धन मिळण्याचे नक्की आहे, तेव्हा मागे थांबून राहणारे लोक (म्हणजे दांभिक) म्हणतील, 'आम्हालाही तुमच्याबरोबर येऊ द्या.' (वस्तुत:) ते अल्लाहच्या वचनाला बदलून टाकू पाहतात. पण तुम्ही त्यांना सांगा, 'तुम्ही मुळीच आमच्याबरोबर येऊ शकत नाही. अल्लाहने आधीच सांगून टाकलेले आहे (की, कोणाला प्राप्त होतील).' तेव्हा ते (अवश्य) असे उत्तर देतील, 'तुम्ही आमच्याविषयी द्वेष बाळगता.' नाही, तसे नाही, वस्तुस्थिती ही आहे की, यांना सत्याची फार कमी जाण आहे.'

16 (पैगंबर!) मागे थांबून राहणाऱ्या ग्रामीण अरब लोकांना सांगा, 'तुम्हाला लवकरच फार लढवय्ये असलेल्या लोकांशी लढण्याकरिता बोलाविले जाईल. त्यांच्याशी तुम्हाला तोपर्यंत लढायचे असेल, जोपर्यंत (एकतर तुम्ही लढता-लढता वीरगती प्राप्त कराल) किंवा ते पूर्णपणे शरणागती पत्करतील. आणि तेव्हा जर तुम्ही स्वत:ला (त्या हाकेवर) आज्ञाधारक सिद्ध कराल तर अल्लाह तुम्हाला फार मोठे बक्षीस प्रदान करेल, आणि जर तुम्ही पाठ फिरवाल, ज्याप्रमाणे आधी तसे तुम्ही केला आहात, तर तो तुम्हाला कठोर शिक्षा करेल.
17 आंधळ्या, लंगड्या किंवा आजारी माणसाने (युद्धात सहभाग नोंदविला नाही तरी) त्याबद्दल त्याला दोषी धरले जाणार नाही.' जो कोणी अल्लाह व त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करेल, त्यास अल्लाह अशा बागांत प्रवेश देईल, ज्यातून पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह वाहत असतील. आणि जो कोणी पाठ फिरवेल, त्यास तो कठोर शिक्षा करेल.

18 (पैगंबर!) जेव्हा श्रद्धावंत लोक त्या झाडाखाली तुमच्याप्रति आपली निष्ठा व्यक्त करण्यासाठी प्रतिज्ञा करीत होते, (हे समर्पणभाव पाहून) अल्लाह त्यांच्यावर फार प्रसन्न झाला. अल्लाहला त्यांच्या अंत:करणामध्ये काय आहे, ते पूर्णपणे ठाऊक होते. आणि त्याने त्यांच्यावर मन:शांती अवतीर्ण केली. आणि

बक्षीस म्हणून त्यांना लवकरच येणाऱ्या विजयाची (शुभवार्ता दिली). [19] तसेच भविष्यात बरेच फायदे त्यांना मिळणार आहेत. ज्यांपैकी युद्धात पराभूत पक्षाकडून मिळणाऱ्या धनसंपत्तीचा समावेश आहे. अल्लाह सर्वशक्तिमान व बुद्धिमान आहे. [20] (श्रद्धावंतांनो!) अल्लाहने तुम्हाला भविष्यात भरपूर फायदे देण्याचे वचन दिले आहे (ज्यांपैकी एक आहे). आणि (हुदैबियाचा शांती करार म्हणजे) त्याने आगाऊरूपी तुम्हाला प्रदान केलेला (फायदा) आहे. (त्याद्वारे) त्याने लोकांचे हात तुमचा (छळ) करण्यापासून रोखून धरले. यासाठी की, तो (करार) श्रद्धावंतांसाठी एक निशाणी ठरावी. आणि त्याने तुम्हाला सरळ मार्ग दाखवावा. [21] आणि याशिवाय आणखी एक विजय बाकी आहे, ज्यावर तुम्हाला आणखी घट्ट पकड लाभलेली नाही. (पण) अल्लाहने त्यास (तुमच्यासाठी) वेढून ठेवलेले आहे, कारण अल्लाह सर्व काही करण्यास समर्थ आहे.

[22] आणि (आता) जर या सत्य नाकारणाऱ्या लोकांनी तुमच्याशी लढाई केली असती तर पाठ दाखवून अवश्य पळ काढला असता. तेव्हा त्यांना कोणी ना रक्षणकर्ता, ना साहाय्यकर्ता लाभला असता. [23] अल्लाहची कार्यपद्धती आधीपासून अशीच राहिलेली आहे. आणि त्याच्या कार्यपद्धतीत बदल झाल्याचे तुम्हाला कधीही आढळणार नाही. [24] त्यानेच मक्केच्या खोऱ्यात तुम्हाला त्यांच्यावर विजय प्रदान केल्यानंतर, त्यांचे हात तुमच्यापासून आणि तुमचे हात त्यांच्यापासून रोखून धरले. आणि अल्लाह तुमच्या सर्व कृत्यांवर नजर ठेवून आहे. [25] हेच ते लोक आहेत, जे सत्य नाकारण्यावर ठाम राहिले आणि (मक्कास्थित) पवित्र मशीदीत प्रवेश करण्यास तुम्हाला मनाई केली. तसेच बळीच्या जनावरांनाही बलिदानाच्या स्थानावर पोहोचण्यास मज्जाव केला. जर (मक्कामध्ये) अनेक श्रद्धावंत पुरुष व स्त्रिया नसत्या आणि जे अहेतुकपणे तुमच्याद्वारे चिरडले जाण्याची शक्यता नसती आणि अजाणतेपणे हा अपराध तुमच्या हातून घडल्याचा दोष तुमच्यावर आला असता. (असे नसते तर

तुम्हाला त्यांच्याशी लढण्याची परवानगी देण्यात आली असती, पण त्याने असे यासाठी केले नाही) कारण अल्लाह ज्याला इच्छील त्यास आपल्या कृपाछत्रात (म्हणजेच सत्य धर्मात) दाखल करून घेईल. जर ते (श्रद्धावंत व संभाव्य श्रद्धावंत लोक श्रद्धाहीनांपासून) वेगळे झालेले असते तर आम्ही सत्य नाकारण्यावर ठाम असलेल्या लोकांना कठोर शिक्षा केली असती.

26 जेव्हा सत्य नाकारणाऱ्या लोकांनी आपल्या अहंकारापोटी (श्रद्धावंतांच्या मक्केत प्रवेशास) प्रतिष्ठेचा मुद्दा बनवून, अज्ञानकाळात जसा अहंकार (लोक) बाळगायचे त्याचेच त्यांनी प्रदर्शन केले. तेव्हा अल्लाहने आपल्याकडून आपल्या पैगंबरावर व श्रद्धावंतांवर मनःशांती अवतीर्ण केली. आणि अल्लाहने त्यांना सदाचारावर अढळपणे कायम ठेवले. कारण हेच लोक या (अल्लाहच्या वरदानास) सर्वाधिक पात्र व योग्य होते. आणि अल्लाहला प्रत्येक गोष्टीची पूर्ण जाणीव आहे.

27 अल्लाहने आपल्या पैगंबराला स्वप्नाद्वारे सत्याचेच दर्शन घडविले होते, जे भविष्यात घडणाऱ्या सत्य घटनेवर आधारित होते. (ते असे होते की,) 'अल्लाहने इच्छिल्यास तुम्ही (मक्केतील) पवित्र मशीदीत अवश्य प्रवेश करणार, निर्भय होऊन व पूर्ण सुरक्षेसह, आणि पूर्णपणे मुंडण केलेल्या व अंशतः केस कापलेल्या अवस्थेत (प्रवेश करणार).' जी गोष्ट तुम्हाला माहीत नव्हती ती गोष्ट अल्लाह (नेहमीपासून) जाणून होता. यापूर्वीच त्याने तुम्हाला एक विजय प्रदान केलेला आहे.

28 अल्लाहनेच आपल्या (शेवटच्या) पैगंबराला मार्गदर्शन आणि सत्य धर्मासह (लोकांकडे) पाठविले आहे. यासाठी की, (यापुढे) इतर सर्व धर्मांवर सत्य धर्मालाच (वैचारिकदृष्ट्या) वर्चस्व प्राप्त व्हावे. आणि साक्षी म्हणून अल्लाह पर्याप्त आहे.

29 मुहम्मद हे अल्लाहचे (अंतिम) संदेशवाहक आहेत. आणि जे लोक (खऱ्या अर्थाने) त्यांच्याबरोबर आहेत ते (आपल्या श्रद्धेत दृढ) व सत्य

नाकारणाऱ्या लोकांप्रति खंबीर (त्यांच्या बहकाव्यात न येणारे) आहेत आणि आपसात कनवाळू आहेत. तुम्ही त्यांना अल्लाहची कृपा व मर्जी संपादन करण्यासाठी प्रार्थनेत (त्याच्यासमोर) नमन करीत असलेल्या अवस्थेत व नतमस्तक होत असताना पाहाल. त्यांच्या कपाळावर (पुन्हा-पुन्हा) नतमस्तक झाल्यामुळे त्याच्या खुणा जाणवतात. त्यांच्या (गुणांचे) वर्णन (आधीच्या) तौरात व बायबल या ग्रंथातही (अशाप्रकारे) करण्यात आलेले आहे की, (ते जणू) शेतात पेरलेले बी (आहेत), जो प्रथम आपला अंकुर निर्माण करतो, मग त्यास (हळूहळू) मजबूत बनवतो. मग तो आणखी घट्ट बनतो व आपल्या देठावर उभा राहतो. आणि तो पेरणारा (ते पाहून) आनंदित होत असतो. (अशाप्रकारे अल्लाह श्रद्धावंतांना दिवसेंदिवस उन्नती प्रदान करीत असतो) की, त्यांना पाहून सत्य नाकारणाऱ्या श्रद्धाहीनांचा जळफळाट व्हावा. (पण) त्यांच्यापैकी जे लोक श्रद्धा धारण करून सत्कर्मे करतील, अशांना अल्लाहने क्षमा करण्याचे व फार मोठे बक्षीस देण्याचे वचन दिलेले आहे.

# सूरह-४९. अल-हुजुरात

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 इमान धारण केलेल्या लोकांनो! अल्लाह व त्याच्या पैगंबरासमोर आपली फुशारकी मिरवू नका. अल्लाहची जाण ठेवून राहा. खरोखर, अल्लाह सर्व काही ऐकणारा व जाणणारा आहे.

2 श्रद्धावंतांनो! पैगंबराशी मोठ्या आवाजात बोलू नका, ज्याप्रमाणे तुम्ही एकमेकांशी मोठमोठ्याने बोलत असता. अन्यथा तुमची सर्व सत्कृत्ये वाया जातील आणि तुम्हाला त्याची जाणीवही असणार नाही. 3 जे लोक अल्लाहच्या पैगंबरासमोर धिम्या आवाजात बोलतात, हेच ते लोक आहेत, ज्यांची मने अल्लाहने अजमावून त्यांच्या (मनांची कवाडे) सदाचरणासाठी खुली केलेली

आहेत. त्यांच्यासाठी क्षमा व फार मोठे बक्षीस आहे. 4 जे लोक तुमच्या (राहत्या) खोल्यांच्या बाहेरून तुम्हाला (मोठमोठ्याने व सातत्याने) हाक मारतात, त्यांच्यापैकी अनेक बुद्धीचा वापर न करणारे आहेत. 5 (एकदा सहजतेने हाक दिल्यानंतर) तुम्ही बाहेर येईपर्यंत, त्यांनी संयमपूर्वक प्रतीक्षा केली असती तर असे करणे त्यांच्यासाठी (अल्लाहच्या दृष्टीने) उचित ठरले असते. पण अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे.

6 श्रद्धा धारण केलेल्या लोकांनो! एखादा दुराचारी माणूस तुमच्याकडे एखादी (वाईट) बातमी घेऊन आला तर (त्यावर विश्वास करण्यापूर्वी) तिच्या सत्यतेविषयी नीट खात्री करून घ्या. असे व्हायला नको की, (त्या चुकीच्या बातमीच्या आधारे) अहेतुकपणे तुम्ही इतरांना नुकसान पोचवून बसाल. मग तुम्हाला आपल्या कृत्यावर पश्चात्ताप करावा लागेल. 7 आणि या गोष्टीची जाण ठेवा, तुमच्यामध्ये अल्लाहचा पैगंबर उपस्थित आहे. बऱ्याच गोष्टीमध्ये त्याने जर तुमचे म्हणणे मान्य केले असते तर तुम्ही संकटात सापडला असता. पण अल्लाहने तुमच्या मनांत श्रद्धेबद्दल प्रेम निर्माण केले आणि तिला तुमच्या मनांना प्रिय वाटेल असे दर्शविले. तसेच त्याने अश्रद्धा, दुष्टपणा व अवज्ञा या गोष्टींविषयी तुमच्या मनात तिटकारा निर्माण केला. असेच लोक सन्मार्गावर मार्गस्थ आहेत, 8 अल्लाहच्या कृपेने व अनुग्रहाने. अल्लाह सर्व काही जाणणारा आहे, बुद्धिवान आहे.

9 श्रद्धावंतांपैकी दोन गट आपसात भिडले तर त्यांच्यादरम्यान समेट घडवून आणा, मग जर त्यांच्यापैकी एक गट दुसऱ्यावर अन्याय करीत असेल तर त्या गटाविरुद्ध लढा, जो अन्याय करीत आहे, जोपर्यंत तो अल्लाहच्या आदेशाकडे परत येत नाही. मग जेव्हा तो त्याकडे वळेल, तेव्हा त्यांच्यादरम्यान न्यायपूर्वक समेट घडवून आणा. आणि न्यायपूर्वकच कृती करा. कारण अल्लाहला न्यायी लोक प्रिय आहेत. 10 सर्व श्रद्धावंत आपसात भाऊ (म्हणजे धर्मबांधव) आहेत.

म्हणून (जेव्हाही त्यांच्यामध्ये काही विवाद निर्माण झाल्यास) भावा–भावामध्ये मिलाफ घडवून आणा. आणि अल्लाहची जाण बाळगा, म्हणजे तुमच्यावर कृपा केली जाईल.

11 श्रद्धावंतांनो! तुमच्यापैकी पुरुषांनी इतर पुरुषांची खिल्ली उडवायला नको, शक्य आहे की, (अल्लाहच्या दृष्टीत) ते त्यांच्यापेक्षाही अधिक चांगले असू शकतात. ना स्त्रियांनी इतर स्त्रियांवर हसावे, शक्य आहे, त्या यांच्यापेक्षा (म्हणजे हसणाऱ्यांपेक्षाही) अधिक चांगल्या असतील. तसेच ना एकमेकांना टोमणे मारा, ना एकमेकांची वाईट नावे ठेवा. श्रद्धा धारण केल्यानंतर वाईट नावांशी संबंध जोडले जाणे, फार वाईट आहे. आणि जे पश्चात्ताप करून (हे सर्व सोडणार नाहीत), तर तेच लोक अत्याचारी आहेत.

12 श्रद्धावंतांनो! बऱ्याच गोष्टींच्या बाबतीत संशय घेणे टाळा, कारण काही बाबतीत संशय घेणे म्हणजे गुन्हा करणे होय. एकमेकांची (गुप्तचराप्रमाणे) हेरगिरी करू नका. आणि एकमेकांच्या चहाड्या–चुगल्या करू नका. तुमच्यापैकी कोणाला आपल्या मरण पावलेल्या भावाचे मांस खायला आवडेल का? अर्थातच! या गोष्टीचा भयंकर तिटकारा तुम्हाला वाटेल. अल्लाहची (सदैव) जाण ठेवा (त्याचे भय बाळगा), नि:संदेह, अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे.

13 लोकांनो! आम्ही तुम्हा (सर्वांना) एक नर व एक नारी पासून निर्माण केले आहे. मग तुम्हाला एकमेकांना ओळखता यावे यासाठी, तुमच्या विविध जाती व कबिले बनविले. (पण) अल्लाहच्या नजरेत तोच सर्वाधिक सन्माननीय मनुष्य आहे, जो त्याची सर्वाधिक जाण ठेवून (जीवन व्यतीत करणारा) आहे. निश्चितच अल्लाह सर्व काही जाणणारा, सर्वप्रकारे जाणीव असणारा आहे.

14 वाळवंटात राहणारे अरब लोक म्हणतात, 'आम्ही तर श्रद्धावंत बनलो आहोत.' (पैगंबर!) त्यांना सांगा, 'नाही, तुम्ही (अद्याप) श्रद्धा धारण केलेली नाही, तुम्हाला असे म्हणावयास हवे, ''आम्ही (नुकतंच) इस्लामचा अंगीकार

केला आहे,'' कारण (खऱ्या अर्थाने) दृढ श्रद्धेने अद्याप तुमच्या हृदयात प्रवेश केलेलाच नाही. आणि जर तुम्ही अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन कराल तर अल्लाह तुमच्या कृत्यांना मुळीच वाया जाऊ देणार नाही. खरोखर अल्लाह माफ करणारा, कृपा करणारा आहे.' 15 सच्चे श्रद्धावंत तर ते लोक आहेत, जे अल्लाहवर व त्याच्या पैगंबरावर श्रद्धा धारण करतात आणि मग त्याविषयी मुळीच शंका घेत नाहीत. आणि आपले धन व प्राण पणाला लावून अल्लाहच्या कार्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा (म्हणजेच जिहाद) करतात. हेच लोक सत्यवादी आहेत.

16 (पैगंबर!) या लोकांना सांगा, 'तुम्ही अल्लाहला आपल्या श्रद्धेची जाण करून द्यायला निघालात की काय? जेव्हा अल्लाह असा जाणकार आहे की, त्याला ते सर्व माहीत आहे जे-जे आकाशात आहे आणि जे-जे पृथ्वीवर आहे. अल्लाहलाच प्रत्येक गोष्टीविषयी परिपूर्ण ज्ञान आहे.' 17 (पैगंबर!) काही लोकांना असे वाटते की, त्यांनी इस्लामचा स्वीकार करून तुमच्यावर उपकार केले आहे. त्यांना सांगा, 'तुम्ही इस्लामचा अंगीकार करणे हा माझ्यावर उपकार आहे, असे कदापि समजू नका. तर याउलट सत्य हे आहे की, अल्लाहचा तुमच्यावर उपकार आहे की, त्याने तुम्हाला सत्यश्रद्धेचा अवलंब करण्याची सद्‌बुद्धी दिली. (या वास्तवाचा स्वीकार करा) जर तुम्ही सत्यवादी आहात तर.' 18 नि:संदेह, अल्लाह आकाश आणि पृथ्वीच्या, (लोकांसाठी) अदृश्य असलेल्या सर्व गोष्टी जाणतो आणि तुम्ही जे काही करत असता, त्यावर तो नजर ठेवून आहे.

# सूरह-५०. क़ाफ़०

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 क़ाफ़० या महान अशा कुराणाची शपथ! (तुम्ही आमचे पाठवलेले पैगंबर आहात). 2 पण, त्यांना या गोष्टीचे आश्चर्य वाटते की, त्यांच्याकडे त्यांच्यामधूनच

एक सावध करणारा (पैगंबर) आलेला आहे. सत्य नाकारणाऱ्यांनी म्हटले,
'खरोखर ही एक अजब गोष्ट आहे! [3] की, आम्ही जेव्हा मृत्यू पावल्यानंतर
(कुजून) माती होऊन जाऊ, (तेव्हा आम्हाला कशाप्रकारे जिवंत केले जाऊ
शकते?) खरोखर ती फार असंभव गोष्ट वाटते!' [4] आम्ही चांगले जाणतो की,
माती त्यांच्या शरीराला कशाप्रकारे नष्ट करते. आणि आमच्याकडे सुरक्षित
असा एक (महान) ग्रंथ आहे, ज्यात प्रत्येक गोष्ट नमूद केलेली आहे.

[5] पण त्यांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला, जेव्हा ते त्यांच्याकडे आले.
परिणामी ते गोंधळून गेलेले आहेत.

[6] त्यांनी त्यांच्यावर असलेल्या आकाशाचे कधी (चिंतनपूर्वक) अवलोकन
केले नाही का? आम्ही कशाप्रकारे त्यास निर्माण करून सजवले व पूर्णपणे
दोषमुक्त (बनवले). [7] तसेच आम्ही पृथ्वीला पसरवून तिचा विस्तार केला
आणि तिच्यावर पर्वतांना भक्कमरित्या उभे केले आणि तिच्यावर सर्व प्रकारच्या
सुंदर वस्तू उगविल्या आहेत. [8] यात (अल्लाहकडे) वळणाऱ्या प्रत्येक भक्तासाठी
धडे व बोध प्राप्त करण्याची साधने आहेत. [9] आणि आम्ही आकाशातून
(लोकांसाठी) लाभदायी ठरणाऱ्या पाण्याचा वर्षाव केला आणि त्याद्वारे (फळांच्या)
बागा आणि धान्यांची शेती निर्माण केली. [10] आणि खजुरीचे उंच-उंच वृक्ष
ज्यावर फळांचे घोस, एकावर एक लोंबकळत असतात. [11] लोकांच्या
उपजीविकेची व्यवस्था म्हणून, तसेच त्या पाण्याद्वारे आम्ही मृत अवस्थेत
असलेल्या जमिनीला जीवन प्रदान करतो, अशाचप्रकारे (मेलेल्या लोकांचे)
पुनरुत्थान होईल.

[12] या लोकांपूर्वी (यांच्याप्रमाणेच) नूहच्या लोकांनी (मृत्युपश्चात जीवनास
नकार दिला) तसेच खंदकवाल्या जमातीने व समूद (या जमातीनेही पुनरुत्थानास)
खोटे ठरविले. [13] आणि आद (या जमातीने) व फिरऔनने आणि लूतच्या
बांधवांनी....... [14] वनात राहणारे (अयकावाले) आणि तुब्बाच्या लोकांनीही

खोटे ठरविले. सर्वांनी पैगंबरांना खोटे ठरविले. म्हणून (शेवटी) माझ्या ज्या शिक्षेपासून त्यांना सावध करण्यात आले होते, ती शिक्षा त्यांच्यावर चालून आली. [15] पहिल्या वेळेस निर्मिती करून आम्ही थकून गेलो आहोत (असे यांना वाटते की काय?) (अजिबात) नाही. तरीही हे लोक दुसऱ्या वेळेस निर्माण केल्या जाण्यासंबंधाने (निराधार) शंका घेत आहेत.

[16] आम्हीच मानवाला निर्माण केले आहे. त्याच्या मनाला ज्या-ज्या विचारांचा स्पर्श होतो, ते सर्व आम्ही जाणतो. आणि आम्ही त्याच्या कंठातील शिरेपेक्षाही त्याच्या अधिक जवळ असतो. [17] दोन नोंद करणारे दूत (प्रत्येकाच्या कर्मांची) नोंद करीत आहेत. जे प्रत्येकाच्या उजव्या व डाव्या बाजूस बसलेले असतात. [18] एक शब्दही असा नसतो जो एखादा माणूस बोलतो. आणि त्याची सदैव सतर्क असलेल्या दूताकडून नोंद होत नाही.

[19] आणि मृत्यूची बेशुद्धी (सर्व) सत्यासह प्रकट होईल. (हे मानवा!) हीच ती गोष्ट आहे, जिच्यापासून तू पळून जाऊ पाहत होतास. [20] आणि (शेवटी पुनरुत्थानाचे) शिंग फुंकले जाईल. हाच तो दिवस असेल ज्यापासून तुम्हाला सावध केले जात होते. [21] आणि प्रत्येक मनुष्य अशाप्रकारे येईल की, त्याच्याबरोबर एक हाकणारा आणि दुसरा साक्ष देणारा असेल. [22] (सांगितले जाईल की), तू यापासून बेसावध होतास. (आज) आम्ही तुमच्या (गफलतीचा) पडदा दूर केला आहे, म्हणून आज तुझी दृष्टी फार तीक्ष्ण झालेली आहे. [23] आणि त्याचा सोबती (दूत) म्हणेल की, मी (बनवलेला) त्याच्या कर्मांचा रेकॉर्ड माझ्याकडे तयार आहे. [24] (तेव्हा अल्लाहकडून आज्ञा होईल) प्रत्येक कृतघ्न व सत्याच्या शत्रूला नरकात फेकून द्या. [25] सत्कृत्यांपासून रोखणारा, मर्यादांचे उल्लंघन करणारा (आणि) इतरांना संशयात लोटणारा असा. [26] ज्याने अल्लाहशिवाय दुसऱ्याला उपास्य बनविले होते. त्याला कठोर शिक्षेच्या ठिकाणी ढकलून द्या. [27] त्याचा सोबती सैतान म्हणेल, ‘हे आमच्या पालनकर्त्या! मी

यास विद्रोही बनवलेले नाही, तर तो स्वत:च चुकीच्या मार्गाचा अवलंब करून फार दूर निघून गेला होता.' 28 अल्लाह म्हणेल, 'माझ्या समक्ष भांडण करू नका. मी आधीच तुम्हाला (या) शिक्षेपासून सावध केले होते.' 29 'माझ्याद्वारे झालेल्या निर्णयात बदल शक्य नसतो आणि मी माझ्या दासांवर कधीही अन्याय करीत नाही.'

30 त्या दिवशी आम्ही नरकास विचारू, 'तू भरून गेला आहेस का?' तो उत्तर देईल, '(नाही), आणखी कोणी आहेत का?' 31 आणि (त्या दिवशी) स्वर्ग सदाचारी (ईश-भीरू) लोकांच्या जवळ आणले जाईल, त्यांच्यापासून फार दूर नसेल. 32 (त्यांना सांगितले जाईल,) 'हाच आहे तो (स्वर्ग) ज्याचे वचन तुम्हाला दिले जात होते.' हे त्या प्रत्येकाचे ठिकाण आहे, ज्याला नेहमी अल्लाहची ओढ असायची आणि मनात नेहमी (अल्लाहचीच) आठवण असायची. 33 तो (प्रत्येक माणूस) जो कृपावंत (अल्लाहप्रति) त्याला न पाहूनही भीतीयुक्त आदर बाळगायचा. आणि (आज) पश्चात्तापाची भावना बाळगून असलेल्या अंत:करणासह त्याच्याकडे आला. 34 तर आता (सदैव) शांतीसह स्वर्गात प्रवेश करा. हा तो दिवस आहे, जिथून अनंतकालीन (सुखी) जीवनाची सुरुवात होत आहे. 35 तिथे त्यांच्यासाठी ते सर्व काही असेल जे ते इच्छितील. आणि (त्यांना देण्यासाठी) आमच्याकडे आणखी खूप काही आहे.

36 (पैगंबर! जे आता सत्य नाकारत आहेत) यांच्यापूर्वी आम्ही कितीतरी जनसमूहांना नष्ट केलेले आहे. जे शक्तीच्या दृष्टीने यांच्यापेक्षा वरचढ होते. त्यांनी सर्वत्र भूतलावर आश्रयाचे ठिकाण शोधण्यासाठी भरपूर शोधाशोध केला, पण त्यांना ते कुठेही सापडले नाही. 37 यामध्ये बोधपर संदेश आहेत, पण त्या माणसासाठी ज्याच्याकडे अंत:करण आहे. किंवा जर तो बोध ग्रहण करण्याच्या हेतूने ऐकणारा असेल.

38 आम्ही आकाश व पृथ्वी आणि या दोहोंच्यामध्ये जे काही आहे, ते सर्व

सहा दिवसात (म्हणजे सहा कालखंडात) निर्माण केले आहे. आणि त्यामुळे आम्ही अजिबात थकलो नाही. [39] (पैगंबर!) ते जे काही बोलतात, ते संयमपूर्वक सहन करा आणि आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीसह त्याचे महिमागान करीत राहा, सूर्योदयापूर्वीही आणि सूर्यास्तापूर्वीही. [40] तसेच रात्रीच्या समयीदेखील त्याचे स्तुतिगान करा आणि नमाज़ झाल्यानंतरही.

[41] तसेच ही गोष्ट (नेहमी) लक्षात ठेवा की, त्या दिवशी हाक मारणारा (मेलेल्यांना) अगदी जवळून हाक मारेल (म्हणेल, 'उठा'). [42] ज्या दिवशी ते (पूर्ण विश्वासाने) त्या (भयंकर) स्फोटाचा आवाज ऐकतील, तो दिवस (कबरीतून) बाहेर येण्याचा दिवस असेल. [43] निश्चितच, आम्हीच जीवन देतो व आम्हीच मृत्यूही देतो, (शेवटी) सर्वांना आमच्याकडेच परत यायचे आहे. [44] ज्या दिवशी त्यांच्यावर असलेली जमीन दुभंगून जाईल, सर्व घाईघाईने त्यातून निघतील (आणि अल्लाहच्या न्यायासनाकडे धावतील). त्या सर्वांना एकत्रित करणे, आमच्यासाठी अगदी सोपी गोष्ट आहे.

[45] ते जे काही करीत आहेत, त्याची आम्हाला पूर्ण जाणीव आहे. (पैगंबर! श्रद्धा धारण करण्यासाठी) तुम्ही त्यांना मुळीच सक्ती करू शकत नाही. तुम्ही या कुराणाच्या साहाय्याने त्या माणसास उपदेश द्या, जो माझ्या धमकीचे भय बाळगतो.

# सूरह–५१. अज़–ज़ारियात

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] त्या वाऱ्यांची शपथ, जे (सर्वत्र वातावरणात) धूळ विखुरतात. [2] आणि त्या (वाऱ्यांची), जे (पाण्याने भरलेल्या ढगांचे) ओझे वाहून नेतात. [3] आणि त्या ज्या हळुवारपणे वाहतात. [4] मग (अल्लाहच्या) आज्ञेनुसार (जीवनासाठी वरदान असलेल्या पावसाचे) वाटप सर्वत्र करतात (त्या स्वर्गदूतांची शपथ). [5] तुम्हाला जे वचन दिले

जात आहे, ते सत्य आहे — यात मुळीच शंका नाही 6 की, (कर्मांचा) निर्णय अवश्य
होणार आहे. 7 (नक्षत्रांचे) अनेक मार्ग असलेल्या त्या आकाशाची शपथ. 8
(लोकांनो!) तुम्ही वेगवेगळ्या मतांत वाईटरित्या गुरफटलेले आहात (की तुम्हाला
कळत नाही की, कशावर विश्वास ठेवावा?) 9 सत्यापासून विमुख तोच होतो, जो
(स्वतःचीच) फसवणूक करीत असतो.

10 सर्वनाश होवो अटकळबाजी करणाऱ्यांचा, 11 जे गफलतीत बुडालेले
आहेत. 12 (थट्टा–मस्करी करीत) विचारतात, 'तो न्यायाचा दिवस येणार तरी
कधी?' 13 (तो तेव्हा येईल) ज्या दिवशी त्यांना आगीवर भाजले जाईल. 14
(सांगितले जाईल,) आता चाखा चव आपल्या दुष्कर्मांच्या फळांची, हीच ती
(शिक्षा) आहे, ज्यासाठी तुम्ही फार घाई करीत होता. 15 (पण) अल्लाहची जाण
ठेवून जीवन व्यतीत केलेले लोक (स्वर्गाच्या) बागांत आणि (नयनरम्य) प्रवाहांच्या
शेजारी असतील. 16 त्यांचा पालनकर्ता त्यांना जे–जे (कृपाप्रसाद) देत असेल, ते
घेत असतील. कारण यापूर्वी ते चांगली कृत्ये करीत असत. 17 ते रात्रीच्या समयी
(रात्रभर न झोपता) थोडा वेळ झोपत असत. 18 रात्रीच्या शेवटच्या प्रहरी
(आपल्या चुकांबद्दल) माफी मागत असत. 19 तसेच त्यांच्या धनसंपत्तीत
मागणाऱ्यांचा आणि गरजू लोकांचा हिस्सा होता.

20 दृढ श्रद्धा बाळगणाऱ्यांसाठी भूतलावर (अल्लाहच्या सामर्थ्याच्या अनेक)
खुणा आहेत. 21 तसेच स्वतः तुमच्यामध्येही (अनेक खुणा आहेत). तर मग ते
तुम्ही पाहत नाही? 22 आणि आकाशात तुमच्या उपजीविकेचे (स्रोत) आहेत
आणि ती गोष्ट देखील जिचे तुम्हाला वचन दिले जात आहे. 23 आकाश व
पृथ्वी यांच्या पालनकर्त्याची शपथ, हे (कुराण) अगदी तसेच सत्य आहे.
ज्याप्रमाणे तुमच्याकडे बोलण्याची योग्यता आहे, हे एक सत्य आहे.

24 इब्राहीमच्या सन्माननीय पाहुण्यांची गोष्ट तुम्ही कधी ऐकली आहे का?
25 जेव्हा ते (स्वर्गदूत) त्याच्याकडे आले व म्हणाले, 'तुला शांती लाभो!

(सलाम!)' त्याने उत्तर दिले, 'तुम्हालाही माझ्याकडून सलाम!' (तो स्वतःशी
म्हणाला,) 'हे अनोळखी लोक वाटतात.' 26 मग तो आपल्या कुटुंबीयांकडे
गेला, आणि एक जाडजूड वासरू (म्हणजेच त्याचे मांस) भाजून घेऊन आला
(त्यांचे पाहुणचार करण्यासाठी). 27 आणि त्यास (त्याने) त्यांच्यासमोर प्रस्तुत
केले, (ते खात नाहीत हे पाहून) त्याने म्हटले, 'आपण खात का नाही?' 28
मग मनोमनी तो भयभीत झाला (या विचाराने की, हे शत्रू तर नसावेत). तेव्हा
ते (आपला परिचय देऊन) म्हणाले, 'भिऊ नकोस,' तसेच त्यांनी त्याला एका
ज्ञानी पुत्राच्या जन्माची शुभवार्ता दिली. 29 तेव्हा (ती वार्ता ऐकून) त्याची
पत्नी मोठ्याने बोलत (त्या पाहुण्यांजवळ) आली आणि (आश्चर्याने) आपल्या
कपाळावर मारत तिने म्हटले, '(माझ्या सारख्या) एका वृद्ध, (व आयुष्यभर)
वांझ राहिलेल्या स्त्रीला (आता पुत्र होणार)!' 30 त्यांनी उत्तर दिले, 'तुझ्या
पालनकर्त्याने असेच म्हटले आहे.' खरोखर तो (असीम) बुद्धिमान व सर्व काही
जाणणारा आहे!

31 इब्राहीमने म्हटले, '(स्वर्गदूतांनो! याशिवाय) तुमच्यापुढे आणखी काय
कार्यक्रम आहे?' 32 त्यांनी उत्तर दिले, 'आम्ही अपराधी लोकांकडे पाठविले
गेलो आहोत (म्हणजेच लूतच्या लोकांकडे). 33 यासाठी की, आम्ही त्यांच्यावर
भाजलेल्या मातीच्या दगडांचा वर्षाव करावा. 34 त्या लोकांना शिक्षा करण्यासाठी,
जे तुमच्या पालनकर्त्याकडून चिन्हांकित करण्यात आलेले आहेत, ज्यांनी सर्व
मर्यादा ओलांडण्याचे पाप केलेले आहे.' 35 मग आम्ही (लूतच्या शहरातून) जे
(थोडेफार) श्रद्धावंत होते, त्या सर्वांना बाहेर काढले. 36 आणि तिथे एका
घराशिवाय सच्च्या श्रद्धावंताचे अन्य घर असल्याचे आम्हाला आढळले नाही.
37 आणि आम्ही त्या शहरात त्या लोकांसाठी एक (संदेशसूचक) खूण बाकी
ठेवली, जे दुःखदायी शिक्षेचे भय बाळगतात.

38 तसेच (फिरऔन व) मूसाच्या कथेतही (आम्ही असाच) संदेश मागे

सोडला. जेव्हा आम्ही त्याला फिरऔनकडे सुस्पष्ट प्रमाणासह पाठविले होते. 39 पण त्याने आपल्या शक्तीच्या अहंकारापोटी मूसाकडे पाठ फिरवली व म्हणाला, 'हा (मूसा) एकतर जादूगार आहे किंवा वेडा माणूस आहे.' 40 (शेवटी) आम्ही त्याला व त्याच्या सैन्याला पकडून, सर्वांना समुद्रात फेकून दिले. (या परिणामासाठी) दोषी तोच होता. 41 (असाच) संदेश आद (या जमातीच्या बाबतीत जे घडले) त्यामध्येही आहे. जेव्हा आम्ही त्यांच्यावर विनाशकारी वादळ पाठवले होते. 42 ते वादळ ज्या (भूभागावरून) गेले तिथे सर्व काही नष्ट करून टाकले, अगदी चुरा–चुरा करून सोडले (काहीही शिल्लक ठेवले नाही). 43 असाच संदेश समूद (या जमातीच्या घटनेतही) आहे. जेव्हा त्यांना सांगण्यात आले की, 'काही काळ मौजमजा करून घ्या.' 44 पण त्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाकडे पाठ फिरवली. मग (शेवटी) ते अचानकपणे एका भयंकर विजेच्या तडाख्यात सापडले, जेव्हा ते (असहायपणे) पाहतच राहिले. 45 मग ते पुन्हा उठू शकले नाहीत. ना ते त्या (संकटापासून) स्वत:चा बचाव करू शकले. 46 आणि (अशाचप्रकारे आम्ही) यापूर्वी नूहच्या लोकांनाही (नष्ट केले), कारण ते निश्चितपणे अपराधी लोक होते.

47 आम्हीच सृष्टीला (आमच्या सर्जनशील) शक्तीने बनविले आणि आम्हीच त्याचा सातत्याने विस्तार करीत आहोत. 48 आणि पृथ्वीचा विस्तारही आम्हीच केलेला आहे. किती (उत्तम संतुलनासह) आम्ही तिचा विस्तार केलेला आहे! 49 आम्ही प्रत्येक गोष्टीच्या जोड्या बनविल्या आहेत. हे यासाठी की, (त्याच्या कला–कौशल्याविषयी) तुम्ही (गहन) चिंतन करावे. 50 (पैगंबर! लोकांना सांगा, तुमचा व सर्वांचा निर्माता, मालक व पालक असलेल्या) अल्लाहकडेच धाव घ्या, मला तर केवळ तुम्हाला स्पष्टरित्या सावधानतेचा इशारा देण्यासाठी त्याच्याकडून पाठविण्यात आलेले आहे. 51 अल्लाहच्या बरोबरीने दुसऱ्याला उपास्य ठरवू नका. मी केवळ त्याच्याकडून तुम्हाला स्पष्टरित्या सावधानतेचा इशारा देण्यासाठी आलो

आहे.

[52] अशाचप्रकारे यांच्यापूर्वीच्या लोकांकडे असा एकही पैगंबर आला नाही, ज्याला त्या-त्या वेळच्या लोकांनी जादूगार किंवा वेडा म्हटलेले नाही. [53] या सर्वांनी एकमेकांना याच (विचारधारेचा) वारसा दिलेला आहे की काय? नव्हे, ते सर्व आहेतच विद्रोही लोक. [54] (पैगंबर!) तुम्ही त्यांच्याकडे दुर्लक्ष करा. आणि तुमच्यावर कोणताही दोष येणार नाही. [55] पण उपदेश करीत राहा, कारण उपदेश करण्याने श्रद्धावंतांना लाभ होतो.

[56] आणि (त्यांना सांगा की), मी जिन्न व मानवाला अन्य कशासाठी नव्हे तर त्यांनी माझी उपासना करावी, यासाठी निर्माण केलेले आहे. [57] मी त्यांच्याकडे कोणतीही उपजीविका मागत नाही. ना त्यांनी मला भरवावे, अशी त्यांच्याकडून कधी अपेक्षा करतो. [58] कारण अल्लाह (सर्वांना) उपजीविका देणारा आहे (सर्वांचा पालनकर्ता आहे), सदैव सर्वशक्तिमान आहे, अपराजेय आहे. [59] निश्चितच जे दुराचारी आहेत त्यांच्या पापांची घागर भरायला आहे. ज्याप्रमाणे (यांच्यापूर्वीच्या) त्यांच्यासारख्या लोकांच्या पापांची घागर भरली होती. तर त्यांनी माझ्याकडे (शिक्षेची) मागणी करू नये. (ती आपल्या नियत वेळेवर येणार). [60] सत्य नाकारणाऱ्या लोकांची त्या दिवशी काही खैर नाही, ज्या दिवसाचे त्यांना वचन दिले जात आहे.

# सूरह-५२. अत-तूर

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] सिनाई पर्वताची शपथ [2] आणि लिखित ग्रंथाची (शपथ) [3] जो खुल्या पानांवर (लिहिला गेला आहे). [4] नेहमी लोकांनी गजबजलेल्या त्या (काबा) गृहाची शपथ. [5] त्या (आकाशरूपी) उंच छताची. [6] तसेच भरती आलेल्या समुद्राची शपथ. [7] (हे माणवा!) तुझ्या पालनकर्त्याच्या शिक्षेत (अपराधी

लोक) अवश्य जखडले जाणार. [8] तिला टाळू शकेल असा कोणीही नाही. [9] त्या दिवशी आकाश (वाईटरित्या) हादरून जाईल [10] आणि पर्वत (भयावह) हालचाल करू लागतील. [11] त्या दिवशी सत्य नाकारणारे लोक बरबाद होणार, हे नक्की. [12] आज जे व्यर्थ शब्दांचा खेळ खेळण्यात व्यस्त आहेत [13] (पण) त्या दिवशी त्यांना दयामाया न दाखवता, धक्के मारत नरकाच्या आगीकडे नेण्यात येईल (आणि त्यांना सांगितले जाईल). [14] ही आहे ती आग जिला तुम्ही खोटे ठरवीत असत. [15] हीदेखील नजरबंदी (जादू) आहे का,की, तुम्हाला काही समजत नाही?

[16] यात दाखल व्हा, आता तुम्ही सहनशीलता दाखवा किंवा दाखवू नका (म्हणजे आक्रोश करीत राहा) त्याने काहीही होणार नाही. तुम्हाला तसाच मोबदला दिला जात आहे, जशी तुम्ही कृत्ये करीत होता.

[17] पण ईशभिरू (म्हणजे अल्लाहची जाण ठेवून जीवन जगलेले लोक) त्या दिवशी ऐश्वर्यसंपन्न अशा बागांत असतील. [18] त्यांच्या पालनकर्त्याने त्यांना दिलेल्या सुखदायी गोष्टींचा उपभोग घेत असतील. त्यांच्या पालनकर्त्याचा (सर्वात मोठा कृपाप्रसाद म्हणजे) त्याने त्यांना आगीच्या शिक्षेपासून वाचविलेले असेल. [19] (त्यांना सांगितले जाईल) खा व प्या आणि मजा करा, तुम्ही केलेल्या कृत्यांचे बक्षीस म्हणून. [20] ते रांगेने मांडलेल्या आरामदायी आसनांवर मस्तपैकी पहुडलेले असतील. आणि आम्ही मोठ्या व सुंदर डोळे असलेल्या रूपवती स्त्रियांशी त्यांना विवाहबद्ध करू.

[21] ज्या लोकांनी श्रद्धा धारण केली, त्यांच्या अपत्यांनी (सत्य) श्रद्धेसह आपल्या वाडवडिलांचे अनुसरण केलेले असेल. तर अशांनाही आम्ही त्यांच्यासोबतच वास्तव्य प्रदान करू. आणि आम्ही त्यांच्या (चांगल्या) कृत्यांच्या मोबदल्यातून काहीही कमी करणार नाही. प्रत्येक माणूस आपल्या केलेल्या कर्मांत बांधलेला आहे. [22] आणि आम्ही त्यांना त्यांच्या इच्छेनुरूप फळे,

आणि मांस विपुल प्रमाणात (कायम) देत राहू. [23] ते एकमेकांपुढे अशा मद्याचे कप प्रस्तुत करत असतील, ज्याद्वारे ना नशायुक्त बडबडीस प्रेरणा मिळेल, ना एखाद्या वाईट कृत्यास. [24] तसेच अशी रूपवान मुले त्यांच्या सेवेत सदैव तत्पर असतील, जसे की, ते फार काळजीपूर्वक जतन करून ठेवलेले मोती आहेत. [25] (स्वर्गनिवासी) एकमेकांकडे वळून, आपसात विचारपूस करतील. [26] ते म्हणतील, 'आम्ही यापूर्वी जेव्हा आमच्या कुटुंबीयांदरम्यान असायचो, तेव्हा (प्रत्येक प्रसंगी) आम्ही अल्लाहची जाण बाळगायचो.'

[27] (खरोखर!) अल्लाहने आमच्यावर (फार मोठी) कृपा करून, आम्हाला होरपळून टाकणाऱ्या आगीच्या शिक्षेपासून वाचविले. [28] यापूर्वी आम्ही त्याचाच धावा करीत होतो. आणि (त्याने आता आम्हाला दाखवून दिले आहे) की, खरोखर, तो फार परोपकारी व दयाळू आहे. [29] (पैगंबर!) तुम्ही (लोकांना) उपदेश करीत राहा. तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कृपेने ना भविष्यवक्ता आहात, ना वेडसर आहात. [30] काय, ते (तुमच्याविषयी असे) म्हणतात, 'तो अन्य काही नसून एक कवी आहे, आणि आम्ही तो एखाद्या संकटात सापडावा, याची वाट पाहत आहोत.' [31] (पैगंबर!) त्यांना सांगा, 'तुम्ही वाट पाहा, मी देखील तुमच्याबरोबर वाट पाहत आहे.' [32] त्यांची बुद्धी त्यांना अशा गोष्टी शिकवीत असते का की, ते आहेतच विद्रोही (स्वभावाचे) लोक?

[33] ते असे म्हणतात का की, (या पैगंबराने) हे कुराण स्वतः रचून आणले आहे? नाही, असे नाही, (सत्य हे आहे की,) त्यांना अल्लाहच्या ग्रंथावर विश्वास ठेवायचाच नाही. [34] (हा ग्रंथ माणसाचीच रचना आहे असे) ते खरोखर गंभीरतापूर्वक बोलत असतील तर त्यांनीही यासारख्याच एखाद्या ग्रंथाची रचना करून दाखवावी.

[35] कोणी निर्माण केल्याशिवायच ते अस्तित्वात आलेले आहेत की काय? की, त्यांनी स्वतःच स्वतःला निर्माण केले आहे. [36] आकाश व पृथ्वी यांची

निर्मिती (ही) त्यांनीच केलेली आहे की काय? नाही, वस्तुस्थिती ही आहे की, त्यांना कशाबद्दलही दृढ विश्वास नाही. 37 त्यांच्याकडे तुमच्या पालनकर्त्याचे खजिने आहेत की काय, वा ते त्यांचे रखवालदार आहेत? 38 त्यांच्याकडे (आकाशापर्यंत जाणारी) एखादी शिडी आहे का, ज्यावर चढून ते (स्वर्गातील गोष्टी) ऐकून घेऊ शकतात. तसे असेल तर त्यांच्या ऐकणाऱ्याने स्पष्ट प्रमाण सादर करावे. 39 अल्लाहसाठी मुली आणि तुमच्यासाठी मुले?

40 किंवा असे आहे का? की, तुम्ही यांच्याकडे (हा संदेश पोचविण्याबद्दल) मेहनताना मागत आहात, त्यामुळे (तुमचे म्हणणे मान्य केल्यास) त्यांना त्या भुरदंडाचा बोजा सहन करावा लागेल. 41 किंवा त्यांच्याकडे काही अदृश्याचे ज्ञान आहे, जे ते लिहून घेऊ शकतात. 42 अथवा ते काही कट रचण्याच्या बेतात आहेत? पण ते सत्य नाकारणारे स्वत: त्या कटात अडकतील. 43 अल्लाहशिवाय दुसरा कोणी त्यांचा उपास्य आहे की काय? ते अल्लाहचे सहभागी (उपास्य) बनवतात, त्याच्याशी अल्लाहचा दुरूनही काही संबंध नाही.

44 आणि (या सत्य नाकारणाऱ्यांची मानसिकता अशी बनलेली आहे की), जसे आकाशाचा एखादा तुकडा खाली पडताना त्यांना दिसला तरी ते म्हणतील, 'हे ढगांचे विविध थर आहेत.' (म्हणजे अल्लाहच्या शिक्षेची त्यांना भीतीच नाही). 45 (पैगंबर!) त्यांना त्याच (गफलतीच्या) अवस्थेत तोपर्यंत सोडून द्या. जेव्हा त्यांचा त्या दिवसाशी सामना होईल तेव्हा त्यांची शुद्धीच ते गमावून बसतील. 46 त्या दिवशी त्यांचे डावपेच (युक्त्या) त्यांच्या काहीच कामी येणार नाहीत. आणि कुठूनही कोणत्याही प्रकारे त्यांना मदत प्राप्त होणार नाही. 47 पण, त्या अपराध्यांसाठी (नरकाच्या) शिक्षेव्यतिरिक्त आणखीही शिक्षा आहे. पण त्यांच्यापैकी अनेकांना याची जाण नाही.

48 (पैगंबर!) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या फैसल्यासाठी संयमपूर्वक

प्रतीक्षा करा. तुम्ही निश्चितपणे आमच्या नजरेसमोर आहात. तर जेव्हा तुम्ही (पहाटे झोपेतून) उठता तेव्हा आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीसह त्याचे महिमागान करा. [49] आणि अशाचप्रकारे रात्रीच्या समयीदेखील आणि नक्षत्रांचा अस्त होतानाही, त्याचे स्तुतिगान करीत राहा.

# सूरह–५३. अन–नज्म

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] अस्त पावणाऱ्या नक्षत्रांची शपथ. तुमचा सोबती (म्हणजे हा पैगंबर) ना बहकलेला आहे, ना वाट चुकलेला आहे. [3] तो इच्छांद्वारे प्रवृत्त होऊन बोलत नाही. [4] ही ईश्वरवाणी आहे, जी त्याच्याकडे प्रकट केली जात आहे. [5] त्याला जबरदस्त शक्तिशाली (स्वर्गदूताने अल्लाहच्या संदेशाचे) धडे दिले आहेत. [6] जो प्रबुद्ध व विवेकशील असा आहे, तो (स्वर्गदूत पैगंबरासमक्ष) एकदा आपल्या खऱ्या रूपात प्रकट झाला होता. [7] तेव्हा तो क्षितिजाच्या सर्वोच्च स्थानी होता. [8] मग तो खाली त्याच्या अगदी जवळ आला. [9] इतका जवळ की, धनुष्याच्या दोन कमानीइतके अंतर किंवा याहूनही कमीच अंतर होते. [10] मग अल्लाहने आपल्या सेवकाकडे (म्हणजे पैगंबर मुहम्मद यांच्याकडे) संदेश प्रकट केला, जो त्याला प्रकट करायचा होता. [11] पैगंबराने जे पाहिले त्याबद्दल त्यांच्या मनाने काहीही खोटे सांगितले नाही. [12] तर आता तुम्ही, त्याने जे पाहिले त्याविषयी वाद घालणार का? [13] आणि त्याने त्याला (त्याच्या अस्सल रूपात) (आकाशातून) खाली येताना दुसऱ्या वेळेसही पाहिले. [14] फार दूरवर असलेल्या बोरीच्या झाडाजवळ, ज्याच्या पलीकडे कोणीही जाऊ शकत नाही. [15] शाश्वत सुखमयी स्वर्ग त्याच्याजवळ आहे. [16] तेव्हा आध्यात्मिक अशा तेजाने बोरीच्या झाडाला झाकून टाकले होते. [17] त्याची दृष्टी ना विचलित झाली, ना मर्यादेपलीकडे गेली. [18] त्याने आपल्या पालनकर्त्याच्या (सामर्थ्याच्या) मोठ–मोठ्या निशाण्या

पाहिल्या.

[19] तुम्ही कधी खरोखर ‘लाऽत व उज्जा’ यांच्याविषयी काही विचार केलात का? (ज्यांची तुम्ही उपासना करता). [20] आणि त्यांच्यातील तिसरा जो ‘मनाऽत’ आहे त्याविषयीही? [21] काय! तुम्ही स्वत:साठी (केवळ) मुलांची (निवड करता) आणि मुलींचा संबंध अल्लाहशी जोडता? [22] ही तर फारच अन्यायकारक वाटणी झाली. [23] (ही तथाकथित उपास्ये म्हणजे) तुम्ही व तुमच्या वाडवडिलांनी ठेवलेल्या नावाशिवाय अन्य काहीच नाही. अल्लाहने ते (उपास्य असण्या)विषयी कोणतेही प्रमाण अवतीर्ण केलेले नाही. ते केवळ आपल्या भ्रामक कल्पना व आपल्या मनोकामनाचे अनुसरण करीत आहेत. आणि तेही त्यांच्याकडे आपल्या पालनकर्त्याकडून मार्गदर्शन आलेले असताना. [24] माणसाला जे हवे असते, ते सर्व त्याला प्राप्त होते का? [25] हे जग आणि यानंतरचे जग अल्लाहच्याच मालकीचे आहे (त्याच्याच नियंत्रणात आहे).

[26] आकाशात कितीतरी स्वर्गदूत आहेत, पण त्यांची शिफारस काहीही कामी येणार नाही. मात्र यास अपवाद त्याचा असेल, ज्यास अल्लाह इच्छील तर (बोलण्याची) परवानगी देईल आणि त्याचे म्हणणे तो पसंत करेल. [27] निश्चितच जे लोक मृत्युपश्चात जीवनावर विश्वास ठेवत नाहीत ते, स्वर्गदूतांना स्त्रिया समजतात. [28] पण त्यांच्याकडे यासाठी ज्ञानावर आधारीत कोणतेही प्रमाण नाही. ते केवळ अनुमानाचे अनुसरण करीत आहेत. पण अनुमान सत्यापुढे टिकू शकत नाही. [29] (पैगंबर!) तुम्ही अशा लोकांकडे दुर्लक्ष करा, जे आमच्या उपदेशांकडे पाठ दाखवतात, ज्यांची सर्व धावपळ केवळ याच जगातील जीवनासाठी असते. [30] (या आयुष्यापुढे विचार करण्याजोगे) जाणण्याजोगे काही नाही असे त्यांना वाटते तुमच्या पालनकर्त्याला चांगले ठाऊक आहे की, त्याच्या मार्गापासून कोण ढळला आहे. तसेच तो त्यालाही चांगल्याप्रकारे जाणतो, जो त्याच्या मार्गावर अढळपणे मार्गस्थ आहे.

[31] जे काही आकाशात आहे आणि जे काही पृथ्वीवर आहे त्या सर्वांचा मालक (केवळ) अल्लाह आहे. त्यामुळे तोच वाईट कृत्ये करणाऱ्यांना त्यांच्या वाईट कृत्यांबद्दल बदला देऊ शकतो आणि तो चांगली कृत्ये करणाऱ्यांना सर्वोत्तम मोबदला देईल. [32] जे गंभीर स्वरूपाच्या वाईट कृत्यांपासून आणि अनैतिक गोष्टींपासून स्वतःला पूर्णपणे दूर ठेवतात, तरी देखील काही लहान–सहान चुका त्यांच्या हातून घडू शकतात. त्यांच्याविषयी तुमच्या पालनकर्त्याची क्षमाशीलता फार अफाट आहे. त्यानेच तुम्हाला मातीतील (रासायनिक घटकांपासून) निर्माण केलेले आहे. (तो तुमचा निर्माता असल्यामुळे) तुम्हाला तो चांगल्याप्रकारे जाणतो. जेव्हा तुम्ही आपल्या मातांच्या पोटात गर्भाच्या रूपात होता. तेव्हा तुम्ही स्वतःला फार पवित्र समजू नका. तुमच्यापैकी कोण खरा ईशभिरू आहे, तो चांगले जाणतो.

[33] (पैगंबर!) तुम्ही त्या माणसाला पाहिले आहात का, जो (तुमच्या संदेशाकडे) तोंड फिरवतो. [34] ज्याने सुरुवातीला थोडेसे दिले, मग आपले (हात) रोखून घेतले. [35] त्याच्याकडे अदृश्याचे ज्ञान आहे का की, ज्याद्वारे तो (सर्व काही स्पष्ट) पाहू शकतो. [36] मूसाच्या ग्रंथामध्ये जे लिहिलेले होते, त्यासंबंधाने त्याला कधी सांगितले गेले नाही का? [37] तसेच इब्राहीमच्या ग्रंथातीलही? जो आपल्या शब्दांना पाळणारा होता. [38] (त्यात हे सांगितलेले होते) की, (न्यायाच्या दिवशी) ओझे वाहणारा कोणीही दुसऱ्याचे ओझे वाहणार नाही. [39] आणि हे की, माणसाला तेवढेच वाट्याला येणार ज्यासाठी तो प्रयत्न करतो. [40] आणि हे की, त्याच्या प्रयत्नांची हकिगत त्याला लवकरच दाखविली जाईल. [41] मग शेवटी त्याला पुरेपूर मोबदला दिला जाईल. [42] आणि हे की, शेवटी सर्वांना आपल्या पालनकर्त्याकडे परतायचे आहे.

[43] आणि हे की, तोच तुम्हाला हसवतो व रडवतो. [44] आणि तो मृत्यू व जीवन देतो. [45] आणि त्यानेच नर व मादी अशा जोड्या निर्माण केल्या. [46]

(केवळ) एका वीर्यबिंदूपासून जेव्हा तो (मादीच्या गर्भाशयात) टाकला जातो. 47 आणि म्हणून दुसऱ्या वेळेसही निर्माण करणे, त्याच्याच हाती आहे. 48 आणि हे की, त्यानेच धनवान व समृद्ध बनवले. 49 आणि तोच सर्वोत्तम प्रकाशमान तारा (सिरिअस) चा मालक आहे.

50 आणि अल्लाहनेच आद (या फार प्राचीन जमातीस) नष्ट केले होते. 51 अशाचप्रमाणे समूद (या जमातीसही), त्यांच्यापैकी कोणालाही सोडले नाही, (प्रत्येकास नष्ट केले). 52 असेच त्यांच्यापूर्वी नूहच्या लोकांनाही, खरोखर, ते फारच अत्याचारी व उद्दाम होते. 53 आणि (लूतच्या लोकांच्या) पालथ्या असलेल्या वस्त्याही, त्यानेच पालथ्या केलेल्या आहेत. 54 ज्या गोष्टीद्वारे ते झाकले जाणार होते, त्याद्वारे ते झाकले गेले (म्हणजेच गाडले गेले). 55 तर हे (मानवा!) तू आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या खुणांविषयी शंका घेत राहशील.

56 आधीच्या सावध करणाऱ्या प्रमाणेच हा (पैगंबर व ग्रंथ) ही सावध करणारा आहे. 57 ती जवळ येणारी (म्हणजेच शेवटची घटका) आता जवळ येऊन ठेपलेली आहे. 58 तिला टाळू शकेल असा अल्लाहव्यतिरिक्त कोणीच नाही. 59 तुम्हाला या वार्ता आश्चर्यचकित करणाऱ्या वाटतात का? 60 (त्या ऐकून) तुम्हाला हसू येते? तुम्ही रडत नाही? 61 आणि तुम्ही मगरुरीचे प्रदर्शन करता? 62 (नाही, तुम्ही तर) केवळ अल्लाहसमोर नतमस्तक व्हायला हवे आणि त्याचीच उपासना करायला हवे.

# सूरह–५४. अल–क़मर

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 ती शेवटची घटका जवळ येऊन ठेपलेली आहे आणि चंद्रात भगदाड पडला. 2 पण सत्य नाकारणारे (ती घटका जवळ येत असल्याच्या) कोणत्याही

खुणा पाहतील, तरी त्याकडे दुर्लक्षच करतील. म्हणतील, 'हा तर पूर्वापार
चालत आलेला जादूचाच एक प्रकार आहे.' 3 त्यांनी सत्य नाकारून केवळ
आपल्या मनोकामनांचे अनुसरण केले. पण प्रत्येक गोष्टीचे सत्य शेवटी उघड
होत असते. 4 आणि त्यांना (पूर्वीच्या लोकांच्या) वार्ता पोचलेल्या आहेत
ज्यांमध्ये सावध करणारे स्पष्ट इशारे आहेत. 5 त्यांत (इशाऱ्यांखेरीज) विवेकपूर्ण
अशा गोष्टी होत्या, पण लोकांना त्या इशाऱ्यांमुळे कोणताच लाभ झाला नाही.
6 (पैगंबर!) तुम्ही (सध्या) त्यांच्याकडे दुर्लक्ष करा. पण ज्या दिवशी एक
बोलावणारा त्यांना एका अप्रिय (व अकल्पनीय) गोष्टीकडे बोलावेल. 7 तेव्हा
ते कबरीतून बाहेर पडतील आणि त्यांच्या नजरा खाली असतील, जणू काही ते
विखुरलेले टोळ आहेत. 8 बोलावणाऱ्याकडे ते धावत असतील. तेव्हा सत्य
नाकारणारे लोक म्हणतील, (खरोखर) हा फारच कष्टदायी दिवस आहे.

9 यांच्याआधी (यांच्याप्रमाणेच) नूहच्या लोकांनीही (पुनरुत्थानास) खोटे
ठरविले होते. त्यांनी आमच्या भक्ताला खोटे ठरवून म्हटले होते, 'हा केवळ
एक वेडा आहे!' अशाप्रकारे त्यास (त्यांनी) झिडकारले. 10 तेव्हा त्याने
आपल्या पालनकर्त्याला हाक दिली, म्हणाला, '(हे प्रभू!) या लोकांनी मला
हैराण करून सोडले आहे, तर तू माझ्या मदतीला ये.' 11 तेव्हा आम्ही
आकाशाची दारे मुसळधार पावसासाठी उघडून टाकली. 12 आणि आम्ही
जमिनीतूनही पाण्याचे स्रोत प्रवाहित केले. (दोन्ही मार्गाने) प्रवाहित झालेले
पाणी, आधीपासून ठरलेल्या उद्देशासाठी (म्हणजेच अपराध्यांना बुडवून
टाकण्यासाठी) एकत्र आले. 13 आणि आम्ही नूहला फळ्या आणि खिळ्यांच्या
साहाय्याने बनलेल्या (नौकेवर) स्वार केले. 14 ती (नौका) आमच्या नजरेसमोर
चालत राहिली. (ही शिक्षा) त्या माणसाचा बदला घेण्यासाठी होती, ज्यास
कृतघ्नतापूर्वक झिडकारण्यात आले होते. 15 आणि आम्ही (या तरंगणाऱ्या
नौकेस आमच्या कृपेचे) चिन्ह म्हणून कायम ठेवले. तर कोणी यापासून बोध

घेणारा आहे का? 16 पाहा, कशी असते माझी शिक्षा, जी माझ्या इशाऱ्यांना दुर्लक्षिल्यामुळे लादली जाते! 17 आम्ही या कुराणास बोध ग्रहण करण्यासाठी सोपे बनवले आहे. तर आहे का कोणी बोध घेणारा? 18 आद (या जमातीनेही) सत्यास खोटे ठरविले. तर कशी होती माझी शिक्षा, जी त्यांनी माझ्या इशाऱ्यांकडे दुर्लक्षिल्यामुळे त्यांच्यावर लादली गेली! 19 आम्ही एका अशुभ दिवशी त्यांच्यावर भयंकर वादळी वारा पाठविला. 20 तो त्यांना अशाप्रकारे उध्वस्त करून सोडत होता की, जणू ते मुळापासून उखडलेल्या खजुरीच्या वृक्षांचे ओंडके होत. 21 तर पाहा, कशी असते माझी शिक्षा जी माझ्या इशाऱ्यांकडे दुर्लक्ष करणाऱ्यांवर लादली जाते! 22 आम्ही या कुराणास बोध ग्रहण करणाऱ्यांसाठी सोपे बनवले आहे. तर आहे का कोणी बोध घेणारा?

23 समूद या जमातीनेही आमच्या इशाऱ्यांना खोटे ठरवले होते. 24 ते म्हणाले, 'आम्ही आमच्यातीलच एका माणसाचे अनुसरण करायचे की काय? (छे!) आम्ही असे केल्यास ते चुकीचे व मूर्खपणाचे ठरेल. 25 काय! आम्हा सर्वांना सोडून याच्याकडेच (अल्लाहचे) संदेश प्रकट झालेत की काय? नव्हे, तो खोटारडा आहे, बढाईखोर!' 26 (आम्ही आमच्या पैगंबराला म्हटले,) 'पण उद्या त्यांना कळून जाईल, कोण खोटारडा व बढाईखोर आहे तो!' 27 आम्ही त्यांची कसोटी पाहण्यासाठी त्यांच्याकडे एक उंटीण पाठवणार आहोत. तर तू (प्रतीक्षा कर व) पाहा (ते तिच्याशी कसे वर्तन करतात) आणि संयम ठेव. 28 तसेच त्यांना या गोष्टीची जाणीव करून दे की, त्यांच्या (व उंटिणीच्या) दरम्यान (त्यांच्या पाणवठ्यावर) पाण्याची विभागणी करण्यात आलेली आहे. तर प्रत्येकाने आपल्या पाळीनुसार पाणवठ्यावर यावे. 29 पण त्यांनी (त्यांच्यामधील) एका (धारकऱ्याला) बोलावले, ज्याने तिच्या धोंडशिरा कापून टाकल्या. 30 तर पाहा कशी असते माझी शिक्षा, जी माझ्या इशाऱ्यांकडे दुर्लक्ष केल्यामुळे लादली गेली. 31 आम्ही त्यांच्यावर (शिक्षेचा) एक भयंकर स्फोट

घडवून आणला, परिणामी ते तुडवल्या गेलेल्या वाळल्या खुंटाप्रमाणे झाले. 32 आम्ही या कुराणास बोध ग्रहण करण्यासाठी सोपे बनविले आहे. तर आहे का कोणी बोध ग्रहण करणारा?

33 लूतच्या लोकांनीही (आमच्या) इशाऱ्यांना खोटे ठरविले. 34 (शेवटी) आम्ही त्यांच्यावर मृत्युदायी वादळ सोडले. फक्त लूतचे कुटुंब त्यापासून वाचले. आम्ही त्यांना भल्या पहाटे तेथून हालविले होते. 35 आमच्या (विशेष) कृपेने, आम्ही, आमच्याप्रति आभार व्यक्त करणाऱ्यांना अशाच प्रकारे (चांगला) मोबदला देत असतो. 36 अर्थातच, लूतने त्यांना आमच्या शिक्षेपासून सावध केले होते. पण त्यांनी त्याने दिलेल्या इशाऱ्यांविषयी (निराधार) विवाद निर्माण केले. 37 त्यांनी (पापकृत्यांच्या उद्देशाने) त्याच्या पाहुण्यांना आपल्या स्वाधीन करण्याची (लूतकडे) मागणी केली. पण आम्ही त्यांची दृष्टी हिरावून घेतली (आणि म्हणालो,) 'आता चाखा माझी शिक्षा, जी माझ्या इशाऱ्यांकडे दुर्लक्ष करणाऱ्यांवर लादली जाते.' 38 (दुसऱ्याच) पहाटे त्यांना चिरकाल कायम राहणाऱ्या नियत अशा शिक्षेने वेढले. 39 'तर चाखा माझ्या शिक्षेची चव, जी माझ्या इशाऱ्यांकडे दुर्लक्ष करणाऱ्यांवर लादली जाते.' 40 आम्ही या कुराणास उपदेश ग्रहण करण्यासाठी सोपे बनविले आहे, तर कोणी आहे का, उपदेश ग्रहण करणारा?

41 अशाचप्रकारे सावध करणारे पैगंबर, फिरऔनच्या लोकांकडे आले होते. 42 त्यांनी आमच्या सर्व संदेशांना खोटे ठरविले. परिणामी आम्ही त्यांना अशा प्रकारे जखडून टाकले, जसे महासामर्थ्यशाली व महाशक्तिमान जखडून टाकू शकतो.

43 तर मग तुमच्यापैकी सध्या सत्य नाकारणारे, त्या (नष्ट झालेल्या) लोकांपेक्षा श्रेष्ठ आहेत की काय? (म्हणून तुमच्यावर काही आच येणार नाही) की, अल्लाहच्या ग्रंथांत (तुम्ही काही केले तरी) तुम्हाला क्षमा करण्याचे वचन

दिलेले आहे. [44] किंवा ते असे म्हणतात की काय, आम्ही अशी संघटित जमात आहोत, म्हणून आमचेच वर्चस्व (नेहमी) कायम राहणार? [45] (पण) लवकरच ही जमात पराभूत होईल आणि पाठ दाखवत पळ काढेल. [46] एवढेच नाही, तर ती शेवटची घटका हीच त्यांची नियत वेळ आहे, आणि ती घटका खरोखर फार आपत्तीकारक व अत्यंत कटू असेल. [47] खरोखर, अपराधी लोक वाट चुकलेले व मूर्ख आहेत. [48] ज्या दिवशी त्यांना तोंडघशी अवस्थेत फरफटत नरकाच्या आगीकडे आणण्यात येईल (व सांगितले जाईल), 'आता चाखा नरकाच्या स्पर्शाची चव.'

[49] आम्ही प्रत्येक गोष्टीस योग्य प्रमाणानुसार निर्माण केले. [50] आणि (काहीही निर्माण करताना) आम्ही फक्त एकदा आदेश देतो आणि तिची अंमलबजावणी लगेच डोळ्याच्या लवण्याप्रमाणे होते (म्हणजे इकडे आदेश-तिकडे लगेच अंमलबजावणी). [51] अशाप्रकारे (भूतकाळात) आम्ही तुमच्यासारख्या अनेकांना नष्ट करून टाकले आहे. तर आहे का कोणी यावर चिंतन करून बोध घेणारा? [52] त्यांनी जे-जे केले त्याची त्यांच्या कर्मवहीत नोंद झालेली आहे. [53] प्रत्येक कृत्य, मग ते लहान असो वा मोठे, त्यात नमूद आहे. [54] निश्चितच ईशभिरू लोक स्वर्गाच्या बागांत व (नयनरम्य) प्रवाहांच्या सान्निध्यात असतील. [55] सच्च्या सन्मानाचे स्थान त्यांना लाभेल आणि सर्वशक्तिमान सम्राटाचे सान्निध्यही.

# सूरह-५५. अर-रहमान

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] तो कृपावंत आहे (अल्लाह)....... [2] ज्याने (मानवाला) कुराण शिकवले.

[3] त्यानेच मानवाला (विचार करणारा प्राणी) बनविले. [4] त्यानेच माणसाला (आपल्या विचारांना व्यक्त करण्याची) योग्यता प्रदान केली. [5] सूर्य आणि चंद्र

(त्यांच्या निर्मात्याने) नेमून दिलेल्या मार्गावर मार्गस्थ आहेत. 6 तारे व वृक्ष
त्याच्यासमोर नतमस्तक होतात (म्हणजे सर्व त्याच्या इच्छेला समर्पित आहेत).
7 त्यानेच आकाशाला (एका) उंच पातळीवर उभारून आणि (प्रत्येक गोष्टीसाठी)
संतुलन स्थापित केले. 8 म्हणून (हे मानवा) तू कदापि (अल्लाहद्वारे प्रस्थापित)
संतुलन बिघडवण्याचे प्रयत्न करू नकोस. 9 सर्व वस्तूंचे नेहमी न्यायपूर्वक
वजन करा, मोजमापात कमी करू नका.

10 आणि त्याने जीवसृष्टीकरिता पृथ्वीची रचना केली.

11 तिच्यावर (नानाविध) आवरण असलेली फळे व घोसदार खजुरीचे
वृक्ष आहेत. 12 आणि टरफल असलेले धान्य व सुगंधी फुलेही आहेत. 13 तेव्हा
तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या कृपेला नाकाराल? 14 त्याने
(प्रथम) मानव (आदम) यास चिकणमातीपासून निर्माण केले. 15 आणि त्याने
जिन्न यांची निर्मिती आगीच्या ज्वालेपासून केलेली आहे. 16 तर तुम्ही आपल्या
पालनकर्त्याच्या (सामर्थ्याच्या) कोणकोणत्या खुणा नाकाराल? 17 तोच सूर्याच्या
दोन्ही उदयस्थानांचा (पूर्व दिशांचा) व दोन्ही अस्तस्थानांचा (पश्चिम दिशांचा)
मालक आहे. 18 तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या (सामर्थ्याच्या) कोणकोणत्या
खुणा नाकाराल? 19 त्यानेच दोन समुद्रांना (अशाप्रकारे) गतिमान केले आहे
की, ते (शेवटी) आपसात मिळतात. 20 (तथापि) त्या दोघांच्यादरम्यान एक
बंध आहे, ज्यामुळे ते (पूर्णपणे) एकमेकांत मिसळून जात नाहीत. 21 तर तुम्ही
आपल्या पालनकर्त्याच्या (सामर्थ्याच्या) कोणकोणत्या खुणा नाकाराल? 22
त्यांच्यामधून मोती आणि प्रवाळ बाहेर येतात. 23 तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या
कोणकोणत्या कृपाप्रसादांना नाकाराल? 24 आणि त्या समुद्रावर पर्वतासारख्या
उभ्या दिसणाऱ्या नौका आहेत, त्या त्याच्याच आहेत. 25 तुम्ही आपल्या
पालनकर्त्याच्या कोणकोणत्या (कृपेच्या) खुणा नाकाराल?

26 पृथ्वीवर (तसेच आकाशात) जे-जे आहे — ते सर्व संपुष्टात येणार

आहे. 27 आणि भव्यतेने व महानतेने परिपूर्ण असे तुझ्या पालनकर्त्याचे स्वत्व नेहमीसाठी कायम राहणार. 28 तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या (सामर्थ्याच्या) कोणकोणत्या खुणा नाकाराल? 29 आकाशात व पृथ्वीवर असलेला प्रत्येक जीव त्याच्यावरच अवलंबून आहे. तो प्रत्येक क्षणी एका वेगळ्या वैभवाच्या रूपात स्वत:ला प्रकट करीत असतो. 30 तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या (श्रेष्ठत्वाच्या) कोणकोणत्या खुणा नाकाराल?

31 हे दोन विशाल समूहांनो! (मानव व जिन्न) आम्ही लवकरच (तुमचा हिशेब घेण्यासाठी) तुमच्याकडे लक्ष देणार आहोत. 32 तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या खुणा नाकाराल? 33 हे जिन्न व मानव समूहांनो! जर तुम्हाला (वाटत असेल) की, तुमच्याकडे आकाश व पृथ्वी यांच्या सीमा ओलांडून निघून जाण्याचे सामर्थ्य आहे, तर त्या ओलांडाच! पण तुम्ही त्या (आमच्या) परवानगीशिवाय ओलांडूच शकत नाही! 34 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या (सामर्थ्याच्या) कोणकोणत्या खुणा नाकाराल? 35 तुम्ही (पळ काढण्याचा प्रयत्न केला तर) तुमच्यावर आगीच्या ज्वाला व धूर सोडण्यात येईल (आणि तुम्हाला अशाप्रकारे सळो की पळो करून सोडण्यात येईल,) ज्यापासून तुम्ही स्वत:चा बचाव करू शकणार नाही. 36 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या (सामर्थ्याच्या) कोणकोणत्या खुणा नाकारणार?

37 (तेव्हा काय अवस्था होईल) जेव्हा आकाश फाटेल व (जळत असलेल्या) तेलाप्रमाणे लालभडक होईल. 38 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या (सामर्थ्याच्या) कोणकोणत्या खुणा नाकारणार? 39 त्या दिवशी कोणत्याही मनुष्याला व जिन्नला त्याच्या दुष्कृत्यांबद्दल विचारपूस केली जाणार नाही. 40 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या खुणा नाकारणार? 41 अपराधी लोक त्यांच्या चेहऱ्यांवरील खुणांवरून ओळखले जातील आणि त्यांना त्यांच्या कपाळावरील केसांना आणि पायांना पकडून फरफटत नेण्यात येईल. 42 तर

तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या (सामर्थ्याच्या) कोणकोणत्या खुणा नाकारणार? 43 हाच तो नरक आहे ज्यास अपराधी लोक नाकारत असत. 44 ते त्यामधे आगीच्या ज्वाला आणि उकळते पाणी यांच्यादरम्यान (निराश अवस्थेत) भटकत असतील. 45 तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या खुणा नाकारणार?

46 आणि जो कोणी आपल्या पालनकर्त्यासमोर उभे राहून जाब द्यावा लागणार (असा विचार) नेहमी बाळगून असायचा, अशा माणसासाठी दोन बागा आहेत. 47 तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या (कृपेच्या) कोणकोणत्या खुणा नाकारणार? 48 दोन्ही बागांत — हिरव्या टवटवीत पसरलेल्या फांद्या. 49 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या (कृपेच्या) कोणकोणत्या खुणा नाकारणार? 50 त्या दोन्ही (बागांत) दोन पाण्याचे झरे प्रवाहित असतील. 51 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या सामर्थ्याच्या कोणकोणत्या खुणा नाकारणार? 52 दोन्ही बागांत प्रत्येक प्रकारच्या फळाच्या दोन-दोन जाती असतील. 53 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या (कृपेच्या) कोणकोणत्या खुणा नाकारणार? 54 (स्वर्गनिवासी तिथे अशा उमद्या) बिछायतीवर पहुडलेले असतील, ज्यांची अस्तरे जाड रेशमाची असतील. आणि दोन्ही बागांतील फळे त्यांच्या सहज हाताला येतील, अशा तऱ्हेने लोंबकळत असतील. 55 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या (सामर्थ्याच्या) कोणकोणत्या खुणा नाकारणार? 56 या (बागांत) लाजाळू नजरा असलेल्या सहचारिणी असतील, त्यांना (स्वर्गनिवासीयांपूर्वी) ना कोणत्याही मनुष्याने, ना कोणत्याही जिन्नने स्पर्श केलेला असेल. 57 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या (कृपेच्या) कोणकोणत्या निशाण्या नाकाराल?

58 त्या अशा सुंदर असतील जणू काही माणके व मोती होत. 59 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या कृपाप्रसादांना नाकारणार? 60 चांगुलपणाचा मोबदला चांगुलपणाशिवाय आणखी काय असू शकतो? 61 तर

तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या कृपाप्रसादांना नाकारणार?

62 आधी (वर उल्लेख झालेल्या दोन बागांशिवाय) आणखी दोन बाग आहेत. 63 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याचे, त्याच्या खुणांद्वारे (प्रकट होणारे गुण) कशा-कशाप्रकारे नाकाराल? 64 दोन्ही बागा गडद हिरव्या पानांनी बहरलेली असतील. 65 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या कृपाप्रसादांना नाकारणार? 66 त्या दोन्ही बागांत खळाळत वाहणारे दोन झरे असतील. 67 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या कृपाप्रसादांना नाकाराल? 68 त्या दोन्ही (बागांत) (नानाविध) फळे असतील, खजूर व डाळिंबे असतील. 69 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या कृपाप्रसादांना नाकारणार? 70 त्यामध्ये (स्वर्गनिवासीयांच्या) सुचरित्र व सुस्वरूप सहचारिणी असतील. 71 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या कृपाप्रसादांना नाकारणार? 72 काळ्या व मोठ्या डोळ्यांच्या त्या सुंदर स्त्रिया असतील व त्यांना (भव्य) मंडपात सुरक्षित ठेवण्यात आलेले असेल. 73 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या कृपाप्रसादांना नाकारणार? 74 स्वर्गनिवासीयांपूर्वी त्यांना कोणत्याही मनुष्याने वा जिन्नने स्पर्श केलेला नसेल. 75 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या कृपाप्रसादांना नाकारणार? 76 (ते अशा स्वर्गात वास्तव्य करतील) जिथे ते हिरव्या व सुंदर गालिच्यावर लोड लावून पहुडलेले असतील. 77 तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या कृपाप्रसादांना नाकारणार? 78 (पैगंबर!) सर्वगुणसंपन्न असे आहे तुझ्या पालनकर्त्याचे नाव, जो असीम महान व थोर आहे.

# सूरह-५६. अल-वाक़िआ

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 जेव्हा ती अटळरित्या घडणारी घटना घडून येईल. 2 तिच्या घडून

येण्याला कोणीही खोटे ठरवू शकत नाही, ना तिला कोणी रोखू शकतो. [3] ती घटना काहींना अपमानित करणारी तर काहींना सन्मान प्रदान करणारी ठरेल. [4] तेव्हा (संपूर्ण) पृथ्वी वाईटरित्या हादरवून सोडली जाईल. [5] आणि पर्वतांचा अगदी चुरा-चुरा होऊन जाईल. [6] मग ते (प्रचंड असे पर्वत) विखुरलेले धुळीचे कण बनतील. [7] (त्या दिवशी) समस्त मानवजात (प्रामुख्याने) तीन समूहात विभागली जाईल.

[8] पहिला समूह उजव्या बाजूला असेल (म्हणजे जीवनात सन्मार्ग अवलंबिलेल्यांचा असेल) वाह! उजव्या बाजूला असणाऱ्यांचे काय (सौभाग्य)! [9] आणि दुसरा समूह डावीकडचा (म्हणजे भ्रष्ट मार्ग अवलंबिलेल्यांचा) असेल. (खरोखर,) किती अभागी आहेत ते डावीकडचे! [10] आणि तिसरा समूह (श्रद्धा व सत्कर्मांच्या बाबतीत) अग्रेसर (राहिलेल्या) लोकांचा असेल. [11] ज्यांना (अल्लाहच्या) सर्वात निकटचे स्थान लाभेल. [12] ऐश्वर्यसंपन्न स्वर्गात वास्तव्य करतील. [13] त्यांच्यात अनेक आधीच्या लोकांपैकी असतील. [14] नंतरचे (म्हणजे क़यामतीच्या जवळच्या पिढ्यांपैकी) फारच थोडेसे असतील. [15] सोने व रत्ने यांनी मढवलेल्या आसनांवर....... [16] ते लोड लावून, एकमेकांसमोर बसलेले असतील. [17] त्यांना (हवी ती सेवा देण्यासाठी सुंदर व) चिरतरुण मुले (सदैव) उपस्थित असतील. [18] ते शुद्ध मद्याने भरलेले प्याले व पात्रे व कप घेऊन (त्यांच्याकडे ये-जा करत असतील). [19] ते पिण्याने ना डोके दुखेल, ना नशा येईल. [20] आणि प्रत्येक प्रकारची फळे जी त्यांना हवी असतील. [21] आणि पक्ष्यांचे मांस जे त्यांना आवडत असेल. [22] आणि त्यांच्यासह विशाल व सुंदर डोळ्यांच्या रूपवती सहचारिणी असतील. [23] त्या अशा असतील जणू त्यांच्या आवरणातच जतन करून ठेवलेले मोती. [24] हे बक्षीस असेल त्या कार्यांबद्दल, जे ते करीत असत. [25] ते (स्वर्गाच्या वातावरणात कधीही) व्यर्थ किंवा तुच्छ शब्द ऐकणार नाहीत. [26] फक्त ऐकतील तर असे शब्द — सलाम

— सलाम (म्हणजे तुम्हाला सदैव शांती लाभो).

[27] तसेच तो गट, जो उजव्या बाजूला असेल, खरंच फार सुदैवी आहेत, उजव्या बाजूचे लोकही! [28] (त्यांच्या आसपास) काटेरहित बोरीचे वृक्ष असतील. [29] आणि घोसदार केळीचे वृक्ष (तिथे असतील). [30] आणि लांबवर पसरलेल्या सावलीत (ते असतील). [31] (त्यांच्या शेजारी) पाण्याचे प्रवाह वाहत असतील. [32] प्रचंड प्रमाणात फळे (त्यांच्यासाठी उपलब्ध असतील). [33] त्यांचा तुटवडा कधीही निर्माण होणार नाही, ना त्यांच्या (वापरासंबंधाने कसले) प्रतिबंध असेल. [34] उंच शाही आसने (तिथे त्यांच्यासाठी असतील). [35] (त्यांच्या ज्या सहचारिणी असतील) त्यांना आम्ही (स्वर्गनिवासीयांसाठी) परिपूर्ण जीवनसाथींच्या रूपाने निर्माण केलेले आहे. [36] आणि त्यांना कुमारी बनवले आहे. [37] त्या (आपल्या जीवनसाथीशी) प्रेम करणारे आणि समान वयाचे असतील. [38] (हे सर्व) उजव्या बाजूच्या लोकांसाठी असेल. [39] या (स्वर्गनिवासीयांपैकी) अनेकजण आधीच्या लोकांमधून असतील. [40] आणि नंतरच्या पिढ्यांपैकी (म्हणजे मानवी इतिहासाच्या शेवटच्या टप्प्यातीलही) अनेकजण असतील.

[41] डाव्या बाजूचे लोक, (म्हणजे भ्रष्ट मार्ग अवलंबिलेले) खरोखर, किती दुर्दैवी आहेत डाव्या बाजूचे लोक! [42] ते होरपळणारे वारे व उकळते पाणी यांच्या दरम्यान वास्तव्य करतील. [43] आणि काळ्या धुराच्या छायेखाली. [44] जी सावली ना थंड असेल, ना सुखदायी. [45] हे लोक यापूर्वी (केवळ) सुख–समृद्धीत धुंद असे जीवन जगत होते. [46] आणि जघन्य अपराध आग्रहपूर्वक करीत असत. [47] आणि म्हणत असत की, आम्ही मेल्यानंतर जेव्हा माती व हाडे बनून जाऊ, तेव्हा आम्हाला पुन्हा जिवंत करून उठविण्यात येईल? [48] आमच्या वाडवडिलांनाही का? [49] त्यांना सांगा, 'होय, आधीचे व नंतरचे सर्व.' [50] गोळा केले जातील, एका निर्धारित वेळेस, एका ठरलेल्या दिवशी. [51] तेव्हा सत्य नाकारणाऱ्यांना व वाट चुकलेल्या तुम्हा लोकांना [52] ज़क़्क़ुमच्या

झाडापासून खाद्य मिळेल. 53 आणि त्यानेच तुम्ही आपले पोट भराल. 54 आणि (ते खाऊन) त्यावर उकळते पाणी प्याल. 55 आणि तेही फार तहानलेल्या उंटाप्रमाणे प्याल. 56 न्यायाच्या दिवशी असा पाहुणचार त्यांना दिला जाईल.

57 आम्हीच तर तुम्हाला निर्माण केले आहे, तर (लोकांनो! या) सत्याचा स्वीकार करण्यास तुम्हाला काय अडचण आहे? 58 तुम्ही कधी (चिंतनपूर्वक) त्यावर विचार केला आहे का, जे (वीर्य) तुमच्यामधून बाहेर पडते? 59 त्याद्वारे (मानवाची) निर्मिती तुम्ही करता की, त्याची निर्मिती करणारे आम्ही आहोत? 60 आम्ही तुम्हा सर्वांसाठी मृत्यू अटळ ठरविले आहे. आणि (तसे करण्यापासून) आम्हाला रोखू शकेल असा कोणीही नाही. 61 तसेच (आम्ही यासाठी समर्थ आहोत) की, तुमच्या जागी तुमच्यासारख्यांची निर्मिती करून आणू किंवा तुमच्यात परिवर्तन घडवून आणू आणि अशा आकारात तुमची पुन:निर्मिती करू ज्याविषयी (सध्या) तुम्ही अनभिज्ञ आहात. 62 तुम्हाला आपल्या पहिल्या निर्मितीचे निश्चितपणे ज्ञान आहे. त्यापासून तुम्ही बोध का घेत नाही? 63 तुम्ही जे पेरता त्यावर तुम्ही कधी चिंतन केला आहात का? 64 त्यास तुम्ही उगवता की, आम्ही उगवणारे आहोत? 65 आम्ही इच्छिले असते तर (पीक तुमच्या हातात येण्यापूर्वीच) त्याचा चुरा-चुरा करून टाकू शकलो असतो. (आम्ही तसे केल्यास) तुमच्याकडे शोक करण्याशिवाय अन्य काही उरणार नाही. 66 (तेव्हा म्हणाल,) 'आम्ही तर बरबाद झालो,..... 67 नव्हे, आम्ही तर पूर्णपणे कंगाल झालोत!' 68 (लोकांनो!) तुम्ही जे पाणी पीत असता, त्याबद्दल तुम्ही कधी चिंतन केले आहे का? 69 तुम्ही त्याचा ढगांद्वारे वर्षाव करता की, आम्ही आहोत त्याचा वर्षाव करणारे? 70 आम्ही इच्छिल्यास त्यास खारट (व कडू) बनवू शकतो? तर मग तुम्ही आमच्याप्रति आभार का व्यक्त करीत नाही? 71 तसेच जो अग्नी तुम्ही पेटविता, त्याविषयी तुम्ही कधी विचार केला आहात का? 72 इंधनासाठी वापरल्या जाणाऱ्या वृक्षांना निर्माण करणारे, तुम्ही आहात की,

आम्ही आहोत? 73 आम्ही तिला तुमच्यासाठी बोध प्राप्त करण्याचे माध्यम आणि वाटसरूंसाठी लाभदायी गोष्ट बनविले आहे. 74 (लोकांनो!) तुम्ही आपल्या महान पालनकर्त्याच्या नावाचे स्तुतिगान करा.

75 तर मी ताऱ्यांच्या स्थानांची शपथ घेऊन सांगतो. 76 जर तुम्ही चिंतन कराल तर (कळून येईल) ही खरोखर फारच मोठी शपथ आहे. 77 यात शंकाच नाही की, हे कुराण फार थोर (असा ग्रंथ) आहे. 78 एका सुरक्षित ग्रंथात जतन करून ठेवलेला आहे. 79 त्यास तेच स्पर्श करतात. जे (मनाने पवित्र) आहेत. 80 प्रकट करण्यात आलेला आहे सर्व जगांच्या मालकाकडून. 81 तुम्ही या (ईश्वर)वाणीची कशी काय उपेक्षा करू शकता? 82 यास खोटे ठरविण्याला तुम्ही आपल्या रोजीरोटीसाठी धंदा बनविला आहात की काय?

83 तर तेव्हा का (तुम्ही असहाय बनता?), जेव्हा मरणाऱ्या माणसाचा शेवटचा श्वास कंठाशी येतो. 84 (तेव्हा) तुम्ही (असहायपणे) इकडे–तिकडे पाहत असता. 85 आणि आम्ही तुमच्यापेक्षाही त्या (मरणाऱ्या) माणसाच्या जवळ असतो, पण तुम्हाला (आम्ही) दिसत नाही. 86 तुम्ही आमच्या आदेशाच्या अधीन नाही, असे जर (तुम्हाला वाटत असेल) आणि...... 87 तुमच्या दाव्यात सत्यता असेल तर तुम्ही त्या मरणाऱ्या माणसाचे प्राण परत का आणत नाही? 88 (तुम्हा सर्वांना मरावे लागणारच) पण जर (मरणारा माणूस) (अल्लाहचे) सान्निध्य लाभलेल्यांपैकी असेल तर. 89 त्याच्यासाठी आनंदी जीवन आहे. आणि विपुल प्रमाणात उपजीविकेची साधने आणि कृपाप्रसादांनी भरपूर असे नंदनवन. 90 आणि जर तो उजव्या बाजूला असलेल्या (म्हणजे सदाचाराचे जीवन जगलेल्या) लोकांच्या गटापैकी असेल. 91 (त्याचेदेखील स्वर्गात या शब्दांनी स्वागत केले जाईल,) 'तुला सदैव शांती लाभो, (तू) सदाचाराचे अवलंब केलेल्यांपैकी होतास.' 92 पण (तो मरणारा) सत्य नाकारणाऱ्या व वाट चुकलेल्या लोकांपैकी असेल तर– 93 त्याच्या स्वागतासाठी उकळते पाणी असेल. 94 आणि धगधगणारी आग असेल.

[95] हे अटळ सत्य आहे, यात मुळीच शंका नाही. [96] (पैगंबर!) तुम्ही आपल्या महान पालनकर्त्याच्या नावाने स्तुतिगान करा.

# सूरह-५७. अल-हदीद

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] आकाशात आणि पृथ्वीवर जे काही आहे, ते सर्व अल्लाहचे स्तुतिगान करीत आहेत. आणि तो सर्वशक्तिमान व अस्सल बुद्धिवान आहे. [2] आकाशात
व पृथ्वीवर त्याचीच सत्ता आहे. तोच जीवन देतो व तोच मृत्यू देतो आणि तोच सर्व काही करण्यास समर्थ आहे. [3] (हे सर्व चराचर अस्तित्वात येण्यापूर्वीही) त्याचे अस्तित्व होते, आणि (सर्व संपुष्टात आल्यानंतरही) त्याचेच अस्तित्व कायम राहील, दृश्य आणि अदृश्य त्याच्यासाठी सारखे आहेत. त्यालाच प्रत्येक गोष्टीचे पूर्ण ज्ञान आहे. [4] त्यानेच आकाश व पृथ्वी यांची सहा कालावधीत निर्मिती केली आणि समस्त सृष्टीच्या सत्ताकेंद्राचे नियंत्रण स्वत:कडे घेतले. जे काही जमिनीत प्रवेश करते आणि जे काही तिच्यातून बाहेर येते, ते सर्व तो जाणतो. तसेच जे काही आकाशातून खाली येते आणि जे काही आकाशाकडे वर जाते, (तेही तो जाणतो). आणि तुम्ही जिथे-कुठे असता, तो तुमच्याबरोबर असतो. आणि जे काही तुम्ही करीत असता, त्यावर तो नजर ठेवून असतो. [5]
आकाशात आणि पृथ्वीवर त्याचीच सत्ता आहे. आणि सर्व गोष्टी त्याच्याकडेच परत जात असतात. [6] तोच दिवसाला लहान करून रात्र मोठी करत असतो, तसेच रात्र लहान करून दिवस मोठा करीत असतो. आणि तोच मनांतील सर्व गोष्टी जाणतो.

[7] (लोकांनो!) अल्लाह व त्याच्या पैगंबरावर विश्वास ठेवणारे बना, त्याने तुम्हाला ज्या धनसंपत्तीवर अधिकार दिलेला आहे, त्यातून (त्याच्या कार्यासाठी) खर्च करा. आणि तुमच्यापैकी जे लोक श्रद्धा धारण करून (अल्लाहच्या कार्यासाठी)

खर्च करतील तर त्यांना फार मोठे बक्षीस मिळेल. [8] काय कारण आहे की, पैगंबर तुम्हाला तुमचा पालनकर्ता असलेल्या अल्लाहवर श्रद्धा धारण करण्याचे आवाहन करीत असतानादेखील तुम्ही (खऱ्या अर्थाने) श्रद्धावंत बनण्यास तयार नाही? पण त्याने तर आधीच तुमच्याशी (त्याला पालनकर्ता मानण्याची) प्रतिज्ञा घेतलेली आहे. जर तुम्ही खरोखर श्रद्धावंत असाल (तर तुम्हाला याची जाण असायला हवी). [9] तोच आपल्या सेवकाकडे स्पष्ट संदेश पाठवीत असतो. या उद्देशाने की, त्याला त्याद्वारे तुम्हाला अंधकारातून बाहेर काढून प्रकाशात आणता यावे. आणि अल्लाह तुमच्याप्रति कनवाळू व दयाळू आहे. [10] तुम्हाला काय झाले आहे की, तुम्ही अल्लाहच्या कार्यासाठी खर्च करायला तयार होत नाही. (पण तुम्ही हे जाणायला हवे की,) आकाश व पृथ्वी या सर्वांचा वारस शेवटी अल्लाहच असेल. तुमच्यापैकी जे लोक विजय प्राप्त झाल्यानंतर आपले धन (अल्लाहच्या कार्यात) खर्च करतात व त्याच्यासाठी लढतात, ते दर्जाच्या बाबतीत त्यांच्याबरोबरचे होऊ शकत नाहीत. ज्यांनी विजय प्राप्त होण्यापूर्वी (अल्लाहच्या कार्यात) आपले धन खर्च केले व त्याच्या मार्गात लढाई केली. तरी अल्लाहने तुम्हा सर्वांचे कल्याण करण्याचे वचन दिलेले आहे. आणि अल्लाह तुम्ही जे काही करता, ते चांगले जाणतो.

[11] तो कोण आहे, जो अल्लाहला (दिलखुशीने) सर्वोत्तम कर्ज देईल? आणि तो त्याच्यासाठी ते (कर्जरूपी दिलेले धन) अनेक पटीने वाढवील. आणि (शिवाय) त्यास सन्मानपूर्वक मोबदला प्रदान करेल. [12] (पैगंबर!) त्या दिवशी तुम्ही पाहाल की, श्रद्धावंत पुरुष व स्त्रिया यांच्यापुढे व त्यांच्या उजव्या बाजूस (त्यांच्या सद्‌गुणांचा) प्रकाश धावत असेल (म्हणजेच ते अल्लाहच्या कृपाछत्रात दाखल झालेले असतील, ते जिथे-कृपाछत्र तिथे). (आणि या शब्दांत त्यांचे स्वर्गात स्वागत केले जाईल की,) आज तुमच्यासाठीच शुभवार्ताच-शुभवार्ता आहे! तुमच्यासाठी कायम वास्तव्याच्या अशा बागा तयार आहेत, ज्यातून

(नयनरम्य सदैव वाहणारे) प्रवाह वाहत असतील. हेच सर्वोत्तम यश आहे. 13 त्या दिवशी दांभिक पुरुष व दांभिक स्त्रिया श्रद्धावंतांना म्हणतील. 'आमच्यासाठी जरा थांबा, आम्हालाही तुमच्या प्रकाशापासून (काही अंशी तरी) लाभान्वित होऊ द्या.' तेव्हा त्यांना सांगितले जाईल, 'मागे परत जा आणि इतरत्र कुठे प्रकाश शोधून घ्या.' मग त्यांच्या (व श्रद्धावंतांच्या) दरम्यान एक भिंत उभी केली जाईल, त्या भिंतीला एक द्वार असेल. तिच्या आतल्या बाजूस (अल्लाहची) असीम कृपा असेल आणि बाहेरच्या बाजूस शिक्षा— (आणि फक्त शिक्षा) असेल. 14 ते दांभिक लोक श्रद्धावंतांना हाक देतील, 'आम्ही तुमच्याबरोबर नव्हतो का.' ते उत्तर देतील, 'होय होता, पण तुम्ही स्वतःहून मोहाला बळी पडलात आणि तुम्ही (श्रद्धेच्या बाबतीत) धरसोड भूमिका घेतली होती आणि (पुनरुत्थानाबद्दलही) तुम्ही शंका घेत राहिलात. तसेच तुमच्या निराधार मनोकामनांनी तुमची येथपर्यंत फसवणूक केली की, अल्लाहची आज्ञा अमलात आली. आणि त्या फसवणूक करणाऱ्या (सैताना)ने अल्लाहच्या बाबतीत तुमची घोर फसवणूक केली.' 15 तर आज ना तुमच्याकडून (तुमची सुटका करण्यासाठी) कोणत्याही प्रकारचे मुक्तिदंड स्वीकारले जाणार आहे, ना त्या लोकांकडून जे सत्य नाकारण्यावर (जाणूनबुजून) आग्रही राहिले. तुम्हा (सर्वांचे) निवासस्थान नरकाची आग आहे. आता हेच तुमचे (एकमेव) आश्रयस्थान आहे. आणि (खरोखर) ते अत्यंत वाईट स्थान आहे.

16 श्रद्धावंतांसाठी ती वेळ अद्याप आली नाही का की, त्यांची मने संपूर्ण समर्पण भावाने अल्लाहच्या उपदेशासमोर लीन व्हावी. आणि त्या सत्यासमोर जे (त्याच्याकडून) प्रकट करण्यात आलेले आहे. आणि त्यांनी त्या लोकांसारखे (अजिबात) होता कामा नये ज्यांना त्यांच्यापूर्वी ग्रंथ देण्यात आला होता. (पण) त्यांची मने कालांतराने कठोर बनलीत. आणि त्यांच्यापैकी बहुसंख्य आज्ञाधारक नव्हते. 17 लक्षात ठेवा की, अल्लाह जमीन मृत झाल्यानंतर तिला जिवंत करतो.

आम्ही आमचे संदेश तुम्हाला स्पष्ट करून यासाठी सांगितले आहे की, तुम्ही आपल्या बुद्धीचा वापर करावा.

18 निश्चितच दान देणारे पुरुष व दान देणाऱ्या स्त्रिया आणि अल्लाहला उदारतापूर्वक कर्ज देणारे लोक, त्यांनी जे काही दिले असेल, त्यात (अल्लाहकडून) कित्येक पटीने वाढ केली जाईल. आणि त्यांना सन्मानपूर्वक मोबदला मिळेल.
19 आणि जे लोक अल्लाहवर व त्याच्या पैगंबरांवर विश्वास ठेवतात तर असेच लोक अल्लाहच्या दृष्टीत सत्यवादी, सत्याची साक्ष देणारे आहेत. त्यांना त्यांचा मोबदला मिळेल आणि (त्यांच्या सद्गुणांचा) प्रकाश (त्यांच्याबरोबर) असेल. आणि जे लोक सत्य नाकारण्यावर आग्रही राहिले आणि त्यांनी आमच्या संदेशांना खोटे ठरविले तर असेच लोक नरकवासी असतील.

20 (लोकांनो!) या गोष्टीचा कदापि विसर पडू देऊ नका की, या जगातील जीवन अन्य काही नसून केवळ खेळ व तमाशा आहे आणि (क्षणभंगुर) शोभेचा एक देखावा मात्र आहे व आपसात बढाई मिरविण्याचा (खेळ) आहे. आणि संपत्ती व संततीच्या बाबतीत एकमेकांच्या पुढे जाण्याची (व्यर्थ) स्पर्धा आहे. (या जीवनाचे) उदाहरण त्या पावसासारखे आहे. ज्यापासून वाढलेली शेती पाहून शेतकऱ्याचे मन प्रसन्न होते. पण (लवकरच) तुम्ही पाहता, ती सुकून जाते आणि पिवळी पडते. मग ती गवताप्रमाणे सुकून चुरा–चुरा होते. (पण) यानंतरच्या (अनंतकालीन) जगात (दोन परिणाम पुढे येतील) (पहिले श्रद्धाहीनांसाठी) कठोर शिक्षा व (दुसरे श्रद्धावंतांसाठी) क्षमा व अल्लाहची प्रसन्नता. तर या जगातील जीवनात, दुसरे काही नसून केवळ क्षणभंगुर व फसवे सुख आहे.
21 (लोकांनो!) (या जीवनाचे सत्य जाणून) केवळ आपल्या पालनकर्त्याकडून क्षमाप्राप्तीसाठी आणि त्या स्वर्गासाठी एकमेकांशी स्पर्धा करा, ज्याचा विस्तार आकाश व पृथ्वी सारखा आहे. ते (स्वर्ग) अशा लोकांसाठी तयार करण्यात आलेले आहे, जे अल्लाह व त्याच्या पैगंबरावर विश्वास ठेवणारे

आहेत. ही अल्लाहची (अपार) कृपा आहे, तो इच्छितो त्यास ती प्रदान करतो आणि अल्लाहच्या कृपेला सीमाच नाही.

22 (लोकांनो!) कोणतेही संकट पृथ्वीवर येत नाही, ना स्वत: तुमच्यावर येते, पण फक्त त्याशिवाय, ज्याच्याविषयी आम्ही ते निर्माण करण्यापूर्वीच, (आमच्याकडे असलेल्या) महाग्रंथात नमूद केलेले असते. नि:संदेह, हे सर्व अल्लाहसाठी सहज शक्य आहे.
23 (त्या वास्तवाची आम्ही तुम्हाला) यासाठी (जाणीव करून दिली आहे) की, जे काही तुम्ही गमावलात त्याबद्दल दु:खी व्हायला नको, तसेच त्याच्याकडून जे तुम्हाला प्राप्त झाले आहे, त्याबद्दलही (अतिउत्साही होऊन) गर्व करण्याची गरज नाही. कारण अल्लाहला गर्विष्ठ व बढाईखोर (लोक अजिबात) प्रिय नाहीत.
24 जे स्वत: कंजूषपणे वर्तन करतात आणि इतरांनाही कंजूषपणा शिकवतात. आणि जो कोणी (या संदेशाकडे) पाठ फिरवील. (त्यांनी हे लक्षात ठेवावे) अल्लाह स्वयंपूर्ण (व आत्मनिर्भर) आहे, सर्व प्रकारच्या स्तुतीस पात्र आहे.

25 आम्ही आमच्या पैगंबरांना सत्याच्या सर्व स्पष्ट प्रमाणासह पाठविले होते आणि त्यांच्याबरोबर ग्रंथ व (चूक की, बरोबर दाखवणारे) तराजूही पाठविले, यासाठी की, लोकांनी न्यायबुद्धीने वर्तणूक करावी. तसेच आम्ही लोखंड उपलब्ध करून (त्याचा उपयोग करण्याची योग्यता तुम्हाला प्रदान केली). ज्यामध्ये प्रचंड ताकद आहे, तसेच लोकांसाठी तो विविध प्रकारे लाभदायी आहे. (हे सर्व तुम्हाला यासाठी देण्यात आले आहे की,) अल्लाहला त्या लोकांना चिन्हांकित करता यावे, जे त्याला न पाहताही, त्याची व त्याच्या पैगंबराची मदत करण्यासाठी पुढे सरसावतात. यात शंकाच नाही की, अल्लाह हा सामर्थ्यशाली व सर्वशक्तिमान आहे.

26 (याच उद्देशासह) आम्ही नूहला व इब्राहीमला (आमचे प्रतिनिधी) बनवून पाठविले होते. आणि आम्ही त्यांच्या वंशजामध्ये संदेशवाहक बनविण्याचा

व ग्रंथ प्रदान करण्याचा क्रम सुरू ठेवला होता. त्यांच्यापैकी काही सन्मार्ग लाभलेले होते, पण अनेक आज्ञापालन न करणारे होते. [27] त्यांच्यानंतर त्यांच्याच पावलावर पाऊल ठेवून चालणारे आमचे (इतर) पैगंबर आम्ही पाठवले. (कालांतराने) आम्ही त्यांचेच अनुसरण करणारा (पैगंबर बनवून) मरियमपुत्र येशू मसीह यास पाठविले. आणि आम्ही त्यास बायबल (इंजील) हा ग्रंथ प्रदान केला होता. आणि ज्या लोकांनी त्याचे अनुसरण केले, आम्ही त्यांच्या मनात करुणा व दया (हे गुण) निर्माण केले. आणि जिथपर्यंत वैराग्याचा संबंध आहे, आम्ही त्यांना त्याचा आदेश (अजिबात) दिलेला नव्हता, तर तो मार्ग त्यांनी स्वत:च शोधून काढला होता. आणि अल्लाहला प्रसन्न करण्यासाठी (स्वत:हूनच) त्याचा अवलंब केला होता, पण त्यांनी त्याचे जसे करायला हवे होते, तसे उचितरित्या पालनही केले नाही. तर आम्ही त्यांच्यापैकी जे सच्चे श्रद्धावंत होते, त्यांनाच (चांगला) मोबदला प्रदान केला. कारण त्यांच्यापैकी अनेक आज्ञा न पाळणारेच होते.

[28] श्रद्धावंतांनो! अल्लाहची जाण बाळगा आणि पैगंबरावर विश्वास ठेवा. तो तुमच्यावर दुपटीने कृपा करेल. तसेच तुम्हाला असा प्रकाश प्रदान करेल, ज्याच्या उजेडात तुम्ही चालू शकाल. तसेच तो तुमच्या (भूतकालीन चुका) माफ करून टाकेल. कारण अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे. [29] आधीच्या ग्रंथधारकांनी हे जाणून घ्यावे की, अल्लाहच्या कृपेवर त्यांची काही मक्तेदारी नाही. कारण कृपा करण्याचा अधिकार सर्वस्वी अल्लाहच्या हाती आहे. तो इच्छितो त्यास ती प्रदान करतो आणि अल्लाह हा असीम कृपावंत आहे.

# सूरह-५८. अल-मुजादला

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] (पैगंबर!) निश्चितपणे अल्लाहने त्या स्त्रीचे म्हणणे ऐकले आहे, जी

आपल्या पतीसंबंधाने तुमच्याकडे वादविवाद करीत होती आणि अल्लाहसमोर आपले गाऱ्हाणे मांडत होती. अल्लाह तुम्हा दोघांचे संभाषण ऐकत होता. अल्लाह सर्व काही ऐकणारा व सर्वसाक्षी आहे.

2 तुमच्यापैकी जे लोक आपल्या पत्नींना 'माता' असे संबोधून (स्वत:पासून) दूर करतात (म्हणजे ज़िहार करतात) (असे संबोधल्याने) त्या त्यांच्या माता होत नाहीत. त्यांच्या माता तर त्या आहेत, ज्यांनी त्यांना जन्म दिला आहे. हे लोक निश्चितपणे एक अयोग्य व असत्य गोष्ट बोलत आहेत. निःसंदेह अल्लाह पापांचे निवारण करणारा व फार माफ करणारा आहे. 3 आणि जे लोक अशाप्रकारे आपल्या पत्नींना 'तू मातेसमान आहेस' असे म्हणून (स्वत:पासून) दूर ठेवतात. पण नंतर जेव्हा ते आपले (असत्य) वक्तव्य मागे घेऊ इच्छितील तर त्यांच्यासाठी (अशी शिक्षा आहे) की, त्यांनी एकमेकाला पुन्हा स्पर्श करण्यापूर्वी एका दासाला (दास्यत्वातून) स्वतंत्र करावे. तर या गोष्टीवर कृती करण्याची तुम्हाला ताकीद दिली जात आहे. आणि तुम्ही जे काही करता, त्याची अल्लाहला पूर्ण जाणीव आहे. 4 आणि ज्याच्यासाठी हे संभव नसेल तर एकमेकांना पुन्हा स्पर्श करण्यापूर्वी त्याने त्याऐवजी सलग दोन महिने उपवास करावा. आणि एखादा कोणी यासाठीही असमर्थ असेल तर त्याने साठ गरीब माणसांना जेवू घालावे. (हा आदेश) अल्लाह व त्याच्या पैगंबराप्रति तुमची श्रद्धा अधिक बळकट करण्यासाठी आहे. या अल्लाहने स्थापित केलेल्या सीमा होत. आणि जे सत्य नाकारणारे आहेत, त्यांच्यासाठी कठोर शिक्षा तयार आहे.

5 जे लोक अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा विरोध करतात. ते (शेवटी) अपमानित केले जातील, ज्याप्रमाणे त्यांच्यापूर्वीच्या (अवज्ञाकारी) लोकांना अपमानित करण्यात आले होते. आम्ही आधीच स्पष्ट असे संदेश प्रकट केलेले आहेत. आणि सत्य नाकारणाऱ्या लोकांना अपमानजनक शिक्षा होणार. 6 ज्या दिवशी अल्लाह त्या सर्वांना मृत अवस्थेतून जिवंत करून उठवेल. आणि त्यांना

त्यांनी केलेली कामे दाखवेल. त्यांनी जे–जे केलेले आहे, ते सर्व अल्लाहने मोजून ठेवलेले आहे, जरी त्यांना त्या गोष्टींचा विसर पडलेला असेल तरीही. कारण अल्लाह प्रत्येक गोष्टीसाठी साक्षी आहे.

7 तुम्हाला या गोष्टीची जाणीव नाही का की, अल्लाह ते सर्व जाणतो जे काही आकाशात आहे आणि जे काही पृथ्वीवर आहे. तीन माणसांची अशी कोणतीही गुप्त बातचीत असत नाही, ज्यात तो चौथा नसतो. तसेच पाच माणसांची (चर्चा) होते व तो सहावा नसतो, असे कधी होत नाही. मग त्याहून ते कमी असोत वा जास्त, त्याची त्यांच्याबरोबर उपस्थिती अटळ असते. मग ते कुठेही का असत नाहीत. मग शेवटी, न्यायाच्या दिवशी तो त्यांना त्यांनी जे–जे केले असेल, त्याविषयी अवगत करेल. अल्लाहला प्रत्येक गोष्टीचे परिपूर्ण ज्ञान असते, यात मुळीच शंका नाही. 8 (पैगंबर!) तुम्हाला त्या लोकांची जाणीव नाही का, ज्यांना गुप्त बोलणी करण्यापासून मनाई केली गेली होती? पण ते त्याच्या अगदी उलट करतात, ज्याची त्यांना मनाई केली गेली होती. ते पापकृत्य व अत्याचारी वर्तन आणि पैगंबराची आज्ञा न पाळणे (इ.) विषयी गुप्त चर्चा करीत असतात. आणि जेव्हा ते तुमच्याकडे येतात, अशा शब्दांत तुम्हाला अभिवादन (सलाम) करतात. ज्या शब्दांत अल्लाहने तुम्हाला कधीही सलाम पाठविलेला नाही. आणि ते मनोमनी आश्चर्य करतात की, अल्लाह आम्हाला या गोष्टींबद्दल शिक्षा का करीत नसेल? (पैगंबर!) त्यांच्यासाठी नरकाची शिक्षा पुरेशी आहे, ते जळण्यासाठी तिच्यात दाखल केले जातील. (खरोखर) ते फार वाईट ठिकाण आहे!

9 श्रद्धावंतांनो! जेव्हा तुम्ही गुप्त सल्लामसलत कराल, तेव्हा पापकृत्य, अत्याचारी कृत्य आणि पैगंबराची अवज्ञा या गोष्टींविषयी आपसात सल्लामसलती (कदापि ) करू नका. तर तुम्ही सत्कर्मे व सदाचारी वर्तन या सद्‌गुणांना प्रोत्साहित करण्यासाठी सल्लामसलती करा. आणि अल्लाहचे भय बाळगा, शेवटी

ज्याच्यापुढे तुम्हाला एकत्र आणले जाईल. 10 (इतर सर्व) गुप्त वार्ता (वाईट उद्देशासाठी) सैतानाद्वारे संचालित केल्या जातात. ज्याद्वारे तो श्रद्धावंतांना दु:खी-कष्टी करू इच्छितो. पण तो त्यांना अल्लाहच्या परवानगीशिवाय कोणत्याही प्रकारे इजा पोचवू शकत नाही. आणि श्रद्धावंतांना अल्लाहवरच दृढ विश्वास ठेवायला हवा.

11 श्रद्धावंतांनो! तुमच्या सभांमध्ये जेव्हा तुम्हाला सांगितले जाईल की, जागा मोकळी सोडून बसा. तेव्हा तुम्ही सांगितल्याप्रमाणे जागा मोकळी सोडून बसा, अल्लाहही (आज्ञापालनाच्या मोबदल्यात त्याच्या कृपेत) तुम्हाला जागा प्रदान करील. आणि जेव्हा सांगितले जाईल की, (आपल्या जागेवरून) उठा, तर तेव्हा तुम्ही उठा (इतर ठिकाणी बसण्यास सांगितले जाईल तर बसा, निघून जाण्यास सांगितले जाईल तर निघून जा). तुमच्यापैकी जे सच्चे श्रद्धावंत आहेत आणि ज्ञानी आहेत. अल्लाह अशा लोकांना उच्च दर्जे प्रदान करेल. कारण तुम्ही जे काही करता, त्याचे अल्लाहला पूर्ण ज्ञान आहे.

12 श्रद्धावंतांनो! जेव्हा तुमची पैगंबराशी एकांतात काही सल्लामसलत करण्याची इच्छा असेल तर ती करण्यापूर्वी काही दानकार्य करा. हे (अल्लाहच्या दृष्टीने) तुमच्यासाठी चांगले व (तुमचे मन) शुद्ध करणारे ठरेल. पण जर तुम्ही तसे करण्यास असमर्थ असाल तर (विश्वास ठेवा की), नि:संदेह, अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे. 13 (श्रद्धावंतांनो!) तुम्ही या आदेशाने घाबरलात की काय? की, तुम्ही पैगंबराशी गुप्त सल्लामसलत करण्यापूर्वी दानकार्य करावे. (घाबरण्याचे कारण नाही.) जर तुम्ही असे करण्यास असमर्थ असाल तर (लक्षात ठेवा) अल्लाह तुमच्याप्रति फार दयाळू आहे. पण नित्य नमाज़ाचे पालन करणे सुरू ठेवा आणि (ज़कातपात्र असाल तर) ज़कात देत राहा. आणि अल्लाह व त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करीत राहा. कारण तुम्ही जे काही करता, त्याची अल्लाहला पूर्ण जाणीव आहे.

[14] तुम्हाला त्या लोकांची जाणीव नाही का, जे त्या लोकांशी मित्रत्वाचे संबंध ठेवतात ज्यांच्यावर अल्लाह नाखूश (क्रुद्ध) आहे. ते ना तुमच्यापैकी आहेत, ना त्यांच्यापैकी आहेत. आणि ते जाणूनबुजून खोट्या गोष्टींबद्दल शपथा घेत असतात. [15] अल्लाहने त्यांच्यासाठी फार कठोर शिक्षा तयार ठेवलेली आहे. निश्चितच ते जे काही करीत आहेत — फार वाईट आहे. [16] त्यांनी आपली दुष्कृत्ये लपविण्यासाठी आपल्या शपथांना सुरक्षाकवच बनविलेले आहे. अशाप्रकारे ते लोकांना अल्लाहच्या मार्गापासून परावृत्त करीत असतात. (परिणामी) त्यांच्यासाठी अपमानास्पद शिक्षा आहे.

[17] ना त्यांचे धन, ना त्यांची अपत्ये त्यांना कोणत्याही प्रकारे अल्लाहपासून वाचवू शकतील. हे लोक नरकवासी आहेत, ते त्यात कायमस्वरूपी वास्तव्य करतील. [18] ज्या दिवशी अल्लाह सर्वांना मृतावस्थेतून जिवंत करून उठवेल, तेव्हा देखील ते त्याच्यासमोर त्याचप्रमाणे शपथा घेतील, ज्याप्रमाणे तुमच्यासमोर शपथा घेत असतात. (त्यांना) वाटते की, ते दृढ अशा आधारावर (उभे) आहेत, पण ते केवळ खोटारडे आहेत. [19] सैतानाने त्यांच्यावर वर्चस्व प्राप्त करून त्यांना अल्लाहच्या स्मरणापासून गाफील केलेले आहे. हे लोक सैतानाच्या गटाचे लोक आहेत. लक्षात ठेवा, सैतानाचा गट अवश्य नाश पावणार आहे. [20] जे लोक अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा विरोध करतात, (न्यायाच्या दिवशी) ते निंद्य व तुच्छ लोकांपैकी असतील. [21] (कारण) हा अल्लाहचा निर्णय आहे, (जो सदैव अंतिम असतो) की, मी व माझे पैगंबर निश्चितपणे वर्चस्व प्राप्त करणार. नि:संदेह, अल्लाह सामर्थ्यशाली व सर्वशक्तिमान आहे.

[22] (पैगंबर!) तुम्हाला असे लोक आढळून येणार नाहीत, जे (खऱ्या अर्थाने) अल्लाह आणि अंतिम दिवसावर विश्वास ठेवणारे आहेत आणि सोबतच त्यांच्याशी मित्रत्वाचे (व आपुलकीचे) संबंध ठेवतात जे अल्लाह व त्याच्या पैगंबराचे विरोधी आहेत (असे शक्य नाही). मग ते त्यांचे पिता किंवा पुत्र किंवा

भाऊ किंवा त्यांचे नातेवाईक का असत नाहीत. (सच्चे श्रद्धावंत ते लोक आहेत,) ज्यांच्या हृदयपटलावर अल्लाहने श्रद्धा कोरून टाकली आहे. आणि आपल्याकडून प्रेरणा देऊन त्यांना दृढता प्रदान केली आहे. तो त्यांना अशा बागांत प्रवेश देईल, ज्यांतून पाण्याचे (मन प्रसन्न करणारे) प्रवाह (सदैव) वाहत असतील. त्यात ते कायमस्वरूपी वास्तव्य करतील. अल्लाह त्यांच्यावर प्रसन्न झाला आणि तेही त्याच्यावर प्रसन्न झाले. हेच लोक अल्लाहच्या गटातील सदस्य आहेत. निश्चितच, अल्लाहचाच गट यशस्वी होणार आहे.

# सूरह–५९. अल–हश्र

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 जे काही आकाशात आहे आणि जे काही पृथ्वीवर आहे, ते सर्व अल्लाहचे स्तुतिगान करीत असतात. तोच सर्वशक्तिमान आहे, अस्सल बुद्धिवान आहे. 2
त्यानेच (म्हणजे अल्लाहनेच) आधीच्या ग्रंथधारकांपैकी सत्य नाकारणाऱ्या सर्वांना एकत्रित त्यांच्या घरांतून बाहेर काढले, ही त्यांची पहिली हद्दपारी होती. (श्रद्धावंतांनो!) ते (कोणत्याही प्रतिकाराशिवाय) निघून जातील असे तुम्हाला वाटलेही नव्हते. तसेच तेही या विचारात होते की, त्यांचे किल्ले अल्लाहपासून त्यांचे (अवश्य) रक्षण करतील. पण अल्लाह त्यांच्यावर तेथून चालून आला, जेथून (एखादे संकट त्यांच्यावर येईल) अशी त्यांनी कधी कल्पनाही केली नव्हती. आणि (त्याने) त्यांची मने दहशतीने हादरवून सोडली. आणि त्यांनी आपल्या घरांना स्वत:च्या व श्रद्धावंतांच्या हातांनी नष्ट केले. तेव्हा हे डोळस माणसांनो! (यापासून) धडा घ्या!

3 आणि जर अल्लाहने त्यांच्याबाबतीत हद्दपारीचा निर्णय सुनावला नसता तर त्याने त्यांना या जगात इतर (मोठी) शिक्षा केली असती. पण यानंतरच्या जगात तर त्यांच्यासाठी नरकाच्या आगीची शिक्षा आहेच. 4 कारण ते अल्लाह व

त्याच्या पैगंबराविरुद्ध उभे राहिले. तर जो कोणी अल्लाहच्या विरुद्ध उभे राहतो. तर अल्लाह (अशांना) शिक्षा करण्याच्या बाबतीत फार कठोर आहे. [5] (श्रद्धावंतांनो! त्यांचे) जे खजुरीचे वृक्ष तुम्ही कापून टाकलात किंवा ज्यांना त्यांच्या मुळावर उभी सोडून दिलात — हे सर्व अल्लाहच्या अनुज्ञेनेच झाले. ते यासाठी की, (अल्लाहला) त्याची अवज्ञा करणाऱ्यांना अपमानित करून सोडायचे होते.

[6] आणि अल्लाहने त्यांच्याकडून जे काही युद्धधन न लढता आपल्या पैगंबराला मिळवून दिले. त्यासाठी (श्रद्धावंतांनो!) तुम्ही घोडे आणि उंटांसह काही धावपळ केलेली नाही. पण अल्लाह आपल्या पैगंबरांना इच्छितो त्यावर वर्चस्व प्रदान करतो.अल्लाह सर्व काही करण्यास समर्थ आहे. [7] अल्लाहने आपल्या पैगंबराला गाववाल्यांकडून जे काही धन मिळवून दिले आहे, ते सर्व अल्लाहसाठी (म्हणजे अल्लाहच्या कार्यासाठी) व त्याच्या पैगंबरासाठी व (पैगंबराच्या) नातेवाइकांसाठी व अनाथांसाठी व गरजू व वाटसरू (या सर्वांसाठी) आहे. कारण ते धन तुमच्यामध्ये जे आधीपासून धनाढ्य आहेत, त्यांच्यामध्येच फिरत राहू नये. आणि पैगंबर त्यातून तुम्हाला जे काही देईल, ते (स्वखुशीने) स्वीकार करा. आणि तो ज्यापासून दूर राहण्यासाठी सांगेल, त्यापासून दूर राहा. आणि अल्लाहची जाण बाळगून असा. कारण अल्लाह शिक्षा देण्याच्या बाबतीतही फार कठोर आहे. [8] (युद्धधनाचा काही भाग त्यांनाही देण्यात यावा,) जे गरीब निर्वासित आहेत, ज्यांना त्यांच्या घरांतून बाहेर घालविण्यात आले व (त्यांच्या) मालमत्तेपासून वंचित करण्यात आले. ते (आपले घरदार सोडून) केवळ अल्लाहचा अनुग्रह व त्याच्या प्रसन्नतेच्या शोधार्थ आलेले आहेत. तसेच ते अल्लाह(च्या कार्यात) त्याच्या पैगंबराचे साहाय्य करीत असतात. हेच (अल्लाहचे) सच्चे भक्त आहेत.

[9] आणि जे लोक आधीपासून (मदिना या) शहरात स्थायिक झालेले आहेत आणि दृढतापूर्वक श्रद्धेचा त्यांनी अंगीकार केलेला आहे (अशा लोकांपैकी गरजू

लोकांनाही त्यातून काही देण्यात यावे). आणि जो कोणी त्यांच्याकडे स्वदेश त्याग करून येतो, त्याच्याशी प्रेमाने वागतात. आणि जे काही निर्वासितरूपी आलेल्या लोकांना दिले जाते, त्याने त्यांच्या मनात काही जळफळाट निर्माण होत नाही. उलट ते स्वत: गरीब असूनही त्यांना स्वत:वर प्राधान्य देतात, आणि जो आपल्या स्वभावाच्या लालसेपासून सुरक्षित ठेवला गेला, तर असेच लोक खरे यशस्वी होणारे आहेत. 10 आणि जे त्यांच्यानंतर (श्रद्धावंत बनले) ते म्हणतात, 'हे प्रभू! (आत्तापर्यंत) आमच्या हातून घडलेल्या चुका माफ कर आणि आमच्या बांधवांनाही क्षमा कर, ज्यांनी आमच्या आधी श्रद्धा धारण केलेली आहे. आणि आमच्या हृदयात श्रद्धावंतांबद्दल द्वेषभाव निर्माण होऊ देऊ नकोस. हे प्रभू! तू खरोखर फार कनवाळू व दयाळू आहेस!'

11 तुम्हाला त्या लोकांची जाणीव नाही का, ज्यांनी दुटप्पीपणाचे वर्तन अवलंबिले आहे? ते ग्रंथधारकांपैकी श्रद्धाहीन असलेल्या आपल्या बांधवांना म्हणतात, 'जर तुम्हाला बाहेर घालवून देण्यात आले तर आम्हीदेखील तुमच्याबरोबर बाहेर पडू. आणि तुमच्याविरुद्ध आम्ही कोणाचेही काहीही ऐकणार नाही. आणि जर तुमच्याविरुद्ध युद्ध केले गेले तर आम्ही तुम्हाला साहाय्य करू.' पण (पैगंबर!) अल्लाह साक्ष देतो की, ते केवळ खोटारडे आहेत. 12 (कारण) त्यांना जर बाहेर घालवण्यात आले तर ते त्यांच्यासोबत (अजिबात) बाहेर पडणार नाहीत. आणि जर त्यांच्याशी युद्ध झाले तर ते त्यांना कधीही साहाय्य करण्यासाठी पुढे येणार नाहीत. आणि मदतीसाठी जर आलेच तर ते निश्चितपणे पाठ दाखवून पळ काढतील. आणि तेव्हा त्यांनाच कोणाकडूनही मदत प्राप्त होणार नाही.

13 (कारण श्रद्धावंतांनो!) तुम्हा लोकांचे भय त्यांच्या मनात अल्लाहपेक्षाही अधिक आहे. याचे कारण, त्यांना सत्याची जाण नाही. 14 हे सारे मिळून तुमच्याशी कधीही लढणार नाहीत. पण फक्त तटबंदी असलेल्या सुरक्षित वस्त्यांतून किंवा भिंतीच्या मागून, त्यांच्यात आपसातच तीव्र मतभेद (व शत्रुत्व आहे).

तुम्हाला ते संघटित वाटतात, पण त्यांची मने एकमेकांपासून दुरावलेली आहेत. याचे कारण, ते लोक बुद्धीचा वापर करीत नाहीत.

15 यांची अवस्था त्या लोकांसारखीच होणार, ज्यांनी अगदी नजीकच्या काळात आपल्या दुष्कृत्यांची फळे चाखली आहेत. आणि यानंतरच्या जीवनात तर त्यांच्यासाठी फार दु:खदायी शिक्षा अटळ आहे. 16 (या दांभिक लोकांची) अवस्था त्या सैतानासारखी आहे जो माणसाला म्हणतो, 'सत्याचा (कधीही) स्वीकार करू नकोस.' मग जेव्हा त्याला सत्य नाकारणारा बनवून टाकतो. तेव्हा तो (त्यास) म्हणतो, 'तुझ्याशी मला काही देणे–घेणे नाही, मला तर सर्व जगांचा पालनकर्ता असलेल्या अल्लाहचे भय वाटते.' 17 अशाप्रकारे, शेवटी ते दोन्ही सत्य नाकारणारे, नरकाच्या आगीत जातील, जिथे ते कायमस्वरूपी वास्तव्य करतील. कारण अत्याचारी कृत्ये करणाऱ्यांच्या वाटी असेच फळ येत असते.

18 श्रद्धावंतांनो! अल्लाहची जाण बाळगून (जीवन व्यतीत करा). आणि प्रत्येकाने नेहमी या गोष्टीकडे लक्ष द्यावे की, त्याने (आपल्या अनंतकालीन जीवनासाठी) पुढे काय पाठविले आहे. तर (नेहमी) अल्लाहची जाण ठेवणारे बना. नि:संदेह अल्लाहला तुम्ही जे काही करता, त्याची पूर्ण जाणीव आहे. 19 आणि त्या लोकांसारखे बनू नका, जे अल्लाहला विसरले, परिणामी अल्लाहनेही असे करून टाकले की, त्यांना स्वत:चाच विसर पडला. हेच लोक आज्ञाभंग करणारे (अपराधी) आहेत. 20 नरकवासी व स्वर्गवासी दोघे कदापि समान होऊ शकत नाहीत. स्वर्गनिवासीच यश प्राप्त करणारे लोक आहेत.

21 जर आम्ही या कुराणास एखाद्या पर्वतावर अवतरित केले असते, (आणि माणसाप्रमाणे त्यालाही बुद्धी असती) तर तुम्हाला निश्चितपणे असे पाहायला मिळाले असते की, तो अल्लाहच्या भयाने कोसळत आहे आणि त्याचे तुकडे–तुकडे होत आहेत. ही उदाहरणे सादर करण्याचा उद्देश हा आहे की,

मानवाने त्यावर चिंतन करावे (व त्यापासून बोध घ्यावे). [22] तोच आहे अल्लाह, त्याच्याशिवाय दुसरा कोणीच उपासनेयोग्य नाही. तोच ते सर्व जाणतो, जिथपर्यंत कोणाचीही बुद्धी पोचू शकत नाही आणि तेही, जे सर्वांसमोर उघड आहे. तो फार कनवाळू व दयाळू आहे.

[23]तोच आहे अल्लाह ज्याच्याशिवाय दुसरा कोणीच उपासनेयोग्य नाही, अस्सल सम्राट, सर्व प्रकारच्या उणेपणापासून पूर्णपणे मुक्त असा, सर्वांचा मुक्तिदाता, सर्वांना सुरक्षा प्रदान करणारा, सर्वांचा सांभाळकर्ता, सर्वांवर पूर्ण नियंत्रण ठेवणारा, सर्वशक्तिमान, सर्वोच्च, सर्व प्रकारच्या स्तुतीस पात्र. असा आहे अल्लाह. लोक त्याच्यासोबत इतरांना त्याचे सहभागी ठरवतात, त्यापासून तो पूर्णपणे असंबंधित आहे. [24]अल्लाह आहे, सर्वांचा निर्माता, प्रत्येक गोष्टीचा प्रारंभकर्ता, सर्व रचनेंचा रचनाकार, सर्व निर्दोष अशी गुणविशेषणे केवळ त्याच्यासाठीच आहेत. जे काही आकाशात व पृथ्वीवर आहे, ते सर्व त्याचेच स्तुतिगान करीत असतात. आणि तोच सर्वशक्तिमान आहे, अस्सल बुद्धिमान आहे.

# सूरह–६०. अल–मुम्तहिना

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] श्रद्धावंतांनो! तुम्ही माझ्या व तुमच्या शत्रूंशी मित्रत्वाचे संबंध ठेवू नका. तुम्ही त्यांच्याप्रति आपुलकी व्यक्त करता आणि ते त्या सत्यास नाकारतात जे तुमच्याकडे आलेले आहे. त्यांनी तुम्हाला व पैगंबराला केवळ यासाठी घरांतून बाहेर घालविले आहे की, तुम्ही आपला पालनकर्ता असलेल्या अल्लाहवर श्रद्धा ठेवता. तुम्ही (खरोखर) माझ्या मार्गात प्रयत्नांची पराकाष्ठा (म्हणजे जिहाद) करण्यासाठी आणि माझी प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी घरदार सोडला असाल तर मग कसे शक्य आहे की, तुम्ही त्यांना गुप्तरित्या प्रेमाचे संदेश पाठवून आपले मित्र बनवाल? तुम्ही जे काही लपविता आणि जे काही प्रकट करता, मी सर्व

जाणून आहे. आणि तुमच्यापैकी जो कोणी असे करेल तो सन्मार्गापासून दूर निघून जाणार (हे नक्की). [2] त्यांना तुमच्यावर नियंत्रण प्राप्त झाले तर ते तुमच्याशी शत्रुत्वाचा व्यवहार करतील. आणि तुम्हाला इजा पोचविण्यासाठी आपले हात पुढे सरसावतील व आपल्या जिभा चालवतील, (म्हणजे मानसिक व शारीरिक त्रास देतील). त्यांची तर अशी तीव्र इच्छा आहे की, तुम्ही आपल्या श्रद्धेचा त्याग करून टाकावा. [3] पण (तुम्ही नेहमी हे लक्षात ठेवा) की, ना तुमचे नातेवाईक, ना तुमची मुले न्यायाच्या दिवशी तुमच्या कामी येतील. तो (केवळ तुमच्या गुणांच्या आधारावर) तुमच्यामध्ये फैसला सुनावेल. आणि तुम्ही जे काही करीत असता, अल्लाह ते सर्व पाहत असतो.

[4] (श्रद्धावंतांनो!) इब्राहीम व त्याच्या अनुयायांमध्ये तुमच्यासाठी उत्कृष्ट आदर्श आहे. जेव्हा त्यांनी आपल्या लोकांना म्हटले, 'आम्ही तुमच्यापासून व तुम्ही अल्लाहला सोडून ज्यांची उपासना करता, त्यांच्यापासून स्वतःला अलग करीत आहोत. आणि तुम्ही ज्यावर विश्वास ठेवता, आम्ही त्या सर्वांना नाकारत आहोत, यापुढे आता तुमच्या व आमच्या दरम्यान शत्रुत्व व तिरस्कार तोपर्यंत राहील, जोपर्यंत तुम्ही एकमेव अशा अल्लाहवर श्रद्धा धारण करीत नाही.'

पण (यास अपवाद केवळ) इब्राहीमचे ते वक्तव्य होते, जे त्याने (आपल्या वडिलांशी दूर जाताना दिले होते की,) 'मी तुझ्यासाठी (अल्लाहकडे) क्षमायाचना करेन, पण तुझ्यासंबंधाने अल्लाहसमोर माझे काहीही चालणार नाही.' त्यांनी (अल्लाहकडे) प्रार्थना केली 'हे प्रभू! आम्ही तुझ्यावर आपला भरवसा ठेवला आहे. आणि आम्ही तुझ्याकडेच वळलो आहोत. आणि (शेवटी) आम्हाला तुझ्याकडेच परत यायचे आहे. [5] हे प्रभू! आम्हाला सत्य नाकारणाऱ्या लोकांच्या परीक्षेचे साधन बनवू नकोस. हे प्रभू! आम्हाला क्षमा कर. खरोखर, तूच सर्वशक्तिमान आहेस, अस्सल बुद्धिवान आहेस.' [6] (श्रद्धावंतांनो!) त्यांच्या रूपाने तुमच्यासमोर निश्चितपणे एक उत्तम आदर्श आहे. पण आदर्श त्या

माणसासाठी जो अल्लाहकडून यानंतरच्या जीवनासंबंधाने (शाबासकी प्राप्त करण्याची) आशा बाळगून आहे. आणि जो कोणी याकडे पाठ दाखवील (त्याने हे लक्षात ठेवावे की,) अल्लाह खऱ्या अर्थाने आत्मनिर्भर (व स्वयंपूर्ण) आहे. सर्व प्रकारच्या स्तुतीस पात्र असा केवळ तोच आहे. 7 (पण) असेही शक्य आहे की, अल्लाह तुमच्या व त्या लोकांच्यामध्ये सलोखा निर्माण करेल, ज्यांच्याशी तुमचे शत्रुत्व होते. अल्लाह काहीही करण्यास समर्थ आहे. आणि अल्लाह अत्यंत क्षमाशील व दयाळू आहे.

8 अल्लाह तुम्हाला त्या (बिगर श्रद्धावंत) लोकांशी सहृदय व न्यायपूर्वक व्यवहार करण्यापासून मनाई करीत नाही, ज्यांनी धर्माच्या बाबतीत तुमच्याशी युद्ध पुकारलेले नाही किंवा तुम्हाला तुमच्या मातृभूमीतून हुसकावून लावण्यात सहभागी झालेले नाहीत. (तुम्ही त्यांच्याशी न्यायपूर्वक व्यवहार करा) कारण अल्लाहला न्यायपूर्वक व्यवहार करणारे लोक प्रिय आहेत. 9 अल्लाह फक्त त्या लोकांशी मित्रत्वाचे संबंध स्थापित करण्यास तुम्हाला मनाई करतो, ज्यांनी केवळ तुमच्या श्रद्धेला कारण बनवून तुमच्याशी युद्ध पुकारले आणि तुमच्या मातृभूमीतून तुम्हाला घालवून लावले किंवा तुमच्याविरुद्ध असे करणाऱ्यांना मदत केली. आणि जे कोणी अशा लोकांशी मित्रत्व (व आपुलकीचे) संबंध स्थापित करतील, तेच लोक खरे अत्याचारी आहेत.

10 श्रद्धावंतांनो! जेव्हा श्रद्धावंत स्त्रिया स्वदेश त्याग करून तुमच्याकडे येतील, तेव्हा त्यांची (नीट) चौकशी करा. अल्लाहला त्यांच्या श्रद्धेची पूर्ण जाणीव आहे. जेव्हा तुम्हाला आढळून येईल की, त्या श्रद्धावंत आहेत, तेव्हा त्यांना श्रद्धाहीन लोकांकडे परत पाठवू नका. ना त्या स्त्रिया (विवाह-संबंधाच्या दृष्टीने आता) त्यांच्यासाठी वैध आहेत, ना ते या स्त्रियांसाठी वैध आहेत. तरीसुद्धा त्या श्रद्धाहीन पतींनी (पत्नी म्हणून स्वीकार करताना) जी महरची रक्कम दिली होती, ती त्यांना परत करा. आणि (श्रद्धावंतांनो!) तुम्ही त्यांना

महरची रक्कम देऊन त्यांच्याशी विवाहबद्ध झाल्यास काही आक्षेपार्ह नाही. तसेच तुम्ही श्रद्धाहीन स्त्रियांशी विवाहबंधन कायम ठेवू नका. आणि जी महरची रक्कम तुम्ही त्यांना दिली होती, त्याची त्यांच्याकडे मागणी करा. आणि श्रद्धाहीन लोकांनीही महरच्या रकमेपोटी जे काही दिले होते, त्याची तुमच्याकडे मागणी करावी. हा अल्लाहचा निर्णय आहे. तो तुमच्यामध्ये (न्यायपूर्वक) निर्णय करीत असतो. कारण अल्लाह सर्व काही जाणणारा व बुद्धिमान आहे. 11 जर तुमच्या पत्नींपैकी कोणी तुम्हाला सोडून श्रद्धाहीनांकडे परत गेल्यास, व (ते तुमची रक्कम देत नसतील) आणि (श्रद्धाहीन लोकांपैकी ज्यांना) रक्कम देण्याची तुम्हाला तसलीच पाळी आल्यास, ज्या लोकांच्या पत्नी तिकडे गेल्या आहेत, त्यांना जी त्यांनी दिली होती तेवढी रक्कम चुकती करा. आणि त्या अल्लाहचे भय बाळगा ज्याच्यावर तुम्ही विश्वास ठेवता.

12 पैगंबर! जेव्हा श्रद्धावंत स्त्रिया या गोष्टींविषयी तुमच्याकडे प्रतिज्ञा करण्यासाठी येतील की, त्या (यापुढे) कोणालाही अल्लाहचे समकक्ष ठरविण्याचे (अपकृत्य) करणार नाहीत, त्या चोरी करणार नाहीत, व्यभिचारी कृत्यात सहभागी होणार नाहीत, आपल्या अपत्यांची हत्या करणार नाहीत आणि त्या जाणीवपूर्वक कोणावरही खोटा दोष रचण्याच्या कृत्यात सामील होणार नाहीत. आणि चांगल्या गोष्टींच्या बाबतीत तुमची अवज्ञा करणार नाहीत. (याविषयी त्या प्रतिज्ञा करीत असतील, तर) त्यांच्याशी प्रतिज्ञा घ्या. आणि त्यांच्यासाठी अल्लाहकडे क्षमायाचना करा. निश्चितच, अल्लाह अत्यंत क्षमाशील व दयाळू आहे.

13 इमानधारकांनो! त्या लोकांशी (कोणत्याही प्रकारे) मैत्री करू नका, ज्यांना अल्लाहने निंद्य ठरविलेले आहे. ते यानंतरच्या जीवनासंबंधाने कसलीही आशा बाळगून नाहीत, ज्याप्रमाणे सत्य नाकारणारे (मृत लोक) आपल्या कबरींमध्ये निराश अवस्थेत पडलेले आहेत.

# सूरह–६१. अस–सफ़्फ़

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] जे काही आकाशात आहे व जे काही पृथ्वीवर आहे, ते सर्व अल्लाहचेच स्तुतिगान करीत असतात, तोच सर्वांवर नियंत्रण ठेवणारा आहे, अस्सल बुद्धिवान आहे. [2] श्रद्धावंतांनो! तुम्ही बोलता एक आणि करता दुसरेच असे का? (तुम्ही आपल्या आचार व विचारात फरक का करता?) [3] अल्लाहच्या नजरेत तुमचे असे कृत्य अत्यंत अप्रिय आहे की, बोलायचे एक आणि करायचे दुसरेच. [4] अल्लाहला तर ते लोक प्रिय आहेत, जे त्याच्या कार्यासाठी पंक्तिबद्ध होऊन लढतात, जणू ते सर्व एक मजबूत अशी भिंत आहेत.

[5] (आणि ती वेळ आठवा) जेव्हा मूसाने आपल्या लोकांना म्हटले, ‘माझ्या बांधवांनो! तुम्ही मला त्रास का देता, जेव्हा तुम्ही हे जाणून आहात की, मी तुमच्याकडे पाठविण्यात आलेला अल्लाहचा पैगंबर आहे.’ मग जेव्हा त्यांनी सन्मार्गापासून दूर जाणे पसंत केले. तेव्हा अल्लाहनेही त्यांच्या हृदयांना सत्यापासून दूर करून टाकले. कारण अल्लाह आज्ञाभंग करणाऱ्या लोकांना सन्मार्ग दाखवीत नसतो.

[6] (असेच तेव्हाही घडले) जेव्हा मरियमपुत्र येशू मसीहने म्हटले, ‘इस्राईलच्या मुलांनो! मी तुमच्याकडे अल्लाहकडून पाठविलेला पैगंबर आहे; माझ्यापूर्वीच्या तौरात या ग्रंथापैकी जे सत्य बाकी राहिलेले आहे, त्यास प्रमाणित करणारा (मी) आहे. तसेच तुम्हाला एका पैगंबराविषयी शुभवार्ता देतो आहे, जो माझ्यानंतर येईल. ज्याचे नाव अहमद असेल.’ आणि जेव्हा तो त्यांच्याकडे सत्याचे सर्व स्पष्ट प्रमाण घेऊन आला, तेव्हा ते म्हणाले, ‘ही केवळ जादू आहे.’ [7] आणि त्याच्यापेक्षा अधिक दुष्ट माणूस कोण असू शकतो, ज्याला, अल्लाहला समर्पित अशी जीवनपद्धती (म्हणजेच इस्लाम)कडे येण्याचे आवाहन केले जात

असतानाही, तो अल्लाहविषयी खोट्या गोष्टी रचत असतो. पण अल्लाह अत्याचारी लोकांना सन्मार्ग दाखवीत नसतो. 8 ते आपल्या तोंडाच्या फुंकरेने अल्लाहचा प्रकाश विझवून टाकू इच्छितात. पण अल्लाह आपला प्रकाश पूर्णपणे सर्वत्र पसरविल्याशिवाय राहणार नाही. मग सत्य नाकारणाऱ्यांना याबद्दल कितीका वाईट वाटेना. 9 त्यानेच आपल्या पैगंबराला मार्गदर्शन आणि सत्यधर्म यांच्यासह पाठविले आहे, या उद्देशाने की, सत्यधर्माला इतर सर्व धर्मांवर (वैचारिक) प्रभुत्व प्राप्त करून द्यावे, मग ते अनेकेश्वरवाद्यांना कितीका अप्रिय वाटत नाही.

10 (पैगंबर! लोकांना सांगा,) श्रद्धावंतांनो! मी तुम्हाला अशा फायद्याच्या सौद्याविषयी मार्गदर्शन करू का, जो तुम्हाला दु:खदायी शिक्षेपासून वाचवू शकतो? 11 (तो हा की,) तुम्ही अल्लाह व त्याच्या पैगंबरावर विश्वास ठेवणारे बना आणि अल्लाहच्या मार्गात आपले धन व प्राण यांच्यासह प्रयत्नांची पराकाष्ठा (म्हणजेच जिहाद) करा. तुम्हाला हे समजत असेल, तर यात तुमचे (निश्चितपणे) भले आहे. 12 (तुम्ही असे केल्यास) अल्लाह तुमच्या चुका माफ करून टाकेल. आणि तुम्हाला अशा बागांमध्ये प्रवेश देईल. ज्यातून पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह (नेहमी) वाहत असतील. तसेच राहण्यासाठी सुंदर घरे तो देईल, जी (घरे) शाश्वत व सुखदायी बागांमध्ये असतील. हेच सर्वश्रेष्ठ यश आहे. 13 (त्या सर्वांसह) तुमच्यावर (या जगातही) आणखी एक कृपा तो करेल, ज्याची तुम्ही अभिलाषा बाळगून आहात.— अल्लाहकडून मिळणारे साहाय्य आणि लवकरच विजयाची प्राप्ती. (पैगंबर! याविषयी) श्रद्धावंतांना शुभवार्ता देऊन टाका.

14 श्रद्धावंतांनो! तुम्ही (त्याप्रमाणे) अल्लाहची मदत करणारे बना, ज्याप्रमाणे मरियमपुत्र येशू मसीहने आपल्या अनुयायांना म्हटले होते, ‘अल्लाहकडे (लोकांना बोलावण्याच्या) कार्यात कोण माझी मदत करेल?’ त्याच्या अनुयायांनी उत्तर दिले होते, ‘आम्ही अल्लाहची मदत करण्यासाठी तयार आहोत.’ तेव्हा इस्राईलच्या मुलांपैकी (म्हणजे ज्यू लोकांपैकी) काहींनी त्याच्यावर विश्वास ठेवला आणि

काहींनी नकार दिला. मग आम्ही श्रद्धा धारण केलेल्या लोकांची त्याच्या शत्रूंच्या विरुद्ध मदत केली, परिणामी ते विजयी झाले.

# सूरह-६२. अल-जुमुआ

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 जे काही आकाशात आहे आणि जे काही पृथ्वीवर आहे, ते सर्व अल्लाहचे स्तुतिगान करीत असतात. तोच अस्सल सम्राट आहे, सर्व उणिवांपासून मुक्त असा, सर्वशक्तिमान आहे, बुद्धिमान आहे.
2 त्यानेच निरक्षर (उम्मी) लोकांमध्ये त्यांच्यामधूनच एक पैगंबर उभा केला, जो त्यांना त्याचे (म्हणजे अल्लाहचे) संदेश ऐकवीत असतो. आणि (मानसिकदृष्ट्या) त्यांचे शुद्धीकरण करतो. आणि त्यांना ग्रंथ व शहाणपणाचे धडे देत असतो. ते यापूर्वी स्पष्टरित्या वाट चुकलेले होते.
3 (मक्केतील निरक्षरांव्यतिरिक्त) इतर लोकांकडेही (हा संदेश पोचविण्याची त्याच्यावर जबाबदारी आहे), ते लोक ज्यांचा (या मक्कावासीयांशी) अद्याप संबंध आलेला नाही. तोच सर्वशक्तिमान आहे आणि अस्सल बुद्धिवान आहे.
4 ही (पैगंबरी) अल्लाहची कृपा होय, तो इच्छितो त्यास, ती प्रदान करतो. अल्लाह असीम कृपावंत आहे.

5 ज्या लोकांच्या (शिरावर) तौरात (या अल्लाहच्या) ग्रंथाची जबाबदारी सोपवण्यात आली होती, पण त्यांनी ती जबाबदारी (गंभीरतापूर्वक) पेलली नाही. त्यांची तुलना त्या गाढवाशी केली जाऊ शकते, जो पुस्तकांचे ओझे वाहून नेत आहे. (खरोखर,) किती वाईट उपमा आहे, त्या लोकांसाठी ज्यांनी अल्लाहच्या संदेशांना खोटे ठरविले (त्याकडे वाईटरित्या दुर्लक्ष केले)! अल्लाह अशा अत्याचारी लोकांना सन्मार्ग दाखवत नसतो.
6 (पैगंबर! ज्यू लोकांना) सांगा, 'हे ज्यू लोकांनो! तुम्हाला वाटत असेल की, तुम्ही इतरांपेक्षा अल्लाहला सर्वाधिक प्रिय आहात, आणि तुमच्या या वाटण्यात काही सत्यता असेल तर तुम्ही (लवकरात

लवकर) मरण्याची अभिलाषा बाळगायला हवी.’ 7 पण (पैगंबर!) त्यांच्या हातांनी जी (दुष)कृत्ये आपल्या पुढे पाठवलेली आहेत, त्या कारणामुळे ते कधीही अशी अभिलाषा बाळगणार नाहीत. अल्लाह अपराध्यांना चांगले ओळखून आहे. 8 त्यांना सांगा, ‘ज्या मृत्यूपासून तुम्ही दूर पळत आहात, तो तुमच्यावर अटळरित्या येणार आहे. तेव्हा तुम्हाला त्या (अल्लाह)समोर हजर केले जाईल, जो ते सर्व जाणतो जिथपर्यंत कोणाचीही बुद्धी पोचू शकत नाही आणि तेही, जे सर्व जाणतात. तेव्हा तो तुम्हाला त्या कामांशी अवगत करेल, जी तुम्ही करीत होता.’

9 इमानधारकांनो! जेव्हा तुम्हाला (साप्ताहिक प्रार्थनेकरिता) जमा होण्याच्या दिवशी (म्हणजे शुक्रवारी) नमाज़ासाठी येण्याचे आवाहन केले जाईल, तेव्हा अल्लाहचे (नमाज़रूपी) स्मरण करण्यासाठी सर्व खरेदी–विक्रीचे व्यवहार बंद करून (प्रार्थनागृहाकडे) निघा. तुम्हाला हे समजणार असेल, तर यात तुमचे स्वत:चे भले आहे. 10 मग जेव्हा नमाज़ पूर्ण होईल, तेव्हा अल्लाहच्या कृपेच्या शोधार्थ (त्याच्या जमिनीवर) (पाहिजे तिकडे) पसरून जा. पण अल्लाहची प्रत्येक प्रसंगी आठवण करीत राहा. यासाठी की, तुम्ही यशस्वी व्हावे.

11 (पण पैगंबर!) (काही लोकांच्या बाबतीत घटते मात्र याच्या उलट) जेव्हा त्यांना काही खरेदी–विक्रीचा प्रकार किंवा करमणुकीचा प्रकार होत असल्याचे आढळते तर तुम्ही (प्रवचन करीत असताना) तुम्हाला उभे सोडून त्याकडे पळत सुटतात. त्यांना सांगा, ‘जे अल्लाहपाशी आहे, ते कोणत्याही खरेदी–विक्रीच्या वस्तूपेक्षा व करमणुकीपेक्षा श्रेष्ठ आहे. आणि अल्लाह सर्वोत्कृष्ट उपजीविका प्रदान करणारा आहे.’

# सूरह–६३. अल–मुनाफिक़ून

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 (पैगंबर!) जेव्हा दांभिक लोक तुमच्याकडे येतात, तेव्हा ते म्हणतात, 'आम्ही अशी साक्ष देतो की, तुम्ही नि:संदेह अल्लाहचे पैगंबर आहात.' अल्लाह जाणतो की, तुम्ही नि:संदेह त्याचे पैगंबर आहात. आणि अल्लाह या गोष्टीची साक्ष देतो की, हे दांभिक खोटे बोलणारे आहेत.
2 त्यांनी (खोटे बोलण्याचा उद्योग करण्यासाठी) आपल्या शपथांना ढाल बनविलेले आहे. आणि ते (त्याद्वारे) लोकांना अल्लाहच्या मार्गापासून परावृत्त करीत असतात. जे ते करीत आहेत, खरोखर फार वाईट आहे.
3 (ते दांभिक) अशाप्रकारे बनले की, त्यांनी सुरुवातीला (वरवर) श्रद्धा धारण केली, पण (मनोमनी) ते सत्य नाकारतात (व ते त्यांच्या कृत्यांतूनही दिसून येते), (परिणामी अल्लाहने) त्यांची मने (सत्याच्या प्रवेशासाठी) सीलबंद करून टाकली. आता त्यांना सत्य उमजतच नाही.

4 आता जेव्हा तुम्ही त्यांना पाहता, त्यांचे दर्शनी रूप तुम्हाला चांगले वाटू शकते. आणि जेव्हा ते बोलतात, तेव्हा तुम्ही त्यांचे बोलणे लक्षपूर्वक ऐकता. (पण ते तुमच्यासमोर असे बसतात) जणू भिंतीला टेकवून उभे केलेले लाकडाचे ओंडके आहेत, प्रत्येक जोराची आवाज त्यांच्याचविरुद्ध (काहीतरी) असल्याचे त्यांना वाटते. हे (धर्माचे खरे) शत्रू आहेत, तर यांच्यापासून (नेहमी) सावध राहा. त्यांच्यावर अल्लाहचा प्रकोप होवो! ते कुठे भलतीकडे जात आहेत!
5 कारण जेव्हा त्यांना म्हटले जाते, 'या, पैगंबर तुमच्यासाठी अल्लाहकडे क्षमायाचना करेल.' तेव्हा ते (नकार दर्शवीत) आपली डोकी हालवतात. आणि तुम्ही त्यांना पाहाल, मगरुरीचे प्रदर्शन करीत तिथून निघून जातात.
6 तुम्ही त्यांच्यासाठी (अल्लाहकडे) क्षमायाचना करा किंवा करू नका, दोन्ही गोष्टी सारख्या आहेत. (कारण परिणाम शून्यच असेल). अल्लाह त्यांना कदापि क्षमा करणार नाही.

कारण अल्लाह विद्रोही लोकांना सन्मार्ग दाखवत नसतो.

[7] हेच ते आहेत, जे (आपल्या साथीदारांना) म्हणतात, 'जे लोक अल्लाहच्या पैगंबरासोबत आहेत, त्या लोकांवर (आपले धन) खर्च करू नका, (परिणामी) त्यांची गोची होऊन ते (पैगंबराची) साथ सोडून देतील.' पण या दांभिक लोकांना हे माहीत नाही की, आकाश व पृथ्वीचे सर्व खजिने, अल्लाहच्या मालकीचे आहेत. [8] आणि ते म्हणतात, 'आम्ही मदिनेला परतल्यानंतर, (आम्ही) तेथील सर्वाधिक सन्माननीय लोक, तेथून त्या सर्वात तुच्छ अशा लोकांना निश्चितपणे हाकलून लावू.' पण या दांभिक लोकांना या गोष्टीची जाण नाही की, सर्व प्रकारचे मान-सन्मान अल्लाहसाठी आहे, त्याच्या पैगंबरासाठी आहे व श्रद्धावंतांसाठी आहे.

[9] श्रद्धावंतांनो! तुमची धनसंपत्ती व तुमची मुले तुम्हाला अल्लाहच्या आठवणीपासून ढळण्यास कारणीभूत ठरायला नको. आणि ज्याला या गोष्टी (अल्लाहच्या स्मरणापासून विचलित करतील) तर असेच लोक (शेवटी) नाश पावणारे असतील. [10] आणि आम्ही तुम्हाला जे काही दिलेले आहे, त्यातून तुमच्यापैकी एखाद्याला मृत्यू येण्यापूर्वी त्याने खर्च करावे. मग तो म्हणू लागेल, 'हे माझ्या पालनकर्त्या! तू मला आणखी काही काळ उसंत का नाही दिलीस? की, मी दानकार्य केले असते आणि सदाचारी लोकांपैकी झालो असतो.' [11] पण अल्लाह कोणालाही त्याची नियत वेळ येऊन ठेपल्यावर उसंत देत नसतो. आणि तुम्ही जे काही करता, अल्लाह ते सर्व जाणतो.

# सूरह-६४. अत-तग़ाबून

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] जे काही आकाशात आणि जे काही पृथ्वीवर आहे, ते सर्व अल्लाहचे स्तुतिगान करीत असतात. सर्वत्र त्याचीच सत्ता आहे — व सर्वत्र त्याचीच

स्तुती आहे. आणि सर्व वस्तुमात्रांवर त्यालाच पूर्ण नियंत्रण प्राप्त आहे. [2] त्यानेच तुम्हा (सर्वांना) निर्माण केले, मग तुमच्यात काही सत्य नाकारणारे तर काही सत्य स्वीकारणारे(श्रद्धावंत)आहेत. तुम्ही जे काही करता, त्यावर अल्लाह (नेहमी) नजर ठेवून असतो. [3] त्यानेच आकाश व पृथ्वी यांना उचित उद्देशासहित निर्माण केलेले आहे. आणि त्याने तुम्हाला आकार दिला, उत्तम आकार दिला. आणि त्याच्याकडेच तुम्हा सर्वांना परत जायचे आहे. [4] जे काही आकाशात आहे व जे काही पृथ्वीवर आहे, ते सर्व तो जाणतो. तसेच तो तुम्ही जे लपवता व जे प्रकट करता तेही जाणतो. कारण अल्लाहलाच (लोकांच्या) मनात काय-काय आहे, याचे पूर्ण ज्ञान आहे.

[5] तुम्हाला त्या लोकांची जाणीव झाली नाही का, ज्यांनी यापूर्वी सत्य नाकारण्याचे (अपकृत्य) केले? मग आपल्या कर्मांची फळे चाखली. आणि (यानंतरच्या जीवनात) तर त्यांच्यासाठी (याहूनही) कठोर शिक्षा आहे. [6] असे (पुन्हा-पुन्हा) यासाठी (घडले), कारण त्यांच्याकडे त्यांचे पैगंबर सत्याचे सर्व स्पष्ट प्रमाण घेऊन आले. पण (पैगंबराप्रति नेहमी) त्यांचा प्रतिसाद असाच होता की, ही (आमच्यासारखी असलेली) माणसे आम्हाला मार्गदर्शन करणार आहेत? अशाप्रकारे त्यांनी सत्यास नकार दिला आणि त्याकडे पाठ फिरवली. आणि अल्लाहला अशा लोकांची गरज नाही. तो (खराखुरा) आत्मनिर्भर आहे. सर्व प्रकारच्या स्तुतीस (सदैव) पात्र असा.

[7] सत्य नाकारणारे असा दावा करतात की, त्यांना पुन्हा जिवंत करून उठविले जाणे शक्यच नाही. (पैगंबर!) त्यांना सांगा, 'माझ्या पालनकर्त्याची शपथ, तुम्हाला पुन्हा जिवंत करून अवश्य उठविले जाईल, मग तुम्हाला तुम्ही जे-जे करत होता, त्याचे दर्शन घडविले जाईल. ही अल्लाहसाठी अगदी सोपी गोष्ट आहे.' [8] म्हणून (लोकांनो!) अल्लाहवर व त्याच्या पैगंबरावर आणि जो सन्मार्ग दाखवणारा प्रकाश आम्ही प्रकट केला आहे त्यावर विश्वास ठेवणारे

बना. आणि तुम्ही जे काही करता, त्याची अल्लाहला पूर्ण जाणीव आहे. 9 जेव्हा तो तुम्हाला त्या एकत्र करण्याच्या दिवशी एकत्रित करेल. हाच दिवस (खऱ्या अर्थाने) जय व पराजयाचा दिवस असेल. जो कोणी श्रद्धा धारण करून सत्कर्मे केलेला असेल, अल्लाह अशा माणसाची वाईट कृत्ये माफ करून टाकेल. आणि त्यास अशा बागांत प्रवेश देईल, जिथे पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह (नेहमी) वाहत असतील. (असे लोक) तिथे कायम वास्तव्य करतील. हेच आहे अस्सल यश. 10 ज्या लोकांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला आणि आमच्या संदेशांना खोटे ठरविले, असेच लोक नरकवासी असतील. ते तिथे कायम वास्तव्य करतील. हेच सर्वात वाईट ठिकाण आहे (राहण्याचे)!

11 (लोकांनो!) तुमच्यावर कोणतीही आपत्ती अल्लाहच्या परवानगीशिवाय येऊ शकत नाही. आणि जो कोणी अल्लाहवर दृढ विश्वास ठेवतो, अल्लाह त्याच्या अंत:करणास योग्य मार्ग दाखवतो. अल्लाहला प्रत्येक गोष्टीचे परिपूर्ण ज्ञान आहे. 12 तुम्ही अल्लाहचे आज्ञापालन करा व पैगंबराचे आज्ञापालन करा. मग जर तुम्ही (या संदेशाकडे) दुर्लक्ष कराल तर आमच्या पैगंबरावर (संदेश) स्पष्टपणे पोहोचविण्यापलिकडे अन्य जबाबदारी नाही. 13 अल्लाह — त्याच्याशिवाय दुसरा कोणीच उपासनेयोग्य नाही. आणि विश्वास ठेवणाऱ्यांना त्याच्यावरच विश्वास ठेवायला हवा.

14 श्रद्धावंतांनो! तुमच्या पत्नी व तुमची मुले यांच्यापैकी काही (धर्माच्या बाबतीत) तुमचे शत्रू आहेत. तर तुम्ही त्यांच्यापासून सावध राहा. पण जर तुम्ही त्यांच्या चुकांकडे दुर्लक्ष कराल आणि त्यांच्याप्रति दया दाखवाल व त्यांना माफ कराल, तर अल्लाह(देखील) फार क्षमा करणारा व दया करणारा आहे. 15 (लोकांनो!) तुमची धनसंपत्ती व तुमची अपत्ये या गोष्टी तुमची कसोटी पाहण्याचे साधन आहे आणि (माणसाला जे–जे हवे, ते खऱ्या अर्थाने) अल्लाहकडेच प्राप्त होणार आहे. 16 तर (श्रद्धावंतांनो!) नेहमी अल्लाहची जाण ठेवून (जीवन व्यतीत

करण्यासाठी) प्रयत्नशील राहा. (जे सांगितले जाते ते) ऐका व आज्ञेचे पालन करा व (त्याच्या कार्यासाठी) खर्च करा. यात तुमचे स्वत:चे भले आहे. जे लोक कृपनतेच्या (व लालसेच्या) आहारी जाण्यापासून सुरक्षित राहिले. तर असेच लोक यशस्वी ठरणारे आहेत. 17 जर तुम्ही अल्लाहला उदारतापूर्वक कर्ज द्याल तर तो त्यात तुमच्यासाठी कित्येक पटीने वाढ करेल. आणि तो तुमच्या चुका माफ करेल. कारण अल्लाह हा (आपल्या दासांप्रति) फार गुणग्राहक आहे व फार सहिष्णू आहे.

18 तो ते सर्व जाणतो, जिथपर्यंत कोणाचीही बुद्धी पोचू शकत नाही आणि तेही, जे सर्व जाणतात. तोच सर्वशक्तिमान व खरा बुद्धिवान आहे.

# सूरह-६५. अत-तलाक़

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 पैगंबर! जेव्हा तुमच्यापैकी कोणीही आपल्या पत्नींना घटस्फोट (तलाक़)
देईल तर (त्याने) त्यांना त्यांच्या स्वच्छतेच्या (म्हणजे मासिक पाळी नसलेल्या)
काळात तलाक़ द्यावा. आणि त्या काळाची गणना काळजीपूर्वक करा. आणि
आपला पालनकर्ता असलेल्या अल्लाहसमोर (जाब देण्याची सदैव) जाण ठेवा.
(तलाक़ची प्रक्रिया पूर्ण होईपर्यंत) त्यांना त्यांच्या घरातून काढू नका. तसेच
त्यांनीही घर सोडून जाऊ नये. पण फक्त त्यांनी जर उघड-उघड काही
निर्लज्जपणाचे कृत्य केलेले असेल (तर त्यांना घराबाहेर घालवू शकता). या
अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादा आहेत आणि जो कोणी अल्लाहने घालून
दिलेल्या मर्यादा भंग करेल, तर तो स्वत:वरच अन्याय करणारा आहे. (हे
माणसा!) तू जाणत नाहीस की, अल्लाह त्यानंतर कदाचित काही नवीन
(कल्याणकारी) स्थिती निर्माण करेल. 2 मग त्यांच्या प्रतीक्षेची मुदत पूर्ण
झाल्यानंतर, त्यांना सन्मानाने ठेवून घ्या किंवा सन्मानाने सोडून द्या. आणि

आपल्या (नातेवाइकांपैकी) दोन विश्वसनीय लोकांना साक्ष म्हणून बोलावून घ्या. (आणि साक्ष देणाऱ्यांनी गरज असेल तेव्हा) अल्लाहची जाण ठेवून, योग्य तीच साक्ष द्यावी. हे उपदेश त्या माणसाला दिले जात आहेत, जो अल्लाहवर व न्यायाच्या दिवसावर विश्वास ठेवणारा आहे. आणि जो कोणी अल्लाहकडे (जाब देण्याची) जाण ठेवेल, अल्लाह त्याच्यासाठी (अडचणीतून) बाहेर पडण्याचा मार्ग काढेल. 3 आणि तो त्याला अशा ठिकाणाहून उपजीविका पुरवेल, ज्याची त्याने कधी कल्पनाही केलेली नसेल. जो कोणी अल्लाहवर विश्वास ठेवतो, अल्लाह त्याच्यासाठी पर्याप्त आहे. अल्लाह नेहमी आपली योजना तडीस नेतोच. (आणि) अल्लाहने प्रत्येक गोष्टीसाठी एक (अवधी व) प्रमाण ठरवून दिलेले आहे.

4 आणि तुमच्या स्त्रियांपैकी वय झाल्यामुळे ज्यांना मासिक पाळी येण्याविषयी शंका आहे. तर अशा स्त्रियांसाठी प्रतीक्षेची अवधी तीन महिने आहे. आणि हाच नियम त्यांनाही लागू होईल ज्यांना मासिक पाळी आलेलीच नाही. आणि गर्भवती असलेल्या स्त्रियांसाठी प्रतीक्षेचा काळ प्रसूती होईपर्यंत आहे. आणि जो कोणी अल्लाहकडे (जाब देण्याची) जाण ठेवेल, अल्लाह त्याचे काम सोपे करून टाकेल. 5 हा आहे अल्लाहचा आदेश, जो त्याने तुमच्याकडे प्रकट केलेला आहे. जो कोणी अल्लाहची जाण बाळगून (जीवन जगेल), अल्लाह त्याच्या चुका माफ करून टाकेल आणि त्यास फार मोठे बक्षीस प्रदान करेल.

6 ज्या स्त्रिया (प्रतीक्षेच्या काळात) आहेत. त्यांना आपल्या ऐपतीनुसार जसे तुम्ही राहत आहात, तसेच त्यांनाही तिथेच राहू द्या. आणि त्यांना त्रास देण्याच्या उद्देशाने त्यांचा छळ करू नका. आणि त्या जर गर्भवती असतील, तर बाळ जन्माला येईपर्यंत त्यांच्यावर खर्च करा. मग जर (तलाक़ झाल्यानंतरही) त्या तुमच्या (बाळाला) स्तनपान देत असतील, तर त्यांना त्याबद्दल योग्य तो मोबदला द्या. (मुलाच्या भविष्याविषयी) आपसात सामंजस्यपूर्वक विचारविमर्श करा. आणि जर तुम्ही आपसात असहमत असाल, तर मग इतर एखादी स्त्री

तुमच्या बाळाला दूध पाजील. 7 (या सर्व बाबतीत) ज्याच्याकडे मोठ्या प्रमाणात धनसंपत्ती आहे, त्याने त्यानुसार खर्च करावा. आणि ज्याच्याकडे निर्वाहाची साधने कमी प्रमाणात आहेत त्याने, अल्लाहने त्याला जे काही दिलेले आहे त्यानुसार त्यातून खर्च करावा. अल्लाहने ज्याला जितके दिलेले आहे, त्यापेक्षा अधिक भार तो कोणावरही टाकत नसतो. अल्लाह हलाखीच्या (दिवसांनंतर) लवकरच चांगले दिवसही आणेल.

8 कित्येक अशा वस्त्या होत्या, ज्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या व त्याच्या पैगंबराच्या आज्ञांचे उल्लंघन केले, तेव्हा आम्ही त्यांना कठोरपणे फैलावर घेतले. आणि आम्ही त्यांना कठोर शिक्षा केली. 9 अशाप्रकारे त्यांनी आपल्या (कर्मरूपी) कमाईची फळे चाखली आणि शेवटी विनाशाशिवाय त्यांच्या वाट्याला काहीच आले नाही. 10 (यापलीकडेही) अल्लाहने त्यांच्यासाठी (याहूनही) मोठी शिक्षा तयार ठेवलेली आहे. हे बुद्धी बाळगणाऱ्या श्रद्धावंतांनो! अल्लाहची जाण बाळगून असा. अल्लाहने तुमच्याकडे एक बोधग्रंथ प्रकट केलेला आहे. 11 (आणि) एक पैगंबर (पाठविला आहे), जो तुम्हाला अल्लाहचे सुस्पष्ट संदेश ऐकवीत आहे. यासाठी की, जे श्रद्धा धारण करून सत्कर्मे करीत आहेत, अशा लोकांना अंधकारातून काढून प्रकाशात आणावे. आणि जो कोणी अल्लाहवर श्रद्धा धारण करून सत्कर्मे करतो, तो त्यास अशा बागांत प्रवेश देईल, ज्यातून पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह (कायम) वाहत असतील. ते तिथे कायम वास्तव्य करतील. ही अल्लाहने त्याला प्रदान केलेली उत्कृष्ट उपजीविका असेल. 12 तो अल्लाह आहे, ज्याने सात आकाशांना निर्माण केले व तशाच पृथ्वी देखील. त्यांच्यामध्ये त्याचे आदेश प्रकट होत असतात (आणि त्या आदेशांनुसार हा प्रचंड कारखाना काम करीत असतो) ते यासाठी की, तुम्हाला कळून यावे की, प्रत्येक गोष्टीवर अल्लाहचे पूर्ण नियंत्रण आहे. आणि अल्लाहने आपल्या ज्ञानाने प्रत्येक गोष्टीस वेढून ठेवलेले आहे.

# सूरह–६६. अत–तहरीम

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 पैगंबर! तुम्ही आपल्या पत्नींच्या प्रसन्नतेखातर त्या गोष्टीला (स्वत:साठी) का अवैध ठरवता, जी अल्लाहने तुमच्यासाठी वैध ठरविलेली आहे. पण अल्लाह फार क्षमाशील व दयाळू आहे.

2 अल्लाहने तुम्हाला आपल्या शपथांमधून मुक्त होण्याचे (नियमासहित) आधीच बजावलेले आहे, कारण अल्लाह तुमचा सांभाळकर्ता आहे. आणि तोच सर्व काही जाणणारा व बुद्धिमान आहे.

3 आणि (एकदा असे घडले की,) पैगंबराने आपल्या पत्नींपैकी एकीला
एखादी गोपनीय गोष्ट सांगितली. पण तिने ती गोष्ट गुप्त ठेवली नाही. आणि
अल्लाहने पैगंबराला याबद्दल सुचीत केले. तेव्हा पैगंबराने तिला त्यांपैकी काही
भाग सांगितला आणि काही भाग सांगायचे टाळले. मग जेव्हा पैगंबराने आपल्या
पत्नीस हे सांगितले, (जे त्यास अल्लाहद्वारे कळविण्यात आले होते), तेव्हा तिने
विचारले, 'तुम्हाला याविषयी कोणी सांगितले?' पैगंबराने उत्तर दिले, 'मला
त्याने हे सांगितले जो सर्व काही जाणणारा आहे व प्रत्येक गोष्टीविषयी जागरूक
आहे.' 4 (पैगंबराच्या पत्नींनो!) जर तुम्ही दोघी पश्चात्तापदग्ध होऊन अल्लाहकडे
वळाल, तर (ते तुमच्या हिताचे असेल) (कारण) तुमची मने आधीच (जे योग्य
आहे) त्यापासून दूर गेलेली आहेत. पण जर तुम्ही दोघी पैगंबराच्या विरुद्ध
एकमेकींना मदत कराल, तर (लक्षात ठेवा) पैगंबराचा साहाय्यकर्ता अल्लाह
आहे आणि जिब्रील (हा स्वर्गदूत) आणि सत्कृत्ये करणारे श्रद्धावंत आणि
याव्यतिरिक्त (सर्व इतर) स्वर्गदूत त्याला साहाय्य करणारे आहेत. 5 (पैगंबराच्या
पत्नींनो!) जर पैगंबराने तुम्हाला घटस्फोट दिला, तर त्याचा पालनकर्ता तुमच्याजागी
तुमच्याहून अधिक चांगल्या पत्नी त्याला देऊ शकतो. ज्या, अल्लाहप्रति समर्पित

अशा, श्रद्धावंत, आज्ञाधारक, नेहमी अल्लाहसमोर लीन असलेल्या, निष्ठावंत उपासक, उपवास करणाऱ्या, ज्या विधवा व कुमारिकाही असतील.

6 श्रद्धावंतांनो! तुम्ही स्वत:ला व तुमच्या कुटुंबीयांना त्या (नरकाच्या) आगीपासून वाचवा जिचे इंधन माणसे व दगड असतील. जिचे (रखवालदार म्हणून) कठोर व प्रचंड शक्तिशाली (अल्लाहचे) दूत नियुक्त आहेत. अल्लाहने दिलेल्या आदेशाची अंमलबजावणी करण्याच्या बाबतीत ते जराशीदेखील कुचराई करीत नाहीत. ते अगदी तेच करतात, जे करण्याचा त्यांना आदेश दिला जातो.
7 सत्य नाकारण्यावर आग्रही राहिलेल्या लोकांनो! आज कोणत्याही सबबी प्रस्तुत करू नका. तुम्हाला त्याचाच मोबदला देण्यात येत आहे, जे तुम्ही करीत होता.

8 श्रद्धावंतांनो! प्रामाणिकपणे पश्चात्ताप करून अल्लाहकडे वळा, नवल नव्हे, तुमचा पालनकर्ता तुमची वाईट कृत्ये माफ करून टाकेल आणि तुम्हाला अशा बागांमध्ये प्रवेश देईल, ज्यांमधून पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह (सदैव) वाहत असतील. त्या दिवशी (म्हणजे न्यायाच्या दिवशी), अल्लाह पैगंबरास व त्याचे अनुसरण करणाऱ्या श्रद्धावंतांना अपमानित करणार नाही. त्यांच्या (सद्गुणांचा) प्रकाश त्यांच्यासमोर व त्याच्या उजव्या बाजूस धावत असेल. आणि ते म्हणतील, 'हे प्रभू! आमच्यासाठी आमच्या या प्रकाशास सदैव तळपत ठेव. आणि आम्हाला क्षमा कर. खरोखर, तुला प्रत्येक गोष्टीवर पूर्ण नियंत्रण प्राप्त आहे.'

9 पैगंबर! (अल्लाहचे शत्रू असलेल्या) सत्य नाकारणाऱ्या लोकांशी व दांभिक लोकांशी जिहाद करा. आणि त्यांच्याप्रति दयामाया दाखवू नका. त्यांचे अंतिम स्थान नरक आहे आणि ते खरोखर फार वाईट स्थान आहे.

10 अल्लाह सत्य नाकारणाऱ्या लोकांसाठी नूहची पत्नी व लूतची पत्नी यांचे उदाहरण सादर करीत आहे. ज्या आमच्या दोन सदाचारी भक्तांशी विवाहबद्ध

होत्या. मग त्यांनी त्यांच्याशी (म्हणजे आपल्या पतींशी) विश्वासघात केला. त्यामुळे (न्यायाच्या दिवशी) अल्लाहच्या मर्जीच्या विरुद्ध, ते त्यांच्या कोणत्याही प्रकारे कामी येऊ शकणार नाहीत. आणि त्या दोघींना सांगितले जाईल, 'नरकाच्या आगीत प्रवेश करा, इतर प्रवेश करणाऱ्यांबरोबर.'

11 आणि इमान धारण केलेल्या लोकांसाठी अल्लाह फिरऔनच्या पत्नीचे उदाहरण समोर ठेवत आहे. तिने (अल्लाहशी प्रार्थना केली) म्हणाली, 'हे प्रभू! माझ्यासाठी स्वर्गात तुझ्या सान्निध्यात एक घर बनव, आणि मला फिरऔन व त्याच्या कुकृत्यांपासून वाचव आणि मला अत्याचारी लोकांपासून मुक्ती दे.' 12
असेच (दुसरे उदाहरण) इमरानची मुलगी मरियम हिचे आहे, जिने आपले शील सुरक्षित ठेवले. मग आम्ही तिच्यात आमचा आत्मा फुंकला. आणि तिने आपल्या पालनकर्त्याच्या वचनांचे व त्याच्या ग्रंथाचे (पूर्ण) समर्थन केले. आणि ती आज्ञाधारक (भक्तांपैकी) होती.

# सूरह-६७. अल-मुल्क

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 असीम समृद्ध आहे तो, ज्याच्या हाती समस्त विश्वाची (ची) सत्ता आहे.
प्रत्येक वस्तुमात्रावर त्याचेच नियंत्रण आहे. 2 त्यानेच तुमची कसोटी पाहण्यासाठी
जीवन व मृत्यू निर्माण केले. तुमच्यापैकी कोण चांगली कामे करतो, (हे त्याला
पाहायचे आहे). तो सर्वशक्तिमान (असूनही) फार क्षमाशील आहे. 3 ज्याने
एकावर एक असे सात आकाश निर्माण केले. कृपावंत (अल्लाहच्या) निर्मितीमध्ये तुम्हाला कोणताही दोष असल्याचे आढळून येणार नाही. (एकदा पाहिल्याने दोष न आढळल्यास) पुन्हा एकदा पाहा की, तुम्हाला आढळतो का कुठे काही
दोष? 4 मग आणखी पुन्हा-पुन्हा पाहा, (प्रत्येक वेळेस) तुमच्या (दोष शोधणाऱ्या) नजरा थकून व निराश होऊन तुमच्याकडे परततील (पण अल्लाहच्या निर्मितीमध्ये दोष कुठेही आढळणार नाही).

[5] आणि आम्ही पृथ्वीसाठी सर्वात जवळ असलेल्या आकाशाला दिव्यांनी सजवलेले आहे. आणि (वाईट हेतूने आपल्या मर्यादा ओलांडणाऱ्या) सैतानांना पिटाळून लावण्याचे त्यांना साधन बनविले आहे. आणि त्यांच्यासाठी धगधगत्या आगीची (भयंकर) शिक्षा तयार आहे. [6] ज्या लोकांनी आपल्या पालनकर्त्याला मानण्यास नकार दिला त्यांच्यासाठी नरकाची (भयंकर) आग तयार ठेवलेली आहे. (खरोखर) ते फारच वाईट ठिकाण आहे. [7] जेव्हा त्यांना तिच्यात टाकले जाईल, तेव्हा तिची (भयंकर) गर्जना ते ऐकतील आणि ती उसळी घेत असेल. [8] जणू तिच्या क्रोधाचा स्फोटच होत आहे. प्रत्येक समूह जेव्हा तिच्यात टाकला जाईल, तिचे रखवालदार (प्रत्येक समूहाला) विचारतील, 'तुमच्याकडे कोणी सावध करणारा आला नव्हता का?' [9] ते उत्तर देतील, 'अर्थातच, सावध करणारा आमच्याकडे आला होता, पण आम्ही त्यास खोटे ठरविले होते आणि आम्ही त्यास म्हटले होते, 'अल्लाहने काहीही प्रकट वगैरे केलेले नाही.' तुम्ही (स्वंयनियुक्त पैगंबर अल्लाहच्या संदेशाचे नाटक करून) चुकीच्या मार्गी लागलेले आहात.' [10] आणि ते म्हणतील, 'जर आम्ही त्यांचे म्हणणे ऐकले असते आणि (निदान) आमच्या बुद्धीचा वापर केला असता, तर आता आम्ही नरकवासीयांपैकी झालो नसतो.' [11] आणि अशाप्रकारे ते आपल्या अपराधाची कबुली देतील. तर नरकवासीयांवर सर्वप्रकारे अल्लाहची अवकृपा होवो!

[12] (या उलट) जे लोक आपल्या पालनकर्त्याला न पाहताही त्याच्याप्रति भीतीयुक्त आदर बाळगतात. त्यांना (अल्लाहकडून) क्षमा व फार मोठे बक्षीस प्राप्त होईल.

[13] (लोकांनो!) तुम्ही काहीही गुपचुपरित्या बोला किंवा मोठ्याने बोला प्रत्येकाच्या मनात जे-जे आहे, ते सर्व त्याला माहीत आहे. [14] ज्याने तुम्हाला निर्माण केले, त्यालाच (तुमच्याविषयी) प्रत्येक गोष्ट माहीत नसणार का? त्याची बौद्धिक शक्ती अगाध आहे, (कोणासाठीही) अनाकलनीय अशी आहे.

तोच प्रत्येक गोष्टीची जाणीव असणारा आहे.

15 त्यानेच पृथ्वीला तुमच्या अधीन करून टाकले. तर तुम्ही तिच्या भूभागांवर संचार करा. आणि त्याने दिलेल्या उपजीविकेतून खा, आणि (हे नेहमी लक्षात ठेवा की, शेवटी) पुनरुत्थान होऊन त्याच्याकडेच परत जायचे आहे. 16 तुम्ही त्याच्यापासून स्वत:ला सुरक्षित समजता का, जो आकाशात आहे (म्हणजेच अल्लाहपासून)? की, तो तुम्हाला जमिनीत गाडून टाकू शकत नाही? पाहा जेव्हा ती कंपित होते (तेव्हा काय होऊ शकते?) 17 किंवा जो आकाशात आहे, त्याच्यापासून तुम्ही निर्भय झाला आहात का? की, तो तुमच्यावर दगडांचा वर्षाव करणारे तुफानी वादळ पाठवू शकत नाही? पण तेव्हाच तुम्हाला कळून चुकेल की, किती (खरा) होता माझा इशारा. 18 आणि त्यांच्या पूर्वीच्या अनेकांनी (माझ्या इशाऱ्याकडे दुर्लक्ष करून त्यास) खोटे ठरविले. तर कशी होती माझी नाराजी (जी त्यांच्यावर प्रकट झाली)!

19 ते त्यांच्यावर उडणाऱ्या पक्ष्यांचे कधी (चिंतनपूर्वक) अवलोकन करत नाहीत का, जे आपले पंख पसरवितात आणि (गरजेनुसार) ते आत मिटून घेत असतात. त्यांना थांबवून ठेवणारा कृपावंत (अल्लाहशिवाय) दुसरा कोणीच नाही. कारण तोच सर्व गोष्टींवर नजर ठेवून असतो. 20 अशी कोणती सेना आहे, जी कृपावंत अल्लाहच्या विरुद्ध तुम्हाला साहाय्य करू शकेल? सत्य नाकारणारे केवळ स्वत:ची फसवणूक करीत आहेत! 21 (अशाप्रकारे) अल्लाहने तुम्हाला उपजीविका प्रदान करणे बंद केले, तर (त्याच्याशिवाय) दुसरा कोण आहे, जो तुम्हाला उपजीविका देऊ शकतो? (हे सत्य उघड असतानाही,) ते केवळ हट्टापोटी विद्रोहाची आणि सत्यापासून दूर जाण्याची भूमिका घेत आहेत.

22 जो माणूस आपल्या चेहऱ्यावर लोटांगण घालून चालतो, तो सन्मार्गावर असू शकतो की, जो सरळ मार्गावर, सरळ ताठ मान ठेवून चालतो तो? 23 त्यांना सांगा, ‘तोच आहे (अल्लाह) ज्याने तुम्हा सर्वांना निर्माण केले आणि

तुमच्यासाठी कान, डोळे व हृदये बनविली, पण तुम्ही (अल्लाहप्रति) फारच थोडी कृतज्ञता दाखवता.' 24 त्यांना सांगा की, तोच आहे (अल्लाह) ज्याने तुम्हाला पृथ्वीवर सर्वत्र पसरवून टाकले. आणि शेवटी (पुनरुत्थानाच्या दिवशी) तुम्हाला त्याच्याकडेच एकत्रित आणले जाणार आहे.

25 पण ते विचारतात, 'या (पुनरुत्थानाच्या) वचनाची पूर्तता होणार तरी केव्हा? तुमच्या म्हणण्यात काही सत्य असेल, तर (आम्हाला उत्तर द्या).' 26 (पैगंबर!) त्यांना सांगा, 'याचे ज्ञान केवळ अल्लाहला आहे आणि मी तर फक्त त्यापासून स्पष्टरित्या सावध करणारा आहे.' 27 पण जेव्हा ते वचन पूर्ण होण्यासाठी जवळ येत असल्याचे पाहतील, तेव्हा सत्य नाकारणाऱ्या लोकांचे चेहरे (दहशतीने) अगदी खिन्न होऊन जातील. आणि (तेव्हा) त्यांना सांगितले जाईल, 'हीच ती गोष्ट आहे, जिची (खिल्ली उडवत तिला आणण्याची) तुम्ही मागणी करीत असत.' 28 (पैगंबर!) त्यांना सांगा '(या जगात) अल्लाह मला व माझ्याबरोबर असलेल्या लोकांना नष्ट करेल किंवा आमच्यावर दया करेल. पण (यानंतरच्या जगात) सत्य नाकारणाऱ्यांना त्या (कायमस्वरूपी) दु:खदायी शिक्षेपासून कोण वाचवू शकतो? याविषयी तुम्ही कधी विचार केलात का?' 29 त्यांना सांगा, 'तो कृपावंत अल्लाह आहे, आम्ही त्याच्यावरच श्रद्धा ठेवतो व त्याच्यावरच भरवसा ठेवतो. आणि तुम्हाला लवकरच कळून चुकेल की, कोण उघडउघड वाट चुकलेला आहे.' 30 (सत्य नाकारणाऱ्यांना) सांगा, 'तुम्ही यावर कधी विचार केला आहात का की, जर तुमचे सर्व पाण्याचे साठे जमिनीत अचानक लुप्त झाले तर (अल्लाहशिवाय दुसरा) कोण आहे, जो तुमच्यासाठी शुद्ध पाणी उपलब्ध करू शकतो?'

# सूरह–६८. अल–क़लम

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 नून० लेखणीची शपथ, आणि ते जे काही (लेखणीने) लिहितात (त्याची शपथ).

2 (पैग़ंबर!) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कृपेने वेडसर नाही आहात. 3
निश्चितच, तुमच्यासाठी कधीही न संपणारे चांगले प्रतिफळ आहे. 4सद्वर्तनाच्या
बाबतीत तुम्ही आदर्श आहात, यात मुळीच शंका नाही. 5 लवकरच तुम्हीही
पाहाल आणि तेहीं पाहतील की....... 6 तुमच्यापैकी वेडाने झपाटलेला कोण
होता. 7 तुमचा पालनकर्ताच चांगल्याप्रकारे जाणतो की, कोण त्याच्या मार्गापासून
ढळला आहे. आणि कोण त्याच्या मार्गावर अढळपणे मार्गस्थ आहे, हेही त्याला
चांगले ठाऊक आहे.

8 म्हणून तुम्ही सत्य नाकारणाऱ्यांच्या (आवडी–निवडीच्या) प्रभावात येऊ
नका. 9 ते तर अशी इच्छा बाळगून आहेत की, तुम्ही थोडे नमते घ्यावे आणि
तेही थोडे नमते घेतील. 10 तुम्ही सारख्या शपथा घेऊन बोलणाऱ्या नीच
माणसाचे म्हणणे मान्य करू नका (त्यावर विश्वास करू नका). 11 आणि जो
(माघारी कोणाचीही) निंदानालस्ती व चहाड्या करीत फिरतो. 12 आणि जो
सत्कृत्यांस प्रतिबंध करणारा, मर्यादांचे उल्लंघन करणारा, अन्यायी वर्तन करणारा
आहे. 13 जो निष्ठुर आहे आणि या सर्व वाईट गुणांसह कमअस्सलही आहे. 14
त्याच्या (मगरूरीचे) कारण, त्याच्याकडे भरपूर संपत्ती व अपत्ये आहेत. 15
जेव्हा आमचे संदेश त्याला ऐकविले जातात, तेव्हा तो म्हणतो, 'या आधीच्या
लोकांच्या निराधार कहाण्या आहेत.' 16 लवकरच आम्ही त्याच्या नाकावर
डाग देऊ.

17 आम्ही यांची परीक्षा पाहत आहोत, ज्याप्रमाणे आम्ही त्या बागवाल्यांची

परीक्षा पाहिली होती. ज्यांनी दुसऱ्या दिवशी सकाळी बागेतील सर्व फळे तोडण्याचा निश्चय बोलून दाखविला होता. 18 (त्यांनी आपला निर्धार बोलून दाखवताना) 'अल्लाहची इच्छा झाल्यास उद्या असे आम्ही करू,' असे म्हटले नाही. 19 हे (रात्री) झोपेतच होते की, तुझ्या पालनकर्त्याकडून एक विपत्ती त्या बागेवर आली. 20 आणि सकाळी त्या बागेची अशी अवस्था झाल्याचे आढळून आले, जणू त्याची आधीच कापणी झालेली आहे (आता तिथे बाग नसून, पडीत जमीन आहे). 21 (इकडे) सकाळी उठल्यानंतर यांनी (बागेत जाण्यासाठी) एकमेकांना हाक दिली. 22 म्हणाले, 'जर सर्व फळे तोडायची असतील, तर शेतावर सकाळीच गेलेले बरे.' 23 मग ते शेताकडे निघाले, व जाताना आपसात कुजबुज करीत होते. 24 म्हणाले, 'आज कोणताही गरीब (गरजू) माणूस बागेत प्रवेश करता कामा नये.' 25 ते भल्या पहाटे असा निश्चय करून निघाले. त्यांना वाटले (कोणाला द्यायचे, कोणाला नाही हे) ठरविण्याचा त्यांना अधिकार आहे. 26 पण जेव्हा त्यांनी ते पाहिले (तेव्हा ते त्यास ओळखू शकले नाही). ते म्हणाले, 'आम्ही वाट चुकलो असणार!' 27 (मग थोडा वेळ विचार करून म्हणाले,) 'नाही, आम्ही पूर्णपणे बरबाद झालो आहोत.' 28 त्यांच्यातील (तुलनात्मक दृष्ट्या) जो भला माणूस होता, तो म्हणाला, 'मी तुम्हाला म्हटले नव्हते का की, तुम्ही अल्लाहचे स्तुतिगान का करीत नाही?' 29 त्यांनी उत्तर दिले, 'आमचा पालनकर्ता असलेला अल्लाहच, असीम महिमावान आहे. खरोखर, आम्हीच चुकीचे वागत होतो.' 30 मग ते आपसात एकमेकांवर आरोप–प्रत्यारोप करू लागले. 31 (शेवटी) ते म्हणाले, 'आमचा धिक्कार असो! खरोखर, आम्हीच अत्यंत चुकीने वागत होतो. 32 शक्य आहे, आमचा पालनकर्ता आम्हाला याऐवजी याहून चांगली बाग प्रदान करेल, कारण आता आम्ही त्याच्याकडेच वळलो आहोत.' 33 (अपराधी लोकांवर या जगातही) अशाप्रकारे शिक्षा केली जाते. पण या नंतरच्या जगातील शिक्षा तर याहूनही

भयंकर मोठी आहे. कदाचित या लोकांना याची जाणीव झाली असती तर (त्यांचे भले झाले असते).

34 (अल्लाहची) जाण ठेवून जीवन व्यतीत करणाऱ्यांसाठी त्यांच्या पालनकर्त्याकडे ऐश्वर्यसंपन्न असा स्वर्ग आहे. 35 आम्ही सच्च्या भक्तांना अपराध्यांसमान करून टाकणार आहोत की काय? 36 तुम्हाला झाले तरी काय, किती वाईट निर्णय करीत आहात तुम्ही? 37 असा एखादा (विशेष) ग्रंथ आहे का तुमच्याकडे, जो तुम्हाला असे सांगतो? 38 त्यात तुम्हाला ते सर्व आढळते, जे तुम्हाला हवे असते? 39 किंवा तुम्हाला आमच्याकडून असे पक्के वचन प्राप्त झालेले आहे की काय, जे पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत आमच्यावर बंधनकारक असेल की, जे तुम्ही ठरवाल ते निश्चितपणे तुम्हाला मिळून राहील? 40 त्यांना विचारा, 'तुमच्यापैकी कोण याची हमी देणारा आहे?' 41 किंवा त्यांनी ठरवलेले कोणी अल्लाहचे समकक्ष असतील आणि त्यांच्या दाव्यात ते जराही गंभीर असतील, तर त्यांनी त्या (ईश्वरीय सत्तेच्या) भागीदारांना समोर आणावे.

42 त्या दिवशी संपूर्ण सत्यावरून (अदृश्याचा) पडदा दूर केला जाईल, आणि (सत्य नाकारत राहिलेल्यांना अल्लाहसमोर) नतमस्तक होण्यास सांगितले जाईल, पण तेव्हा ते नतमस्तक (होण्यासाठी प्रयत्न करूनही) नतमस्तक होऊ शकणार नाहीत. 43 (शरमेने) त्यांच्या नजरा खाली झालेल्या असतील, नामुष्कीने ग्रस्त अशा अवस्थेत ते असतील. त्यांना (जगात) अल्लाहसमोर नतमस्तक होण्यासाठी सांगितले जात होते, पण ते धडधाकट असूनही (त्या आज्ञेचे पालन करीत नसत). 44 (पैगंबर!) जे लोक या संदेशाला खोटे ठरवितात, त्यांना माझ्यावर सोडून द्या (मी त्यांना पाहून घेईन). त्यांना आम्ही, त्यांना कळणारही नाही, अशा रीतीने हळू-हळू (विनाशाकडे) ओढत आहोत. 45 मी त्यांना (काही काळ) उसंत देत आहे, कारण माझी योजना अगदी पक्की

आहे.
46 तुम्ही त्यांच्याकडे (हा संदेश पोचविल्याबद्दल) काही मोबदला मागत
आहात की काय, ज्यामुळे (बिचारे) त्या भुरदंडाच्या ओझ्याने दबले जात
आहेत? 47 किंवा (त्यांना असे वाटते की), त्यांच्या आवाक्यात अदृश्याचे
ज्ञान आहे आणि ते ज्ञान, ते लिहून घेत आहेत? 48 (पैगंबर!) तर तुम्ही
आपल्या पालनकर्त्याचा निर्णय होईपर्यंत सहनशीलतापूर्वक प्रतीक्षा करा. आणि
त्याच्याप्रमाणे (म्हणजे यूनुसप्रमाणे, संयम गमावू नका), ज्याला माशाने गिळले
होते. तेव्हा त्याने (अल्लाहचा) धावा केला. तेव्हा तो फार दु:खी–कष्टी झालेला
होता. 49 जर त्याच्या पालनकर्त्याकडून त्याच्यावर मेहेरबानी झाली नसती, तर
अत्यंत वाईट अवस्थेत खडकाळ मैदानात तो फेकला गेला असता. 50 पण
त्याच्या पालनकर्त्याने (आपल्या कार्यासाठी) त्याची निवड केली आणि सदाचारी
लोकांत त्याचा समावेश केला. 51 जेव्हा सत्य नाकारणारे लोक या उपदेशास
ऐकतात (म्हणजे या कुराणास), तेव्हा ते तुम्हाला आपल्या क्रोधीत नजरांनी
अशाप्रकारे पाहू लागतात, जणू ते तुम्हालाही (अशाप्रकारे प्रतिसाद देऊन या
उपदेशापासून) दूर करणार आहेत. आणि म्हणतात, ‘तो निश्चितपणे वेडा
आहे.’ 52 (पैगंबर, तुम्ही सबुरीने घ्या,) हे कुराण समस्त मानवजातीसाठी
(अल्लाहकडून) आलेल्या बोधग्रंथाशिवाय अन्य काहीच नाही.

# सूरह–६९. अल–हाक़्क़ा

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 ती अटळरित्या घडणारी घटका. 2 काय आहे ती अटळ घटका? 3 ती
अटळ घटका काय आहे, हे तुम्हाला कशामुळे ज्ञात होईल? 4 समूद व आद या
जमातींनी अचानकपणे आदळणाऱ्या आपत्तीला खोटे ठरविले होते. 5 समूद ही
जमात एका भयंकर स्फोटाने नष्ट केली गेली. 6 आणि आद ही जमात देखील

बेफाम अशा वादळाद्वारे नष्ट केली गेली. 7 त्याद्वारे अल्लाहने सात रात्री व आठ दिवस त्यांना अखंडपणे वेढून ठेवले. पाहणारा पाहू शकतो की, ते तिथे असे पालथे पडलेले आहेत की, जणू ते खजुरीच्या वृक्षाच्या खाली पडलेल्या फांद्या आहेत. 8 तुम्हाला आता त्यांचे कोणतेही अवशेष दिसतात का? 9 अशाचप्रकारे फिरऔनने आणि त्याच्या पूर्वीच्या लोकांनी, तसेच उलथवून टाकलेल्या वस्त्यांमधील लोकांनीही अपराधी कृत्ये केली होती. 10 त्यांनी आपल्या पालनकर्त्याकडून आलेल्या पैगंबराची अवज्ञा केली. परिणामी (शेवटी) अल्लाहने त्यांना कठोरपणे फैलावर घेतले. 11 (लोकांनो! जेव्हा नूहच्या काळात) जेव्हा पाण्याने सर्व मर्यादा ओलांडल्या होत्या, तेव्हा आम्हीच तरंगत्या नौकेत तुम्हाला (म्हणजेच मानवी वंशाच्या दिव्याला) सुरक्षित बसविले होते. 12 ते यासाठी की, आम्ही त्या घटनेस तुमच्यासाठी बोध घेण्याचे साधन बनवावे. आणि (संदेश ग्रहण करणाऱ्या) कानांनी ते ग्रहण करून लक्षात ठेवावे.

13 आणि जेव्हा एकदाच जोराने फुंकर मारून शिंग फुंकण्यात येईल. 14 आणि पृथ्वी व त्यावरील पर्वतांना वर उचलून एकाच दणक्यात त्यांचे तुकडे–तुकडे केले जातील. 15 त्या दिवशी ती घडणारी महान घटना घडून येईल. 16 आणि आकाश फाटून जाईल तर त्या दिवशी तो अगदी निष्प्रभ होऊन जाईल. 17 आणि स्वर्गदूत त्याच्या (चहूबाजूंनी) कडेवर असतील. त्या दिवशी तुझ्या पालनकर्त्याच्या महासिंहासनाला आठ स्वर्गदूत उचलून धरलेले असतील. 18 त्या दिवशी तुम्हाला (अल्लाहच्या न्यायालयात) हजर केले जाईल. तेव्हा तुमची कोणतीही गुपिते लपून राहणार नाहीत (असा असेल न्यायाचा दिवस).

19 तेव्हा ज्याचे कर्मपत्र त्याच्या उजव्या हातात दिले जाईल, तो (खूश होऊन इतरांना) म्हणेल, ‘हे पाहा माझे कर्मपत्र आणि वाचा. 20 मला विश्वास होता की, मला (एके दिवशी) माझ्या (कर्मांचा) हिशेब अवश्य पाहायला मिळणार आहे.’ 21 तेव्हा त्याला (खऱ्या अर्थाने) सुखी जीवन लाभेल, 22

आलिशान अशा स्वर्गात. 23 तिथे फळांचे घोस त्यांच्या सहज हाताला येतील. 24 आम्ही त्यांना सांगू, 'खा व प्या अगदी आनंदाने, विगत दिवसांमध्ये तुम्ही जी चांगली कृत्ये केलीत त्याच्या फलस्वरूप.' 25 पण ज्या माणसाला त्याचे कर्मपत्र त्याच्या डाव्या हातात सुपूर्द केले जाईल. तेव्हा तो म्हणेल, 'अरेरे, माझे कर्मपत्र मला कधीच दिले गेले नसते तर (फार बरे झाले असते)! 26 आणि मला माझे हिशेबही कधीच कळाले नसते तर.....! 27 (किती बरे झाले असते!) जर त्या मृत्यूने माझे (कायमस्वरूपी) अंत घडवून आणले असते. 28 माझी धनसंपत्ती माझ्या काहीच कामी आलेली नाही. 29 आता माझे सर्व अधिकार संपुष्टात आलेले आहेत.' 30 (आज्ञा होईल,) 'त्याला पकडा आणि त्याच्या गळ्यात साखळदंड घाला. 31 आणि मग त्याला नरकात फेकून द्या. 32 मग त्याला (त्याच्यासारख्या इतर अपराध्यांसोबत) सत्तर गज एवढ्या लांब साखळीने जखडून टाका.' 33 कारण तो सर्वशक्तिमान अल्लाहवर विश्वास ठेवत नव्हता. 34 तसेच तो गरजू लोकांना अन्नदान करण्यासाठी (ना स्वतः पुढे सरसावला,) ना त्याने इतरांना त्यासाठी प्रेरित केले. 35 म्हणूनच आज इथे कोणीही त्याचा हितचिंतक नाही. 36 आणि गलिच्छ (वस्तूंखेरीज) त्याला कोणतेही अन्न मिळणार नाही. 37 जे केवळ अपराधी लोक खातील.

38 पण नाही, (लोकांनो!) मी त्या सर्वांना साक्षी बनवून सांगतो, ज्यांना तुम्ही पाहता. 39 आणि ते सर्व ज्यांना तुम्ही पाहू शकत नाही. 40 निःसंदेह हे कुराण सन्माननीय पैगंबराने आणलेली ईश्वरवाणी आहे. 41 आणि ही काही कोणा कवीची रचना नाही. पण तुम्ही जशी दृढ श्रद्धा ठेवायला हवी, तशी श्रद्धा अजिबात ठेवत नाही. 42 हे (कुराण) कोणा भविष्यवेत्त्याची वाणी नाही. पण तुम्ही जसे चिंतन करायला हवे, तसे चिंतन अजिबात करीत नाही. 43 हे (कुराण) सर्व जगांचा पालनकर्ता असलेल्या अल्लाहकडून प्रकट करण्यात आलेले आहे. 44 आणि जर या (पैगंबराने) आमच्याविषयी खोटी गोष्ट रचली असती, 45 तर आम्ही त्याचा उजवा

हात धरून.... 46 त्याच्या मानेची धमनी कापून टाकली असती. 47 आणि
तुमच्यापैकी कोणीही आम्हाला असे करण्यापासून रोखू शकला नसता. 48 निःसंदेह,
हे (कुराण) बोधग्रंथ आहे — त्यांच्यासाठी जे ईशभिरू आहेत. 49 आम्हाला चांगले
ठाऊक आहे की, तुमच्यामध्ये काही, आमच्या संदेशांना खोटे ठरविणारे आहेत. 50
(पण) असे करणे सत्य नाकारणाऱ्या लोकांसाठी निश्चितपणे पश्चात्तापाचे कारण
ठरणार आहे. 51 यात मुळीच शंका नाही की, हे (कुराण) कोणत्याही प्रकारच्या
भेसळीपासून मुक्त असे निर्भेळ सत्य आहे. 52 तर तुम्ही आपल्या महान
पालनकर्त्याच्या नावाचे स्तुतिगान करीत राहा.

# सूरह-७०. अल-मआरिज

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 त्या अटळ शिक्षेविषयी शंका घेणाऱ्याने ती (लवकर) यावी म्हणून
मागणी केली. 2 सत्य नाकारणाऱ्या लोकांपासून तिला कोणीही दूर सारू शकत
नाही. 3 जेव्हा ती अल्लाहकडून येईल, जो सदैव उंच असणाऱ्या स्थानांचा
मालक आहे. 4 त्याच्याकडे स्वर्गदूत व जिब्रील (प्रमुख स्वर्गदूतांपैकी एक)
(दररोज) चढून जात असतात. जो दिवस (म्हणजे पृथ्वीवरील) पन्नास हजार
वर्षांचा असल्याप्रमाणे असतो. 5 (श्रद्धावंतांनो!) तुम्ही सहनशीलतेचा अंगीकार
करा, — सकारात्मक सहनशीलतेचा. 6 लोकांना (न्यायाचा दिवस) फार दूर
असल्याचे वाटते. 7 पण आम्ही त्यास फार जवळ आल्याचे पाहत आहोत. 8
त्या दिवशी आकाश वितळलेल्या तांब्यासारखे (लाल) होईल. 9 आणि पर्वत
लोकरीच्या पिंजलेल्या पुंजक्याप्रमाणे होईल. 10 आणि कोणीही मित्र आपल्या
मित्राविषयी विचारपूस (देखील) करणार नाही. 11 जरी ते एकमेकांना समोर
पाहतील (तरीही कोणी कोणाला विचारणार नसेल), तेव्हा अपराधी माणसामध्ये
(एका प्रकारची व्यर्थ) इच्छा जागृत होईल की, त्या दिवसाच्या शिक्षेपासून

सर्वांचे बळी देऊनही स्वत:ची सुटका होणार असेल तर ती व्हावी. (जसे)
त्याची स्वत:ची मुले, 12 त्याची पत्नी व त्याचा भाऊ, 13 आणि त्याचे सर्व
कुटुंबीय, जे त्याला नेहमी आधार द्यायचे. 14 आणि पृथ्वीवरील सर्व लोकांनाही
'मुक्तिदंड' म्हणून देऊन केवळ आपली सुटका करून घ्यावी.

15 पण नाही! त्याच्यासाठी तर नरकाची धगधगती आग तयार असेल. 16
जी त्याच्या त्वचा सोलून काढील. 17 त्या सर्वांना ती स्वत:कडे बोलावील,
ज्यांनी (सत्यापासून) पाठ फिरविली आणि (त्यापासून) दूर निघून गेले. 18
ज्याने (भरपूर) संपत्ती गोळा केली व (स्वत:भोवतीच) तिचा संचय करून
ठेवत होता. 19 खरोखर, माणूस उतावीळ स्वभावासह जन्माला आलेला आहे.
20 जेव्हा त्याला कष्ट पोहोचते, तेव्हा तो शोक करू लागतो. 21 आणि जेव्हा
तो सुस्थितीत असतो, तेव्हा तो कंजूषपणाचे वर्तन करतो. 22 पण असे न
करणारे ते आहेत, जे नमाज़ाच्या माध्यमातून अल्लाहकडे वळलेले आहेत. 23 जे
नित्य नमाज़ाचे पालन करतात. 24 तसेच जे आपल्या संपत्तीतून योग्य तो हिस्सा
(दानकार्यात) देतात. 25 मागणाऱ्या गरजू लोकांना आणि (न मागणाऱ्या) गरजू
लोकांना. 26 जे न्यायाच्या दिवसावर दृढ विश्वास ठेवतात. 27 आणि जे
आपल्या पालनकर्त्याच्या शिक्षेचे भय बाळगून असतात. 28 (आणि) होय,
कोणालाही आपल्या पालनकर्त्याच्या शिक्षेपासून निर्धास्त होता कामा नये. 29
आणि जे आपले चारित्र्य कलंकित होऊ नये म्हणून नेहमी दक्ष असतात. 30 पण
त्यांच्या पत्नी व (विवाहबंधनात दाखल झालेल्या) दासी, यांच्याबाबतीत काहीही
आक्षेपार्ह नाही. 31 पण जे या मर्यादांच्या पलीकडे जाऊ पाहतात. तर असेच
लोक (अल्लाहच्या नजरेत) मर्यादांचे उल्लंघन करणारे लोक आहेत. 32 आणि जे
आपली विश्वासार्हता व आपल्या वचनांप्रति (पूर्णपणे) दक्ष असतात. 33 आणि
जे (सत्याची) साक्ष देण्याच्या बाबतीत दृढनिश्चयी असतात. 34 तसेच जे
नियमितपणे नमाज़रूपी प्रार्थना करीत असतात. 35 यांनाच (सर्वसुखसंपन्न)

अशा स्वर्गात सन्मानाचे जीवन लाभेल.

36 पण या सत्य नाकारणाऱ्यांना काय झाले आहे की, ते तुमच्याकडे धावत
येत आहेत..... 37 उजव्या बाजूने आणि डाव्या बाजूने व गटागटाने? 38
त्यांच्यापैकी प्रत्येकजण, अशी अपेक्षा बाळगून आहे का की, त्याला सर्वसुखसंपन्न
अशा स्वर्गात प्रवेश दिला जाईल? 39 नाही, कदापि नाही, आम्ही त्यांना अशा
गोष्टीपासून निर्माण केलेले आहे, जी त्यांना ठाऊक आहे.

40 कदापि नाही! मी सूर्योदयाच्या व सूर्यास्ताच्या सर्व स्थानांचा मालक
असलेल्या (अल्लाहची) शपथ घेऊन सांगतो, आम्ही यासाठी समर्थ आहोत की,
41 त्यांच्याजागी त्यांच्यापेक्षाही उत्तम लोकांना आणू शकतो. आणि असे
करण्यापासून आम्हाला रोखू शकेल असा कोणीही नाही. 42 तर त्यांना तोपर्यंत
व्यर्थ बडबड करीत व शब्दांचा खेळ खेळत राहू द्या, जेव्हा ते त्या दिवसाला
सामोरे जातील, ज्याचे त्यांना वचन दिले गेलेले आहे. 43 ज्या दिवशी ते
आपल्या कबरींतून घाईघाईने बाहेर पडतील आणि (जमा होण्याच्या ठिकाणी)
असे धावत सुटतील जणू एका खांबाकडे धावण्याची शर्यतच करीत आहेत. 44
त्यांच्या नजरा जमिनीवर खिळलेल्या असतील, शरमेने त्यांचे चेहरे ग्रस्त
असतील. हाच तो दिवस आहे, ज्याचे त्यांना वचन देण्यात आलेले होते.

# सूरह–७१. नूह

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 आम्ही नूहला त्याच्या लोकांकडे पैगंबर बनवून पाठविले. (त्यास आम्ही
म्हटले की), आपल्या लोकांना, त्यांच्यावर दु:खदायी शिक्षा येण्यापूर्वी, सावध
कर. 2 (नूहने) म्हटले, 'माझ्या बांधवांनो! मला तुमच्याकडे स्पष्टरित्या सावध
करणारा बनवून पाठविले गेले आहे. 3 तुम्ही (केवळ) अल्लाहची उपासना करा,
आणि त्याची नेहमी जाण ठेवा आणि माझ्या आज्ञेचे पालन करा 4 अल्लाह

तुमच्या चुका माफ करून टाकेल, आणि एका निर्धारित अवधीपर्यंत तुम्हाला उसंत देईल. पण जेव्हा अल्लाहने निर्धारित केलेली वेळ येते, मग तिला कोणत्याही प्रकारे टाळता येत नाही. कदाचित तुम्हाला हे समजले असते, तर (बरे झाले असते).'

5 (दीर्घ काळापर्यंत संदेश पोचविण्याचे कर्तव्य पार पाडल्यानंतर) नूहने (अल्लाहकडे) प्रार्थना केली, 'हे प्रभू! मी आपल्या लोकांना अहोरात्र (तुझ्याकडे) येण्याचे आवाहन केले. 6 पण माझ्या सततच्या आवाहनाने, ते (तुझ्यापासून) केवळ दूर आणि दूर गेले. 7 आणि जेव्हा-जेव्हा मी त्यांना बोलाविले की, (त्यांनी तुझ्याकडे वळावे) व तू त्यांना क्षमा करावी. पण त्यांनी प्रत्येक वेळेस आपली बोटे आपल्या कानात घातली आणि आपल्या वस्त्रांनी स्वत:ला झाकून घेतले. आणि त्यांनी हट्टीपणा व मगरुरीचे प्रदर्शन केले. 8 मग मी त्यांना जाहीररित्याही (सन्मार्गाकडे) येण्याचे आवाहन केले. 9 आणि त्यांना सार्वजनिक पातळीवर आणि खासगीत वैयक्तिक पातळीवर (सर्वप्रकारे) समजावून सांगितले.'
10 मी (त्यांना) म्हटले, 'आपल्या पालनकर्त्याकडे क्षमायाचना करा, खरोखर, तो अत्यंत क्षमाशील आहे. 11 तो तुमच्यासाठी आकाशातून भरपूर पर्जन्यवृष्टी करेल. 12 आणि तुमच्या संपत्ती व संतती मध्ये वाढ करेल. आणि तुमच्यासाठी बागा फुलवेल व नद्या प्रवाहित करेल. 13 तुम्हाला झाले तरी काय की, तुम्ही अल्लाहला सर्वोच्च आदरणीय समजत नाही? 14 वास्तविक पाहता, त्यानेच तुम्हाला विविध अवस्थांमधून नेऊन, निर्माण केलेले आहे. 15 तुम्ही कधी (चिंतनपूर्वक) अवलोकन केले नाही का की, अल्लाहने एकावर एक सात आकाश कशाप्रकारे पूर्ण संतुलनासह निर्माण केलेले आहेत? 16 आणि (आकाशात) चंद्राला (प्रतिबिंबित) प्रकाश देणारा आणि सूर्याला देदीप्यमान दीपक बनविले आहे. 17 आणि अल्लाहने कशाप्रकारे तुम्हाला पृथ्वीतून उपजविले आणि (वनस्पतीप्रमाणे) वाढीस लावले.' 18 'आणि नंतर (मृत्यूद्वारे) पुन्हा तो

त्याच मातीत परत नेईल. आणि मग पुन्हा तुमचे पुनरुत्थान करेल. 19 (पाहा!) अल्लाहने तुमच्यासाठी पृथ्वीला कशाप्रकारे विस्तीर्ण बनवले आहे. 20 यासाठी की, तुम्हाला तिच्या खुल्या मार्गांवर संचार करता यावा, (म्हणजे अशी तिची रचना केली).'

21 नूहने पुढे म्हटले, 'हे प्रभू! त्यांनी माझ्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून, अशा माणसाचे अनुसरण केले, ज्याच्या संपत्तीने व संततीने केवळ त्याच्या विनाशात भर घातली.'

22 आणि त्यांनी माझ्याशी कटकारस्थानांचा (दीर्घ) खेळ खेळला. 23 आणि ते (आपल्या अनुयायांना) म्हणाले, 'तुम्ही आपल्या उपास्यांचा कधीही त्याग करू नका, ना *वद्दचा*, ना *सुवाचा* त्याग करा. तसेच ना *यागूस*, ना *याऊक*, ना *नस्रचा* त्याग करा.' 24 'आणि त्यांनी अनेकांना बहकावून सोडले. म्हणून (हे प्रभू!) तू आता या दुराचाऱ्यांच्या मार्गभ्रष्टतेत आणखी वाढ कर.' 25 (परिणामी) त्यांच्या दुष्कृत्यांमुळे त्यांना बुडवून टाकण्यात आले. आणि त्यानंतर त्यांना नरकाच्या आगीत दाखल केले गेले. अशाप्रकारे त्यांना अल्लाहपासून वाचविणारा कोणीही साहाय्यकर्ता लाभला नाही.

26 नूहने (अल्लाहकडे) प्रार्थना केली, 'हे प्रभू! या सत्य नाकारणाऱ्या श्रद्धाहीनांपैकी एकालाही भूतलावर (जिवंत) सोडू नकोस. 27 तू जर त्यांना सोडून दिलेस, तर ते तुझ्या भक्तांना बहकाविण्याचे (पाप) सुरूच ठेवतील. आणि त्यांच्यापोटी जो जन्माला येईल, तो पापी व कृतघ्नच असेल. 28 हे प्रभू! मला व माझ्या आईवडिलांना क्षमा कर आणि जो कोणी सच्चा श्रद्धावंत बनून, माझ्या घरात प्रवेश करेल, त्यालाही तू क्षमा कर. तसेच सर्व श्रद्धावंत पुरुषांना व श्रद्धावंत स्त्रियांना क्षमा कर. आणि दुराचाऱ्यांच्या अन्य कशात नव्हे, तर केवळ विनाशात भर घाल.'

# सूरह–७२. अल–जिन्न

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 (पैगंबर!) लोकांना सांगा, 'माझ्याकडे असा संदेश प्रकट करण्यात आला आहे की, जिन्नच्या एका समूहाने या कुराणास ऐकले, तेव्हा ते आपल्या (साथीदारांना) म्हणाले, ''आम्ही (अगदी) भारावून टाकणारे असे कुराण ऐकले आहे. 2 जो सन्मार्ग दाखवणारा आहे, आणि म्हणून आम्ही त्यावर श्रद्धा धारण केली, आणि आम्ही कोणालाही आमच्या पालनकर्त्याचे समकक्ष ठरविणार नाही. 3 आमच्या पालनकर्त्याची महिमा फार मोठी आहे. त्याने स्वत: साठी ना पत्नी बनविली, ना पुत्र. 4 आमच्यातील मूर्ख अल्लाहविषयी काही असत्य व निराधार विधाने करीत असत. 5 आम्हाला तर वाटले होते, माणूस व जिन्न अल्लाहविषयी खोट्या गोष्टी कधीही उच्चारणार नाहीत. 6 माणसांमध्ये काही असे होते, जे भूतकाळात जिन्नपैकी काहींचा आश्रय मागायचे, असे करून त्यांनी केवळ त्या जिन्नांच्या गर्वात वाढ केली होती. 7 आणि जसे तुम्हाला वाटत होते, तसेच त्यांनाही वाटत होते की, अल्लाहने कधीही कोणालाही पैगंबर बनवून पाठविलेले नाही (ना पुढे पाठवेल.)

8 आम्ही आकाशाकडे पोहोचण्याचा प्रयत्न केला. पण आम्हाला आढळले की, ते शक्तिशाली रखवालदार आणि उल्का यांच्यासह (तिकडे पोहोचण्याचा प्रयत्न करणाऱ्यास पिटाळून लावण्यासाठी) सज्ज आहेत. 9 आणि आम्ही पूर्वी आकाशातील काही स्थानांवर (परलोकाच्या वार्ता) ऐकण्याच्या उद्देशाने बसायचो, पण आता जो कोणी काही ऐकण्याचे प्रयत्न करतो, तर त्याला पिटाळून लावण्यासाठी आगीचा गोळा तयार असतो. 10 आम्ही नाही सांगू शकत की, (त्या व्यवस्थेद्वारे) भूतलावर राहणाऱ्या लोकांचे काही वाईट इच्छिले गेले की, त्यांच्या पालनकर्त्याने त्यांचे काही भले इच्छिलेले आहे. 11 आमच्यात काही

सदाचारी आहेत, तर काही (सदाचारी) नाहीत. आणि आमच्यात भिन्न–भिन्न
मार्गांचा अवलंब करणारे आहेत. 12 आणि आम्हाला हे कळून चुकलेले आहे
की, आम्ही पृथ्वीवर अल्लाहच्या योजनेला अयशस्वी करू शकत नाही, ना
त्याच्यापासून पळून जाऊन त्याच्या योजनेला विफल करू शकतो. 13 आणि
जेव्हा आम्ही मार्गदर्शनाचे बोल ऐकले, तेव्हा (लगेच) त्यावर विश्वास ठेवणारे
बनलोय. जो कोणी आपल्या पालनकर्त्यावर विश्वास ठेवून (जीवन व्यतीत
करेल), तर (यानंतरच्या जीवनात) कसल्याही नुकसानाच्या, ना अन्यायाच्या
भयाने तो ग्रस्त होईल. 14 आणि आमच्यापैकी काही (अल्लाहचे) आज्ञापालन
करणारे आहेत आणि काही वाट चुकलेले आहेत. तर ज्यांनी आज्ञापालन केले.
तेच सन्मार्गावर मार्गस्थ झाले. 15 पण जे वाट चुकलेले आहेत तेच नरकाच्या
आगीचे इंधन बनतील.'' '

16 (पैगंबर! लोकांना सांगा,) 'माझ्याकडे असा संदेश आला आहे की,
जर त्यांनी सन्मार्ग अवलंबिला असता, तर आम्ही त्यांच्यावर भरपूर पर्जन्यवृष्टी
(म्हणजेच कृपाप्रसादांचा वर्षाव) अवश्य केला असता.' 17 ते यासाठी की,
त्याद्वारे आम्हाला त्यांची परीक्षा पाहता यावी. आणि जो कोणी आपल्या
पालनकर्त्याच्या स्मरणाकडे पाठ फिरवेल, तर तो त्यास कठोर शिक्षा करेल.

18 आणि (लक्षात ठेवा) मशीदी केवळ अल्लाहची उपासना करण्याची
ठिकाणे आहेत. म्हणून तुम्ही अल्लाहसोबत इतर कोणाचाही धावा करू नका
(म्हणजे केवळ अल्लाहचाच धावा करा.) 19 आणि (एकदा असे घडले) की,
त्याचा सेवक (म्हणजे पैगंबर मुहम्मद) त्याची प्रार्थना करण्यासाठी उभा राहतो,
तेव्हा (सत्य नाकारणारे) तिथे येऊन गर्दी करतात आणि त्याचे श्वास गुदमरवून
टाकणारे कृत्य करतात. 20 त्यांना सांगा, 'मी केवळ माझ्या पालनकर्त्याचा
धावा करतो, आणि कोणालाही त्याचा भागीदार ठरवीत नाही.' 21 (पैगंबर!)
सांगा, 'मला कोणत्याही प्रकारे तुमचे भले–वाईट करण्याचा अधिकार नाही.'

22 सांगा, 'अल्लाहच्या (कोपा)पासून मला कोणीही वाचवू शकत नाही. ना त्याच्याव्यतिरिक्त इतर कुठे मला आश्रयस्थान मिळू शकते. 23 अल्लाहकडून जे संदेश मला प्राप्त होतात, ते (लोकांपर्यंत) पोहोचविणे एवढेच माझे कर्तव्य आहे.' आणि जो कोणी अल्लाह व त्याच्या पैगंबराची अवज्ञा करेल त्याच्यासाठी नरकाची आग अटळ आहे. जिथे असे लोक कायम वास्तव्य करतील.

24 ज्या गोष्टीचे (सध्या) त्यांना वचन दिले जात आहे, जेव्हा तिला ते आपल्यासमोर पाहतील, तेव्हा त्यांना कळून चुकेल की, कोणाचे साहाय्यकर्ते दुर्बल आहेत. आणि कोणाची संख्या अल्प आहे. 25 त्यांना सांगा, 'ज्या गोष्टीचे तुम्हाला वचन दिले जात आहे, ती गोष्ट निकट आहे की, माझ्या पालनकर्त्याने तिच्या मुदतीत दीर्घ वाढ केलेली आहे, मला ते माहीत नाही.' 26 जिथे कोणाचीच बुद्धी पोचत नाही त्या गोष्टी जाणणारा केवळ तोच आहे, त्या गोष्टी तो कोणावरही उघड करीत नसतो. 27 यास अपवाद फक्त त्या पैगंबराचा असतो ज्यास त्याने नियुक्त केलेले असते. आणि त्याच्या सुरक्षेसाठी (स्वर्गदूतांपैकी) रक्षक त्याच्या पुढे व मागे चालायला लावतो. 28 ते यासाठी की, हे स्पष्ट होऊन जावे की, (पैगंबरांनी) आपल्या पालनकर्त्याचे संदेश (लोकांपर्यंत) पोहोचिले आहेत. आणि त्यांच्याकडे जे-जे आहे, त्या सर्वांना अल्लाहने वेढून ठेवलेले आहे. आणि जे-जे अस्तित्वात आहे, त्यांची तो गणना करून ठेवत असतो.

# सूरह-७३. अल-मुज़्ज़म्मिल

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 स्वत:वर चादर पांघरून असलेल्या (हे पैगंबरा!) 2 रात्रीच्या समयी (नमाज़ामध्ये अल्लाहसमोर) उभे राहा, रात्रीचा काही भाग. 3 (म्हणजे) रात्रीचा अर्धा भाग किंवा त्यापेक्षा काही कमी. 4 किंवा त्यापेक्षा थोडासा अधिक.

कुराणाचे पठण करताना, सावकाश पण विचारपूर्वक (पठण) करा. [5] आम्ही तुमच्यावर (आमचे संदेश पोचविण्याचे) फार मोठे दायित्व सोपवीत आहोत (तर त्यासाठी तुम्ही तयार असा.) [6] निश्चितच, रात्रीच्या समयी (प्रार्थनेसाठी) उठणे कठीण (असले तरी) स्वत:च्या मनावर नियंत्रण प्राप्त करण्यासाठी एक उत्तम उपाय आहे. आणि तेव्हा (प्रार्थनाही) मनापासून (माणूस) करू शकतो.

[7] कारण दिवसा तुम्हाला (संदेश पोचविण्याच्या जबाबदारी संबंधाने) बरीच कामे असतात. [8] (दिवस असो वा रात्र) आपल्या पालनकर्त्याच्या नावाचे (प्रत्येक प्रसंगी) स्मरण करीत राहा आणि संपूर्ण निष्ठेने त्याच्याप्रति समर्पित असा. [9] तो पूर्व आणि पश्चिम यांचा (म्हणजे संपूर्ण जगाचा) मालक आहे. त्याच्याशिवाय दुसरा कोणीच उपासनेयोग्य नाही. म्हणून त्यालाच तुम्ही आपला सांभाळकर्ता बनवा. [10] आणि लोक जे काही म्हणतात, त्याबद्दल सहनशीलता बाळगा आणि सभ्यपणे त्यांच्याकडे दुर्लक्ष करा. [11] आणि सुख-समृद्धी लाभलेल्या, सत्य नाकारणाऱ्या लोकांना माझ्यावर सोडा (मी त्यांना हाताळेन), (पण) त्यांना काही काळ उसंत द्या. [12] (अशांसाठी) आमच्याकडे अवजड बेड्या व धगधगती आग आहे. [13] आणि घशात अडकेल असे भोजन आहे आणि दु:खदायी शिक्षा आहे. [14] ज्या दिवशी जमीन व पर्वत कंप पावतील, आणि पर्वत वाळूच्या विखुरणाऱ्या ढिगाऱ्यांप्रमाणे होतील.

[15] (लोकांनो!) आम्ही तुमच्याकडे एका पैगंबराला पाठविले आहे. जो तुमच्यासमोर सत्याची साक्ष देणारा आहे. ज्याप्रमाणे आम्ही फिरऔनकडेही एका पैगंबराला पाठविले होते. [16] पण फिरऔनने पैगंबराचे म्हणणे मान्य केले नाही, परिणामी आम्ही कठोरतापूर्वक त्याच्या मुसक्या आवळल्या. [17] त्याचप्रमाणे जर तुम्हीही सत्य नाकाराल, तर त्या दिवसाच्या शिक्षेपासून तुम्ही स्वत:ला कसे वाचवाल? ज्या दिवसाच्या (दहशतीने) मुलेही वृद्ध होऊन जातील. [18] ज्या दिवशी आकाश फाटेल, कारण अल्लाहचे (पुनरुत्थानाचे) वचन पूर्ण होणार. [19]

(हे कुराण) एक उपदेशग्रंथ आहे, तेव्हा हवे त्याने आपल्या पालनकर्त्याचा मार्ग निवडावा. [20] (पैगंबर!) तुमच्या पालनकर्त्याला चांगले ठाऊक आहे की, तुम्ही व तुमचे अनुसरण करणारे (श्रद्धावंत) त्याच्यासमोर प्रार्थनेत (कधी जवळजवळ) दोन तृतीयांश किंवा एक द्वितीयांश तर कधी एक तृतीयांश रात्र उभे असता. अल्लाह रात्र व दिवसाच्या अवधीचे प्रमाण निश्चित करीत असतो. त्याला माहीत आहे की, तुम्ही वेळेचे प्रमाण निश्चित करू शकत नाही, म्हणून त्याने तुमच्यावर दया केली (आणि वेळेचा निर्बंध ठेवला नाही). तेव्हा तुम्ही तुम्हाला शक्य होईल त्याप्रमाणे (रात्रीच्या प्रार्थनेत) कुराणाचे पठण करा. त्याला माहीत आहे की, तुमच्यात काही आजारी असतात, तर काही अल्लाहच्या कृपेच्या (म्हणजे उपजीविकेच्या) शोधार्थ प्रवासात असतात. आणि काही (वेळप्रसंगी) अल्लाहच्या कार्यासाठी लढत असतात. म्हणून कुराणातील तुम्हाला सहज शक्य होईल तेवढ्या भागाचे पठण करा. तसेच नित्य प्रार्थना करा, दानकार्य करा आणि (ज़कातीशिवाय शक्य असेल, तर) अल्लाहला उदारतापूर्वक कर्ज द्या. जी चांगले कृत्ये तुम्ही स्वत:साठी पुढे पाठवाल, ती तुम्हाला अल्लाहपाशी आढळतील. तर हेच (तुमच्यासाठी) अधिक उत्तम असेल आणि त्यांचा मोबदलाही फार मोठा असेल. आणि अल्लाहकडे क्षमायाचना करा. खरोखर तो फार क्षमाशील व दयाळू आहे.

# सूरह–७४. अल–मुद्दस्सिर

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] स्वत:वर चादर पांघरून असलेल्या (पैगंबरा!) [2] उठ आणि लोकांना
सावध कर. [3] आणि आपल्या पालनकर्त्याचे स्तुतिगान कर. [4] आपली वस्त्रे
स्वच्छ ठेव. [5] आणि सर्व प्रकारच्या अपवित्रतेपासून स्वत:ला दूर ठेव. [6] आणि
परोपकारी कृत्य करून बदल्यात अधिक प्राप्त करण्याची इच्छा बाळगू नका. [7]

(संदेश पोचविताना, जे विघ्न येतील) ते आपल्या पालनकर्त्याखातर सहन कर.

8 मग जेव्हा (पुनरुत्थानाचे) शिंग फुंकण्यात येईल. 9 तो फार कठीण दिवस असेल. 10 सत्य नाकारत राहिलेल्या लोकांसाठी मुळीच सुखकर असणार नाही. 11 त्याच्याबरोबर मला एकटा सोडा, ज्याला मी निर्माण केलेले आहे (त्याला मी पाहून घेईन). 12 आणि त्याला मी विपुल प्रमाणात धनसंपत्ती दिली. 13 आणि त्याच्याबरोबर असणारी मुले. 14 आणि त्याच्यासाठी सर्व प्रकारची साधने उपलब्ध केली. 15 पण तो (माझे आभार मानण्याऐवजी,) मी त्याला आणखी जास्त द्यावे, अशी लालसा बाळगतो. 16 कदापि नाही! तो तर आमच्या संदेशांचा शत्रू आहे. 17 लवकरच मी त्याला अशा पर्वतावर चढायला लावीन, (ज्यावर चढून त्याचे) फार वाईट हाल होतील.

18 त्याने (आमच्या संदेशांना खोटे ठरविण्यासाठी) विचारपूर्वक कट कारस्थाने रचली. 19 त्याचा नाश होवो! त्याने कशी कटकारस्थाने रचली! 20 पुन्हा त्याचा सर्वनाश होवो! त्याने कशा अटकळी बांधल्या! 21 मग त्याने पुन्हा विचार करत (सभोवार) नजर टाकली. 22 मग त्याने आठ्या घातल्या व तोंड वाकडे केले. 23 मग (आमच्या संदेशाकडे) पाठ फिरवली व मगरुरीचे प्रदर्शन केले. 24 आणि म्हणाला, ‘हे अन्य काही नसून प्राचीन काळापासून चालत आलेली एक जादू आहे.’ 25 (आणि पुढे म्हणाला,) ‘हे कुराण अन्य काही नसून केवळ माणसाची रचना आहे.’

26 (अल्लाह म्हणतो) ‘मी त्याला लवकरच नरकात फेकून देईन.’ 27 तुम्हाला काय माहीत, नरक काय चीज आहे? 28 तिची आग ना जिवंत राहू देईल, ना मरू देईल. 29 माणसाची त्वचा भाजून टाकणारी. 30 तिच्यावर एकोणीस रखवालदार नियुक्त आहेत. 31 आणि आम्ही स्वर्गदूतांनाच (म्हणजे angels ना) नरकाच्या आगीवर रक्षक म्हणून नियुक्त केलेले आहे. आणि आम्ही त्यांची संख्या (जाहीर करण्यामागचे) कारण असे आहे की, त्याद्वारे

सत्य नाकारणाऱ्यांची परीक्षा पाहता यावी आणि ग्रंथधारकांची श्रद्धा अधिक दृढ व्हावी. आणि श्रद्धावंतांच्या श्रद्धेत वाढ व्हावी. तसेच आधीचे ग्रंथधारक व (या कुराणावर विश्वास ठेवणारे) श्रद्धावंत यांनी कोणत्याही प्रकारे शंका बाळगू नये. आणि ज्यांच्या मनात विकृती आहे आणि जे सत्य नाकारणारे आहेत, ते म्हणतील, 'असे उदाहरण प्रस्तुत करून (तुमच्या) अल्लाहला काय म्हणायचे आहे?' अशाचप्रकारे अल्लाह इच्छितो त्यास भरकटण्यासाठी सोडून देतो आणि इच्छितो त्यास सन्मार्ग दाखवतो. आणि तुझ्या पालनकर्त्याच्या सेनेला त्याच्याशिवाय दुसरा कोणीच जाणू शकत नाही. आणि हे (कुराण) केवळ मानवजातीच्या उपदेशासाठी आहे.

32 नाही, त्या चंद्राची शपथ! 33 आणि रात्रीची जेव्हा ती सरते. 34 आणि त्या सकाळची जेव्हा ती प्रकाशमान होते. 35 खरोखर, नरकाची आग भयानक गोष्टींपैकी एक आहे. 36 माणसाला भिवविण्यास पुरेशी आहे. 37 तुमच्यापैकी प्रत्येक माणसाला (भय दाखवणारी) जो पुढे जाऊ इच्छितो किंवा मागे राहू इच्छितो. 38 प्रत्येक मनुष्य त्याने जे काही केलेले आहे, त्याच्या बदल्यात गहाण आहे. 39 यास अपवाद फक्त उजव्या बाजूचे (सदाचारी) लोक आहेत. 40 ते स्वर्गाच्या बागांत असतील आणि ते विचारत असतील. 41 अपराध्यांविषयी. 42 'कोणत्या गोष्टीने तुम्हाला नरकाच्या आगीत आणलेले आहे?' 43 ते उत्तर देतील, 'आम्ही नमाज़ाचे पालन करणाऱ्यांपैकी नव्हतो. 44 तसेच आम्ही गरिबांना खाऊ घालत नसत. 45 आणि आम्ही व्यर्थ वादविवाद करणाऱ्यांसोबत, ते करायचो. 46 आणि आम्ही न्यायाच्या दिवसाला नाकारायचो. 47 (असेच आमचे सुरू राहिले) येथपावेतो की, अटळ असलेले मरण आम्हाला आले.' 48 तर कोणतीही मध्यस्थी त्यांच्यासाठी लाभदायी ठरणार नाही.

49 तेव्हा त्यांना झाले तरी काय की, ते सर्व उपदेशांकडे पाठ फिरवीत आहेत. 50 जणू ते भयभीत झालेली गाढवे होत. 51 जी सिंहाला भिऊन पळत

सुटलेली आहेत. [52] किंबहुना, त्यांच्यापैकी प्रत्येकाची अशी इच्छा आहे की, त्याला खुले ग्रंथ दिले जावे. [53] असे कदापि होणार नाही! वस्तुस्थिती ही आहे की, यांना यानंतरच्या जीवनाचे भय नाहीच. [54] निःसंदेह! हा केवळ एक उपदेशग्रंथ आहे.

[55] तेव्हा ज्याची इच्छा असेल, त्याने त्यापासून बोध घ्यावे. [56] पण (सत्य नाकारणारे) यापासून बोध ग्रहण करणार नाहीत, जोपर्यंत त्यांच्याबाबतीत अल्लाह असे इच्छित नाही. तोच यासाठी पात्र आहे की, त्याचे भय बाळगले जावे. आणि लोकांना क्षमा करू शकतो असा तोच आहे.

# सूरह-७५. अल-क़ियामह

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] मी पुनरुत्थानाच्या दिवसाला साक्षी ठेवून सांगतो. [2] तसेच (मानवाचे) मन, जे (वाईट कामांविषयी) त्याला दोष देत असते, त्यास साक्ष ठेवून सांगतो. [3] मानवाला असे वाटते की काय, आम्ही त्याची हाडे पुन्हा एकत्र करून त्याचे (पुनरुत्थान) करू शकत नाही? [4] अर्थातच, आम्हाला त्याच्या बोटांची पेर अन पेर (जशाचे तसे) बसवण्याचे सामर्थ्य प्राप्त आहे. [5] पण माणूस त्याच्यापुढे, जे येणार आहे त्यास नाकारू इच्छितो (म्हणजेच पुनरुत्थानास, कारण त्याला निर्भयपणे दुष्कृत्ये करता यावीत) [6] (चेष्टा करत) तो विचारतो, 'तो पुनरुत्थानाचा दिवस येणार तरी केव्हा?' [7] जेव्हा (दहशतीने) डोळे दिपून जातील. [8] आणि चंद्राला ग्रहण लागेल. [9] जेव्हा सूर्य व चंद्र एकत्र आणले जातील. [10] त्या दिवशी मनुष्य म्हणेल, 'आता कुठे पळून जाऊ?' [11] नाही, (हे मानवा!) तुझ्यासाठी आता कुठेही आश्रय नाही! [12] त्या दिवशी केवळ तुझ्या पालनकर्त्यापाशीच आश्रयस्थान आहे! [13] त्या दिवशी मनुष्यासमोर त्याने जे काही आपल्यापुढे पाठविलेले असेल, आणि जे काही मागे सोडलेले असेल, ते

सर्व उघड केले जाईल. 14 वस्तुस्थिती ही आहे की, मनुष्य स्वत: आपल्याविरुद्ध साक्ष आहे.

15 मग तो कितीका सबबी पुढे ठेवत नाही?

16 (पैगंबर!) तुम्ही (हे कुराण) तुम्हाला लवकर पाठ होऊन जावे म्हणून घाईघाईने आपल्या जिभेला चालना देऊ नका. 17 कारण त्यास (तुमच्या मनात) संकलित करण्याची व पठण करवण्याची जबाबदारी निश्चितपणे आमच्यावर आहे. 18 जेव्हा आम्ही तुम्हाला वाचून ऐकवू, तेव्हा तुम्ही त्याच्या शब्दांचे लक्षपूर्वक अनुसरण करा. 19 त्याचे अर्थ स्पष्ट करणे आमचेच काम आहे.

20 नाही, पण तुमच्यापैकी (अनेकांना) ताबडतोब होणारा फायदाच प्रिय असतो (म्हणजेच याच जगात सर्व काही मिळावे). 21 आणि यानंतरच्या जीवनाकडे दुर्लक्ष करता. 22 काही चेहरे त्या दिवशी प्रफुल्लित असतील. 23 आपल्या पालनकर्त्याकडे पाहत असतील. 24 आणि त्या दिवशी काही चेहऱ्यांवर उदासीनता पसरलेली असेल. 25 या विचारात असतील की, त्यांच्यावर फार मोठे दु:खाचे संकट लवकरच कोसळणार आहे. 26 पण जेव्हा (मरणाऱ्या) माणसाचा (शेवटचा श्वास) कंठाशी येतो. 27 आणि (त्याच्या आसपासचे) लोक म्हणतात, 'कोणी मांत्रिक आहे का, जो त्याला वाचवू शकतो?' 28 आणि त्याला खात्री होते की, हीच या जगाला निरोप देण्याची वेळ आहे. 29 मृत्यू होताना होणाऱ्या तीव्र वेदनेमुळे, एक पाय दुसऱ्या पायावर घासू लागेल. 30 (हे मानवा!) हा दिवस असेल तुझ्या पालनकर्त्याकडे प्रयाण करण्याचा!

31 (जोपर्यंत तो जिवंत होता) ना त्याने सत्याचा स्वीकार केला, ना त्याने नमाज़रूपी प्रार्थना केली. 32 या उलट, त्याने सत्यास खोटे ठरविले आणि त्याकडे पाठ दाखविली. 33 मग तो (उपदेशगृहातून) उठून मोठ्या ऐटीने

आपल्या कुटुंबीयाकडे निघून जायचा. 34 (हे मानवा!) खेद आहे तुझ्याबद्दल,
खेद! 35 पुन्हा तुझ्याविषयी खेद वाटतो, फक्त खेद! 36 मनुष्याला असे वाटते
की काय, त्यास (वाटेल ते करण्यासाठी) असेच सोडून देण्यात येईल? (म्हणजे
त्याच्याशी जाब विचारला जाणार नाही?) 37 प्रथमत: तो गर्भाशयात टाकला
गेलेला वीर्याचा एक बिंदू नव्हता का? 38 वीर्यापासून पुढे तो गुठळी झाला, मग
अल्लाहने त्यास घडविले व पूर्ण संतुलनासह त्याच्या अवयवांची रचना केली. 39
आणि त्याचे दोन प्रकार बनविले, म्हणजे नर व नारी. 40 त्याचा (निर्माता
असलेला अल्लाह) मृताला जिवंत करण्यास समर्थ नसेल का?

# सूरह-७६. अद-दह्र

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 मनुष्यावर एक अशी वेळ आलेली नाही का, जेव्हा तो वर्णन करण्यास
योग्य असा नव्हता? 2 आम्ही मनुष्याला एक मिश्रित अशा वीर्यबिंदूने निर्माण
केले. आणि त्याची परीक्षा पाहण्यासाठी आम्ही त्याला ऐकणारा व पाहणारा
बनविले. 3 आम्हीच त्याला मार्ग दाखवला आहे. आता स्वत:ला कृतज्ञ किंवा
कृतघ्न त्याला सिद्ध करून दाखवायचे आहे. 4 आम्ही सत्य नाकारणाऱ्या कृतघ्न
लोकांसाठी साखळदंड, गळ्यात घालावयाची लोखंडी कडी आणि नरकाची धगधगती
आग तयार ठेवलेली आहे. 5 याउलट सच्चे सदाचरणी लोक असे प्याले पितील,
ज्यात कापूराचा थंडावा जाणवेल. 6 हा एक असा स्रोत आहे, ज्यातून अल्लाहचे भक्त
पितील. आणि हवे तिकडे (त्याच्या शाखा काढून) त्यास प्रवाहित करतील. 7 (खरे
सदाचरणी ते आहेत,) जे आपल्या वचनपूर्तीच्या बाबतीत फार दक्ष असतात. आणि
त्या दिवसाचे भय बाळगतात, ज्याचे संकट सर्वदूर पसरलेले असेल. 8 आणि ते
(केवळ अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी) स्वत: गरजवंत असूनही (इतर) गरजवंत, अनाथ
व कैदी यांना खाऊ घालतात. 9 (म्हणतात) ‘आम्ही केवळ अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी

तुम्हाला खाऊ घालत असतो. आम्हाला तुमच्याकडून ना काही मोबदला हवा आहे, ना तुमचे आभार. 10 त्या भयानक दिवशी आमच्या पालनकर्त्याकडून होणाऱ्या निर्णयाचे आम्हाला भय वाटते.' 11 आणि म्हणून अल्लाह त्या दिवसाच्या संकटापासून त्यांचे रक्षण करेल. आणि त्यांना चैतन्य व सुख प्रदान करेल. 12 आणि त्यांच्या सहनशीलतेच्या मोबदल्यात त्यांना स्वर्ग व रेशमी कपडे प्रदान करेल. 13 ते तिथे भव्य आसनांवर लोड लावून पहुडलेले असतील. तिथे त्यांना ना उन्हाळ्याचा त्रास होईल, ना हिवाळ्याचा. 14 स्वर्गातील वृक्षांच्या आनंददायी सावल्या त्यांच्यावर पसरलेल्या असतील आणि फळांचे गुच्छ हाताला सहज येतील (अशा पद्धतीने तिथे उपलब्ध असतील). 15 (ईश्वरीय प्रसादांनी भरलेली) चांदीची पात्रे व काचेचे प्याले त्यांच्यादरम्यान फिरविले जातील. 16 काचेसारखे दिसणारे प्याले, चांदीचेच असतील. योग्य प्रमाणात ते भरलेले असतील.

17 (याशिवाय) त्यांना तिथे सुंठीचे फ्लेव्हर असलेले (मद्याचे) प्याले पिण्यास देण्यात येतील. 18 स्वर्गात (अशा पेयाचा) एक वाहता झरा आहे, ज्याचे नाव सल्सबील आहे. 19 आणि त्यांच्या सेवेत अशी (सुंदर) मुले नेहमी तत्पर असतील, जी नेहमी तशीच मुले राहतील. तुम्ही त्यांना पाहाल, तर तुम्हाला वाटेल की, ते सर्वत्र विखुरलेले जणू मोतीच आहेत. 20 स्वर्गात तुम्ही जिथे-कुठे पाहाल सर्वत्र तुम्हाला सुख समृद्धी आणि महान राजेशाही थाट दिसून येईल. 21 स्वर्गनिवासी तिथे तलम हिरव्या रेशमाची कपडे परिधान करतील आणि कशिदा काढलेली वस्त्रे. आणि त्यांना चांदीची कडी घालण्यात येतील आणि त्यांचा पालनकर्ता त्यांना शुद्ध पेय पिण्यासाठी देईल. 22 (त्यांना सांगितले जाईल) 'हा तुमचा मोबदला आहे. आणि तुमच्या प्रयत्नांना (अल्लाहची) स्वीकृती मिळाली आहे.'

23 (पैगंबर!) आम्ही (हे) कुराण तुमच्याकडे थोडे-थोडे करून प्रकट केलेले

आहे. [24] म्हणून तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाची संयमपूर्वक प्रतीक्षा करा. आणि त्यांच्यापैकी कोणाचेही म्हणणे मान्य करू नका, जो पापी व कृतघ्न आहे. [25] आणि सकाळी व संध्याकाळी (वेगवेगळ्या प्रसंगी) आपल्या पालनकर्त्याचे स्तुतिगान करा. [26] आणि रात्रीच्या समयीदेखील त्याच्यासमोर (नमाज़ात) नतमस्तक व्हा. आणि रात्रीच्या एका मोठ्या भागात त्याचे स्तुतिगान करा. [27] हे लोक (जे अल्लाहविषयी गाफील आहेत), ताबडतोब प्राप्त होणाऱ्या फायद्यांची अभिलाषा बाळगतात. आणि (त्यांच्याशी अटळरित्या सामना होणाऱ्या) भयंकर दिवसाकडे, ते दुर्लक्ष करून आहेत. [28] आम्हीच त्यांना निर्माण केलेले आहे. आणि त्यांच्या अवयवांची सुदृढ अशी रचना आम्हीच केलेली आहे. आणि आम्ही इच्छिले तर त्यांच्याजागी त्यांच्याचसारख्या इतरांना आणू शकतो. [29] हा एक उपदेशग्रंथ आहे. तेव्हा ज्याची इच्छा असेल, त्याने आपल्या पालनकर्त्याकडे जाणाऱ्या मार्गाचा अवलंब करावा. [30] पण जोपर्यंत अल्लाह (तुम्हाला तो मार्ग दाखवू) इच्छित नाही, तोपर्यंत तुम्हीही तशी इच्छा करू शकत नाही. अल्लाह सर्व काही जाणणारा आहे, बुद्धिमान आहे. [31] तो इच्छितो त्यास आपल्या कृपाछत्रात प्रवेश देतो. आणि अत्याचारी लोकांसाठी त्याने कठोर शिक्षा तयार ठेवलेली आहे.

# सूरह–७७. अल–मुरसलात

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] त्या वाऱ्यांची शपथ जे एका मागून एक पाठविले जातात. [2] आणि मग ते वादळाची गती धारण करतात. [3] आणि जे (पाऊस वर्षिणाऱ्या) ढगांना दूरवर पसरवितात. [4] मग त्यांना एकमेकांपासून वेगळे करतात. [5] (त्यांची) शपथ जे आपल्याबरोबर (अल्लाहकडून) उपदेश (ग्रंथ) घेऊन येतात. [6] काहींसाठी क्षमा तर काहींसाठी सावधानतेचा इशारा. [7] ज्या गोष्टीचे तुम्हाला वचन दिले जात आहे, ती निश्चितपणे घटित होणार आहे.

8 (ती घटना तेव्हा घटित होईल) जेव्हा तारे निस्तेज होऊन जातील. 9
आणि जेव्हा आकाश फाटून जाईल. 10 आणि जेव्हा पर्वत धुळीप्रमाणे विखुरले
जातील. 11 आणि जेव्हा निर्धारित समयी पैगंबरांना एकत्र आणले जाईल. 12 या
सर्व गोष्टी कोणत्या दिवसासाठी टाळल्या जात होत्या. 13 न्यायाच्या दिवसासाठी.
14 आणि तुम्हाला काय माहीत की, न्यायाचा दिवस म्हणजे आहे तरी काय?
15 सत्याला असत्य ठरविणारे, नाश पावणार आहेत, त्या दिवशी. 16 आम्ही
आधीच्या (अपराध्यांना) नष्ट केले नाही का? 17 आणि आम्ही त्यांच्या
नंतरच्या (अपराध्यांनाही) त्यांच्या पाठोपाठ (विनाशाच्या खाईत) जायला लावू.
18 कारण आम्ही अपराध्यांसोबत असाच व्यवहार करीत असतो. 19 सत्याला
असत्य ठरविणारे नाश पावणार आहेत, त्या दिवशी.

20 (लोकांनो!) आम्ही तुम्हास एका तुच्छ वीर्यबिंदूपासून निर्माण केलेले
नाही का? 21 मग त्यास एका सुरक्षित ठिकाणी ठेवले, (म्हणजेच गर्भाशयात).
22 एका निर्धारित मुदतीपर्यंत. 23 अशाप्रकारे आम्ही (गर्भाच्या) वाढीचे टप्पे
निश्चित केले. होय! आम्ही किती कुशल रचनाकार आहोत! 24 सत्याला
असत्य ठरविणारे नाश पावणार आहेत, त्या (न्यायाच्या) दिवशी 25 आम्ही
पृथ्वीला (भरपूर गोष्टी) स्वत:मध्ये सामावून ठेवणारी बनविलेले नाही का? 26
जीवितांसाठी आणि मृतांसाठी. 27 आणि तिच्यावर आम्ही उंच पर्वत उभे केले.
आणि तुम्हाला पिण्यासाठी गोड पाण्याची व्यवस्था केली. 28 सत्याला असत्य
ठरविण्याचे (कुकृत्य) केलेले लोक नाश पावणार आहेत, त्या दिवशी.

29 (त्या दिवशी त्यांना सांगितले जाईल), ‘चला आता त्या गोष्टीकडे
(म्हणजेच नरकाच्या आगीकडे) जिला तुम्ही खोटे ठरवीत असत. 30 चला त्या
(आगीच्या) सावलीकडे जिचे तीन भाग आहेत (तीन कॉलम आहेत).’ 31 जी
ना छाया देणारी आहे, ना ज्वालेपासून रक्षण करणारी आहे. 32 त्या सावलीतून
महालाएवढ्या उंचच्या उंच ठिणग्या फेकल्या जातील. 33 (त्या उसळणाऱ्या

ठिणग्या अशा दिसतील) जणू पिवळ्या उंटांचा (कळप) आहे. 34 सत्याला असत्य ठरविणारे नाश पावणार आहेत, त्या दिवशी. 35 हा असा दिवस आहे जेव्हा लोक अवाक झालेले असतील. 36 आणि त्यांना सबबी सादर करण्याची परवानगी दिली जाणार नाही. 37 सत्याला असत्य ठरवीत राहिलेले लोक, (न्यायाच्या) दिवशी नाश पावणार आहेत. 38 (तेव्हा सांगितले जाईल) हा फैसल्याचा दिवस होय. आम्ही तुम्हाला व तुमच्या पूर्वीच्या सर्व लोकांना एकत्रित केलेले आहे. 39 जर तुमच्याकडे काही युक्ती असेल तर ती माझ्याविरुद्ध (आता) लढवा. 40 नाश पावणार आहेत, सत्य नाकारणारे, त्या दिवशी.

41 (याउलट) (अल्लाहकडे जाब देण्याची) जाण ठेवून होते, ते लोक (आनंददायी) सावल्या व पाण्याचे (नयनरम्य) झरे यांच्या सान्निध्यात असतील. 42 त्यांना हवी असतील, ती फळे (उपलब्ध असतील). 43 (सांगितले जाईल,) 'खा व प्या व मजा करा, त्या कृत्यांच्या बक्षिसाप्रीत्यर्थ, जी तुम्ही करीत असत. 44 आम्ही सदाचरणी लोकांना अशाप्रकारे बक्षीस देत असतो.' 45 सत्य नाकारणारे नाश पावणार आहेत, त्या दिवशी. 46 (पापी लोकांनो!) खा आणि चार दिवस मौज करून घ्या (पृथ्वीतलावर). निःसंदेह! तुम्ही पापी आहात! 47 पण सत्य नाकारण्यावर आग्रही राहिलेले लोक नाश पावणार, त्या दिवशी. 48 जेव्हा त्यांना सांगितले जाते की, (अल्लाहसमोर) नमन करा, तर ते तसे करीत नाहीत. 49 सत्य नाकारण्यावर आग्रही राहिलेले लोक नाश पावणार आहेत, त्या दिवशी. 50 (अल्लाहचा सुरक्षित ग्रंथ असलेल्या) या कुराणाशिवाय ते अन्य कशावर विश्वास ठेवणारे बनतील?

# सूरह–७८. अन–नबा

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 लोक आपसात कोणत्या गोष्टीविषयी विचारणा करीत आहेत? 2

(पुनरुत्थानाच्या) त्या महाभयानक गोष्टीविषयी? 3 ज्याबद्दल ते मतभेद बाळगून
आहेत. 4 पण त्यांना लवकरच कळून येईल. 5 होय! त्यांना लवकरच कळून
चुकेल. 6 आम्ही पृथ्वीला (मानवजातीसाठी) विश्रांतीचे स्थान नाही बनविले?
7 आणि पर्वतांना आधारस्तंभाप्रमाणे (नाही बनविले का)? 8 आणि आम्ही
तुम्हाला जोड्या-जोड्यांच्या स्वरूपात निर्माण केले आहे. 9 आणि झोपेला
तुमचा थकवा दूर करण्याचे साधन बनवले. 10 आणि रात्रीला आम्ही आवरण
बनविले. 11 आणि दिवसाला जीवनप्रवास पुढे सुरू ठेवण्याचे माध्यम बनविले.
12 आणि आम्ही तुमच्यावर सात भक्कम आकाश निर्माण केले. 13 आणि
(आकाशात सूर्यरूपी) एक दीपक स्थापित केले. 14 आणि आम्ही वारे हाकून
नेणाऱ्या जड ढगांतून विपुल प्रमाणात पाण्याचा वर्षाव करतो. 15 त्याद्वारे धान्य
व वनस्पती आम्ही निर्माण करतो. 16 आणि घनदाट बागबगीचेही. 17 न्यायाच्या
दिवसाची वेळ ठरलेली आहे, यात मुळीच शंका नाही.

18 ज्या दिवशी शिंग फुंकले जाईल आणि तुमचे ताफेच ताफे येऊ लागतील.
19 आणि आकाश उघडण्यात येईल, त्यामध्ये दरवाजेच दरवाजे होऊन जातील.
20 आणि पर्वतांना चालविले जाईल, तर ते असे होऊन जातील की, जणू काही
ते मृगजळच होते. 21 नि:संदेह, (सत्य नाकारणाऱ्या लोकांसाठी) नरक टपून
बसलेला आहे. 22 विद्रोही लोकांचे ते ठिकाण आहे. 23 त्यात ते युगानुयुगे
पडून राहतील. 24 तिथे त्यांना ना थंडाव्याचा स्पर्श होईल, ना (तहान भागवणारे)
काही प्यायला मिळेल. 25 आणि मिळेल तर केवळ उकळते पाणी आणि पू. 26
(असा असेल) त्यांच्या दुष्कृत्यांचा योग्य तोच मोबदला. 27 कारण ते
(मृत्यूनंतरच्या जगात) 'हिशेब घेतला जाणार' अशी जाण बाळगून नव्हते. 28
आणि त्यांनी आमच्या प्रत्येक संदेशाला जाणूनबुजून खोटे ठरविले. 29 पण
आम्ही (त्यांनी केलेले) प्रत्येक (कृत्य) रेकॉर्ड करून ठेवलेले आहे. 30
(आणि आम्ही त्यांना सांगू,) '(आपल्या दुष्कृत्यांची) फळे आता चाखा,

कारण आम्ही तुमच्या शिक्षेत केवळ वाढ आणि वाढ करीत जाऊ.'

[31] (पण) अल्लाहची जाण ठेवून असलेल्या लोकांसाठी यश नक्की आहे. [32] भव्य बागा आणि द्राक्षांच्या वेली. [33] आणि समवयस्क नवयुवती. [34] आणि काठोकाठ भरलेले प्याले. [35] तिथे ते व्यर्थ व खोट्या गोष्टी कधीही ऐकणार नाहीत. [36] हे असेल तुमच्या पालनकर्त्याकडून (त्यांच्या कृत्यांनुसार) मिळालेले बक्षीस. [37] त्या कृपावंत अल्लाहकडून, जो आकाश व पृथ्वी आणि त्या दोहोंच्यामध्ये जे-जे आहे, त्या सर्वांचा पालनकर्ता आहे. त्याच्यासमोर (काही) बोलण्याची कोणीही हिंमत करू शकत नाही. [38] ज्या दिवशी (म्हणजेच न्यायाच्या दिवशी) जिब्रील व इतर स्वर्गदूत पंक्तिबद्ध (त्याच्यासमोर) उभे राहतील. कोणीही काही बोलणार नाही. पण तो बोलेल, ज्याला कृपावंत अल्लाह बोलण्याची परवानगी देईल. आणि तो योग्य तेच बोलेल. [39] तो दिवस येणे अटळ आहे. तेव्हा ज्याला आपल्या पालनकर्त्याकडे जाणाऱ्या मार्गाचा अवलंब करायचा आहे, त्याने तो करावा. [40] आम्ही तुम्हाला अगदी जवळ असलेल्या शिक्षेपासून सावध केलेले आहे. ज्या दिवशी मनुष्य त्याच्या हातांनी जी-जी कृत्ये पुढे पाठवलेली असतील, ती स्पष्टपणे पाहून घेईल. आणि तेव्हा सत्य नाकारणारा म्हणेल, 'मी जर माती असतो, तर (किती बरे झाले असते)!'

# सूरह-७९. अन-नाज़िआत

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] त्या (वाऱ्यांची) शपथ जे प्रचंड शक्तीने सर्व काही उपटून काढतात. [2] आणि त्या वाऱ्यांची जे हळुवार वाहतात. [3] आणि त्या (ढगांची,) जे वेगाने तरंगत असतात. [4] आणि त्यांची, जे एकमेकांच्या पुढे जातात. [5] त्यांची, जे (निर्मात्याच्या) आदेशांना अमलात आणतात. [6] ज्या दिवशी भयानक भूकंपाने (संपूर्ण पृथ्वी) हादरून जाईल. [7] आणि त्या पाठोपाठ (आणखी) हादरे बसतील.

8 त्या दिवशी (लोकांची) हृदये (त्या दहशतीमुळे वेगाने) धडधडू लागतील. 9
त्यांच्या नजरा खाली खिळलेल्या असतील. 10 (पुनरुत्थानास नाकारणारे)
म्हणतात, '(मृत्यूनंतर) आम्हाला (जिवंत करून) पुन्हा पूर्वीच्या स्थितीत
आणले जाणार का? 11 जेव्हा आम्ही जीर्ण हाडे बनलेले असू?' 12 ते
म्हणतात, 'असे झाले, तर ते परतणे, नुकसानाची गोष्ट असेल.' 13 (पण जेव्हा
ती शेवटची घटका त्यांच्यावर येईल,) एका जोराची हाकाटी असेल. 14 आणि
लगेच, ते (सर्व जीर्ण हाडे झालेले) मैदानात हजर होतील!

15 तुम्हाला मूसाचा वृत्तांत पोचला का? 16 जेव्हा त्याच्या पालनकर्त्याने
तुवाच्या पवित्र खोऱ्यापाशी त्यास हाक दिली होती. 17 (आणि म्हटले),
'फिरऔनकडे जा, तो सर्व मर्यादा ओलांडून विद्रोही बनलेला आहे.' 18 आणि
त्याला सांगा, 'तू (मार्गभ्रष्टतेच्या घाणीपासून) स्वत:ला शुचिर्भूत करू इच्छितोस
का? 19 तू ईशभिरू बनावेस म्हणून मी तुला तुझ्या पालनकर्त्याचा मार्ग दाखवू
का?' 20 त्यानंतर मूसाने त्याला (अल्लाहच्या सामर्थ्याची एक) मोठी खूण
दाखविली. 21 पण त्याने खोटे ठरविले व मानण्यास नकार दिला. 22 (मूसाच्या
विरुद्ध) उपाय योजण्यासाठी तो बेमुरवतपणे तिथून निघून गेला. 23 आणि त्याने
आपल्या सर्व लोकांना एकत्र बोलाविले. 24 आणि म्हणाला, 'मीच तुमचा
सर्वश्रेष्ठ भाग्यविधाता आहे.' 25 पण अल्लाहने त्याच्या मुसक्या आवळल्या
(आणि विद्रोही माणसाचा) या जगात व यानंतरच्या जगात (कसा शेवट होतो
याचा इशारा देणारे उदाहरण त्याला बनविले). 26 नि:संदेह, यात प्रत्येक
ईशभिरू माणसासाठी धडा आहे.

27 (लोकांनो!) तुम्हाला निर्माण करणे अधिक कठीण आहे की, त्या
आकाशाला निर्माण करणे (अधिक कठीण आहे), ज्याला अल्लाहने निर्माण
केले आहे. 28 त्याचे (विशाल) घुमट उंच स्थापित केले आणि त्यास दोषरहित
बनवले. 29 आणि त्याने त्याची रात्र काळोखी बनविली व त्यातून प्रकाशमान

दिवस प्रकट केला. 30 आणि त्यानंतर पृथ्वीला विस्तीर्ण केले. 31 आणि तिच्यातून तिचे पाणी काढले व चारा निर्माण केला. 32 आणि पर्वतांना तिच्यावर भक्कमपणे स्थापित केले.

33 हे सर्व तुमच्या आणि तुमच्या गुराढोरांसाठी उपजीविकेचे साधन आहे. 34 आणि जेव्हा ते भयंकर संकट येईल. 35 त्या दिवशी माणसाने (जगात) जे-जे केले आहे, ते त्याला आठवेल. 36 आणि पाहणाऱ्यासाठी नरक प्रकट केला जाईल. 37 ज्याने उद्दामपणे वर्तन केलेले असेल. 38 आणि केवळ जगातील जीवनास प्राधान्य दिलेले असेल. 39 तर नरक अशाच माणसाचे अटळ ठिकाण आहे. 40 पण जो आपल्या पालनकर्त्यासमोर (हजर होऊन जाब द्यावा लागणार) अशी जाण ठेवून होता. आणि ज्याने वाईट मनोकामनाचे अनुसरण करण्यापासून स्वत:चे रक्षण केले असेल. 41 तर स्वर्ग त्याचे ठिकाण असेल. 42 (पैगंबर!) ते त्या शेवटच्या घटकेविषयी विचारतात की, ती केव्हा येणार आहे? 43 पण तिच्याविषयी तुम्ही कसे सांगू शकणार? 44 (कारण) ती केव्हा येईल, हे केवळ तुझ्या पालनकर्त्यालाच माहीत आहे. 45 तुमचे काम त्यांना केवळ सावध करणे एवढेच आहे, जे तिचे भय बाळगतात. 46 त्या दिवशी जेव्हा ते ती पाहतील, तेव्हा त्यांना वाटेल की, ते केवळ एक संध्याकाळ किंवा एक सकाळ यापेक्षा जास्त (मृत्यूपूर्वीच्या) जगात राहिले नाहीत.

# सूरह-८०. अबस

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 (पैगंबराने) एवढ्यावरून कपाळाला आठ्या घातल्या व तोंड फिरविले. 2 की, एक आंधळा माणूस त्यांच्याकडे आला. 3 (पैगंबर!) तुम्हाला काय माहीत की, कदाचित (ईश्वरीय संदेश ग्रहण करून) तो सुधारू शकला असता, 4 किंवा त्याने उपदेश ऐकले असते, तर ते त्याच्यासाठी लाभदायी ठरू शकले

असते. 5 जो मनुष्य (उपदेशांप्रति) अनास्था दाखवत होता. 6 तुम्ही मात्र
त्याच्याकडे लक्ष देण्याच्या बाबतीत उत्सुक होता. 7 त्याने जर स्वत:ची
सुधारणा केली नाही, तर त्याबद्दल तुमच्यावर काही दोष येणार नाही. 8 पण जो
मनुष्य तुमच्याकडे धावत येतो, (उपदेश ग्रहण करण्याच्या) उत्सुकतेसह. 9
आणि तो अल्लाहप्रति आदरयुक्त भय बाळगणारा आहे. 10 तुम्ही अशा माणसाकडे
दुर्लक्ष करता. 11 निश्चितच हे (कुराण) एक बोधग्रंथ आहे. 12 तर हवे त्याने
(यापासून) बोध ग्रहण करावे. 13 जो अशा पृष्ठांवर नमूद आहे, जी अर्थातच
आदरास पात्र आहेत. 14 जी उच्च दर्जाची व पवित्र आहेत. 15 अशा लिहिणाऱ्यांच्या
हाती. 16 जे सन्माननीय व सदाचारी आहेत.

17 नाश पावो माणूस! किती कृतघ्न आहे तो! 18 (अल्लाहने) त्यास
कशापासून निर्माण केले? 19 वीर्याच्या एका बिंदूपासून! त्यास तो निर्माण
करतो आणि त्याची स्वभाववैशिष्टे निश्चित करतो. 20 आणि त्याच्यासाठी
(जीवनाचा) मार्ग सुकर करतो. 21 आणि शेवटी त्यास मृत्यू देऊन कबरीत
पोचवतो. 22 आणि मग जेव्हा तो इच्छील त्यास पुन्हा जिवंत करून उभा
करेल. 23 तरीही माणूस त्याच्या आदेशांनुसार कृती करण्यास नकार देतो (जो
माणसाचा सर्वप्रकारे कर्ताकरविता आहे). 24 माणसाने आपल्या अन्नाकडे
पाहावे (ते त्याला कसे उपलब्ध करून दिले जाते, त्यावर त्याने चिंतन करावे).
25 आम्ही कसे मोठ्या प्रमाणावर पाण्याचा वर्षाव करतो. 26 आणि मग आम्ही
जमिनीला फाडून (नवीन वनस्पती निर्माण करतो). 27 मग आम्ही तिच्यातून
धान्य उगवितो. 28 आणि द्राक्षे व भाजीपाला. 29 आणि जैतून व खजूर. 30
आणि घनदाट बागा. 31 आणि फळे व चारा. 32 तुमच्या व तुमच्या गुराढोरांसाठी
आजीविकेचे साधन म्हणून.

33 जेव्हा कान बहिरे करणारा प्रचंड आवाज होईल. 34 (तो पुनरुत्थानाचा
दिवस असेल) ज्या दिवशी मनुष्य आपल्या भावापासून दूर पळेल. 35 आणि

आपल्या आई–वडिलांपासून. [36] आणि आपली पत्नी व मुले यांच्यापासून. [37] त्या दिवशी प्रत्येक जण स्वत:चीच अशी चिंता करीत असेल की, दुसऱ्याकडे लक्ष देण्याचा विचार त्याच्या मनात येणार नाही. [38] काही चेहरे त्या दिवशी प्रफुल्लित असतील. [39] हसत असतील, आनंद साजरा करीत असतील. [40] आणि त्या दिवशी काही चेहरे धुळीने माखलेले असतील. [41] त्यांच्यावर उदासीनता पसरलेली असेल. [42] हेच लोक सत्य नाकारणारे दुराचारी होते.

# सूरह–८१. अत–तकवीर

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] जेव्हा सूर्य गुंडाळून टाकला जाईल. [2] आणि जेव्हा तारे तेजशून्य होतील. [3] आणि जेव्हा पर्वतांना चालविले जाईल. [4] आणि जेव्हा दहा महिन्यांचा गर्भ असलेल्या उंटिणी मोकाट सोडून दिल्या जातील. [5] जेव्हा जंगली जनावरांना एकत्र आणले जाईल. [6] आणि जेव्हा (सुनामीप्रमाणे) समुद्र खवळतील. [7] जेव्हा सर्व लोकांची (त्यांच्या कृत्यांनुसार) विविध गटांत विभागणी केली जाईल. [8] आणि जेव्हा जिवंत गाडल्या गेलेल्या तान्ह्या मुलीला विचारले जाईल. [9] कोणत्या अपराधापोटी तिला मारून टाकण्यात आले? [10] आणि जेव्हा लोकांचे कर्मपत्र उघडले जातील. [11] जेव्हा आकाशाचे आवरण खेचून त्यास उघडे केले जाईल. [12] आणि जेव्हा नरकाची आग भडकविली जाईल. [13] जेव्हा स्वर्ग जवळ आणले जाईल. [14] तेव्हा प्रत्येकाला नीट कळून जाईल की, त्याने स्वत:साठी काय तयार केलेले आहे.

[15] मी मागे हटणाऱ्या ताऱ्यांना साक्ष ठेवतो. [16] त्या ग्रहांनाही जे आपल्या कक्षेत फिरतात व अस्त पावतात. [17] आणि त्या रात्रीचीही (शपथ) जी सरत असते. [18] आणि त्या पहाटेची, जेव्हा ती उदय पावते (मी या सर्व गोष्टींची शपथ घेऊन, म्हणजे त्यांना साक्षी बनवून सांगतो). [19] की, हे कुराण एका आदरणीय पैगंबराकडे प्रकट केलेली ईश्वरवाणी होय. [20] सामर्थ्यशाली असा,

सृष्टीच्या महासिंहासनावर आरूढ असलेल्या अल्लाहकडे सन्माननीय असा (ग्रंथ).
21 तेथे त्याच्या आज्ञेचे पालन केले जाते. आणि तो विश्वासपात्र आहे. 22
(मक्केतील लोकांनो!) तुमचा (हा) साथी वेडा नाही. 23 पैगंबराने (हा ग्रंथ
अल्लाहकडून आणणाऱ्या स्वर्गदूताला) खुल्या क्षितिजावर पाहिले, हे सत्य आहे.
24 कोणाचीही बुद्धी जिथे पोचू शकत नाही अशा अदृश्य गोष्टी जाणण्यासाठी तो
(पैगंबर) काही हपापलेला नाही. 25 हे कुराण काही शापित सैतानाची वाणी
नाही (तर शुद्ध 'अल्लाहची वाणी' आहे). 26 मग तुम्ही लोक कुठे (भटकत)
जात आहात? 27 हा केवळ उपदेशपर संदेश आहे, समस्त मानवजातीसाठी. 28
तुमच्यामधील त्या प्रत्येक माणसासाठी जो सरळ मार्गाचा अवलंब करू इच्छितो.
29 पण तुम्ही तोपर्यंत त्या गोष्टीची इच्छा करू शकत नाही, जोपर्यंत सर्व
जगांचा पालनकर्ता असलेला अल्लाह ती इच्छित नाही.

# सूरह-८२. अल-इनफितार

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 जेव्हा आकाश फाटून जाईल. 2 आणि जेव्हा तारे विखुरून जातील. 3
आणि जेव्हा (महाभयानक सुनामीप्रमाणे) समुद्र वाहू लागतील. 4 आणि जेव्हा
कबरी उघडल्या जातील. 5 प्रत्येकाला कळून येईल की, त्याने (स्वत:साठी)
पुढे काय पाठविले आहे. आणि मागे काय सोडले आहे. 6 हे मानवा! आपल्या
कृपावंत पालनकर्त्याविषयी तुझी कोणत्या गोष्टीने फसवणूक केली आहे?
7 ज्याने तुला निर्माण केले, मग तुझ्या शरीरातील अवयवांची संतुलित अशी
रचना करून तुला घडविले.
8 ज्या रूपात इच्छिले तसे तुला रूप दिले. 9 तरीही (लोकांनो!) तुम्ही
न्यायाच्या दिवसाला खोटे समजता! 10 पण सत्य हे आहे की, तुमच्यावर
पहारेकरी नियुक्त आहेत (जे न्यायाच्या दिवशी तुमच्याविषयी साक्ष देतील). 11

ते (खरोखर) सन्मानास पात्र आहेत, ते (तुमच्या प्रत्येक कृत्याची काळजीपूर्वक) नोंद करीत आहेत. 12 तुम्ही जे काही करता, ते सर्व जाणतात. 13 नि:संदेह, सदाचारी लोक सर्वसुखसंपन्न (अशा स्वर्गात) असतील. 14 तर याउलट दुराचारी लोक नरकात असतील. 15 न्यायाच्या दिवशी त्यात प्रवेश करतील. 16 आणि तिथून त्यांची कदापि सुटका होणे नाही. 17 तुम्हाला काय माहीत की, न्यायाचा दिवस काय चीज आहे? 18 पुन्हा ऐका, न्यायाचा दिवस काय आहे, याची तुम्हाला किती जाणीव आहे? 19 त्या दिवशी कोणीही कोणासाठीही काही करू शकणार नाही (कोणत्याही प्रकारे कामी येणार नाही). त्या दिवशी सर्वप्रकारचे अधिकार फक्त आणि फक्त एकट्या अल्लाहकडे असतील.

# सूरह–८३. अल–मुतफ्फिफ़ीन

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 नाश पावणार आहेत ते, जे कमी माप देतात. 2 जे स्वत:साठी घेताना पुरेपूर माप घेतात. 3 पण इतरांना मापून किंवा वजन करून देताना कमी देतात. 4 अशा लोकांना या गोष्टीची जाणीव नाही का की, त्यांना उठवून उभे केले जाणार आहे? 5 (जाब देण्यासाठी) एका भयंकर दिवशी. 6 ज्या दिवशी संपूर्ण मानवजात, सर्वांचा मालक असलेल्या (अल्लाहसमोर) उभी राहील? 7 खरोखर, दुष्ट लोकांच्या कृत्यांचा रेकॉर्ड सिज्जीनमध्ये असेल. 8 आणि तुम्हाला काय माहीत, 'सिज्जीन' काय आहे? 9 ते लिहून ठेवलेले महारेकॉर्ड आहे. 10 सत्य नाकारणारे नाश पावणार आहेत, त्या दिवशी. 11 जे न्यायाच्या दिवसाला खोटे ठरवितात. 12 त्यास तोच खोटे ठरवितो जो मर्यादांचे उल्लंघन करणारा पापी आहे. 13 जेव्हा त्याला आमचे संदेश ऐकविले जातात, तेव्हा तो म्हणतो, 'या केवळ आधीच्या लोकांच्या कहाण्या आहेत.' 14 नव्हे! वस्तुस्थिती ही आहे की, त्यांच्या दुष्कृत्यांचा, त्यांच्या हृदयावर गंज चढलेला आहे. 15 निश्चितपणे!

त्या दिवशी त्यांना त्यांच्या पालनकर्त्यापासून दूर ठेवले जाईल (ते पालनकर्त्याला पाहू शकणार नाहीत). [16] मग ते नरकाच्या आगीत प्रवेश करतील. [17] आणि त्यांना सांगितले जाईल, 'हाच तो (नरक) आहे, ज्यास तुम्ही खोटे ठरवीत होता.'

[18] पण सदाचारी लोकांचा रेकॉर्ड इल्लिय्यीनमध्ये सुरक्षित ठेवलेला आहे. [19] आणि इल्लिय्यीन म्हणजे काय? हे तुम्हाला कसे कळणार? [20] तो एक महारेकॉर्ड आहे. [21] तो रेकॉर्ड अल्लाहच्या सर्वात नजीक असलेल्या स्वर्गदूतांच्या निगराणीत आहे. [22] नि:संदेह, सदाचारी लोक सर्वसुखसंपन्न (अशा स्वर्गात) असतील. [23] (शाही) आसनांवर बसून (अल्लाहच्या सामर्थ्याच्या सर्वत्र झळकत असलेल्या खुणा) पाहत असतील. [24] त्यांच्या चेहऱ्यांवर (खऱ्या अर्थाने) प्रसन्नता असल्याचे तुम्हाला जाणवेल. [25] त्यांना सीलबंद शुद्ध मद्यार्क पिण्यासाठी दिले जाईल. [26] ज्याच्या सीलमधून कस्तुरीचे सुगंध येत असेल, या त्या गोष्टी आहेत ज्याची इच्छुकांनी इच्छा बाळगायला हवी. [27] आणि त्या पेयात तसनीमचे मिश्रण असेल. [28] (तसनीम हा स्वर्गातील) एक असा झरा ज्यातून अल्लाहचे सान्निध्य लाभलेले लोक पितील. [29] जे लोक अपराधी होते, ते श्रद्धावंतांची खिल्ली उडवायचे. [30] आणि त्यांच्या जवळून जाताना ते एक-दुसऱ्याकडे पाहून डोळे मिचकावीत असत. [31] आणि जेव्हा ते आपल्या लोकांकडे परत येत, तेव्हा ते (त्या ईशभिरू लोकांविषयी) मस्करी करीत परत येत असत. [32] आणि जेव्हा ते त्यांना पाहत असत, तेव्हा ते तिरस्काराने असे म्हणायचे, 'हे वाट चुकलेले लोक आहेत.' [33] वास्तविक पाहता, यांना श्रद्धावंतांवर रखवालदार म्हणून पाठविण्यात आलेले नव्हते. [34] पण आज (न्यायाच्या दिवशी) श्रद्धावंत लोक त्या सत्य नाकारणाऱ्या लोकांवर हसतील. [35] शाही आसनांवर बसून (श्रद्धाहीनांची काय दशा झाली,) ते पाहत असतील. [36] (म्हणतील,) 'सत्य नाकारणाऱ्यांना त्यांच्या कृत्यांचा पुरेपूर बदला मिळाला ना!'

# सूरह–८४. अल–इनशिक़ाक़

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 जेव्हा आकाश फाटून जाईल. 2 आणि तो आपल्या पालनकर्त्याच्या
आदेशाचे पालन करेल, जे त्याचे कर्तव्य आहे. 3 आणि जमिनीला पसरवून
अगदी सपाट प्रदेश बनविण्यात येईल. 4 तिच्यामध्ये जे काही आहे, ते सर्व
बाहेर टाकून ती रिकामी होऊन जाईल. 5 ती आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाचे
पालन करील, जे तिचे कर्तव्य आहे. 6 हे मानवा! आपल्या पालनकर्त्याकडे
जाण्याचा तुझा परिश्रमपूर्वक प्रवास सुरू आहे, फार खडतर (प्रवास). आणि
त्याला तू भेटणार आहेस. 7 तेव्हा ज्याची कर्मवही त्याच्या उजव्या हातात दिली
जाईल. 8 त्याचा हिशेब लगेच सहजपणे आटोपला जाईल. 9 आणि तो आपल्या
लोकांकडे आनंदाने परत येईल. 10 आणि ज्याची कर्मवही त्याच्या पाठीच्या
मागून देण्यात येईल. 11 तो, त्याला कायमस्वरूपी संपवून टाकण्यासाठी विनवणी
करील. 12 आणि तो धगधगत्या आगीत प्रवेश करेल. 13 तो आपल्या
लोकांमध्ये खुशाल (व निश्चिंत) राहत होता. 14 आपल्याला (एके दिवशी
अल्लाहकडे) परत जावे लागेल असे त्याला कधीही वाटत नव्हते. 15 अर्थातच!
(त्याला परत यावे लागणारच होते) त्याचा पालनकर्ता नेहमी त्याच्यावर नजर
ठेवून होता. 16 मी संधिप्रकाशाची शपथ घेऊन सांगतो, 17 आणि रात्रीची
आणि ती ज्यांना–ज्यांना (स्वतःच्या अंधारात) गडप करते त्यांची. 18 आणि
चंद्राची जेव्हा तो पूर्ण होतो. 19 की, तुम्हाला एका अवस्थेतून निश्चितपणे दुसऱ्या
अवस्थेत जावे लागणार आहे. 20 त्यांना झाले तरी काय की, ते श्रद्धा धारण
करीत नाहीत? 21 आणि जेव्हा त्यांच्यासमोर कुराणाचे संदेश पठण केले जातात,
तेव्हा ते (अल्लाहप्रति श्रद्धा व्यक्त करण्यासाठी) त्याच्यासमोर नतमस्तक होत
नाहीत. 22 पण जे सत्य नाकारण्यावर ठाम आहेत ते (या संदेशांना) खोटे ठरवीत

असतात. [23] ते (आपल्या मनात) काय दडवून ठेवत आहेत, ते अल्लाहला सर्व माहीत आहे. [24] (पैगंबर!) त्यांना दुःखदायी शिक्षेची वार्ता ऐकवा. [25] पण जे लोक श्रद्धा धारण करून चांगली कृत्ये करतात, त्यांच्यासाठी कधीच न संपणारा चांगला मोबदला आहे.

# सूरह–८५. अल–बुरूज

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] नक्षत्रांचे वेगवेगळे समूह असलेल्या त्या आकाशाची शपथ. [2] वचन दिलेल्या (त्या पुनरुत्थानाच्या) दिवसाची शपथ. [3] साक्ष देणाऱ्याची आणि ज्याच्याविषयी साक्ष दिली जाते त्याची शपथ. [4] नाश पावले खंदकवाले. [5] जो (खंदक) इंधनाने भडकाविलेल्या आगीने भरलेला होता. [6] ते त्याच्यापाशी बसलेले होते. [7] श्रद्धावंतांबरोबर जे (अत्याचार) केले जात होते, ते पाहण्यासाठी (तिथे बसलेले होते). [8] त्यांच्याशी त्यांचे शत्रुत्व केवळ यासाठी होते की, त्यांनी अल्लाहवर श्रद्धा धारण केली, जो सर्वशक्तिमान आहे, सर्व प्रकारच्या स्तुतीस पात्र आहे. [9] त्याचीच सत्ता आहे आकाशात आणि पृथ्वीवर आणि तो प्रत्येक गोष्टीवर नजर ठेवून आहे. [10] जे लोक श्रद्धावंत पुरुष व श्रद्धावंत स्त्रिया यांचा छळ करतात. आणि त्याबद्दल त्यांनी पश्चात्ताप केला नाही तर अशांना निश्चितपणे नरकात (विविध) शिक्षा भोगाव्या लागतील. (शिवाय) त्यांना जळण्याची शिक्षाही भोगावी लागेल. [11] पण जे लोक श्रद्धा धारण करून सत्कर्मे करतात, त्यांना मोबदल्यात अशा बागा प्रदान केले जातील, ज्यातून पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह वाहत असतील. आणि हेच सर्वश्रेष्ठ यश होय. [12] तुमच्या पालनकर्त्याची पकड फार कठोर असते. [13] तोच प्रथम निर्माण करतो आणि तोच दुसऱ्या वेळेसही निर्माण करेल. [14] तोच फार क्षमाशील आहे व प्रेमळ आहे. [15] समस्त सृष्टीच्या सत्ताकेंद्राचा स्वामी. [16] तो इच्छितो, ते करून

टाकतो. [17] त्या सैन्यांविषयी वृत्तांत तुम्ही ऐकले नाही का? [18] फिरऔन व समूदच्या [19] (हे संदेश ऐकूनही) सत्य नाकारणारे सत्य नाकारण्यावर ठाम आहेत. [20] पण अल्लाहने त्यांना सर्व बाजूंनी वेढून ठेवलेले आहे. [21] हे कुराण एक महान ग्रंथ आहे — यात शंकाच नाही. [22] जे सदैव सुरक्षित अशा लेखशिलेवर लिहून ठेवलेले आहे.

# सूरह-८६. अत-तारिक़

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] आकाशांची शपथ आणि त्याची जो रात्री प्रकट होतो [2] रात्री प्रकटणारा तो काय आहे, तुम्हाला काय माहीत? [3] तो प्रखर तेज असलेला तारा आहे. [4] असा कोणीही नाही ज्यावर पहारेकरी नियुक्त केलेला नाही. [5] माणसाने विचार करायला हवे की, त्यास कशापासून निर्माण करण्यात आलेले आहे. [6] त्याला अशा पाण्यापासून (म्हणजे वीर्यबिंदूपासून) निर्माण करण्यात आले, जो उचंबळून, [7] पाठींतून व उराच्या हाडांमधून निघतो. [8] निःसंदेह, तोच त्याला पुन्हा जिवंत करण्याचे पूर्ण सामर्थ्य बाळगतो. [9] ज्या दिवशी सर्व रहस्ये उघड केले जातील. [10] तेव्हा (माणसाकडे) कसलेही सामर्थ्य असणार नाही, ना कोणी साहाय्यकर्ता त्याला लाभेल. [11] आकाशातील त्या पाणी वर्षिणाऱ्या (मेघांची) शपथ जे पावसावर पाऊस वर्षितात. [12] (अंकुर फुटताना) जी जमीन दुभंगून जाते, तिची शपथ. [13] निःसंदेह, हे (कुराण) एक निर्णायक (व गंभीर) वचन आहे. [14] ते असेच सहज घेता कामा नये. [15] पण (या कुराणास नाकारणारे) खोट्या युक्त्या आखत आहेत. [16] मी देखील (त्यांच्या सर्व कारस्थानांना शून्यवत करण्यासाठी) योजना आखित आहे. [17] तेव्हा सत्य नाकारणाऱ्यांना उसंत द्या, काही काळासाठी उसंत!

# सूरह–८७. अल–आला

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 (पैगंबर!) आपल्या पालनकर्त्याच्या महतीचे गान करा, जो सर्वोच्च आहे.
2 ज्याने प्रत्येक गोष्टीला निर्माण केले आणि परिपूर्ण बनविले. 3 जो (अस्तित्वात
असलेल्या प्रत्येक गोष्टीचे) स्वरूप (व स्वभावगुण) निश्चित करतो आणि त्यानुसार
त्यांना मार्गदर्शन करतो. 4 तोच सर्व हिरवळ अस्तित्वात आणतो, 5 मग तिला
काळा केरकचरा बनवून टाकतो. 6 (पैगंबर!) आम्ही तुम्हाला अशाप्रकारे कुराण
शिकवू की, तुम्ही ते विसरू शकणार नाही. 7 यास अपवाद फक्त ते असेल, जे
अल्लाह इच्छील. केवळ तोच ते सर्व जाणतो, जे (मानवाच्या) आकलनशक्तीच्या
आवाक्यात आहे आणि जे त्याच्या पलीकडे आहे. 8 आणि आम्ही तुमच्यासाठी
(अंतिम सुख) सोयीकडे जाणाऱ्या मार्गाला सोपे करून टाकू. 9 तर तुम्ही उपदेश
करीत राहा, मग ते लाभदायक ठरेल (किंवा ठरणार नाही असा विचार करू
नका). 10 जो ईशभिरू आहे, तो अवश्य उपदेश ग्रहण करेल. 11 पण जो अभागी
असेल, तोच त्याकडे पाठ फिरवील, 12 आणि तोच भयानक आगीत प्रवेश
करेल. 13 जिथे तो ना मरेल, ना जगेल (म्हणजे तडफडेल). 14 पण जो (या
जगात) स्वत:ला (मनाने) शुद्ध बनवतो, तोच (या पुढील जगात) यशस्वी ठरतो.
15 जो आपल्या पालनकर्त्याचे स्मरण करतो आणि प्रार्थना करतो. 16 पण तुम्ही
(लोक) याच जगातील जीवनास प्राधान्य देता. 17 पण यानंतरचे जीवन यापेक्षा
उत्तम व कायमस्वरूपी आहे. 18 हीच गोष्ट यापूर्वीच्या ग्रंथांतही सांगितलेली आहे.
19 म्हणजेच इब्राहीम व मूसा यांना प्रदान केलेल्या ग्रंथांत.

# सूरह–८८. अल–ग़ाशियह

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 (पैगंबर!) तुम्हाला त्या सर्वांना झाकोळून टाकणाऱ्या सर्वव्यापी आपत्तीविषयी
काही कळाले आहे का? 2 त्या दिवशी काही चेहरे उतरलेले असतील. 3
(पापाच्या ओझ्याने) कष्टी झालेले आणि (दहशतीने) गळून गेलेले असतील. 4
ते धगधगत्या आगीत प्रवेश करतील. 5 आणि त्यांना उकळत्या झऱ्याचे पाणी
पाजवण्यात येईल. 6 त्यांना कडू काटेरी झुडपाशिवाय अन्न म्हणून अन्य काही
मिळणार नाही. 7 ज्याच्या खाण्याने ना पौष्टिकता लाभेल, ना भूक भागेल. 8
त्या दिवशी काही चेहरे प्रफुल्लित असतील. 9 आपल्या प्रयत्नांच्या परिणामांशी
संतुष्ट असतील, 10 (सर्वसुखसंपन्न) उदात्त अशा स्वर्गात, 11 तिथे (स्वर्गनिवासी)
व्यर्थ बडबड ऐकणार नाहीत. 12 तिथे (मन प्रसन्न करणारे अगणित) झरे वाहत
असतील. 13 तिथे शाही आसन असतील, 14 सहज हाताला येतील असे
(विविध ज्यूसचे) प्याले. 15 आणि लोड–गाद्या व्यवस्थित रांगेने ठेवण्यात
आलेल्या असतील. 16 आणि गालीचे (उत्कृष्ट रीतीने) अंथरलेले असतील.
17 (यानंतरचे जीवन नाकारणारे) उंटाकडे कधी चिंतनपूर्वक पाहत नाहीत का
की, त्यास कसे निर्माण करण्यात आलेले आहे? 18 आणि आकाशाकडे की,
त्यास कशाप्रकारे उंच स्थापित करण्यात आले? 19 आणि पर्वतांकडे की,
त्यांना कसे उभे करण्यात आले? 20 आणि पृथ्वीकडे, तिला कसे पसरविले
गेले? 21 म्हणून (पैगंबर!) तुम्ही त्यांना उपदेश करा. आणि केवळ उपदेश
करणे एवढेच तुमचे काम आहे. 22 तुम्ही त्यांच्यावर रखवालदार नाही. 23 पण
जो पाठ फिरवितो आणि सत्य नाकारतो. 24 त्यास अल्लाह सर्वात कठोर शिक्षा
करेल. 25 त्यांना आमच्याकडेच परतायचे आहे, यात शंकाच नाही 26 मग
त्यांच्याकडून हिशेब घेणे, हे आमचे काम आहे.

# सूरह–८९. अल–फज्र

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.
1 उष:कालाची शपथ 2 आणि दहा रात्रींची 3 आणि सम व विषम यांची 4
आणि सरत्या रात्रीची, 5 बुद्धी लाभलेल्या माणसांसाठी यांमध्ये पुरेशी साक्ष नाही
का? 6 आद या जमातीसोबत तुझ्या पालनकर्त्याने कसा व्यवहार केला, तुला
याची जाणीव नाही का? 7 उंच (व भव्य) महाल असलेल्या इरमची ती जमात
होती. 8 जगात त्यांच्यासारखी (धष्टपुष्ट) जमात आधी कधी अस्तित्वात नव्हती.
9 आणि समूद या जमातीबरोबरही जे प्रचंड पर्वतांना कोरून दऱ्यामध्ये स्वत:साठी
घरे बनवीत. 10 आणि बलाढ्य सेनेचा मालक असलेल्या फिरऔन बरोबर
(आम्ही कसा व्यवहार केला?) 11 (तो व त्याच्या सेनेने) भूतलावर अराजकता
माजविली होती. 12 आणि भूतलावर फारच उपद्रव घडविला होता. 13 तेव्हा
तुमच्या पालनकर्त्याने त्यांच्यावर शिक्षेचा कोरडा उगारला. 14 कारण तुमचा
पालनकर्ता सदैव लक्ष ठेवून असतो. 15 माणसाचे असे आहे, जेव्हा त्याचा
पालनकर्ता त्याला सन्मान आणि कृपाप्रसाद देऊन आजमावितो. तेव्हा तो म्हणू
लागतो, ‘माझ्या पालनकर्त्याने मला सन्मानित केले आहे.’ 16 आणि जेव्हा
त्याला (दुसऱ्याप्रकारे) आजीविकेची साधने कमी करून आजमावितो, तेव्हा तो
म्हणतो, ‘माझ्या पालनकर्त्याने मला अपमानित केलेले आहे.’ 17 कदापि नाही,
तुम्ही लोक अनाथांचा आदर करीत नाही. 18 आणि तुम्ही गरजवंतांना अन्नदान
करण्याच्या बाबतीत एकमेकांना प्रेरित करीत नाही. 19 आणि तुम्ही दुर्बलांची
वारसाप्राप्त संपत्ती गिळंकृत करून टाकता. 20 आणि संपत्तीची तुम्हाला फारच
लालसा आहे, जी कधीही तृप्त होत नाही. 21 कदापि नाही, जेव्हा जमिनीला
तिचे तुकडे–तुकडे करून सपाट करण्यात येईल. 22 तेव्हा तुमचा पालनकर्ता
प्रकट होईल आणि स्वर्गदूतही मोठ्या संख्येने येतील, त्यांच्या रांगांच्या रांगा

लागलेल्या असतील. [23] त्या दिवशी नरकावरून अदृश्याचा पडदा दूर केला जाईल. तेव्हा माणसाला सत्य उमजेल, पण आता सत्य उमजण्याचा काय फायदा? [24] तो म्हणेल, 'अरेरे, मी माझ्या या जीवनासाठी काही चांगली कृत्ये पुढे पाठविली असती तर......' [25] तेव्हा अल्लाह अशी शिक्षा करील जशी शिक्षा कोणीही कधीही केलेली नसेल. [26] तो (अपराध्यांना) अशा प्रकारे जखडून टाकेल, जसे कोणीही जखडू शकत नाही. [27] (पण सदाचारी माणसाला अल्लाह म्हणेल,) 'हे शांती लाभलेल्या आत्म्या! [28] तू अशाप्रकारे आपल्या पालनकर्त्याकडे परत ये, तू त्याच्याशी संतुष्ट आणि तो तुझ्याशी संतुष्ट. [29] माझ्या (सदाचारी) भक्तांत सामील हो [30] माझ्या स्वर्गात प्रवेश करून.'

# सूरह–९०. अल–बलद

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] मी या (मक्का) शहराची शपथ घेतो. [2] आणि तुम्ही या शहरात वास्तव्य करीत आहात. [3] तसेच (मानवजातीच्या) आई–बापाची व त्यांच्या अपत्यांची (म्हणजे मानवजातीची) शपथ. [4] नि:संदेह आम्ही मानवाला कष्टाचे (व कसोटीचे जीवन जगण्यासाठीच) निर्माण केलेले आहे. [5] तो असा विचार करतो का की, त्याच्यावर कोणाचेच नियंत्रण नाही? [6] तो (बढाई मारत) म्हणतो, 'मी प्रचंड धन खर्च केले आहे.'

[7] तो असे विचार करतो का की, त्याच्यावर कोणीही नजर ठेवून नाही. [8] आम्ही त्याला दोन डोळे दिलेले नाही का? [9] आणि जीभ व दोन ओठ, [10] आणि त्याला (आम्ही चांगले व वाईट असे) दोन खुले मार्ग दाखविले नाही का? [11] पण त्याने (हिमतीने) चढण पार करण्याचा प्रयत्न केला नाही. [12] पण तुम्हाला काय माहीत, ती चढण काय आहे? [13] ती आहे, गुलामाला गुलामीतून मुक्त करणे.

[14] उपासमारीच्या काळात अन्नदान करणे, [15] अनाथ नातेवाइकांना. [16] किंवा इतर दु:खी-कष्टी लोकांना. [17] आणि (असे करणारा) स्वत: अशा श्रद्धावंतांपैकी असायला पाहिजे होता जे एकमेकांना सहनशीलता व एकमेकांप्रति कनवाळूपणा बाळगण्याचे उपदेश करतात. [18] असेच लोक खरे नशीबवान आहेत. [19] आणि जे लोक आमचे संदेश नाकारण्यावर ठाम राहतात, तर तेच डाव्या बाजूचे अभागी लोक आहेत. [20] ते आगीने वेढले जातील.

# सूरह-९१. अश-शम्स

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] सूर्याची व त्याच्या चढत्या उन्हाची शपथ. [2] (सूर्य) मावळल्यानंतर निघणाऱ्या चंद्राची शपथ. [3] आणि प्रभा प्रकट करणाऱ्या दिवसाची शपथ. [4] आणि प्रकाशावर पडदा टाकणाऱ्या रात्रीची शपथ. [5] आणि आकाशाची, त्याने त्याला कसे (अद्भुत) निर्माण केले? [6] आणि पृथ्वीची, त्याने तिला कसे पसरविले? [7] आणि आत्म्याची, त्याने त्याला कसे घडविले?

[8] मग तिला चांगले व वाईट समजण्याची प्रेरणा दिली. [9] ज्याने त्यास पवित्र केले, तोच यशस्वी होईल. [10] तो नाश पावणार, ज्याने त्या आत्म्यास अपवित्र बनविले [11] समूदने केवळ आपल्या मगरुरीपोटी सत्य स्वीकारण्यास नकार दिला. [12] जेव्हा त्यांच्यापैकी सर्वात दुष्ट माणूस (सांडणीला मारण्यासाठी) उठून उभा राहिला. [13] तेव्हा अल्लाहच्या पैगंबराने त्यांना म्हटले, 'ही अल्लाहची सांडणी आहे (तिला हात लावू नका), तिला तिचे पाणी पिऊ द्या.' [14] पण त्यांनी त्या (पैगंबरास) खोटे ठरविले आणि निष्ठुरपणे तिच्या धोंडशिरा कापून टाकल्या. मग त्यांच्या पालनकर्त्याने त्यांच्या पापापायी त्यांना पूर्णपणे नष्ट करून टाकले. आणि त्यांच्या शहराला भुईसपाट करून टाकले. [15] व तो त्याच्या परिणामांची अजिबात पर्वा करीत नसतो.

# सूरह-९२. अल-लैल

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] पृथ्वीवर अंधकाराचा पडदा पसरविणाऱ्या रात्रीची शपथ. [2] प्रकाशमान होणाऱ्या दिवसाची शपथ. [3] नर व मादी यांच्या निर्मितीची शपथ. [4] लोकांनो! तुमचे प्रयत्न अर्थातच भिन्न-भिन्न आहेत. [5] तर जो दान देतो व अल्लाहची जाण ठेवून जीवन जगतो. [6] आणि जे अंतिम (व अटळ) सत्य आहे, त्यावर विश्वास ठेवतो. [7] अंतिम (सुख) सोयीकडे जाणारा (जीवन) मार्ग त्याच्यासाठी आम्ही सुलभ करू. [8] पण जो कंजूष आहे आणि स्वत:ला (फारच) आत्मनिर्भर समजतो. [9] आणि अंतिम सत्यास खोटे ठरवितो. [10] आम्ही त्याच्यासाठी (नरकाकडे) जाणारा मार्ग सुकर करू. [11] जेव्हा तो (नरकाच्या) खड्ड्यात जाऊन पडेल, तेव्हा त्याचे धन त्याच्या काही कामी येणार नाही. [12] मार्ग दाखविणे एवढेच आमचे काम आहे (आणि मार्ग त्याला अवलंबायचा आहे). [13] यानंतरचे जग आणि हे जगही आमच्याच नियंत्रणात आहेत. [14] मी तुम्हाला धगधगत्या आगीपासून सावध केलेले आहे. [15] तिच्यात तोच प्रवेश करेल, जो फारच दुष्ट आहे. [16] ज्याने सत्य नाकारून त्याकडे पाठ दाखविली. [17] पण जो अल्लाहची जाण ठेवून (जीवन जगतो), त्यास त्यापासून दूर, सुरक्षित ठेवण्यात येईल. [18] जो (मन) शुद्ध करण्यासाठी आपले धन (इतरांवर) खर्च करतो. [19] असे तो (इतरांकडून) प्राप्त झालेल्या अनुग्रहाच्या मोबदल्यात करीत नाही तर [20] केवळ सर्वोच्च अशा आपल्या पालनकर्त्याच्या प्रसन्नतेसाठी करतो. [21] आणि लवकरच तो खऱ्या अर्थाने संतुष्ट होईल.

# सूरह-९३. अज़-ज़ुहा

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] पूर्णपणे प्रकाशमान झालेल्या दिवसाची शपथ. [2] आणि रात्रीची शपथ,

जेव्हा ती पसरते. [3] तुमच्या पालनकर्त्याने तुम्हाला सोडून दिलेले नाही, ना तो तुमच्याशी नाराज झालेला आहे. [4] यानंतरचे जीवन तुमच्यासाठी या जीवनापेक्षा (कित्येक पटीने) अधिक चांगले असणार, यात शंकाच नाही. [5] आणि लवकरच तुमचा पालनकर्ता तुम्हाला (जे हवे ते) देईल, ज्याने तुम्ही पूर्णपणे समाधानी व्हाल. [6] तुम्ही अनाथ होता, आणि त्याने तुम्हाला आश्रय प्रदान केला, हे सत्य नाही का? [7] तुम्ही सत्याच्या शोधार्थ भटकत होता, तेव्हा त्याने तुम्हाला मार्गदर्शन प्रदान केले. [8] तुम्ही त्यास गरजू असल्याचे आढळले, आणि त्याने तुम्हाला समृद्धता प्रदान केली. [9] म्हणून तुम्हीही अनाथांबरोबर निष्ठुरपणे वर्तन करू नका.

[10] आणि (तुमची) मदत मागणाऱ्याला तुम्ही झिडकारू नका. [11] आणि आपल्या पालनकर्त्याप्रति (आभार व्यक्त करण्यासाठी), त्याच्या कृपाप्रसादांच्या संदर्भासहित, त्याचे स्मरण करा.

# सूरह–९४. अल–इनशिराह

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] (पैगंबर! सत्याच्या प्रवेशासाठी) आम्ही तुमच्या मनाची कवाडे खुली केली नाहीत का? [2] आणि आम्ही तुमच्यावरून तुमचे ते ओझे उतरविले नाही का? [3] ज्याने तुमची कंबर (जवळपास) मोडून टाकली होती. [4] आणि आम्ही तुमचे नावलौकिक वाढविले. [5] (लक्षात ठेवा) प्रत्येक दु:खा(पलीकडे) सुखही आहे. [6] होय! प्रत्येक दु:ख सुखाचे दार खुले करते. [7] जेव्हा तुम्ही फुरसतीत असाल, भरपूर मेहनत करा. [8] आणि आपल्या पालनकर्त्याकडे आपले संपूर्ण लक्ष केंद्रित करा.

# सूरह–९५. अत–तीन

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 अंजीर व जैतूनची शपथ. 2 आणि सिनाई या पर्वताची शपथ. 3 आणि या
शांतीचं (केंद्र असलेल्या मक्का) शहराची. 4 आम्ही मानवाला उत्तम आकार
देऊन (उत्कृष्ट निर्मितीच्या रूपाने) निर्माण केलेले आहे. 5 पण त्याच्या (अन्यायी
वर्तनामुळे) त्यास सर्वात खालच्या दर्जाच्या ठिकाणी फेकून दिले आहे. 6 पण
यास ते लोक अपवाद आहेत, जे श्रद्धा धारण करून सत्कर्मे करतात. त्यांच्यासाठी
कधीच न संपणारा चांगला मोबदला आहे. 7 यानंतर आणखी कोणती गोष्ट (हे
मानवा!) तुला न्यायाच्या दिवसाला खोटे ठरवायला लावणार आहे? 8 अल्लाह
सर्व न्याय करणाऱ्यांमध्ये सर्वोत्तम न्यायाधीश नाही का?

# सूरह-९६. अल-अलक़

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 वाच! आपल्या पालनकर्त्याच्या नावाने (आरंभ करून) ज्याने (सर्वांना)
निर्माण केले. 2 ज्याने मानवाला गोठलेल्या (रक्तापासून) निर्माण केले. 3
वाच! तुझ्या पालनकर्त्याच्या (नावाने) जो फार उदार आहे. 4 ज्याने
(मानवाला ज्ञानप्राप्तीसाठी) लेखणीचा उपयोग करणे शिकवले. 5 मानवाला ते
सर्व शिकवले, जे त्यास माहीत नव्हते.

6 तरीही मनुष्य मगरूरीने वागतो. 7 कारण तो (आत्मनिर्भर नसतानाही)
स्वत:ला आत्मनिर्भर समजतो. 8 सर्वांना तुझ्या पालनकर्त्याकडेच परत जायचे
आहे — यात शंकाच नाही. 9 तुम्ही त्या माणसाला पाहिले आहात? जो
रोखतो, 10 प्रार्थना करणाऱ्या आमच्या एका भक्ताला (नमाज़ापासून). 11
असा माणूस मार्गदर्शन लाभलेला आहे, असे तुम्हाला वाटते का? 12 की तो
(मार्गदर्शन लाभलेला आहे, जो) अल्लाहचे भय बाळगण्याची ताकीद देतो?
13 तुम्ही कधी या गोष्टीचे अवलोकन केला आहात का की, (हा रोखणारा
माणूस) कशाप्रकारे सत्य नाकारून त्याकडे पाठ फिरवतो? 14 त्याला याची

जाणीव नाही का की, अल्लाह सर्व काही पाहत आहे? 15 त्याला हे कळायला हवे! त्याने हे थांबवले नाही, तर त्याला आम्ही अवश्य पकडू आणि त्याच्या कपाळावरचे केस धरून त्याला फरपटत नेऊ. 16 त्या खोट्या व अपराधी कपाळावरचे (केस आम्ही पकडू). 17 तेव्हा त्याने (आपल्या मदतीसाठी) आपल्या साथीदारांना बोलावून घ्यावे. 18 आम्हीही नरकाच्या रखवालदारांना बोलावू. 19 कदापि नाही, तुम्ही त्याचे म्हणणे कदापि मान्य करू नका, तर (अल्लाहसमोर नमाज़ामध्ये) नतमस्तक व्हा व त्याचे सान्निध्य प्राप्त करा.

# सूरह–९७. अल–क़द्र

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 आम्ही या (कुराणाच्या) प्रकटीकरणाची (सुरुवात) भाग्य निश्चित करण्याच्या रात्री केलेली आहे. 2 तुम्हाला काय माहीत, त्या रात्रीचे महत्त्व काय आहे? 3 ती (एक) रात्र हजार महिन्यापेक्षा अधिक उत्तम आहे. 4 त्या रात्री (असंख्य) स्वर्गदूत व (प्रमुख स्वर्गदूतांपैकी एक असलेला जिब्रील हा) स्वर्गदूत आपल्या पालनकर्त्याच्या परवानगीने प्रत्येक गोष्टीसंबंधाने त्याचे आदेश घेऊन (पृथ्वीवर) उतरतात. 5 पहाट होईपर्यंत ती रात्र शांतता (व सुरक्षिततेची) रात्र आहे.

# सूरह–९८. अल–बय्यिनह

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 पूर्वीच्या ग्रंथधारकांपैकी आणि अनेकेश्वरवादी लोकांपैकी जे लोक सत्य नाकारण्यावर आग्रही आहेत, ते तोपर्यंत अश्रद्धेपासून परावृत्त होणार नव्हते जोपर्यंत त्यांच्याकडे सत्याचे (पूर्णपणे) स्पष्ट प्रमाण येत नाही. 2 म्हणजे अल्लाहकडून असा एक पैगंबर, त्यांना पवित्र ग्रंथ वाचून दाखवणारा (त्यांच्याकडे यावा). 3 आणि त्या

ग्रंथात सरळ व स्पष्ट आदेश लिहिलेले असावेत. 4 (पण) पूर्वीच्या ग्रंथधारकांकडे स्पष्ट प्रमाण येऊन पोचल्यानंतरच त्यांच्यात फाटाफूट झाली. 5 त्यांना केवळ अशी आज्ञा देण्यात आली होती की, त्यांनी अल्लाहप्रति पूर्ण समर्पणभाव बाळगून आणि श्रद्धेच्या बाबतीत एकाग्रचित्त होऊन त्याचीच उपासना करावी, आणि नित्य नमाज़रूपी प्रार्थना करावी आणि ज़कातरूपी दानकार्य करावे, कारण हाच नेहमी खरा धर्म (राहिलेला) आहे. 6 नि:संदेह, पूर्वीच्या ग्रंथधारकांपैकी सत्य नाकारणारे आणि अनेकेश्वरवादी लोक नरकाच्या आगीत प्रवेश करतील आणि तिथे कायम वास्तव्य करतील. हे नरकवासी संपूर्ण जीवसृष्टीत सर्वात वाईट प्राणी होत. 7 नि:संदेह, जे लोक श्रद्धा धारण करून, चांगली कामे करतात ते, संपूर्ण जीवसृष्टीमध्ये सर्वात चांगली निर्मिती आहे. 8 त्यांच्यासाठी चांगला मोबदला अल्लाहकडे तयार आहे. सर्वसुखसंपन्न आणि शाश्वत अशा बागा, ज्यामध्ये पाण्याचे (नयनरम्य) प्रवाह वाहत असतील. तिथे ते कायम वास्तव्य करतील. अल्लाह त्यांच्याशी प्रसन्न आणि ते अल्लाहशी प्रसन्न. हे सर्व त्याच्यासाठी आहे, जो नेहमी आपल्या पालनकर्त्याप्रति भीतीयुक्त आदर बाळगून असतो.

# सूरह-९९. अज़-ज़िल्ज़ाल

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 जेव्हा संपूर्ण पृथ्वी (शेवटच्या) प्रलयंकारी भूकंपाने हादरवून सोडली जाईल.
2 तेव्हा ती आपले सर्व ओझे बाहेर फेकून देईल. 3 मनुष्य (तिला असे
पाहून) ओरडू लागेल, ‘तिला झाले तरी काय?’ 4 त्या दिवशी ती (तिच्यावर
घडलेल्या) सर्व घटना कथन करू लागेल. 5 कारण तुमच्या पालनकर्त्याने
तिला असे करण्याची आज्ञा केलेली असेल. 6 त्या दिवशी सर्व माणसे
वेगवेगळ्या गटांत समोर येतील, ते यासाठी की, त्यांनी केलेली कर्मे त्यांना
दाखवता यावीत. 7 तेव्हा ज्याने अगदी लहानसेदेखील पुण्यकर्म केलेले

असेल, ते (आपल्या डोळ्यांनी) तिथे पाहून घेईल. 8 तसेच ज्याने अगदी
लहानसे वाईट कृत्य केलेले असेल, तर तेही (आपल्या डोळ्यांनी) तिथे
पाहून घेईल.

# सूरह–१००. अल–आदियात

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 त्या घोड्यांची शपथ, जे धापा टाकत धावतात 2 जे आपल्या टापांनी
आगीच्या ठिणग्या उडवितात 3 जे भल्या पहाटे भरधाव वेगाने जाऊन (शत्रूवर)
हल्ला चढवतात. 4 युद्ध क्षेत्राच्या परिसरात सर्वत्र धुळीचे लोट उडवितात. 5
आणि शत्रूच्या सैन्याच्या मधोमध शिरतात. 6 मनुष्य आपल्या पालनकर्त्याप्रति
फार कृतघ्न आहे — यात शंकाच नाही. 7 आणि तो याबद्दल स्वत: साक्षी
आहे. 8 आणि तो धनसंपत्तीच्या मोहात वाईटरित्या गुरफटलेला आहे. 9 त्याला
त्या (अंतिम दिवसाची) जाणीव नाही का, जेव्हा कबरींमध्ये असलेल्यांना
उठवून बाहेर आणले जाईल. 10 आणि लोकांच्या हृदयांमध्ये जे–जे दडलेले
होते, ते सर्व उघड केले जाईल. 11 त्या दिवशी त्यांचा पालनकर्ता त्यांना
दाखवून देईल की, तो त्यांच्याविषयी नेहमी पूर्ण जाणीव ठेवून होता.

# सूरह–१०१. अल–क़ारिआ

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 ती अचानक येणारी आपत्ती! 2 किती भयंकर असेल ती अचानक येणारी
आपत्ती! 3 ती भयंकर आपत्ती कशी असेल, हे तुम्हाला काय माहीत? 4 (जेव्हा
ती येईल) तेव्हा संपूर्ण मानवजात विखुरलेल्या पतंगासारखी झालेली असेल. 5
आणि पर्वत पिंजलेल्या लोकरीप्रमाणे झालेले असतील. 6 तेव्हा ज्याच्या चांगल्या
कर्मांचे पारडे जड असेल, 7 त्याला सर्वसुखसंपन्न जीवन लाभेल. 8 याउलट

ज्याचे सत्कृत्यांचे पारडे हलके असेल. [9] नरकाच्या केंद्रस्थानी त्याचे ठिकाण असेल. [10] ते केंद्रस्थान म्हणजे काय, हे तुम्हाला काय माहीत? [11] भयानक धगधगती ती आग आहे.

## सूरह-१०२. अत-तकासुर

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] (लोकांनो!) अधिकाधिक (धन) प्राप्त करण्याच्या लालसेने तुमचे मन (अल्लाहपासून) विचलित करून ठेवलेले आहे. [2] आणि तुम्ही कबरीत पोहोचेपर्यंत तुमचे असेच सुरू असते. [3] पण तुम्हाला लवकरच कळून चुकेल. [4] अर्थातच, तुम्हाला लवकरच कळून चुकेल. [5] तुम्हाला कदाचित खात्रिपूर्णरित्या उमजले असते, (तर गफलतीत राहिला नसता) [6] की, तुम्ही नरकास अवश्य पाहाल. [7] आणि तुम्हाला खात्री पटेल, अशा रीतीने पाहाल [8] आणि त्या दिवशी (जगात तुम्ही उपभोगलेल्या ईश्वरीय) कृपाप्रसादांविषयी जाब विचारले जाईल.

## सूरह-१०३. अल-अस्र

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] निघून जाणारा वेळ (म्हणजेच मानवाचा इतिहास) साक्षी आहे [2] की, मनुष्य हा नेहमी तोट्यातच आहे, यात शंका नाही. [3] पण यास अपवाद फक्त ते लोक आहेत, जे श्रद्धा धारण करून सत्कर्मे करतात आणि एकमेकांना सत्याशी (आपले नाते अढळ ठेवण्याविषयी) उपदेश करीत असतात. आणि जे एकमेकांना सहनशीलतेचे पालन करण्यासाठी उपदेश करतात.

## सूरह-१०४. अल-हु-म-ज़ह

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] लोकांची पाठीमागे निंदा करणारा व टोमणे मारणारा नाश पावणार आहे! [2] जो (आपल्याभोवती भरपूर) धनसंपत्ती गोळा करतो, आणि ती मोजत असतो. [3] त्याला वाटते की, त्याचे धन सदैव त्याच्याबरोबर असेल. [4] कदापि नाही, त्याला तर चुराडा करून सोडणाऱ्या शिक्षागृहात फेकून देण्यात येईल. [5] आणि ते 'चुराडा करणारे शिक्षागृह' म्हणजे काय, तुम्हाला काय माहीत? [6] तिथे अल्लाहने भडकाविलेली आग आहे. [7] जी (अपराध्यांच्या) हृदयांपर्यंत जाऊन पोहोचेल. [8] सर्व बाजूंनी तिच्यात त्यांना बंद करून टाकण्यात येईल. [9] तिच्या लोळांच्या उंच-उंच स्तंभामध्ये.

# सूरह-१०५. अल-फ़ील

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] तुम्हाला अल्लाहने त्या हत्तीवाल्या सैन्याबरोबर कसा व्यवहार केला, याची जाणीव नाही का? [2] त्याने त्यांची योजना उधळून लावली नाही का? [3] आणि त्याने त्यांच्यावर उडणाऱ्या प्राण्यांचे थवेच्या थवे पाठविले. [4] ज्यांनी त्यांच्यावर मातीच्या दगडांचा वर्षाव केला. [5] मग शेवटी अल्लाहने त्यांना खाऊन फेकलेल्या भुशाप्रमाणे करून टाकले.

# सूरह-१०६. कुरैश

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] (मक्कावासी) कुरैश सुरक्षित राहावे म्हणून [2] हिवाळा व उन्हाळा या काळात त्यांच्या प्रवासांदरम्यान त्यांना सुरक्षा लाभावी म्हणून (अल्लाहने त्याच्या घरापाशी वसवून त्यांना हे फायदे दिले). [3] तर त्यांनीही या घराच्या (म्हणजे काबाच्या) पालनकर्त्याची उपासना करावी. [4] ज्याने त्यांना भुकेले असताना खाऊ घातले. आणि (कोणत्याही प्रकारच्या) धोक्यापासून त्यांना भयमुक्त केले.

# सूरह-१०७. अल-माऊन

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 तुम्ही त्या माणसाचे कधी (चिंतनपूर्वक) अवलोकन केले आहात का,
जो न्यायाच्या दिवसाला नाकारतो? 2 जो अनाथांना धक्के देऊन हाकलून
लावतो. 3 आणि गरजू लोकांना खाऊ घालण्यास कोणालाही कधीही प्रेरित
करीत नाही. 4 असे नमाज़ी लोक नाश पावणार आहेत. 5 ज्यांना नमाज़च्या
हकिगतीचे भान नाही. 6 जे (कधी चांगले कृत्य केले तर) लोकांना दाखवण्याच्या
उद्देशाने करतात. 7 आणि जे साधी गरजेची वस्तूही कोणाला देत नाहीत.

# सूरह-१०८. अल-कौसर

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 (पैगंबर!) आम्ही तुम्हाला विपुल भलाई प्रदान केलेली आहे. 2 तर तुम्ही
आपल्या पालनकर्त्याची नमाज़रूपी प्रार्थना करा आणि त्याच्यासाठी त्याग करा. 3
निःसंदेह, तुमचा तिरस्कार करणारा तुमचा शत्रूच (सर्व चांगल्या गोष्टींपासून) वंचित
राहणार आहे.

# सूरह-१०९. अल-काफ़िरून

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

1 सांगा, ‘हे सत्य नाकारणाऱ्या लोकांनो! 2 मी त्यांची उपासना करीत
नाही, ज्यांची उपासना तुम्ही करता. 3 तसेच तुम्ही त्याची उपासना करीत
नाही, ज्याची उपासना मी करतो. 4 मी त्यांची उपासना कदापि करू शकत
नाही, ज्यांची उपासना तुम्ही करता. 5 तसेच ना तुम्ही त्याची उपासना कधी
कराल, ज्याची उपासना मी करतो. 6 तुमचा धर्म तुम्हाला लखलाभ आणि

माझा धर्म मला.’

# सूरह–११०. अन–नस्र

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] जेव्हा अल्लाहचे साहाय्य पोचते व (परिणामी) विजय प्राप्त होतो. [2] आणि तुम्ही पाहता की, लोक मोठ्या संख्येने अल्लाहच्या धर्मात प्रवेश करीत आहेत. [3] तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीसह त्याचे महिमागान करा. आणि त्याच्याकडे क्षमायाचना करा. तो सदैव क्षमा करण्यास तयार असतो.

# सूरह–१११. अल–लहब

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] (हातवारे करून पैगंबराला अपशब्द बोलणाऱ्या) अबू लहबचे दोन्ही हात तुटून पडो! आणि त्याचा सर्वनाश होवो! [2] ना त्याची धनसंपत्ती, ना त्याची कमाई त्याच्या कामी येईल. [3] तो लवकरच नरकाच्या धगधगत्या आगीत प्रवेश करील [4] आपल्या त्या पत्नीबरोबर, जी इंधन सोबत घेऊन फिरणारी आहे (म्हणजे त्याच्या वाईट कृत्यांना प्रोत्साहित करणारी ती, त्याच्याबरोबर नरकात प्रवेश करील). [5] तिच्या गळ्याभोवती पीळदार दोर असेल.

# सूरह–११२. अल–इख़लास

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] (पैगंबर! हे लोक अल्लाहविषयी विचारतात), तुम्ही त्यांना सांगा, ‘अल्लाह एकच आहे, [2]तो आत्मनिर्भर (व स्वयंपूर्ण) आहे. [3]ना तो कोणाला (अपत्यरूपी) जन्म देतो. ना तो कोणापासून जन्माला आलेला आहे (असा आहे अल्लाह).

[4]आणि त्याच्यासारखा दुसरा कोणीच नाही.’

# सूरह–११३. अल–फ़लक़

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] (पैगंबर!) सांगा, 'सकाळ निर्माण करणाऱ्या पालनकर्त्याचे मी शरण प्राप्त करू इच्छितो. [2] त्याने निर्माण केलेल्या प्रत्येक गोष्टीच्या अपायापासून (स्वत:ला वाचविण्यासाठी). [3] आणि रात्रीच्या अपायापासून, जेव्हा ती सर्वत्र (अंधार) पसरवते. [4] तसेच त्यांच्या अपायापासून, जे काही गूढ प्रयास करून फुंकर मारतात. [5] तसेच मत्सर बाळगणारा जेव्हा मत्सर बाळगतो, त्याच्या अपायापासून वाचण्यासाठी (त्याचे शरण आवश्यक आहे).'

# सूरह–११४. अन–नास

आरंभ अल्लाहच्या नावाने जो अत्यंत दयाळू व कृपाळू आहे.

[1] (पैगंबर!) सांगा, 'मी लोकांच्या पालनकर्त्याचे शरण प्राप्त करू इच्छितो, [2] जो लोकांचा सर्वाधिपती [3] (व) लोकांचा ईश्वर आहे, [4] जो लपून बहकाविण्याचे काम करतो अशा (सैतानाच्या) अपायापासून (स्वत:ला वाचवण्यासाठी मला त्याचे शरण हवे आहे.) [5] जो लोकांच्या मनात वाईट विचार भरतो, [6] मग तो जिन्नांपैकी असो वा मनुष्यांपैकी.'

# कुराण
## मराठी अनुवाद

कुराण ईश्वरीय ग्रंथ आहे. तो मूळ अरबी भाषेत पूर्णपणे सुरक्षित आहे. अशा ग्रंथाचे भाषांतर मूळ ग्रंथाशी कदापि बरोबरी करू शकत नाही. पण याचा अर्थ असा कदापि होणार नाही की, जो माणूस अरबी भाषा जाणत नाही, तो कुराण समजू शकत नाही. कुराण जरी अरबी भाषेत असले तरी, वस्तुतः ते मनुष्याच्या स्वाभाविक भाषेत आहे.

प्रत्येक ग्रंथाचा एक उद्देश असतो, कुराणाचा उद्देश मनुष्याला ईश्वराच्या निर्मिती योजेनेची जाणीव करून देणे आहे, जेणेकरून मनुष्यासमोर हे स्पष्ट होऊन जाईल की, ईश्वराने हे विश्व का निर्माण केले, मनुष्याला पृथ्वीवर वसवण्यामागे ईश्वराचा काय हेतु आहे, मृत्युपूर्वीच्या जीवनात ईश्वराला मनुष्याकडून काय अपेक्षित आहे आणि मृत्यूनंतरच्या जीवनात मनुष्याला कशाला तोंड द्यावे लागणार आहे. मनुष्य ईश्वराची शाश्वत निर्मिती आहे. मनुष्याचा जीवन-प्रवास मृत्युनंतर देखील कायमस्वरूपी सुरू असतो. कुराण मनुष्याच्या समस्त जीवन-प्रवासासाठी मार्गदर्शक ग्रंथ आहे.

GOODWORD

www. cpsglobal.org
www.goodwordbooks.com

The Quran-Marathi
ISBN 978-93-5179-076-1
9 789351 790761